# समग्र सावरकर वाङ्मय

## खंड ४ था

## वाङ्मय विभाग

या खंडात स्वातंत्र्यवीर सावरकर यांनी बाल वयात लिहिलेले निबंध, विलायतेत असताना लिहिलेली 'लंडनची बातमीपत्रे,' श्रद्धानंद साप्ताहिकात लिहिलेले निवडक निबंध व 'गरमागरम चिवडा,' किर्लोस्कर, स्त्री इत्यादि मासिकातून लिहिलेले निबंध, सावरकरांची विविध विषयावरील निवडक भाषणे व अगदी अलीकडे त्यांनी लिहिलेली 'हिंदुराष्ट्राच्या अितिहासातील सहा सोनेरी पाने' या सर्वांचा समावेश केला आहे.



समग्र सावरकर वाङ्मय प्रकाशन समिति

महाराष्ट्र प्रांतिक हिंदुसभा, पुणें

मूल्य रु. १५

# समग्र सावरकर वाङमय

## खंड ४ था – वाङमय विभाग

## अनुक्रमणिका

मनुस्मृतीतील महिला



स्वा. सावरकरांचीं भाषणें

(अुत्तरार्ध) प्रकरण



## सोनेरी पान सहावे

# समग्र सावरकर वाङ्मय

## खंड ४ था

## वाङ्मय विभाग

### १. सर्व पेशव्यांत थोर पेशवे कोण व ते कां याचीं कारणें

रत्न म्हटलें की ते टाकाऊ असें नसावयाचेच, परतु त्यातल्या त्यात कोहिनूरची दीप्ति जशी काही निराळीच, किंवा देव म्हटले की सर्व वद्य, पण त्यातही महादेव जसे सर्व जगास महावद्य होऊन बसले आहेत, त्याचप्रमाणे ज्यानी प्रथम मोडकळीस आलेल्या स्वातन्त्र्यप्रासादाचा जीर्णोद्धार केला ते बाळाजी विश्वनाथ, ज्यानी आपल्या बाहुबलाने व सदगुरुप्रसादाने सर्वातीचे मजले त्या प्रासादावर उठविले ते बाजीराव-चिमणाजी, व ज्यानी आपल्या पितृपितामहाच्या अचाट घाडमाला व कीर्तीला साजेल अशा रीतीने कैव शत्रूस दाती तृण धरावयास लावून त्या विस्तीर्ण व भव्य प्रासादाची पूर्णता करून त्यावर हिंदुपदपादशाहीचा देदीप्यमान जरीपटका रोविला ते बाळाजी बाजीराव व दादा भाऊ, हे सर्व थारातले थोर व वीरातले वीर होतेच, पण ह्या अमोल वैजयंती-मालिकेत कौस्तुभमणीचे ठायी शोभणाऱ्या राव माधवरावाची थोरवी काही विलक्षणच! जमीन कितीही जरी सुपीक असली, तरी काही काळाने जशी ती निःसत्त्व होत जाते त्याचप्रमाणे भट-कुलभूमिवेने माधवरावाना जन्म दिल्यापासून ती निःसत्त्व होत गेलीसे दिसते.

आता हेंही खरें आहे की, प्रसंग हा मानवी प्राण्याच्या गुणसिंधूला भरतें आणणारा चंद्र होय. (प्रसंगाशिवाय मनुष्याच्या अंगचे गुण वनात सुकलेल्या गुलाबाच्या पुष्पाप्रमाणे होत.) माधवरावांच्या अंगी जे-जे गुण वास करीत असलेले आपणांस दिसतात, ते-ते पूर्वीच्या पेशव्यांचे अंगी नसतील असें नाही; व त्याच कारणांनी त्यांच्या त्या अदृश्य गुणांची आपल्याला कल्पना होणें नाही. माधवराव गादीवर आले त्या वेळची संकटपरंपरा व अत्यंत दुस्तर परिस्थिति, व त्यातून माधवराव निभले ही गोष्ट, ह्या दोन गोष्टी ऐकताच त्यांच्या अजब कर्तृत्वशक्तीने मनुष्य थक्क होतो ! ' व्यावर्तितातपरुजः प्रथमाभ्रवृष्टया वृक्षस्य वैद्युत इवाग्निरिव स्थितोऽयम् ।' याप्रमाणे हिंदुपदपादशाहीची पानपतच्या भयंकर रणकंदनाने दुर्दशा झाली आहे; दोन लाख बांगडी फुटल्याने महाराष्ट्रातील प्रत्येक घरातून अबलांच्या हृदयद्रावक किंकाळ्या व वृद्ध मातापितरांचे हंबरडे ऐकू येताहेत; स्वराज्यप्रासादाचे स्तंभ जे सरदार लोक, ते खाल्ल्या घरचे वासे मोजू लागले आहेत; नुकताच अुद्‌गीरचे लढाअीत वडविलेला निजाम, म्हैसूरचा हैदर, रोहिलखंडचा नजीब, अयोध्येचा नबाब असे अेक ना अनेक कोल्हे क्षणभर क्षीण झालेल्या मराठी सिंहास मृतप्राय मानून त्याच्या मांसाची वाटणी करण्यास अुद्युक्त झाले आहेत; एका दोन महिन्यात स्वकुलगृहाचे तीन आधारस्तंभ पडल्याने वरली अिमारत डळमळू लागली आहे; आजपर्यंत कोणत्याही पेशव्याला अननुभूत असा फितूरराहू महाराष्ट्रराज्येंदूला ग्रासू पाहत आहे व होळकर, भोसले, बुंदेले अित्यादि कृतघ्न सरदार ज्याचें अन्न खाल्लें त्याची अशी स्थिति असता खुशाल तमाशा पाहत अुभे आहेत व आपापली तुंबडी कशी भरते या आपस्वार्थी चिंतेत निमग्न आहेत — अशा अत्यंत आणीबाणीच्या प्रसंगी १७ वर्षांचे पोर, की ज्या वयात स्वतःचे शरीराचीही शुद्ध नसते, अशा अल्प वयात आमचा राजबिंडा माधव, प्रपितामहांनी संपादन केलेल्या व पितृपितामहांनी अटकेस नेअून भिडविलेल्या जरीपटक्याचा असह्य तोल सभाळण्यास दंड ठोकून अुभा तो काय राहतो व कविकुलमुकुटमणीच्या

' भुवमधिपतिर्बालावस्थोऽप्यलं परिरक्षितुं
न खलु वयसा जात्यैवायं स्वकार्यसहोभरः ।'

ह्या वचनास यथार्थ करून अेका दहा वर्षांत झंझावाताप्रमाणे वरील अभ्रपटल पार विध्वसून टाकून महाराष्ट्रस्वराज्याकाश निर्मल ते काय करतो ! ! खरोखर अमल्य प्रसंगी जर थोरले माधवरावांविरहित कोणताही पेशवा गादीवर असता तर त्याला अितक्या बेमालूम रीतीने ही सर्व संधानें साधणें अशक्य होते ! कारण माधवरावांच्या वेळेला अितकी कठीण परिस्थिति आली होती की, ती पूर्वी कोणत्याच पेशव्याच्या वाट्यास आली नव्हती. शिवाय माधवरावापेक्षा पूर्वीच्या तिघाही पेशव्यांना पुष्कळ अधिक सवलती होत्या. बाळाजी विश्वनाथाला जसा शाहू महाराजांचे

जबर पाठपुरावा होता तसा माधवरावांना कोणाचाच नव्हता. शिवाय बाळाजी विश्वनाथांपेक्षा राज्यशकटपालन माधवरावाचे वेळेस किती पट तरी दुस्तर झालेलें होते, हे वरील वर्णनावरून दिसेलच. बाजीरावाशी तुलना करू लागले असताही असें आढळून येईल की, त्याच्यापेक्षा जास्त जबाबदारीची कामे माधवरावास पार पाडावी लागली. त्यांस अेक तर चिमणाजी अप्पासारखा कोणी जोडीदार सहकारी नव्हता. शिवाय शिंदे-होळकरादि सरदारांची प्रस्थें बाजीरावाच्या वेळेस बिलकुलच डोअीजड नव्हतीं व अितकी कृतघ्नही बनलीं नव्हतीं. बाजीरावाला मोठा व कायमचा शत्रु म्हटला म्हणजे काय तो अेकटा निजाम; पण माधवरावाच्या वेळेला तो निजाम तर होताच, पण हैदर व अिंग्रज, रोहिले, रजपूत ! साराश हिंदुस्थानीं सर्व राजे पेशवाअीच्या नाशाकरिता ' व्रणार्त पशुच्या शिरावरि घनी अुभे काकसे ' राहिले होते ! बाजीरावाला कर्जाचा जाच सोसावा लागला तर तो आमच्या माधवरावानाही सुटला असें नाही ! अशा रीतीने बाजीरावापेक्षा खडतर स्थितीत सापडूनही ज्यांनी खच्ची झालेल्या राज्यवृक्षाचा जोम ' की तोडिला तरु फुटे आणखी भराने ' ह्या न्यायाने वृद्धिंगत केला त्याची थोरवी काय वर्णन करावी ? आपल्या नातवाचें हे अवर्णनीय चातुर्य पाहून त्या पितामहानी मात्सर्यरहित होअून स्वर्गी आश्चर्याने तोंडात बोटच घातलें असेल ! आता नानासाहेबासंबंधाने पाहिले तर त्याना शूर, चतुर व कारस्थानी अशा भाअू-दादाचें साह्य होतें; सर्व सरदार लोक आपापल्या अिमानास जागत होते; 'विभवयशाचे सदैव पोशिंदे ' असे तुकोजी, दत्ताजी व जनकोजी शिंदे व ' रिपुसि महादर देते ' राजेबहाद्दर व समशेरबहाद्दर असलेला अेकेक वीर हातावर शिर घेअून अुच्चारलेला शब्द सिद्धीस नेण्यास खडे होते व छत्रपतीच्या वेळेपासून मराठ्याचा बसलेला अद्भुत दरारा कायम होता ! शिवाय घरात फितुराने पोसरण्यास आरंभ केला नव्हता. पण ह्या सवलतींपैकी अेक तरी सवलत रावसाहेबास मिळाली काय ? नाही, अगदी नाही ! सर्व प्रकार याच्या अगदी उलट ! पण त्या पठ्ठ्याने या संकटास भीक घातली काय ? बिलकुलच नाही. त्यानी भ्रातृपितृपितृव्यशोकाचे असह्य अुमाळे दाबून टाकून काकाचा शब्द तिथवर बोज ठेवला व तोच त्याचा क्रम जेव्हा मर्यादातिक्रम करू लागला त्या वेळेस कोणाच्याही आधाराची वा दपटशहाची पर्वा न करता सामदडादि साधनाने योग्य शासन देअून आधी घरातील कलह मिटविला; ' सख्या विठ्ठलाच्या ' जगप्रसिद्ध शहाणपणाला बिल्ली माजर बनविले; राक्षसभुवनच्या लढाअीत स्वतःच्या शौर्याची व कर्तबगारीची कमाल करून निजामाची हड्डी नरम केली; फितुरी रघुजीला यथेच्छ चोप दिला; हैदरला तर वेळोवेळी चीत केले; रोहिल्याचा सूड अुगविला; रजपुताना वठणीवर आणलें व शिवाय दिल्ली बहुतेक हाताखाली घातली ती निराळीच ! साराश, भयंकर वादळाच्या तडाख्यात गवसलेल्या व समोरील खडकावर आपटून छिन्नविछिन्न

होण्याच्या बेतात आलेल्या तारवास जसा अेखादा कुशल कर्णधार मिळावा व त्याने त्यास अलगत तीरास न्यावें, त्याचप्रमाणे मोठया शिताफीने माधवरावाने स्वराज्यास त्या वेळेस जगविलें !

ही नुसती राजकीय गोष्टीत तुलना झाली. पण प्रजावात्सल्य, मनुष्याची पारख, अिभ्रत, शौर्य, कारस्थानीपणा वगैरे जे-जे काही म्हणून राजाला अवश्य पाहिजे ते ते माधवरावाच्या अंगी अेकवटले होते ! माधवरावाच्या अंगी बाळाजी विश्वनाथाप्रमाणे व बाळाजी बाजीरावाप्रमाणे कारस्थानपटुत्व होते, बाजीरावाप्रमाणे शूरत्व, व धाडस होते, शिवाय मनुष्याची पारख करण्याच्या कामात तर त्याची कमाल होती ! तमल्या अल्पवयात जी-जी मनुष्ये त्याने निवडली त्यात अेकही टाकाअू निघाला नाही ! नाना फडणीस, रामशास्त्री, महादजी शिंदे, त्रिंबकराव मामा पेठे अित्यादि त्याची मंडळी यच्चयावत् आपापल्या सद्गुणतेजोराशीने भारतेतिहासात लखाखत आहेत ! तसेच प्रजावात्सल्याच्या कामी ते किती दक्ष असत हे, बिगारी धरण्याची त्याने बंदी केली ह्या गोष्टीवरुनही दिसून येअील. साराश, पूर्वीच्या सर्व पेशव्यांचे गुण पुष्कळ पटीने गुणीभूत होअून माधवरावाच्या अंगात अेकवटले होते व म्हणूनच ते म्हणजे श्रीमंत माधवराव बल्लाळ अुर्फ थोरले रावसाहेब पेशवे, हे सर्व पेशव्यात अति थोर होते अितकेच नव्हे तर, जगात आजवर जे कोणी नामांकित राजे होअून गेले त्यांच्या मालेच्या मध्यभागी आमच्या ह्या भारतीय रत्नाला गुंफण्यास बिलकुल हरकत नाही

—करमणूक दि २८-१२-१९००

+ + +

## २. अैतिहासिक पुरुषांचे अुत्सव कां करावे ?

प्रत्यास अुत्तेजन द्यावे व जी जी दुष्कृत्यें असतील ती ती पुन न घडतील असा बंदोबस्त करावा, त्या सर्वांनी अेकमेकाशी ओश्वरदत्त नीतीचे अतिक्रमण न करता प्रेमाने वागावे व हे कुटुंब न्याय, पुण्य व आनद ह्यांचे माहेरघर बनावे याबद्दल तो विश्वसृट् परमेश्वर नेहमी तत्पर झालेला असतो आपल्या असख्य कौटुंबिकापैकी स्वभाव सादृश्यानुरूप तो निरनिराळे वर्ग करतो व त्या प्रत्येक वर्गास तत्तद्रुचि-सादृश्याच्या अनुरोधाने तो वर्तनाचे अुत्तम नियम घालून देतो ह्याचे वर्तन-नियमांस धर्मपथ म्हणतात. ज्याप्रमाणे तो नियमाचे हे वर्गीकरण करतो त्याचप्रमाणे ह्या नियमाग व ज्या वर्गासाठी ते नियम केलेले असतात त्या वर्गास अनुकूल, व अवश्य अशी अेखादी स्वतत्र खोली तो आपल्या विश्वरूपी विस्तीर्ण गृहात निवडून देतो आपल्या सामान्य खोलीला पाण्याचे जसे नळ आणलेले असतात त्याप्रमाणे तोही त्या खोलीत मोठमोठ्या नद्या आणून पाण्याची अुत्कृष्ट सोय करतो त्याच्या आहाराम अवश्य तेवढे खाद्य देअील असे धान्याचे कोठारही जमिनीचे रूपाने तेथे तयार केलेल असते दुसऱ्या कोणी ह्या खोलीस अुपरोध करू नये व सीमेसबधाने घोटाळा अुडू नये म्हणून ह्या खोल्यामोवती तो परमेश्वर पर्वताच्या भिती घालतो व ह्या सर्व कौटुंबिकाचे दळणवळण कायम राहावे म्हणून त्या पर्वताच्या भितीना खिडीचे रूपाने मोठमोठी दार ठेवतो अशा या निरनिराळ्या खोल्याना व्यावहारिक भाषेमध्ये देश अशी सज्ञा आहे या निसर्गविरचित खोल्यामध्ये जेथे ज्याची योजना असेल तथे व तेवढ्यातच त्यानी सुखासमाधानाने राहावे अशी त्या परमजनकाची आज्ञा असते सर्वांचे कल्याण सारखेच करण्याची त्याची अिच्छा असल्याने वरील निवडणुकीत त्याजकडून यत्किचितही पक्षपात झालेला नसतो पण ह त्याचे नि पक्षपातित्व कित्येक अदूरदर्शी मूर्ख लोकास न कळून त महत्त्वाकाक्षेच्या फेऱ्यात सापडतात त्यास जी खोली परमेश्वराने दिलेली असते तिने त्याची तृप्तता होत नाही त्यास दुसऱ्याच्या खोल्या हिसकावून घेण्याची अपहारबुद्धि उत्पन्न होते व बळी तो कान पिळी ह्या न्यायाने हे दुष्टबुद्धि स्वजातीयावरच हल्ला करून त्याना आपल्या कब्जात आणतात मग आपले वर्तननियमच सर्वोत्कृष्ट अशी चुकीची समजूत करून घेअून ते त्या जित लोकानी पाळावेत असा जुलूम करू लागतात अशा रीतीने त्या सर्वशक्तिमानाच्या अिच्छेविरुद्ध व मानवी जातीच्या कल्याणा-विरुद्ध जेव्हा जेव्हा कोणच्याही प्रकारचा घोटाळा अुडतो व विश्वकुटुंबाची व्यवस्था डळमळते तेव्हा तेव्हा तो घोटाळा मोडून टाकून न्यायाचा विजय करून ‘ अधमासी मारोनी सुजना ताराया ’ तो जगत्पालक, निरनिराळ्या अशानी निरनिराळ्या विभूतीचे ठायी दृग्गोचर होतो व त्याचेकडून ती ती अुद्दिष्ट महत्कार्ये घडवून आणतो ह्याच विभूतीना परमेश्वराचे अशभूत म्हणून कोणी अवतारी किंवा दैविक पुरुष म्हणतात किंवा त्याच्या महत्कृत्यानीच अितिहास अुत्पन्न होत असल्याने कोणी त्यास अैतिहासिक पुरुष म्हणतात

असल्या सत्पुरुषाचे आयुष्य हे त्याच्या स्वत साठी नसते ते 'जगाच्या कल्याणासताच्या विभूति' असतात. त्याच्या ठायी औश्वरी अंशाचा संभव असल्याने त्याचे सर्व काही आपणा सामान्य जनाहून अुच्चतर असते त्याचे हात स्वोदरपूर्तीस्तवच नसून अन्यायास रट्टे देअून न्यायास कुरवाळण्यासाठी असतात. त्याची दृष्टि स्वहित पाहण्यासाठीच नसून सर्व जगाचे कल्याणाकडे तिचा रोख असतो फार काय पण 'भवो हि लोकाभ्युदयाय तादृशा' अशी त्याची थोरवी असल्याने त्याचे वैभव सामान्य मतीला अेकदम ग्रहण करिता येत नाही त्याचे पराक्रम अशक्य भासतात व त्याच्या कृत्याची वर्णन बादवन्या वाटतात. अुघडच आहे, अेखाद्या कूपदर्दुराला जर 'अगाध-जल-संचारी' देवमाशाचे वर्णन सांगितले तर त्यास ते शक्य कसे वाटावे! गावाखालील ओहळालाच ज्याने पाहिले आहे त्यास समुद्राची कल्पना कशी व्हावी व जरी प्रत्यक्ष समुद्रावर नेअून त्यास अुभा केला तरी स्वत चे दृष्टीवर पूर्ण विश्वास ठेवून आपण पाहत आहोत हे सत्य आहे अशी त्याची खात्री कशी व्हावी? तद्वतच स्वार्थपरायण, महत्त्वाकांक्षी व नीचहेतु अशा आपणा सामान्य जनास त्या परार्थसाधु, निरपेक्ष व अुच्चहेतु अशा औश्वरी विभूतीच्या महत्त्वाचे अेकदम मापन करणे हे अगदी असंभवनीय आहे

परंतु अशा थोर विभूतींच्या महत्त्वाचे मापन करणे जरी अशक्य असले तथापि त्यानी केलेल्या कृत्याचे महत्त्वमापन करणे सामान्य जनासही शक्य होते श्रीरामचंद्राचे पराक्रम जरी प्रत्यक्ष कोणास करता येणारे नाहीत, तथापि त्यानी केलेल्या रक्ष क्षयाने वसुधरा हलभारा झाली ह सर्वास आकलन करता येते व आदिकवीचा 'सरमा सालकरा सुपदन्यासा सुवर्णमयमूर्ति' अशी वाणी जरी साध्य होणे अशक्य असल, तथापि त्या वाणीने विरचित झालेल्या रामायणाने जगत्त्रयावर केवढा उपकार केला आहे हे सर्वास समजते सारांश, थोर लोकाची कृत्ये करण्यास जरी सामान्यजन असमर्थ असतात तरी त्या कृत्याची व त्याच्या सुपरिणामाची थोरवी त्यास कळते व त्या योगानेच ते लोक त्या औश्वरी तेजापासून संभूत झालेल्या विभूतीवर फार प्रेम ठेवतात

ज्यावर आपल प्रेम असत, त्यासबंधी साहजिक रीतीने आपल्या मनात अेकप्रकारचा पूज्यभाव अुत्पन्न होतो ज्या मानाने ते प्रेम मोठे त्या मानाने तो पूज्यभावही मोठा असतो अवतारी पुरुषाची कृत्य विश्वकल्याणास्तव असल्यामुळे त्यावर जगताचे विशेष प्रेम वसते व ते अेकसारखे वृद्धिंगत होत असते ते प्रथम त्या सत्पुरुषाला अवतारी समजतात, पण पुढे तर प्रत्यक्ष परमेश्वरस्वरूपी मानतात त्यानी ज्या मानाने जगास अुपकृत केलेले असेल त्या मानाने त्याचेवर सामान्य जनसमूह प्रेम व अर्थात पूज्यभाव ठेवितो त्या सत्पुरुषाच्या परोपकारी कृत्यानी त्याची अत करणे आर्द्र होतात ते त्या थोराची कृत्ये जगाला कशी फायदेशीर झाली ह सागू लागतात पूज्यभावाने त्याची नामस्मरणे करतात ज्या ज्या ठिकाणी

व ज्या ज्या रस्त्यानी ते सत्पुरुष गेलेले असतील ती ती सारी स्थळे क्षेत्रे होतात. ज्या नद्याचे ते पाणी प्यायले असतील त्या नद्या परम पवित्र मानल्या जातात व ज्या दिवशी त्याचे जन्म किंवा निधन झाले असेल त्या दिवशी त्यानी केलेल्या अुपकारी कृत्याची आठवण होअून जनसमूहाची हृदये प्रेमरसाने भरून येतात! त्या त्याच्या अमर्यादित अुपकाराची यत्किंचित् तरी फेड व्हावी म्हणून त्याचे पूजन केले जाते, त्याचे भजन केले जाते, त्याचा जयजयकार होतो, व त्याच्या परम पवित्र कृत्याची गुणवर्णने गात गात सकल जनसमूह त्याचे ठायी तल्लीन होअून जातो! त्या ऐतिहासिक सत्पुरुषाचे अुत्सव करू लागतो!!

ऐतिहासिक अुत्सवाचे महत्त्व ध्यानात यावयास व ते का करावे हें पूर्णपणे जाणण्यास या अुत्सवाची ही अुत्पत्ति ध्यानात ठेवली पाहिजे. आपणावर अेखाद्याने अुपकार केला असता त्याच्या अुपकाराची फेड यथाशक्ति करावी किंवा निदान त्या त्याच्या अुपकृतीबद्दल त्याचे अखंड आभारी तरी व्हावे हा मनुष्यजातीचा निसर्गजन्य धर्म होय, व (अुपकारकर्त्याशी कृतघ्न न होता कृतज्ञ राहावे हे नीतिशास्त्राचे सार होय) याच मानवी धर्माला अनुसरून व याच नीतिशास्त्राच्या अनुरोधाने थोर सत्पुरुषाचे अुत्सव करण्याची ही चाल पाडली आहे, किंवा पडली आहे म्हणण्यापेक्षा पडली आहे म्हणणेच ज्यास्त योग्य होय! कारण मानवी धर्माला धरून ज्या चाली असतात त्या पाडाव्या लागत नाहीत. त्या चालीची अुत्पत्तिही मानवी धर्माप्रमाणेच निसर्गजन्यच असते. अेखाद्याने आपल्यावर अुपकार केला म्हणजे त्याबद्दल कृतज्ञता जशी आपोआपच जागृत होते व तिची जागृति व्हावी म्हणून जशी व्याख्याने झोडावी लागत नाहीत तद्वतच (ज्यानी आर्यधर्मास ग्लानि आली असताना नास्तिकाचे धागडधिंग्याला आळा घालून आपल्या सर्वसमर्थ वाणीने पर-पक्षीयास दीनवाणी केले व धर्माचे संस्थापन केले त्या शंकराचार्याचे, ज्यानी सर्व देश पारतंत्र्याच्या वणव्यात होरपळत — नव्हे — जळत असता आपल्या समशेरीच्या पाण्याने त्या वणव्यास विझवून वर स्वातंत्र्यामृताची वृष्टि करविली त्या छत्रपतीचे, ज्यानी महाप्रयासाने अुभारलेला स्वातंत्र्यप्रासाद आमूलाग्र डळमळत असताना केवळ आपल्याच बुद्धीच्या व लेखणीच्या टोकावर त्यास थावून धरून गोकुळात श्रीकृष्णाने अेक्या करांगुलीवर गोवर्धन कसा धारण केला हे सर्व जगाच्या प्रत्ययाला आणून दिले त्या फडणिसाचे व तत्सदृश वीरवरी-अद्भुत थोर सत्पुरुषाचे अुत्सव करण्याची चाल ही पाडावयास नको आहे! त्याचे अुत्सव हे लोकांच्या मनोमंदिरात अक्षय चाललेले असतात, सदसद्विवेक बुद्धीची त्याच्या महत्त्ववर्णनाची व्याख्याने तेथे अखंड सुरू असतात! कृतज्ञता आपल्या हाती नीराजन घेअून त्याच्या अगणित सत्कृत्यावर 'सूर्यमिव राजेन्द्र जयाला' असा प्रकाश सतत पाडीत असते! त्याचे हे अुत्सव स्वयंभू असतात.) अितकेच नव्हे तर अेकदा का ते सुरू झाले म्हणजे मग ते कोणाच्यानेही बंद करवत नाहीत. जेव्हा सद्गुणाची किंमत मनुष्यजातीस कळू

लागली तेव्हापासून हे अुत्सव सुरू झालेले आहेत जोपर्यंत सद्गुणाची ही किंमत मनुष्यजाति विसरणार नाही तोपर्यंत हे अुत्सव अबाधित व अखंड चालावयाचे आहत. थोडक्यात म्हणावयाचे म्हणजे जगाच्या अुत्पत्तीबरोबर हे अुत्पन्न झाले आहेत व जगाच्या अंतापर्यंत हे अनंत राहणार आहेत

सारांश, हे ऐतिहासिक अुत्सव अनादिकालापासून चालत आलेले असून त्याची अुत्पत्ति ही मानवी स्वभावास अनुसरून असणारी जी कृतज्ञता-बुद्धि तिच्यापासून झालेली आहे मानवी स्वभाव सर्वत्र सारखाच असल्याने कृतज्ञताबुद्धीपासून अुद्भूत झालेली ही ऐतिहासिक अुत्सव करण्याची चाल ह्या जगतीतलावरील झाडून सार्‍या राष्ट्रात थोडयाबहुत अशाने प्रचलित असतेच ते करण्याच्या पद्धतीत कालस्थित्यनुरूप भेद असेल व होईल, परंतु मूलतत्त्वामध्ये कोठेही भेद नाही श्रीरामचंद्राने दुष्ट राक्षसांचा संहार करून यज्ञयागादिकास निर्विघ्नता, ऋषिजनास अभयता व सर्व धरित्रीस निर्भयता दिली म्हणून कृतज्ञ होअून आम्ही रामजयंतीचा अुत्सव करतो तर प्रत्यक्ष सुळावरूनही तारण्यास समर्थ असा अुपदेश केला म्हणून कृतज्ञ होअून ख्रिस्ती लोक ख्रिस्तजयंतीचा अुत्सव करितात पारतंत्र्याने बद्धीभूत झालेली आर्यभूमि सुलतानी तरवारीच्या धारेवर त्या सुलतानाच्या मर्जीच्या तालावरहुकूम नाचत असताना व क्षणोक्षणी पाय चुकून किंवा जोराने पडून तिच्या सुरम्य शरीराचे तुकडे तुकडे होतात की काय अशी भीति पडली असताना धारेच्या महाराष्ट्रीय माल्याने त्या तरवारीला अचूक अुडवून त्या आर्यभूमीला अलगत मुक्त करणा‍र्‍या छत्रपतींचे, त्याच्या या अनन्य सामान्य अुपकृतीने कृतज्ञ होअून आम्ही अुत्सव करतो, तर राबर्ट ब्रूसचे स्कॉटलंडातील लोक कृतज्ञता-बुद्धि-

नवल नाही वयेची संस्कृत पद्धति किंचित् ढिली होअून जेव्हा भजनपद्धति सुरू झाली व पायात घुंगरे घालून व अेका हातात वीणा व अेकात चिपळ्या घेअून 'तुझे नामीं प्रेम देअीं अखंडीत । नेणे तप व्रत दान कांही ॥' असा करुणारव फोडीत तुकोबा पंढरीरायाचे समोर 'ब्रह्मानंदी लागली टाळी । कोण देहाते सांभाळी ॥' अशा स्थितीमध्ये जेव्हा प्रथम दिसू लागले तेव्हा त्या त्याच्या करुण-रवाबरोबर जरी लोकांची अंतःकरणे त्यास न जुमानता प्रेमरसाने विरघळत जात व त्यांचीं नयने त्या 'वैराग्ये डोलविला, माथा जेणे मुनींद्र सनकाचा।' अशा भगवद्भक्तास पाहून भक्तिरसाच्या अश्रूंनी भरून येत, तथापि फक्त परंपरागत संस्काराने त्या पद्धतीस अुघड रीतीने तत्कालीन समाजास अनुमोदन देता येअीना! अितके काय बसाला! श्रीगणपत्युत्सवाला राष्ट्रीय वळण देअून त्यात जे हा मेळ्याची नवीन पद्धति सुरू केली तेव्हा त्या पद्धतीवर प्रतिपक्षाचा कोण मारा झाला हे अजून प्रत्येकाला स्मरत असेल ! पण मजा काय की, ते प्रतिपक्षी तोंडाने मेळ्यास शिव्या देत असतानाच त्यात नाचावयास प्रवृत्त झाले व ही पद्धति हानि-कारक आहे हे सिद्ध करण्यासाठी त्याच्या बाजूचे म्हणून पुरावे मांडीत असतानाच त्या पद्धतीची अुपयुक्तता सिद्ध करू लागले !! दुष्यंताने शापमूढ स्थितीमध्ये शकुंतलेचे रमणीय रूप पाहताच त्याची जी अवस्था झाली तीच अवस्था मनोहर पण नवीन रूपे पाहून सामान्य समाजाची होते व 'न च खलु परिभोक्तुं नापि शक्नोमि हातुम्' अशा विलक्षण कुचंबळ्यात पडून तो समाज भांबावून जातो !!

परंतु अशा भांबावून गेलेल्या समाजास त्याचा भास दूर करून खरा प्रकार खऱ्या रीतीने कळविणे हे समाजधुरीणांच आद्यकर्तव्य होय समाजास आजपर्यंतचे पद्धतीप्रमाणे पुराण, कथा, भजन वगैरे प्रकारचे अुत्सवात असतात असे वाटणे साहजिक आहे व जेव्हा पुराणाचे अैवजी कोणी व्याख्यान देअू लागेल तेव्हा तो अेक प्रकारचा विलक्षणपणा होतो आहे असे वाटून त्यास चुकल्यासारखे होअील फार काय, पण समाजाच्या ओळखीचे 'दैविक पुरुष' हे नाव काढून त्याच्या बदला 'अैतिहासिक पुरुष' हे नाव घातले असताही समाजास ते नवीन वाटेल पण त्यास नीट समजाविले पाहिजे की, अैतिहासिक पुरुषाचे अुत्सव हे काही नवीन नाहीत ज्यांना तुम्ही दैविक म्हणत होतेत त्यानाच आम्ही अैतिहासिक हे जास्त व्यापक नाव देतो हे आपलेच आहे, हे परकीयापासून अुसनवार घेतलेले नाही श्रीरामाचे अुत्सव काय आपण आज करू लागलो आहोत? श्रीकृष्णाचे अुत्सव काय आजच सुरू झाले आहेत? आळंदीची यात्रा काय यंदाच भरू लागली आहे? व जर या सर्व गोष्टी पूर्वापार चालत आल्या आहेत तर मग अैतिहासिक पुरुषाचे अुत्सवाची चाल नवीन कशाने झाली? का हे सर्व प्रकार अैतिहासिकच नव्हत? श्रीरामाने रावणाचा नाश करून कित्येक राष्ट्रे स्वतंत्र केली, श्रीकृष्णाने सत्पक्ष स्वीकारून पानिपतच्या रणभूमीवर अन्यायी व अपहारी कौरवांचा नाश केला व

ज्ञानरायानी 'श्रीमद्भगवद्गीता व्याख्या केली जनासि ताराया।' ह्या गोष्टी अैतिहासिक नाहीत काय ? अितिहास ह्याच गोष्टींनी झाला नाही काय ? व जर यानी झाला नाही तर झाला तरी कशानो ? व्यर्थ नामभेदानी फसण्याचे कारण नाही देविक पुरुषाचे अुत्सव हे निराळे नसून ते अैतिहासिक पुरुषाच्या अुत्सवातच अतर्भूत आहेत व ज्या अर्थी देविक अुत्सव पूर्वीचे आहेत हे तुम्ही कबूल करता त्या अर्थी अैतिहासिक अुत्सवाची चालही पूर्वीचीच आहे श्रीरामाने आपणावर अुपकार केला त्याशी आम्ही कृतज्ञ झालो व त्याचे अुत्सव करू लागलो श्रीशिवराजानेही आपणावर अुपकार केले आहेत अर्थात् आपण त्याशी कृतज्ञ झाले पाहिजे व त्याचे अुत्सव केले पाहिजेत कोणी म्हणतात की, अशा दृष्टीने पाहिले तर आपणा हिंदुस्थानवासीयास शेकडो अुत्सव दररोज करावे लागतील होय, करावे लागतील पण त्यात बिघडले काय ? असले अुत्सव जितके करावे लागतील तितके हवेच आहेत असले अुत्सव करावे लागणे ही सामान्य गोष्ट नाही, हा असामान्य गोष्ट आहे हे भाग्य लाभण्यास पदरी फार मोठी पुण्याअी लागते हे अुत्सव म्हणजे कोणाचे अुत्सव ? हे अैतिहासिक सत्पुरुषाचे अुत्सव होत, व याची सख्या आमचे राष्ट्रात जास्त आहे म्हणजे काय ? तर अितक्या सत्पुरुषानी आमचे राष्ट्र युक्त आहे असेच म्हणणे होय अितक्या रत्नानी ही आमची राष्ट्रदेवी भूषित आहे. तिच्या कठामध्ये अितक्या कोहिनुराची माळ आहे ही यथार्थ गर्वोक्ति करण्याचे नशिबी असणे म्हणजेच सर्व पुण्याचा अुत्कर्ष होय !!! आज काय शिवाजीचा अुत्सव आहे, अुद्या गुरु नानकाचा आहे, परवा नाना फडणिसाचा आहे, असे होता होता ज्या राष्ट्रात वर्षातील ३६५ दिवस सारखे सत्पुरुष-महोत्सव सुरू राहून शिवाय बाकी अुरतातच, जेथे वर्षातील दिवस कमी पडतात पण सत्पुरुषाची सख्या कमी पडत नाही त्या राष्ट्राचे भाग्याशी कशाची तुलना करावी ? क्षीरसागर,

तेव्हा अैतिहासिक अुत्सव परकीयापासून घेतले आहेत म्हणून किंवा त्या अुत्सवास आजचे रूप मिळाले आहे म्हणून ते अुत्सवच नकोत असे म्हणणाऱ्या आक्षेपकाचा विचार झाला. रूपासबंधी जे प्रश्न आहेत त्यांचा अेकाच प्रकारचा निकाल कधी लागणार नाही. त्यास अुत्तर अितकेंच की ज्या पक्षास जे रूप संमत असेल त्या रूपात त्यांनी तो अुत्सव करावा. अखेर सद्रूपाचाच जय होअून सर्वजण त्याचेच रूप स्वीकारतील, पण रूपाशिवाय आणखीही असा अेक अैतिहासिक अुत्सवापासून तोटा दाखविण्यात येतो की, केव्हा केव्हा त्या अुत्सवापासून अेकीचा भंग होण्याचा संभव असतो, श्रीशिवाजीच्या अुत्सवापासून मुसलमानांना चीड येअील व ते आपला पुरातन द्वेष पुन्हा माजवितील. पण असे होअील हे जरी गृहीत घेतले तरी यात शिवोत्सवाचा तो दोष काय ? भारतधर्ममहापरिषद भरविल्याने व तीत श्रीमच्छंकराचार्यांचा सन्मान केल्याने सर्व बुद्धधर्मीयांशी वैर होअून मंडनमिश्राच्या वंशजास वाअीट वाटेल म्हणून ती धर्मपरिषद भरवू नये असे म्हणणे किंवा ऑस्ट्रियाला, आपल्या तोंडातून अिटली कसा हिसकावून घेतला याची आठवण होअून तो धायधाय रडू लागेल म्हणून ग्यारिबॉल्डीचा अुत्सव अिटली देशाने करू नये असे बरळणे हे जितके वेडेपणाचे व अविचाराचे होअील तितकेच किंबहुना त्याहून अधिक असमंजसपणाचे शिवोत्सवाने मुसलमान नाखूष होतात सबब तो करू नये असे म्हणणे होणारे आहे. जर मुसलमान नाखूषच होत असतील तर तो मुसलमानांचा अदूरदर्शीपणा होय. वामनपंडितांनी म्हटले आहे, 'देखोनी परिपूर्ण सुधाकर सर्व सुखी परि चोर रडे ।' शिवाय हेही ध्यानात ठेविले पाहिजे की, जे समंजस व सुशिक्षित मुसलमान आहेत ते वरील मूर्खपणास आपले बिलकुल अनुमोदन देत नाहीत. सारांश काय ? अैतिहासिक अुत्सवापासून हा तोटा होतो हे म्हणणे फोल आहे खर्च जास्त लागत असेल तर तो कमी करा, समाज प्रथम दचकत असेल तर त्यास नीट समज द्या, पण अैतिहासिक सत्पुरुषांचे अुत्सव बंद करू नका. कृतज्ञताबुद्धीने मनात अुद्भवणारा जो पूज्यभाव तोच ह्या अुत्सव-पद्धतीत फलद्रूप झालेला असतो व खेवढ्याचसाठी ते अुत्सव न करणे म्हणजे कृतज्ञताबुद्धीचा खून करणे होय.

परंतु कृतज्ञतेसाठी व फक्त कृतज्ञतेसाठीच हे अुत्सव करावयाचे असे मात्र नाही. ज्याप्रमाणे सूर्य अमक्याचसाठी प्रकाशतो हे सांगता येणार नाही तद्वतच हे अुत्सव अमक्याच अेका फायद्यासाठी केले पाहिजेत हे विशेष रीतीने सांगता येणार नाही. सूर्य जगताला प्रकाश देण्यास्तव प्रकाशतो, किंवा प्राणिमात्राला आवश्यक अशी अुष्णता देण्यास्तव प्रकाशतो, किंवा पंकजश्रीला हसविण्यासाठी प्रकाशतो, किंवा समुद्राचे खारे पाणी नेअून जगत्कल्याणास्तव ते गोडे करून मेघाकरवी परत धाडण्यासाठी प्रकाशतो का त्या मेघांनी 'धारासारशतविकीर्ण' केलेली वसुमती

पुन 'हरिततृणसस्या कुर्वती' करण्यासाठी प्रकाशतो !!! तद्वतच हे अैतिहासिक अुत्सव कशासाठी करावयाचे ? वा कृतज्ञताबुद्धिस्तव करावयाचे, वा सत्पुरुषाची स्मारक म्हणून करावयाचे, वा नवीन पिढीला सद्गुणाचे हे अुत्तम कित्ते होतील म्हणून करावयाचे, वा दुष्कृत्याचा अपजय कसा होतो व सत्कृत्याचा जय कसा होतो हे कळण्यासाठी करावयाचे, वा करावयाचे तरी कशासाठी ? याला अेकच अुत्तर देता यअील व ते हेच का, या कार्यांपैकी अमके अेकच कार्य करण्यासाठी ते करावयाचे नसून ही सर्वच कार्यें करण्यासाठी ते करावयाचे आहेत हा सूर्य अमक्याच कार्यासाठी प्रकाशत नसून तो या सर्वच कार्यासाठी प्रकाशतो

ही सर्व कार्यें अितकी महत्त्वाची आहेत की, त्यापैकी प्रत्येक कार्यासाठी अनेक अडचणी सोसूनही आम्ही हे अुत्सव करावयास पाहिजे आहेत ह्या अैतिहासिक अुत्सवानी जगाचे स्वरूप कैक वेळा बदलले आहे ! अितिहासाची पुस्तके ही फक्त सत्पुरुषाच्या पुढोची कल्पना देतात, पण हे अैतिहासिक अुत्सव ह्या कुडीत प्राणप्रतिष्ठा करून ह्या सत्पुरुषास आपणापुढे मूर्तिमत अुभे करतात ! त्याचे सद्गुण आपणाला दृश्य रीतीने दिसू लागतात व प्रत्यक्ष त्याच्या दर्शनापासून अुत्पन्न होणाऱ्या स्फूर्तीचा प्रेक्षकाच्या शरीरात सचार होअू लागतो ! नवीन मुलगा अितिहास वाचू लागला असता शिवभूपाच्या वर्णनाने त्याचे अत करण जितके वेधले जाअील त्याच्या शतपट रीतीने तो शिवोत्सवात दग झाला असताना वेधले जाअील. सत्पुरुषाचे अितिहास हे सद्गुणाचे ठसे होत पण ते ठसे नूतन पिढीच्या मन पटावर बरोबर रीतीने अुमटविणारा अैतिहासिक अुत्सव हा कुशल छापणारा आहे 'अुत्सवप्रिया खलु मानवा' हा मानव जातीचा निसर्ग आहे व मनोवृत्ति ह्या निसर्गजन्य आहेत म्हणून त्या मनोवृत्तीना अुद्दीपित करून जे सुशिक्षण या अुत्सवानी दिले जाते ते अितर साधनानी अितक्या साध्या व अितक्या पूर्ण रीतीने कधीही देता यणार नाही ! अैतिहासिक अुत्सवात प्रेक्षकाना तुम्ही या विभूतीप्रमाणे वागा म्हणून सागावे लागत नाही त्या विभूतीचे तसल्या ठिकाणी दर्शन होण्याचा अवकाश की प्रत्येक अत करणात दैविक शक्ति अुत्पन्न झालीच पाहिजे व त्या विभूतीच्या वैभवाचा परिणाम त्या व्यक्तीच्या हृदयावर घडलाच पाहिजे ! त्यातही आपणा मूर्तिपूजक लोकाना तर याचा अनुभव पदोपदी घेता येणारा आहे ! व जो अनुभव व परिणाम व्यक्तीच्या हृदयावर घडतो तोच त्या व्यक्तीनी सजून वाऱ्या समाजावर घडलाच पाहिजे व म्हणूनच कालाअील म्हणतो,

'There is no better means than this identical hero worship to secure the existence and ensure the prosperity of a community'

तेव्हा अैतिहासिक सत्पुरुषाचे अुत्सव का करावे ? तर निसर्गजन्य कृतज्ञतेसाठी ते करावेत ! त्या सत्पुरुषानी जगावर जे अनंत अुपकार केले आहेत त्याचे

स्मारक म्हणून करावेत ! ते अनादिसिद्ध परंपरेने चालत आलेले आहेत म्हणून करावेत ! ते अुपदेशामृताचा वर्षाव करणारे मेघ आहेत, ती सद्‌गुणांची मूर्तिमंत स्वरूपे आहेत, मनोवृत्तींना अुद्दीपन देणारी तीं रसायने आहेत, तरुणांना सच्छिक्षण देणारे ते शिक्षक आहेत व सत्पुरुषांच्या कृत्यांचे ते जिवंत अितिहास आहेत, असे ते आहेत म्हणून ते करावेत. त्यांपासून अितके फायदे आहेत म्हणून ते करावेत. त्यांपासून खरोखर तोटे मुळीच नाहीत म्हणून ते करावेत !!! पण आम्ही हिंदु लोकांनी ते विशेषतः सांप्रतच्या स्वाभिमान-व कर्तव्य-शून्यतेमुळे प्राप्त झालेली अवनत स्थिति जाअून अुन्नतावस्था प्राप्त होण्यासाठी अवश्यमेव करावेत. कारण राष्ट्रोन्नतीचा हा अेकच सोपा जिना आहे !!!

\+ + +

# ३. वन्दे मातरम्

भरतखंडाला स्वदेश म्हणण्याचे भाग्य परमेश्वराने कोणत्या लोकांच्या ललाटांना अलंकृत करण्यासाठी राखून ठेवले आहे ? भरतभूमि मातृस्थानी मानण्याच्या पवित्र अधिकाराचा अभिषेक जगच्चालकाने कोणत्या लोकांवर केलेला आहे ? व ह्या भगवतीच्या सुधाधवल स्तन्याचा दिव्य आस्वाद घेअून व तिला ' हे मातर् ' ' हे आअी ' असे म्हणून कोणाच्या जिव्हा धन्य झाल्या आहेत ? ती धन्यता केवळ आमच्या जिव्हांना लाधली आहे ! भरतभूमीला मातृस्थानी मानण्याच्या अधिकाराचा अभिषेक अेकट्या आम्हा भारतीयांवरच जगच्चालकाने केला आहे ! व भरतखंडाला ' स्वदेश ' म्हणण्याच्या महद्‌भाग्याने आम्हा भारतीयांविना जगावरील कोणच्याही लोकांचे ललाट अलंकृत झालेले नाही ! आम्ही सर्व हिंदी बांधव हे हिंदमातेची खरी लेकरं आहोत. हिंदमाता ही आमची जन्मदात्री आहे. हिंदमाता ही आमची परिपालयित्री आहे. तिच्या दुधावर आम्ही वाढलो आहोत. तिच्या दुधावर आमचे पूर्वज वाढले, तिच्या दुधावरच आमचे वंशज वाढणार आहेत. ही आमची भारतभूमि वात्सल्याची पुतळी आहे. ही आमची भारतभूमि मूर्तिमंत प्रेमलता आहे ! ती वेदांत गाअिल्याप्रमाणे 'पुराणी देवी युवति पुरंध्री ' आहे. ती अनुभवाने वृद्ध आहे. ती सौंदर्याने तरुण आहे. आम्हा तीस कोटी लोकांवर तिची समान ममता आहे. तीस कोटी कंठांतील ' वंदे मातरम् 'चा मंजुळ कलरव अैकून तिला प्रेमाचे भरते येते ! अशा प्रेममयीला 'आअी ' म्हणण्याचे महद्‌भाग्य जिच्या प्रसादाने आम्हास लाभले आहे त्या

पारलौकिक चिच्छक्तीला व आमच्या ह्या अैहिक परमेश्वरी आर्यभूमातेला आमचा सदैव प्रनाम असो !

आर्य भूमातेच्या भाग्याची गणना कोण करू शकणार आहे? 'असितगिरिसम स्यात् कज्जलं सिंधुपात्रे सुरतरुवरशाखा लेखनी पत्रमुर्वी। लिखति यदि गृहीत्वा शारदा सर्वकालम्' तथापि हे आर्यमाते, तुझ्या गुणाचा पार लागणार नाही ! सर्व जगतीतळावर पसरलेल्या हजारो भूभागामध्ये आर्यभूसारखी रमणीय भूमि दुसरी कोणची आहे, हे पाहण्यासाठी हिमालय पर्वत अुठून अुभा राहू लागला. त्याने आपले डोके सर्व विश्वातील भूप्रदेश दिसतील अितके अुच केले, तरी त्याला अितकी रमणीयता अन्यत्र कोठेच आढळेना भूलोकावर जिच्याअितकी रमणीयता नाही, तिच्यासमान स्वर्गलोकात तरी काही आहे की नाही म्हणून तो अुत्साह पावलेला हिमालय, स्वर्गाची कपाटे अुघडून आत घुसला परंतु तेथे, हे आर्यभू, तुझ्याअितकी मंगलमय वस्तु सापडण्याचे अैवजी काही निराळाच प्रकार झाला ! या हिमालयाची नी हिमधवल सौध शिखरे पाहून अिंद्राच्या अमरावतीतील अप्सराची अेकच त्रेधा अुडाली ! त्या सर्वजणी हिमालयाच्या गळयात मिठया मारू लागल्या. अमरावतीचा त्याग करून तेव्हापासून त्या हिमालयावर स्वच्छंदाने विहार करीत असतात. ही वातमी पोचताच आश्चर्योत्सुक गिरिजेने, गिरिजारमणासह आपले बिऱ्हाड त्या प्रासादसुंदर हिमनगरावरील कैलासात नेअून ठेवले! श्रीशंकराला जो आपल्या अस्तित्वाने पूत करावासा वाटला, त्या हिमालयाने हे आर्यभूमि तू युक्त आहेस ! 'य सर्वशैलाः परिकल्प्य वत्स, मेरौ स्थिते दोग्धरि दोहदक्षे ॥ भास्वन्ति रत्नानि महौषधींश्च पृथूपदिष्टा दुदुहुर्धरित्रीम्' अशा त्या हिमालयाने, हे आर्यभूमि, तू सपन्न आहेस ! सूर्याशी प्रतिरोध करू अिच्छिणा या महानुभाव विंध्याद्रीने तू सपन्न आहेस ! रायगड व सिंहगड ह्या रत्नानी ज्याचा कळस शोभिवत झालेला आहे, त्या स्वतन्त्रतेच्या देव्हाऱ्याने–सह्याद्रीने तू सपन्न आहेस ! हिमालय, विंध्याद्रि व सह्याद्रि ह्या प्रमुख नगवरानी अधिष्ठित असलेल्या भूमातेला आमचा प्रणाम असो !

केले असता ते गच्च भरून जाअील अितके सोनें व अितकी रत्नें, हे आर्यमाते, तू शेकडों भुयारातून आमच्यासाठी जतन करून ठेविली आहेस. त्यावाचून कोहिनुरानी भरलेली पेटी गोवळकोंड्याकडे आहे ती वेगळीच ! अपरिमित सुवर्णानें सुशोभित असलेल्या ' सुवर्णभू 'ला व अनंत कोहिनुरानी तेजोमय झालेल्या आर्य-वसुंधरेला आमची प्रणति असो !

विश्वामित्राला मोह पाडण्याप्तव मेनकेनें ज्याचें साहाय्याची याचना करावी असा तो वसंत ऋतु, वसुमतीला हिरवा शालु नेसविणारा तो वर्षाऋतु, ह्या ऋतु-प्रमुखानी जी ऋतुमती आहे, त्या आर्यभूला आमचें वंदन असो ! पार्वतीच्या स्तनाप्रमाणे मधुर आम्रफलाच्या व अप्सराच्या अधरोष्ठाप्रमाणे असणाऱ्या सरसमृदुल द्राक्षाच्या लता ह्या बालकाच्या चिमुकल्या मुखांत स्तन पोचावे म्हणून वाकलेल्या युवतीप्रमाणे ज्या भूमीमध्यें किंचिन्मात्र लवलेल्या आहेत, त्या आर्यभूमातेला आमचें वंदन असो !

ज्याच्या कोमल कंठातून आपले नाव अुंच व मधुर लकेऱ्यांत गाअिलें जावे म्हणून श्रीरामचंद्रानी यत्न संपादन केले असा सुरकोकिलाही ज्या भूमीमधील कल्पवृक्ष सप्तसुराना आलापीत आहेत, त्या विविधविहंगमा भारतीला आमचें वंदन असो ! जिला पाहून ब्रह्मदेवाने रमेचें नाव कसे असावे हे ठरविलें त्या चंपकवल्लिनें व ज्याच्या प्रतिबिंबाने लक्ष्मीचें गालावर आपादुर लाली आली आहे त्या गुलाब, मालतीनें नि जाअीजुअीनें जी सुगंधित झाली आहे, त्या विकसित-कुसुमा भूमातेला आमचें वंदन असो ह्या भारतीयांच्या विस्तीर्ण राष्ट्राला अत्यंत अुच्च प्रकारच्या जीवनशक्ति जिच्या कृपेने आज सहस्रावधि वर्षे मिळत आहेत व पुढे भविष्यकाल कायम आहे तोपर्यंत मिळतील त्या भूमातेला आमचें वंदन असो ! जीमधील शेतें ही नेहमी धान्याच्या मुठी भरलेले आपले हस्त अुंच करून डुलत डुलत सर्व मनुष्यजातीचा योगक्षेम चालविण्यास आपण समर्थ आहोत असे यथार्थ स्वाभिमानानें दर्शवीत असतात, जीमध्यें भूमि सस्यशालिनी नि जीमध्यें जलाशय फुल्लारविंद असे असतात, जिच्या रथाच्या अश्वाच्या पाठी परमात्म्याच्या हाताच्या खरारानी पूत झालेल्या आहेत, जीमधील गाअी नेहमी दुभत्या असतात अशा त्या सुभगा भूदेवीला आमचें वंदन असो ! चीन देशाच्या बादशहाने चीनची भिंत बांधून तो देश जास्त बळकट केल्याचा वृथा गर्व करू नये म्हणून जिला अुत्तरेकडे स्वतः निसर्गदेवीनें हिमालयाची अत्युच्च व दुर्भेद्य भिंत अुभवून दिली आहे व जिला दक्षिण, पूर्व व पश्चिम या दिशानी समुद्राचा विस्तीर्ण खंदक संरक्षण करीत आहे त्या आमच्या भूदेवीला आमचें वंदन असो ! जिला अुत्तरेकडून सर्व स्थलदेवता व अितर दिशानी जलदेवता संरक्षीत आहेत त्या भूमातेतील सर्व क्षेत्राना आमचें वंदन असो अशा या आमच्या भारतमातेचा सर्वत्र जयजयकार असो !

असामान्यता असते देशभूमीची खरी चारुता तिच्या स्वतःच्या महत्त्वाने जितकी प्राप्त होते तिच्या शतपट अधिक रीतीने त्या देशभूचे पुत्राचे कृतीवरून ठरत असते ह्या वीरमातृत्वात जी भूमि सर्व जगात श्रेष्ठ ठरेल ती खरी श्रेष्ठ होय ! ही कसोटी जर आर्य भूमातेला लावावयाची असेल तर आमची भूमाता वीर्यवान् पुत्राची जननी आहे हे सिद्ध करण्यासाठी तिच्या वीर्यवान् पुत्रापैकी काहींचा जरी नामनिर्देश करू लागलो तरी, हे चंद्रा व सूर्या, तुमची तेजे फिकी पडू लागतील. कारण वीरमातृत्वात ही भूमि मृत्युलोकातच काय, पण सूर्यलोकात व चंद्रलोकात श्रेष्ठ ठरविली जाईल. इंग्लंड, अमेरिका, जपान, चीन, वगैरे अर्भकाबरोबर तुलना करणे यात काहीच अर्थ नाही. ज्या वेळेस रोमचे नाव ऐकू येत नव्हते व ग्रीस देशात वस्तीही झाली नव्हती तेव्हा ही आर्यभूमि वीरप्रसवा व मानवी समाजाची अधिदेवता होती. इजिप्त, खाल्डिया, व असीरिया यांच्याही कित्येक शतके आधी आमच्या इकडे मानवी जातीची उत्क्रांति तत्त्वाच्या नि दर्शनाच्या सूत्रीकरणापर्यंत आलेली होती. जगातील कित्येक भाषात ५००।६०० शब्दांचा भरणा नव्हता, त्या वेळेस ह्या भारतातील ऋषिवरांनी संस्कृत भाषेला संस्कृत करून तिला सूक्ष्म विचारप्रदर्शनात प्रवीण केले होते. इतकेच नव्हे, तर तिला छंदात बद्ध करून तालसुरावर लीलानर्तन करण्याला लाविले होते जेथे इतिहासाचा प्रदीप प्रवेश करू धजत नाही किंवा जेथे दंतकथेचे तीव्र टोकही बोथट होत आहे असा सहस्रावधि वर्षापूर्वीच्या कालातूनही ज्या भूमीमध्ये वेदघोष ऐकू येत आहे, त्या भूमीचे भाग्याची तुलना कोणाशी करता येणार आहे ? सर्व जगात अत्यंत जुना असा ऋग्वेद ह्या भूमीमध्ये निर्माण झाला तत्त्वज्ञानाला १० हजार वर्षापूर्वी शोधून काढणारे वीर्यवान् ऋषि जगावर इतरत्र कोठे आढळणार आहेत ? त्या ऋषींच्या तपोवनांनी व त्यांच्या तपांनी पूत झालेल्या भूमातेला आमचे वदन असो ! वसिष्ठ-वामदेवांनी अभिमंत्रित असलेल्या जलाच्या सिंचनाने ही पुनीत झालेली आहे होम हवनाच्या पुण्यसमयी देव-देवतांना संतोष अग्नीच्या दक्षिणार्ची ज्वालांनी ह्या भूमीत व्यक्त झालेला आहे होमामध्ये दग्ध होणाऱ्या घृताचे सुवासाने दुरून स्वर्गातील इंद्र व वरुण या भूमीवर अवतरत असत वीर्यवान् नि ब्रह्मवेत्ते ऋषींच्या समिति या भूमीवर तत्त्वज्ञानाचा वाद-विवाद करीत असताना आपले आजपर्यंतच्या गोप्याचे आता स्फोटन होते की काय म्हणून परब्रह्माला काळजी

अुदात्तता प्राप्त होत नाही ? असे हे तत्त्ववेत्ते ज्या भूमीच्या कुसुन्याला धन्य करीत आहेत त्या तत्त्ववेत्त्या भूमीला आमचे वदन असो ! ! ! न्यायशास्त्राचे प्रणेते व सांख्य-शास्त्राचे प्रणेते ह्याच भूमीच्या अन्नावर वाढले ! बुद्धीवर अंधश्रद्धेचा पगडा पडू लागताच ज्या कपिल महामुनींनी अंधपरंपरेला झुगारून देअून विचारशक्तीचा पहिला जयजयकार केला ते सांख्यशास्त्रप्रणेते कपिल महामुनिदेखील आपल्या ह्या भारतीला ' हे मातर् ' म्हणून वदन करीत असत ! सर्व जगाला अजून वंद्य असलेल्या कपिल महामुनींनी जिला ' आअी ' म्हणून वदन करावे अशी भूमि ह्या जगावर किंवा, चंद्र, मंगळ बुधादि ग्रहहो, तुमच्याकडे तरी अेखादी आहे काय ? भास्कराचार्यांनी, आर्यभट्टांनी व वराहमिहिरांनी भूगोलाचे ज्योतिषशास्त्राचे व गणितशास्त्राचे शोध ह्या भूमीतील अन्नसेवनाने आलेल्या तीव्रतेने लाविले. दशांशाचा शोध ह्या भूमीचा आहे गुरुत्वाकर्षणाचा शोध ह्या भूमीचा आहे. भूमिति ह्या भूमीत जन्मास आली, त्रिकोणमिति (Trigonometry) ह्या भूमीतील यज्ञवेदींतून अुत्पन्न झाली सप्तसुराचा अुदय ह्या भूमीच्या कोमल कंठातून झाला. मत्स्ययंत्र (होकायंत्र) ह्या भूमीत जन्मास आले जगात व्याकरणशास्त्राची पद्धति ह्या भूमीने दिली पहिली सशास्त्र लिपि व वर्णमाला ह्या भूमीत निर्माण झाली. मयसभेला अुत्पन्न करणारे शिल्पशास्त्र ह्या भूमीच्या मालकीचे आहे. नाट्यशास्त्र, वैद्यशास्त्र ह्याच भूमीत अुत्पन्न झाले कणाद, कपिल, भास्कर, आर्यभट्ट वराह-मिहिर, भरत, पाणिनि, विश्वकर्मा, वाग्भट, गौतम, असल्या तेजोभास्करांना – ह्या स्वतंत्र शास्त्रप्रणेत्यांना – अुत्पन्न करण्याअितके ज्या भूमीचे अंग तीर्थवान आहे

आहे, त्या व्यासाला जन्म ह्या आर्यभूमीने दिला. रामायण आमचे आहे. महाभारत आमचे आहे. शाकुंतल आमचे आहे यापैकी अेक आमचे असते, तरी सर्व जगाहून आम्ही श्रेष्ठ ठरलो असतो. आता तर सर्व आमचे आहे आता भारतभूमि सोडून क्षीरसागराला कोण जातो! रामायण हा आमचा क्षीरसागर, भारत हा आमचा दुसरा क्षीरसागर, शाकुंतल आमचा तिसरा क्षीरसागर व अुत्तर रामचरित्र हा आमचा चौथा क्षीरसागर. अिनक्या क्षीरसागरापुढे त्या अेकाची काय किंमत आहे! अेका क्षीरसागरात राहणाऱ्या त्या लक्ष्मीकांताहून आम्ही भारतभूमीचे रहिवासी चौपट भाग्यशाली आहो. आमच्या कवितेत लक्ष्मी आहे, पण त्याच्या लक्ष्मीत कविता कुठे आहे? या कवितेचे कान्त वाल्मीकि, व्यास, कालिदास व भवभूति ह्या सर्वांना ज्या भूमीकडून दिव्य प्रतिभास्फूर्ति झाली, त्या भूमीला आमचे वंदन असो!!! परंतु ही प्रतिभास्फूर्ति काव्यातच झाली असे नाही. मानवी समाजाला धर्मतत्त्वानी जर काही फायदा झाला असेल, तर त्याचे सर्व श्रेय आमच्या या आर्यभूमीला आहे. जगताची सर्व धर्मपरंपरा येथून अुद्भूत झालेली आहे. वेदप्रणीत धर्माची ही सर्व लेकरे आहेत. हिंदुधर्मापासून महात्म्या बुद्धाने बुद्धधर्म प्रतिपादन केला. त्या बुद्धधर्माची अेक प्रत अुतरून घेअून जीजसने खिस्तीधर्म तयार केला. त्यात तरवारीचे पाणी ओतून महमदी धर्म झाला व त्या महमदी धर्माचा ओघ नानकाने पुन्हा मूळ आर्य धर्माशी आणून भिडविला धर्म हा जर तुमचा प्राण असेल व जर तुम्ही धर्मच्युत झालेले नसाल, तर हे जगतावरील सर्व समाजांनो, तुम्हाला तुमचा तो प्राण दिल्याबद्दल ह्या आमच्या आर्यभूला वन्दन करा! वैदिक धर्म तर ह्या भूमीचा प्राणच आहे त्याचे रक्षणार्थ देह कष्टविणारे शंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य, वल्लभाचार्य, वगैरे सर्व धर्मवीर आमच्या भूमीत जन्माला आलेले आहेत वीर्यशाली जपाना, ज्या भाग्याकरिता तू आणखी दहा सुशिमाच्या लढाया जिंकल्यास तरी तुला जे लाभणार नाही, असले बुद्ध महर्षींना जन्म देण्याचे भाग्य या आमच्या आर्य वसुंधरेला आहे! अितकेही असून अमक्यानी अमक्याच मार्गाने परमेश्वराकडे जावे असा ह्या अुदारचरितेचा बिलकुल आग्रह नाही. तिच्या मुलांपैकी काहीजण, देवाला विष्णु म्हणून म्हणोत! कोणी नानकास धर्मप्रणेता म्हणोत, किंवा कोणी बुद्धाला म्हणोत असल्या गोष्टीत त्या मातेचा आपल्या कोणच्याही मुलावर अनुदारपणाचा दाग नाही. तिच्या तीस कोटी लेकरांतील हिंदु जितके तिला प्रिय आहेत, तितकेच बौद्ध आहेत, तितकेच जैन आहेत. निसर्गाने जिला सर्व जगतात अत्यंत सुंदर केली आहे तीच ही भारतमाता आपल्या वीर्यवान् प्रसवानीही सर्व जगात श्रेष्ठ आहे. ही स्तुति काव्याच्या भाषेत केलेली नाही. ही स्तुति यथार्थ आहे हे दाखविण्यासाठी वर अैतिहासिक भाषाच वापरली आहे. पौराणिक व दंतकथायुक्त अशा माहितीला जर क्षणभर बाजूला ठेवले तरी वर वर्णन केलेल्या अैतिहासिक व्यक्तींपैकी

अेकेकाची योग्यता अशी आहे की, तसल्या अेकेका व्यक्तीला जन्म देताच ज्ञित भूमि निःसत्त्व होअून गेल्या असत्या! परतु आज सतत अनंत वर्षे अनं वीरांनी वीरप्रसवा झालेल्या सत्त्वमती भारतीला आमचें वदन असो! परं मातृभूमि नुसती सत्पुत्रांना अुत्पन्न करीत नाहीं. ह्या भाग्यशाली भूमीच्या पोटी जशी व जितकी नररत्ने आलेली आहेत, तशींच व तितकीच स्त्रीरत्नेही येथे पैदा झालीं आहेत. तिच्यामध्ये ऋषिवृंदाना भरसभेत ब्रह्मविचारात जिंकून टाकणारी गार्गेयी जन्मास आलेली आहे, ह्या भूमीमध्ये लोपामुद्रा जन्माला आलेली आहे! ह्या भूमीत अहिल्या जन्माला आलेली आहे! ह्या भूमीत तारा जन्माला आलेली आहे! ह्या भूमीत मदोदरी जन्माला आलेली आहे! ह्या भूमीत दमयंती जन्माला आलेली आहे! व ह्याच भूमीत सावित्री जन्माला आलेली आहे. भूदेवीच्या मुलीही मुलाअितक्याच पावन आहेत. याचेसाठी आणखी किती नावें द्यावीत! तथापि अजून कोणाची खात्री होत नाही काय? नसेल तर अैका! आम्ही अेकच पवित्र नांव सागतो तें अैका. सद्गुण, औदार्य, धाडस, पातिव्रत्य, सदयता, निसर्गगंभीरता आणि दिव्य सुदरता ह्या सर्व सद्गुणांना ज्या अेका नांवाने सबोधिता येअील असे आम्ही आता अेक नांव सागतो ते अैका! ज्या नामोच्चारणाने आम्ही नि आमचा देश हे सदैव पावन होतील असे आता अेक नाव सागतो ते अैका. हे जगावरील सर्व प्राणिमात्रही नि स्वर्गातील सर्व देवही, तें नाव श्रीसीतादेवीचें होय! सीतादेवी ह्या भूमीच्या अुदरी पैदा झाली. ज्या भूमीच्या अुदरी श्री जानकी पैदा झाली, त्या भूमीच्या अुदरी आमचाही जन्म झाला आहे ही कल्पना मनात प्रवेश करिताच तें आकाशाहूनही विस्तृत होतें! जे क्षेत्र अुत्तम धान्य देतें तें श्रेष्ठ, तसेंच जो देश अुत्तम स्त्रीपुरुषाना प्रसवतो तो श्रेष्ठ आहे असें समजून आपण ह्या भारतात श्रेष्ठत्व पाहू लागलो तो काय आढळलें? अंगिरस, गर्ग, वसिष्ठ, वामदेव, याज्ञवल्क्य जनक अित्यादि महातत्त्ववेत्ते कोण।

ाभर पाणी ह्या टिटवीने आणल आहे परतु अितक्यानेच काय झाले आहे ? ः वणन तर आमच्या अितिहासाचा पूर्वार्धच आहे ! आधुनिक कालातील ची यादी तर अजून अल्लाहिदाच आहे चितूरचे प्रतापसिह बुदेल्खडाचे छत्रसाल, ळचे प्रतापादित्य, रायगडचे हिंदुपदपादशाह, पुण्याचे शनवारवाड्याचे मालक, हेरचे महादजी, पानिपतचे मैदान, सिंहगडची दरड, रागण्याची खिड, ज्ञाने- ाची लेखणी, विठोबाचा भक्त, समर्थाचे दास, किती सागावे, कस सागाव ? वर सागाव ? योद्धयाची यादी द्यावी का तत्ववेत्याची द्यावी का शास्त्र- ाची द्यावी, का कवीची द्यावी का देशभक्ताची द्यावी, वा स्वातन्त्र्यवीराची । का मुत्सद्द्याची द्यावी? हे आर्यवसुधरे तू सुभग आहेस, सुजला आहेस, सुवर्णा त, सुरत्ना आहेस तुला आमचे वदन असो हे ऋतुमती वसुमती, सुलते व सुफलित, आमच वदन असो ! ह विविधविहगमे, विविधकुसुम, तुला आमच वदन असो ! सगरम्ये व निसगरक्षिते तुला आमचे वदन असो हे पुराणी देवी युवती, त्र, तुला आमच वदन असो हे तत्वज्ञे व शास्त्रज्ञे, तुला आमच वदन असो ! भामयी व धर्ममयी तुला आमचे वदन असो ! हे सत्वमती व वीर्यवती, तुला च वदन असो हे स्वातन्त्र्यतिलकभूषिते, तुला आमच वदन असो ! श्रीशकरादि श देव जिचे सरक्षण करताहेत, त्या तुला आमचे वदन असो! नारद, तुबर व्यास, ीकि तुझ्याभोवती तुझी स्तोत्रे गात आहेत तुला आमच वदन असो ! श्री प्रतापादि तुझ्या शत्रूच्या नरडीचा घोट घेत आहेत, त्या तुला आमच वदन । ! !

वदे मातरम् ! वद मातरम् ! वद मातरम ! ! !

—(विहारी, चैत्र शु २, शके १८२८)

\+ \+ \+

## ४ बाजीरावाची पुण्यतिथि !

### पसतीस चला ! !

काढली, ती केवळ अेका मृत्यूचे म्यानातच परत आत घातली, त्या ... पुण्यतिथि ही निष्फळ वाचाळतेनेच जर सार्थ झाली असे समजावयाचे असेल, बाजीराव असे होते नि तसे होते या गप्पा झोटण्यातच सर्व दिवस गमावून ... असो वा मोठ असो, परतु त्या वीराच्या अिच्छा तृप्त करण्यासारखे कोणतेही ... जर करावयाचे नसेल, तर त्या महान् कर्मवीराचा मी वशज आहे असे म्हणण्या... महाराष्ट्राचा अधिकार महाराष्ट्राने गमावला असेच म्हणावे लागेल.

केवळ वडिलाची कीर्ति सागूनच जो आळशी व अकर्मण्य मनुष्य आपण ... धन्य मानून घेतो तो खरोखरच अेक मूर्ख होय खरोखरच पुण्यतिथीच्या काय व जन्मतिथीच्या काय, नुसत्या ह्या वाचाळ समारभाचा, या नाटकाचा, या नुसत्या सव्यापसव्याचा आता आम्हास अगदी तिटकारा आला पाहिजे बाजीरावाची पुण्य... तिथि साजरी करावयाची आहे ना ? तर मग अेक कणभर का होअीना, पण का... करून दाखवा ! बाजीरावाची पुण्यतिथि साग करावयाची आहे ना, तर ... वसअीस चला व या वर्षाच्या आत पोर्तुगीजाचे कालात त्याच्या बलात्काराने ... आपल्या गयाळपणाने जे हजारो महाराष्ट्रीय हिंदु आपल्या धर्मास व सस्कृती... आचवून खिश्चन झाले, त्यास शुद्ध करून पुनरपि आपल्या या हिंदुत्वाच्या पंक्ती... माहरास परत आणण्याची भव्य व सबळ अशा महान् चळवळ अुडवून द्या

कारण बाजीरावाच्या पिढीच्या पराक्रमाने पोर्तुगीजापासून वसई परत मिळविली, परतु तिच्या अगाधर लागलेले जातिच्छेदाचे, धर्मग्लानीचे व सस्कृति भगाचे खोल घाव ती पिढी भरुन काढू शकली नाही ते कार्य जर आपली पिढी करील, तर त्या वीराच्या अनेक अिच्छापैकी निदान अेक तरी अिच्छा पुरी होअून या पुण्यतिथीस त्याचा आत्मा काहीतरी सतोष पावेल त्याच्या अितर महान् अिच्छा, त्यानी साधिलेली व घडवून आणलेली परतु आता पुन्हा विघडलेली महत्वाची कोणी करू शकत असेल, तर शुभस्य शीघ्र ! परतु जर व ज्याना ती अितर महत्वाची करवत नाहीत, तर त्यानी तरी हे अेक शक्य असलेले परतु अती तितकच महत्फलदायी ठरणार कार्य तरी या पुण्यतिथीच्या निमित्ताने करून दाख... वावे अितकही जर आपल्या हातून होणार नाही, तर बाजीरावाची पुण्यतिथि आम्ही केल्यापक्षा केली नसती तर बर झाले असते, अस त्या महावीरास वाटल्या विना राहित गहणार नाही

वसअी, ठाणे, माहीम, अित्यादि भागातून हजारो खिश्चन झालेले परतु मनापासून आपल्या पूर्वजपूजित हिंदुधर्मासच चिकटून राहिलेले आपले महाराष्ट्राच्या रक्ताचे, बीजाचे, भाषेचे बधु वसअीत आहेत हे अनेकास माहीत आहेच केवळ आपण त्याना आपल्या घरात घेत नाही म्हणून ते परक्या घरात डाबून राहिले जात आहेत त्याच्याप्रमाणेच त्या प्रातातील हिंदुमात्र बाटवून ख्रिस्ती करावा अशी पोर्तुगीजाची प्रचड खटपट चाललेली होती. हिंदु सस्कार व हिंदुपूजा ही शासनाने बद व निषिद्ध केली होती. ते शासन भगिल्यासाठी केवडो हिंदु हुतात्म्याना टार

ण्यात येत होते व थोडेच दिवसात तो प्रांतच्या प्रांत निर्हिंदु झालाही असता जर श्रीमंत बाजीरावाची पिढी वसओवर चढून जाऊन, रोखून रेटून त्या किल्ल्यास ा देऊन बसती ना, माझे शिर तरी आत पडू द्या म्हणून गर्जणाऱ्या हट्टी ांनि पोर्तुगीजाची सत्ता पादाक्रांत करती ना पण बाजीरावाच्या पिढीने वसओ ली व 'कोंकणात हिंदुधर्म राखिला,' परंतु पोर्तुगीजाचा तरवार तोडून तिला ृत्यावर अधिक घाव घालणे अशक्य करण्याचे कार्य जरी बाजीरावाची वीर ा करू शकली तरी लागलेले घाव भरून काढण्याचे, परक्याचे गोटात गेलेल्या ूस सोडवून पुन्हा परत घरी आणण्याचे कार्य करण्यास त्यास समय सापडला ी. ते कार्य आपल्या पिढीने केले असता बाजीरावाची अेक अिच्छा तरी ा होणारी आहे तीही पूर्ण न करणे, हे शक्य असलेले कामही हाती न घेणे आणि ीरावाच्या पुण्यतिथीच्या गप्पा मारणे म्हणजे त्या वीर पुरुषाच्या स्मृतीची ाळ अप्रतिष्ठा करणे होय म्हणून वसओकडे टाळा फिरवा. महाराष्ट्रातील सर्व ्रमसभांचा या वर्षीचा हा मुख्य कार्यक्रम असला पाहिजे त्वरित ज्या त्या सभेने तराची वाट न पाहता वसओस प्रचारक पाठवून द्याव या व त्वरित कामासही ार निमित्ते काढून लांबणीवर टाकण्याची प्रवृत्ति आता पुरे झाली अुत्तरेस ्याना रजपुताच्या मुसलमान झालेल्या साठ हजार माणसांना आर्य समाजाने त हिंदु करून घेतले काय महाराष्ट्रास स्वतःच्या रक्ताच्या व जवळ जवळ ुच असलेल्या आपल्या वसओच्या पतित हिंदूंस शुद्ध करण्याअितकाही आटोप ला नाही ? काय आर्यसमाजास जे शक्य झाले ते महाराष्ट्रास अशक्य व्हावे ?

आणि कोणती गोष्ट शक्य किंवा अशक्य हें केव्हा ठरणार ? ती करण्याचा ानरी प्रयत्न केल्यावर ना ? का दुपारी चापून जेवून आराम खुर्चीवर पडले ता अडचणीच्यावर अडचणीचे मजले जी शिथिल करपना वसल्यावसल्याच ारत तिच्या सांगण्यावरून ? वसओचे हजारो हिंदुबंधु परत स्वधर्मात येणे अशक्य ह, अकाली आहे हे तेव्हाच सिद्ध होओल की, जे हा महाराष्ट्रीय प्रचारकांच्या ा चिमाजी अप्पाच्या सेनेसारख्या सर्व दिशांनी अुठून ठाणे, माहीम घेत घेत मतराचे सौभित घुसतील व माझे शिर तरी किल्ल्यात पडू द्या म्हणून गर्जणाऱ्या ्वाटीने निदान अेक वर्षभर तरी वसओस झुंजत राहतील ! अजून क प्रचारकही तिकडे गेला नाही तिकडच्या हिंदु संघटनेच्या पुरस्कर्त्यांनी ून अिकडची काडी तिकडे केली नाही, तोच बसल्या बसल्या हे अशक्य, ते ाक्य, ह्याची वेळ आली नाही, त्याची अितकी घाओ का, म्हणून वरळत ण्याचा आपणास काय अधिकार आहे ? वेळ आली नाही ? ती आणण्याचा

# लंडनचीं वातमीपत्रें

## ५. लंडन टॉवर

अिंग्लंडच्या अितिहासप्रसिद्ध लंडन टॉवरमध्ये असणाऱ्या शस्त्रागारामध्ये श्र 'शिवछत्रपतींनी ज्या वाघनखांने अफजुलखानास मारले तीं वाघनखें आहेत अ महाराष्ट्रात साधारण बोलवा असल्याने ती वाघनखें पाहण्यास मी फारच अुत्सु झालो होतो, असं आपल्या वाचकांना वाटेल हिंदुस्थानच्या पारतन्त्र्याची आत ज्या वाघनखाने अुपसून बाहेर काढली व जीं शिवछत्रपतींच्या करस्पर्शाने पवित्र झा तीं मराठी वाघाची वाघनखें लंडन टॉवरमध्ये पडलेली पहावयास मी अुत्सुक झाले असेन असें आपल्या वाचकांना वाटत असेल परंतु मला ती अुत्सुकता मुळी वाटेना श्रीकृष्णाच्या विश्वरूपाला पाहण्यास अर्जुनालाही दिव्य चक्षु दिलेले हो तरी देखील त्याच्याच्याने त्या विश्वरूपाला पाहवेना मग त्या वाघनखांकडे दृ फेकण्याचा माझ्या ह्या गुलामगिरीच्या डोळ्याची कशी छाती होणार ! मला क भय लागले माझी गात्रे विगलित होअू लागली छत्रपतींच्या त्या वाघनखांना मं कसा पाहू ? अितिहासाच्या वाचनाने मला अशी माहिती झालेली होती की, त्य मराठी वाघाच्या नखांना गुलामगिरीच्या रक्ताची फार चटक लागलेली आहे, म अशी माहिती असताना मी तिकडे जाण्यास कसा धजू ? जर कदाचित मी त्याच्या कडे दबून पाहत असताना त्याची अर्धसुप्त दृष्टि मजकडे गेली व माझ्या गुलाम गिरीचा त्यांना वास आला तर स्तंभ कडाडदिशी फोडून तो शिवनृहरि बाहे येअून गुलामगिरीचा वास कोठून येत आहे म्हणून गर्जना करणार नाही का ? अफजुलखानाच्या आतड्यावर यथेच्छ ताव मारून शिवाजीची वाघनखें झो गेल्याला बरीच वेळ झालेली आहे, आता त्याच्या अुठण्याचा समय जवळ आलेला असल्याने या निद्रेमध्ये सर्व अन्न जिरून जाअून ज्याची क्षुधा प्रदीप्त झालेली आहे, तीं गुलामगिरीच्या रक्तास चटावलेली वाघनखें माझ्यामागे अुड्या घेत येतील नि मला व माझ्या राजनिष्ठेला फाडफाडून भरभर मिटक्या देअून घटघट त्या 'स्वहितासृगुदका' पिणार नाहीत काय ? अशा धास्तीत मी गर्क झालो असतानाच मला त्या वाघनखांचे शेजारी टिपूची तरवार दिसली त्या तरवारीच्या दर्शनावरोबर अेक विलक्षण सचार अंगात सचारू लागला व ह्या गुलामगिरीत जगण्यापक्षा श्री छत्रपती शिवाजी महाराजांच्या वाघनखांनी मेलेलेच फार बरे असा माझा ग्रह होअू लागला व मी त्या वाघनखांना पाहण्यास खरोखरच अुत्सुक झालो त्या पवित्र वस्तूच्या दर्शनास जाण्यापूर्वी काहीतरी नजराणा न्यावा असें मला वाटू लागले परंतु त्यांना जो अेकच नजराणा पाहिजे आहे तो मला कोठून मिळेल ? पारतन्त्र्याचे

न त्याना नजराण्यादाखल देण्यासाठी मी टिपूच्या तरवारीची करुणा भाकू-
लो, परतु तिने मला अेकच जबाब दिला की ' टिपूची तरवार सज्ज आहे पण
चा हात कोठे आहे?'

टिपूचा हात कोठे आहे हे मी अैकतो न अैकतो तोच माझी दृष्टि त्या
नखावर गेली परतु छत्रपतीचे वाघनखात जी दिव्यता असेल असे वाटत होते
दिव्यता त्यात नव्हती, म्हणून सशय येअून मी जास्त जवळ गेलो तो मला
ळून आले की ही महाराजाच्या हातातील अस्सल वाघनखे नाहीत त्या वाघ-
ापाशी जी माहितीची चिठ्ठी आहे तीत हे स्पष्ट लिहिलेले आहे ती माहिती
े आहे

'Waghnakh or tiger's claws, a weapon for concealment in the
ıd It was a similar instrument with which the famous Shivajı
troyed Afzulkhan, a Vijapur general while entertaining him
ese are from Mysore used by robbers.'

या वरील अक्षरश अुतरून घेतलेल्या माहितीवरून श्रीशिवाजीमहाराजाची
ाघनखे 'अशीच' होती अितकाच अुल्लेख केलेला आहे तीच ही नव्हत पुढे तर
पष्टच अुल्लेख आहे की, ही म्हैसूरमधून तिकडील दरोडेखोरापाशी असलेली
अकडे आणली आहेत श्रीछत्रपतीची वाघनखे टॉवरमध्ये नाहीत ती अितर कोठे
ाहत हही अजून नक्की बाहेर आलेले नाही. अशा रीतीने ज्याच्या दर्शनासाठी
ी अुत्सुक झालो होतो ती वाघनख न दिसल्याने क्षणभर माझी निराशा झाली.
रतु लगेच मला थोडा तरी हुरूप वाटू लागला कारण छत्रपतीची वाघनखे
डनच्या टॉवरमध्ये वदीत पडण्यापेक्षा ती मला न दिसतील तरी काही वाअीट
ाही ती मला दिसण्यासाठी लडनला येण्यापेक्षा माझ्या आर्यभूला दिसण्यासाठी
हिंदुस्थानातच असलेली बरी वाघनखे प्रदर्शनासाठी नसतात त्याना पारतत्र्याची
ोटे फाडण्यासाठीच काय ती बाहेर काढणे अिष्ट आहे ज्याना ती वाघनखे पहा-
याची अुत्कठा लागलेली असेल त्यानी पारतत्र्याची आतडी अुपसण्यास तयार असले
ाहिजे त्यानी त्यासाठी बद्धपरिकर व सज्जखड्ग झाले पाहिजे अितकी ज्याची
यारी असेल त्याला श्रीछत्रपतीची वाघनखे सापडणे कठीण नाही कारण
तापगडचे देवीला वरील सज्जतेचा अर्ज केल्याबरोबर ती त्या देवीचे दरबारातून
ाविण्यात येतात

—(विहारी, चैत्र शु ९ शके १८२९).

\+ + +

ज्यानी आपले शरीर चंदनासारखे झिजविलेले आहे, त्या महानुभाव लजपतरायाना हद्दपार करण्याचे धाष्टर्य आजपर्यंत कोणच्या टोरीने केलेले आहे ? फुलरच्या नावाने खडे फोडणाऱ्या लोकानी ह्या मोर्लेमध्ये किती फुलर भरलेले आहेत हे अजून तरी समजावून घेतले आहे की नाही ? लाला लजपतराय याना हद्दपार केल्याची बातमी तारेने येताच त्याबद्दल अेकाही लिबरल पत्राने तक्रार केलेली नाही. लिबरल पेपरमध्ये अत्यंत प्रमुख असलेले ट्रायब्यून नावाचे दैनिक पत्र तर स्पष्ट म्हणते की, 'कोणा लजपतरायाला हाकलून दिल्याची बातमी आलेली आहे We do not question the need of these measures. या कृत्याच्या आवश्यकतेबद्दल आम्हाला काही अेक शंका नाही ! ' पार्लमेंटमध्ये उलटसुलट प्रश्नाची गर्दी चाललेली असता त्या सर्वांचा मथितार्थ अेकाच वाक्यात मोर्लेने सांगितला तो हा की, 'अशा रीतीने प्रश्नोत्तर होअून हिंदुस्थानचे बाबतीत पार्लमेंटमध्ये मतभेद आहेत, असे नेटिव्हाना वाटण्यास जागा ठेवणे हें धूर्तपणाचे नाही ! ' लजपतराय व अजितसिंह याना हद्दपार करणे, बंगाल्यात व पंजाबात सार्वजनिक सभाची बंदी करून टाकणे, विद्यार्थ्यांना व शिक्षकाना स्वदेशभक्ति करू नका म्हणून हुकूम सोडणे, वाटेल त्याला वाटेल तेव्हा अुचलून तुरुंगात टाकणे, हे प्रकार जे लिबरल करतात तेच लिबरल व तेच त्यांचे राष्ट्र भुद्या वेळ येताच गावेची गावे तोफेच्या तोंडी देतील व सर्व दंगाला आग लावून देअून हिंदुस्थान बेचिराख करतील, याचा विशेषत passive resistance च्या रडक्या प्रतिकारवाद्यानी अवश्य विचार करावा अजून तर काहीच झालेले नाही आताशी कोठे अेकटी दुकटी तुरळी गडबड करू लागल्याची बातमी आली आहे तोच या क्रूर राष्ट्राने आपले पंजे फिस्कारले आहेत अमच्या वीरापुढे आम्ही कर देत नाही जा असे नुसते रडून कर देणे चुकेल असे येड्याच्या अिस्पितळातही कोणास खरे वाटणार नाही. यदा अिंग्लंडमध्ये जी गडबड अुडालेली आहे ती रडक्या प्रतिकाराची नसून ती सत्तावनच्या पन्नासाव्या वर्षाची होय ती नानाच्या कानपूरचे स्मरण होय !

हे स्मरण फक्त अिंग्रजानाच होत आहे असे नाही. ते लंडनमधील हिंदी लोकानाही होत आहे *मेच्या मे ११ ला येथील हिंदी लोकाची सभा या सत्तावनच्या* स्वातंत्र्यसंग्रामाची सोनेरी ज्युबिली करण्यासाठी भरली होती व तीत त्या संग्रामात पडलेल्या देशवीराचे भजनपूजन करण्यात आले. अशा रीतीने मध्या लंडनमध्ये अुभय पक्षानाही सत्तावनचे डोहाळे होत आहेत ! *नानाच्या देहाची छबी अिंग्रजाच्या* व हिंदूच्या अंत करणावर अेकाअेकी अुठून आलेली आहे ! या विलक्षण चमत्काराचा अर्थ काय व सत्तावनचे डोहाळे कोणाच्या जन्माचे द्योतन करीत आहेत याचा अुलगडा भविष्यकाळ लवकरच करो !

—(विहारी, वैशाख व. ३०, शके १८२९)

\+ + +

## ७. हिंदुस्थाना ! तुला पचेल तें तू खा !

गेल्या आठवड्यांत लंडन शहरीं अनेक महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या. ता. २० रोजीं अिंडियन बजेटवर वादविवाद होणार होता. त्या वादविवादांत आपल्या देशाच्या वतीनें भिक्षा मागत फिरत असलेल्या प्रतिनिधींचा सर्व जीव गुंतून राहिला होता. बजेटच्या दिवशीं सकाळीं ' डेली न्यूज ' जित्यादि पत्रांत भिक्षांदेहीची आरोळी ठोकली गेली होती. My nation stands expectant म्हणून ना. गोखले यांनी धडधडीत असत्य विधान केलें. ना. गोखले यांना आशा असेल परंतु ती हिंदुस्थानांतील लोकांची आशा नव्हती ! वेडरबर्न व सर हेन्री कॉटन यांच्या टुरटुरींत ज्यांना हिंदुस्थान देशाची खरी कळकळ दिसते त्यांना हिंदुस्थानासंबंधीं किती देशा सदा लुटला व पुढच्या सालीं किती व कसा लुटावयाचा हें ठरविण्यासाठीं होणाऱ्या बजेटावरील वादविवादांत अभागी हिंदुस्थानाची अुन्नति दिसावी हें ठीकच आहे. शेवटीं काय झालें ? कोणाची आशा सफल झाली ? लिबरल मार्लेंनीं काय दिलें ? आज अेक शतकभर भिक्षा मागत असतां परवांच्या शिष्ट पटिकेला मार्लेंच्या त्या अत्यंत कुटिल भाषणाशिवाय झोळींत काय पडलें ? राष्ट्रीय सभेचे पुढारी Opium eaters अफू खाणारे आहेत हीच पदवी त्यांना मिळाली ना ? शिष्ट लोकांनो ! तुम्ही केव्हा शुद्धीवर येणार ? हेन्री कॉटनच्या चर्चेबद्दल थर्मामीटरप्रमाणें कडक किंवा सौम्य भाषा वापरून देशाला Self Government मिळविण्याच्या तुमच्या प्रयत्नाचा

ारंभ झाला अेका आयरिश तरुणाने—तो आयरिश असावा असा माझा अजमास ाहे—हिंदुस्थानने अशा वेळी आयरिश नॅशनॅलिस्ट ह्या स्वावलंबी पक्षाप्रमाणे ब्रिटिशांना कोणतही साह्य करू नये व आयर्लंडने व हिंदुस्थानने अेकदमच अेकमेकांच्या ाह्याने अुभयताचे कल्याण करून घ्यावे असे सुचविले नंतर मिस्टर हार्वे नावाच्या ेका पुढाऱ्याचे भाषण झाले त्याचा सारांश असा होता की, जेथे परवशतेचा मळस ााला आहे व कायदा सत्ताधारी लोकांच्या तरवारीनेच चिरला गेला आहे, तेथे राष्ट्रचैतन्य राखावयाचे असल्यास दोनच अुपाय असतात अेक 'जनरल प्यासिव्ह रेझिस्टन्स' किंवा दुसरा 'गुप्त मंडळ्या' Passive Resitance' हा अप्रत्यक्ष प्रतिकार आहे परंतु गुलामगिरीत पडलेल्या राष्ट्राची हा अप्रत्यक्ष प्रतिकार जालीम रीतीने अमलात आणण्याअितकी तयारी बहुधा झालेली नसते कोणीही सरकारला मदत न करण्याची बुद्धि अुत्पन्न होण्यास व त्याप्रमाणे सर्वांकडून वर्तन घडण्यास समाज राजकीय शिक्षणाने फारच सुसंस्कृत केलेला पाहिजे व तं राजकीय शिक्षण परक्याच्या करड्या सत्तेखाली स्पष्ट रीतीने देणें अशक्य झालेले असते म्हणून प्रथम दुसरा अुपाय याजला जातो, व तो 'Secret Societies' गुप्त मंडळ्या हा होय या गुप्त मंडळ्यांनी स्वदेशप्रेम अुत्पन्न करावं व रचनाकौशल्याने प्रचंड संघ अुभारावे. रशियामध्ये याच ताजे अुदाहरण घडत आहे व रशियाचे स्वातंत्र्य आता दूर नाही हे सर्व श्रेय गुप्तमंडळ्यांचे आहे इ इ' त्यानंतर अेका वाश्रींचे भाषण झाले त्या वाशींची शांत व अुदात्त मुद्रा व त्यांचे मानसिक शास्त्राच्या आधाराने झालेल भाषण यावरून त्या फारच सुशिक्षित असाव्या त्या आयरिश असाव्या असें दिसते. त्यांनी रशियाची व हिंदुस्थानाची तुलना केली व जेथे जेथे मानव जात परवशतेत खितपत असेल तेथे तेथे माझं अंतःकरण गुतलें आहे व जगतात कोणीही परतंत्र नाही अशी स्थिति येअीतोपर्यंत मला चैन पडावयाचं नाही असें सांगितलं अितक्यात अेक साहेब अुठले व त्यांनी दे पारस यांना 'लेबर पार्टीला' पैशाची मदत हिंदुस्थानने करावी म्हणजे लेबर पार्टी येथे अधिकारावर आली की हिंदुस्थान वर येअील म्हणून मागितले यांना आजपर्यंत हिंदुस्थानने केलेली 'पैशाची मदत' पुरेशी झाली नाही दे पारेख यांनी व सोशियालिस्ट लोकांनी त्या गरीब साहेबाची फारच टर अुडविली अध्यक्षांनीही 'हिंदुस्थानातील लोकांनी हिंदुस्थानातच काम केले पाहिजे, अमका पक्ष अिंग्लंडमध्यें अधिकारावर येअील म्हणून पैसे धाडून व त्यांना हिंदुस्थानच्या स्थितीची माहिती देण्यासाठी प्रतिनिधि धाडून काही अेक व्हावयाचे नाही' असें सांगितले व मोर्लेनी हिंदुस्थानातील लोकास लेखनस्वातंत्र्य व वाक्स्वातंत्र्य आहे असें पार्लमेंट सभेत विधान करावे व बंगाल्यात ही स्थिति ठेवावी हे फार लाछनस्पद आहे' असं प्रतिपादिलं

अशा रीतीने हिंदुस्थानच्या रोगावर दोन औषधें मिळाली आहेत House of Commons मधल्या दवाखान्यात देशभक्त गोखल्यांना अेका मोर्ले नावाच्या

डॉक्टरांनी अेक बाटली दिली व चंडास हॉलमधल्या आरोग्यभुवनात मि. हार्वे या नांवाच्या भिषग्वर्यांनि दे. पारेख यांना अेक औषधि दिली.

हिंदुस्थाना ! तुला पचेल तें तू खा !

—दि. १७ ऑगस्ट १९०

\+ \+ \+

## ८. राष्ट्रीय तरुण-सेना

लंडन :—' वडें घर व पोकळ वासा ' अशी ब्रिटिश साम्राज्याची स्थिति झालेली आहे. या साम्राज्याच्या बाह्य अंगाला पाहूनच जे चकित होतात त्याना हें साम्राज्य आतून किती पोखरलेले आहे याची कल्पना देखील नसते. हिंदुस्थानसारख्या सहा सात हजार कोसावरील जित झालेल्या देशास अिंग्लिशांचें केवढें भय वाटतें ! हिंदुस्थानातील तीस कोटी लोकानाच काय, परतु सर्व जगाला ताब्यात ठेवील अशी अिंग्लंडची शक्ति आहे, ही सर्वसाधारण समजूत असते अिंग्लंड म्हणजेच नंदनव आहे, का कामधेनू आहे, का स्वर्ग आहे, असें वाटत असतें. परतु अिकडे प्रत्यक्ष स्थिति पाहिली म्हणजे काय आढळते आहे ? पार्लमेंटच्या जागा पैशाने विकल्या जा आहेत. खायला मिळत नाही म्हणून हजारो लोक अुपाशी मरत आहेत. का नाही म्हणून अुडाणटप्पूचे दंगे होत आहेत. लाच खाणें, खोटे बोलणें, रानटीपणाच कामे करणें, हीं कृत्ये अिनकीं सर्वसाधारण आहेत की, त्याची चौकशी देखील हो नाही. प्रत्येक सार्वजनिक चव्हाटयावर व बागेमध्ये, प्रत्येक अैतिहासिक जागी प्रदर्शनस्थलामध्ये मनुष्य शिरू लागला की अेक भली मोठी पाटी टांगलेली अस तिच्यावर ' Beware of the pickpockets' ' खिसेकातरूंना जपा ' म्हणून अक्ष लिहिलेली असतात ही अक्षरें काय दाखवितात ? अिंग्लंडमध्ये अितके खिसेकात आहेत की, प्रत्येक जागेवर पोलिसबरोबर त्याचाही पहारा बसलेला आहे. पर अिंग्लंडमध्ये कोण खिसेकातरू नाही ? ' Beware of the pickpockets हीं पाटी अिंग्लंडपुरतीच लावलेली नसती व जर परमेश्वराने ती प्रत्येक देशाच दारावर लावली असती, तर किती बरें झाले असते ! कारण अिंग्रजी खिसेकातरूं भीति ही अिंग्लंड देशातच फक्त नसून ती जगावरील सर्व देशांत शिरलेली आ अिंग्लिश लोक व्यावहारिक शास्त्रांत पटाअीत झालेले आहेत याचे हें अेक प्रत्यंतर आहे. कारण या खिसे कातरण्याच्या धंद्यातदेखील त्यांनी अर्थशास्त्राच्या तत्वाप्रमाणे काम चालविलें आहे. ते तत्त्वाला सोडून कधीही वागत नसतात ! त्यांनी या खि कातरूपणाचे धंद्यात श्रमविभाग केलेला आहे. खिसे दोन प्रकारचे असतात. व्यक्ती

खसा व राष्ट्राचा खिसा. पैकी व्यक्तीचे खिसे कातरण्यासाठी अिंग्लंडमध्ये लोक
क्ती अिमाने अितवारे खटपट करीत असतात हे प्रत्येक स्थली असलेल्या त्याच्या
रील जाहिरातीवरून दिसून येअील व राष्ट्राचे खिसे कापण्यात तर अिंग्लिश
र्ता पटाअीत जाहेत हं हिंदुस्थानातील लोकास सागत बसणे म्हणजे अिंग्लिशाच्या
ा सद्‌गुणाची 'नेटिव्हाना' काहीच माहिती नाही असे म्हणण्यासारखे आहे झुलू
ोकाशी झालेल्या लढाअीत अिंग्रजानी पशुहूनही रानटीपणा दाखविला अशी
याचीच पत्रे ओरड करीत आहेत! अेक झुलूबाअी आपल्या मुलास घेअून अुभी
ोनी व त्याची समजूत घालीत होती अितक्यात अेक शूर अिंग्रज शिपाअी आला
त्याने म्हटले, 'बाई तू नका त्रास घेअू! मी तुझ्या मुलाची समजूत घालतो' व
से म्हणून त्याने त्या मुलाला गोळी घातली शेकडा अधम कृत्यापैकी मी हं अुदाहर-
ार्थ देत आहे ही कृत्ये अिंग्रज शिपाअीच आता अिंग्रजी पत्राना कळवीत आहेत
ोअर वॉरमध्ये बोअर लोकाना शस्त्रे अिंग्लंडमधून मिळाली अशी गुणगुण होती.
[illegible] प्रगति झालेली आहे.
[illegible] र लष्करी कमिशनच्या
ौकशीवरून असे सिद्ध झाले आहे की, कोटयवधि रुपयाची अफरातफर होअून
ोठमोठया अधिकाऱ्याच्या माह्याने लाचलुचपतही राजरोसपणे चालू होती.
शा हजारो गोष्टीवरून अिंग्लंडमधील अतर्गत स्थिति किती कुजत आली आहे
ाचा अदाज करता येअील परतु बाहेरचा भपका पाहून गरीब व हताश लोक भिअून
ातात व त्याना अिंग्लड म्हणजे अेक अजरामर, मोठा थोरला राक्षस आहे असे वाटू
ागते परतु तसे काही अेक नाही अिंग्लडचे मन कुजले आहे. त्याच्यातील थोर
द्‌गुण पूर्वी कधीकाळी असतील तर ते नष्ट झालेले आहेत साम्राज्याच्या अुतरत्या
ाळात जी चिन्हे व्हावयाची ती सर्व दृग्गोचर होत आहेत व ही त्याना स्वत लाच
ितकी कळत आहेत तितकी अितर कोणालाही कळत नसतील आपल्या हिंदुस्थानात
शी समजूत आहे की अिंग्लंडचे मन नीतिभ्रष्ट झालेले आहे, तथापि त्याचे
ामर्थ्य मात्र फारच मोठे आहे ज्या राष्ट्राला अेखादी मोडकी तरवार किंवा

राजनिष्ठा ती व्यवस्था करीत आहे तोपर्यंत ठीक आहे. पण हिंदु लोकात देशनिष्ठा अुत्पन्न झाली तर पुढे काय करावे याचा विचार अिंग्रजानी केलाच पाहिजे व याचा विचार करू लागताच ते गोंधळून जातात. हिंदुस्थान देशनिष्ठ झाल्यावर मि. सिंगे हे आपल्या पुस्तकात म्हणतात की मग अेक दिवसभर देखील हिंदुस्थानात राहण्याची सोय नाही अिंग्लडचे भिकारडे आरमार हिंदुस्थानला काय ताब्यात ठेवणार! अिंग्लड साम्राज्य सांभाळण्यास किती असमर्थ आहे हे धूर्त अिंग्रजानी केव्हाच ताडले आहे. आपले साम्राज्य बुडणार हे त्याना पूर्णपणे कळले आहे. आता त्याचे सर्व प्रयत्न फक्त अशाचसाठी आहेत की, जितकी जास्त चिकाटी टिकविता येअील तितकी टिकवावी. परिणामाचा प्रश्न नसून दिरगाअीचा प्रश्न आहे कारण अिंग्रज लोक आपल्या अिकडे वाटतात तितके काही सशक्त नाहीत आपल्या तिकडे निवडलेले मुदृढ लोक येतात व वाटेल तितके वाढतात, परंतु खुद्द त्याचे देशात पाहावे तों आपल्या सामान्य मनुष्यात व त्याच्या सामान्य मनुष्यात काही भीतिदायक भेद नाही. काही वर्षापूर्वी राज्यारोहणानिमित्त हिंदी शिपाअी अिकडे आले होते. नेपाळी, शीख व मराठा शिपाअी कटकपणात व धाडसात अिंग्रजी शिपायापेक्षा काकणभर जास्तच आहेत. स्वदेशाभिमानात ते कमती आहेत व म्हणूनच अिंग्रजी अमलाखाली राबत आहेत अिंग्रजाची शारीरिक अवनति झपाट्याने होत आहे. गेल्या पचवीस वर्षात सैन्याला अुपयोगी म्हणून अुंची व वजन ठरविलेले होते तितके आता शेकडा दहात आढळत नसल्याने ती अट कमी करण्यात आली आहे शिपायाचा धंदा सोडून अिंग्रजी तरुण दुकानाकडे धावत जातो म्हणून लॉर्ड रॉबर्टस् रागे भरत आहेत व त्यानी या अिंग्रजी शरीरक्षयाला भिअून जाअून 'रायफल क्लब' ची स्थापना करण्याची खटपट जारीने चालविली आहे. बहुतेक पत्रातून या विषयाची चर्चा सुरू झालेली आहे, व जो तो आपापल्या परीने अिंग्रजाची अशक्तता दूर करण्यास काय युक्ति योजावी ह्या विचारात आहे. अिंग्लिश लोक आता अगदी घाबरले आहेत. त्यातूनही आयर्लंडची चळवळ, अिजिप्तमधील चळवळ, हिंदुस्थानातील चळवळ, जर्मनीची तुर्कस्थानातील चळवळ, वगैरे चळवळींनी लंडनच्या अुरात धडकी भरली आहे. ज्या आरमाराला व सैन्याला पाहताच आपण हिंदुलोक गर्भगळीत होतो त्या *आरमाराची व सैन्याची खरी योग्यता अिंग्लडच्या पूर्ण ध्यानात आलेली आहे* जर आयर्लंडने व हिंदुस्थानने आपापले लोक परत बोलावले तर अिंग्लडचे सैन्य किती अुरणार? ते अिंग्लडच्या निम्म्या भागाचे रक्षणास देखील पुरणार नाही! अशा भीतीने कंपित होअून हल्ली अिंग्लडमध्ये दैनिक पत्रातून वरील आशयाच्या चर्चा चाललेल्या आहेत पैकी अुदाहरणार्थ अेका पत्राची हकीकत खाली देतो.

'डेली मिरर' या नावाचे अेक दैनिक पत्र लंडनमध्ये प्रसिद्ध होत असते। ह्या पत्राच्या लाखो प्रती दररोज खपत आहेत. हे पत्र लहान मुलात फारच प्रिय असल्याने त्या मुलासाठी लष्करी शिक्षणाच्या आवश्यकतेवर या पत्रात लेखमाला सुरू झाल्या आहेत. अिंग्रजी तरुणाची शरीरप्रकृति दिवसेंदिवस किती विलयाला जात

आहे याचे पूर्ण दिग्दर्शन करून हिंदुस्थानातील स्वदेशी चळवळ, अजिप्तमधील गडबड वगैरे चिन्हावरून अिंग्रजाचे दुसऱ्याचे कुरणावर चरण्याचे व दुसऱ्याच्या पायावर अुभे राहण्याचे दिवस संपत आले असून आता स्वत चे सामर्थ्य निदान अिंग्लडच्या सरक्षणापुरते तरी वाढवावे असा अुपदेश देण्यात आला स्वयसेवकाचे सैन्य तयार केल्याशिवाय अिंग्लडची धडगत नाही, ही गोष्ट लॉर्ड रावर्टस्‌पासून तो वर्तमानपत्राच्या चारकापर्यंत सर्वांच्या ध्यानात आता आली आहे सक्तीचे लष्करी शिक्षण द्यावे असे अेका पक्षाचे म्हणणे आहे व दुसऱ्याचे म्हणणे की लष्करी शिक्षणाची महत्वाची अगे अितकी लोकप्रिय करून सोडावी की, लोकानी आपण होअूनच लष्करी शिक्षण घ्यावे ही स्थिति घडवून आणण्यास मुख्य अुपाय म्हणजे तरुणपणीच विद्यार्थ्यास शारीरिक शिक्षणाची गोडी लावणे 'डेली मिरर' मध्ये अेक लष्करी ऑफिसर म्हणतो की लहानपणी विद्यार्थ्यास जर व्यायामाची गोडी लावली तर तो जन्मभर व्यायाम सुरू ठेवल्याशिवाय राहणार नाही तेच अेखाद्या बावीस वर्षाच्या तरुणाला व्यायामाचा नाद लावू म्हटले तर ते अतिशय कठीण होतें असा अनुभव आहे शिवाय लहानपणी तालेल अितका व्यायाम करीत गेले तरी शरीराला वळण तावडतोब लागते व अगातील रग वाढत जाते परतु अेकदा हाडें व स्नायु कठीण झाले म्हणजे मग त्याना वळण लावणे अशक्य होअून जातें म्हणून लहान मुलाना १४ वर्षापासून तालीम शिकवलीच पाहिजे असे त्याचे म्हणणे आहे परतु तालीम करून नुसते लठ्ठ होण्यात खरी शक्ति नसते हल्लीच्या वेळी स्वदेशरक्षणाला नुसत्या तालमीहून अधिक शिक्षण पाहिजे आहे व ते शिक्षणही तरुणपणीच देअू लागाव असे येथे सर्वानुमते ठरत आल आहे हे शिक्षण तालमीबरोबर दिले गेले म्हणजे लष्करी शिक्षण स्वयसेवक शिपायापुरत मिळणार आहे आपल्याकडे लष्करी शिक्षणाबद्दल लोकाची फार विलक्षण समजूत झालेली आहे लष्करी शिक्षण म्हणजे अेक मोठे भानगडीचे, धोक्याचे व कठीण काम आहे असे त्याना वाटते वर्षानुवर्षे शिकत बसल्याशिवाय लष्करी शिक्षण मिळत नाही, अशी अेक घातकी समजूत प्रचलित आहे परतु खरी गोष्ट याच्या अगदी अुलट आहे अुत्तम सेनानी व्हावयास वर्षानुवर्ष तर काय, पण जन्मभर शिक्षण घेतले तरी हवेच आहे नेपोलियनने देखील लष्करी डावपेचात चुका केल्या परतु स्वदेशाच्या सरक्षणार्थ स्वयसेवकत्व करण्याअितके, सैन्यामधील शिपायाअितके, मनुष्यात मर्दपणा येण्याअितके लष्करी शिक्षण घेणे फार सोपे आहे वाटेल तो मनुष्य शिपाअी होअू शकेल, या शिपाअीगिरीच्या शिक्षणाला मोठीशी बुद्धि वा मोठासा काळही लागत नाही अत्यत अडाणी व मतिमद अिंग्रज अुत्तम शिपाअी होतो, व वेळ किती लागतो हे मी 'स्पेक्टेटर' नावाच्या पत्राच्या शब्दातच सागतो Soldiers can be thoroughly trained in six months and made to enjoy their training instead of dragging through it as they do at present अुत्तम शिपाअी बनण्यास सहा महिन्याहून अधिक काळ लागत नाही व त्या सहा महिन्यातही

ते काम हसतखेळत करता येते. लष्करी शिक्षणात तीन मुख्य गोष्टी आहेत; Riding घोड्यावर बसणे, Shooting अचूक नेम मारणे व Drill कवाईत; शिवा गनिमी काव्यात कवाअितीचे माहात्म्य फारच थोडें असल्यामुळे कटकपणा. हे तिन्हीही गुण लहानपणी फारच अुत्तम शिकविता येतात. '*It is much, easier to teach* boys to shoot and ride and soldier, generally than it is to teach young men. अितके शिक्षण १४–१५ वर्षांपासून दिले की, त्या तरुणास शिपाअीगिरीचा छंद लागतो, त्याचे शरीर सुदृढ होतें. क्रिकेटच्या अैवजी नेम मारण्यात, तालीम करण्यात व घोड्यावर बसण्यात तो जास्त वेळ आनंदाने व हौसेने खर्च करतो, व स्वदेशावर जर कोणी स्वारी केली व मातृभूमीचे अंगावरील स्वातंत्र्यशालूच्या पदराला स्पर्श करण्याचे मनात आणले तर त्या दुष्टाच्या छातीवर नाचण्याचे व कंठ चिरण्याचे सामर्थ्य त्या तरुणांचे अंगात आलेले असतें. डेली मिरर म्हणते, अशा रीतीने सर्व अिंग्लंड शिपायांचे राष्ट्र बनविता येअील स्वदेशस्वातंत्र्यासाठी बळी देण्यास प्रत्येक तरुणाचा देह योग्य होअील, याहून धन्यता ती कोणती? व म्हणून 'डेली मिरर'ने Boy army for Britain ब्रिटनसाठी तरुणसैन्य तयार करण्यास आरंभ केला व त्या *पत्राच्या तरुण वर्गणीदारांपैकी ज्यांची खुषी असेल त्यांनी अर्ज करावेत असे* लिहिले अितक्यात 'A striking and patriotic response to our proposal' म्हणून लेख आला व त्यात अेका देशभक्ताने दीड दोन महिन्यात आपण शिक्षण देअून १४।१५ वर्षांच्या अेका पथकास बंदूक मारणे, घोड्यावर बसणे, कवाअीत व तरवारीचे हात शिकवतो असें अभिवचन दिल्याचे प्रसिद्ध झाले आहे व आता ही तरुणसेना तयार होणार यात काही शंका नाही. या सर्व तयारीचा अुद्देश काय तर 'in case a foreign foe invaded our shores every Englishman ought to be in a position to assist to repel the invader. अिंग्लंडवर दुसऱ्याने स्वारी केली तर प्रत्येक तरुणाने आपल्या देश

## ९. समाप्तीचा आरंभ

गेल्या आठवड्यात लंडन शहरात हिंदुस्थानाबद्दल जितकी खळबळ उडाली आहे तितकी खरोखरच ५७ चे सालापासून आजपर्यंत उडाली नव्हती ! १८५७ चे सालानंतर अिंग्रज लोक आपणाला अगदीच विसरले होते असे म्हणून त्यांच्या हिंदुस्थानविषयीच्या प्रेमाला मी बाध आणीत आहे असं बिलकुल नाही ५७ सालापासून ह्यूम, वेडरबर्न, कॉटन वगैरे स्नेह्यांचा ताडाचा ताडा हिंदुस्थानचे कुरणात चरत चरत आपल्याशी स्नेह संपादून होता हे मी नाकबूल करीत नाही त्याचप्रमाणे आधुनिक मॅझिनी नामदार गोखले सी आय अी. यांच्या अिंग्लंडवरील स्वाऱ्यांचे वेळी हिंदुस्थानने अिंग्लंडला जवळजवळ पादाक्रांत केलेले आहे हे मी कबूल करीत आहे परंतु गेल्या आठवड्यात या सर्व प्रसंगाहून जास्त अशी खळबळ सुरू झाली आहे. ना गोखले सी आय. अी यांनी अिंडिया पत्राने म्हटल्याप्रमाणे 'आपली कामगिरी फत्ते' करून लंडनकडे पाठ वळविली तोच अपशकुनांना आरंभ झाला. गोखल्यांनी मोर्ले यांच्या कानाच्या जितके जवळ तोंड नेता येअील तितके नेअून हिंदुस्थानात राजद्रोह नाही असे सांगून सर्व व्यवस्था करून ठेवली होती 'डेली न्यूज' च्या बातमीदारास फुल्लरचा राजीनामा पसंत झाला असे कळताच ना. गोखले यांनी असे स्पष्ट अभिवचन दिले की 'The public opinion will come to its normal state आता सार्वजनिक चळवळ शांत होअील' अुघडच आहे कारण, सर्व चळवळ फुल्लर साहेबाविरुद्धच होती देशातील चाळीस कोटी रुपये लुटले जात आहेत म्हणून काही आम्ही चळवळ करीत नव्हतो ! दुष्काळाने रूसो जपानी युद्धाअितके लोक दरवर्षी मरत आहेत म्हणून आमची चळवळ किंवा स्वदेशाला दारिद्र्याचे नरकात बसावे लागत आहे म्हणूनही आमची चळवळ नव्हती तर आमची गेल्या वर्षातील चळवळ फुल्लरच्या राजीनाम्यासाठी होती व आता तो राजीनामा मिळताच लोकांची मने पुन्हा पहिल्यासारखीच थंडगार होतील ! मग स्वदेशाच्या पायातील बेडी अेक रतीभरही सैल न का होअीना ? पण 'The public opinion will come to its normal state !' अशा रीतीने सर्वांची समजूत घालून व ब्रिटिश राज्य 'Providential dispensation' आहे अशी स्वतःचीही समजूत घालून ना गोखले सी आय अी हिंदुस्थानाकडे जावयास निघाले तोच अेक भयंकर तार येअून थडकली अेडवर्ड बादशहा पदच्युत झाले ! व बाबू सुरेंद्रनाथ बॅनर्जी भारतभूच्या राजचिन्हांनी मंडित झाले !

ही तार संध्याकाळच्या पत्रात प्रसिद्ध होताच सर्व लंडन हलू लागले काणास काहीच अुमज पडेना आज सकाळी हिंदुस्थान आपल्या ताब्यात होता व अेका चार तासाचे आत तो अेका बंगाली बाबूच्या ताब्यात गेला हे अैकून कोणास अन्न रुचेना. व्यापारी लोक आपल्या व्यापाराचे काय होअील म्हणून चिंतातुर झाले

पेन्शनर लोक आपल्या पेन्शनचें काय होओील म्हणून चिंतातुर झाले; सर हेन्री कॉटन व वेडरबर्न हे आता हिंदुस्थानचें काय होओील म्हणून चिंतातुर झाले. परंतु ह्या अिंग्लिश लोकांतील चिंतेपेक्षा ब्रिटिश कांग्रेस कमेटींतील अिंडियन सभासदांना तर रात्रभर झोप येओीना. या सर्वांना गोखल्यांनी नुकतेंच वजावून सांगितलें होतें की, हिंदुस्थानवर अिंग्रजांचें राज्य परमेश्वरानेच आपल्या फायद्यासाठी आणलेलें आहे व म्हणून मी या ओीश्वरी कृपेचा स्वीकार करून आपण यावच्चंद्रदिवाकरौ तिला अगदी अुराशी धरून बसले पाहिजे. परतु बाबू सुरेंद्रनाथाने स्वत: अभिषिक्त होअून ओीश्वरदत्त अिंग्रजी राज्याला झुगारून दिले! आता हें जर ओीश्वराच्या कानावर गेलें तर तो काय म्हणेल? दु:खात सुख अितकेंच की अिंग्लिश लोक मूर्तिपूजक नसल्याने त्यांच्या ओीश्वराला कान नाहीत! नाही तर यापूर्वीच त्याला ही गोष्ट अैकू गेली असती. परतु सर हेन्री कॉटनला कान आहेत याची वाट काय लावावी? त्याना ही गोष्ट हिंदुस्थानपासूनच अैकू आली असेल! ते हिंदुस्थानच्या हिता करताच पण रागावले असतील; व हेन्री कॉटन रागावले असता ओीश्वर रागावला काय, न रागावला काय सारखाच! तेव्हा सुरेंद्रनाथांनी हें किती घोर पाप केलें! आता याचें क्षालन कसें तरी केलेंच पाहिजे म्हणून दे. दत्त यांनी लडन टािम्सला अेक पत्र टाकले. नव्हे, अेक नव्हे दोन पत्रें टाकली व त्याच्यात सुरेंद्रनाथांना ब्राह्मणांनें नुसते आशीर्वाद दिले व अशा प्रकारचे आशीर्वचनविधि हिंदुलोकांत वारवा करण्यात येतात म्हणून त्यात भीति वाटण्यासारखे काहीअेक कारण नाही, असें प्रसिद्धपणे कळवून पुढे लिहिले आहे की सुरेंद्रनाथाना हल्ली फार गर्व झालेला आहे व त्यामुळे त्यांच्या हातून असले हास्यास्पद प्रकार घडत आहेत. ब्राह्मणाच्या आशीर्वचनाची सुरेंद्रनाथांना भूक कां लागावी हे मला काही समजत नाही अितके लिहून R. C. Datt म्हणून खाली सही केली आहे. पण पुन्हा शंका आली की आपल्यावर अिंग्लिश लोकाचा विश्वास कसा बसेल? असें काय आपल्या अंगी आहे? थोडा वेळ विचार करून त्यांनी अुत्तम तोड काढली व वरील मुसद्या सहीखाली 'Late Civil Servant' 'आपलाच अेक बंदा गुलाम' म्हणून असलेल्या थोर पदवीनें राजनिष्ठा नम्रतापूर्वक नमूद केली. हे पत्र प्रसिद्ध झाल्यावर लडनच्या साहेबलोकांस जरा धीर आला. हिंदुस्थान अजिवात सुटले नाही, म्हणून आनद झाला व जो तो दे. दत्तांची पाठ थोपटू लागला.

परतु संकटें कोसळू लागली म्हणजे अेकदम कोसळतात. दे. दत्तांनी सुरेंद्रनाथांच्या राज्याभिषेकाचें संकट टाळले व अिंग्लिश लोक आपल्या या अेका गुलामाच्या आश्वासनावर स्वस्थ बसले न बसले तोंच बंगालमध्ये सुरेंद्रनाथांच्या राज्याभिषेकाहूनही अेक भयंकर प्रकार चालू असल्याची बातमी आली. 'डेली न्यूज' नांवाच्या दैनिक पत्रात प्रसिद्ध झालें की बगालमध्ये 'Golden Bengal' म्हणून गुप्त संस्था असल्याचा तपास लागत आहे. तिच्या शाखा फार विस्तृत पसरलेल्या

ाहेत व तिने नुकतेंच अेक हस्तपत्रक प्रसिद्ध करून त्यात 'Why Cry ? Drive out the Saheb' म्हणून मजकूर प्रसिद्ध केला आहे! सुरेंद्रनाथांनी ापल्या राज्यारोहणाच्या भाषणात असें सांगितलें की विलायती भाखरेत डुक-ाचे व गाअीचे रक्त मिसळलेलें असतें. अशा रीतीनें सर्व बंगालमध्यें १८५७ च्या ळेस सुरू असलेल्याच गोष्टी सुरू झालेल्या आहेत. 'वंदे मातरम्' नावाच्या चटोर' पत्रात 'They (The English) desire to make the Government of India popular, without ceasing in any sense to be essentially English. We desire to make it autonomous and absolutely free of British control' म्हणून मजकूर प्रसिद्ध झाला आहे. 'अिंग्लिश लोकाचे मनातून आपली सत्ता हिंदुस्थानावर कायम राहावी; परंतु आमची अशी अिच्छा आहे की आमच्यावर ब्रिटिशांचा यत्किंचितही अमल न राहता आम्ही र्ण स्वतंत्र व्हावें.' या लावलचक तारेनें अिंग्रजांना खरोखरच धीर सुटला आहे. त्यापाठी ब्रह्मराक्षस म्हणतात तें काही खोटें नाही. अिंग्लंडमध्ये हल्ली काय स्थिति आहे हे थोडे तरी लक्षात यावे यासाठी अिंग्लंडमधल्या प्रमुख पत्रातील ाही अुतारे देतो.

डेली क्रॉनिकल :– 'Hindu unrest' या सदराखाली लिहितो की 'The Coronation of king Banerjee in Bengal is the climax of political unrest in Bengal. He is a typical Babu, a frothy speaker with no backing of judgement or character. The cry 'Vande mataram' has a seditious meaning attached to it Partition of Bengal was the greatest mistake of Lord Curzon' वगैरे. राजा बानर्जी यांच्या राज्याभिषेकात बंगालमध्ये तर या चळवळीचा कळस झाला आहे.

डेली मिररने आपला बातमीदार दादाभाअीकडे धाडला व बंगालमध्ये ुठावणी होणार की काय म्हणून विचारलें? दादाभाअींनी सांगितलें की तें सर्व रकारच्या वर्तनावर अवलंबून आहे. परंतु अुठावणी वगैरे काहीअेक होणार नाही.

डेली टेलिग्राफ: He (Banerjee) has just surpassed himself by being *crowned and anointed king whether of India or of* Bengal only is not stated. In the old days the shift of such an imposter would have been short. The Government would either have clapped him under restraint as a dangerous lunatic or ended his days in summary fashion. But now Banerjee's neck is quite safe ... mined up with the swadeshi movement there is a vague, elusive nationalist feeling which is fostered by a cheap national press. None can form any clear idea as to how much of this wild inflamatory oratory is merely the talk of Banderlog.'

सुरद्रबाबूवर या पत्रात शिव्यांचा भडिमार झालेला आहे हिंदुस्थान वडाच्या काठावर आहे व ही चळवळ आणखी थोडे दिवस चालली तर या वर्तमानपत्रांनी व वक्त्यांनी जोपासना केलेल्या चळवळीतून भडका अुडेल असे या भविष्यवाद्याचे म्हणणे आहे

The Standard :—या पत्रात तर फारच लांब लेख आलेला आहे "It appears that we are on the eve of an eruption, which though it might take a different fo·m would be hardly less deplorable than the storm that was brewing half a century ago There is certainly an active and malignant agitation against the Government Sedition is openly preached and authority defied To the cry 'India for the Indians' has been added the watchword 'Down with the master foe " The Coronation of the Babu king cannot be overlooked, etc' हिंदुस्थान १८५७ च्या बडाच्या तयारीत आहे ! अिंग्लिशांचा अुघड अुघड द्रोह शिकविला जात आहे व हिंदी लोकांसाठीच हिंदुस्थान !' या महामंत्राचा अुच्चार चालला आहे! हे पत्र पुढे म्हणते की अशाने हिंदुस्थानचे कल्याण होणार नाही ब्रिटिश राज्यात मिळणाऱ्या नोकऱ्या वगैरे सवलती त्यांना अितरत्र मिळणार नाहीत

डेली ग्रफिक —या पत्रात Emperor Banerjee म्हणून मथळ्याखाली लेख आलेला आहे या पत्राने सुरेंद्रनाथांचा अेक फोटोही दिला आहे वंदे मातरम्' पत्रातील हा अुतारा तर बहुतेक पत्रातून प्रसिद्ध झाला आहे डेली न्यूजच्या बातमीदारापुढे हेन्री काटन यांनी अेक लांब चऱ्हाट घळून असे सिद्ध केले आहे की, हिंदुस्थानला आता काही सवलती दिल्याशिवाय त्यांतील सुशिक्षितांचा ब्रिटिशांच्या सत्तेत असलेला विश्वास व त्यांची राजनिष्ठा अभंग राहणार नाही लडन टाअिम्सनेही गडबड अुडवून दिली आहे स्काटलंडमधल्या प्रमुख दैनिक पत्रानेही बडाची आरोळी केली आहे

अेका संस्कृत पंडिताने तर मातरम् शब्दाची व्युत्पत्ति करता करता असे सिद्ध केले आहे की माता म्हणजे कालीदेवता होय व काली म्हणजे संहारकर्ती देवता होय म्हणून 'वंदे मातरम् म्हणजे हे काली, तू अिंग्लिशांचा संहार कर'!

अिंग्लिशांचा संहार कर ! ही दुःस्वप्नं अिंग्लिशांना का पडू लागली आहेत? परमेश्वराच्या मनात जे असेल ते तो करतो असा आमचा हिंदूंचा भरवसा आहे, म्हणून देवा तू अमुकच कर हे त्याला वळे वळे सांगण्याअितके आम्ही अुर्मट झालो नाही देवाच्या मनात आले तर संहार किंवा संरक्षण हे त्याला अेका क्षणात करण्याची शक्ति आहे त्याला तू संहारच कर अशी आज्ञा करण्याची आमची अिच्छा नाही, आमची योग्यता नाही त्याला आम्ही वंदन करू मग त्याला योग्य वाटेल ते तो करील हिंदुस्थानातील लोकांत दृढ श्रद्धा अुत्पन्न होते आहे ही गोष्ट

त्य आहे आमचे राष्ट्र अुन्नतीच्या मार्गाकडे जात आहे यात शंका नाही. परंतु हणून तेथे गुप्त मंडळाची जाळी पसरली आहेत किंवा तेथे अुद्याच बंड होणार गाहे अशी भीति अुगीच अिंग्लिशांनी का बाळगावी? गुप्त मंडळ्या करावयास ग्म्ही का रशियन लोक आहोत? आम्ही हिंदुस्थानचे हिंदी लोक आहोत! अिंग्रजी राज्य हा अीश्वरी प्रसाद आहे म्हणून आमचे पुढारी शपथेवर सांगत ाहेत. अितकी 'राजनिष्ठा' असता वरील तर्क संभवनीय दिसत नाहीत ते ाहीही असो, परंतु अेका पत्रकाराने केलेली सूचना मात्र आपल्या देशबांधवांनी क्षात ठेवण्यासारखी आहे. ती सूचना अशी की स्वदेशी चळवळीने मुसलमान गेकांना फार तोटा होत आहे म्हणून आपण ती चळवळ बंद ठेवून आपल्या मुसलमानभाअींशी स्नेह संपादन करावा यातच हिंदुस्थानचे खरे हित आहे.

अशा रीतीने हल्ली हिंदुस्थानाबद्दल भवति न भवति चालू आहे. टोरी किंवा कॉन्सरव्हेटिव्हच्या मताने हिंदुस्थानातील धाडसी चळवळ जुलमाने मारून टाकावी व ब्रिटिश अमल चिरस्थायी करावा. लिबरल पत्राच्या मताने जास्त जुलूम जर आता सुरू केला तर हिंदी लोक जास्त चिरडीस जातील. याकरिता किंचित् सवलती देअून त्यास संतुष्ट करावे व ब्रिटिश सत्ता चिरस्थायी करावी. या पक्षामध्ये साधनासाधनामध्ये जरी फरक आहे तरी सुदैवाने ब्रिटिश सत्ता चिरस्थायी करावी हें साध्य उभयतांसही मनापासून आवडते आहे! व हेच साध्य हिंदु लोकांसही आवडते आहे असे सिद्ध करण्यासाठी हेन्री कॉटनने दे दत्त व गोखले यांचा सन्मानपूर्वक उल्लेख करून त्यांची मते हिंदुस्थानच्या अंतिम कल्याणाला मिळवितील अशी शिफारस केली आहे! हें अंतिम कल्याण म्हणजे gradually हळूहळू, सरपटत येणारे ब्रिटिश साम्राज्याखालील स्वराज्य हे होय! हिंडमन यांच्या जस्टिस पत्राच्या ताज्या अंकात त्यांनी लिहिले आहे की 'अिंग्लंड हिंदुस्थानची काळजी वाहू लागले. कारण हिंदुस्थान हिंदुस्थानची काळजी वाहू लागले! हिंदुस्थान जागे झाले आहे. हल्लीची चळवळ म्हणजे 'The Beginning of the End' आहे. जिकडे सत्य त्याचा विजय असो!'

—ता. ५ ऑक्टोबर १९०६

\+ + +

तसेच अितका दम धरून प्रसंग टाळला असता की बहार अुडाली असती परंतु ' काम अेप क्रोध अेप ! ' रागाच्या झटक्यात झाले काय की, हेन्रीचे अंगावरचे कातडे त्यानी फाडून पार झुगारून दिले ! परवा के तय्यबजीच्या दुःखप्रदर्शनाचे वेळी सर हेन्री कॉटन यानी भाषण केले व त्यात जुन्या पुढाऱ्याच्या राजनिष्ठेबद्दल व नेमस्तपणाबद्दल स्तुति करून ते रडत ओरडत व जळफळत म्हणते झाले की, " माझ्यापुढे तरुण अिंडियन बसले आहेत त्याना माझे कळकळीच – हिंदुस्थानच्या कळकळीचे सागणे आहे की, त्यानी या जुन्या महात्म्याचे अनुकरण करावे हिंदुस्थानात हल्ली जे अतिरेकी व अघोरपथी लोक निघाले आहेत त्याचे अैकू नका ते म्हणतात, की आम्हास पूर्ण स्वातंत्र्य पाहिजे, म्हणजे आमचा हिंदुस्थानावरचा अिंग्रजी अमल नाहीसा करावयाचा अरेरे, असे करू नका कर ! राष्ट्रीय सभा मागते आहे ते ठीक आहे पण ब्रिटिशाचा अमल नाहीसा करून पूर्ण स्वतंत्रता मिळवावयाची हे म्हणणे अनर्थाचे आहे " सभेत आरोळी अुठली (नाही नाही !) नाही काय, ते अनर्थाचे आहेच आहे ! हेन्री कॉटन हिंदुस्थानचे मित्र ! लाडगा आला रे आला ! राष्ट्रीय मेंढवाड्यातील शेळया जितक्या लवकर सावध होतील तितक्या बऱ्या !

हेन्री कॉटनची डेलीन्यूजच्या वातमीदाराशी भेट झाल्याचे मागे कळविलेच आहे त्यावर या पाळीच्या ' अिंडियन सोशियालॉजिस्ट' मधील टीका वाचण्यासारखी आहे हिंदुस्थानात पुष्कळ लोक स्वातंत्र्य मागत आहेत म्हणून हेन्री कॉटन त्याना अघोरी पथात काढीत आहेत ते ठीकच आहे परंतु हा अघोरी पथ केवळ हिंदुस्थानातच आहे असे नाही अिंग्लडमध्येही अेक अघोरी पथ राजकीय स्वातंत्र्य मागत आहे या अघोरी पथाची अेक टोलेजंग सभा नुकतीच हाअिड पार्कमध्ये झाली या अघोरी पथात सर्व स्त्रियानी आपली नावे नोदवून घेतली आहेत अिंग्लडमधल्या स्त्रियाना राजकीय स्वातंत्र्य पाहिजे आहे ! या सभेत मिस पॅथर्स वाअीचे भाषण झाले. त्यातील अेक अुतारा देतो " आम्ही हे पक्के जाणून आहो की स्त्रियाचे अिंग्लडमध्ये जे अत्यंत हाल होत आहेत त्याचे मुख्य कारण आमचे राजकीय पारतंत्र्य होय आम्हाला पूर्ण राजकीय स्वातंत्र्य पाहिजे आहे या कामी पुरुषानी आम्हास साह्य द्यावे अशी आमची अिच्छा आहे परंतु जर ते खुषीने आम्हास राजकीय स्वातंत्र्य देत नसतील तर आम्ही साफ सागतो की, आम्ही स्त्रिया ते त्याचेपासून हिसकावून घेण्यास समर्थ आहोत आम्ही मनात आणताच सर्व अिंग्लडचे व्यवहार अेका दिवसात बंद पाडू शकू व राजकीय स्वातंत्र्य हिसकून जिंकून घेअू शकू ! ' हिंदी देशबधूनो ! ही अेक स्त्री बोलते आहे व आपण अजून नेमस्त पुरुष आहोत ! गुलामगिरीचा वरवटा पुन्हा कोणत्याही देशावरून न फिरो !

गुलामगिरीचा वीट येणे हे काही मोठें नवल नाही. तो वीट आजपर्यंत आला नाही हेंच खरें नवल आहे परंतु आता हेन्री कॉटन कितीही रागावले तरी गुलामगिरीचा शेवट जवळ आला आहे यात शंका नाही. दादाभाअींच्या अध्यक्षत्वाचे आड लपून हेन्री कॉटनने ज्या अघोरी पयावर गोळया झाडल्या त्या पयातच देशभक्त शामजी कृष्णवर्मा याची गणना आहे त्याच्यावर अिंग्रजी पत्रें कितीही वोट मोडीत असली तथापि हिंदुस्थानच्या भाग्याचे जे काही किरण हल्ली चमकत आहेत त्यात त्याची गणना अितिहासास करावी लागणार यांत शंका नाही देशभक्त शामजींनी अेडमंड वर्क नावाची स्कॉलरशिप आपले महाराष्ट्रांतील देशबंधु प्रधान बी अे, अेल अेल बी याना दिल्याचे सर्वविश्रुतच आहे त्या लेक्चरशिपच्या नियमाप्रमाणें ठरलेला निबंध परवा दे प्रधान यानी वाचून दाखविला. ' भावी भारतनिर्मिति ' हा विषय होता. त्या विषयाचें दे प्रधान यानी फारच विस्तृत, जोरदार, सुंदर व यथार्थ विवेचन केलें. तो निबंध बहुतेक प्रसिद्ध होअीलच त्यानी भावी भारताची निर्मिति कशी करावयाची हें सांगण्याच्या आधी प्रस्तुत स्थितीची शोचनीयता फार मार्मिक रीतीने वर्णन केली मुसलमानी अमदानीपेक्षा अिंग्रजी वरवटा अनंत रीतीने स्वदेशभूमीच्या नाशास कारणीभूत झालेला आहे. हल्ली जी शांतता दिसत आहे ती जिवंत लोकांची शांतता नसून मेलेल्याची शांतता आहे या शांततेबद्दल अिंग्रजांचे आभार मानावयाचे तर स्मशानशांततेबद्दल मृत्यूचेही आभार का मानू नयेत हे समजणे फार कठीण आहे सध्याची झालेली ही दुःस्थिति टाळण्यास दे प्रधान म्हणाले की पूर्ण राजकीय स्वातंत्र्य हीच अेक मात्रा आहे स्वातंत्र्य हे निसर्गदत्त आहे ते आज मिळविणें कठीण दिसते म्हणून अुद्या तें मिळविता येणार नाही असे कशावरून ? अिटलीचे स्वातंत्र्याला कालपर्यंत ' स्वप्नसृष्टि ' म्हणत होते ! पण आज तीच स्वप्नसृष्टि खरी झालेली आहे व अिटली, तिचे रोम व तिचा आल्प्स हे स्वातंत्र्याच्या निशाणाला आपल्या पवित्र मस्तकावर धारण करून सर्व जगाला स्वातंत्र्यप्रेमाची ललकारी देत आहेत ! तेंव्हा सद्य स्थितीला टाळण्यास दुसरी तोड नाही म्हणून पूर्ण राजकीय स्वातंत्र्य पाहिजे आहे ! हे मिळविण्याचे अेक दोन अुपायही त्यांनी सुचविले की चहूकडे शिक्षण-वृद्धि करावी लोकाना राजकीय हक्क समजावून द्यावे, मुसलमान-बघूनी व सर्व हिंदी लोकांनी अेक व्हावे व स्वातंत्र्याशिवाय थांबावयाचे नाही असा निश्चय करावा आपण पात्र झालो म्हणजे प्रतिनिधि, स्वातंत्र्य वगैरे देण्याचे अिंग्रजांनी अभिवचन दिलेले आहे वगैरे आशयाचे दे प्रधान याचे निबंध वाचन झाल्यावर देशभक्त लोकमान्य शामजी याचे आभारप्रदर्शक भाषण झाले व ' वंदे मातरम् ' राष्ट्रगीत देशबंधु टागोर—बंगालचे महर्षि टागोर याचे पणतू—यानी सुस्वर सुमंगल रीतीने गाअिल्यावर सभेचे काम संपविण्यात आलें.

ही बातमी हेन्री कॉटनला कळेल तर त्याना काय वाटेल ? परमेश्वर त्याना शांतता देवो !

—ता २६ ऑक्टोबर १९०६

\+ + +

# ११. हिंदुस्थानचे गारुडी

लंडन : ता. ५–१०–१९०६ शनवारचा दिवस करमेना म्हणून व्हरायटी ' हिपोड्रोम ' मध्ये गेलो होतो. व्हरायटी थिअेटरें आपल्या लोकांना नवीन आहेत म्हणून त्यांची थोडक्यात कल्पना द्यावी असें वाटतें. या थिअेटरमध्ये गाणाऱ्यांचें गाणें, नाचणाऱ्यांचा नाच, खुषमस्कऱ्यांचा खुषमस्करेपणा, पशुपक्ष्यांचे नाना तऱ्हेचे खेळ, वायसिकलवरचें प्रेक्षणीय काम, तालमी, मनुष्यांचीं सुंदर शरीरें, ट्रॅपीझवरचीं कामें, कुस्त्या, जुजुत्सूचे खेळ, अिंग्रजी जादूगार, अित्यादि सर्व गोष्टी पाहावयाला व अैकावयाला सापडतात. ती अेक प्रकारची खिचडीच आहे म्हणावयाची. हिपोड्रोममध्ये गेल्यानंतर अेक प्रोग्राम विकत घेतला व वाचावयास लागलो तों त्यात ' Indian Fakirs, Hindu Conjurers ' ही अक्षरें दिसलीं. हे काय करून दाखविणार याबद्दल मोठी अुत्सुकता प्राप्त झाली. काही वेळाने ते आले. त्यांचा पोषाक, ती त्यांची पुंगी, डमरू व पोतडी अगदी हिंदुस्थानातल्याप्रमाणे. प्रेक्षकांना त्यांच्या पोषाकात तर नवीनपणा वाटलाच, पण त्यांनी जे खेळ करून दाखविले तेही तेथील लोकांना नवीनच होते. अेकंदर ते सर्व खेळ फारच सफाअीने केलेले पाहून त्यांना फार कौतुक वाटलें. त्यांनी ज्या टाळ्या वाजविल्या त्यावरून असें मानण्यास जागा आहे. खेळ आपल्या अिकडे जे अगदी साधारण आहेत त्यांपैकीच होते. त्या गारुडी लोकांनी आपल्यापैकी अेकाला अेका पेटाऱ्यात अेका जाळ्यात घालून नाहीसा केलेला व फिरून त्याच पेटाऱ्यातून मोकळा बाहेर काढलेला पाहून येथल्या लोकांना फार आश्चर्य वाटलें. खेळ सर्वांच्यासमोर व अगदी नजीक करून दाखविले. त्यांच्याकडे कित्येकांचे डोळे लागलेले होते ! कित्येकांच्या बायनाक्युलर्स लागलेल्या होत्या. पण त्यांनी आपलें काम फार हुषारीने व हातचलाखीने केलें. लोक त्यांची करामत पाहून फार खूप झाले व गारोड्यांनाही मॅनेजराकडून बरेच पैसे मिळाले असतील. शेवटी सॅनफ्रान्सिस्कोच्या भूकंपाचा देखावा पाहून घरी आलो व काही वेळाने झोपी गेलो असता अेक सुंदरसें स्वप्न पडलें : हिंदुस्थानच्या स्टेजवर हिंदु गारुडी मोठे आश्चर्यकारक व साहसाचे खेळ करून दाखवीत आहेत. त्यांच्याकडे दूरदूरच्या राष्ट्रांतील लोकांचे डोळे लागले आहेत. कित्येक छिद्रान्वेषी लोक आपल्या दुर्बिणी लावून बसले आहेत व त्या गारोड्यांचें कोठे बिनसतें अिकडे त्यांचें लक्ष गुंतून गेलें आहे. कित्येक हे काय करून दाखविणार अशा विचारात गटांगळ्या खात आहेत. खेळ खेळावयास मंगमंगाने आव्हान केलें आहे. या लोकांनी कॉंग्रेसरूपाच्या तोंडातून नेहमी धूर काढावा व अग्नीच्या ज्वाला दाखवाव्या; पण यामध्ये प्रेक्षकांना काही विशेष वाटत नव्हतें व याचा परिणामही त्यांच्यावर काही विशेष झाला नाही. बऱ्याच वेळाने त्यांनी स्वदेशीचा खेळ खेळावयास सुरवात केली. सर्व प्रेक्षक बारकाअीने

पाहू लागले छिद्रान्वेषी लोक हा खेळ फसणार म्हणून म्हणू लागले तोंव त्याची निराशा झाली म्हणून अितर हमले हा खेळ तर बहारीने पार पडला दुसऱ्या अेका खेळाला सुरवात झाली अेका पेटाऱ्यात हिंदुस्थान देश दारिद्र्य, प्लेग आपसातील तटे, मत्सर, वाओीट राज्यव्यवस्था, पारतंत्र्य याच्या जाळयात फसलेला दिसला. त्याला या स्थितीतून सर्वांच्या समक्ष नाहीसा करून फिरून त्याच पेटाऱ्यातून बंधरहित व मोकळा करण्याचा विचार त्या हिंदु गारोड्याचा चालला होता. ते काय करणार अिकडे सर्वांचे लक्ष लागून गेले होते व सर्व मोठ्या अुत्सुकतेने व अेकचित्ताने पाहत होते अितक्यात मी जागा झालो. अरेरे ! कोण वाओीट गोष्ट ! केवढी निराशा !! काय झाले ते पहावयाला सापडले नाही फिरून निजावयाचा विचार केला डोळे मिटले तो निराळेच स्वप्न पडले ते थोडक्यात असे ज्या ज्या हिंदु गारोड्याला म्हणून अिंग्लंडच्या स्टेजवर येअून काम साधून घ्यावयाचे आहे व काही लभ्यांश मिळवावयाचा आहे त्याचा भिक्षा मागून काहीही मतलब साधणे नाही भिकेकऱ्याला अिंग्लंडच्या स्टेजवर जागा नाही. जागा तर नाहीच नाही पण तो अुपहासास मात्र पात्र होअील येथे येणाऱ्या गारोड्यानी हा धडा अवश्य घेतला पाहिजे

—ता २ नोव्हेंबर १९०६

* * *

## १२. याचा अर्थ काय ?

लंडन, ता २।११।१९०६ लंडनमध्ये पार्लमेंट सभेत अलीकडे हिंदुस्थानच्या प्रश्नावर काही प्रश्नोत्तरे होत असतात देशभक्त सुरेंद्रबाबूना अिकडून याच अर्थी काही पत्रे गेलेली सर्वांस माहीत आहेतच त्यापैकी अेका पत्रात बंगालची चळवळ जर अशीच नेटाने चालविली व अर्जाची काही मंडोळी जर अिंग्लंडमध्ये पुन्हा आली तर विभागणी रद्द करण्याचा प्रधानमंडळाचा हेतु आहे असा अर्थ त्यात ध्वनित केला होता हे पत्र प्रसिद्ध होताच लॉर्ड मोर्लेवर पार्लमेंटमध्ये प्रश्नांचा भडिमार अुडाला विभागणी रद्द होण्याचा काही संभव आहे का ? अशा आशयाच्या प्रश्नांनी त्रासून जाअून मोर्लेसाहेबांनी असे पुन्हा ओरडून सांगितले की, ' विभागणी कायम झाली आहे ती कालत्रयीही रद्द होणार नाही ! ' राजकारस्थानी पुरुषामध्ये स्पष्ट व सत्य बोलण्याचा दुर्गुण कधीही नसावा अस्पष्ट, खरेही नाही व खोटेही नाही, पूर्ण खोटे असले तरी चालेल, पण पूर्ण खरे मात्र केव्हाही नाही असेच बोलणे

कारस्थानी लोकास शोभते. हे तत्त्व मोर्लेसाहेबांना माहीत नाही असे नाही. स्पष्ट व सत्य बोलण्याचा दुर्गुण त्यांच्यामध्ये आहे असे म्हणण्याचे धाडस मोर्लेच्या बजेटवरील भाषणानंतर ना. गोखले देखील करू शकणार नाहीत. हिंदुस्थान श्रीमंत होत आहे या वाक्यात मोर्लेच्या बजेटवरील भाषणाचे सर्वस्व आलेले आहे. आता हिंदुस्थान श्रीमंत होत आहे या वाक्यात सत्याचे दुर्गुणाचा लवलेश तरी आहे काय ? आपले कारस्थानीपणाचे कर्तव्य पार पाडीत असताना या सत्याच्या दुर्गुणाचा स्पर्शही होऊ नये म्हणून मोर्लेसाहेब यथाशक्ति व यथामति प्रयत्न करीत असतात, परंतु परवा सतापाचे भरात ते स्पष्ट बोलून गेले विभागणी रद्द होणार नाही असे सांगितल्याने हिंदुस्थानावर काय परिणाम होतील याची ज्याला चांगली कल्पना आहे त्याना हे स्पष्ट उत्तर ऐकून फार वाईट वाटले त्यांना आपला डाव फसल्यासारखा वाटला गवताची पेंढी दाखवीत दाखवीत गाय कसाईखान्यात जितकी लवकर व सुलभ रीतीने आणता येते तितकी तिला खरी हकीगत सांगून कधीही आणता येणार नाही शिवाय अशा रीतीने फसवीत रजवीत गाय कसाईखान्याकडे आणण्यात अनेक प्रकारची मजा वाटत असते ही निराळीच ! विभागणी रद्द करतो, आज करतो, उद्या करतो, केव्हातरी करतो, असे सांगत राहिल्याने बंगालच्या गाई पृष्ठावरी बुच्छभार वाहोन वाटेल तिकडे पळत सुटल्या व त्याच्या भरणाऱ्या सभा, त्याचे होणारे अर्ज, त्याची पोकळ अवमाने, वगैरेची मजाही वघावयास सापडली परंतु ही मधि आता व्यर्थ जाईल असे पाहताच अिग्लडमधील आपल्या जिवलग मित्राचे अंतःकरण तळमळू लागले आहे बंगालच्या गाई राजनिष्ठ असल्याने पुन्हा एकदा जमले तर पहावे म्हणून कालपासून 'फिरून यत्न करून' पाहण्यात येत आहे . काल मि रेडमंड व लेबर पक्षाच्या अकदोन सभासदानी मोर्लेला प्रश्न विचारले की, 'विभागणीचे कागद पार्लमेंटपुढे हजर कराल का ? ' मोर्ले : ' त्या कागदपत्रात काही विशेष माहिती नाही ' प्रश्न— ' पार्लमेंटपुढे आणण्यात विशेष हरकत कोणती ? ' अुत्तर ' ते मागे अेकदा पार्लमेंटपुढे मांडण्यात आले होते नक्की तारीख मला माहीत नाही मी त्यावेळेस जिकडे लक्ष देत नव्हतो ' मोर्लेसाहेबांना हिंदुस्थानविषयी पूर्ण सहानुभूति आहे त्याबद्दल आपल्यातील कित्येक जहालांतसुद्धा मतभेद नाही परंतु अशी ही 'पूर्ण सहानुभूति' मोर्लेसाहेब स्टेटसेक्रेटरी झाल्यापासूनच अुत्पन्न झाली आहे, हें अैकून मतभेद नसलेल्याचा विरस होअील. परंतु याचा अुलगडा करणे अगदी सोपे आहे या जागेवर येण्यापूर्वी मोर्लेचा खिसा व मन रिकामे होते जोपर्यंत याच्या खिशाचे लक्ष हिंदुस्थानाकडे नव्हते तोपर्यंत याच्या मनाचेही लक्ष हिंदुस्थानकडे नव्हते परंतु पुढे ही जागा मिळाली तेव्हा अर्थातच ही स्थिति पालटली कोटाचा खिसा जसजसा हिंदुस्थानच्या पगाराने भरत चालला तसतसा मनाचा खिसा हिंदुस्थानच्या महानुभूतीने भरत चालला ! पार्लमेंटमध्ये काल झालेल्या या प्रश्नाची व अुत्तराची बातमी वाचून अेक हिंदी तरुण मला म्हणाला

लिबरल गव्हर्नमेंट झाल्यापासून हिंदुस्थानाबद्दल किती चर्चा होऊं लागली पाहिलेत का? अशात अर्ज करून व सभासदांच्या भेटी घेऊन नेट धरला तर काम फत्ते होईल!' असलें वाक्य म्हणणारे हिंदी तरुण अजून निघताहेत हें खरोखर दुर्भाग्य आहे! पार्लमेंटमध्ये जर हिंदुस्थान आज काय करतें आहे इकडे इंग्रजांचें लक्ष लागलें असेल तर, तें अर्जांनी नव्हे किंवा ते. गोखल्याच्या भेटींनीही नव्हे. तें लक्ष हिंदुस्थानात उदयोन्मुख होऊं घातलेल्या स्वातंत्र्यपक्षाच्या अवसानाने लागलेलें आहे. इंग्रजी पार्लमेंटचें लक्ष आता हिंदुस्थानाकडे पहिल्यानेच लागत आहे अशी दुसरी एक वेडगळ कल्पना आपल्यात प्रचलित आहे. पण आज आहे याहून लाखो पटीं जास्त लक्ष हिंदुस्थानाने एकदा आकर्षिलें होते. १८५७ च्या वणव्याचा भयंकर चटका लागताच इंग्लंडच्या पार्लमेंटमध्येच तर काय, पण इंग्लंडच्या प्रत्येक झोपडीत सुद्धा हिंदुस्थानाबद्दल प्रश्नोत्तरें झालेली आहेत!

तसाच धणवा पेटविण्यासाठी दे. दादाभाई नौरोजी हिंदुस्थानात जाणार आहेत म्हणे! पण त्यांस कांग्रेसच्या अध्यक्षत्वाचा सन्मान तिसऱ्यांदा मिळाला म्हणून येथे एक मेजवानी होणार आहे व त्यात कित्येक एम्.पी. पुढाकार घेणार आहेत! हिंदुस्थानच्या राष्ट्रीयसभेचे अध्यक्षस्थान दे. दादाभाईंना मिळाले म्हणून इंग्लिशांना इतका आनंद का बरें झाला असावा? लो. टिळकाची निवड झाली असती तर हिंदुस्थानवासीयांना जितका आनंद व हर्ष झाला असता, तितका दादाभाईंची निवडणूक होताच इंग्लिशांना होत आहे याचा अर्थ काय?

दे. पांडुरंग महादेव बापट बी. ए. यांनी काही दिवसांपूर्वी हिंदुस्थानास होमरूल पाहिजे आहे अशा आशयाचें एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध केलें होतें. या त्यांच्या स्वदेशाला 'स्वराज्य' मागण्याच्या अपराधाबद्दल मुंबई युनिव्हर्सिटीने त्याची 'मंगळदास नथुभाई' स्कॉलरशिप काढून घेतली असल्याची बातमी इकडे आली आहे. स्वदेशाने गुलामगिरीत पडावें असें म्हणेल त्यासच ही भाझी स्कॉलरशिप द्यावी अशी एखादी शर्त मंगळदास नथुभाईंनी स्कॉलरशिप ठेवते वेळेस घातली होती की काय? हिंदुस्थानच्या तरुण रक्तात निसर्गानेच पेरलेली स्वातंत्र्यभक्ति आता असला वेडगळ धाक दाखवून मारण्याचे दिवस राहिलेले नाहीत!

—ता. २३ नोव्हेंबर १९०६

✦ ✦ ✦

# १३. क्रांतीचे प्रवाह

लंडन विश्वनियमानुरूप क्रांति व उत्क्रांति यांचे प्रवाह अखंड व सतत वाहत असतात कालाच्या उतरणीवरून अकल्पनीय जोराने आपटत आपटत कोसळणाऱ्या प्रपातांना क्रांति म्हणतात व समप्रदेशावर वाहत असणाऱ्या नदीप्रमाणे विश्ववृत्तीचे जे प्रगमनात्मक मंदौघ त्यांना उत्क्रांति म्हणतात क्रांति व उत्क्रांति ही अेकमेकांची कार्यें व कारणे होत क्रांतीतून उत्क्रांति व उत्क्रांतीतून क्रांति उत्पन्न होते हे उत्क्रांति-क्रांतिचक्र कालचक्राच्या आरंभापासूनच गतिमान झालेले आहे तत्व-क्रांति, धर्मक्रांति, राज्यक्रांति, निरनिराळ्या स्वरूपाने भिन्न भिन्न काली विश्व-वृत्ति प्रगमन करीत आलेल्या आहेत व पुढेही प्रगमन करीत राहतील साचलेल्या व प्रवाह नसलेल्या डबक्यातील पाणी जसे कुजत त्याचप्रमाणे स्थिरत्व व शिथिलत्व पावलेल्या मनुष्याच्या किंवा राष्ट्राच्या अंगातील पाणीही कुजू लागते हे कुजणे नाहीसे करण्यास त्या साचलेल्या पाण्याचा, त्याची गति अडवून ठेवणाऱ्या धाऱ्याचा विध्वंस करून, प्रवाह सुरू करावा लागतो प्रवाह ही विश्वाची निसर्ग-वृत्तिच असल्याने, लवकर किंवा उशिरा, मूळरूपाने किंवा रूपांतराने, पण गति-शून्यास चलन मिळू लागते. ह्या चलनाच्या आरंभाला, निर्बंधाला फाडून बाहेर घुसणाऱ्या ओघाच्या पहिल्या धडकेला, किंवा गतिशून्य मनुष्याच्या व कुजू पाहणाऱ्या राष्ट्राच्या पायांना बद्ध करणाऱ्या शृंखला प्रगतीच्या घणाखाली तुटत असताना ताडकन होणाऱ्या आवाजाला क्रांति असे म्हणतात व ह्या प्रतिक्रियेचा विशेष वेग कमी होऊन मूल व सामान्य गति प्राप्त झाली म्हणजे या गतीने होणाऱ्या प्रगमनास उत्क्रांति म्हणतात जगातील धर्मक्रांति संपून हल्ली धर्माची उत्क्रांति सुरू आहे परंतु जगाच्या राजकारणाची उत्क्रांति होण्यास शेकडो आप-मतलबाचे व अन्यायाचे बंधारे अडथळे करीत असल्यामुळे अजून बऱ्याच राज्य-क्रांत्या व समाजक्रांत्या अवश्य आहेत त्या झाल्याशिवाय जगाचे प्रगमन होणार नाही, व प्रगमन ही विश्ववृत्ति असल्यामुळे ह्या क्रान्त्याही झाल्याशिवाय राहणार नाहीत अशा या प्रगमनात्मक क्रांत्यांपैकी हल्ली किती क्रांत्या सुरू आहेत किंवा सुरू होऊ पाहत आहेत, किती साचलेली डबकी भूकंपाच्या उसळीने आपले बंधारे फोडण्यासाठी धडकी मारीत आहेत किंवा मारण्याच्या तयारीत आहेत व किती राष्ट्रें आपल्या गुलामगिरीच्या साखळदंडावर घाव घालीत किंवा घाव घालण्याची संधि व साधनें जुळवीत आहेत याचा आढावा काढणे अत्यंत महत्त्वाचे आहे या महत्त्वाच्या विषयावर मि हिंडमन या सोशियालिस्ट महनीय विद्वानाचे ' क्रांतीचे प्रवाह ' (The Rapids of Revolutions) या नामाभिधानाखाली अेक अत्यंत महत्त्वाचे जे भाषण झाले तें आपल्या वाचकांसाठी देत आहे त्यांत हिंदी लोकांना शिकण्याचे धैर्य असल्यास पुष्कळ शिकता येअील

प्रथमतः मि. हिंडमन यांनी इंग्लंडमधील हल्लीच्या निरनिराळ्या राजकीय पक्षाचें व त्याच्यातील असलेल्या विरोधांचें विवरण केलें. त्यात हिंदुस्थानातील लोकांना रुचण्यासारखें जरी नसलें—कारण गुलामांना स्वतंत्र विचार सहसा रुचत नाहीत—तरी शिकण्यासारखें हे होतें की, मि. हिंडमन यांचे मताने लिबरल व कान्झर्व्हेटिव्ह या दोन पक्षांत नांवाचें तेवढें भिन्नत्व आहे. बाकी हे दोघेही अनुदार मताचेच आहेत. अेक पक्ष जरा भडभड्या स्वभावाचा आहे म्हणून मनातील दुष्ट हेतु तो अुघड बोलून दाखवितो. दुसरा पक्ष थोडा कावेबाज असल्यामुळे दुष्ट हेतूना गोड भाषेत छपवून ठेवतो. पहिला नुसता दुष्ट आहे. परंतु दुसरा लिबरल पक्ष हा दुष्ट व विश्वासघातकी आहे या विश्वासघातकी लोकांचे हातो अिंग्लंडचे राज्यसूत्र येअून आज अेक वर्ष होत आले आहे या अेका वर्षात त्यांनी कोणतें अुदार कृत्य केलें आहे? जी कृत्यें केली आहेत तीं कान्झर्व्हेटिव्हांच्या कृत्यांहून कोणत्याही रीतीने भिन्न नाहीत. त्यांनी अिजिप्तसाठी काय केले आहे? हिंदुस्थानासाठी काय केलें आहे? अन्यायाने व अधमपणाने कोटयवधि रुपये लुटून आणले जातात, त्यातील अेक दमडी तरी यांनी कमी केली आहे काय? मग या पक्षाने फरक तो काय झाला? (मि. हिंडमन येथे जरा चुकले असें मला वाटतें. लिबरल पक्ष आल्यापासून अगदीच फरक झाला नाही हें खोटें आहे. अुदाहरणार्थ, मोर्ले ह्या. पुस्तकें विकता विकता पोट भरण्याची पहिली अवस्था व लिबरल पक्ष अधिकारावर येताच हिंदुस्थानच्या पगाराने प्राप्त झालेली अवस्था—मोर्लेची गेल्या वर्षीची मुद्रा व आता वर्षभर हिंदुस्थानच्या पैशाने लालबुंद पडलेली मुद्रा यात असलेला फरक मि. हिंडमनने विसरावयास नको होता.) मि. बाल्फर म्हणतात त्याप्रमाणे लिबरल व कान्झर्व्हेटिव्ह हे अेकमेकांच्या सोंगांची बतावणी करण्यापुरते तेवढे मात्र भिन्न आहेत. बाकी अधमपणात दोघेही भागीदार आहेत. परंतु अिंग्लंडमध्ये ही दोन्ही डबकीं साचून कुजत चालली आहेत हें जरी खरे आहे तरी क्रांतीचा प्रवाह सुरू झाला असल्याचीं चिन्हें स्पष्ट दिसत आहेत. लोकपक्ष बळावत चालला आहे. समता व स्वातंत्र्य याचा विजय नुसत्या अिंग्लंडमध्येच नव्हे—तर सर्व जगावर व्हावा असें म्हणणारा पक्ष बळावत आहे. रशियामध्ये तर लोकशक्तीच्या आघाताने जुलमाचा बधारा जवळजवळ फोडलाच आहे. मी ज्या वेळी येथे बोलत आहे त्याच वेळेला रशियामध्ये जुलमी जमीनदारांचे हक्क नाशावीत ठरून भाडवलवाल्यांवर जोराचा घाला पडत आहे व लवकरच रशियामध्ये क्रांतिपक्षाचा विजय झालेला पाहून न्यायप्रिय लोकांना आनंद झाल्याशिवाय राहणार नाही. क्रांति ही दाबून दबणारी नाही. तिला जितकें दाबावें तितकी ती वर अुसळते. प्रगमनाकडे नेणारी असल्याने क्रांति ही पवित्र वृत्ति आहे असें मी समजतो. हा क्रांतीचा प्रवाह म्हणजे जिवंतपणाचें चिन्ह आहे. हा क्रांतीचा प्रवाह हल्ली तर फारच जोराने सुरू झाला आहे. तो या शतकाच्या आरंभापासून

ईअतक्या वेगाने घो घो करीत फुगत चाललेला आहे की, त्याच्या अनिवार्य वेगाने पूर्वदिग्भाग आपली झोप सोडून देऊन खडबडून अुठू लागला आहे आशियात राज्यक्रांति सुरू झाली आहे. आता तिला कोणालाही थांबविता यावयाचे नाही तिला थांबविण्यासाठी जो कोणी तिच्यापुढे अुभा राहील त्याला अुलथून अेखाद्या नजीकच्या खडकावर छिन्नभिन्न करून टाकून आपला मार्ग साफ करत हा क्रांति-प्रवाह आपल्या अनुकूल वेगाने असाच धावत जाणार! कोणीही आपल्या गर्वाने फुगून त्याला अडथळा करू नये कारण ते गर्वाचे फुगणे या अेशियाच्या राज्य-क्रांतीपुढे चेंडूप्रमाणे चिरडून जाईल हे मी नुसत्या अजमासाने सांगत नाही हे जपानच्या आधारावर सांगत आहे ह्या मासखाअू बुटक्या राष्ट्राने मासखाअू व अगडबंब रशियाला चीत केला तो या राज्यक्रांतीच्या जोरावर होय ह्या राज्य-क्रांतीच्या प्रवाहाला थांबवून धरण्यासाठी हा टोचभर रशिया वाटेत आला मात्र, तोच त्याला अेखाद्या गवताच्या काडीपेक्षाही यत्किंचित् समजून ह्या प्रचंड ओघाने अुलथून दूर झुगारून दिले, अितका दूर की, पुन्हा त्या प्रवाहाचे आड येण्यासाठी तो पुढे सरू म्हणेल तर त्याला ताड नाही! जपानातून निघून तो प्रवाह आता चीनमध्ये शिरत आहे—नव्हे शिरला आहे मला खात्रीने असे माहीत झाले आहे की, चीनमध्ये भयंकर जागृति अुत्पन्न झाली आहे. चीनमध्ये शिक्षण, राजकारण, सामर्थ्य व स्वदेशाभिमान यांचा प्रसार अत्यंत त्वरेने होत आहे व चीनच्या जागृतीचा परिणाम सर्व जगावर झाल्याशिवाय राहणार नाही परंतु राज्यक्रांतीचा हा अेकच प्रवाह आहे असे नाही चीनमध्ये स्वातंत्र्य थोडयाबहुत प्रमाणाने कायम होते व म्हणून तेथे जागृति व क्रांति करणारा प्रवाह कितीही जोरान असला तथापि तो परतंत्राना स्वातंत्र्यार्थ चेतना देणाऱ्या प्रवाहापेक्षा कमी जोराचाच असला पाहिजे परंतु सुदैवाने अेशियामध्ये परतंत्राना स्वतंत्र करण्याची शक्ति धारण करणारा असा अेक राज्यक्रांतीचा प्रचंड प्रवाह सुरू झाला आहे हा प्रवाह म्हणजे हिंदुस्थानची जागृति होय अनंत यातनांनी वधिर झालेल्या हिंदुस्थान देशात अखेर चेतना अुत्पन्न झाली आहे स्वस्वातंत्र्यासाठी सामर्थ्य आणावयाचे त्याचे प्रयत्न सुरू झाले आहेत असले स्वातंत्र्यगामी प्रयत्न आपल्या सोशिया-लिस्ट लोकांना सदोदित वंदनीय असलेच पाहिजेत. हिंदुस्थान स्वतंत्र झाले तर आपली कोणतीही हानि होणार नाही, अितकेच नव्हे, तर आपल्या व्यापाराची त्या योगाने वृद्धिच होअील दुकानदाराला गिऱ्हाअिकाच्या श्रीमंतीतच फायदा आहे आपण हिंदुस्थानच्या ह्या स्वातंत्र्याच्या प्रयत्नाना मान्य केलेच पाहिजे कारण भूतदया हा मनुष्यत्वाचा विशेष धर्म आहे हिंदुस्थानची राष्ट्रीय सभा आता डिसेंबरमध्ये भरणार आहे तिच्या प्रयत्नाना आपली महानुभूति असलीच पाहिजे. अितकेच नव्हे तर या प्रचंड सभेला आम्ही अशी विनंती करतो की, हिंदुस्थानचे लोक स्वातंत्र्यसंपादनासाठी राज्यक्रांति करण्यास अुठताच त्याना शक्य ती मदत

व पूर्ण सहानुभूति देवू अशी अिच्छा आपण मजबरोबर प्रदर्शित करावी (यथे त्या प्रचड सभेत टाळयाचा कडकडाट सुरु झाला.) व मी अशी आशा धरतो की, हे तुम्ही दिलेले वचन कधीही विसरणार नाही अेशियाचे भाग्य अेशियाच्या प्रयत्नान व अेशियानेच अुदयास आणावे ही अभूतपूर्व गोष्ट घडवून आणण्या-साठीच क्रातीचे प्रवाह अेशियामध्ये कसे सुरू झाले आहेत हे मी आपणास सागितले. फ्रान्स व जर्मनी येथेही राज्यक्रातीचे नसले तरी समाजक्रातीचे प्रवाह इग्लड-प्रमाणेच वाहत आहेत हजारो मजूरदारानी काबाडकष्ट करूनही अुपाशी मरावे, मूठभर आळशी लोकानी सर्व सपत्तीचा अुपभोग घ्यावा ही अन्यायमूलक पद्धति जितक्या त्वरेर बदलेल तितकी बदलली पाहिजे सामाजिक अर्थशास्त्र सुधारणे हे आपले मुख्य कर्तव्य आहे अमेरिकेतही अुपाशी मरणारे लोक अिग्लडप्रमाणेच लक्षावधि आहेत तेव्हा राजा असला काय किंवा प्रेसिडेंट असला काय, लोक-स्थिति जर अितकी भयकर असेल, तर तेथे क्राति झालीच पाहिजे व म्हणूनच हे क्रातीचे निरनिराळे प्रवाह सर्व जगभर सुरू झाले आहेत अिग्लड, फ्रान्स, रशिया, अमेरिका, चीन, जपान, अिराण हिंदुस्थान अित्यादि सर्व पृथ्वीवर निरनिराळया स्वरूपाने पण अेकाच हेतूसाठी क्रातीचे प्रचड प्रवाह सुरू आहेत आणि तो अेकच हेतु कोणता ? तो अेकच हेतु मानवी प्रगमन हा होय या अेकाच अुदात्त हेतूसाठी होणाऱ्या क्रात्या कोणत्याही भागात झाल्या तथापि त्या सर्वांना अभिनदनीय असल्या पाहिजेत ! अशा आशयाचे भाषण करून मि हिंडमन हे टाळयाच्या व स्तुतिनादाच्या घोषात खाली बसले

हिंदुस्थाना ! हे भाषण तू सारग्रहणचिकित्सेने वाच सावधगिरीने वाच-नाही तर कान्झर्व्हेटिव्ह व लिबरल याच्या कडेवर बसून आपली अुन्नति करून घेण्याची मूर्ख आशा धरून तू जसे आजपर्यंत दिवस घालविलेस, तसेच आता सोशि-यालिस्ट व हिंडमन यानी मला कडवर घ्यावे असा खुळा हट्ट धरण्यात बाकीचे दिवस खर्चू लागशील, लोकाच्या—ते कितीही गोड बोलले व सज्जनतायुक्त असले तरी—लोकाच्या कडेवर बसून तुला चालता येण्याचे शिक्षण सपादन करता येणार नाही हिंडमन असे बोलले म्हणून हुरळून जाअू नकोस हिंडमनच काय, पण तू कर्तबगारी करून दाखविलीस तर सर्व जग असे बोलेल, हे तुझ्या कर्तबगारीवर अव-लबून आहे हिंडमन किंवा कोणीही महात्मा जर खरी सहानुभूति दाखवीत असेल तर ती साभार स्वीकार ! सहानुभूति स्वीकार, पण मागू नकोस ! सन्माननीय आमत्रण आल्यास जेवावयास जा, परतु आगतुकी मात्र करू नकोस स्वत कर्तबगारी करून अन्न सपादन कर परमेश्वराने तुला भारतभूसारखी शेती दिली आहे त्या विस्तीर्ण शेतीला गगा, यमुना, गोदावरी, कावेरी, सिंधु व ब्रह्मपुत्रा हे अखड कालवे देवाने तयार करून ठेवले आहेत ह्या दिव्य शेतीत ह्या अखड कालव्याच्या पाण्याने तुझ्या पूर्वजानी धान्यच नव्हे तर प्रत्यक्ष सोने पिकविले आहे ! परतु

देवाने या शेतीच्या करारात अेक शर्त घातली आहे, ती ही की, ही शेती तूच नागरली पाहिजेस तूच ही शेती करशील तर हीत सोने पिकेल परंतु दुसऱ्याचा नांगर हिच्यावर फिरला की, हीत प्लेग पिकेल, दुष्काळ पिकेल, पारतंत्र्य पिकेल! मग हा नांगर बाल्फरचा असो किंवा मोर्लेचा असो ही देवाची शर्त तू पाळलीस की हिंदुस्थाना, पुढच्या हंगामात तुझ्या या दिव्य शेतीत पाऊस पडो किंवा न पडो, कोहिनूर पिकतील, मयुरासने पिकतील, कालिदास पिकतील, शिवाजी पिकतील!

आत्मैव ह्यात्मनो बंधु ।

—ता २०।१२।१९०६-

\+ \+ \+

## १४. अिंग्लंडातील स्त्रिया व हिंदुस्थानातील पुरुष

लंडन राजकीय स्वातंत्र्य असले म्हणजे मानवी शक्तींचा विकसन कशी होऊ लागतात, अेक विकसन ह दुसऱ्या विकसनाचे कर्मं प्रवर्तक होते व व्यक्ति, राष्ट्र व मनुष्यजाति ही अभ्युन्नतीकडे कशी चढू लागतात याचे अगदी ताजे उदाहरण म्हटले म्हणजे अिंग्लंडमधली सध्या चालू असलेली स्त्रीस्वातंत्र्याची चळवळ हाय प्रथम अिंग्लंडला अप्रतिहत पारतंत्र्य आले तेथून रोमन साम्राज्याच्या नाशकाली सुटका होअून ते अप्रतिहत राजसत्तेखाली स्वतंत्र झाले पुढे राजसत्तेचे अप्रतिहतत्व जाअून तोवर सरदाराचा वचक बसला नंतर लोकपक्ष आत घुसला व व्यापारीवर्गानेही राजकारणात आपला हक्क शाबीत केला व आता पुरुषाचे राजकीय स्वातंत्र्य स्थापित झालेले पाहून स्त्रीवर्गाने आपला त्यात असलेला हिस्सा संपादन करण्यास कंबर कसली आहे ह्या त्यांच्या चळवळीपासून अनेक गोष्टी शिकण्यासारख्या असल्याने त्याविषयी थोडीशी सगतवार माहिती आज धाडीत आहे

स्त्रीस्वातंत्र्याची ही चळवळ सुमारे पन्नास वर्षांपासूनच सुरु आहे. राजकीय भविष्यवेत्ता मॅझिनी याने शेवटी शेवटी ह स्पष्ट रीतीने सांगितले होते की, पुढील शतकात स्त्रीजाति आपले राजकीय हक्क स्थापित केल्यावाचून राहणार नाही अिंग्लंडमध्ये ही चळवळ जरी पन्नास वर्षांपासून सुरु आहे, तरी त्या वेळेस तिच्याकडे कोणाचेही लक्ष गेले नव्हते त्या वेळच्या काही अुदार पुरुषांनी या चळवळीला अनुमत दिले होते, परंतु स्त्रीजातीला राजकीय व्यवहारात हिस्सा मिळविण्यास काही शतके अुलटावी लागतील अशीच सर्वत्र समज होती पार्लमेंटचा

सावा ज्याच्या हाती होता त्यानी या चळवळीकडे अुपहासपूर्वक दुर्लक्ष केलेले होते परतु या दुर्लक्षाला न जुमानता त्या वेळच्या काही पुढारी स्त्रियानी ही चळवळ तशीच पुढे चालू ठेवली त्याचा असा अजमास होता की, या चळवळीबद्दल जनसमाजास माहिती दिली व त्याच्या सहानुभूतीने पार्लमेटच्या सभासदाकडे अर्ज केले व निवडणुकीच्या वेळेस विनतीपत्रे काढली की, आपल्यास लवकरच मत-दारीचा व पार्लमेटमध्ये बसण्याचा हक्क मिळेल या समजुतीप्रमाणे त्यानी ही चळवळ चालू ठेवली काही दिवसानी या चळवळीला व्यावहारिक स्वरूप देण्यासाठी स्त्रियानी निरनिराळ्या ठिकाणी व्याख्यानमाला सुरू केल्या मासिक पुस्तकात लेख येअू लागले व वर्तमानपत्रातून चर्चा होअू लागल्या स्त्रीवर्गामध्ये दिवसेदिवस पार्लमेटमध्ये निवडून येण्याचा हक्क आपणास मिळावा याबद्दल जोर-दार व दृढ निश्चयाची अिच्छा वळावत चालली, परतु या चळवळीस प्रत्यक्ष अमलात आणण्याची अुचल कोणत्याच पक्षाकडून होअीना स्त्रियाना शिक्षण कमी आहे, त्याना शिपाअीगिरी करता येणार नाही, त्याना राजकीय हक्क सभाळण्याचे बुद्धिसामर्थ्यही निसर्गत च कमी आहे वगैरे मुद्द्यावर पुरुषवर्गापैकी कोणीही त्याची दाद घेत नाही, अितकेच नव्हे तर ह्या पुरुषवर्गाच्या कोट्या खऱ्याच आहेत असे समजून कित्येक स्त्रीपक्षीय पुढारी स्त्रियाही या अडचणी कशा दूर कराव्या ह्या विचारात गढून गेल्या ! परतु लवकरच त्याच्या ध्यानात असे आले की जुल्मी लोकाची ही शिळी विधान सर्वथैव खोटी आहेत स्वत च्या हातातील सत्ता सोडून देण्यास जुलमी मनुष्य तयार होणार आहे ? व ती आपली सत्ताप्रियता छपवून ठेवण्यासाठी स्त्रिया ती सत्ता चालविण्यास योग्य नाहीत ही सबब आजच पुढे आली आहे की काय ? अमेरिका राजसत्ता हिसकून घेअीतोपर्यंत ती अशिक्षित व राजधुरा धरण्यास असमर्थ आहे म्हणून जुलमी राजे म्हणत नव्हते काय ? अिटालीला स्वातंत्र्य साभाळण्याची अक्कल नाही म्हणून आम्ही तेथे राज्य करतो, हे ऑस्ट्रिया शेवटपर्यंत म्हणत नव्हता काय ? खुद्द अिग्लडमध्ये मजूरदाराना पार्लमेट-मध्ये निवडून येण्याचे आधीचे दिवशी, ते त्या हक्कास पात्र झाले म्हणजे आम्ही ते हक्क खुषीने देअू, परतु आज ते अपात्र आहेत म्हणून त्यास हक्क देअू नये असे जुलमी बोलले नाहीत काय ? नव्हा आपण पात्र आहोत किंवा अपात्र आहोत हे आपल्या दाव्यावर, मजा मारणाऱ्या जुल्मी लोकाच्या म्हणण्यावर ठरविणे, हे केव्हाही अिष्ट नसून ते आपण स्वत च ठरविले पाहिजे असे स्त्रियानी ओळखले त्यानी अिग्लडमधील स्त्रीसमाजाचे सूक्ष्म अवलोकन केले व त्याच्या लक्षात आले की, स्त्रीवर्ग पार्लमेटमध्ये निवडून येण्याचा हक्क मिळविण्यास पूर्ण योग्य आहे अितकेच नव्हे तर स्त्रियाचे असामर्थ्याविषयी जो बभ्रा करण्यात येतो त्याचे मुख्य कारण हे राजकीय पारतंत्र्यच आहे राजकीय स्वातंत्र्य मिळाल्याशिवाय आपली दुर्बलता व अशिक्षितता जाणार नाही व हे जुलमी लोक तर म्हणतात की ती

दुबलता व अशिक्षितता नाहीशी झाल्याशिवाय आम्ही तुम्हाला राजकीय स्वातन्त्र्य देणार नाही! पाण्यात अुतरल्याशिवाय आम्हास पोहता येणार नाही व हे जुलमी सत्ताधीश म्हणतात की, पोहता आल्याशिवाय आम्ही तुम्हाला पाण्यात अुतरू देणार नाही! 'अुतरू देणार नाही? आम्ही अुतरणार! आम्ही स्वातंत्र्य मिळविणार!' स्त्रियांचे पुढाऱ्यांनी असा निश्चय केला व तो जाहीर केला हे पाहताच मग पुरुषमंडळात काही स्त्रीमित्र अुत्पन्न झाले व त्यांनी सांगितले की, स्त्रियांना पार्लमेंटात हक्क मिळावा हा तुमचा अुद्देश स्तुत्य आहे त्याबद्दल तुमच्या चळवळीस आमची पूर्ण सहानुभूति व मदत आहे परंतु तुमची ही चळवळ कायदेशीर व सभ्य स्त्रियांना शोभेल अशी असावी हा अुपदेश त्या वेळच्या स्त्रीपुढाऱ्यांना मानवला व त्यांनी कायदेशीर पद्धतीने भांडण्यास आरंभ केला कायदेशीर पद्धतीने म्हणजे पुरुषांनी केलेल्या कायद्यांना अनुसरून! ह्या कायदेशीर पद्धतीमध्ये अेक महत्त्वाचा मुद्दा पुष्कळ लोक विसरतात जेव्हा दोन पक्षांमध्ये स्वामित्वाबद्दल वाद अुत्पन्न होतो तेव्हा वास्तविक रीत्या प्रत्येक पक्षाने आपल्या विजयाला योग्य त्याच हालचाली केल्या पाहिजेत परंतु सत्ताधीश स्वतंत्र होअू पाहणाऱ्या गुलामांना सांगतात की तुम्ही सांगितलेल्याच हालचाली करून सुटावयाचा प्रयत्न करा! पण कायदेशीर रीतीने चळवळ करा! दोन पहिलवानांची कुस्ती चालली असता त्यांतील अेक दुसऱ्यास सांगतो की, मला पाडण्याच्या अुद्देशाला माझी पूर्ण सहानुभूति आहे पण तू मला मी सांगतो तेच पेच मारीत रहा अर्थात ज्या पेचांवरच्या तोडी आपल्याला माहीत आहेत तेच पेच प्रतिपक्षाने आपल्याला मारावे असा त्याचा अर्थ असतो प्रत्येक व्यक्तीला किंवा राष्ट्राला काही काळाने पारतन्त्र्याचा तिटकारा यअू लागतो व ज्या जुलमी राक्षसाने आपणास परवश केलेले असते त्याच्या हातून सुटण्याचा प्रयत्न करण्यास ते गुलामगिरीत पिचणारे लोक सिद्ध होतात जुलमी लोक गुलामाची ही सिद्धता आता काहीही केल्याने ढिली होत नाही असे पाहून मग तिचा जोर भलत्याच मार्गाने फुकट दवडण्यासाठी ही कायदेशीर चळवळीची तोड काढतात! कायदे कोणी केलेले असतात? जुलमी लोकांनी आपल्या संरक्षणासाठी व आपले जुलूम अव्याहत राहण्यासाठीच ते कायदे केलेले असतात असल्या कायद्याच्या शिरस्त्याने जोपर्यंत अेखादा गुलाम चालतो तोपर्यंत त्याची गुलामगिरी कशी सुटणार? गुलामाची गुलामगिरी कायम राहावी म्हणूनच त्याच्यावर कायद्याची ही बेडी चढवलेली असते ही बेडी कायम ठेवून तू पाहिजे तर गुलामगिरी सोड हे म्हणणे लबाडीचे असते गुलामगिरी म्हणजेच दुसऱ्याच्या कायद्यांनी बद्ध होणे व तो कायदा कायम ठेवणे म्हणजेच गुलामगिरी कायम ठेवणे! अशा परिस्थितीत कायदेशीर पद्धतीने गुलामगिरी घालविणे या वाक्याचा आत्मनाशा-पेक्षा दुसरा कोणताच अर्थ होणे शक्य नाही पौराणिक भाषेच्या गोष्टीत बोलावयाचे असल्यास, पारतन्त्र्य-राक्षसाचे मरण त्याच्या कायद्याचे पुस्तकात असते-

जोपर्यंत त्याची कायद्याची पुस्तके शाबूद आहेत, तोपर्यंत तो कधीही मरणार नाही आपल्याला कोणी मारण्याला आले तर त्यास तो मोठा वीरतेचा आव घालून सागतो की, मानवा, मी लढण्यास सिद्ध आहे परतु तू अेक अट पाळली पाहिजेस तो हीच की, मी मेल्याशिवाय तू माझ्या या कायद्याच्या पुस्तकाचा नाश करू नकोस गरीब बिचारा मानव ! त्याला यातील खोल अर्थ कळत नसतो या अटीत काहीच नाही असे वाटून तो मानव त्या कायद्याच्या पुस्तकास जपण्या विषयी वचन देतो आपणास मारल्याशिवाय आपल्या कायद्याच्या पुस्तकाचा हा नाश करीत नाही व कायद्याचे पुस्तकात आपले मरण असल्यामुळे त्याचा नाश झाल्याशिवाय आपण मरणार नाही असे जाणून पारतन्त्र्य-राक्षस मनामध्ये हसत हसत पण बाहेरुन मोठया काळजीची मुद्रा धारण करून लढाअीस सिद्ध होतो त्या सबल राक्षसावर तो दुर्बल मानव आघातावर आघात करतो राक्षसही केव्हा केव्हा मोठी जखम झाल्याचे ढोंग करतो हे पाहताच आणखी आशेने तो दुर्बल मानव आणखी निकराचा हल्ला करतो परतु राक्षस मरत नाही. त्याच्या त्या कायद्याच्या पुस्तकाच्या मर्मस्थळी अेक घाव घालून जे काम व्हावयाचे ते त्याच्या शरीरावर अनत घाव घालूनही होत नाही दुर्बल मानव दमून जाअून किंवा राक्षसाची अेखादी थप्पड लागून मरूनही जातो. तरी राक्षस जिवतच्या जिवत ! पारतन्त्र्य-राक्षसाने या कायदेशीर चळवळीच्या अटीच्या युक्तीने आजपर्यंत जरी पुष्कळ कुस्त्या मारल्या आहेत, तरी केव्हा केव्हा त्याच्याहून वस्ताद गड्याचा त्याच्या कायद्याच्या मर्मस्थळी घाव लागताच त्याने य पलायही केले आहे अिटली-मध्ये मझिनीने या राक्षसाची ही खुबी आळखली व त्याचे ज्यात मरण आहे त्या कायद्याचे पुस्तकालाच आग लावली ! नेदर्लंडने तेच केले श्रीशिवछत्रपतींनी तेच केले व तेच मर्म जाणून अिंग्लडमधील स्त्रियांच्या तरुण पुढाऱ्यांनी ह्या कायद्याच्या पुस्तकाला नुकतीच आग लावून दिली. काही दिवसापूर्वी त्यानी असा निश्चय केला की पुरुषानी केलेल्या कायद्याना जोपर्यंत आम्ही मान देत आहोत तोपर्यंत स्त्रियाची चळवळ यशस्वी होणार नाही तेव्हा प्रथमत हे कायदे जुमानावयाचे नाहीत, कायदे मोडताच पुरुष बळाचा अुपयोग करणार, तेव्हा बलाचा प्रतिकार बलानेच करावयाचा असा निश्चय करून तरुण सुशिक्षित स्त्रियाची अेक टोळी तयार झाली गेल्या निवडणुकीचे वेळी शेकडो अुमेदवाराकडून स्त्रियाना पार्लमेटचा हक्क देण्याचे वचन घेअून त्याना निवडून दिले परतु दिलेले वचन मोडण्यास वेळ किती लागणार ! त्या निवडून आलेल्या पार्लमेटच्या सभासदानी स्त्रियाचे वतीने काहीही खटपट केली नाही हे पाहताच स्त्रीवर्गात भयकर क्षोभ माजला परतु त्यात दोन पक्ष झाले अेक नेमळा व दुसरा जहाल नेमळ्या पक्षात म्हाताऱ्या जुन्या पुढारणी आहेत, परतु जहाल पक्षात सर्व तरुण स्त्रिया आहेत पहिल्याचे मताने सभा भरवून 'पुन अर्ज ' करावे असे ठरले. परतु या जहाल पक्षाने असा

निश्चय केला की, आता या 'पुन. अर्जा 'च्या शिळधा पद्धतीला झुगारून देणे भाग पडत आहे. अर्जांचा काळ संपला. आता प्रतिकाराचा काळ आला आहे असे ठरवून प्रतिकार कसा करावयाचा याचा विचार चालला, तेव्हा या जहालपक्षातही दोन भेद झाले. अेक रडक्या प्रतिकाराचे किंवा अप्रत्यक्ष प्रतिकाराचे Passive resistance चे अभिमानी व दुसरे लढाऊ प्रतिकाराचे किंवा प्रत्यक्ष प्रतिकाराचे अभिमानी. प्रतिकार म्हटला की तो रडून कधीही करता यावयाचा नाही. अप्रत्यक्ष प्रतिकाराला प्रत्यक्ष प्रतिकाराचा पाठिंबा असल्याशिवाय नेमळचा पक्षाहून त्यास जास्त यश कधीही येणार नाही हे ओळखण्याअितक्या अिंग्लंडच्या स्त्रिया अितिहास-शून्य नसल्याने हल्ली या लढाऊ प्रतिकाराच्या पक्षात बहुतेक तरुण स्त्रिया मिसळल्या आहेत. काही दिवसापूर्वी त्या पोलिसाशी धक्काबुक्की करीत पार्लमेंट-मध्ये घुसल्या व आत शिरून पार्लमेंटचे काम चालले असता अेकदम आपली अेक सभा भरवू लागल्या ! 'स्त्रियास स्वातंत्र्य द्या' ! म्हणून निशाण फडकले व व्याख्यानास आरंभ झाला ! तेव्हा अर्थात् पकडापकड होअून त्यास बाहेर घालविले गेले. पुढे कोर्टात चौकशी चालली तेव्हा कोर्टाच्या प्रश्नास स्त्रियाकडून अुत्तरे दिली जात की तुम्हाला आम्ही अुत्तरे देत नाही. कारण तुम्हाला स्त्रियाचे मत न घेता न्यायासनावर बसविलेले आहे! कायदा का मोडला या प्रश्नास अुत्तर की तो कायदाच नव्हता. त्यास पुरुषानी स्त्रियाची संमति घेतल्याशिवाय कायदा बनविला आहे. पुढे त्यास शिक्षा झाल्या. अेक महिन्याने सर्वांची सुटका होताच पुन्हा मारामारीस आरंभ ! ट्रायब्यूनच्या ऑफिसात अेक सभा भरली व तेथे अेका नेमळचा पक्षातील स्त्रीचे भाषण झाले. तिने पार्लमेंटमध्ये स्त्रियानी केलेल्या प्रकाराला नाक मुरडले न मुरडले तोच अेक स्त्री अुभी राहिली व म्हणाली 'आज पन्नास वर्षे तुम्ही 'सभ्य स्त्रिया'सारखे वर्तन करून काय दिवे लावलेत ? कोणता जय मिळविलात ? आजच्या सभेअितके लोक आज ५० वर्षात तुमच्या अेका सभेला तरी आले होते काय ? पार्लमेंटमध्ये आज जी जिवंत चर्चा चालली आहे हे कशाचे फळ आहे ? हे आमच्या लढाऊ प्रतिकाराचे फळ आहे. आम्हीच *खऱ्या खऱ्या कुलस्त्रिया आहोत. तुम्ही गुलाम स्त्रिया आहात कारण तुम्ही गुलाम-*गिरीतच सभ्यता मानीत आहात !' थोड्याच दिवसात अेका प्रमुख पार्लमेंटच्या मेंबरचे व्याख्यान व्हावयाचे होते. त्या मेंबरने पार्लमेंटमध्ये स्त्रियाना निंदात्मक शब्द योजिले होते त्याचे व्याख्यानाचे ठिकाणी व्याख्यान सुरू होताच पाचसहा स्त्रिया व्यासपीठावर अेकदम चढल्या व त्याच्याबरोबर आपणही व्याख्यान देअू लागल्या. 'ह्याने पार्लमेंटमध्ये तुमच्या आयाबहिणींना दुःशब्द लावल्याची तुम्हास काही शरम असेल तर ह्याचे भाषण तुम्ही अैकू नये.' असा त्यांनी धुमाकूळ-माडला. तो बोलू लागला की, आपण बोलावयाचे असा अुपक्रम सुरू केला. त्याच वेळेस दुसरीकडे जगी सभा करून त्यात मुख्य अध्यक्ष स्त्रीने असे जाहीर केले की

' आम्ही आता प्रत्यक्ष प्रतिकार करणार आहोत. कोणतीही राज्यक्रांति प्रत्यक्ष प्रतिकाराशिवाय झाली नाही. आम्ही स्पष्ट सांगतो की, अेकाच काय परंतु आमच्याविरुद्ध जाणाऱ्या सर्व पार्लमेंटच्या सभासदांना आम्ही रडावयास लावू, आता त्यांनी सावध असावें.' अशा रीतीनें जेव्हा ही जिवत चळवळ सुरू झाली तेव्हा अिंग्लंड हलकेच जागें झाले. डेली न्यूज, ट्रायब्यून अित्यादि वजनदार पत्रें सहानुभूतीचे लेख लिहू लागली. मिसेस फासेम या प्रसिद्ध स्त्रीने स्त्रियांच्या या प्रत्यक्ष प्रतिकारपक्षाविषयी असें म्हटलें आहे की ' यांनी स्वदेश जागा केला.' आज पन्नास वर्षांत जी गडबड झाली नव्हती ती अेकदोन आठवड्यात केली गेली. अेक स्त्री परवा वक्तृत्वपूर्ण भाषेत म्हणाली की, आमच्या या कृत्यांचा महत्त्वाचा अुपयोग म्हणजे स्त्रीवर्गाची जागृति हा होय. सर्व देशभर 'आमच्या भगिनी आपल्या हक्कांची चर्चा करू लागतील व दुसरे असें की जुलमी मदांध सत्ताधीशांच्या डोळ्यात हें चरचरीत अंजन गेल्याने ते खडबडून जागे होतील.' हें अंजन घालण्याचे काम किती नेटाने चालले आहे याचें प्रत्यक्ष अुदाहरण काल घडलें. काल संध्याकाळी हाअुस ऑफ कॉमन्सवर दुसरी स्वारी करण्याचा बेत ठरला व सुमारे पन्नास स्त्रिया तेथे जमल्या. कायद्याप्रमाणे पार्लमेंटपासून अेक मैलाचे आत सभेचें काम चालले असता कोणताही सार्वजनिक जमाव वा गलबला करू नये असें आहे, म्हणून मुद्दाम अगदी पार्लमेंटला खेटून स्त्रियानी व्यासपीठ अुभारले व दाराकडे अुभे राहून व्याख्यान सुरू झाले. पोलिस तेथून जावयास सांगू लागताच लिबरल गव्हर्नमेंटवर शिव्याचा वर्षाव सुरू झाला. ते देशबुडवे आहेत, विश्वासघातकी आहेत, अधम आहेत, खोटी वचनें देणारे आहेत, असा अेकच गलका सुरू झाला ! कसची पार्लमेंट, कसचें काय ! शेकडो स्त्रिया भराभर जमल्या व पार्लमेंटवर तुटून पडल्या ! पार्लमेंटची द्वारे बंद केलीं गेलीं असे पाहताच मारामारीस सुरवात झाली. अेक व्याख्यात्री पोलिसाने धरून नेताच दुसरी पुढे येअून अुभी राहिली. तिला धरताच तिसरीने व्यासपीठावर अुडी घेतली ! अेक बाअी आपले तान्हें मूल घेअून अुभी राहिली व म्हणाली यापुढे आम्ही सर्वजणी आमची तान्हीं मुलें घेअून येथे येअू व मग आम्हास तुम्ही धक्के मारा ! पुरुषाना वाढविण्यास स्त्रियास काय कष्ट होतात हें जगताला दिसून येअील ! पकडलेल्या स्त्रियांत बॅरिस्टर झालेल्या स्त्रिया प्रमुख आहेत ! ह्या स्वतःच्या बापाच्या, भावाच्या किंवा पतीच्याही अन्यायी परवशतेला न जुमानणाऱ्या अिंग्लंडच्या स्त्रिया स्वदेशावर जर परक्यांचें राज्य असतें तर काय करत्या व काय न करत्या ! अिंग्लंडच्या स्त्रिया व हिंदुस्थानचे पुरुष ! हिंदुस्थाना, तुझ्या विमल यशाला आम्ही कलंकभूत झालो आहोत ! त्यापेक्षा तुझे निसंतान कां झालें नाही !

—ता. ४ जानेवारी १९०७

+ + +

## १५. वर्षारंभ

लंडन : ख्रिस्तमसचा मण संपून युरोपमध्ये नवीन वर्ष सुरू झाले आपल्या अिकडे दिवाळीच्या सुमारास व्यापारी लोक आपापला आढावा काढून व नफ्या-तोट्याचा अंदाज घेअून नंतर ज्याप्रमाणे नवीन प्रपंच सुरू करतात, त्याप्रमाणे अिकडील व्यापाऱ्यानी आपापल्या धंद्याचे वार्षिक रिपोर्ट तपासून नवीन वर्षी कशा धोरणाने चालावयाचे हे नुकतेच ठरविले आहे व्यक्तिविषयक धोरण कसे ठेवावयाचे हें खाजगी व्यापाऱ्यांनी ठरविले व राष्ट्रविषयक धोरण या नवीन वर्षात कसे ठेवावयाचे हे राष्ट्रीय व्यापाऱ्यांनी ठरविले वर्षारंभ होताच प्रत्येक सार्वजनिक संस्थेमध्ये सभासदांची मंडळे जमली व आपल्या संस्थेच्या भावी अुत्कर्षासाठी काय केले पाहिजे याचा विचार करण्यात आला युरोपच्या वर्षारंभाला निरनिराळ्या संस्थांची व राष्ट्रांची अंदाजपत्रके प्रसिद्ध झाली फ्रान्समध्ये पोपच्या अधिकारासंबंधी बरीच खडाजंगी अुडालेली आहे त्या तंट्यात फ्रान्सच्या राजमंडळाला धक्का बसतो की काय याची फार भीति वाटत होती, परंतु आता तशी भीति वाटण्याचे काही अेक कारण नाही अशी वार्ता आलेली आहे जर्मनीमध्ये पार्लमेंट सभेला कैसरने किंचित् अुद्दामपणाने अेकदम खलास केल्याचे अैकल्यावरून सर्व युरोपभर जनक्षोभ झालेला होता परंतु आता नवीन निवडणुकीस आरंभ झाल्याने वातावरण शांत होत चालले आहे अिटलीमध्ये यंदा अखेर समाधानाचा व प्रगतीचा वारा वाहू लागला हें अैकून कोणास आनंद होणार नाही ? महाभाग मॅझिनीच्या लेखणीने व धनुर्धर ग्यारिबॉल्डीच्या तरवारीने अिटलीच्या *'वसुंधरेला स्वातंत्र्याचा सुंदर रत्नमंडित हार'* घालून तिला धन्यता दिली परंतु त्या स्वातंत्र्यप्राप्तीसाठी जे भयंकर दिव्य करावे लागले त्यायोगाने अिटलीची तनुलतिका फार क्षीण झालेली होती परंतु जिच्या हाती *स्वातंत्र्याची संजीवनी लागली आहे त्या अिटलीच्या भूमीला क्षीणता किती दिवस त्रास देअू शकणार ? अिटलीच्या यंदाच्या रिपोर्टावरून तेथील लोकांची प्रगति झपाट्याने होअू लागल्याचे अैकून सर्व प्रमुदित झाले आहेत अिटलीचा खजिना भरू लागला आहे अिटलीचा जोम वाढू लागला आहे व अिटलीचा देह सबल* होत चाललेला आहे स्वातंत्र्याचा हार अिटलीच्या कंठात पडल्यास तो तिला सोसेल की नाही यावद्दल नुकतीच—चाळीस वर्षांपूर्वी—चर्चा सुरू होती ! स्वातंत्र्याचा हार हा सुवर्णरत्नमौक्तिकांनी खचलेला असल्याने तो तोलण्यास जड असतो यात काही शंका नाही, परंतु त्या हारामध्ये अीश्वरी कृपेने असा अेक गुण आहे की, त्याचा स्पर्श होताच तो तोलण्याची शक्ति यावी हा त्या स्वातंत्र्याच्या हाराचा गुण फार थोड्या धन्वंतऱ्यांना माहीत असतो ग्यारिबॉल्डीलाही तो माहीत होता व मॅझिनीलाही तो माहीत होता त्यांना पूर्णपणे माहीत होता म्हणूनच त्यांनी

सर्व जग साशंक असताही तो स्वातंत्र्याचा रत्नखचित कंठा भूदेवीच्या कंठामध्ये घातला व तिला अक्षय्य सालंकृतता दिली. स्वातंत्र्यमालेने जिची तनु विभूषित झालेली आहे त्या अिटलीचा सदोदित अुत्कर्ष असो! अिटली, फ्रान्स, जर्मनी ह्या राष्ट्राप्रमाणेच अिंग्लंडमध्येही या वर्षाची अंदाजपत्रके प्रसिद्ध होत आहेत. गेल्या आठवड्यात चडाम हॉलमध्ये मि. हिंडमन यांचे 'नूतन वर्ष' या विषयावर जे अेक महत्त्वाचे भाषण झाले त्या भाषणात त्यांनी अिंग्लंडमधल्या राजकीय वातावरणात काय हालचाली होतील यांचे सुरेख विवेचन केले. त्या भाषणात हिंडमन म्हणाले की, यंदा हिंदुस्थानच्या क्रांतीला फार महत्त्व आलेले आहे. त्या विस्तीर्ण व प्रथित भूमीला स्वातंत्र्यसंपादनार्थ जे युद्ध करावे लागत आहे त्याच्या निकालाकडे सर्वांचे डोळे लागले आहेत. हिंदुस्थानाबद्दल हिंडमनने हा जो अुल्लेख केला त्याबद्दल अेका हिंदी गृहस्थाने त्यांचे आभार मानल्यावर ते पुन्हा म्हणाले, 'सुमारे २५ वर्षांपूर्वी जे जे हिंदी तरुण येत ते ते मला म्हणत की, हिंदुस्थानाविषयी तुमची मतें फारच कडक आहेत. अितकी कडकी आम्हास सोसत नाही. परंतु हल्ली येणारे हिंदी तरुण पाहून मला माझीच मतें फार नेमस्त आहेत असे वाटू लागले. तुमच्या देशात हा सतेज पथ प्रकट होत असलेला पाहून आम्हाला समाधान वाटते. हे समाधान काही केवळ भूतदयेनेच वाटते असे समजू नका. सोशियालिस्ट लोकांची हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यगामी प्रयत्नाला जी सहानुभूति आहे तिचे खरे कारण असे आहे की, हिंदुस्थान जोपर्यंत अिंग्लंडच्या ताब्यात आहे तोपर्यंत येथील जुलमी लोकास जिंकण्याची आम्हास आशा नाही. हिंदुस्थानात चरून पुष्ट झालेले हे प्राणी फार मारके होतात. त्यांचा माज अुतरविण्याची युक्ति म्हटली म्हणजे त्यांचे चरावयाचे कुरण अजिबात बंद करणे हीच होय व म्हणूनच आमची अशी अिच्छा आहे की, हिंदुस्थानने पूर्ण स्वतंत्र व्हावे. हिंदुस्थानातील चारा बंद झाल्यावर मग आमच्या श्रीमान् व जुलमी वर्गाचा अुद्दामपणा आम्ही अेका क्षणात नाहीसा करू शकू. हिंदुस्थानला स्वतंत्र करण्याचे प्रयत्न तुम्ही म्हणता त्याप्रमाणे हिंदुस्थानातच केले पाहिजेत. त्यासाठी तुमचे नेमस्त पुढारी अिंग्लंडमध्ये जो अचाट खर्च करीत बसले आहेत, तो अगदी व्यर्थ आहे. हिंदुस्थानात असताना तेथे लुटलेला पैसा अपुरा वाटूनच की काय कोण जाणे, आमचे परत आलेले अिंग्लिश अधिकारी तुमच्या मोठ्या पुढाऱ्यांना फसवून तुमच्यासाठी झटण्याच्या मिषाने हजारो रुपये लंडनमध्ये गिळंकृत करीत आहेत. हेन्री कॉटन व वेडरबर्न हे तुम्हाला स्वराज्याच्या थापा मारतात व त्या अैकून तुम्ही भुलता! परंतु मी तुम्हाला स्पष्ट सांगतो की, ही सर्व लबाडी आहे. आमचे देशबंधु कसे आहेत, हे आमचे आम्हाला पूर्ण माहीत आहे व म्हणून मी तुम्हास अशी विनंती करतो की, तुम्ही या मानभावीपणास अितःपर भुलू नका.' मि. हिंडमन यांनी वर्षारंभीच्या आपल्या अेवढ्याशा भाषणात कितीतरी कोडी

सोडविली आहेत! आपले देशबंधु अगदी लबाड आहेत हे त्यानी स्पष्ट सांगितले. अिंग्लंडमध्ये लोकमत अनुकूल करून घेणे हे किती वेडगळ व अशक्य आहे याचा त्यानी खुलासा केला. अिंग्लंडचे मत अनुकूल करून घेण्यास अेकच अुपाय आहे व तो हाच की अिंग्लंडच्या मताची कवडीचीही पर्वा न करणे! १८५७ साली अिंग्लंडमध्ये कोणी डेप्युटेशन धाडली होती किंवा कोणी व्याख्याने दिली होती? परंतु ५७ साली अिंग्लंडचे जितके लक्ष हिंदुस्थानकडे वेधले होते त्याच्या शतांशही लक्ष गोखल्याच्या हजारो व्याख्यानानीही वेधले नाही. आपण कृति करू लागलो की अिंग्लंडचे लक्ष आपण नको नको म्हटले तरी आपल्यामागे धावत सुटेल! मि. हिंडमनने आणखी अेका मुद्द्याचा स्पष्ट निकाल केला. सोशियालिस्ट लोक हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळावे हे केवळ त्याचा त्यात फायदा असल्यानेच म्हणत आहेत. अर्थात अुद्या जर अिंग्लंडमधले श्रीमान् लोक व सोशियालिस्ट या दोघांचा मिलाफ झाला तर हिंदुस्थानची संपत्ति लंडनच्या भिकाऱ्यास वाटून देण्यास हे सोशियालिस्ट लोक मागे घेणार नाहीत कशावरून? ते काहीही होवो, हिंदुस्थानने अेक लक्षात ठेवावयाचे की, आपण स्वतःचे पाय व स्वतःचे हात सबळ केले पाहिजेत. मग सोशियालिस्ट मित्र म्हणून आले तर सलाम करू, शत्रु म्हणून आले तर अर्धचंद्र देऊ. अिंग्लंडच्या वर्षारंभात अितके शिवल्यावर आपण आता आयर्लंडच्या वर्षारंभाकडे वळू.

युरोपमध्ये अिंग्लंड, फ्रान्स, जर्मनी व अिटली हे देश स्वतंत्र झालेले आहेत. रशिया हा ह्या वरील देशाअितका जरी स्वतंत्र नसला तरी तेथील झार हा त्याच्या स्वतःच्या देशबंधूंपैकीच आहे. रशियातील पैसा झार नेतो म्हणजे मास्कोहून सेंटपीटर्सबर्गला जातो यापेक्षा जास्त अन्याय काही होत नाही. परंतु ह्या सर्व देशाहून आयर्लंडची स्थिति फारच भिन्न आहे. युरोपमध्ये हंगेरीसारखे देशही जवळ जवळ पूर्ण स्वतंत्र असता अेकटे आयर्लंड काय ते परकीयाच्या तुरुंगात पडलेले आहे. सर्व युरोप स्वतंत्रतेचा श्वासोच्छ्वास करीत असताना आयर्लंडची हतभागी भूमि मात्र गुलामगिरीच्या घाणीत कुजत आहे! आयर्लंडला स्वतःचा देश नाही. स्वतःचे नाव नाही स्वतःचे निशाण नाही! आयर्लंड हिंदुस्थान झालेले आहे! व म्हणूनच गोखले हिंदुस्थानातील लोकाना अुपदेश करतात की, तुम्ही आयर्लंडसारखे नेमस्त व्हा! नेमस्त? बरोबर आयर्लंडसारखा नेमस्तपणा धरण्याचे जर हिंदुस्थान मनात आणील तर हिंदभू अुद्या स्वतंत्र होअील! आयर्लंड नेमस्तपणा धरते म्हणजे काय करते आहे याची थोडीशी कल्पना आपल्या वाचकाना देण्यासाठी आयर्लंडमध्ये वर्षारंभाला काय काय सुरू झाले आहे हे थोडक्यात सांगतो. आयर्लंडमध्ये तरुणाची मने अितकी सवळलेली आहेत की, God save the king' हे ठराविक गीत म्हणण्याचे नाकारून ते वर्षारंभाला 'God save Ireland' हे राष्ट्रगीत म्हणत आहेत. आयर्लंडची ग्यालिक भाषा अिंग्रजीच्या

चरकात गतप्राण झाली होती मोठमोठाल्या सभेत आयरिश भाषा कळणारे शभ-रात दहाही निघत नसल्याने अिंग्रजी हीच जन्मभाषा होत आलेली आहे ! अुद्या पढरीच्या यात्रेत चोहोकडे अिंग्रजी सुरू होअून वारक-यात मराठी बोलणारे दोन चार जणच निघावे तशी आयर्लंडची विचित्र स्थिति आज झालेली आहे ! या दु खदायक गुलामगिरीचा पूर्ण वैताग येअून आयर्लंडला जीवित दु सह झालले आहे आता स्वतत्र होअू किंवा मरू परतु गुलामगिरीत जिवत राहावयाचे नाही असा निश्चय तरुण लोक राजरोस रीतीने करू लागले आहेत स्वदेशी चळवळ जारावर आह अप्रत्यक्ष प्रतिकारही सुरू झाला आहे लोकानी दारू पिअू नय, सरकारी नोक-या धरू नयेत, परका माल घेअू नये, अित्यादि निरनिराळ्या रूपाने स्वदेश स्वतत्र करण्याचे प्रय-न सुरू झाले आहेत परतु हे सर्व प्रयत्न सुरू केले तरी राष्ट्र-स्वात-य मिळणे शक्य आहे काय? Passive Resistance अप्रत्यक्ष अूर्फ रडक्या प्रतिकाराने जुलमी मदांधाच्या तावडीतून आपले आयर्लंड आपणास मुक्त करता येणे शक्य आहे काय? 'आम्ही कर देत नाही जा' 'आम्ही अप्रत्यक्ष प्रतिकार करीत आहोत, खबरदार आमच्या अगाला हात लावशील तर!' अशा नुसत्या दरडावणीला शत्रु भीक घालील काय, वगैरे प्रश्न आपल्या मनाला विचारून आयर्लंड ह्या वर्षारभाला काही निराळीच अुत्तरे देअू लागले आहे अेक आयरिश प्रमुख पत्र म्हणत, 'आयर्लंडला स्वतत्र करण्याचा अेकच मार्ग आहे ता मार्ग म्हणजे अिंग्लिशाना हुसकून देणे हा होय' परतु अिंग्लिशाना हुसकून कस द्यावयाचे? अर्जानी की व्याख्यानानी की विनत्यानी, की Passive resistance च्या रडक्या प्रतिकारानी? त पत्र म्हणत की, That can only be done by physical force only, no matter how many little things can be got by other means there can be no substitute for force to acheieve complete freedom!' बारीकसारीक व अुष्टे तुकडे जरी विनत्यानी, लागूलचालनानी किंवा पोकळ गुरगुरण्यानी मिळाले तरी पूर्ण स्वातत्र्य हे ल्ढाअीशिवाय कधीही मिळणार नाही! परतु लढाअी ही तर फार कठीण गोष्ट आहे अशी परतत्र दशात नहमीच समजूत असते पण हे पत्र आपल्या देशबाधवाना म्हणते की, ल्ढाअी ही गोष्ट फारशी कठीण आहे असे मुळीच नाही दुष्काळाने व रोगाने काय थोडे आयरिश लोक मरताहेत! गुलामगिरीत जे जिवत आहेत ते खरोखरी पाहता मेलेलेच आहेत मग लढाअीत कठीण ते काय? लढाअीत शिस्त व कवा-अीत फार लागते अशी सवसाधारण कल्पना आहे ही शिस्त मिळविणे ह किती सोपे आहे ह मागे Daily mirror च्या 'तरुण सेने' सबधाने मी जी हकीकत कळविली आहे तिजवरून दिसून येअीलच त्याच मुद्द्याचा अनुवाद करून ते पत्र म्हणते की, 'The essential thing in modern warfare is good shooting अलीकडच्या लढाअीत कवाअितीचे वगैरे माहात्म्य फार थोडे आहे कारण

परतंत्रतेतून सुटणाऱ्या देशाला गनिमी काव्यात पळण्याशिवाय अितर कवाअीत फारशी लागत नाही जपानने रशियाच्या सैन्यावर चाल केली त्या वेळेस त्याच्या सैन्यातील भरती अितकी कच्ची होती की, त्याना सारखे पायही टाकता येत नसत परतु लढाया व विशेषत स्वातंत्र्याच्या लढाया मनानेच बहुताशी लढल्या जातात त्या मनाला जर नेम अचूक मारण्याचे साह्य असले तर जयश्री हटकून माळ घालते परतु हे अचूक नेम मारणे म्हणजे काही मोठी अजब विद्या आहे असे नाही हे पत्र म्हणते की, The boys of fifteen in the Boer ranks were as effective as grown up men One Boer boy of that age, young Snyman, took five regular British soldiers prisoners अेका पधरा वर्षाच्या बाअर मुलाने पाच ब्रिटिश कवाअीतवाज शिपायाना कैद केले कारण त्याला अुत्तम नेम मारता येत होता हे नेम मारणे ही चातुर्याची गोष्ट नसून ती फक्त सवयीची गोष्ट आहे आता ही सवय आयरिश लोकानी करावयाची कशी ? तर त्यालाही या पत्रकाराने तोड काढली आहे की ज्याअर्थी आयर्लंडमध्ये सशस्त्र संस्थान नाहीत त्याअर्थी तरुण लोकानी अमेरिकेत जाअून नेम मारण्यास शिकावे याप्रमाणे हजारो आयरिश लोक अमेरिकेत नेम शिकत आहेत अितकेच नव्हे, तर त्यानी तेथ आपल्या स्वतंत्र पलटणीही तयार केलेल्या आहेत व त्या पलटणी आपल्या मातृभूमीला सोडविण्यासाठी युद्धभूमीचे आमत्रण केव्हा येअील याची मार्गप्रतीक्षा करीत सज्ज आहेत !

आयर्लंडचा हा नेमस्तपणा हिंदुस्थानने अनुकरावा असा गोखल्याचा मानस आहे की काय ?

—ता ८।२।१९०७

\+ \+ \+

## १६. विमानाची युक्ति

लडन गेल्या शतकात विमानाची युक्ति निघाली तेव्हा अितक्या थोड्या अवधीत त्याची अितकी प्रगति होअील हे फारच थोड्याच्या लक्षात आले असेल अेकोणिसावे शतक वाफशक्तीच शतक होते विसावे शतक विद्युतशक्तीचे शतक आहे वाफेच्या दिव्याचे अैवजी विद्युद्दीप व वाफेच्या यंत्राचे अैवजी विद्युतयंत्र चोहोकडे सुरू होअून जगातील कित्येक व्यवहारात फरक घडून आलेला आहे, परतु हल्ली हवेवर चालत जाण्यासाठी जे प्रयोग सुरू झाले आहेत त्याच्या साह्याने आजपर्यंत कल्पनातीत वाटणारा असा फरक लवकरच घडून येअील असे आता

निश्चयाने म्हणता येत हवेतून गाडी हाकण्याची युक्ति ही आता मनुष्याच्या पूर्णतायात आलेली आहे आजपर्यंत विमानाची शक्ति फारच सकुचित असे फ्रान्स-मधून अिंग्लडमध्ये विमानात बसून येता आले म्हणजे मोठा विजय समजण्यात यत असे ल्टाअीतही यापूर्वी थोडाबहुत विमानाचा अुपयोग करण्यात येत असे ह्या विमानाना अितक दिवस अेक मजेची वस्तु अितकाच काय तो मान अस परतु याच्यापलीकडे जगातील सव व्यवहार अेकदम बदलून टाकणारा विलक्षण फरक विमान करू शकतील ह मुळीच शक्य वाटत नव्हते या युक्तीचे बहुतक श्रेय फ्रच शोधकाकड आहे फ्रान्समध्य विमानाच्या गतीवर आजपर्यंत शकडो प्रयोग करण्यात आल व त्या प्रयोगाचा विजय होअून आता लवकरच सव जग विहगा बरोबर स्पर्धा करीत आकाशात अुडू लागेल जमिनीच्या किंवा पाण्याच्या पृष्ठ-भागावरच काय तो मनुष्यजातीचा अमल चालावा व आकाशात अुडून चिमण्यानी दखील मनुष्यजातीचा अुपहास करावा ही लज्जास्पद स्थिति नाहीशी करण्याचे श्रेय ज्या फ्रच शोधकानी घेतल त्याचे मनुष्यजातीवर अखडित अुपकार झालेले आहत गुलामगिरीच्या बडया ठोकून मनुष्यजातीला जमिनीवरही चालणे अशक्य करण्यात राक्षसी अिंग्लड गुतल असताना फ्रान्स देशात स्वर्गीय पख शोधून काढून मनुष्यजातीला आकाशात स्वच्छद विहार करण्यास समथ बनविण्याचे दीघ अुद्योग चाललेले असाव ही गोष्ट त्यास भूषणावह नाही अस कोण म्हणेल? हल्ली विमानात अत्यत प्रवीणता मिळविलेले शोधक अेम डयूमड हे आपले प्रयोग फ्रान्समध्यच करीत आहेत आजपयत हवेपक्षा हलक्या वस्तूची विमान करण्यात यत असत परतु या प्रसिद्ध वैमानिकान आता अस सिद्ध केल आहे की, हवेहून भारी असणाऱ्या पदार्थाची विमानही अुत्तम रीतीने अुडू शकतात विमानाला आज-पयत दोन चाक लावीत असत परतु नुकत्याच केलेल्या प्रयोगावरून अेम डयुम-डन अस सिद्ध करून आहे की अेक चाकी विमान समतोलाने तयार करून असता तें फार त्वरित हवेत अुडत जात विमानाला हल्ली जी अितकी विलक्षण गति देता आली आह याचे मुख्य कारण मोटार फोर्सची योजना होय या मोटार फोर्सने जमिनीवरच मनुष्याची गति वाढविली नसून त्याला आकाशात भराऱ्या मारण्यासही मदत केली आह विमानाला दोन बाजूनी हवा कापीत वर चढण्यासाठी दोन पख जोडलेले असतात त्या पखाना हा मोटार फोर्स लावलेला असता आजपर्यंत विमानाना पख लावलेले नसत त्यासची अेक पिशवी विमानाचे अग्रभागी लावून हवेपक्षा हलका असणारा ग्यास त्या पिशवीमुद्धा वर चढू लागला की त्या अुद्गमन-शक्तीने विमान वर चढविण्यात यत असे परतु हल्ली पखाची युक्तिही फार पसत पडत चाललेली आह या युक्तीन आता अेम् डयुमड ह कित्येक विलक्षण प्रयोगा-नतर ५० घोड्याच्या शक्तीच विमान वर अुडवू शकतात आजपर्यंत सुमारे १८ मैल अुड्डाण अेका तासात करता यअी परतु परवा अेम डयुमडने सर्व जगाला

यक्व करणारे आश्वासन दिले आहे- ते म्हणतात, आता १०० हार्सपॉवरचे विमान अुडविता येअील ! व ते दर तासी २५० मैल अुडत जाअील ! या शोधाने जगात अतर्क्य फेरफार होणारे असल्याने या आश्वासनाचा व या सुयशाचा सर्व जगभर जयघोष चाललेला आहे राष्ट्रांना आता पाण्यावरची जहाजेच ठेवून भागणार नाही. तर हवेत तरणारी प्रचड लढाअू विमाने अुभारावी लागणार आहेत फ्रान्सने तर आजच ८० लढाअू विमाने सज्ज करून ठेवलेली आहेत ! जेथे जमिनीवरून जाता येत नसे तेथे मनुष्य पाण्यावरून चालत जाओी. परतु आता तर जेथे जमिनीवरून वा पाण्यावरूनही जाता येणार नसेल, तेथे मनुष्य हवेवरून अुडत जाणार ! अुत्तर ध्रुवावर बर्फ झालेल्या पाण्यातून किंवा जमिनीवरून जाता येत नाही अेकूण आता ध्रुवाचा कबजा घेण्यासाठी अेक वैमानिक हवेतून जाणार आहेत व त्याना प्रेसिडेंट रुजव्हेल्ट हे स्वत सर्व खर्च देणार आहेत

अेका प्रचड गाडीला सतेज, पाणीदार व ज्वान घोडे जोडलेले आहेत व त्याच्या गाडीवानाची शिटी अैकताच ते हवेत दर तासात २५० मैल आकाश आक्रमीत भरधाव अुडत आहेत अशी कल्पना डोळ्यापुढे आणली व नतर त्या अवाढव्य कल्पनेला दाबून अेका लहानशा आटोपसर यत्राच्या स्वरूपात आणली म्हणजे या विमानाचे चित्र बरोबर होअील.

परतु जो जो मनुष्यजातीचे अुद्धरण होत आहे तो तो अिंग्लडचे मरण जवळ येत आहे. पाण्याचे चोहोकडून वेष्टण असलेल्या आपल्या बेटाला अिंग्लड आजपर्यंत अजिक्य मानीत आले आहे फ्रान्स व अिंग्लड याचेमध्ये अिंग्लिश चॅनल आहे. त्यातून अेक बोगदा काढून युरोपखडाशी निकट सबध व दळणवळण जोडावे अशी शेकडो लोकानी विनती केली परतु या तुसडया व स्वापराधजन्य भित्रेपणाने सर्वांशी अविश्वास राखणाऱ्या राष्ट्राने ते म्हणणे अैकले नाही कारण त्याना अशी खात्री असे की, पाण्यावर आपला पराभव करून अिंग्लडवर येण्याची कोणाची ताकद नाही. ते पाण्याचे सरक्षण सोडून देअून अिंग्लडचा व फ्रान्सचा जर चॅनेलमधल्या बोगद्यातून आगगाडीने सबध जुळला, तर अेखादे दिवशी फ्रान्सचा नेपोलियन अिंग्लडच्या सिंहासनावर चढू लागेल अिंग्लिश चॅनेलमध्ये बोगदा पाडून त्यातून आगगाडी नेल्यास व्यापाराचा फार विस्तार होअील व अिंग्लडला अेकदरीत फार फायदा होअील हें कळत असूनही आजपर्यंत अिंग्लड आपल्या पाण्याच्या गुर्मीत चूर असे. परतु धूर्त फ्रान्सने जेव्हा दर तासाला २५० मैल अुडत जाणारे लढाअू विमान तयार केले, तेव्हा या स्वयप्रतिष्ठित अिंग्लडची जी तारांबळ अुडाली आहे ती काही विचारू नका ! आता अिंग्लिश चॅनेलमध्ये आगगाडी नेली काय व न नेली काय ? हवेतून फ्रेंच विमाने क्षणार्धात अिंग्लडवर मारा करतील असे पाहून व हिरमुसले होअून अखेर अिंग्लड आता व्यापार तरी साधावा म्हणून फ्रान्सशी आगगाडीचा सबध जोडणार आहे ! —(ता. १५ मार्च १९०७)



\+ + +

## १७. दे. श्यामजी कृष्णवर्मा यांचें औदार्य !

लंडन हिंदुस्थानातील लोकांमध्ये गेल्या दोन वर्षांपासून ज्यांचे नाव प्रिय व प्रथित झालेले आहे त्या देशभक्त श्यामजी कृष्णवर्मा यांनी हिंदभूच्या अुद्धारार्थ जी १०००० रुपयांची नूतन देणगी दिली तिची त्रोटक व संक्षिप्त वार्ता तारेने यापूर्वीच तिकडे आलेली असेल देशभक्त श्यामजी यांनी 'अिंडियन सोशियालिस्ट' पत्र काढल्यापासून हिंदुस्थानातील पुष्कळ लोकांना त्यांच्या विषयींची माहिती मिळवावी अशी अुत्कंठा असेल म्हणून या प्रसंगाचा फायदा घेअून त्यांच्या व्यक्तिविषयक चरित्राबद्दल थोडीशी माहिती दिल्यास ती आपले वाचकांना शिक्षणप्रद झाल्यावाचून राहणार नाही देशभक्त श्यामजी हे आपल्या विद्यार्थीदशेत असतानाच संस्कृत भाषेमध्ये फार प्रवीण झाले होते त्यांच्या त्या गीर्वाण भाषा नैपुण्यावर लुब्ध होअून श्रीदयानंद स्वामी यांची त्यांच्यावर अितकी मर्जी बसली की, त्यांनी श्यामजींना जयळजवळ पट्टशिष्यच बनविले होते निरनिराळ्या संस्कृत पंडितांशी वादविवादाचा प्रसंग आला म्हणजे श्रीदयानंदांनी प्रथम आपल्या लाडक्या शिष्याकडून त्यांचें खंडन करवावें व मग जरूर लागल्यास स्वत. शास्त्र अुपसावें श्रीदयानंदाच्या सहवासात देशभक्त श्यामजींच गीर्वाणवाणीप्रावण्य अितके वाढले की, धर्मोपदेशनाचें व्रत घेअून ते हिंदुस्थानभर संस्कृत भाषेत भाषणे करीत हिंडू लागले पुणे, नाशिक, कलकत्ता वगैरेसारख्या संस्कृत विद्येच्या आद्यपीठस्थानी जाअून देशभक्त श्यामजींनी आपल्या अस्खलित, मधुर व युक्तिप्रचुर भाषणांनी त्या वेळच्या जुन्या व नव्या विद्वानांवर आपली पूर्ण छाप बसविली होती कै कृष्णशास्त्री चिपळूणकर, रानडे वगैरे विद्वानांनीही पंडितांचा लौकिक व त्यांची विद्वत्ता यांची फार वाखाणणी करावी श्रीस्वामी दयानंद यांच्या आर्यसमाजातर्फे हें धर्मोपदेशनाचें काम अधिकाऱ्युक्ततेने बजावीत असता व श्यामजींची संस्कृत भाषानैपुण्याची कीर्ति द्वीपान्तरीही जाअून धडकली होती व दयानंदाच्या अनुमतीने व शिफारशीने त्यांची केंब्रिज कॉलेजच्या संस्कृताध्यापकत्वाचे जागेवर निवडणूक होअून ते अिंग्लंडमध्ये आले त्या वेळेस ह्या तरुण हिंदी प्रोफेसरास संस्कृत भाषेचें शिक्षण देताना केंब्रिज युनिव्हर्सिटीच्या व्यासपीठावर पाहून कित्येक अिंग्रजास फार चमत्कार वाटे व ते पंडितजींच्या वक्तृत्वाबद्दल फार धन्यवाद गात परंतु त्या वेळेस कौतुकास्पद झालेले पंडित श्यामजी अेकाअेकी अिंग्लिशांच्या नापसंतीला अुतरून आज दोषास्पद झालेले आहेत ! कारण त्या वेळेस जे 'पंडित श्यामजी' होते ते आज 'देशभक्त श्यामजी' आहेत ! अिंग्रजांच्या रक्तांत औदार्य व नि पक्षपात हे गुण सदोदित खेळत असतात असे वाटणाऱ्या मूर्ख लोकांनी हे अुदाहरण सदोदित ध्यानांत वाळगावें पंडितजींची त्या वेळची विद्वत्ता व आजची विद्वत्ता यांत जर काही भेद असला तर तो अधिकत्वातच आहे. परंतु अिंग्रजांची प्रीति ही बरबर

वाटते तशी खरोखर सद्‌गुणसंपन्नतेवर नमून त्याच्या दास्यलोलुपत्वावर असते. जोपर्यंत तुम्ही त्याची गुलामगिरी करण्यास कटाळले आहात हें त्याच्या नजरेस आले नाही तोपर्यंत ते तुमच्या सस्कृतप्रावीण्याची स्तुति करतील व तुमच्या वक्तृत्वाची तारीफ करतील; परतु हे सर्व त्याच्या जोखडाला मान देण्यास तयार आहात तोपर्यंत ! गाडी सुरळीतपणे ओढीत आहेत तोपर्यंत गाडीवाला आपल्या बैलाला कुरवाळतो, थोपटतो, त्याची स्तुति करतो; परतु बैलाने जरा मान चोरण्यास आरभ केला की, त्याचे अितर सद्‌गुण अेका क्षणात दुर्गुण होअून त्याच्या पाठीवर गाडीवानाचे चाबूक अुडू लागतात! फक्त नवल हे की मानवी बैलाना हे रहस्य अजून कळू नये व त्याने आपल्या पाठीवर चाबूक अुडविणाऱ्यास नि.पक्षपाती म्हणून सबोधू लागावे ! पडित श्यामजीनी केंब्रिजमध्ये अध्यापकत्व करीत असतानाच तेथील अेम. अे. ची पदवी घेतली व बॅरिस्टरची परीक्षाही दिली. नंतर ते हिंदुस्थानात परत गेले व रतलाम, अुदेपूर वगैरे कित्येक सस्थानात दिवाणगिरीची कामे करून काही दिवस बॅरिस्टरीचे कामही करीत होते. ते काठेवाडात दिवाण असता त्याच्याच शिफारशीने तेथे आलेला अेक गोरा आपल्या जातिस्वभावास अनुसरून त्याचेवरच कित्येक आरोप आणू लागला. त्या सस्थानातच नव्हे, तर कोणत्याही सस्थानात काम करण्यास ते नालायक आहेत असे सिद्ध करण्याचा मेवयानकी नावाच्या फिरग्याने घाट घातलेला पाहून देशभक्त श्यामजीनी त्याचे खरे स्वरूप अुघड करण्यास आरभ केला. हिंदुस्थान सरकारापर्यंत ते भाडण जाअून देशभक्त श्यामजी पूर्ण रीतीने निर्दोष होअून बाहेर आले. नतर त्यास अुदेपूरच्या महाराजानी पुन्हा दिवाणगिरीची वस्त्रे दिली. हे काम काही दिवस केल्यानतर दे. श्यामजी हे अिंग्लडात आले व प्रसिद्ध तत्त्वज्ञानी हर्बर्ट स्पेन्सर याच्या ग्रथाध्ययनात कालक्रमण करू लागले. त्यावेळेस त्याच्या मनात हिंदुस्थानच्या स्वातत्र्यप्राप्तीबद्दल जबरदस्त अुत्कठा अुत्पन्न होअून त्याना आपल्या राष्ट्राच्या दास्याची शरम वाटू लागली. रात्रदिवस हिंदुस्थान व त्याचे स्वातत्र्य याची तळमळ लागलेल्या ह्या स्वदेशभक्ताने अखेर १९०५ च्या जानेवारी महिन्यात आपल्या राजकीय चरित्राला आरभ केला व हिंदुस्थानातील राजकीय वातावरणात ज्याने महत्त्वाचा फरक पाडलेला आहे त्या 'अिंडियन सोशियालॉजिस्ट मासिक पत्रकाचा पहिला अक प्रसिद्ध झाला. देशभक्त श्यामजीच्या प्रयत्नाचे विशिष्टत्व हे आहे की, प्रथमपासूनच त्यानी स्वराज्याचे निशाण अुभारलेले आहे. अिंग्लडच्या गुलामगिरीला पूर्णपणाने झुगारून देअून हिंदुभूमि सर्वांग स्वतत्र झाल्याशिवाय तिचा अुद्धार होणे अशक्य आहे, हे राजकीय सत्य निर्भेळ रीतीने व सुप्रसिद्धपणे अुपदेशिण्याचे प्रथम श्रेय ज्या थोड्या महात्म्याना आहे त्यात दे. श्यामजीची गणना आहे. 'अिंडियन सोशियालॉजिस्ट' पत्राबरोबरच त्यानी 'होमरूल सोसायटी' स्थापन केली. त्या सोसायटीचे मुख्याध्यक्षत्व श्यामजींकडेच

आहे व त्याचेकडे आहे म्हणूनच त्या सोसायटीची स्वातंत्र्यप्रीति व स्वराज्यनिष्ठा जाज्वल्य रीतीने कायम आहे. अिंग्लंडमध्ये अिंग्रजांच्या व विशेषतः मानभावी अिंग्रजांच्या दाबाखाली चाललेल्या हिंदी चळवळीचा धिक्कार करून स्वतंत्र व म्हणूनच खरी हिंदी चळवळ अिंग्लंडमध्ये प्रथमतः देशभक्त श्यामजींनी सुरू केल्या-पासून हिंदी राजकारणाची दुसरी व सत्य बाजू जगाचे निदर्शनास येअू लागली. हेन्री कॉटनला वशपरंपरेने संपादकत्व देणारे अिंडिया व स्वराज्याची पवित्र पताका अुभारणारे 'अिंडियन सोशियालॉजिस्ट' आणि हिंदुस्थानच्या गुलाम-गिरीवर पोसलेल्या कॉटन, वेडरबर्नच्या मुठीतील ब्रिटिश कॉंग्रेस कमिटी व स्वदेशाचे स्वातंत्र्य संपादण्यासाठी जन्म घेणारी व केवळ हिंदी लोकांनीच चालविलेली होमरूल-सोसायटी, या दुकलीतील ध्रुवविरोधावरून हिंदुस्थानच्या राजकारणाचे स्वरूप दे. श्यामजींनी कसे बदलून टाकले हे सर्वांच्या ध्यानी येअील.

याहूनही महत्त्वाची गोष्ट म्हणजे अिकडे येणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांचे मन-संक्रमण ही होय. आजपर्यंत जे जे हिंदी तरुण अिकडे आले ते ते नेमस्तांच्या अमलाखाली 'ब्रिटिश न्यायबुद्धि व नेमळेपणा' शिकून परत जात व हिंदुस्थानात अिंग्लंडच्या लोकांबद्दल अद्वातद्वा स्तुतिस्तोत्रें गाअून लोकांना भिक्षादेहीकडे नेत. परंतु आता देशभक्त श्यामजींच्या 'सोसायटी'ने व मासिक पत्राने मानभावी कॉटनांची कृत्ये फळ लागतात व ते स्वराज्यनिष्ठ होअून स्वदेश स्वातंत्र्यार्थ प्रयत्न करू लागतात. या विद्यार्थ्यांच्या मन संक्रमणासाठी श्यामजींनी काढलेल्या अिंडिया हाअूस' या संस्थेची अुपयुक्तता फार आहे. या 'अिंडिया हाअूस'चा अिंग्रजांना अितका वचक बसला आहे की अेखाद्या लायब्ररीत वगैरे हा अिंडिया हाअूसचा पत्ता दिला की अेखादा अँग्लो अिंडियन चटकन विचारतो की, 'Then you belong to the Revolutionary Party !' मग आपण राज्यक्रांतिकारक असालच ! या ल्हानशा प्रसंगावरूनही देशभक्त श्यामजींची अिंग्रजांना किती दहशत बसली आहे हे दिसून येअील. या निरनिराळ्या संस्था काढून अिंग्लंडात स्वातंत्र्याचे अुपदेशकेंद्र काढल्यानंतर देशभक्त श्यामजींनी तरुण लोकांस स्वतंत्र देशात राहून स्वातंत्र्याची प्रत्यक्ष महती कळावी म्हणून 'लेक्चरशिप्स' ठेवल्या व प्रत्येकी २००० रुपयांच्या 'राजा प्रतापसिंह', 'शिवाजी', 'अकबर' 'दयानंद' 'फेलोशिप्स'ही दिल्या. या कामी त्यांना बॅरिस्टर राणा ह्या स्वातंत्र्यनिष्ठाचे फार साह्य झाले. दे. श्यामजी येथेच थांबले नाहीत. हिंदुस्थान स्वतंत्र कसे करावयाचे हा जितका महत्त्वाचा मुद्दा आहे तितकाच स्वातंत्र्यानंतर हिंदुस्थानात स्वराज्यरचना कशी ठेवावी हा मुद्दाही महत्त्वाचा असल्यामुळे त्या विषयावर अेक अुत्तम व विद्वत्तायुक्त निबंध जो लिहील त्यास रु. ७५० चे बक्षिसही त्यांनी लावलेले आहे. त्या बक्षिसाची जाहिरात देअून अजून पुरे दोन महिनेही झाले नाहीत तोच परवा होमरूल सोसायटीच्या द्वितीय वार्षिक संमेलनाचे प्रसंगी हिंदुस्थानात स्वराज्योपदेशक

प्रांतोप्रांती धाडण्यासाठी त्यांनी १०००० रुपये दिल्याचें जाहीर केले. स्वराज्याचा अुपदेश करीत सर्व हिंदुस्थानभर संचार करण्यास जे राजकीय संन्यासी तयार होतील त्यांना या १०००० रुपयांतून साहाय्य होणार आहे. स्वराज्याची अुदात्त कल्पना प्रथम प्रभु रामदासाच्या व श्रीशिवछत्रपतींच्या मनात व तरवारीत प्रादुर्भूत झाली. 'स्वराज्य' शब्द प्रथम छत्रपतींनी महाराष्ट्रदेशात रूढविला. त्या वेळेपासून या पवित्र व तेजोमय शब्दाने मराठ्यांचा जरीपटका अटकेपर्यंत नेला आहे. महाराष्ट्राच्या अितिहासात स्वराज्य व सरदेशमुखी या ओजस्वी शब्दद्वयाचा शिक्का प्रत्येक पानावर व ओळीवर पडलेला आहे. महाराष्ट्राच्या अंगात चैतन्य ओतणारा तोच हा 'स्वराज्य' शब्द आता हिंदुस्थानात फिरून दुमदुमू लागला आहे. हा अैतिहासिक तेजाने दीप्तिमान् झालेला शब्द—हा शिवछत्रपतींनी अुच्चारलेला शब्द—सर्व हिंदुस्थानचे अंतिम लक्ष्य म्हणून आता समुद्रवलयांकित भरतखंडाचे कंठातून ध्वनित होत आहे. नकळत का होओना, परंतु ज्या क्षणी दादाभाअींनी हा शब्द राष्ट्रीयसभेच्या अध्यक्षपीठावरून तीस कोटी लोकांचे अंतिम लक्ष्य म्हणून अुच्चारला तो क्षण खरोखरीच दैविक होय! आता पूर्व परंपरागत व अैतिहासिक स्मृतिपूर्ण 'स्वराज्या'चा व 'सरदेशमुखी'चा हक्क आर्यभूपासून दूर ठेवण्याची कोणाची छाती आहे? स्वराज्याच्या झेंड्याखाली सर्व हिंदुस्थान जमू लागले आहे व तो जमाव लवकर व्हावा म्हणून स्वराज्योपदेशक धाडण्यासाठी १०००० रुपये देशभक्त श्यामजींनी दिले आहेत. कारण त्यांची अत्यंत अुत्कट अिच्छा आहे की 'मी माझ्या डोळ्यांदेखत माझे परमप्रिय हिंदुस्थान स्वतंत्र व स्वराज्ययुक्त झालेले पहावे!'

देशभक्त श्यामजी! तुम्ही आपले भाषणाचे शेवटी दर्शविलेली ही अिच्छा शीघ्र फलदायी होवो! त्या स्वराज्यासाठी तीस कोटी आत्मे तळमळोत! तीस कोटी मने स्मरणीस लागोत! विशेषत: त्या स्वराज्यासाठी साठ कोटी हात कार्यास लागोत!

—(ता. १५।२।१९०७)

\+ \+ \+

## १८. स्वदेशाशी कृतघ्नपणा

लंडन — हिंदुस्थानच्या भाग्योदयाची जी कित्येक सुचिन्हे प्रादुर्भूत होऊं लागलीं आहेत त्यांत अेक महत्वाचें चिन्ह म्हटलें म्हणजे हिंदी तरुणांची परदेशातही वाढत जाणारी स्वात्मनिष्ठा हें होय. बाहेरच्या भपक्याला भूलून व देखाव्याला दिपून जाअून अिंग्लंडमध्यें येणारे हिंदी तरुण हिंदुस्थानच्या असामर्थ्याबद्दल व अिंग्लंडच्या सामर्थ्याबद्दल भलतच ग्रह आजवर करून घेत आले आहेत. हे हिंदी तरुण परत आपल्या स्वदेशाला जातांना आपण अेखाद्या मोठ्या स्वर्गातून भूलोकाकडे अधःपतन करीत चाललों आहोंत असें समजत असत. अेखादा मनुष्य अिंग्लंडमधून जाअून आला की, त्याच्यांत सर्व दिव्य गुणांचा समावेश झाला असलाच पाहिजे, अशा भोळसर समजुतीनें अिंग्लंडमध्ये परकीय आचारविचारांनीं नखशिखान्त बाटलेल्या हिंदी तरुणांच्या वर्तनास फार मान देण्याची चटक गुलामगिरींत रुतलेल्या हिंदी लोकांस आजपर्यंत लागलेली होती. त्या योगानें तर या अर्ध्या हळकुंडात पिवळ्या होणाऱ्या परदेशी हिंदी तरुणास फारच चेकारल्यासारखें होत असे व अिंग्लंडच्या मोठेपणाविषयीं, त्याच्या सुधारणेविषयीं, त्याच्या अैश्वर्याविषयी, त्याच्या बलवत्त्वाविषयीं निरर्गल अतिशयोक्तीचीं वर्णनें करण्यांत व याहून दुःखाची गोष्ट की स्वकीयांच्या व स्वदेशाच्या दारिद्र्याविषयीं, अवनतीविषयीं व दुबलतेविषयीं अद्वातद्वा कारणपरंपरा लावून हिंदुस्थानाहून अिंग्लंड हें अनंतपटीनें व सर्वतोपरी श्रेष्ठ आहे असें भासविण्यांत या निमगोऱ्या साहेबास फार डौल वाटत असे. अिंग्लंडचा थोरपणा आपण गायला म्हणजे असल्या थोर अिंग्लंडला पाहिलेले आपणही फार थोर आहोंत अशी सामान्य जनाची समजूत होईल अशा स्वार्थबुद्धीनें या मूठभर बाटग्यांनीं आजपर्यंत आपल्या देशाचा तेजोभंग केला. अिंग्लंडला पाहून दिपलेले हिंदी तरुण असे अुपयोगी पडतील ही गोष्ट अिंग्लंडच्या फार दिवसापूर्वी लक्षांत आलेली आहे. अिंग्लंडनें हिंदु लोकांस परोपकारबुद्धीनें शिक्षण दिलें किंवा नाअिलाजानें व दुष्टबुद्धीनें दिलें हें आतां हिंदुस्थानातील तरुण पिढी तरी समजून चुकलेली आहे. पूर्वी या शिक्षणाबद्दल अगदीं प्रथम नुसती चर्चा सुरू झाली तेव्हां ईस्ट अिंडिया कंपनीनें अेक अत्यंत महत्वाचा खलिता अिंग्लंडमध्यें Lord Wilberforce ह्यांना धाडलेला होता. त्यांत कंपनी म्हणते ' We have lost America by our folly in allowing the establishment of schools and colleges. Let us not repeat this. Let the Hindus come to England if they want education.' ह्या अत्यंत अनुदार व कुटिल वाक्यांत गर्भितार्थ काय आहे ? जें शिक्षण हिंदुस्थानांत दिलें असतांना आपल्या अमलास अमेरिकेप्रमाणें विघातक होईल तें शिक्षण हिंदु लोकांस अिंग्लंडात आल्यावर मिळालें असतां अपायकारक होणार नाहीं या म्हणण्याचा अर्थ काय ?

ेक तर अिंग्लडमध्येच खरे शिक्षण द्यावे कारण फारसे हिंदी तरुण अिकडे येअू
ाकणार नाहीत असा अर्थ असेल परंतु हा अर्धा कच्चा अर्थ होय कारण
ंगाल्यातल्यासारखी अेखादी असोसिअेशन स्थापून हिंदुस्थानला हजारो विद्यार्थी
ारदेशी धाडणे अगदी सुलभ आहे हे वळण्याअितके शहाणपण वरील मुत्सद्द्यास
ात्रीने होते. परंतु त्याचा मनातील संपूर्ण हेतु असा आहे की, हिंदी तरुण अिंग्लंड-
मध्ये शिक्षण घेअू लागला म्हणजे त्या शिक्षणाने त्याचे मन आत्मनिष्ठ होण्याचे
त्यली अिंग्लडचा डामडौल पाहून ते दुर्बल व परदेशी मात्र होअील व त्याच
ारणास अुत्तम विद्वान्, अनुभवी म्हणून लेखणारी हिंदुस्थानची जनता त्याच्या
ातक व भ्रामक शब्दास यथार्थ समजून अिंग्लडच्या अिभ्रतीला वचवून राहत
ाअील अिंग्लडच्या या कौटिल्याची अुदाहरणे अितरत्रही शेकडा आढळतात लॉर्ड
डलहौसीच्या राज्यतृष्णेने हिंदुस्थानात भयंकर असंतोष माजला, व त्या वेळच्या
तेजस्वी पुरुषाना फिरंग्याच्या अमलाचा नायनाट करून टाकण्याची स्फूर्ति अुत्पन्न
झाली असे पाहताच अिंग्लडने होच तेजोवधाची युक्ति अमलात आणलेली होती
निजामचे दिवाण सर सालरजंग ह्याना अिंग्लडला आणले व ग्वाल्हेरचे दिवाण
दिनकरराव व महाराज जयाजीराव ह्याना ५७ चे थारमी फलकस्थारा पाहुण-
चारासाठी नेले ! या पाहुणचाराने व देखाव्याने हे तिन्ही मुत्सद्दी कसे भ्रष्ट झाले
व स्वदेशाशी निमकहरामपणा करुन परपक्षाला त्यानी कसे साह्य केले हे स्वत:
अिंग्रजी अितिहासकारच हसत हसत सांगतात व म्हणतात की अिंग्लडच्या वैभवाला
यानी पाहिले नसते तर हेही राष्ट्रविक्षोभात सामील झाले असते ! नुकतेच येथे
दक्षिण आफ्रिकेकडील काही निग्रो संस्थानिक आपल्या तक्रारी मांडण्यासाठी म्हणून
आले होते त्या संस्थानिकास राजा अेडवर्डच्या भेटीस नेण्यात आले तेथील वैभव,
कृत्रिम भव्यता दाखवून त्याना निम्मे ठार केल्यावर मग राजा अेडवर्डचा हस्त-
स्पर्शही करविला केला ह्या गर्दीत ते भोळे संस्थानिक अितके अुल्लू झाले की,
त्याच्या कामाची बिलकुल दाद लागली नसताही त्याना अिंग्लिशाच्या स्नेहाची व
थोरवीची अत्यंत धन्यता वाटली व त्यानी वर्तमानपत्राच्या बातमीदारास कळविले
की, *Now we are bigger—bigger indeed! We have shaken hands with the great white father !!* कर्णाच्या तेजोवधासाठी जशी शल्याची
योजना झालेली होती, तशीच हिंदुस्थानच्या तेजोभंगासाठी या निमगोऱ्या साहेबास
अिंग्लडने योजलेले होते व अिंग्लडच्या सामर्थ्याबद्दल किंवा सुधारणेबद्दल जर
आपल्या अिकडे विचित्र कल्पना प्रचलित असल्या तर या घातक परिणामाचे अुत्तर-
दायित्व अिंग्लडला जाअून आमच्याच पैशाने शिकून आलेल्या या हिंदी तरुणाच्या
भ्रष्ट व भ्रमिष्ट अतिशयोक्तीवरच आहे आपल्यात अेक म्हण आहे की, 'शेळ्यात
मुंडी गाय प्रधान,' त्याचप्रमाणे निरुपद्रवी राष्ट्राला लुबाडून घेणाऱ्या ह्या अिंग्लिश
राष्ट्राची स्थिति आहे हिंदुस्थानच्या पारतंत्र्याचे जर कोणते कारण असेल तर ते

स्वदेशाभिमानाचा गेल्या शतकाचे आरंभी असलेला अभाव हेच होय. परंतु हे कारण लपवून ठेवून गुलामगिरीच्या चरकात चिरडून गेलेल्या हतबल लोकास अिंग्लड असे सागत, शिकवीत व पटवीत आले आहे की, तुम्ही गुलामगिरीलाच पात्र आहात व आम्ही राज्य करण्यासाठीच अुत्पन्न झालेले आहोत. त्या अिंग्रजी तुणतुण्याची झोल ओढून अिंग्रजाच्या अन्नाने वाटलेल्या हिंदी तरुणानीही म्हणावे की, खरोखरीच अिंग्रज लोक फार शूर, धाडसी, दृढनिश्चयी, विद्वान्, शास्त्रकला-कोविद, अिंग्लडचे वायुमान काय, अिंग्लडची शोभा काय, अिंग्लडची भव्यता काय, अिंग्लडमध्ये सर्व अवर्णनीय आहे! अिंग्लडमधील लोक अुद्योगी व शूर निपजतात याचे कारण तेथील थड वायुमान व निसर्गरचना होय! असे हे लोक अजून बेधडक सागत नाहीत काय? अिंग्लडमधील लोक राक्षसासारखे धिप्पाड आहेत, हे विधान हजारो वेळा केले जात नाही काय? अिंग्लडमध्ये अन्याय व अनीति मुळीच नाही व अिंग्रज व्यापारी फार प्रामाणिक असतात, हे म्हणणाऱ्या वेड्सट-बाया व बाया-बापड्या काय थोड्या आहेत? अिंग्लड शास्त्रविद्येत विलक्षण प्रगमन झालेले आहे ही समजूत आपल्या तिकडे काय थोड्याची आहे व विशेषतः अत्यत खेदकारक गोष्ट ही की, हिंदुस्थानचा धर्म, हिंदुस्थानची निसर्गरचना, सबलता, सामर्थ्य, नीति, बुद्धिमत्ता, शौर्य ही सर्व अिंग्लडच्यापेक्षा फार फार कमी आहेत, ही आत्मघातकी, असत्य व कुलकलकदायिनी समजूत विशेषतः सुशिक्षित वर्गात आजपर्यंत किती रूढ होअून बसलेली आहे? अशा स्थितीत अखेर हिंदी तरुणाचे डोळे अुघडलेले पाहून हे हिंदुस्थानच्या अभ्युन्नतीचे अत्यत महत्त्वाचे चिन्ह आहे असे कोण म्हणणार नाही?

ह्या आत्मनिष्ठ जागृतीची प्रत्यतरे येथे दरक्षणी घडत आहेत हिंदुस्थाना-सारखा भाग्यवान्, निसर्गसुदर व रमणीय देश व हिंदु लोकासारखे वेदप्राचीन, नीतिसपन्न, प्रेमळ व वीररसभाजन आर्य लोक, अशी जोडी लाभणे हे महद्भाग्याचे फल आहे असे आता हिंदी तरुणास कळू लागले आहे हिंदुस्थानचे धर्म, रीति-भाति, हिंदुस्थानच्या समाजवृत्ति, हिंदुस्थानचे अितिहास व हिंदुस्थानची आज-पर्यंतची कर्तृत्वशक्ति ही अितर अुन्या व हगामी राष्ट्राच्यापेक्षा शतपटीने स्पृहणीय व वदनीय आणि माननीय आहे व तिला मूर्ख व अधळ्या सुधारकाच्या अुतावळे-पणाने लाथाडीत सुटण्यासारखे भयकर पाप केवळ रौरवदायक आहे असे आता तरुण अत करणास कळत आहे स्वदेशाभिमानाची ज्योत जी मालवली गेली होती ती अेकदा का पेटली की त्या प्रकाशाने आजपर्यंत आपणास थडसळून पाडण्या-साठीच ज्या वस्तु अुत्पन्न झाल्या आहेत असे स्वकीय परकीय आपल्यास सागत आले त्याच गोष्टीचे मनोरमत्व व पुण्यपावनत्व पाहून जग तोंडात बोट घालील हे तरुण पिढीस कळू लागले आहे व अिंग्लडमध्ये येणे म्हणजे स्वदेशाशी कृतघ्न-पणा व अिंग्लडच्या साम्राज्याशी राजनिष्ठा धरणे नव्हे, हेही त्याना हळूहळू समजून येत आहे. याची अेक दोन अुदाहरणे मासल्यासाठी देतो.

पंजाबी पत्राच्या संपादकास झालेली क्रूर व राक्षसी शिक्षा अैकताच तरुणाच्या रोषास पारावार नाहीसा झाला. त्यांना आपल्या हतबलत्वाची लाज वाटू लागली व मनगटाच्या ढिलेपणाने आलेले हतबलत्व मनगटे जोरदार केल्यास अजूनही निघून जाअील ही त्याची खात्री पटू लागली जोपर्यंत कायदे करणे व त्या कायद्याच्या अंमलबजावणीसाठी तरवार लटकत ठेवणे हे फिरंग्याच्या स्वाधीन आहे, तोपर्यंत नेमस्तपणा काय किंवा Passive Resistance चा अप्रत्यक्ष किंवा रडका प्रतिकार काय मारखेच विफल होत असे अुद्गार बहुतेकाच्या तोंडून निघू लागले आहेत व खरा मार्ग, यशदायी मार्ग अितिहाससूचित मार्ग कसा स्वीकारावा, याचा हिंदी अंतःकरणात अूहापोह होत आहे मध्यंतरी येथून पंजाबीला सहानुभूति व आनंदप्रदर्शक तारा पाठविण्यात आल्या आनंद अशासाठी की आपल्यावर अमले अुघड जुलूम करण्याची बुद्धि अखेर मानभावी सत्तेस होअू लागली अिंडिया हाअूस, केंब्रिज व सायरेन्सेस्टर येथून तारा गेल्या होत्या नंतर पंजाबीसाठी अेक फंडही काढण्यात आला. या फंडाचे नाव 'पेनीफंड' आहे या फंडाला यथील मूठभर हिंदी तरुण किती अुत्कटतेने साह्य करीत आहेत हे कळण्यासाठी अेक अुदाहरण देतो. सायरेन्सेस्टरच्या शेतकी कॉलेजात देशबंधु हरनामसिंग बी अे. (शीख) अित्यादि पाचच हिंदी आहेत परंतु त्यांनी तत्काल ८० रुपये पाठवून दिले आहेत ! व विशेष महत्वाचे हे की, या सहानुभूतीच्या तारा किंवा फंड यांच्यापेक्षा आता वेळ न दवडता काही तरी शेवटचा सोक्षमोक्ष केला पाहिजे अशी सर्वांस अुत्कंठा लागली आहे.

आपल्या महाराष्ट्रात देशभक्त अंताजी दामोदर काळे याच्या अविश्रांत, असहाय्य व अविरत श्रमाने अुत्पन्न झालेला व त्याच्याच नेटाने चिरस्थायी झालेला पैसाफंड हा आता लंडनमध्येही गाजत आहे दे अंताजी दामोदर काळे याचे अत्यंत वर्णनीय चरित्र व अेका व्यक्तीने खरा खरा स्वार्थत्याग करून दृढश्रद्धेने अेखादे राष्ट्रकार्य हाती धरले असता त्यात अेका व्यक्तीलाही किती कार्य करता येतें याचा वृत्तान्त अैकून सर्वांना—रजपुताना, सिखाना, बंगाली लोकाना, मद्रासी लोकाना, सर्वांना फार धन्यता वाटते 'पैसाफंडाचे' अुत्पादक याच अर्थपूर्ण व महनीय पदवीने दे काळे याचा नामोच्चार येथे होत आहे व या पदवीची किंमत अितर अुमऱ्या व व्यापारी पदव्याहून अनंतपटीने जास्त आहे अशी येथे सर्वांची खात्री आहे पैसाफंडासाठी जवळ जवळ ५० रुपये आधीच जमलेले आहेत व कोणातरी खात्रीचे येणाराबरोबर ते हिंदुस्थानात रवाना होतील आणखी अेक अुपदेशपर व अुत्साहक गोष्ट घडून आली अमेरिकेहून देशबंधु देव (बंगाली) हे कृषिकर्मशास्त्रात अेम् अेससी ची पदवी घेअून येथे आले. हे बंगालच्या राष्ट्रीय असोसिअेशनचे द्वारा गेले होते गेल्या आठवड्यात हिंदुस्थानात जावयाचे पूर्वी ते लंडनमध्ये फेटा मिळेल की नाही याची चौकशी करीत होते ! 'आपण हिंदुस्थानात

गेल्यावर फेटा का घेत नाही ? ' असे विचारता ते म्हणाले ' कलकत्त्यास अुतरताच डोक्यावर जर टोपी पाहिली तर रस्त्यात राष्ट्रपक्षीय मुले हुर्यो करतात व शिवाय आपण आपल्या देशात परत जाताना स्वदेशीच पोपाख घालणे जास्त भूपणास्पद आहे ! ' ह्या अेका लहान गोष्टीत किती अर्थ भरलेला आहे ! पचवीस वर्षापूर्वी अिग्लंडहून आलेले भ्रष्ट लोक स्वकीय वस्तूचा तिरस्कार करीत व बाटेपणातच महती मानीत. हिंदुस्थानच्या बाजारात विलायती छपरी टोपींचा शोध करीत असत. आज स्वदेशी पोरे हुर्यो करतील या भीतीने व स्वकीयत्वाच्या यथार्थाभिमानाने अुद्दीपित होअून पदवीधर लोक लंडनच्या बाजारात हिंदी जरतारी फेट्याचा शोध करीत आहेत !

—दि १२ अेप्रिल १९०७

\+ \+ \+

## १९. सावधान !

काळ जातो क्षणक्षण । मूळ येथील मरण
काही धावाधाव करीं । जव तो मृत्यु आहे दुरी

लंडन — कवीचे हे वरील उद्‌गार हिंदुस्थानच्या सद्यस्थितीला किती बरोबर लागू पडत आहेत ! ज्या रोगाने हिंदभूची तनु क्षीण होत चाललेली आहे त्या पारतंत्र्याचा दिवसेदिवस वळावत जाणारा जोर पाहून कोणाच्या जिवास हळहळ वाटणार नाही व कोण असे म्हणणार नाही की ' काही धावाधाव करी । जव तो मृत्यु आहे दुरी '। मृत्यूचे दरबारात काय बेत चाललेले आहेत ते, हिंदसुंदरी, तुला माहीत आहेत काय ? तुझ्या गळ्यात पडणारे त्याचे पाश कसे हळूहळू परंतु झपाट्याने करकचले जात आहेत याची, हिंदसुंदरी, तुला कल्पना तरी आहे काय ? क्षण क्षण काळ चालला आहे. त्या प्रत्येक क्षणाबरोबर तुझे क्षीण क्षीण होत जाणारे शरीर अनिवार्य व क्रूर अशा यमसदनाकडे फरफर ओढून नेले जात आहे, हे तुझ्या नि सत्त्व गात्राना सवेदित होत आहे काय ? मृत्यु दूर होता तेव्हाच वास्तविक धावाधाव करावयास पाहिजे होती ! पण आता मृत्यु अगदी नजीक आला आहे. अजून तरी ह्या पवित्र भारताचे प्राण वाचविण्यासाठी कोणी धावाधाव करील काय ? कोणी धावत येअून हिचे रक्षण करील काय ?

कारण आता अवधि अगदी अुरलेला नाही हिंदुस्थानला नामशेष करण्याचे दुहेरी प्रयत्न कसे चालले आहेत हे जो किंचित् तरी लक्ष देअून पाहील त्याच्या तेव्हाच ध्यानात येअील आता अवधि अगदी अुरलेला नाही ! सुमारे पन्नास वर्षांपूर्वी हिंदुस्थानचे शरीरात व हिंदभूचे कुसव्यात अितके सत्त्व होते की तीत तात्या टोपे, कुमारसिंह व नानासाहेब निपजत असत, रणजितसिंह नवीन साम्राज्ये रचीत असत व वीर लोक चिलियनवालाच्या व कानपूरच्या लढाया लढत असत परंतु अेका ह्या पनास वर्षांत ते सत्त्व क्षीण होत होत हल्लीच्या स्मशानशांततेपर्यंत आलेले आहे म्हणजे ५० वर्षांपूर्वी पारतन्त्र्यरोगाचा आपले शरीरात झालेला प्रादुर्भाव हाणून पाडण्याची जी शक्ति हिंदभूमध्ये होती ती आज नाममात्रही अुरलेली नाही व जी आज अुरलेली आहे ती अुद्या अुरलेली नसणार ! भयानक पारतन्त्र्यरोगाचा प्रादुर्भाव २० वर्षांपूर्वी होता त्याहून आज कितीतरी वाढला आहे व दिवसेंदिवस झपाट्याने वाढत जात आहे ! हिंदुस्थानच्या अंगातील शक्ति कमी होत चाललेली व पारतन्त्र्यरोग बळावत चाललेला ! अशी दुहेरी वाणी आलेली आहे ! अशा दुहेरी जबड्यात मृत्यु हिंदभूला भरडू पाहत आहे !

हा मृत्युचा जबडा हिंदुस्थानच्या अगदी कंठनालाशी कसा भिडलेला आहे हे कोणास पाहावयाचे आहे काय ? व त्या जबड्यात असलेल्या विषमय दातात आणखी नवीन विषमय दाताची भरती कशी होत आहे हे पाहावयाचे आहे काय ? असेल तर हल्ली अिंग्लंड व युरोपखंडात चाललेले प्रयत्न लक्षपूर्वक पहा ! वर्तमानपत्रात प्रसिद्ध झालेल्या भपकेदार वृत्तान्ताने फसू नका तर त्या वृत्तान्तात प्रसिद्ध न झालेल्या हतूकडे लक्ष द्या गेल्या आठवड्यात सर्व अिंग्लंडभर अिंग्रजी साम्राज्यातील सर्व स्वतंत्र वसाहतींचे जंगी संमेलन भरविण्याची गर्दी अुडून गेली होती ह्या वसाहतीमध्ये अिंग्लंडच्या अधिपतित्वाचा द्वेष बऱ्याच लोकात अुत्पन्न होअू लागला आहे व जर साम्राज्य ठेवावयाचेच असेल तर आम्हास व तुम्हास सारखेच हक्क असले पाहिजेत असे चोहोकडून प्रतिपादन होअू लागले आहे ह्या कॉलनीच्या द्वेषाचा वेळीच अुपशम व्हावा व त्यास साम्राज्याने ममत्व वाटू लागावे म्हणून हे संमेलन भरविण्यात येत आहे हे दृश्य व तात्पुरते कारण आहे परंतु याचे मूळ कारण फारच भिन्न आहे आयर्लंड, अिजिप्त व हिंदुस्थान ह्या देशामध्ये ह्या अिंग्रजी व फिरंगी साम्राज्याची बेडी आपल्या पायात न ठेवण्याची अिच्छा बळावत चाललेली पाहून ह्या आधीच निर्बल करून टाकलेल्या राष्ट्राची ही स्वातंत्र्यगामी अिच्छा वेळ पडल्यास ठिकाणच्या ठिकाणी दाबून टाकण्याची शक्ति असावी, अेतदर्थ हे सर्व ढंग चाललेले आहेत वेळ पडल्यास अिंग्लंडला वसाहतींचे पूर्ण लष्करी साह्य व्हावे म्हणून अेव्हापासून हे संघ तयार करण्यात येत आहेत या वसाहतींपैकी थोरली वसाहत कॅनडा ही होय हिची लोकसंख्या ५७,६६,६०६ आहे व हिचे हल्लीचे मुख्यप्रधान सर विल्फर्ड लारियर हे आहेत न्यूफाअूंडलंडची

लोकसंख्या २,१७,०३७ आहे व तिचे मुख्यप्रधान सर रावर्ड वार्ड हे आहेत. ऑस्ट्रेलियाची लोकसंख्या ५०,००,००० आहे व तिचे हल्लीचे मुख्यप्रधान आलफ्रेड डीकन आहेत. न्यूझीलंडची लोकसंख्या ८,८८,५७८ असून तिचे मुख्यप्रधान सर जोसेफ वार्ड हे आहेत. केपकॉलनीची लोकसंख्या जवळ जवळ २४ लक्ष असून त्यापैकी दहा लक्ष गोरे लोक आहेत. तिचे मुख्यप्रधान जेमसन हे आहेत. नाताळची लोकसंख्या जवळजवळ २१ लक्ष असून त्यापैकी १ लक्ष गोरे लोक आहेत व तिचे मुख्यप्रधान मूर हे आहेत व अगदी नवीन घातलेली स्वतंत्र वसाहत ट्रान्सवाल हिची लोकसंख्या १२ लक्ष असून त्यापैकी ३ लक्ष गोरे लोक आहेत व तिचे मुख्यप्रधान जनरल बोथा हे आहेत. अशा या सात वसाहतींचे मुख्यप्रधान हल्ली लंडनला आलेले आहेत व त्या सर्वांचे संमेलन भरवून त्यात साम्राज्याचे संरक्षणाची चर्चा चाललेली आहे. त्या सर्वांत विशेषत जनरल बोथा यांजकडे सर्वांचे लक्ष वेधलेले होते. यात काही नवल नाही. ह्या कॉन्फरन्सचे दुसरे दिवशी लंडन शहरात या ब्रिटिश साम्राज्यातील वसाहतींच्या मुख्यप्रधानांची जंगी मिरवणूक निघाली होती. सर्व रस्त्यातून कागदाची सुंदर फुले पसरून त्याच्या लांब माळा अेकसहा बांधलेल्या होत्या. त्या माळांच्या मध्यभागी अिंग्रजी राष्ट्राची निशाणे टांगलेली होती. विशेषत सेंटपालच्या भव्य व प्राचीन चर्चपुढील देखावा फारच मनोरम केलेला होता. अेक अतिशय मोठे निशाण मध्यभागी फडकत होते व बाजूला निरनिराळ्या वसाहतींची निरनिराळी लहान लहान निशाणे लावलेली होती. चोहोबाजूंनी त्या रस्त्याला अेखाद्या अत्यंत सुंदर लग्नमंडपाप्रमाणे शृंगार चढविलेला होता. सर्व रस्त्यावरील भागात लाखो लोक दाटीने अत्यंत टापटिपीने अुभे होते. स्वतंत्र राष्ट्रात आपले भाग्यशाली स्वतंत्र राष्ट्रीय निशाण विजयानंदात फडकत असता ज्या मनोवृत्ति जागृत होत असतात त्या त्यांच्या अंतःकरणात व चेहऱ्यावर नाचत असलेल्या दिसत होत्या. सेंटपालमधून तेथील भिन्न भिन्न घंटांचा घणघणाट सुरू झालेला होता व त्या नादातील स्वागतरवाने तो प्रचंड जनसमूह डुलू लागला होता. अितक्यात सुंदर व अुघड्या वाहनात बसलेले प्रधान येण्यास सुरवात झाली. त्यातील पहिला मान जनरल बोथास मिळालेला होता. त्याची बगी पहिल्याने येताच बोथाचा जयजयकार सर्व दिशांतून अुठला व टोप्याला व हातातील छत्र्याला व रुमालाला अुडवीत ' यावे महाराज ! ' ' बोथाचे स्वागत असो ! ' असे आनंद-ध्वनि अेकसारखे अुठत होते. नंतर ही मिरवणूक गिल्डहॉलमध्ये गेली व तेथे ह्या मुख्यप्रधानास ' फ्रीडम ऑफ दि सिटी ऑफ लंडन 'चा सन्मान देण्यात आला. त्या लंडनच्या फ्रीडमचा मान घेते वेळेस ' मी अिंग्रजी राज्याबद्दल नेहमी राजनिष्ठ राहीन ' अशी शपथ घेण्याची पद्धत आहे व त्याप्रमाणे या सर्व प्रधानास ही शपथ घेणे भाग पडले. अशा युक्तीने बोथाकडून राजनिष्ठेची शपथ घेवविली गेली ! या सर्व मिरवणुकीचा परिणाम काय झाला ? तर लंडन हे नुसत्या अिंग्लंडच्या

नव्हे तर सर्व वसाहतीच्या स्वतन्त्र सैन्यास आपले रक्षणार्थ अेकत्र करण्याची अुत्कंठा धरीत आहे हे सिद्ध झाले ह्री मिरवणूक सपल्यावर कान्फरन्सपुढे जे विषय मुख्यत्वेकरून आलेले आहेत त्यात तुझे नाव घेतलेले नाही, तरी हिंदुस्थाना, तू तिकडे नीट लक्ष दे अगदी महत्त्वाचा व सर्वांना जवळजवळ पूर्ण संमत झालेला विषय म्हणजे 'साम्राज्याचे संरक्षण' हा होय म्हणून हेन्री कँबेल बॅनरमन ह्या अिंग्लंडच्या मुख्य प्रधानाने सांगितले आहे ! अिंग्लंडचे आरमार जे आहे ते क्वचित् हिंदुस्थान राखण्यास समर्थ होणार नाही, म्हणून कॉलनी व अिंग्लंड मिळून अेक संघटित व समाओक आरमार तयार करावे हा अिंग्रजांनी घाट घातलेला आहे व हा खर्च व बोजा सांभाळण्यास कॉलनीनी तयार व्हावे म्हणून अेक पार्लमेंट सभा स्थापण्याची व व्यापारविषयक विशेष सवलती देवविण्याची कॉलनीज्‌ला लालूच लावलेली आहे ! हिंदुस्थान व अिजिप्त हे कॉलनींना व अिंग्लंडला चरण्याचे कुरण आहे हे समाओव कायम ठेवणे हे सामान्य अुद्दिष्ट असल्याने साम्राज्यसंरक्षक आरमार अुत्पन्न करावे व साम्राज्यातून कोणीही सुटण्याचा किंवा कोणास सोडविण्याचा प्रयत्न केल्यास त्यास सघवलाने तुडवून टाकावे असा हा कावा आहे आजपर्यंत अेकटे अिंग्लंडच गुलामाच्या अुरावरील दडपण असे पण आता या सात मुलीदेखील आपल्या आअीला साह्य करण्यास येणार, हा या कान्फरन्सचा सरळ अर्थ आहे

परंतु अिंग्लंडची अेवच हालचाल हल्ली चाललेली आहे असे नाही पार्लमेंटमध्ये हाल्डेनने अेक सैन्य सुधारणेचे बिल आणलेले आहे त्यात लष्करी खर्च जास्त झाला तरी बेहेतर, परंतु अिंग्लंडचे सैन्य अत्यंत तयार जालीम ठेवण्याची खटपट चालविली आहे ज्याची साम्राज्ये अन्यायाच्या व गुलामगिरीच्या पायावर अुभी राहिलेली आहेत त्यांना आपल्या प्राणधारणाचा अेकच अुपाय अुरतो व तो म्हणजे राक्षसी बल संपादणे हा होय

तिसरी महत्त्वाची हालचाल म्हणजे अेडवर्ड राजाचा हल्ली सुरु असलेला प्रवास ही होय, अिंग्लंडचे साम्राज्य अितके अवाढव्य वाढलेले आहे की आता जगात सर्वत्र शांतता असल्याशिवाय त्याची धडगत नाही अेखाद्याची प्रकृति अति नाजूक झाली म्हणजे त्याला दुसरीकडे दंगा चाललेला असला तर बिलकुल सहन होत नसतो म्हणून येत्या हेग परिषदेत आता यापुढे कोणीही आपले आरमार वाढवू नये असा ठराव आणण्याची अिंग्लंड खटपट करीत आहे आता स्वत चे आरमार अितराचे तिप्पट झाल्यावर आता यापुढे कोणीही आपले आरमार वाढवू नये हे म्हणणे स्वार्थाचे व दुष्टबुद्धीचे असल्यामुळे जर्मनी, आस्ट्रिया अित्यादि राष्ट्रे यास विरुद्ध आहेत व म्हणून प्रत्यक्ष भेटीने त्यांची मने वळविण्यासाठी अिंग्लंडचे राजे फिरतीवर निघालेले आहेत. स्पेनला तर आधीच वळविलेले असून आता अिटलीच्या राजाशी भेट होत आहे !

हे वरील तीन प्रयत्न अितरांनी कोठेंही गडबड करूं नये, आपलें सैन्य जय्यत तयार असावें व अितक्यावरही प्रसंग पडल्यास वसाहतींच्या खर्चाची व सैन्याची मदत घेअून आपली गुलामगिरीची बेडी आपल्या भव्याचे पायात जखडता यावी— या तीन प्रयत्नांचा काय हेतु आहे व विशेषतः याचा परिणाम काय होणार आहे, हें हे हिंदुस्थाना ! तू लक्षपूर्वक पहा ! तू दिवसेंदिवस क्षीणसत्त्व होत चाललेला व तुझा रोग क्षणोक्षणी जोराने बळावत चाललेला आहे. हे हिंदुस्थाना, तू लक्षपूर्वक पहा ! तुझे जे पुत्र तू हलके हलके बरा होशील म्हणतात, ते तुझी ही अत्यंतावस्था पाहत नाहीत. मी बहुतेकांचे असे अुद्‌गार अैकतो की, स्वतंत्रता ही हलके हलके सुमारे शंभर वर्षांनी मिळेल ! शंभर वर्षें ? शंभर वर्षें हिंदुस्थान या दुखण्यात खिचपत पडेल व मग हें दुखणें जाअील ? या भविष्यवादाला किंवा या भविष्याच्या अभावाला धिक्कार असो. शंभर वर्षेंच काय, पण आता २५ वर्षें जर हिंदुस्थान असेंच परतंत्र राहिले तर पुन्हा ही हिंदभू हाती लागणार नाही !

म्हणून आता कांही तरी शेवटचा प्रयत्न करू लागा. काही तरी सौख्य किंवा मोक्ष जर होणार असेल तर तो आताच होय, जो दिवस अुजाडतो तो तुमच्या जयाचा संभव कमी करीत आहे ! अजून वेळ आहे म्हणून म्हणतो की, ' काही धाबाधाव करा ! ' तुमचा पक्ष सत्य आहे व कितीही सत्य तुमच्या विरुद्ध झाले तरी देवांचे संघ तुमच्याकडे आहेत. तुम्हीही समदुःख्याचे—अिजिप्त, आयर्लंडचे संघ करा. पण हें सर्व आताच झालें तर होअील ! क्षणानंतर हिंदभू हातची गेली असें समजा ! म्हणून पुनः म्हणतो ' अति समयो वर्तते ! सावधान !! '

—ता. १७ मे १९०७

✦ ✦ ✦

## २०. अप्रत्यक्ष प्रतिकाराचा जय व पराजय

लंडन : फ्रान्स देशामध्ये राजकारणशास्त्रातील सर्व प्रश्नांना काही विलक्षण बहर येतो यात शंका नाही. राजा हा विष्णूचा अंश आहे हें दोषत्वपोषक थोतांड फ्रान्समध्येच फोफावलें होतें. पण त्या थोतांडाचा नायनाट करण्यासही फ्रान्समध्येच लोक प्रथम पुढे आले. अठराव्या शतकात रुसो व व्हाल्टेअर या सत्ववेत्यांचा फ्रान्समध्येच अुदय झाला. ' The Declaration of the Rights of Man ' या अभूतपूर्व लेखाचा प्रादुर्भाव फ्रान्समध्ये झाला. ज्या तत्त्वाने सर्व

जगात नवीन युगाला आरंभ केला, अन्यायमूलक व जुलमी राजसत्तेच्या भूगोलावर ज्याने घाव घातला व ज्याचा दिग्विजय होण्यासाठी सर्व चराचर अुत्सुक झालेले आहेत ते लोकसत्तेचे तत्त्व प्रथम फ्रान्समध्येच भरभराटीस आले. १७८९ पासून १८४८ पर्यंत फ्रान्समध्ये अितक्या निरनिराळ्या प्रकारच्या राज्यरचना झाल्या आहेत की, सर्व जगाला भिन्नभिन्न राज्यरचनेचे गुणधर्म शिकविण्यासाठी फ्रान्स ही सृष्टिकर्त्याने अेक मोठी प्रयोगशाळाच अुघडलेली आहे की काय असा भास होअू लागतो अप्रतिहत राजसत्ता, नियमित राजसत्ता, अराजकता, लोकनियुक्त राजसत्ता, लोकप्रतिनिधित्व, संयुक्त लोकसत्ता, अशा परंपरेने शक्य तेवढ्या निरनिराळ्या राज्यरचना योजीत योजीत हल्ली फ्रान्सने लोकसत्ता पसंत केलेली आहे फ्रान्समध्ये गेल्या दोनशे वर्षांत ह्या राज्यरचना अितक्या वेळा बदलल्या गेल्या आहेत की सरासरीने दर दहा वर्षांनी फ्रान्समध्ये अेक नवीन व घनघोर राज्यक्रांति होत होती; सुमारे पन्नास वर्षे जर कोणची राज्यरचना फ्रान्समध्ये अेकसारखी टिकली असेल तर ती हल्लीची लोकसत्ताच होय. अितक्या राजक्रांत्या झालेल्या असल्यामुळे राज्यक्रांतीच्या बहुतेक साधनांचा अुपयोग फ्रान्सने केलेला आहे. त्यातही फ्रेंच लोकांची मनें निसर्गतःच अत्यंत सूक्ष्मचेतन व प्रतिकारमय असल्याने त्यांच्या देशातील कोणत्याही चळवळीत अेकप्रकारचे अद्भुतत्व व मनोरमत्व दिसून येते. त्यांच्या अितिहासात क्रांतीच्या सर्व आयुधांचे विशिष्ट गुणधर्म अितक्या स्पष्ट रीतीने दृग्गोचर झालेले आहेत व ते प्रयोग अितक्या कवित्वयुक्त भाषेत लोकक्रुतींनी कालाचे पुस्तकात लिहिलेले आहेत की, राजकारणशास्त्राचा सप्रयोग सुलभ व मनोरंजक ग्रंथ फ्रान्सचे अितिहासाशिवाय अितरत्र आढळणे बरेच दुर्मिळ आहे.

अशा या प्रयोगशाळेत राज्यक्रांतीचे नवीन साधन म्हणून सर्वत्र विकले जाणारे Passive Resistance चे, अप्रत्यक्ष प्रतिकाराचे जे तत्त्व त्याचे रासायनिक पृथक्करण करणे सांप्रत अत्यंत अिष्ट आहे अप्रत्यक्ष प्रतिकार हा बहुतेक देशाच्या कायदेशीरपणाच्या कक्षेत आलेला असतो, म्हणजे अप्रत्यक्ष प्रतिकार करणे हा राजद्रोह होत नाही. ज्या सरकाराविरुद्ध आपणास जाणे असेल, त्या सरकारच्या हाताखाली नोकरी न करणे, अितरांनी नोकरी न करावी असा अुपदेश करणे, त्या सरकारच्या शाळांशी, संस्थांशी व न्यायसदनांशी कोणत्याही प्रकारचा संबंध न ठेवणे, त्या सरकारला पैशाचे साह्य होअू नये म्हणून त्याला कर्ज न देणे, त्याच्या

संप त्या यंत्रावरील मजुरांकडून करविणे हाच अप्रत्यक्ष प्रतिकार होय. मुंबईच्या अेखाद्या गिरणीचा धनी आपले म्हणणे अैकत नसला म्हणजे त्याला तसे करणे भाग पाडण्याकरिता त्याचे गिरणीत कोणी कामच करू नये म्हणून जसा मजूर लोकांचा संप होतो, तसाच सर्व लोकांचा संप करून सरकारचे राज्ययंत्र बंद पाडण्याचा जो प्रयत्न तो अप्रत्यक्ष प्रतिकार होय. अशा या अप्रत्यक्ष प्रतिकाराचा आश्रय धरून वाटेल त्या सरकारास ताळ्यावर आणता येअील अशी हल्ली बऱ्याच लोकांची कित्येक देशामध्ये प्रवृत्ति होत चाललेली आहे. त्यांचे असे म्हणणे असते की जर आम्ही सर्वांनी सरकारची नोकरी सोडून दिली तर कर वसूल कोण करणार? पोलिस कोण होणार? आणि सरकारला शिपाअी कोठून मिळणार? अशा अवस्थेत सापडलेले सरकार अेका दिवसात अेक नामशेष तरी झाले पाहिजे किंवा अेक शरण तरी आले पाहिजे. शस्त्र हाती न घेता, रक्ताचा अेक थेंबही न सांडता, फार काय परंतु राजद्रोहाची जोखीम अंगावर न घेता राज्यक्रांतीसारखे प्रचंड कृत्य करण्याचे अप्रत्यक्ष प्रतिकार हे अेक अभूतपूर्व साधन आपण शोधून काढले आहे, असा ह्या विसाव्या शतकाला यथार्थ गर्व वाटत असे. तथापि या नवीन साधनाचा अुपयोग मात्र आजपर्यंत अगदी बेमालूम रितीने कोणीही केलेला नसल्याने राज्यक्रांति करण्यास हे साधन किती उपयोगी पडेल याचा व्यावहारिक निकाल अजून लागलेला नव्हता.

परंतु अितर सर्व साधनांप्रमाणेच राज्यक्रांतीच्या या नवीन साधनाचाही प्रयोग फ्रान्समध्ये गेल्या पंधरवड्यात करण्यात आला. फ्रान्सच्या दक्षिणेकडच्या सर्व प्रांतांत दारूचे मळेवाल्यांचा व फ्रान्सचे सरकारचा करांचे बाबतीवरून तंटा पडला. आपले म्हणणे त्या हजारो शेतकरी लोकांनी सरकारचे कानांवर ढोलेजंग सभा भरवून व अर्ज करून घातले. परंतु या अर्जाप्रमाणे वागण्याचे सामर्थ्य नसल्याने वा अिच्छा नसल्याने फ्रेंच सरकारकडून त्यांचा समाधानकारक निकाल लागला नाही. दक्षिणेकडच्या फ्रेंच लोकांचा अुद्देश जरी राज्यक्रांति करण्याचा नव्हता, तथापि सरकारास आपले म्हणणे अैकण्यास भाग पाडण्यासाठी निर्वाणीचे शस्त्र अुपसावे असा त्यांनी निश्चय केला व या कामी कोणत्याही जुन्या साधनाची योजना न करता त्यांनी नवीन प्रचलित होअू पाहणाऱ्या अप्रत्यक्ष प्रतिकाराचा अवलंब केला. कोणतीही गोष्ट सर्वशक्तीने कशी करावी ह्याचे फ्रेंच लोकास बाळकडूच मिळालेले असल्यामुळे व त्यांच्या प्रतिभामय व अुत्साही स्वभावामुळे गेल्या आठवड्यात अभूतपूर्व, मनोहर व अत्यंत बोधप्रद अशा रीतीने अप्रत्यक्ष प्रतिकाराचा प्रयोग फ्रान्सचे रंगभूमीवर करून दाखविण्यात आला. त्या प्रयोगात अणुरेणूअितकी काटकसर किंवा हयगय झालेली नव्हती. नारबोने ह्या शहरी प्रथमतः मुख्य पुढाऱ्यांची गाठ घेण्यास दक्षिण प्रांताचे लोक येअू लागले. हजारो लोकांच्या हजारो मिरवणुकी निरनिराळ्या शहरांपासून निघून नारबोनेकडे वळल्या. त्या

त्री नारवोने शहरात अितका अफाट समाज जमला होता की त्याना निजावयास हरात जागा मिळेना. चर्चेस व सार्वजनिक स्थलें सर्व अुघडी केलीं तरी लाखो तकरी बाहेर राहिले व मग रस्त्यांतून लोकानी निजण्यास आरंभ केला. रस्त्याना णू काय माणसाचीच फरसबंदी केलेली आहे अितकी दाट माणसे, स्त्रिया, पुरुष ले सर्व शहराच्या रस्त्यांत निजली, तरी समाज अजून अुरलेलाच होता. म्हणून हराच्या नजीकच्या शिवारात लोक शिरले; पहाट होताच तिथिनिश्चयाची भा भरली व जमलेल्या कमेटीने कोणच्या तिथीला सर्व दक्षिण प्रांतात अप्रत्यक्ष तिकाराला अेकदम आरंभ करावयाचा हें सर्वत्रास कळविलें. या वेळेस कोठेंही कायदेशीर वर्तन घडलें नाही. अखेर संकेतसमय आला व अप्रत्यक्ष प्रतिकाराला ारंभ झाला. परंतु तो अितर देशात जसा झाला असता तसा नव्हे. फ्रान्समध्ये र्व चळवळीना चालन जसें कवित्वपूर्ण व अद्‌भुततेने देण्यात येतें तसेंच येथेही झले. ठरलेल्या वेळेला नारोवोने येथील चर्चेसमधील घंटा वाजू लागल्या व लगेच क्षिणेतल्या शेकडो शहरी व खेडेगावी अप्रत्यक्ष प्रतिकार सुरू झाला ! हजारो ारकुनानी नोकऱ्या सोडल्या, मुलानी शाळा सोडल्या, शहरातील म्युनिसिपालिट्या ोकळ्या झाल्या, सर्व दक्षिणेतील शहरांच्या मुख्य मेयरांनी त्या ठरलेल्या तासाला ाजिनाम्याच्या तारा पॅरिसला धाडल्या व खुद्द पॅरिसच्या लोकसभेतील दक्षिणे- डचे सभासद सभा सोडून चालते झाले! सरकारी बिल्ले व पट्टे व अधिकारदंड ़जारांनी व लाखानी झुगारून देण्यात आले व अशा रीतीने अेका तासात फ्रान्सच्या 'क्षिणेकडील विस्तीर्ण प्रांतात राज्यरचना नामशेष झाली ! पोलिस अुरले नाहीत, ैन्याने गोळ्या घालण्याचें नाकारलें ! ह्याहून अप्रत्यक्ष प्रतिकाराची अशी चागली चना करणें हे अगदी अशक्य आहे, राजकारणशास्त्रातील अितर गोष्टीप्रमाणेच प्रत्यक्ष प्रतिकार कित्ती पूर्ण रीतीने व कशा कौशल्याने करावा हे सर्व जगास ान्सनेच शिकविलें ! अप्रत्यक्ष प्रतिकाराचा हा पूर्ण विजय होय !

परतु फ्रान्समध्ये अप्रत्यक्ष प्रतिकार काय करू शकतो हें जसे त्या लोकांनी प्रयोग सिद्ध करुन दाखविले त्याचप्रमाणे तो काय करू शकत नाही हेंही गेल्या ाठवड्यात तेथेच सिद्ध झाले. मानवी मनाच्या हल्लीच्या स्थितीत अप्रत्यक्ष तिकाराने सर्व निकाल लागणें दुर्घट आहे. त्या मताला सत्याच्या तत्त्वापेक्षा जून बळाच्या सामर्थ्यानेच सर्व गोष्टींचा निकाल लावण्याची कशी चटक लाग- ेली आहे व म्हणून सामर्थ्याच्या—शरीरसामर्थ्याच्या—लष्करीसामर्थ्याच्या अभावी प्रत्यक्ष प्रतिकार कसा लगडा पडतो हे फ्रान्समध्ये फार चागल्या रीतीने सिद्ध ालेलें आहे. अप्रत्यक्ष प्रतिकाराने सर्व काम होअील असें वाटणाऱ्या पुढाऱ्याना ुसरे प्रातातून आणलेल्या लोकाकडून पकडण्यात आले, सर्व दक्षिणेभर शिपायांचा ाराडा पडला, लष्करी कायदा सुरू झाला. वक्तृत्व व सभा बद पडल्या व लोकाना ुसऱ्या धाकदपटशाने सरकार गांगरेल ही जी आशा होती ती नष्ट झाली ! र्थात् लोकानीही शस्त्रें अुपसलीं. आपल्या अप्रत्यक्ष प्रतिकाराचा त्याग करून

प्रत्यक्ष प्रतिकाराकडे ते वळले व आता दोन हात होऊन शेवटचा काय
लागतो हें कळणें हे त्या अभयतांच्या हातातील जोरावर अवलंबून राहण
म्हणजे अप्रत्यक्ष प्रतिकाराचे मागे लष्करी सामर्थ्य असले तरच तो विजयी
नाही तर त्याचाही -- त्या अप्रत्यक्ष प्रतिकाराचाही दुर्बलत्वाने पराजय हो
सप्रयोग सिद्ध केलें गेले !

सरळ विचारपद्धतीनेही हेंच सिद्ध होतें. अप्रत्यक्ष प्रतिकारात अेक
मनुष्य अत्यंत अुदात्त होअील असें गृहीत धरलेलें असतें. सर्वजण सरकारी नो
सोडतील हा त्याचा मुळारंभ असतो. परंतु दारिद्र्याने निष्कांचन झालेल्या ल
अिच्छा असली तरीही अितकी अुच्चस्वार्थपरा वृत्ति तोलून धरण्याची शक्ति
दुसरी गोष्ट अशी की, अप्रत्यक्ष प्रतिकारात विरुद्धपक्षही अत्यंत अुदात्त
ठरविलेले कायदे तो कधी मोडणार नाही व नवीन जुलमी कायदे तो कधी क
नाही, असें गृहीत धरून चालण्यास आरंभ होतो. परंतु ही गोष्ट सर्वस्वी अ
आहे. जो लोकसंमतीच्या विरुद्ध जाण्याअितका नीच असतो तो वेळेवर
कायदे करून वा जुने अुकरून काढून ती लोकसंमति व तिचा अप्रत्यक्ष प्र
बळाने दाबून टाकण्याअितका क्रूरही असतो. अिंग्लंडमध्ये काही स्त्रियांनी
कर देत नाही असें म्हणताच सरकारने त्यांस अुचलून तुरुंगात फेकले !
अिंग्रजी बायका व अिंग्रजी पुरुष यांचा हा आपला आपसाआपसातील प्रेम
आहे ! संप करून खाजगी गिरण्यांचे मालकांनाही ताळ्यावर आणणें मजु
कठीण जातें ! मग ज्या सरकारला पैशाचें, सैन्याचें व शस्त्रास्त्रांचें मबलख

## २१. प्रकाश आणि काळोख

लंडन : मानवी अितिहास फार चमत्कारिक आहे या अितिहासातील पुष्कळ
ीर्ची कारणें व त्याचे परिणाम बरोबर रीतीने समजणारा प्राणी विरळा
ालज्ञान ज्याप्रमाणे मनुष्याला दिलेले नाही, त्याप्रमाणे प्रत्येक गोष्टीचे अंतिम
ान समजण्याची शक्तिही मनुष्यास दिलेली नाही, परवा पोर्तुगालचा राजा
ुवराज याचा वदुकीचे गोळ्यानी देहपात घडवून आणला युवराजाचा धाकटा
ू गादीवर बसला, रशियाचे झारने व अिंग्लंडच्या राजाने सहानुभूतीच्या
ा पाठविल्या. फ्रेंच प्रतिनिधिसभेत सहानुभूतीचे ठरावासबंधी खल चालला असता,
ाजसत्तावादी प्रतिनिधींनी पोर्तुगालच्या राजाच्या व युवराजाच्या खुनाचे
ाशी केवळ खुनीपणापेक्षा अधिक महत्वाची कारणे आहेत व त्या कारणाचा लोक-
ावादित्वाशी संबंध आहे आणि म्हणून महानुभूतीच्या ठरावास विरोध केल्यामुळे
ुनुभूतिवाल्याचा विरस झाला. पोर्तुगालमध्ये अनियंत्रित प्रधान (Dictator)
ो याने राजीनामा दिला व नवीन जे संयुक्त प्रधानमंडळ नेमण्यात आले त्याच्या
ाने छोट्या राजाला आग्रहाने सांगितले की मला १३० प्रतिनिधीना हद्पार
ण्याची जर अनुज्ञा मिळेल तर राज्यात लवकर शांतता होअील. त्याप्रमाणे वर्तमान
ऽ आहे. राजा व युवराज याची हत्या का झाली आहे ? ती कोणी केली ? ही
ा करण्यामध्ये कोणत्या तरी लोकपक्षाचे अंग होते काय ? हत्या तर झालीच;
ासून त्या पक्षाची हानि होणार की लाभ होणार ? झारने व अिंग्लंडच्या राजाने
ानुभूतीच्या तारा पाठविल्या यातील अिंगित काय आहे ? मानवाचे हृदयाला
ा धक्का बसण्यासारखी ही गोष्ट झाली की, आल्हाद व अुत्साह येण्यासारखी
ोष्ट झाली अित्यादि प्रश्न अुद्भवतात. हत्या का झाली याचे कारण धुडता
दिसून येते की, राजाने नुकतीच सर्व सरळ राज्यपद्धति सोडून देअून अेक
ायंत्रित प्रधान पोर्तुगालची शांतता राखण्याकरिता नेमला होता. पोर्तुगालच्या
ाततेचे कारण, जे लोकपक्षाच्या अशांततेचे कारण, चहूकडे सर्वदेशी आहे तेच
व आहे लोकाना हा फार्स नको आहे लोकाना सिंहासनावर बसणारी बाहुली
ा म्हसोबा नको आहेत. अेक किंवा थोडेसे दुड्ढाचार्य यांच्या हाती
ाचे सम्मतीशिवाय, मताविरुद्ध अधिकार अेकवटला म्हणजे कधीना कधी असाच
णाम घडावयाचा. राम अुजाडून दिवस यावयाचाच. लोकाना हाणून, दडपून
ानात ठेवले तरी सज्जन आहेत तोपर्यंत हे अज्ञान चिरकालीन होअील असे
ते नको. ज्ञानार्जन व ज्ञानदान सतत करीत राहणे हा कर्तव्याचा ओनामा आहे.
ओनामा जे सतत गिरवीत राहणार ते सतसज्जन लोकाचे नजरेपुढे सत्यासत्य
ण्याचे काम सतत करीत राहणारच व सत्यासत्य लोकापुढे मांडले म्हणजे

सत्याची बाजू अुचलून धरणे व असत्याचा वडेजाव कमी करणे हे स्वभावतः प्रगतिशील असणारा लोकसमाज करू लागतो पोर्तुगालमध्ये ज्या गोष्टी घडून (आल्या) आहेत, त्यामध्ये या द्वंद्वाचे —सत्यासत्याच्या द्वंद्वाचे प्रतिबिंब स्पष्ट दिसते लोकसमाजाला भेवडावणारा किंवा त्याच्या अुरावर बसणारा म्हसोबा ज्याप्रमाणे ... वत् झाला आहे, त्याप्रमाणे सूत्रधार कावेबाजाचे हाती नाचणारी व राजा आव्हान केली जाणारी बाहुलीही शत्रुवत झाली आहेत. सत्ता अेका राजाचे ह(ाती) असो किंवा अनेक राजाच्या हाती असो, जोपर्यंत ती लोकाचे हाती नाही तोपर्यंत लोकाचे त्या शासनपद्धतीशी वैर असणारच. यावरून लोकसत्तात्मक पद्धति म्हणजे अगदी निर्दोष अशी सामान्य जनाची समजूत असते असा सिद्धान्त वाटला तर तो चुकीचा होओील. लोकाना, बहुजनसमाजाला पूर्णपणे कळते की, ... दोष आहेत, कारण निर्दोष पद्धति या दोषयुक्त मानवी स्वभावाचे व्यवहारात मिळावयाचीच नाही, हेही लोकाना माहीत आहे असे असल्याने अनेक शासनपद्धतीत सगळ्यात कमी दोषयुक्त पद्धति आजमितीला कोणती आहे हे ठरवून तिचा पुरस्कार करायचा, असे सामान्यजनाचे मत त्याना नेहमी सागत असते. युरोपमध्ये सतमज्जनाच्या सतत परिश्रमाने लोकाना शासनपद्धतीची शिकवणी मिळालेली आहे. युरोपियनाना राजा, सरदार अित्यादि असमतादर्शक शब्ददेखील कडू वाटू लागले आहेत त्याची मनुष्यसमनेकडे धाव आहे व ही त्याची धाव (सतसज्जनाच्या अव्याहत परिश्रमानेच, लोकाचे मनामध्ये ही श्रेष्ठ समताबुद्धि अुत्पन्न झाली ) आमच्या पोटाविरुद्ध आहे, आमचे मजा करण्याचे हक्काविरुद्ध आहे, असे राजाना व सरदारप्रभृति हक्काचे अुपभोगाने बिघडलेल्या स्वयमन्य श्रेष्ठाना पूर्णपणे कळून चुकले आहे कोण अधिक बलवान आहे हे स्वतंत्रविहारी काल ठरवील गतकालाने अेवढे तरी ठरविले आहे की, ज्या ज्या ठिकाणी लोकाना सतमज्जनाकडून शासनपद्धतीची सथा दिली गेली, त्या त्या ठिकाणी स्वयमन्य श्रेष्ठाची कमी अधिक पिछेहाट झाली. आपणास अिंग्लडचा व फ्रान्सचा अितिहास हे शिकविण्यास पुरे आहे. असो पोर्तुगालमध्ये जी गोष्ट घडून आली, तिचे मुळाशी लोक व लोकशत्रु याचे चिरकालीन द्वंद्वाचा सबध आहे असे आम्हास वाटते मुख्य प्रधानाने १३० प्रतिनिधींची अुचलबागडी केल्याने देशात शातता होओील असे स्पष्ट सागितले, यावरून आमचे मताची सत्यता सिद्ध होते. झारच्या व अिंग्लडच्या राजाच्या हृदयाला फार मोठा धक्का बसला, फ्रेंच प्रतिनिधिसभेत सहानुभूतीचा ठराव पास झाला नाही, या गोष्टीह आमच्या मताचा पुरस्कार करतात. लोकाच्या हृदयातील काळोख कमी होत जाअून प्रकाश अधिक होत चालला आहे, हे पाहून आमच्या मनाचा अुत्साह वाढत आहे राजाचे हृदयाला धक्का बसला की मानव्याच्या हृदयाला धक्का बसलाच पाहि(जे) असे राजा म्हणजेच देश असे मानणाऱ्या मुकुटवाल्याना वाटणे साहजिक आ(हे)

बरोबर त्याचे बगलबच्चे व आश्रित यानीही आसवे ढाळावी, हेंही सृष्टि-
ानुसार आहे परतु राजे रडोत, राजाश्रित रडोत, त्याचे रडण्याने लोकाचे
ाला पाझर फुटण्याचे दिवस निघून गेले व ही आम्ही फार आनंदाची गोष्ट
ातो सृष्टिक्रतिशास्त्राचे साधारण नियम मानवी हृदयाचे वाढीला साहजिक
ागतात या नियमाप्रमाणे पहिले जे केवळ व्यक्तीला ओळखणारे हृदय (ती
त स्वत असो किंवा राजा अित्यादि असो) त हळूहळू समाजाला, राष्ट्राला
ानव्याला ओळखू लागते व जशी जशी मानवी हृदयाची अेकाहून अेक विस्तृत
लोकसमूहाशी सलगी होअू लागते तशी तशी त्याची वृत्ति अधिक गभीर होत
व्यक्तीचे अभ्युदयाची किंवा पराभवाची वार्ता अैकूनच केवळ ते हृदय हेलकावे
नाही मला पूज्य झालेल्या विस्तृत लोकसमूहाचे हिताहिताशी या अभ्युदय-
वाचा काय सबध आहे ही पृच्छा अेकदम मनात अुभी राहते व हृदयाचे अुडणे
ा आल्हादवर्तन ह पूज्य लोकपक्षाचा मानभग किंवा विजय यावर अवलबून असते.
ालचे वर्तमान मानव्यहिताकाक्षी हृदयाला आल्हादजनक आहे, कारण लोक-
ने आपले शत्रूवर घाव करणे हे अुदाहरण हृदयाला अत्यत अुत्साहजनक होय
राजमुकुटाचा पोर्तुगालमध्ये झालेल्या मानभगाचा तेथील लोकपक्षाचे आजचे
विर कसा परिणाम होअील, याचे आजच भाकित करण्यापेक्षा थोडे दिवस
ील त्या गोष्टी डोळयात तेल घालून पाहणे ज्यास्त श्रेयस्कर आहे आज अेवढे
निश्चितपूर्वक सागता येअील की सर्व देशातील लोकपक्षाला या राजमुकुटाच्या
त्या मानभगापासून हुरूप आला आहे ही प्रकाशाची चिन्हे आहेत, ही काळोख
होत असल्याची चिन्हे आहेत

वरचा मजकूर लिहिल्यानतर दोन दिवसात ज्या हकीकती लडनला आल्या
त त्यावरून राजमुकुटाला दिलेल्या शिक्षेचा देशावर सुपरिणाम झाला आहे अस
: दिसते लोकसत्तावादी प्रमुख प्रतिनिधीनाही कारागृहातून सोडून दिले आहे
या राजाने वचन दिले आहे की, मी अनियंत्रित प्रधान कधीही नेमणार नाही.
नमडळात सर्व पक्षाचे लोक आहेत, भवति-न-भवति होअून श्रेष्ठाचे सभेचा
ouse of peers) अध्यक्ष प्रगमनशील (progressive) पक्षाचा असावा असे
ा फोकास फाल्काओ या प्रमुख माणसास अध्यक्ष नेमले आहे परवाचा अनि-
त प्रधान फ्रँको यास नव्या सरकारने लिस्बनहून निघून जाण्याची 'शिफारस'
ावरून तो लिस्बन सोडून माद्रिद येथे गेला आहे त्याने आपले सर्व पैसे
गाल बँकामधून काढून फ्रेंच आणि अिंग्लिश बँकात ठेवले आहेत व स्वत.
वत्झर्लंड येथे जाअून राहणार आहे लोकसत्तावाद्याचा पुढारी 'माकाडो' याने
ढपणे सागितले की, पोर्तुगालची राजसत्ता वयातीत होअून मृत्युपथाला
लेली आहे नवीन प्रधानमडळ कर्त्या माणसाचे आहे व ते राजसत्ता अुचलून

धरण्याचा प्रयत्न करील परतु तिला कोणत्याही वैद्याचे औषध चालणार तीन वर्षांत राजसत्तेचा निकाल लागेल व लोकसत्ता तिची जागा घेईल,' 'तथास्तु' असा आशीर्वाद देऊ या ! हिंदुस्थाना ! तुझे कसे काय !

—ता २८ फेब्रुवारी १'

+ + +

## २२. लंडनमधील पहिला शिवोत्सव

लडन मनुष्ये मरतात पण त्याची सत्कृत्ये जिवत राहतात सत्कृत्ये या मर्त्य जगात अमरत्व देणारी अपूर्व रसायन आहेत त्या सत्कृत्यातील लवमात्र ग्रहणही आत्म्याचे अमरत्व सिद्ध करते मग ज्याने सत्कृत्याच्या अुच्चपदस्थानी वसणाऱ्या स्वदेशस्वातत्र्याचे प्रस्थापन केले त्या महात्मा शिवभूपाचे नाव प्रत्येक येणाऱ्या वर्षी अमरत्वाचे नवीन ताम्रपट मिळवीत आहे ह्यात काय नवल असणार? शिवनेरीच्या डागरात १६२७ त जन्मलेले बालक १९०८ साली जिवत आहे, तारुण्यभरात आहे, दिग्विजयात दग आहे, दरसाल नवीन समुद्र पादाक्रांत करीत आहे, नवीन किनारे गाठीत आहे, नवीन मापाना माहीत आहे, व नवीन कठातून हृदयात वाङ्मयातून त्याची सिंहासन व त्याचे जयजयकार दुमदुमत चालले आहेत ! मृत्यूचा पाश कोणाला तोडावयाचा आहे काय ? काळाअितकाच अमर्यादित अमरत्व कोणास पाहिजे आहे काय ? असेल तर अेक अुपाय म्हणजे स्वदेश स्वातत्र्याच्या रणागणात त्याने हरहर म्हणावा ! कधीही मरण न येण्याचे अेक साधन म्हणजे स्वदेश स्वातत्र्यास्तव तत्काल मरण हे होय !

असा न मरण्यासाठी जो मेला त्या शिवभूपाच्या जयजयकाराने लडननगर गेल्या आठवड्यात प्रथम निनादन पावले येथील फ्री अिंडिया सोसायटीद्वारा गेल्या शनिवारी श्रीशिवरायाचा जन्मोत्सव करण्यात आला त्याच्या अुच्चासनस्थित मूर्तीपुढे व त्याच्या स्वतत्र निशाणाखाली मद्रास, बगाल, मुबअी, पजाब असे सर्व दिशाचे व हिंदु, मुसलमान, पार्शी, यहुदी असे सव धर्मांचे हिंदी लोक शिवभूपाची पूजा बाधीत होते असले अुत्सव व असले प्रसग म्हणजे विरयेकानी अशक्य म्हटलेल्या हिंदी राष्ट्रैक्याची मूर्त तनयता होत दे आयर बी अे. यानी शिवाजीच्या चरित्राचे तात्त्विक स्वरूप सागताना म्हटले की, शिवाजीसारख्या विभूतीचे जन्म म्हणजे आमची आर्यजाति अजून वेदकालाअितकीच व जरूर तर त्याहून जास्तही

पुढील वातमीपत्रात वाचकास कळण्यातही येईल सदर उत्सवाची च कार्यक्रमपत्रिका पुढे दिल्याप्रमाणे आहे

Bande Mataram

*

To Commemorate
The Anniversary of the
INDIAN NATIONAL RISING OF
1857

A

Meeting of Indians in England
will be held at India House, 65 Cromwell
Avenue, Highgate N
on
Sunday the 10th of May, 1908 at
4 P m

You and all your Indian friends are cordially invited
to be present

—o—

PROGRAMME

1 National Songs
2 National Prayer
3 Tributes to the sacred memory of,
Emperor Bahadur Shah
Shrimant Nanasaheb
Rani Lakshmibai
Moulavi Ahmad Shah
Raja Kuvar singh
And other martyrs
4 Declaratien of Self denial
5 President s speech
6 Distribution of Prasad
7 National Songs

—(ता २९ मे

✦ ✦

## २३. सत्तावनच्या स्वातंत्र्यसमराचा जंगी अुत्सव

लंडन. गेल्या आठवड्यात अिंग्लंडमध्ये राहत असलेल्या हिंदी जनसमूहात जपर्यंत केव्हाही अनुभवास न आलेली विलक्षण चळवळ अुडालेली होती. सत्ता॰ च्या स्वातंत्र्यसमराची जन्मतिथि जसजशी जवळजवळ येअू लागली तसतशी ी लोकामध्ये तो जन्मोत्सव अपूर्व थाटाने साजरा करण्याची स्फूर्ति अधिकाधिक रण पावू लागली. मे महिन्याला आरंभ होताच प्रत्येक गल्ली-गल्लीतून हिंदी काच्या टोळ्या जमवून, त्याना जन्मोत्सवाचे महत्त्व, तत्प्रीत्यर्थ केला जाणारा ार्थत्यागाचा तपस्यामास, त्या समारंभाचा अेकंदर कार्यक्रम, सत्तावनच्या ातंत्र्यसमराचे खरे स्वरूप अित्यादि गोष्टी विवरण करून सांगण्यासाठी प्रत्यही ातून लहान सभा भरत होत्या व त्यांतून अुत्साही देशसेवक अुपदेश देत हिंडत ते. या त्याच्या विवरणाचे व ह्या प्रत्यही चालू असणाऱ्या गल्ल्यागल्ल्यामधील टेखानी सभाचे ओघ अेकत्र होत होत अखेर ता. १० मेच्या पुण्यदिवशी त्याचा ाड व अेकत्रित ओघ अिंडिया हाअुसकडे लोटू लागला कारण अिंडिया हाअुसच्या लमध्येच ता. १० मेची टोलेजंग सभा भरण्याचे ठरले होते अिंडिया हाअुसचा ल या कार्याकरिता फारच सुंदर रीतीने शृंगारलेला होता श्रोतृसमाजाच्या ोरील बाजूला अेक भव्य रक्तवस्त्र लावलेले असून त्यावर पुष्पमालाच्या पंक्ति कलेल्या होत्या व त्या नानाविध रंगाच्या पुष्पमंडपात अर्धाफूट जाडीच्या अक्ष- ी सोनेरी, हिरव्या, श्वेत व गुलाबी रंगात राजा बहादुरशाह, श्रीमंत नाना- हेब, राणी लक्ष्मीबाअी, मौलवी अहमदशाह, राजा कुंवरसिंह व १८५७ साली लेले आणखी काही योद्धे या सर्वांची नावे अभिनंदनार्थ स्मरण म्हणून कोरून हिण्यात आलेली होती. या भव्य स्मृतिपटाचे भोवती निरनिराळ्या देशभक्ताच्या ाविरीही लावलेल्या असून, त्या हॉलमध्ये मनोहर पुष्पाच्या लहान झाडाच्या

भाग घेऊन कांब्रिज, आक्सफर्ड, सारेन्सेस्टर, रेडिंग असल्या दूरच्या ठिकाणाहूनही हिंदी लोक या सभेला आटले होते त्यातही देशभक्त हिंदी स्त्रीजनांच्या आगमनाने व राष्ट्रगीतगायनाने सर्वांस अुत्साह आणून दिलेला होता राष्ट्रप्रार्थना झाल्यावर राजा बहादूरशाह व श्रीमंत नानासाहेब यांचा स्मृतिगौरव करण्यासाठी दे सावरकर यांनी सत्तावनच्या भरातीच अितिहासस्वरूपसंबोधनपर भाषण केल्यानंतर वंदेमातरमच्या घोषात सर्व सभा अुभी राहून, त्या अुभयवीरांच्या नावाचा त्रिवार जयघोष करण्यात आला द खान यांनी राजा कुंवारसिंग यांचा स्मृतिगौरव केला दे दास बी अे यांनी राणी लक्ष्मीबाअीचा व मास्तर (पारसी) व दे येरुग्न (यहुदी) व अितर वक्ते ह्यांनी अितर देशवीरांचा स्मृतिगौरव केल्यानंतर अध्यक्षांचे अुत्साहक भाषण झाले व त्या भाषणाच्या शेवटी स्वार्थत्यागाच्या शपथा घेण्यात आल्या जेंव्हा डाक्टर, प्लीडर बरिस्टर अेडिटर युनिव्हर्सिटी पदवीधर व्यापारी, माताबाल, तरुण व वृद्ध स्त्रिया व पुरुष अेकामागून अेक या स्वार्थत्यागी मासात कडक तपस्या करण्याच्या प्रतिज्ञा करू लागले तेंव्हाचा अुत्साह अवर्णनीय आहे सर्व जणांचे हृदयावर ह्या तपस्यामासाकरिता मुद्दाम तयार केलेल्या वीर स्मृतिमुद्रा चळकत होत्या कोणी महिनाभर अुपास करण्याच्या शपथा घेतल्या कोणी मद्यपान सोडले आणि कोणी धूम्रपान सोडले महिनाभर थिअेटरमध्ये जाणे नाही कोणतेही चैनीचे कृत्य करणे नाही व या रीतीने जे जे पैसे वाचतील ते ते सत्तावनच्या देशवीरासाठी अुभारलेल्या कोषात टेवून टाकावयाचे' या फंडाचे वसुली साठी पदवीधरांनी भिक्षेच्या शपथा घेतल्या व मुद्दाम केलेल्या झोळ्या घेअून हे राष्ट्रीय भिक्षेकरी आज सर्व आठवडाभर घरोघर भिक्षा मागत हिंडत आहेत व या योगाने नवीन राजकीय चर्चेची पारायणे अिंग्लंडमध्ये प्रत्येक हिंदी घरी चालू केली आहेत फंडास मिसेस वामाने पंचाहत्तर रुपये धाडले ते प्रसिद्ध करण्यात आले दे राजाजीनेही आपले मे महिन्याचे सर्व अुत्पन्न देशवीरास अर्पण केले हे व अितर स्वार्थत्यागविधि झाल्यावर पुन मिसेस दत्त या देशभक्त विदुषीने राष्ट्रगीत गायली प्रसादासाठी बनविलेल्या चपात्या वाटण्यात आल्या व वंदे मातरमच्या जयघोषात व देशवीरांच्या स्मृतिघोषात ती अभूतपूर्व सभा विसर्जन पावली अितका हिंदी समाज व अितका अमर्याद अुत्साह या लंडन शहरी पाहिल्याचे कोणासही आठवत नाही ! चपात्याच प्रसादासाठी अशाकरता वाटल्या की सत्तावनचे क्रांतियुद्धाचे आधी अशाच 'चपात्या' देशभर गुप्तरूपाने वाटल्या गेल्या होत्या !

—ता ५ जून १९०८

\+ + +

## २४. पदवीदान समारंभ

लंडन सत्तावनच्या दावीराच्या सन्मानार्थ स्मृतिमुद्रा धारण केल्या-
न येथील दे हरनामसिंग बी. अे. व दे खान आर. अेम. या दोघा देशभक्त-
गानी आपला पुढील सर्व अभ्यासक्रम (कोर्स) सोडून दिला व ज्यानं सत्ता-
च्या नानाना व लक्ष्मीबाअीला ' रामोशी, खुनी व चोर ' म्हटले, त्या प्रिन्सि-
लच कॉलेजमध्ये पाय ठेवण्याचे नाकारले, हे आपले वाचकास कळविले आहे. हे
न विद्यार्थी हिंदु असते तर त्यासबंधी अितके पार्लमेंटमध्ये प्रश्नोत्तरे होण्यासारखे
ही झाले नसते. परंतु दुर्दैवाची गोष्ट ही की, त्यातील अेक शीख व दुसरा
सलमान पडला! अिंग्रजी राज्याचे भक्कम आधारस्तंभ म्हटले म्हणजे शीख व
सलमान अशी अलीकडे अिंग्रज लोक आपली समजूत मुद्दामच करून घेत असतात.
हा त्या भक्कम म्हणून गाजविलेल्या झाडातच ही कीड लागलेली पाहून, अर्थातच
ील पार्लमेंटपर्यंतच्या सर्व ' रिमा 'ना चटका बसल्यासारखे झाले. त्यानी वरील
या गृहस्थाना कॉलेजमध्ये जाण्याचा खाजगी आग्रहही केला. ' तुम्ही पंजाबी व
हूनही शीख. तुम्हास हे द्वेषबुद्धीचे वर्तन शोभत नाही ! तुम्ही कॉलेजमध्ये परत
ल, तर पुन्हा असले वर्तन न करण्याबद्दल आम्ही तेथील प्रिन्सिपालास बजावून
तो ' अशा मजकुराचे अेक लांब पत्र पंजाब व बंगालमध्ये अधिकारावर अस-

नंतर अध्यक्षांनी त्या दे हरनामसिंग वी अे व दे खान, आर अेम यांच्या करारी देशभक्तीची स्तुति करून त्याप्रीत्यर्थ त्यांना लंडनमधील हिंदी देशबांधवातर्फे यार-अे हिंद ही पदवी देण्यात येत आहे असे जाहीर केले व ती पदवी कोरलेली दोन रौप्यपदक त्या दोघांस श्रोत्यांच्या टाळ्यांनिनादात अर्पण करण्यात आली अध्यक्षांनी सांगितले की, पदवी देणे हा हक्क लोकांचा आहे अितकेच नव्हे तर जी स्वदेशाने दिलेली किंवा मानलेली नव्हे ती पदवीच नव्हे या हक्काची फार दिवस न केलेली अमलबजावणी करण्याची स्फूर्ति आज माझ्या या तरुण लेकरांनी करून दिली हे त्यास अत्यंत भूषणावह आहे मला तीन मुले आहेत त्यांनी अशी देशाची पदवी मिळविली, तरच मी त्यांची आओ आहे असे मी म्हणू शकेन नाही तर परक्यांना दिलेल्या पदव्या असल्या मुलांच्या छातीला डसताना पाहण्यापेक्षा आयाच निसंतान होणेच अधिक श्रेयस्कर आहे !''

—ता ३१ जुलै १९०८

\+ + +

## २५. बरे झाले !

लंडन आता कोठे हिंदुस्थानच्या राजकारणात थोडीशी चळवळ सुरू झाली आहे असे म्हणावयास हरकत नाही तरुण लोक कुटुंबाच्या क्षुद्र महत्त्वाकांक्षा सोडून देअून जेव्हा रस्तोरस्ती देशासाठी फिरू लागतात, शाळेतील मुले आओबापाच्या व्यक्तिमय व अप्पलपोटेपणाच्या निंद्य व अज्ञानजनक अुपदेशांना व धाकांना न जुमानता जेव्हा स्वराज्याच्या दिव्यात पटापट अुड्या घेतात, जेव्हा अेकेका पत्राचे तीन तीन लेखक तुरुंगात जातात तोच चार चार लेखक त्या पत्राचे स्तंभ भरण्यास पुढे सरसावतात तेव्हा थोडीशी चळवळ सुरू झाली असे म्हणण्यास हरकत नाही जेव्हा दंड भरण्यापेक्षा तुरुंगात जाण्यास स्वयंसेवक तयार होतात, जेव्हा ब्रह्मबांधव अुपाध्याय मरतात, जेव्हा सुशीलकुमार सेन पाठीवर फटके सपासप अुडत असता राष्ट्रीय धैर्याला काळिमा न लागावा म्हणून पाठ रतीभरही हलवीत नाहीत वा मुद्रा पालटवीत नाहीत, जेव्हा चिदंबरम् पिले आपणास जामीन मिळत असता काही मजुरांना जामीन मिळत नाहीत, अेतदर्थ आपणही तुरुंगाबाहेर यण्याचे नाकारतात, जेव्हा टिळक, परांजपे धरले जातात, तेव्हा हिंदुस्थानात थोडीशी चळवळ सुरू झाली आहे असे म्हणावयास हरकत नाही

'मेली आहे ! मेली आहे !!' म्हणून जगाने जिच्या सवधाने कडी अुठविली होती ती भूमाता हिंदभू हलके हलके का होअीना, पण स्पष्ट श्वासोच्छ्वास करू लागली आहे परमेश्वराचे कितो अुपकार आहेत !

परतु हिंदभू याप्रमाणे श्वासोच्छ्वास करू लागताच चोहोकडे अेकच गोंधळ अुडालेला आहे. जे आजपर्यंत दुर्लक्ष करीत होते वा निराश होते, ते आमचे लोक आम्हाकडे धावू लागले; कोणी जवळ आले, कोणी येअू लागले, जगातील जे तिन्हाअीत होते त्यानी आजपर्यंत सिद्धान्तभूत मानलेले विचार पुन्हा परीक्षावयास आरभ केला व हिंदभू मेली या कडीवरील विश्वास त्यानी सोडून दिला विपक्षीय जे होते त्याची तर सर्वाहून जास्तच धादल अुडाली. त्याना त्याचे असत्य डाचू लागले त्याना क्षणात लज्जा वाटे, क्षणात सताप येअी, क्षणात धाक, क्षणात आशा क्षणात आश्चर्य, क्षणात निराशा, असा त्याच्या मनोविकाराचा गोंधळ अुडाला. सर्व मते मतातरे झुजू लागली हिंदुस्थानची वार्ता जगाला लागू द्यावयाची नाही म्हणून हजारो रुपये दिले तरी जी अिग्लडमधील पत्रे हिंदुस्थानचे लेख लिहीत नसत ती पत्रे रोज आपले पत्राचे स्तभ हिंदुस्थानचे लेखानी भरू लागली ज्या हिंदुस्थानी लोकाना प्रदर्शनात जास्त गिन्हाअिके जमविण्यासाठी विदुषकाची कामे देण्यासाठीच केवळ परस्थ लोक भेटत असत, त्याच हिंदुस्थानी लोकाचा दर्जा परदेशात अेकदम वाढला व अमेरिका, फ्रान्स व अिग्लड येथील प्रमुख पत्राचे बातमीदार हिंदी लोकाच्या भेटीचा लाभ घेण्यास अुत्सुक होअू लागले हिंदी लोकातील तरुणाची ओळख व्हावी, म्हणून जपानी लेखक सकाळ सध्याकाळ लडनच्या हिंदी हॉटेलात खेटे घालू लागले हाअूस ऑफ कॉमन्समध्ये हिंदुस्थानचो दोन प्रश्नोत्तरे होणे दुर्मिळ होते. आता हाअूस ऑफ लॉर्डसमध्ये परवाचा सारा दिवस हिंदुस्थानातील अस्वस्थतेच्या वादविवादात *लार्ड कर्झन व व्हायकाअुट मोर्ले असल्याच्या कुस्तीत* गेला. कुस्ती करावी तरी पचाअील न करावी तरी पचाअीत ! लॉर्ड कर्झन हिंदुस्थानसबधी *तासभर* चर्चा करतात व अितर लोकाना दोष देतात की पार्लमेंटात *हिंदुस्थानबद्दल* पक्षभेददर्शक प्रश्न करू नयेत. लॉर्ड मोर्ले पुन्हा तासभर कर्झनवर टीका करतात व शेवटी अिषारा देतात की, आपले बोलणे लाब अंकू जाते तर मुळी कोणी बोलूच नये ! न बोलणे हे शहाणपणाचे व मुत्सद्देगिरीचे आहे हें सिद्ध करण्याकरताच तास-दाम बोलावे लागते ! अिकडे हिंदी तरुणाचाही जोम वाढतच चाललेला पाहून बोलल्याशिवाय वर्तमानपत्रे स्वस्थ बसत नाहीत. सत्तावनच्या अुत्सवसभेसबधाने सर्व अिग्रजी वर्तमानपत्रानी अेकच आरोळी अुठविली आहे. सत्तावनची स्मृतिमुद्रा कोटावर धारण करून हिंदी विद्यार्थी ऑक्सफर्ड, लडन, सायरेन्सेस्टर अित्यादि शहरी अुघडपणे कॉलेजात जाअू लागले, तेव्हा त्याना अटकाव न करणेच प्रशस्त अशी वत्तृप्ति योजण्याचे ठरले. पण सायरेन्सेस्टरच्या

प्रिन्सिपालने छाती करून माझ्या कॉलेजात तरी ही अुन्हा धारण करू नय म्हणून आज्ञा केली तो काय प्रकार झाला? हिंदी विद्यार्थ्यांनी धडाक्यात कॉलेज सोडून दिले! तेव्हा प्रिन्सिपॉल पत्र लिहू लागले की तुम्ही कॉलेजमध्ये या! पण पहिल्या धाकाप्रमाणे या दुसऱ्या मोहालाही धुडकावून देअून सत्तावनच्या देशवीराची ज्याने निंदा केली, त्याच्या कालेजात पाअूल न टाकण्याचा निश्चय करून, दे हरनामसिंग व दे खान हे दोन वर्षांच्या श्रमावर व पशावर पाणी सोडते झाले बर, या अुदाहरणाने तरी हिंदी विद्यार्थी भितील म्हणून रीस अेम् पी ने पार्लमेंटात प्रश्न विचारून दरडावले, तो काय परिणाम झाला? जास्तच चिडलेल्या हिंदी लोकांनी या स्वार्थत्यागी तरुणाचे सन्मानार्थ जंगी मेजवानी देअून त्यांना पदके बक्षीस दिली!

हिंदुस्थानातील अत्युच्च पीठावरील निवडक तरुणाचे हे वर्तन पाहून असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही की, हिंदुभू हलके हलके का होअीना पण स्पष्ट श्वासोच्छ्वास करू लागली! तिच्या निधनाची कडी मात्र निधन पावली! बरे झाले की त्या निराशेतही आम्ही आशेला सोडली नाही!

—ता ७ ऑगस्ट १९०८

* * *

## २६. विद्यार्थ्यांचा तेजोभंग

आपले विषारी जाळे पसरवू लागतात अशक्य व सूक्ष्म विचारास असमर्थ असणारी ती तरुण दृष्टि वरवरच्या भपक्याला पाहून भिते, दचकते व तेजोभगाच्या विषारी दंशाने निर्जीव होऊन जाते दास्यातील लोकाना खरे शिक्षण म्हणजे तेजोभगच होय हें जाणून अिंग्लिश कारस्थानपटूनी हिंदुस्थानच्या विद्यार्थ्यांना अिंग्लडात जे आजपर्यंत अुत्तम प्रकाराने वागविले ते अेवढ्यासाठीच होय आजपर्यंत वरवर सभ्यतेने व दिखाअू प्रेमाने हिंदी विद्यार्थ्यांना वागविण्यात येअी व त्या योगाने ते विद्यार्थी 'अिंग्लडमध्ये अिंग्लिश लोक फारच चागले असतात, केवळ तिकडेच अँग्लो-इंडियन लोक काय ते अुमट असतात' असा समज करून घेत त्याच्या अंत करणात आत्मदौर्बल्य व बुद्धीत अिंग्लिशाच्या सौजन्याचा मिथ्याभास अशी फसवणूक हिंदी विद्यार्थ्यांची होत असे

परतु आता गेल्या दोन तीन वर्षात असल्या देखाव्याला न भिणारी हिंदुस्थानची आत्मजागृति होताच पूर्वी ज्या फसवणुकी ध्यानात येत नसत त्या आता अुघड होअू लागल्या अेकाच कॉलेजात व वर्गात अिंग्रजी विद्यार्थ्यांनी प्रश्न– मग तो कितीही मूर्खपणाचा असो, केला की प्रोफेसर अर्धा अर्धा तास त्याचे समाधान करतात परतु हिंदी विद्यार्थ्यांनी केलेल्या मार्मिक प्रश्नासही ते कसे फेटाळून लावतात हे दृष्टीला राजकीय सूक्ष्मता येताच अुघड कळू लागत केंब्रिजसारख्या ठिकाणीही हिंदी विद्यार्थ्यांना जाणूनबुजून आत न घेणारी कॉलिजे निघू लागली एडिंबरामध्ये सर्व विद्यार्थ्याना आपल्या कह्यात ठेवता यावे म्हणून अिंग्रजाच्या अधिकाराखाली बोर्डिंग्ज निघाली व त्याचा पहिला नियम ' यथील विद्यार्थ्यांनी राजकीय कामात कोणतीही चर्चा करू नये ' हा क्षात्र! साम्राज्यदिनाला खेडेगावातील शाळातूनही अिंग्रज लहान लहान मुलास राजकीय शिक्षण दण्यात येते परतु हिंदी तरुणातील ग्रॅज्युएटासही राजकीय चर्चा करता कामा नये या अिंग्लडमधल्या शाळात व हिंदुस्थानातील शाळात आता भेद तो काय अुरला? हिंदुस्थानी लोकास दोहोमध्येही दास्याशिवाय दुसर शिक्षण व अपमानाशिवाय दुसरे बक्षीस ते काय मिळणार? मग लोकानी आपल्या लोकानी अिंग्लडमध्ये काय म्हणून यावे? अुद्योगधद्याचे शिक्षण जपान, जर्मनी, अमेरिका येथे जितक मिळत तितक अिंग्लडमध्य मुळीच मिळत नाही जगाच्या प्रगतीत अिंग्लड अर्ध्या शतकाने मागे आहे आपल्या लगड्या

खरें शिक्षण जपान, जर्मनी, अमेरिका यांतच मिळेल. शास्त्रीय व व्यापार-विषयक शिक्षणही तिकडेच मिळेल व अिंग्लंडमध्ये होणाऱ्या तेजोभंगाचा विषारी दंशही टाळता येईल.

—ता. १४ ऑगस्ट १९०८

\+ + +

## २७. लोकमान्यांना काळेपाण्याची शिक्षा !

लंडन : महाराष्ट्राच्या विभूषणाला, आर्यधर्माच्या अभिमानाला, नीति-मत्तेच्या निपुणतेला व स्वदेशप्रीतीच्या अुद्भवाला, त्या बाल गंगाधर तिलकाला काळे पाण्यावर धाडण्याची शिक्षा झाल्यापासून ज्याच्या हृदयात खेप आलेला नाही व ज्याच्या मस्तकात भयंकर खळवळाट झाला नाही असा खऱ्या अंत:करणाचा एकही हिंदु आढळणें दुर्मिळ आहे. व्यापाऱ्यांनी आपली दुकानें बंद ठेवली, गिरणीवाल्यांनी गिरण्या बंद ठेवल्या, विद्यार्थ्यांनी शाळा सोडल्या, नागरिकांनी अुपवास केले, देशाच्या रंध्ररंध्रातून सहानुभूतीच्याच नव्हे, तर अकृत्रिम कृतज्ञतेचा संचार सुरू झाला. मुंबईसारख्या वकाल वस्तीच्या शहरात व राजकारणात अन-भिज्ञ असणाऱ्या लोकांनी संप केले, त्यांचीं मनें क्षुब्ध झाली, ते रागाने वेडे होअून व जिवाची पर्वा सोडून युरोपियनावर हल्ले करू लागले व गोळ्यांच्या पहिल्या फेरीसरशीच आपल्या नि:शस्त्रतेने आलेल्या दौर्बल्यासह घरचा रस्ता न सुधारता सतत आठ दिवस बंदुकांच्या प्राणघातक गोळ्यांशी दगडाचा सामना करू लागले या सर्व प्रकारच्या प्रक्षोभाचे वृत्तान्त रोज तारेने येत गेल्याने येथील समाजाला

दिवस हिंदुस्थानात सपत आलेले आहेत, हें सुचविण्याची ही उत्कृष्ट संधि साधल्याबद्दल आमच्या सर्व लेखकाची उदात्तता वाखाणावी तितकी थोडीच आहे.

अशा सवोंस या स्वयस्फूर्त राष्ट्रीय ऐक्यवृत्तीला दे. गोपाळ कृष्ण गोखले यानी गालबोट लावले नसते तर किती तरी चागले झाले असते ! टिळकाच्या शिक्षेची वार्ता व त्या आघाताने दबून न जाता कर्तव्य करण्याची महाराष्ट्राचे अगात सचारलेली जास्तच दृढनिश्चयात्मकता याची हकीकत ऐकून इंग्लडमधील एकूण एक हिंदी मनुष्याच्या मनाची काही विलक्षण स्थिति झालेली होती. ज्या महात्म्याने राष्ट्रासाठी सोसलेल्या विपत्तीने आज मुबईसह सर्व महाराष्ट्रात ही अपूर्व एकता सचारलेली आहे, त्या महात्म्याचे गुणवर्णनासाठी व त्या महाराष्ट्राचे सहानुभूतीसाठी इंग्लडमधल्या हिंदी समाजातर्फे एक सभा भरलीच पाहिजे अशी प्रत्येकाच्या मनात साहजिकपणे उत्कठा लागली. वास्तविक दे. गोखल्यानीच या कामी पुढाकार घ्यावयास पाहिजे होता परतु ते पुढे आले नाहीत म्हणून इतर उभय पक्षातील लोकानी सर्व हिंदी रहिवाशाची सभा बोलावली. नेमस्त व जहाल हा भेद यत्किंचितही मनात न आणता सर्व दर्जाची व मताची मडळी त्या सभेस आली होती सभेचे ठिकाण कॅक्स्टन हॉलसारखे विस्तृत असताही हिंदी व युरोपियन स्त्रीपुरुषसमाजाने ते भरले होते, व अध्यक्षस्थानी दे. वें. पारेख हे नेमस्त पक्षाचे अध्वर्यु व दादाभाईचे वेळेपासून राजकारणात झटत असलेले गृहस्थ होते. अशा या सभेला गोखल्यानी मदत देऊ नये हे कारण उद्वेगजनक होय त्याना अध्यक्षस्थान स्वीकारण्यावद्दल जेव्हा विचारले गेले तेव्हा त्यानी ते नाकारलेच ! सभेत शिक्षेचा निषेध करण्याविषयी काही बोलाल का म्हणून विनती केली असता तीही त्यानी मान्य केली नाहीच, पण याहीपेक्षा पुढे जाऊन सभेला हजर रहाण्याइतकीही त्यानी तसदी घेतली नाही ! प्रत्येक फाटक्या साहेबाच्या घराचे उबरठे झिजविण्याची सधि जे फुरट दवडीत नाहीत त्याना टिळकाच्या शिक्षेबद्दल उघडपणे निषेधाचा उच्चार करण्याची व तशा सभेला हजर राहण्याचीही आवश्यकता कळू नये हे काही सौजन्याचे निदर्शक खास्रीने नव्हे ! दे. गोपाळराव गोखल्यासबधी अजूनपर्यंत जी काही पूज्यबुद्धि लोकात आहे, तिच्या योगाने लोक त्याच्या हजिरी-गैरहजिरीस महत्त्व देत असतात. परतु सर्व राष्ट्राच्या स्वयस्फूर्त विचाराला व मनोवृत्तीला टिळकाच्या हद्दपारीसारख्या अत्यत कोमल प्रसगी अशा निरर्थक अडथळा करून त्यानी काय महत्त्वाची देशसेवा बजावली ते गोपाळरावाचे गोपाळरावानाच माहीत ! बाकी सर्वांना त्याच्या त्या सदिग्ध व अप्रस्तुत वर्तनाचा वीट येऊन त्याच कक्स्टन हालात भरलेल्या सभेत गोखल्याच्या या कर्तव्यपराङ्मुखतेचा निषेध करण्याचा ठराव पास करण्यात आला. मुबईला ओरिऍटल रिव्ह्यू या पत्राने व इंग्लडात दे. गोपाळ कृष्ण गोखल्यानी राष्ट्राच्या एकतानतेचा जो हा भग केला त्याने राष्ट्राचे तर राहोच, पण त्याचे तरी हित होवो म्हणजे झाले!

—ता. २१ सप्टेंबर १९०८

\+ \+ \+

वर्तनस्वातंत्र्यास अिग्लडमध्ये पारतंत्र्याचा स्पर्श देखील होणे नाही! हिंदी तरुणाच्या अगातील दुर्गुणास भरभराटविण्याम पूर्ण स्वातंत्र्य अिग्लडमध्ये होते आणि, अजूनही आहे! या वरील सुखलपटतेच्या भोवतीच घिरट्या घालणारे चटोर हिंदी विद्यार्थी जोपर्यंत अिग्लडमध्ये येत होते, तोपर्यंत त्याना मन मानेल तसे वागू दिले जात असल्याने, या चटोरपणालाच ते स्वातंत्र्य समजू लागले, पण हिंदुस्थानात परत जाअून या अिग्लडात मुबलक असलेल्या वर्तनस्वातंत्र्याची ते वाहवा करू लागले अिग्लडची हवाच स्वतंत्र विचाराना पोषक आहे, हिंदुस्थानात अरेरावी गाजविणारे काही ॲंग्लोअिडियन काय ते खराब आहेत, बाकी अिग्लडमध्ये लोक मान झाडून सगळे अुदार आहेत, असे या मूठभर विदेशाहून परत आलेल्या लोकाच्या वल्गनाना अैकून आपणही विश्वासू लागलो

परतु जेव्हा सुखलपटतेला लाथ मारून देशासाठी तळमळणारे विद्यार्थी अिग्लडला पोचले, ज्यानी देशस्वातंत्र्यास्तव सन्यास स्वीकारलेला आहे, ज्यानी आपले पुष्कळ देशबाधव अन्नासाठी मरत असल्यामुळे आपणही क्षुपवास करण्याच्या प्रतिज्ञा केलेल्या आहेत, व व्यक्तिविषयक सुखसाधने कधी नसताही त्या साधनाना देशभक्तीच्या सेवेला अर्पण करून जे थडीपुरते वस्त्र व भुकेपुरतेच अन्न ग्रहण करीत आहेत, असे हिंदी तरुण अिकडे येअू लागताच, अिग्लडमध्ये मिळते म्हणून ज्याची कर्डी पिकली होती ते वर्तनस्वातंत्र्य व ते मतस्वातंत्र्य ह मृगजलातल्या लाटात पोहू लागले अिडियन विद्यार्थ्यांच्या स्वच्छंदी वर्तनास आळा घालण्यासाठी टाअिम्सपासून डेली मिररपर्यंत व लॉर्ड मोर्लेपासून तो रीससाहेबापर्यंत सर्व दातओठ खाअून धावत सुटले

*आणि कारण असे सागण्यात येत आहे की हिंदी तरुण लोकाना अेकटे राहू* देणे ह त्याच्या चारित्र्यास घातक होणारे आहे जोपर्यंत अिडियन तरुण दारू पीत, नाच करीत, तमाशे पाहत *बाहेरख्यालीच्या रगात दग होत होते, तोपर्यंत त्याना* वर्तनस्वातंत्र्य घातक नव्हते—परतु देशभक्तीच्या वेडाने त्याना पछाडताच व त्याच्या तरुण नेत्रात विषयी रगेलपणाचे स्थळी पवित्र स्वार्थत्यागाच्या लकेऱ्या दिसू लागताच त्याना वर्तनस्वातंत्र्य घातक होअू लागले!

म्हणून हिंदी लोकाच्या वर्तनाची चौकशी करण्यास लॉर्ड मार्ले यानी ली वॉर्नर, सर मचेंन वावली अित्यादीची कमिटी नेमली होती व तिचा रिपोर्ट नुक्ताच तयार होअून त्यातील मुख्य मुद्दे लडन टाअिम्स पत्राने गेल्या मगळवारी प्रसिद्ध केले लडन टाअिम्सचा ता लेख अनेक रीतीनी फार महत्त्वाचा आहे. त्यात तो लेखक म्हणतो, 'निरनिराळ्या खेळात हौसेने मिसळण्याचे स्थली, अिंग्रजी लोकात मजा मारणे, चहा पिणे, त्याच्याशी गोडीगुलाबीने राहणे वगैरे स्नेहवर्धक गोष्टी शिकविण्यासाठी हिंदी विद्यार्थ्यांना अेकत्र करणाऱ्या ज्या सस्था अिंग्रजानी काढल्या आहेत, त्यात कोणताही भाग न घेता हिंदी तरुण अलीकडे राजकारणाच्या

वाळवटात गुरफटलेले दिसतात आम्ही त्याना त्याच्या तारुण्याला साजेल अशा आनदी वृत्तीत ठवण्यासाठी केलेले सव प्रयत्न विफल होतात कारण अुलट दिशेने प्रयत्न करणारे जहाल तरुण आपल्या वजनाने अभक लोकाना राजकारणाच्या क्षुब्धतेत सहज ओढू शकतात सव अिग्लडभर पसरलल्या व अकट्या अडिवरो मध्यच १५० पयत असलेल्या या पाचश अक तरुण हिंदी लोकातून गेल्या ता १७ मेच्या सभरा अिंडिया हाअूसमध्य 'देशवीरस्मृती प्रात्यथ शभरावर अिंडियन जमावे ही अकच गोष्ट आमच्या म्हणण्याची सिद्धता करात आह! नतर टाअिम्सने अितर पुष्कळ मुद्द्याच विवरण केल आह व शेवटी सव हिंदी विद्यार्थ्याना अशा काडवाड्यात काडून त्यावर अिंग्लिशाची सक्त देखरेख अुफ पहारा ठेवावा अशी सूचना दिलली आहे स्वकरच सुटी सपताच अिंडियन विद्यार्थ्याना या राजनिष्ठच्या काडवाड्यात काडण्यात यअील ह निश्चित आहे ज निश्चित नाही त ह की अशा काडवाड्यानी कधी अत करण वळताल काय ?

## २९. अिंग्लंडच्या व्यापाराची स्वदेशीमुळे पिछेहाट

लंडन — आज दोन वर्षेपर्यंत छपवून ठेवलेले सत्य अखेर जगापुढे मांडणे अिंग्लंडला भाग पडले आहे हिंदुस्थानात स्वदेशी चळवळ व आयर्लंडात सिनफिन चळवळ सुरू झाल्यापासून या चळवळीचा आपल्या व्यापारावर काहीच परिणाम होणारा नाही व झालेला नाही अशा दिमाखाने त्या चळवळीच्या पुरस्कर्त्यांना निराश करण्याचा अिंग्रजांनी प्रयत्न चालविलेला होता हिंदुस्थानात स्वदेशी चळवळीमुळे बाजारात विलायती मालास मागणी नसताही आपल्या निर्यात व्यापारावर व हिंदुस्थानातील विलायती आयात मालावर त्याचा रतिभरही परिणाम होत नाही हे दाखविण्यासाठी आज दोन साल हिंदुस्थानकडे मागणी नसताही माल धाडण्यात येतच होता. हिंदुस्थानच्या बाजारात विक्री न झाली तरी हरकत नाही परंतु गेल्या वर्षापर्यंत हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर विलायती माल आल्याचे आकडे जमेच्या तसेच फुगलेले राखले होते. तिकडे हिंदुस्थानी गिरण्यातून तर माल जोराने बाहेर पडत होता व बाजारात स्वदेशीच खपत होता. परंतु सरकार तर अिकडे हिंदुस्थानात विलायती माल पूर्वीअितकाच येतो, हे बंदरातील आकड्यावरून प्रसिद्ध करून स्वदेशीच्या पुरस्कर्त्यांस खोटे पाडीत होते या परस्परविरुद्ध गोष्टीचे हृद्‌गतही अेका अँग्लोअिंडियन पत्राने थोडे दिवसापूर्वी प्रसिद्ध केले होते की, दोन्हीही गोष्टी खऱ्या आहेत. फरक अेवढाच की, बाजारात स्वदेशी माल जास्त खपत चाललेला आहे ! व गोदीमध्ये विलायती माल जास्त साचत चाललेला आहे ! तथापि अजूनपर्यंत अिंग्लंडच्या लोकसमाजात स्वदेशीचा खरा चटका बसण्याअितका उघड परिणाम दिसून आलेला नव्हता वास्तविक पाहता आपल्या हिंदुस्थानचे पैसे संरक्षण करणे हा स्वदेशी बहिष्काराचा मूळ व मुख्य उद्देश आहे अिंग्लंडचा व्यापार बुडाला, तरच स्वदेशी चळवळ यशस्वी झाली, असा आमचा समज नाही अिंग्लंडने हिंदुस्थानविरहित वाटेल तेथल्या बाजारात जाअून आपला व्यापार खुशाल वाढवावा त्याला हिंदुस्थानची स्वदेशी काय म्हणून आड येअील ? व अेतदर्थच जोपर्यंत हिंदुस्थानात नवीन गिरण्या, नवीन कारखाने, नवीन धंदे भराभर उघडत आहेत, तोपर्यंत अिंग्लंडच्या व्यापाराचे आकडे वाढत गेले असते, तरी देखील आमच्या स्वदेशीचा विजयच झाला असता. परंतु हिंदुस्थानाअितका भोळसट बाजार जगावर अितरत्र अिंग्लंडला कोठेही सापडणारा नसल्याने, त्या बाजारात अिंग्रजी माल कमी खपतो की नाही हे ठरविण्यास अिंग्लंडच्या व्यापाराचे आकडे हे अेक साधन आहे व त्या साधनाने देखील आता हें निर्विवाद सिद्ध होते आहे की, गेल्या दोन वर्षांच्या परिश्रमाने स्वदेशी-बहिष्काराचा विजय झालेला आहे. कारण आठ महिन्यात अिंग्लंडच्या परदेशाशी चाललेल्या व्यापाराचा आढावा नुक्ताच प्रसिद्ध झालेला आहे. त्यावरून असे स्पष्ट

हात आहे की, अिंग्लंडच्या व्यापाराला स्वदेशीने जखम केलेली आहे. या गेल्या आठ महिन्यात परदेशी व्यापाराचा आढावा देताना बोर्ड आफ ट्रेड म्हणते –

" Our Foreign Trade
Decrease of £ 72 000 000
In Eight Months

Again we have to record a falling off in trade which is sufficiently serious Decrease in the imports is £42,045,186 and decrease in the exports is £30,083 043 making an aggregate shrinkage during the present year of upwards of £72 000 000,

अशा रीतीने अिंग्लंडला ७ कोटी पौंडाची गेल्या साली ठोकर बसली आहे. अिंग्लंडमधून मात्र बाहेर देशी किती कमी गेला याचे सविस्तर आकडेही महत्त्वाचे आहेत –

| | | |
|---|---|---|
| तेलाच्या बी तेल, डिंक अित्यादि | ३॥ | लक्ष पौंड कमी गेले |
| कागद अित्यादि | २ | " " " |
| लोकर अित्यादि | ५॥ | " " " |
| लोखंडी सामान पेट्या अि | ६॥ | " " " |
| कापसाचे कपडे | ६॥ | " " " |
| लोकरीचे कपडे | ४ | " " " |
| अितर कापड | ३ | " " " |
| धातडी सामान | ५॥ | " " " |

अित्यादि आकड्यावरून अिंग्लंडला बहिष्काराचा केवढा आघात सोसावा लागत आहे हे स्पष्ट होणार आहे. परदेशात जाणाऱ्या मालाची पिछेहाट जे सांगत आहे तेच जी मालाची वाढ झालेली आहे ती वाढही सांगत आहे. कारण सर्व प्रकारच्या पिछेहाटीत अिंग्लंडातून बाहेरदेशी जाणाऱ्या यंत्रसामग्रीची मात्र वाढ झालेली आहे. कारण या वर्षी २॥ लक्ष पौंडाची यंत्रे मात्र अिंग्लंडमधून जास्त बाहेर गेली. ही वाढही तेच सांगत आहे की हिंदुस्थानात स्वदेशी चळवळ जोराचने आहे व म्हणून यंत्रे जास्त मागविण्यात येत आहेत! परंतु अिंग्लंडपेक्षा जर्मनी जपानमधून यंत्र घेण्याचा बहिष्कारवादी लौकर निश्चय करतील, तर पुढील साली हीही वाढ कमती होअील. तसेच यंत्राला लागणारा कोळसाही अिंग्लंडने ६३ लक्ष पौंडाचा बाहेर जास्त धाडला. अिकडेही हिंदुस्थान लवकरच लक्ष देअील व जपानी कोळसा घेअू लागेल. ७ कोटि पौंडापेक्षा अिंग्लंडचे खरी नुकसानी अधिकच झालेली आहे. कारण हे ७ कोटि पौंडाचे नुकसान गेल्या वर्षीच्या आकड्याशी तुलना करून ठरविले असल्याने व गेल्या वर्षीही असाच तोटा असल्यामुळे ३।४ वर्षापूर्वीच्या आकड्याचे मानाने

अिग्लडचे खरे नुकसान फारच जास्त झालेले असले पाहिजे या पिछेहाटीचा परिणामही तावडतोव अिंग्लडमध्ये होअून आपापसात वेवनाव सुरू झालेला आहे मँचेस्टर व लँकेशायरच्या व्यापाऱ्यावर या पिछेहाटीचा वहुतेक ताण पडलेला असल्याने तेथील गिरण्याच्या मालकानी मजुरात शेकडा ५ कमी पगार देण्याचे ठरविले परतु मजुरानी तसे करण्याचे नाकारून पगार कमी झाल्यास काम वद पाडू म्हणून जाहीर केले प्रत्येक दैनिकात Cotton crisis वर आर्टिकले येत आहेत ग्लासगो येथे तर काम नसलेल्या मजुरानी हजारो लोकाचे थवे करून दग्यास आरभ केलेला आहे. सोशियालिस्ट लोकही दग्यात मिसळत आहेत या दग्याची शातता करण्यासाठी, मुदर्भीच्या दग्यानतर जसे तिकडले गव्हर्नर समाचारास जात होते तसेच येथील राजपुत्रही मुद्दाम गेले होते परतु त्यानाही वेवनाव झालेल्यानी धिक्कारून परत धाडले. सभेत राजपुत्राच्या सन्मानार्थ राष्ट्रीय गीत God Save the King हे सुरू होताच मजुरीवाल्यानी हुर्यो करण्यास सुरुवात केली! व आपल्या अनत स्वरानी " Down with the Tyrant " ह्या अर्थाच्या पदमात मार्सेलिसच्या गाण्यास आरभ केला !! तरी ह्या लोकावर मुवअीच्या शाततात्रिय दयाळू गव्हर्नराप्रमाणे गोळ्या सोडण्याचा हुकूम राजपुत्राने दिल्याचे अैकिवात नाही ! अितकेच नव्हे, तर त्यातील लोकाची धरपकडही चाललेली नाही !!

—ता २ ऑक्टोबर १९०८

\+ + +

## ३०. सरदार अजितसिह व सय्यद हैदर रेझा यांचें अभिनंदन

लडन —गेल्या रविवारी फ्री अिंडिया सोसायटीतर्फे भरलेल्या लडन येथील हिंदी रहिवाशाच्या सभेत खालील ठराव सर्वानुमते पसार झाले सभेच्या अध्यक्षस्थानी दे अलीखान हे होते व सभेत हिंदु, मुसलमान, पार्शी अित्यादि सर्व पथाचे लोक अुपस्थित होते

दे सावरकर यानी पहिला ठराव पुढे आणला व त्याला डॉक्टर राजन व लाला हरदयाळ यानी अनुमोदन दिले 'देशभक्त सरदार अजितसिह यानी स्वदेशाची जी सेवा अखड रीतीने चालविलेली आहे तीवद्दल आमचे सर्वाचे मनात प्रथमपासून वसत असलेला पूज्यभाव त्याच्या तिलकाश्रमाची वार्ता अैकून अितका

प्रबळ झालेला आहे की, आज ही संधि साधून आम्ही फ्री अिंडिया सोसायटीचे आमंत्रणावरून जमलेले सर्व गृहस्थ सरदार अजितसिंह याच्या ह्या धैर्ययुक्त देश-भक्तीचे सार्वजनिक अभिनंदन करीत आहो. दाखविलेल्या भयाने वा मूर्खपणाच्या लटपटीने आपल्या मार्गापासून च्युत न होता, सरदार अजितसिंह हे ज्या राष्ट्रीय पक्षाचे ते अेकदा भक्त बनले, त्या पक्षाची सेवा आजपर्यंत अेकनिष्ठेने करीत आले आहेत व त्याची ही सेवा पुढेही अखंड चालणार अशी आम्हास खात्री वाटत आहे.'

दे आयर, बी अे यानी दुसरा ठराव पुढे आणला व त्याला वी वें दास बी अे बॅरिस्टर अॅट लॉ यानी अनुमोदन दिले 'दे सय्यद हैदर रेझा हे गेली दोन वर्षे पंजाब व सयुक्तप्रात यामध्ये आपल्या देशबांधवाना मातृभूमीच्या प्रेमाची व देशाच्या अभिमानाची जी दीक्षा देत आहेत त्याबद्दल ही सभा त्यांचे अभिनंदन करीत आहे विशेषत हिंदुस्थानातील पथभेद असलेल्या भिन्नवर्गीयाना मातृप्रेमाच्या अेकाच निशाणाखाली अेक करण्यास्तव चाललेले त्याचे प्रयत्न, त्यात त्याना येत असलेले यश व त्या राष्ट्रीय अैक्याचा राष्ट्रीय दास्यविमोचनाकडे ते करीत असलेला अुपयोग याबद्दल ही सभा त्यांची फार आभारी आहे '

–ता. १६ ऑक्टोबर १९०८

\+ + +

## ३१. दे. लो. विपिनचंद्रपाल यांचें आगमन

लंडन –ज्याच्या दिव्य प्रतिभाशक्तीला, जवळजवळ सर्व राष्ट्र अज्ञान-निद्रेत गुरफटलेले असताना, हिंदुस्थानच्या राजकीय आकाशातील क्षितिजावर स्वराज्यसूर्याचा अरुणोदय प्रथम दृष्टिगोचर झाला, ज्यानी ते आपले भविष्यदर्शन अितर स्थूलदृष्टि अपमानीत असताही, आपल्या भूमातेला अखंड विश्वासाने आजपर्यंत प्रथम केले व शेवटी ज्याच्या या मगलभूपाळीरवाने अखेर जागृत झालेली हिंदसुंदरी आज त्या पूर्वसूचित स्वराज्यसूर्याचे दर्शनासाठी हुतात्मतेची आरती घेअून अुत्सुकतेने अुभी आहे, अशा सूचक भविष्यवाद्यामध्ये जे आपल्या अलोट बुद्धिमत्तेने व वक्तृत्वाने अग्रेसरत्व पावलेले आहेत ते श्रीयुत देशभक्त बाबू विपिन-चंद्र पाल हे गेल्या आठवड्यात लंडनला येअून पोचले त्यांच्या आगमनसमयाची वार्ता जरी अगदी फक्त दोन तीन तासच आधी लंडनला मिळाली तरी चेरिंगक्लास स्टेशनवर गाडी येण्याचे पूर्वीच हिंदी लोकाची गर्दी लोटू लागली बाबू विपिनचंद्र

पाल याचे दर्शन गाडीच्या खिडकीतून होण्याचा अवकाश तोच वंदे मातरम्च्या ध्वनीच्या सरीवर सरी वर्षू लागल्या! बाबूसाहेब गाडीतून उतरताच चोहो बाजूंनी पुष्पांची वृष्टि व पालचे जयजयकार ह्यांशिवाय दृष्टीला या कर्णाला अन्य विषय गोचर होईनासे झाले स्टेशनवर असलेल्या अिंग्रज गृहस्थांना हा प्रकार अभूतपूर्व वाटावा हे साहजिकच होतें. पाल येण्याचे आधीच त्याच्या संबंधाने निरनिराळे अुद्‌गार अिंग्लिशपत्रे काढीत होती. 'That irreconcilable agitator Bipin Chandra Pal is coming to England' म्हणून वार्ता अिंग्लिश पत्रांनी आधीच पसरवलेली असल्यामुळे पालना भेटण्यासाठी अलीकडे अिंग्रजी लेखकांच्या व वृत्तपत्रकाराच्यामध्येच चढाओढ चाललेली आहे. ज्याच्या जयजयकाराने कल-कत्त्याच लोकांच्या कानठळ्या बसविल्या तो पाल आपल्या जयजयकारासह अखेर लंडनमध्येही शिरू लागला! अिंडिया हाअुसकडे बाबूसाहेब आले व तेथे त्यांचे थोडे भाषणही झाल्यावर राष्ट्रगीत होअून मंडळींना निरोप देण्यात आला बिपिन बाबूबरोबर त्यांचा मुलगाही आहे. येत्या रविवारी बिपिन बाबूंचे Nationalism वर प्रथम भाषण होणार असून येथील सर्व अिंडियनांची मने त्यांच्या या प्रथित पुढाऱ्याच्या भाषणश्रवणासाठी अुत्सुक झालेली आहेत.

—ता. २३ ऑक्टोबर १९०८

\+ \+ \+

## ३२. राखीबंधन समारंभ

लंडन —सुमारे पंधरा दिवसापूर्वी लंडनला रूटरची तार आली होती की नाशिकला हिंदुमुसलमानांना जंगी दंगा झालेला आहे व शहराच्या सुरक्षिततेसाठी देवळालीहून युरोपिअन लष्कर मागवलेले आहे ही तार वाचताच तिचा अर्थ सर्वांनाच चमत्कारिक वाटू लागला. त्या वेळेसच नाशिकच्या देशभक्त ब्राह्मणांनी गणपति अुत्सवासारख्या प्रसंगी सय्यद हैदर रेझा यांना बोलावून नेअून हिंदुस्थानभर सर्वां-नाच आश्चर्यभरित करणारे अुदाहरण घालून दिले. ही वार्ता येथून पुरते आठ दिवसही लोटले नव्हते तोच नाशिकला हिंदुमुसलमानांचा दंगा व्हावा ही चमत्का-रिक गोष्ट अैकून बहुतेकांनी असा तर्क बांधला की नाशिकच्या गणपति अुत्सवातील ते धाडसी वर्तन पाहून, त्याचा हिंदुमुसलमानांच्या सलोख्यावर होणारा परिणाम नाहीसा करण्यासाठी बंगालप्रमाणे हा भाडोत्री दंगा सजविला असेल. कित्येकांनी

भर घाला असा राष्ट्रास आग्रहाने अुपदेश केला। पहिला ठराव लाला लजपतराय यानी पुढे आणला व त्याला दे पारेख यानी अनुमोदन दिले दुसरा ठराव सहानुभूतीचा असून तो दे बिपिन बाबूनी आपल्या वक्तृत्वपूर्ण तेजस्वी वाणीने पुढे आणला व त्याला द सावरकर यानी अनुमोदन दिले तिसरा ठराव बायकॉटचा होता व तो दे खापर्डे यानी पुढे आणला व त्याला दे रामपन बी अे बॅरिस्टर अॅट लॉ यानी अनुमोदन दिले सभेचे रिपोर्ट टॉअिम्स वगैरे पत्रातून जे प्रसिद्ध झालेले आहेत व त्यावर डेलीन्यूज वगैरेनी जे लेख लिहिलेले आहेत त्यावरून ह्या सभेचे महत्वाचे स्वरुप दिसून येअील त्या सभेचे काम साडेपाचला सपल व लगेच सहाला राष्ट्रजयंतीचे सभेस आरभ झाला १६ ऑक्टोबरला देशभूने राष्ट्रपक्षाला कसा जन्म दिला, ह्याचे अत्यंत अुत्साहक, यथार्थ व देशभक्तिपूर्ण विवेचन देशभक्त लाला लजपतरायानी केल्यावर डॉ कुमारस्वामी, दादासाहेब करंदीकर, खापर्डे अित्यादीची भाषणे झाली नतर रागीयघनास प्रथमत बिपिन बाबूनी आरभ केला राष्ट्रगीताच्या गायनानतर बिपिनबाबूचे अमूल्य वक्तृत्वाचे भाषण सुरू झाले त्यानी सागितले की, मी गेल्या वर्षी या वळेस तुरुगात होतो व आज वनवासात आहे परन्तु माझे सर्व अत करण तिथे तुरुगामध्ये अरविंद घोष ग्सलेले आहत, तिथे राहिलेल आहे। जेथे बाल गगाधर आहे, तिथे त्या देशतिलकापाशी गुतलेले आहे। अरविंद व तिलक या दोन नावाचे अुच्चारण होण्यास तीस चाळीस मिनिटे लागली कारण प्रत्येक नावामाठी टाळयाचा कडकडाट व वदेमातरम्चा गजर पधरा मिनिटावर सतत चालत होता। नतर बिपिनबाबूनी ज्या तरुणानी राष्ट्रासाठी अमर्याद यातना सोसून देहाच्या ममतेला ठार मारले त्याचे स्मरण केले आणि पुन्हा सर्व हॉलभर टाळयाच्यािशवाय काही अैकू येत नाहीसे झाले त्या प्रचड कडकडाटातून वदेमातरम् हा ध्वनि मात्र सर्वाहून वर चढत जाताना अैकू येअी सभेला युरोपियन रिपोर्टर्स व इतर अिग्रजही आलेले होते त्याचे मुखावर बिपिन बाबूच्या वक्तृत्वाची छाप हुबहूब पडलेली होती।

—ता १३ नोव्हेबर १९०८

\+ + +

## ३३. हिंदी विद्यार्थ्यांसाठी कोंडवाडा

लडन —गेल्या दोन वर्षामध्ये अिग्लडमध्ये आलेल्या हिंदी विद्यार्थ्यांच्या देशभक्तीने, त्याच्या स्वार्थत्यागाने त्याच्या दुर्वर्तनपरावृत्तीने व त्याच्या वाढत्या अैक्याने व प्रेमाने ज्याच्या अत करणात काळजीचे विष पसरू लागले आहे, त्या-आपल्या अत्यत हितचितक (!) अॅग्लोअिडियन वीरानी गेल्या आठवड्यात

अेन्दाची बरेच दिवस भरवू घातलेली सभा अुरकून घेतली. पूर्वीचे स्यालीखुशालीचे रगान दग होण्याचे अैवजी अलीकडील हिंदी विद्यार्थी नेहमी सन्मानवृत्तीने राहू लागले, तारुण्यात हसत खेळत दिवस घालविण्याचे अैवजी ते चिंतामग्न दिवस व अस्वस्थ रात्री कढू लागले ! व्यक्तिविषयक चैनबाजीचे अैवजी पैसे असूनही अुपास करू लागले व अँग्लोअिंडियनांची आमंत्रणे येत असताही नाच-तमाशाना जाण्याचे नाकारू लागले ! राजकीय विषयात जितके त्याना लक्ष द्यावेसे वाटते त्याचे सहस्रांशही लक्ष स्यालीखुशालीत ते देत, तरी देखील आपल्या या 'हितचिंतकाना' अितकी काळजी लागली नसती परंतु हिंदी तरुणाची चित्तवृत्ति अितकी काही स्वार्थपरावृत्त व स्वदेशहितरत होत चालली आहे की, त्याच्या या नीतिच्युततेला लवकर आळा घातल्याशिवाय त्याचे हित करण्यास दुसरा मार्ग नाही हे अुघड दिसू लागले !

मॅझिनीला त्याच्या वयाच्या विशीच्या आत जेव्हा चिंतामग्नतेत दिवस घालविण्याची सवय लागली, तेव्हा अिटलीचे व ऑस्ट्रियनांचे हितचिंतकाकडून असेच स्पष्ट सांगण्यात आले होते की, तरुण मुलानी स्यालीखुशालीत आनंद करण्याअैवजी राजकीय गूढ विचारात गुंगणे व रात्री अेकटे व अुदासीन संन्यस्त वृत्तीने विचार करीत फिरणे, हे सरकारास कधीही खपणार नाही ! !

अिंग्लंडमधील अँग्लोअिंडियनांची व हिंदुस्थानच्या गोऱ्या हितचिंतकाची ही काळजी अतिशय वाढत चाललेली आहे दर आठवड्यास परमेश्वरभजनार्थितके नियमाने आज सतत दोन वर्षे, अीश्वरी ध्येयाचे मूर्त चिन्ह असलेल्या देशभूमीचे भजनासाठी हिंदी विद्यार्थ्याची अखंड चाललेली कीर्तने, त्यातील त्याच्या दिसून आलेल्या देशमय चित्तवृत्ति, पालकाच्या आज्ञा मोडूनही कित्येकानी सोडलेले सिव्हिल सर्व्हिसचे कोर्स, स्वातंत्र्य देशयोगाची टोलेजंग सभा, देशातील लोकासाठी महिनाभर केलेले अुपवास, सायरेन्सेस्टर कॉलेजामधील बाणेदार वर्तन, टिळक, साअुथ आफ्रिका, राष्ट्रजयंती वगैरे प्रसंगाच्या त्यानी भरविलेल्या टोलेजंग सभा व त्यात वृद्ध लोकाचा त्यांचेवर परिणाम होण्याअैवजी, त्याच्या अुल्हासाने वृद्धाच्याच अंगात शिरत चाललेले नवीन वारे, या सर्व परंपरेने चिंतामग्न झालेल्या अिंग्रजी सद्गृहस्थानी परवा या विषयाचा आजपर्यंत चाललेला निमसरकारी व वर्तमानपत्री खल मथवून अुघड चर्चा करण्याकरिता सभा भरविली सरकारच्या कृपेतील दे गुप्त, अमीरअल्ली, करहानसिंग, वगैरे वजनदार लोक दे भावनगरी वगैरे जबाबदार लोक, सर कर्झन वायली, मिस बेक, डॉ. पोल्न व अितर विख्यात सरकारी व निमसरकारी अिंग्रज देशभक्त, विपिनचंद्र, खापर्डे, करंदीकर वगैरे पुढारी व तरुण विद्यार्थ्यांची बहुतेक मंडळी यानी कॅक्स्टन हॉल भरलेला होता. अध्यक्षस्थानी मुंबअीचे माजी गव्हर्नर लॉर्ड लॅमिंग्टन हे

होते डॉ पोलन सी आय ओ यानी अिंडियन विद्यार्थ्यांना अेका केंद्रात आणणे व त्याचे चळवळीला त्याच्याच हितासाठी दावात ठेवणे किती अवश्य आहे याचा विवरणात्मक निबंध वाचला व हिंदी विद्यार्थ्यांची वर्तणूक अलीकडे फार विघडून नीतिच्युत होत चाललेली आहे वगैरे विधान केली नतर लॉर्ड लॅमिग्टन हेही त्याला मान डोलवून म्हणाले की, अिंडिया ऑफिसनेही (सरकारी मुख्य कचेरी) प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीने या होतकरू कल्पनेला साहाय्य करून हिंदी विद्यार्थ्यांवर देखरेख ठवणे हे हिंदी विद्यार्थ्यांचश फार फार हिताचे आहे अशा या सभेत काय प्रकार घडला हे अिंग्रजी पत्राच्या भाषेतच सागणे अिष्ट आहे डेली क्रॉनिकल म्हणते—

## DISLOYAL STUDENTS

### Indian Hostile Demonstration at London Meeting

A demonstration of disloyalty on the part of the Indian Students was witnessed yesterday Lord Lamington referred to the King's proclamation and said that the proclamation, that very great Document, which was promulgated yesterday (loud hissings and derisive laughter) stated our feelings towards them We do wish them well (booing and laughter by the students and cheers by the Britishers) When an Indian student affirmed that there must be awakening in the Indian students first and foremost of a senese of loyalty to the English throne and to the person of the King (The hissings and the derisive laughter were tremendous and the Chairman had to call for order) ह्याप्रमाणे अितर पत्रातूनही मोठमोठाले मथळे देअून छापले आहे की, 'राजद्रोही हिंदी विद्यार्थी काल्च्या सभत जेथे तेथे हुत हुशचा प्रचड मारा सुरू करीत फार काय पण लॉर्ड लॅमिग्टनन परवाच्या जाहीरनाम्याचा अुल्लेख करताच हसणे, ओरडणे हुश हुश करणे याच्या वादळात अध्यक्षाना तं वाक्य मोडणे भाग पडले ! अेक हिंदी विद्यार्थी म्हणाला की राजाचे राज्यपद व मुकुट याच्याबद्दल राजनिष्ठा व प्रीति हिंदी विद्यार्थ्यांनी प्रथमत संपादिली पाहिजे तेव्हा पुन्हा हुरनचा मारा चालला ! तो हिंदी विद्यार्थी (हे गृहस्थ मुंबअीचे वकील वेलिणकर असून ते अितके वृद्ध आहत की त्याना विद्यार्थी म्हणणे हे अुद्धटपणाचेच लक्षण होअील) संतापून पुन्हा पुन्हा म्हणाला 'ह्या धिक्काराचा अर्थ काय ? राजाचे मुकुटाबद्दल व व्यक्तींबद्दल आम्ही अप्रतिम पूज्य भाव ठेवलाच पाहिजे' हे तो म्हणताच पुन्हा धिक्कार शब्दाचा अितका मारा झाला की त्याला भाषण संपवून बसावे लागले! अितक्यात अेक अिंग्रज गृहस्थ संतापून अुभा राहिला व अेका हिंदी गृहस्थाकडे

घोंट दाबयून म्हणाला की मी ह्या मनुष्याला आमच्या राजाच्या नावाचा धिक्कार करताना पाहिले तर त्याला आता काढून दिले पाहिजे ! परंतु ह्या संतापाचा काही अेक परिणाम न दिसून सभेत अुलट वाचावाचीच अधिक वाढत चालल्याने त प्रकरण शेवटास नेता येणे दुष्कर झाले व तथेच संपले ! लार्ड लॅमिंग्टन यांनी मुंबअी अिलाख्यावर राज्य केले त्याना टाळी नाही अुत्थापन नाही परंतु जेव्हा बिपिनचंद्र पाल नावाचा वक्ता अुठला तेव्हा हिंदी विद्यार्थ्यांनी त्याचा अप्रतिम सत्कार करण्यास आरंभ केला व जयजयकार अेकसारखा सुरू ठेवला (Bipin Chandra Pal received quite an ovation when he got up from Indian Students which lasted for several minutes) अशा घोटाळ्यात व वाचावाचात ती सभा पार पडली ! पुन्हा अशी सभा न भरविणच अिष्ट आहे, असा धडा यापासून शिकणे अिंग्लिश लोकांच्याच हिताचे आहे नव्हे काय ?

—ता २७ नोव्हेंबर १९०८

\+ \+ \+

विपिनबाबूंच्या नंतर देशभगिनी विदुषी कामाबाओी यांचेही अेक स्वातंत्र्यपोषकतेचे व्याख्यान झाले. त्यांनी आपले राष्ट्रीय निशाण हातात धरून फडकवितांच सर्व सभा अुभी राहिली व वंदेमातरम्‌च्या गर्जनांचा वर्षाव सुरु झाला ही व्याख्याने सुरू असतांच रविवार ता २० डिसेंबर रोजी सर्व हिंदुस्थानी लोकांची राष्ट्रीय परिषद भरविण्याची सूचना शुक्रवारी सभेपुढे मांडण्यात आली होती प्रथमत ही परिषद नागपुरास भरणाऱ्या टिळकपक्षीय कॉंग्रेसच्या पुष्टीप्रीत्यर्थ भरविणे होते। परंतु सरकारच्या हटवादी आततायीपणाने नागपूरच्या कॉंग्रेसची गळेदाबी झाल्याची वार्ता त्याच सुमारास आल्याने सर्वानुमते ही परिषद स्वतंत्र त्याच लंडनमध्ये भरवावी असे ठरले व त्याप्रमाणे दि २० रोजी कॅक्स्टन हॉलमध्ये येथील सर्व दर्जाच्या, वयाच्या व ठिकाणाच्या लोकांची गर्दी होअू लागली ऑक्सफर्ड, केंब्रिज, मांचेस्टर वगैरे सर्व ठिकाणाहून हिंदी लोक आलेले होते पॅरिसहून देशभक्त राणा हेही आलेले होते. अध्यक्षस्थानी देशभक्त खापर्डे यांची सर्वानुमते निवडणूक झाली व त्यांनी राष्ट्रीय पक्षाची बाजू सत्याला व अेक्याला धरून आहे हे प्रमाणसिद्ध करून दाखविले ' आमच्या करण्यात व आमच्या मागण्यात भयंकर ते काय आहे ? अिंग्रज लोक अिंग्लंडात जसे आहेत, फ्रान्स देशात फ्रेंच लोक राहतात व अमेरिकेन लोक अमेरिकेत ज्या हक्काचा अुपभोग घेतात त्या हक्काचा अुपभोग आम्ही आमच्या देशात घेअू अिच्छितो अिंग्लंडमध्ये अिंग्लिश लोक जसे राहतात तसे राहणे जर तुम्हाला भयंकर वाटत नाही तर हिंदी लोक हिंदुस्थानात तसे राहू अिच्छितात, त्यात तुमचा अितका संताप व गल्बला का व्हावा अित्यादि आशयाचे लो दादासाहेबांचे भाषण झाल्यावर दे डॉक्टर कुमारस्वामी (अेक देशभक्त व विद्वान युरेशियन हिंदी) यांनी स्वराज्याचा पहिला ठराव सभेपुढे मांडला डॉ कुमारस्वामी यांचे लेखनकौशल्य व कलाप्रवीणता अिंग्लंडमध्ये मान्य व प्रसिद्ध आहे त्यांनी आणलेला ठराव ' हिंदुस्थानच्या अत्युच्च लक्षाचा होव हिंदुस्थानसाठीच नव्हे, तर दडपशाहीच्या भवयीने अंगात शिरलेली अनीतिमत्ता नाहीशी होअून अिंग्लंडचे कल्याण व्हावे, यासाठीही हिंदुस्थानने पूर्ण स्वतंत्र झालेच पाहिजे.' स्वराज्याचा ठराव असा होता —' आपल्या राष्ट्राच्या पूर्ण व सर्वांगीण अुन्नतीला व आमच्या अीश्वरदत्त अधिकाराच्या अुपभोगाला ज्याच्या प्राप्तीनेच सुसाध्यता येणारी आहे, त्या स्वराज्याच्या, पूर्ण स्वातंत्र्याच्या अंतिम साध्याला ही परिषद पूर्ण मान्यता देत आहे ' डॉ कुमारस्वामी यांनी मांडलेल्या या ठरावाला दे सावरकर यांनी अनुमोदन दिले स्वराज्याचा सत्य अर्थ, पूर्ण स्वातंत्र्य हाच असून जितक्या स्पष्ट अुच्चाराने ह्या साध्याला तुम्ही संमति देत आहात परंतु ती संमति देण्यापूर्वी त्या शब्दाचा खरा अर्थ ध्यानात बाळगा या अंतिम साध्याला संमति देण्यापूर्वी तुरुंगाच्या भिंती व अंधाराच्या

घोट दाखवून म्हणाला की मी ह्या मनुष्याला आमच्या राजाच्या नावाचा धिक्कार करताना पाहिल तर त्याला आता काढून दिले पाहिजे! परंतु ह्या सतापाचा काही अेक परिणाम न दिसून सभेत अुलट वाचावाचीच अधिक वाढत चालल्याने ते प्रकरण शेवटास नेता येणे दुष्कर झाले व तेथेच सपले! लार्ड र्लमिंग्टन यांनी मुंबअी अिलाख्यावर राज्य केले त्याना टाळी नाही अुत्थापन नाही, परंतु जेव्हा विपिनचंद्र पाल नावाचा बगाली अुठला तेव्हा हिंदी विद्यार्थ्यांनी त्याचा अप्रतिम सत्कार करण्यास आरंभ केला व जयजयकार अेकसारखा सुरू ठेवला (Bipin Chandra Pal received quite an ovation when he got up from Indian Students which lasted for several minutes) अशा घोटाळ्यात व वाचावाचात ती सभा पार पडली! पुन्हा अशी सभा न भरविणेच अिष्ट आहे. असा धडा यापासून शिकणे अिंग्लिश लोकांच्याच हिताचे आहे नव्हे काय?

—ता २७ नोव्हेंबर १९०८

\+ \+ \+

## ३४ राष्ट्रीय परिषद!

लडन —देशभक्त विपिन बाबू यांच्या व्याख्यानमालेला गुरुवार ता १८ डिसेंबर रोजी केक्स्टन हॉलमधील भव्य हॉलमध्ये आरंभ होअून गेल्या सोमवारी तिचा समाप्ति झाली या व्याख्यानातील अुदात्त तत्त्वविचार अुत्साहक वक्तृत्व, अखोट देशभक्ति कुशाग्र तर्क व अमोघ कोटिक्रम यांच्या योगाने या व्याख्यानातील साराश देण्याचा प्रयत्न करणे म्हणजे त्याचे स्वारस्य बिघडविणे होय, व त्याच्या श्रवणाने मोहित झालेल्या श्रोत्यांच्या आग्रहावरून ती व्याख्याने लवकरच समग्र छापावयाची असल्याने त्यांचे साराश देणे म्हणजे नाहीच घालविणे होय अेतदर्थ आजच्या वर्तमानपत्रात त्या व्याख्यानाविषयी काहीच विशेष न लिहिता फक्त अितकेच सांगणे बस्स आहे की गेल्या दहा बारा दिवसात लडनच्या हिंदी लोकातच नव्हे तर बऱ्याच अिंग्रजी मडळातही व्याख्यानाशिवाय दुसरी चर्चा अैकू येत नाही तिकिटांना अडीच रुपये किंमत होती व सर्व व्यवस्था अेका आठवड्यात घाअीघाअीने केलेली होती तथापि बहुतेक हिंदुस्थानी व कित्येक अिंग्लिश लोक यांच्या झुंडी व्याख्यानास लोटत होत्या सध्याकाळ कधी होते व हॉलमध्ये शिरण्यास कधी मिळते असे सर्वांस होअून जात असे दुसरे दिवशी

विपिनबाबूंच्या नतर देशभगिनी विदुषी कामाबाओी यांचेही अेक स्वातन्त्र्यपोषकतेचे व्याख्यान झाले त्यांनी आपले राष्ट्रीय निशाण हातात धरून फडकवितांच सर्व सभा अुभी राहिली व वदेमातरम्‌च्या गर्जनाचा वर्षाव सुरू झाला ही व्याख्याने सुरू असतांच रविवार ता २० डिसेंबर रोजी सर्व हिंदुस्थानी लोकांची राष्ट्रीय परिषद भरविण्याची सूचना शुक्रवारी सभेपुढे मांडण्यात आली होती प्रथमत· ही परिषद नागपुरास भरणाऱ्या टिळकपक्षीय कॉंग्रेसच्या पुष्ट्यर्थप्रीत्यर्थ भरविणे होते । परंतु सरकारच्या हटवादी आततायीपणाने नागपूरच्या कॉंग्रेसची गळेदाबी झाल्याची वार्ता त्याच सुमारास आल्याने सर्वानुमते ही परिषद स्वतंत्र त्याच लंडनमध्ये भरवावी असे ठरले व त्याप्रमाणे दि २० रोजी कॅक्स्टन हालमध्ये येथील सर्व दर्जांच्या, वयाच्या व ठिकाणाच्या लोकांची गर्दी होअू लागली ऑक्सफर्ड, केंब्रिज, सायरेन्सेस्टर वगैरे सर्व ठिकाणाहून हिंदी लोक आलेले होते पॅरिसहून देशभक्त राणा हेही आलेले होते. अध्यक्षस्थानी देशभक्त खापर्डे यांची सर्वानुमते निवडणूक झाली व त्यांनी राष्ट्रीय पक्षाची बाजू सत्याला व अंक्याला धरून आहे हे प्रमाणसिद्ध करून दाखविले ' आमच्या करण्यात व आमच्या मागण्यात भयंकर ते काय आहे ? अिंग्रज लोक अिंग्लंडात जसे आहेत, फ्रान्स देशात फ्रेंच लोक राहतात व अमेरिकन लोक अमेरिकेत ज्या हक्काचा अुपभोग घेतात त्या हक्काचा अुपभोग आम्ही आमच्या देशात घेअू अिच्छितो अिंग्लंडमध्ये अिंग्लिश लोक जसे राहतात तसे राहणे जर तुम्हाला भयंकर वाटत नाही तर हिंदी लोक हिंदुस्थानात तसे राहू अिच्छितात, त्यात तुमचा अितका संताप व गल्बला का व्हावा अित्यादि आशयाचे लो दादासाहेबांचे भाषण झाल्यावर दे डॉक्टर कुमारस्वामी (अेक देशभक्त व विद्वान युरेजियन हिंदी) यांनी स्वराज्याचा पहिला ठराव सभेपुढे मांडला डॉ कुमारस्वामी यांचे लेखनकौशल्य व कलाप्रवीणता अिंग्लंडमध्ये मान्य व प्रसिद्ध आहे त्यांनी आणलेला ठराव ' हिंदुस्थानच्या अत्युच्च लक्षाचा होय हिंदुस्थानसाठीच नव्हे, तर दडपशाहीच्या सवयीने अंगात शिरलेली अनीतिमत्ता नाहीशी होअून अिंग्लंडचे कल्याण व्हावे, यासाठीही हिंदुस्थानने पूर्ण स्वतंत्र झालेच पाहिजे.' स्वराज्याचा ठराव असा होता —' आपल्या राष्ट्राच्या पूर्ण व सर्वांगीण अुन्नतीला व आमच्या ओीश्वरदत्त अधिकाराच्या अुपभोगाला ज्याच्या प्राप्तीनेच सुसाध्यता येणारी आहे, त्या स्वराज्याच्या, पूर्ण स्वातन्त्र्याच्या अंतिम साध्याला ही परिषद पूर्ण मान्यता देत आहे ' डॉ कुमारस्वामी यांनी मांडलेल्या या ठरावाला दे सावरकर यांनी अनुमोदन दिले स्वराज्याचा सत्य अर्थ, पूर्ण स्वातंत्र्य हाच असून अितक्या स्पष्ट अुच्चाराने ह्या साध्याला तुम्ही संमति देत आहात परंतु ती संमति देण्यापूर्वी त्या शब्दाचा खरा अर्थ लक्षात बाळगा या अंतिम साध्याला संमति देण्यापूर्वी तुरुंगाच्या भिंती व अंधाराच्या

गुहा अित्यादिकाची चित्रे डोळ्यापुढे आणा. त्या चित्राच्या भयानक देखाव्यात तुम्हाला आकर्षण करणारे मनोहरत्व दिसते आहे की नाही हे पहा. विस्तवाच्या निखाऱ्यावर पाय ठेवून तो मृदु गादीवर ठेवल्याप्रमाणे अचचल पडत आहे की नाही हे निश्चित करा व मग ह्या असाह्य यज्ञात — आनंदात बलिदान करण्याची अुत्कट अिच्छा होत आहे, असे जर तुम्हास वाटत असेल, तरच ह्या ठरावास आज संमति द्या नाहीतर घाअी करण्यात काही हशील नाही. स्वराज्य हे दिव्य आहे व दिव्य अंतःकरणातच ते वृद्धिंगत होअू शकते ' हे अनुमोदन संपताच टाळ्यांच्या अखोट नादाला आरंभ झाला, अेकहीजण विचारले असता विरुद्ध गेला नाही व सर्वानुमते ह्या पूर्ण स्वातंत्र्यात्मक स्वराज्याचा ठराव पसार झाला, दुसरा ठराव बायकॉटचा असून तो देशभगिनी विदुषी कामाबाअी यांनी पुढे मांडला. अमेरिकेच्या बायकॉटचा अितिहास सांगून त्या म्हणाल्या, ' हिंदुस्थानातील तरुणांनो ! ' बहिष्कार ' हाच जयघोष चालू केला पाहिजे. ठराव हेच सांगतो की, बहिष्कार हे स्वराज्याचे अेक महत्त्वाचे साधन असून त्याची अमलबजावणी प्रत्येक दिशेने करण्यात आली पाहिजे.' देशभगिनी कामाबाअींच्या भाषणानंतर दे. वर्मा यांनी अनुमोदन दिले व ठरावही सर्वानुमते पसार झाला. नंतर तिसरा ठराव तुर्कस्थानच्या लोकांनी लोकसत्तेच्या तत्त्वावर राज्यपद्धति नेल्याबद्दल त्यांचा गौरव करण्याचा असून, तो दे. आयर यांनी पुढे ओणला चौथा ठराव ठिकठिकाणी राष्ट्रजागृति होअून स्वातंत्र्यप्राप्तीचे जे प्रयत्न सुरू झालेले आहेत, त्या सर्व प्रयत्नास व अिजिप्त, अिराण व आयर्लंड येथील प्रयत्नास आमची पूर्ण संमति असल्याबद्दलचा होता तुर्कस्थानच्या ठरावावर दे. आगाखान यांनी देशभक्तिपरिप्लुत असे भाषण केले व ऑस्ट्रियन मालाचाच नव्हे, तर हिंदुस्थानने ब्रिटिश मालावरही बहिष्कार घालावा, असे जमे सांगितले, तसेच अिजिप्शियन संस्थेचे सेक्रेटरीने सांगितले की, ' हिंदुस्थान व अिजिप्त यांची अमर दोस्ती राहो मी बाहू पसरून तुम्हास सांगतो की, हे हिंदी जनहो, या व अिजिप्तला आलिंगन द्या. तुम्ही तुमचा माल अिजिप्तमध्ये धाडा, आम्ही आमचा बाजार तुमच्या मालाला खुला केला आहे अिजिप्त तुमच्यावर भावासारखे प्रेम करीत आहे ' याच्या दुसऱ्या दिवशी बिपिनबाबूंचे भाषण झाल्यावर अिजिप्तच्या सेक्रेटरीने प्लॅटफार्मवर जाअून बिपिनबाबूंना आलिंगन दिले ! पाच मिनिटे अिजिप्त व अिंडिया आलिंगन देत व्यासपीठावर अुभे होते. सर्व अुभे असून जिजिप्तचा जयजयकार व वंदेमातरम्‌चा तालनिनाद यांनी सभास्थान दुमदुमून राहिलेले होते ! !

यापुढील ठराव मि मोर्लेच्या सुधारणाबद्दलचा असून त्यात म्हटलेले होते की, सुधारणा अितक्या क्षुल्लक व फसवणुकीच्या आहेत की, त्याच्या योगाने देशप्रगतीला अडथळा होअील व नोकरीच्या तुकड्यासाठी भांडणाची पद्धति वाढून जातीजातीत वैमनस्ये अुत्पन्न होतील. ह्या सुधारणा आमच्या बुद्धिमत्तेचा अुपमर्द-

प्रेरणाऱ्या असून आमच्या आशेवर कुठार होणाऱ्या आहेत' हे विपिनचंद्र पाल यांचे यावर फारच मुद्देसूद भाषण झाले नंतर स्वदेशी व राष्ट्रीय शिक्षण याचे ठराव कलकत्त्याच्या राष्ट्रीय कांग्रेसने पसार केलेले जसेच्या तसेच पसार करण्यात आले मद्रासची स्वयमन्य नेमस्त काँग्रेस ही राष्ट्रीय काँग्रेस होऊच शकत नाही व वसाहतीचे स्वराज्य ही अशक्य, अधळी व अनर्थक अेतदर्थच त्याज्य कल्पना आहे वगैरे ठरावही पास करण्यात आले व अशा रीतीने अुत्साहात व अेकमताने ही परिषद पूर्ण झाली.

—ता. १५ जानेवारी १९०९

\+ + +

## ३५. श्रीगुरु गोविंदसिंह महाराजांचा जन्मोत्सव

लंडन.— मातृभूमीपासून हजारो मैलावर दुरावले असताही गेल्या आठवडयात क्षणभर आपण हिंदुस्थानच्या वातावरणातच प्रवेशलो आहोत की काय असा भास होत होता युरोपियन देशात जन्मास आला असता, तर ज्या पुरुषाचे नाव जगातील प्रत्येक मनुष्याच्या तोंडी झाले असते, त्या श्रीगुरु गोविंदसिंह महाराजांची जन्मतिथि लंडनमध्ये अितक्या अुत्साहाने, डौलाने व अभूतपूर्व दणक्याने गाजविली जाअील हे दोन वर्षांपूर्वी कोणास खरे देखील वाटले नसते परंतु राष्ट्रीय क्रांतीच्या लाटा जो जो आत्मबलाच्या अविश्वासाला फेकून देअून आत्मबलाच्या विश्वासाला अुत्पन्न करीत आहेत, तो तो परराष्ट्रातील थोर पुरुषापुढे दास्यात्मक नमन करणे सोडून देअून स्वकीय थोर पुरुषाच्या चरित्राला माननीय व मानवर्धक प्रणिपात करण्याकडे तरुणाचा कल वाढत चाललेला आहे राष्ट्रीयत्वाचा पाया म्हणजे राष्ट्रीय विभूतींचे अितिहास होत. हिंदुस्थानात श्रीगुरुगोविंदाचा राष्ट्रीय कुंभद अजून झालेला नसतानाही लंडनसारख्या आजपर्यंत हिंदी तरुणाना जास्त नीतिभ्रष्ट व परस्तुतिपाठक बनविणाऱ्या शहरात तो प्रसंग अशा दिमाखाने गाजला जावा, यापेक्षा वृद्धिंगत देशभक्तीचे दुसरे चिन्ह ते काय असू शकणार? ह्या आमच्या वृद्धिंगत देशभक्तीलाच डॉ. पोल व अितर अँग्लोअिंडियन 'नीतिभ्रष्टता' म्हणत आहेत! त्यांच्या म्हणण्याप्रमाणे ही तरुण भारताची वृद्धिंगत 'नीतिच्युतता' गेल्या आठवडयात अननुभूत जोराने प्रत्ययास आली कॅक्स्टन हॉलमध्ये ता. २९ डिसेंबर रोजी हिंदी व अिंग्रज लोकांची गर्दी होअू लागली जरी त्या दिवशी लंडन शहरच्या मानाने हवा वाअीट होत होती, तरी समाजाची अनपेक्षित संख्या

जमलेली होती सभास्थानी गुलाबी रंगाची भव्य पताका लावलेली असून तिच्यावर अत्यंत कुशल रीतीने 'देग तेग फत्ते' ही अक्षरे लिहिलेली होती ती लालच्या गुलाबी रंगात फारच खुलत होती Honour to the sacred memory of Shree Guru Govind Singh ह्या खाली Prophet, Poet and Warrior ही अक्षरे निरनिराळया युक्त रंगात लिहिलेली होती हे भव्य व शुभसूचक निशाण, पुष्पे, धूपाचा सुगंध, व प्रख्यात विभूतीचे नामस्मरण व राष्ट्रीय पताकाचे अुज्ज्वल रंग ह्यामुळे सर्व हॉलला अेखाद्या देवालयाचे पावित्र्य प्राप्त झालेले होते अध्यक्षस्थानी देशभक्त विपिनचंद्र पाल याची योजना झाल्यावर राष्ट्रगीताचे गायन झाले. बंगाली, 'आमार देश' व मराठी 'प्रियकर हिंदुस्थान'। ही गीते अुदात्त मनोवृत्तींना अुचंबळवीत असताना दोघा शीख तरुणांनी गुरु नानकाच्या ग्रंथातून धार्मिक प्रार्थना पजावीत आहेत त्या म्हणून दाखविल्या नंतर प्रो गोकुलचंद अेम् अे. (दयानंद कॉलेज) याचे निबंधवाचन सुरू झाले गुरु गोविंदसिंह याच्या चरित्राचे कथन अितिहासात्मक सुरस व आवेशयुक्त केल्यावर गोकुलचंद म्हणाले की, ह्या अत्यंत प्रख्यात पुरुषाचा नामोच्चार आम्हा हिंदूच्या हृदयाला जो अभिमान, प्रेम, आत्मनिष्ठा व पूज्यभाव देतो तो, ख्रिश्चन लोकाना ख्राअिस्टचे नामोच्चारावरोबर जी मनोभावना अुत्पन्न होते, तिच्याशीच काय तो तुलला जाअू शकेल। श्रीगुरु गोविंदानी आपल्या देशाविरुद्ध व स्वराज्याविरुद्ध जाणाऱ्या हिंदु देशद्रोह्यानाही म्लेच्छाअितकेच सळो का पळो केलेले होते देशबंधु गोकुलचंद याचे व्याख्यानानंतर लो. लाला लजपतराय ह्याचे व्याख्यान झाले ते म्हणाले की, गुरु गोविंद हे हिंदुस्थानातील अत्यंत थोर विभूतींतील अेक असून पंजाबमधली तर अनन्य, अत्यंत थोर विभूति होत या थोर विभूतीची चार लहान अर्भके त्याच्या शत्रूच्या रोषाला बळी पडली श्रीगुरु गोविंदसिंह हे खरे सिंह होते लाला लजपतरायानंतर अध्यक्ष विपिन च.पू याचे सुश्राव्य व स्फूर्तिदायक भाषण झाले ते म्हणाले की, हिंदुस्थानात जी नवी जागृति, नवा पक्ष म्हणून म्हणत आहेत ती जागृति नवी नाही व पक्षही नवा नाही मनुष्याच्या दैविक शक्तीचा विकास करण्यासाठी श्रीगुरु गोविंदसिंह झटले. अध्यक्षाचे भाषण झाले तरी श्रोत्याचा हट्ट सावरकरानी बोलावे असा वाढत चाललेला पाहून विपिनबाबूनी दे सावरकराना बोलण्यास भाग पाडले दे सावरकर म्हणाले की, निशाणाच्या वरती लिहिलेले तीन शब्द जे 'देग, तेग, फत्ते' याचा अर्थ पुष्कळाना कळणार नाही शीख धर्माची व गुरु गोविंदसिंहाच्या चरित्राची ही तीन शब्दांची फुली आहे व ती श्रीगुरु गोविंदसिंहानीच अुच्चारलेली आहे देग म्हणजे तत्त्व होय, तेग म्हणजे तरवार होय व फत्ते म्हणजे विजय होय तरवारीवाचून तत्त्वही पगू पडते असे पाहून गोविंदसिंहानी तरवार अुपसली आणि हिंदुपक्ष शेवटी विजयी झाला

नंतर फलप्रसादाची वाटणी झाल्यावर गुरुगोविंदाच्या जयजयकारात व वंदे मातरम्च्या जयघोषात सभा बरखास्त झाली हया सभेत हिंदुस्थानच्या वृद्धिंगत होणाऱ्या राष्ट्रैक्यासाठी हिंदु, मुसलमान, पार्शी वगैरे सर्वजणानी राष्ट्रीय विभूतीचा सन्मान करण्यासाठी अेकत्र जमाव या देखाव्याची कल्पना अिंग्रजी लोकाना येती झाली टाअिम्स, डेली टलिग्राफ, मिरर, डेली अेक्सप्रस वगैरे अुभय पक्षाच्या प्रमुख पत्रानी सभेवर प्रशसात्मक मजकूर लिहिलेला आहे डली मिररने त्या प्रसगी फोटो घेअून तो काल प्रसिद्ध केला

माझी अशी अिच्छा आहे की, पुढील साली डिसबरच्या या २९ व्या तारखेस सर्व महाराष्ट्रभर गुरु गोविंदाचा जयजयकार होणे अत्यत आवश्यक आहे प्रत्यक पत्रातून, प्रत्येक व्यायामपीठावरून, प्रत्यक सभागृहातून व प्रत्येक कठातून गुरु गोविंदाचा जयजयकार दणाणून रहावा व त्यायोगे या राष्ट्रविभूतीच्या स्मृतीला महाराष्ट्राने आपला नम्र प्रणिपात अर्पण करावा कारण त्या महात्म्याचा दह पजाबच्या स्वात्त्र्यास्तव झटून थकेर जेव्हा श्रमी झाला तेव्हा विश्रातीसाठी तो गोदावरीच्या तीरी नादेड येथे येअून राहिला व त्या पवित्र देहाच्या तेजस्वी भस्माचे रक्षण अजून महाराष्ट्रच करीत आहे जेथे श्रीगुरु गोविंदसिंहाची पुनीत देहरक्षा साठविलेली आहे, त्या नादेड गावी हजारो शीख यात्रेला येतात तेथेच महाराष्ट्रानेही यात्रा न्यावी अशी माझी अुत्कट अिच्छा आहे ! !

—ता २२ जानेवारी १९०९

\+ + +

## ३६. स्वराज्याच्या जयघोषाचा परिणाम

लडन — हल्ली अिंग्लडात असे अेक पत्र नाही की, ज्यात हिंदुस्थानविषयी प्रत्येक दिवशी काही ना काही तरी मजकूर, चर्चा व वादविवाद सुरू राहत नाही पाच वर्षांपूर्वी अेक महिन्याला अेक आर्टिकल लिहिल, म्हणजे ते पत्र हिंदुस्थानच कैवारी होत असे डेलीन्यूजचे दोअर दसील दादाभाअींनी विकत घेतले, का तर त्या पत्राने काहीतरी हिंदुस्थानबद्दल खरडावे म्हणून ! आज अिंग्रजी पत्र हिंदुस्थानी लेखक धुडीत फिरत आहेत, की त्यानी हिंदुस्थानबद्दल काही तरी माहिती लिहावी ! हा फरक कसा झाला ? गोखल्याची 'लेक्चर' तर पूर्वीही होत होती व हल्लीही होत आहेत तेव्हा हा फरक त्यांनी केला असे म्हणता येत नाही नवीन कारण काय घडल ? असा कोणता आवाज गेल्या दोन वर्षांत झाला की, अेकदम अिंग्लडची चसलेली कानठळी खुली होअून त्याना हिंदुस्थानचे नाव अैकू येअू लागल ?

स्वराज्याच्या जयघोषाचा तर परिणाम नसेल ना? अिंग्लंडकडे दुर्लक्ष करण्याची जी स्वदेशी चळवळीची प्रवृत्ति आहे तिचा तर हा परिणाम नसेल ना! कसेंही असो, कोणता तरी विलक्षण आवाज, गोखल्यांच्या निरुपद्रवी भाषणें करण्याहून भिन्न, असा अिंग्लंडने अैकला आहे खास व तें आपण होअूनच हिंदुस्थान आहे तरी काय हा प्रश्न विचारीत दचकल्यासारखें, गांगरल्यासारखें, भीत भीत पण दिमाखी डौलात तपास करीत फिरत आहे.

मोर्लेच्या सुधारणात आम्हांला काहीच मिळाले नाही म्हणून मुसलमान लोक कुरकूर करू लागले; तेव्हा टाअिम्सने व अिव्हिनिंग न्यूजने लेख लिहून ठाम मत दिले की आपण हिंदुस्थान मुसलमानापासून जिंकले आहे व मुसलमान प्रथमपासून राजनिष्ठेचे खांब आहेत. तेव्हा त्याना नेहमी खूप राखले पाहिजे. डेली न्यूजने तितकेच ठासून मत दिले की, आपण हिंदुस्थान मराठ्यापासून जिंकलें आहे व मुसलमानाना पक्तिप्रपच दाखविण्याअितकी दुसरी कोणतीच गोष्ट हानिकारक नाही. अेतदर्थ मुसलमानाची हाकाटी व्यर्थ आहे! अशी अुपदेशाची वेवदशाही चाललेली आहे.

पण स्टँडर्ड पत्र म्हणते की, या क्षुल्लक गोष्टी आहेत त्यांच्या गर्दीत सरकारने गुप्त राजद्रोही चळवळीकडे दुर्लक्ष करावे ही अत्यत शोचनीय गोष्ट आहे- हे म्हणते: 'A striking example may be given of the atrocious endeavour of Indian residents in England, to inflame the discontent that infects some classes among their countrymen, and sows among their young men the seeds of rebellion Grossly seditious pamphlets are sent out in large quantities headed 'Two Historic Documents', the obvious intention being to counteract any good effect produced by His Majesty's Proclamation. नतर या 'Two Historic Documents' नावाच्या पत्रकातील अुतारे देअून स्टँडर्ड अेक अग्रलेखही खरडू लागले. त्याच्या हिंदुस्थानच्या बातमीदाराने गुप्त बातमी अुजेडात आणली व हें पत्रक स्टँडर्डला दीड महिन्यात धाडलें याबद्दल अितर पत्रापेक्षा आपल्या पत्राच्या बातमीदाराच्या चापल्याने स्टँडर्डला खूप धन्यता वाटते आहे! ते असें म्हणते की, असली पत्रकें स्फोटकारक द्रव्यापेक्षाही फार भयकर आहेत. सरकार ती थांबविण्याचा आजपर्यंत कसून प्रयत्न करीत आहेच. पण It is manifest, however, that the vigilance of the Home authorities has been unavailing. नंतर शेवटी सर्व राग येथील हिंदी विद्यार्थ्यांवर काढून स्टँडर्डने पुन्हा अेकदा सरकारला बजावून It is beyond question not a few of highly intelligent Indians in our universities and reading for Bar are striving their utmost by such means, particularly to accustom the minds of young rising generation to the idea of an armed revolt! मग अेडिटराने वाचकाची रजा घेतली आहे.

असाच एक जाज्वल्य लेख लिहिता लिहिता येथील मॉर्निंग पोस्ट पत्राने पॅरिसच्या राजद्रोहा कटाची माहिती देण्याचे भरात देशभक्त सरदार राणासाहेब व त्यांची जर्मन पत्नी विदुषी राजाबाओी यांचेवर निंदात्मक व व्यक्तिविषयक शितोंडे अुडविले आहेत परतु हे मिथ्याशूर अेडिटर त्या शिवराळपणाचे पायश्चित्त मिळण्याचा सभव दिसताच गर्भगळीत झाले व परवाच्या आपल्या पत्राचे अकात देशभक्त राजाद्वयाची सपशेल माफी मागून मोकळे झाले ! ! त्यानी प्रसिद्ध केल होत की, पॅरिसमध्ये अेका जर्मन बाओीचे हाती सर्व क्रातिसूत्रे असून ती अेका हिंदी मनुष्याची बायको ' म्हणवीत असते ' असल्या या अश्लील निंदकाला राजानी चागल अजन घातले ह फार अुत्तम झाल !

परतु त्याच सुमारास अेका बगाली तरुणान अेका प्रख्यात साहेबावर हात टाकल्याची दाट वदता पसरून जिकडे तिकडे गुप्त पोलिसाचा सुळसुळाट सुरू झाला ! ली वार्नर साहेब 'सिटिझन ऑफ अिडिया'चे कर्ते, याचे नाव व दर्जा सर्व हिंदुस्थानात माहीतच आहे या दर्जावरून ली वानराकडे अेक बगाली भिकारी गेला, व त्याच्या हाती अँग्लोअिडियन लोक कसे अत्याचार करतात याची तक्रार लिहिलेला अर्ज दखून म्हणाला की, हा अर्ज तुम्ही मोर्ले याच्याकडे धाडा सर ली वार्नर याची व त्या तरुणाची पूर्वीची ओळख होती त्या योगाने त दोघेही बोलू लागले व अर्ज वाच लागले थाडक्या वेळातच बोलणे राहून वाचावाची सुरू झाली व ली वार्नर त्या तरुणाला झिटकारून पुढे जाअू लागले तो त्याचेबरोबर बळेच जाअू लागला अेका मोठ्या चौकात अेका प्रख्यात लिबरल क्लबाचे समोर रस्त्यावर ही जोडी चालली होती तो ली वार्नर म्हणाले 'चल हट जाव निगर ! ' 'निगर' हे आपल्यास म्हटल्याचे अेकताच त्या बगाल्यान सर ली वार्नरचा हात खेचला व क्रोधापमान होअून ताड्कन् त्याच्या श्रीमुखात लगावली ! ! ! पोलिस धावपळ करतात तो ली वार्नर त्याच्या धक्क्यासरशी पाच याड लाब कोलमडत गेले होते त्या तरुण बगाली भिक्षेकऱ्याचे नाव ' भट्टाचार्यजी ' अस आह या विलक्षण प्रकारची बातमी अेकून खूप खळबळ अुडाली आह परतु भट्टाचार्य अजून पकडला गेला नाही! फक्त पोलिसाचा त्याच्यावर पहारा आहे असे म्हणतात त्या भट्टाचार्याचे म्हणणे की, ली वार्नरनी आपणास फार व निरर्थक शिवीगाळ केली होती

—ता १२ फेब्रुवारी १९०९

\+ \+ \+

## ३७. द्वंद्वयुद्ध

लंडन — गेल्या पधरा दिवसापूर्वी देशभक्त भट्टाचार्य नावाच्या बंगाली तरुणास शिवीगाळ केल्यावरून सर ली वार्नर के. अेस्. ओ. याच्या श्रीमुखात बसल्याची गोष्ट घडल्यापासून येथील पत्रात या विलक्षण तरुणाची बरीच हकीकत प्रसिद्ध झालेली आहे. डेली डिस्पॅच नावाच्या पत्राने तर भट्टमहाशयाचा फोटोही देऊन टाकला! तथापि असली क्षुल्लक गोष्ट आपण होऊन चव्हाट्यावर आणू नये म्हणून सर विल्यम ली वार्नरनी फिर्याद वगैरे काहीअेक केली नाही. हिंदुस्थानात ज्याने राजामहाराजास आपल्या तोंयाने कापावयास लावले त्या सर ली वार्नरच्या श्रीमुखात अेका बंगाल्याने भडकावून द्यावी ही गोष्ट सामान्य नाही — क्षुल्लक तर मुळीच नव्हे! म्हणून अिंग्रजी पत्रांनी ती प्रसिद्ध केली. परंतु आपल्याला सर ली वार्नरनी 'हट जाव निगर!' असे म्हटले ही गोष्ट वर्तमानपत्रात आलेली पाहताच दे. भट्टाचार्य याला अधिक संताप आला असे दिसते. कारण गेल्या आठवड्यात त्याच्या अेका स्नेह्याने या अपराधाबद्दल ली वार्नरनी माफी मागावी म्हणून अेक पत्र लिहिले व ते तो ली वार्नरच्या हाती देण्यास निघाला. या नवीन तरुणाचे नाव वासुदेव भट्टाचार्य असे असून तो अेक सुशिक्षित बंगाली विद्यार्थी आहे. "अेका कुलीन ब्राह्मणास तुम्ही 'निगर' ही अश्लील शिवी देऊन सर्व हिंदुधर्माचा अुपमर्द केलेला आहे. सबब तुम्ही याबद्दल माफी मागावी अशी माझी विनंती आहे" असे हे पत्र होते. सर ली वार्नर पत्र पाहून संतापले व त्या तरुणास 'सुवरका बच्चा' असे म्हणाले! हे अैकताच वासुदेवाने त्यांना धमकावले. ली वार्नरने छत्रीने त्याला टोचले. त्यासरशी दे. वासुदेव भट्टाचार्य याने आपली लाठी गरगर फिरवीत तेथल्या तेथेच ली वार्नरला रट्टे लगावण्यास आरंभ केला!! ही गोष्ट भर रस्त्यावर घडली असल्याने अेकदम अनेक लोक जमले. त्या गडबडीत अेका मोटारमध्ये चढून सर ली वार्नर निघून गेले. परवा कोर्टात आपल्याला छत्री मारल्याबद्दल दे. वासुदेवभट्ट ह्याने ली वार्नरवर फिर्याद केली होती? पण ती मजिस्ट्रेटने काढून टाकली. काल दुपारी बौ स्ट्रीटच्या कोर्टात अखेर भट्टाचार्य याजवर फिर्याद करण्यात आली आहे व त्यात खुद्द हिंदुस्थानच्या सत्तेचे मुख्य केंद्र अिंडिया ऑफिसनेच फिर्यादीची भूमिका स्वीकारली आहे! अिंग्रजी पत्रे खालील हकीकत देतात.

'The Brahmin solicited Sir Lee Warner to read his letter. Sir Lee Warner declined to do so, and the Brahmin brandished a stick and struk him on his legs. The incident was reported to Lord Morley, the Counsel of India, and it was officially decided that a summons should be applied for' व त्याप्रमाणे हिंदुस्थान सरकारच्या निरोमागावरील सत्तेने त्या ब्राह्मण तरुणावर काल फिर्याद दाखल केली!!

दे. वासुदेव भट्टाचार्य हे बंगालमध्ये ' संध्या ' पत्राचे संपादक व बंगाली भाषेतील प्रवीण वक्ते होते. हे युगांतर पत्राचेही शेवटी संपादक होते असे प्रसिद्ध झाले आहे. ज्या तरुणाने लो वार्नरवर पहिला प्रहार केला त्याचें नाव कुंजविहारी भट्ट असे आहे व याचाच फोटो येथे प्रसिद्ध झाला आहे.

हिंदुस्थानांतील सद्य स्थिति प्रत्यक्ष पाहण्यासाठी टाजिम्सने प्रख्यात बातमीदाराम हिंदुस्थानात धाडलेले आहे व अिंग्लंडमध्ये फार वजनदार मानलेली त्याची पत्रें प्रसिद्ध होण्यास आरंभ झालेला आहे. त्या पत्रात हल्ली दक्षिणेची स्थिति वर्णन करताना तो फारच चमत्कारिक विचार प्रसिद्ध करीत आहे. नवीन चळवळीचें वर्णन हे राजश्री असे देतात:—

*It must plainly be said that Extremism as the public have* agreed to term the movement which is frankly hostile to the permanent continuance of the British rule, is not dead, nor is it likely to die. Some of its leaders are behind the prison walls but the movement *still* goes on. All the reforms in the world will not terminate its uncompromising activities. The Extremists attract young men to their ranks and they preach a gospel which exercises a fascination over most wild and ardent spirits. Their adherents are perhaps far more numerous than is commonly supposed; The *number of their passive sympathisers must be very great. Extremism* has no intention of coming out into the arena at present. Its devotees mean to work as they have worked hitherto in secrecy and stealth. Isolated assasinations, the insidious cultivation of animosity in the rural districts; the acquisition of control over large bodies of workers in the industrial centres—these are among methods that they adopt. अशा काल्पनिक भराऱ्या मारीत मारीत हे लेखक शेवटी महाराष्ट्रावर येऊन आदळतात. ' महाराष्ट्र हे मराठ्याचें पोळें आहे. ज्या राष्ट्राने सर्व हिंदुस्थान जिंकून ते पचवीतही आणले होते त्या मराठ्यांचा हा पाळणा आहे. नवीन राष्ट्रीय जागृति ही महाराष्ट्रात प्रथम झाली. The emotional Bengali calls along the whole world to witness his deeds. The Chitpavan Brahmin whose bent of mind is far more practical, works in silence, and he persits. मराठ्यांना शिवाजीचा अभिमान वाटतो. व त्याच्यांतील चित्पावन ब्राह्मणाचा कावा शिवाजीप्रमाणे ब्रिटिश राज्य अुलथून टाकून हिंदुस्थान स्वतंत्र करण्याचा आहे. बंगाली ओरडतात पण महाराष्ट्र हा सरोसर राजद्रोहाचें भुयार आहे: ' Even in Bengal, the Bengalees did the shouting; it was Poona, that provided the brains that directed the Bengali Extremists.' नंतर श्रीशिवोत्सव, गणपत्युत्सव-

'प्रसंगी जेवढा जातिवंत मराठा, तेवढा कसा अेकदिलाने अेक होअू शकतो व त्या अेकीतून राष्ट्रजागृतीची–लेखकाचे भाषेत राजद्रोहाची–कोण अूर्मि त्याना प्रस्फुरित-हृदय करते याचे वर्णन देअून मग लेखक म्हणतो, 'महाराष्ट्रातील निदान चार जिल्ह्यात तर राजद्रोह तत्त्वाच्या थरापर्यंत भरलेला आहे हे सिद्ध झालेले आहे. गावातून व खेड्यातून ब्राह्मण वकले, पुराणिक राजद्रोह अुपदेशीत फेऱ्या घालीत जातात. Even certain good educational institutions are known to contain students who are extremists to a man.' नतर नाशिक व सोलापूर शहराचा नामनिर्देश होअून त्यालाही शेलापागोटे अर्पिलेले आहे व मराठ्याचा हा Extremism व शिवाजीचा अभिमान लिहून थकल्यामुळे की काय लेखक शेवटयात म्हणतो– 'The Deccan is honeycombed with secret societies', सर्व दक्षिण भाग (महाराष्ट्र) गुप्तमडळाच्या भुयारानी पोखरलेला आहे ! ' बाकीचे पत्र लो. टिळकाना दिलेल्या शिव्यानी भरलेले असल्यामुळे फक्त अेकच वाक्य ज्यास्त दिल्याने पुरे आहे :–"It may be said with reasonable certainty that the predominent feeling in this large and important area is very different from that expressed at the Madras Congress !'

अशा लोकाच्या बातम्यावर अिंग्लड विश्वास ठेवणार ! !

—ता. २६ फेब्रुवारी १९०९

\+ \+ \+

## ३८. शिवीगाळीचा परिणाम

लडन, ता. १२ फेब्रुवारी १९०९–काल रोजी बोस्ट्रीट कोर्टात सर ली वार्नर याच्यावर हल्ला केल्याबद्दल दे. वासुदेव भट्टाचार्य याजवर खटला चालून त्यानी सहा महिनेपर्यंत वीस पौंडाचा जात मुचलका व दहा दहा पौंडाचे दोन जामीन द्यावे अगर अेक महिना कैद भोगावी असा निकाल देण्यात आला. खटल्यात फिर्यादीतर्फे सर विल्यम याची व के. यॉम्सन याची अशा दोन साक्षी झाल्या. आरोपीतर्फे आरोपीची व दे. कुजविहारी भट्टाचार्य याची अशा दोन साक्षी झाल्या. सर विल्यम अुलट तपासात म्हणाले, 'आरोपीच्या अगर त्याच्या मित्राच्या अर्जामुळे माझ्या मनावर काहीही परिणाम झाला नव्हता.' आरोपीतर्फे मि. रिच यानी विचारले की तुम्ही आरोपीला 'Go away, you dirty niggar' असे म्हणालात का ? सर ली म्हणाले–असे शब्द मी अुच्चारले असावेत हे शक्यच नाही. सर विल्यम यानी पूर्वी कुजविहारी

यास 'सुवरका बच्चा' म्हटल्याचे अगर शिवीगाळ दिल्याचेही साफ नाकबूल केले. आपल्या हातात छत्री असून आपण तिचा उपयोग केला नाही असही त्यानी सागितले. आरोपीचे म्हणणे असे की, आपल्या हिंदी मित्राला घाणेरडी शिवी देण्यासबधी सर विल्यमचे काय म्हणणे आहे ते त्यानी सागावे अगर माफी मागावी अशा आशयाचे पत्र तिसऱ्या वेळी त्याना रस्त्यात समक्ष नेऊन देण्यास गेलो असता ते अर्धवट वाचून त्यानी आपल्याला 'Get away dirty Niggar' म्हणून ढकलून दिले, तेव्हा आपणही त्याना परत ढकलले परतु त्यानी आपल्याला पुन्हा छत्रीचा तडाखा दिला म्हणून आपणही त्याना परत आपल्या काठीचा तडाखा दिला मजिस्ट्रेट सर ऑलवर्ट डिरटझेन म्हणाले की, आरोपी आपल्या मित्राचा अुपमर्द झाला होता अशी समजूत होअून बराच क्षुब्धवृत्ति झाला असावा असे दिसत, तरी असे वर्तन करणे गैर आहे देशभगिनी मिसेस कामा व देशबाधव चौधरी व रॉय हे जामीन राहण्यास तयार असूनही दे वासुदेव भट्टाचार्य यानी तुरुगात जाण्याचेच कबूल केले दे वासुदेव भट्टाचार्य यानी घडलेली हकीवत जगीच्या तशीच सर विल्यम यानी सागितली नसून आपण त्यास 'खरा अिंग्रज' समजत नाही असे आपल्या शपथेवर दिलेल्या जबाबात सागितले त्याच्या मनात फौजदारी व दिवाणी कोर्टात काम चालवून या गोष्टीचा निकाल लावावयाचा होता व त्यासाठी त्यानी ता ५ फेब्रुवारी रोजी आपल्या देशबाधवाना अुद्देशून अेक विनतीपत्र काढले होत त्याची नक्कल सोबत पाठविली आहे व त्याचप्रमाणे दे वासुदेव यानी सर विल्यम यास लिहिलेले पत्रही त्या विनतीपत्राबरोबरच प्रसिद्ध झालेले आहे त्याची नक्कलही सोबत ठेवलेली आहे. हे काम ह्यापुढे दिवाणीत चालू करून याचा योग्य निकाल लावून घेण्याचे दे भट्टाचार्य याचे मनात आहे व त्यासबधाने कोणी वर्गणी पाठविल्यास त्याचा ते पत्रत आभारपूर्वक स्वीकार करतील. वर्गणी त्याचे सल्लागार दे बी सी. बगाली C/o थॉमस कुक अन्ड सन्स, लडगेट स्ट्रीट, लडन, B C या पत्त्यावर पाठवून द्यावी.

दे वासुदेव भट्टाचार्य याने सर विल्यम याना ता २६।१।१९०९ रोजी लिहिलेल्या पत्रातील साराश — परवा झालेल्या नटचाचे महत्त्व आपल्या ध्यानात आले नसावे असे वाटते एका अति धार्मिक बगाली घराण्यातील गृहस्थाला 'सुवरका' बच्चा असे गालिप्रदान करण्याचे अक्षम्य . वर्तन करून आपण बऱ्याच इग्लडवासी हिंदु लोकाच्या मनास डागून सोडले आहे आपल्यासारख्या इतिहास-प्रवीण व विद्वान् माणसाला अशा हिंदी धर्मात गलिच्छ मानलेल्या जनावराचे नाव घेअून गालि करण्याच्या परिणामाचा विसर पडावा ही खरोखर मोठ्या खेदाची गोष्ट होय आपल्या पूर्वीच्या गैरवर्तनामुळे हिंदुस्थानातील लोकाचे मत किती वाअीट आहे, ते अेक अीश्वरासच ठावूक व आपल्या या उद्दामपणाची बातमी तिकडे समजली म्हणजे हल्लीची तिकडील स्थिति जास्तच कठीण होणार आहे, म्हणून आपण माझ्या गरीब मित्राची सपशेल माफी मागावी, म्हणजे मी ती इकडे

वगाने त्याचा नि पात करणार ? प्रल्हादाचे हरिनाम व गोकुळचा गोविंद— त्याच्या नि पातासाठी जे शस्त्र उपसले जाई त्या शस्त्राचाच नि पात होत असे ! ! सुप्त क्रांतीची ही बीजे वेगाने फोफावत अुत्पतन पावत असताना त्याचा नि पात आता कोण करू शकणार ? कसा करू शकणार ! !

आणि नि पात करण्याचा निश्चय करून जरी कोणी सज्ज झाला तरी ज्याचा नि पात करणे आहे तो जहाल ओळखणेही काही सुगम नाही कोण जहाल ठरविता येअील ? आता पाच सहा वर्षांपूर्वी दे गोखले जहाल होते, व तीन चार वर्षांपूर्वी सुरद्र बाबू जहाल होते, परंतु त्याच्या नि पाताची जर कोणाला आता जास्त भीति वाटत असेल तर ती खरी सरकारलाच होय ! त्याना हद्दपारी न व्हावी म्हणून लोकपक्षापेक्षा अिग्रजच देवाची व सरकारची जास्त प्रार्थना करीत आहेत काल मारक्या वाटणाऱ्या या गाओी आज इतक्या ज्या निरुपद्रवी वाटू लागल्या आहेत त्या त्याचेमध्ये काही फेरफार झाल्यामुळे नव्हे, तर गाओीहून जास्त भयकर प्राणी क्षितिजावर येअू लागल्यामुळे होय व म्हणूनच १–११ वर्षांपूर्वी विपिनचद्र पाल म्हणजे जहालाचे अेक अग्रणी समजले गेले व आता मात्र खरा जहाल हाती लागला असे वाटून सरकार त्याचा नि पात करण्यास साटा अुगारू लागले तोच पडित श्यामजीची ऊरकाळी अैकू आली काल महा-बलाढ्य वाटणारा बिपिनचद्र पालच आज सरकारला अेक साधारण कायदेशीर, फक्त जरा जास्त कुरकुऱ्या स्वभावाचा नेमस्त बाबू आहे असे वाटू लागले तेव्हा दिवसेदिवस जहालाचा नि पात करणे हे जितके कठीण होत आहे तितकाच खरा जहाल कोण हे ओळखणेही अशक्य होत चाललेले आहे

प्रयत्नाती आपल्यास यश येईल असे जाणून या दुर्घट कार्याला सरकारने हात घातला हिंदुस्थानात अेकीकडे चाबकाचे मार देत दुसरीकडे ममताळूपणे कुरवाळणे सुरू झाले व जी मात्रा हिंदुस्थानात लागू पडेल असे वाटते, तीच अिग्लडमधल्या या दोन वर्षांत फारच अुन्मत्त होत चाललेल्या हिंदी विद्यार्थ्यांनाही देण्यात आली पार्लमेटमध्ये सुधारणा देण्याविषयी रोज रात्री वाद चालू आहे, हिंदुस्थानच्या अितिहासातही अत्यत प्रागतिक वस्तुक्राति घडवून आणण्याची दवंडी पिटविली जात आहे व त्या योगाने नेमस्त पक्षाला—परंतु लडनमध्ये या पक्षाचे नावही अुरलेले नाही म्हणा—मिळवून घेण्याचा ज्या समयी दिमाख दाखविला जात आहे त्या समयी लडनमधल्या अेकूणअेक विद्यार्थ्यांवर अपमानास्पद आरोप

सांगितले की, ह्या धास्तीने हिंदी विद्यार्थी भिअून राजकारण सोडतील अशी सरकारची अटकळ आहे या अटकळीचे प्रत्युत्तर हेच मिळाले की अिंडिया हाअूस-मधल्या सभांना वर्धीही लोटत नसे अितकी गर्दी आता दर रविवारी लोटत आहे! पंडित श्यामजींची आक्सफर्डमधील हर्बर्ट स्पेन्सरची देणगी त्या युनिव्हर्सिटीने झिडकारून परत करावी म्हणून युनिव्हर्सिटीत चळवळ होताच लंडनमध्ये भर सभेत पंडितजींच्या देशभक्तीचा गौरव करून अभिनंदनपर ठराव त्यांना धाडण्यात आला लंडनमध्ये या सरकारी निःपात मोहिमेला रोव किती दबले आहेत हे समजण्यास अेकच गोष्ट सांगणे बस्स होईल की हिंदुस्थानांत सुरेंद्र हे जसे सरकारला नेमस्त वाटते तसे लंडनमध्ये सरकारला—कृपेला पात्र नसला तरी भीतीला—आपला पुरुष म्हटला म्हणजे विपिनचंद्र पाल हे होत! लंडनमध्ये विपिनबाबू नेमस्त आहेत असे अिंग्लिश पत्रे अुघड म्हणतात अितकी लंडनची व अिंग्लंडची हिंदी वसाहत सरकारच्या निःपात मोहिमेला म्यायली!!!

अर्थात्‌च अिंग्लंडची सर्व पत्रे चिडून गेली पंडित श्यामजींनी देशवीरांचे स्मारक अुभारावे व 'दे खुदीराम बोस, म ह्य्यालाल वगैरे तरुणांना देश-वीरत्वाचा मान मिळणे योग्य आहे' हे राजद्रोही 'अिंडियन सोशियालॉजिस्ट' पत्रात प्रसिद्ध केल्यापासून त्यांचेवर शिव्याशापांचा वर्षाव सुरू झाला विपिन-चंद्रांनीही या कागदी लढाअीत अेक फेर झाडून दिले. अिव्हिनिंग स्टॅंडर्ड या दैनिक पत्राने विद्यार्थ्यांवर हल्ला करण्याचे पत्करले व Seditious students, Rebellious Indians' वगैरे मथळ्याखाली प्रथम आडून गोळीबार सुरू केले परंतु शेवटी आड पडदा सोडून दे सावरकर यांचेवर अुघड रीतीने दोषारोप करण्यास त्याने आरंभ केला सर्व विद्यार्थ्यांना बेबंद करण्यास प्रवृत्त करणारे हेच गृहस्थ होत असा त्याचा अजमास आहे! या निरर्गल लेखाला दे सावरकर यांच्या एका स्नेह्याने कडक व धमकावणीचे अुत्तर धाडताच स्टॅंडर्डचे संपादक जरा स्वस्थ बसले व अेक दिवस आश्चर्यचकित करून टाकणारा देखावा घडून आला. तो असा —

ह्या दैनिक स्टॅंडर्डचे प्रतिनिधि दे सावरकर ह्यांना भेटावयास आले! पंधरा दिवस ज्याने अद्वातद्वा टीका केली त्यांनी ही भेटीची तसदी आधीच घेतली असती तर काही बिघडले नसते! तथापि त्या प्रतिनिधींने दे सावरकरांची मनःपूर्वक भेट घेतली खुद्द एडिटर म्हणतात — 'Presently a suspected Indian, with youth and intelligence stamped upon his greetings' It was Mr V D Savarkar.' अिंडियन-राजकारण, अिंडिया हाअूस, हिंदी विद्यार्थी व अितर चळवळी वगैरे विषयावर तासभर संवाद झाला व ती हकीगत काही खरी काही खोटी—दुसऱ्या दिवशी स्टॅंडर्डमध्ये प्रसिद्ध झाली तथापि अितर पत्रांनी शिवीगाळ अजून चालविली आहे त्यातल्या त्यात 'Sunday Chronicle'

-या पत्राच्या वातमीदाराने जराशी वस्तुस्थितीस धरून हकीकत दिलेली असल्याने त्याचे अेक दोन अुतारे दिल्यास खरी स्थिति थोडीबहुत अुघडकीस येअील

Sunday Chronicle चा वातमीदार अिंडिया-हाअुसमध्ये दे सावरकराच्या भेटीला आला अिंडिया हाअूसवर अितर पत्रकार जे आरोप करतात त्याप्रमाणे तथे भयकर असे काही अेक दिसले नाही असे स्पष्ट म्हणून लेखक Campel Green म्हणतो ' It may be that any eyesight is not good ! It is a house of mystry Mr Shyamji Krishnawarma works for the independence of India. If he does not approve the assassinations of British officials who accidently or incidently suffer thereby he excuses them He has offered five thousand Rupees towards a fund of Indian Martyrs' Memorial for the men hanged in Bengal Anyhow the shadow of Krishnavarma is on India House That is to be fair and to say the least Now what is the answer? I had an opportunity of a long friendly discussion with Mr V D Savarkar, who seems to be not only the spokesman for the students but the spokesman for Mr Shyamji Krishnavarma He is a young Grey's Inn Law student, 23 years age at a guess He has a clear olive complexion, clear, deep penetrating eyes, a width of jaw, such as I have seen in few men His English is excellent If I mistake not Mr Savarker will go far—I hope he will go far in the right direction अिंडिया हाअूससंबधीची प्रश्नोत्तर देताना तो म्हणतो, 'मी विचारल्यावरून ते म्हणाले की, ' अिंडिया हाअूस ही अेक विद्यार्थी निवास संस्था आहे येथे येण्यास अमुकच राजकीय मते लागतात असा बिलकुल नियम नाही एक जो नियम आहे तो अेवढाच की, रहिवाशाने अेक पौंड द्यावा व राहणे व खाणे अुपभोगावे कृष्णवर्मा घराच्या भानगडीत कधीच पडत नाहीत होय, तथे राजकीय विवाद होतात, पण तसे तुम्ही शुद्ध सरकारी निवासस्थान स्थापले तरी तेथेही चालल्याशिवाय कधीही राहणार नाहीत राजकारण प्रस्तुत प्रसंगी आमचा प्राण आहे अिथे तुम्ही म्हणता तसे म्हणणारी व ब्रिटिशांचे राज्य कल्याणकारक आहे असे म्हणणारी मडळीही येतात वादविवाद चालतात सत्य व वास्तिकता ज्याचे बाजूला असतो त्याची मते प्रसार पावतात ' ते लेखक म्हणतात—' Let me state a fact before an impression The fact is Mr. V D Savarkar believes in India for Indians, in the complete imanciptation of India from the British rule He says India has nothing for what to thank the English, or less it be the denationalisation, as he calls it, of the Hindus ' स्वतःचे विचार बरेच विस्तृत रीतीने देअून ते लेखक अेक गोष्ट वगळतात असे म्हणतात की हे गृहस्थ रॅडिकल म्हणजे

ोखल्यांच्या आशाकेंद्र लिबरलाहूनही लिबरल आहेत. तरी त्यानी असे स्पष्ट कबूल केले की, हिंदुस्थानच्या पदरात आम्ही कितीही सुधारणा टाकल्या तरी हिंदुस्थानवर ब्रिटिशांचें राज्य आम्ही तसूही न मागे फिरता गाजविणार. तरवारीने आम्हास घालविल्याविना आम्ही जाणारे नाही व तरवार तुम्हापाशी शिल्लक नाही. सबब उभयहितासाठी ब्रिटिश राज्यच हिंदुस्थानात असणे उत्कृष्ट आहे. अितर पुष्कळ सवाद झाला. हे लक्षात ठेवण्याजोगे आहे की, हे लेखक इतर पत्रकारानी केलेले आक्षेप यथातथा नसावे असे कबूल करतात. " Mr Savarkar said, 'We do not mind detectives watching outside and following us, if the climate suits them !' That last is a quite English touch. It shows how the British hand has moulded the intellect of young India. It has even breathed into it the British Joke ....I have no evidence of fact which would justify me in traversing the statement of this nimble-minded young leader of India-House."

डेलीमेल, मँचेस्टर, डिस्पॅच वगैरे पत्रानींही सावरकराच्या भेटी घेऊन हकीगती दिलेल्या आहेत.

—ता. ९ अेप्रिल १९०९

* * *

## ४०. सर कर्झन वायलींना ठार मारलें !!

लडन —खुद्द लडन शहरामध्ये, हिंदी, अिग्रजी डिटेक्टिव्हांची आज दीड महिना येथील झाडून हिंदी लोकावर सक्त पाळत असतानाही, सर कर्झन वायली-सारख्या अिंडिया ऑफिसच्या केवळ अत्यत प्रमुखच नव्हे, नावाजलेल्या अधिकाऱ्याचा खून झाल्याची वार्ता हिंदुस्थानात विद्युन्मार्गाने येअून आता शिळीही झाली असेल सर कर्झन वायली हे अिंडिया ऑफिसचे मुख्य केंद्र असून येथील हिंदी विद्यार्थ्यांच्या सहवासासाठी व त्याना मदत करावी म्हणून सरकारी धोरणाप्रमाणे सतत अविश्रांतपणे झटत असत. सेक्रेटरी ऑफ स्टेट हे प्रत्येक अुगवल्या मावळत्या प्रधानमडळाबरोबर बदलतात; परतु हिंदुस्थानच्या कारभाराची सारीं सूत्रे व खरी दिशा, अिंडिया ऑफिसमध्ये कायम असलेल्या अधिकाऱ्याच्याच हाती असतात. ह्या अधिकाऱ्यात सर कर्झन वायली हे अप्रतिम चातुर्यसपन्न असत. याना माहीत नाही असा हिंदी मनुष्य अिंग्लडात नसे. राजकारणातील व व्यक्तिविषयक प्रत्येक बातमीची अित्यभूत माहिती या पुरुषाजवळ ठेवलेली असे. फार

नाय, पण हिंदुस्थानच्या कारभाराची सूत्रे वाह्यत हाती असलेल्या सेक्रेटरी ऑफ स्टेटचे सर कर्झन वायली हे प्रत्यक्ष नयनच होते हिंदुस्थानातही अिंग्रजी राज्याच्या अिमानी सेवेने २० वर्षेपर्यंत यानी नावलौकिक सपादिला होता

लॉर्ड मोर्लेंहूनही अँग्लोअिंडियन लोकात ज्याची अुणीव जास्त भासणारी आहे अशा या महापुरुषास भयकर व निर्दयपणाने मारल्याचा आरोप ज्या तरुणावर आहे त्याचे नाव दे. मदनलाल डिंगरा असे आहे या तरुणाची चौकशी अजून चाललेली आहे दे डिंगरा याच्या पूर्ववृत्तान्तातील काही काही गोष्टी आता प्रसिद्ध होत आहेत गेल्या साली यानीही अितराप्रमाणे आपल्या कोटावर ५७ ची वीरस्मृतिमुद्रा धारण केलेली होती परतु कॉलेजमध्ये कोणा अेका स्नेह्याने चेष्टेने मुद्रा दूर फेकली हे पाहताच हा तरुण अितका चवताळला की तो अेक सुरा घेअून त्याच्या अगावर तुटून पडला ! दुसरे अेके समयी जपानी लोकाच्या शौर्याबद्दल गोष्टी चाललेल्या असताना दे डिंगराला या गोष्टी फार वेळ न रुचून तो तरुण म्हणाला की त्यात काही विशेष नाही माझे हिंदुराष्ट्रही तितकेच शूर व साहसी आहे व लवकरच आमच्याही धाडसांनी लोक कीर्ति गाअू लागतील अितर हिंदी तरुण म्हणाले, ' हा पोकळ डौल आहे शरीरकष्ट व दणवीरत्वात आमचे लोक अडळ राहत नाहीत शेवटी वाद पैजेवर आला व हिंदु लोकाच्या साहसाची चुणूक तर पाहू या, म्हणून अेकाने अेक टाचणी घेअून डिंगराच्या हातावर टाचण्यास आरभ केला डिंगराने तो हात जसाच्या तसाच अढळ ठेवला – टाचणी सर्व आत रोवली व रक्त बाहेर अुसळले तरी डिंगराने हात हलविला नाही

या खुनाचा निषेध करण्यासाठी सोमवारी दे भावनगरीचे खटपटीने अेक हिंदी लोकाची सभा भरली होती अध्यक्षस्थानी दे आगाखान हे होते सभेला पुष्कळ हिंदी लोक जमलेले होते पहिला ठराव दे भावनगरीने पुढे आणला त्यात व त्याचे भाषणात ज्या मनुष्याची खुनाचे आरोपावरून चौकशी व्हावयाची आहे, अगावर तो आरोप शाबीत झाल्यावर करावा तसा भडिमार त्यानी चालविला नतर दे अमीर अल्ली अुठले त्यानीही तोच प्रकार पण जरा कमी प्रमाणावर केला व वेळ थोडा आहे म्हणून अध्यक्षानी ठराव सभेपुढे वाचून दाखवून अेकदम कितीकाना तो पसत आहे असे विचारले पुष्कळसे हात अुभारलेले दिसताच त्यानी सागितले की, ' सर्वानुमते पास ' हे वाक्य अैकताच ' नाही, नाही, विरुद्ध मतेही येथे आहेत ' असे म्हणून शब्द अुठला ' काय ? विरुद्ध मत ?' अध्यक्ष ओरडले, व सर्व मागे वळून पाहू लागले ' होय, होय माझे मत विरुद्ध आहे ' म्हणून अधिकच जोराचा प्रतिशब्द अुमळला ' त्याचे नाव टिपून घ्या ! त्याला – अुभा करा ! कोण आहे तो ?' असा अेकच गल्का अुडाला ' हा मी येथे आहे व पुन्हा अध्यक्षाना अशी विनती करतो की ठराव सर्वानुमते पास झालेला नाही '

आता सभेत ' सावरकर, सावरकर ' अशी कुजबूज सुरू झाली सर्वानुमते ठराव पास करण्याची ज्याना अत्यत उत्कठा लागलेली होती त्यानी सतापून जाऊन दे सावरकराना पुन्हा दटावण्याचा प्रयत्न केला परतु सभेचे मध्यभागी उभे राहून अधिकच शाततेने त्यानी पुन्हा आपले मत विरुद्ध असल्याचे कळविले तेव्हा दे. भावनगरी सतापाने लाल होऊन व प्लॅटफॉर्मवरून उडी मारून खाली आले व ' पकडा त्याला ! धरा त्याला ! ' म्हणून गर्जू लागले ! तीन मिनिटेपर्यंत विलक्षण स्तब्धता दिसली व मग अेकदम ' धरा ! बाहेर घालवा ! ' वगैरे किंकाळ्या फोडीत खुर्च्या व काठ्या सर्व बाजूनी उठू लागल्या 'माझे मत का विरुद्ध आहे हे अध्यक्षानी अैकावे ' म्हणून दे सावरकर हे बोलत होते परतु त्याचे ते बोलणे ह्या चवताळलेल्या मूठभर लोकाच्या किंकाळ्यात अैकू येअीना अध्यक्षानी दे भावनगरीस मागे ओढून ह्या अतिरेकाबद्दल कानउघाडणीही केली. परतु आता सर्व सभेत पक्षविपक्ष होऊन अेकच आरोळी उठलेली होती ह्या सर्वांचे मध्ये दे सावरकर शातपणे उभे असताना अेक पामर नावाचा युरेजियन त्याच्या अगाला भिडला व त्याने त्याच्या डोळ्यावर आघात केला तरीही सावरकरानी स्थलावरून अिचही मागे न सरता व उलट आघात न करता ' तरीही माझे मत विरुद्धच आहे' असे सागितले. त्याच्या डोळ्याला जखम होऊन रक्त भळभळा वाहू लागले व हे पाहताच सर्वांचा सताप विकोपास गेला दे सुरेद्रनाथ बानर्जींनी सतप्त होऊन ' सावरकराना स्वमत देण्याचा पूर्ण अधिकार होता त्याच्यावर हात टाकणे Outrageous आहे ' असे म्हणून सभा सोडून दिली स्त्रीजन भयाने किंचाळत हॉलचे बाहेर गेला. हॉलमध्ये खुर्च्या झुगारल्या जाऊ लागल्या शिव्या-प्रतिशिव्याचा गोधळ उडाला व अितक्यात हिंदी तरुणातील अेकाने दे. सावरकरावर ज्याने प्रथम आघात केला होता त्या पॉमरचे डोक्यात काठी घातली व तोही रक्ताने भिजून चिंब झाला. पोलिस लोक सभेत शिरलेलेच होते व सुमारे अर्ध्या अेक तासात ठराव कसेबसे वाचून अध्यक्षानी सभा सपली असे कळविले दे सावरकर याना आधीच बाहेर नेलेले होते व स्नेह्यावरोबर त्याना घरीही पोचविण्यात आले होते दुसरे दिवशी त्यानी लडन टाअिम्सला आपले मत विरुद्ध का होते वगैरे सर्व खुलासा करून अेक पत्र लिहिले व त्यातील त्यच्या समर्थनाचा परिणाम होऊन बहुतेक पत्रानी ते पत्र आपण होऊन छापून प्रसिद्ध केले त्या पत्राने सर्व क्षुब्ध वातावरण निवळले आहे. ते पत्र आपल्या वाचकासाठी पुढील पाळीला घालीन डेली डिस्पॅच नामक पत्रातील अेक उतारा मासल्यासाठी दिला आहे

'The pale youth' who made so dramatic a protest at yesterday's meeting of Indians held to denounce the murder of Sir Curzon Wyllie turns to be Mr Vinayak Damodar Savarkar He is a fervent nationalist Mr Savarkar who is an extemely brilliant.

scholar, is at present, an individual of interest, apart from his appearance at yesterday's meeting. He is the law-student here whom the Benchers of his Inn refused to call, and at present, I understand he is waiting for the decision of the House of Lords to whom he has appealed Like most of his nationalists he is a political theorist, and is deeply versed in all the literature of political liberty. He translated Mazzini's writings into Marathi.'

यात मला असलेल्या माहितीवरून अेक चूक दिसत आहे की दे सावरकर ह्याच्यावरील ग्रेज अिनमधील केस अजून निकालात आलेली नाही जुलै १४ ला ती पुन्हा अेकदा चालणार आहे व तिचा निकाल महाराष्ट्र वाचकांना पुढे कळवीन.

—ता ३० जुलै १९०९

\+ + +

## ४१. मदनलाल डिंगरा !

लंडन ता १६ जुलै—ज्या तरुणाने कर्झन वायली याचा भयंकर खून केला त्याच्याविषयीची माहिती आता वर्तमानपत्रातून सविस्तर रीतीने प्रसिद्ध होत आहे. टाअिम्स, डेली न्यूज, डेली क्रॉनिकलपासून तो तहत अत्यंत क्षुल्लक ग्रामपत्रिकेपर्यंत सर्व छापखाना हल्ली दररोज व दरघडी हिंदुस्थानच्या चर्चेने, या खुनाच्या विवरणाने, डिंगराच्या वर्णनाने भरलेला असतो ! ज्या दिवशी सकाळी खुनाची पहिली वार्ता कळली त्या दिवशी रस्त्यारस्त्यातून वर्तमानपत्रविके मोठमोठ्याने ओरडत सर्व दिवसभर हिंडत होते ' डिंगराने केलेला खून ! हिंदुस्थानचा द्वेष ! अेका हिंदूचे निधडे धाडस ! वगैरे कर्कश किंकाळ्या अैकून मी घराचे खिडकीतून डोकावू लागलो तो प्रत्येक घराचे दाराशी वर्तमानपत्राचे अंक विकत चाललेले होते त्या दिवशी सर्व ब्रिटिश द्वीपामध्ये अेकूण अेक मनुष्याचे तोंडी ' हिंदुस्थान ! हिंदुस्थान ! ' हा अेकच शब्द होता. तेव्हापासून आतापर्यंत वर्तमानपत्रात हिंदुस्थानच्या चर्चेपुढे दुसऱ्या कोणत्याही विषयाला थारा मिळेनासा झाला आहे. क्रिकेटची चर्चा देखील बंद पडली तेव्हा अितर विषयाची काय कथा !

ज्या दिवशी रात्री डिंगराने सर कर्झन वायलीवर चार गोळ्या झाडल्या त्या दिवशी डिंगरा खुनाचे अेक अर्धा तास आधी मिस बेक या आंग्ल स्त्रीबरोबर - ही बाओी त्या दिवशी ज्या संस्थेचा अुत्सव होता त्या संस्थेची सेक्रेटरी आहे—

आपल्या नुकत्याच झालेल्या परीक्षेच्या गप्पा मारीत शांतपणे बसलेला होता व तेव्हाही तो जवळ दोन पिस्तुले, सुरी व खंजीर अशी शस्त्रे ठेवून सर कर्झनवर पाळत ठेवीत होता ! नंतर जेव्हा कर्झन आले तेव्हा तो दारापाशी गेला व काही बोलावयाचे निमित्त करून सर कर्झनजवळ उभा राहिला. बोलण्यास आरंभ होताच त्याने पिस्तुल झाडले नाही, तर अगदी हलके बोलण्याचे मिष करू लागला. तेव्हा कर्झन अधिकच जवळ आले त्यांचे तोंड अगदी जवळ येताच त्यांचे डोळ्यांचे पाते लवते न लवते अितक्या अवकाशात चार गोळ्या मारल्याही होत्या ! जवळ असलेले अेक पारशी डॉक्टर लालकाका हे त्याला पकडू लागताच त्यानाही अेक गोळी घातली व ते खाली कोसळले सर प्रोबेन हे मागून धावले तरी डिंगरा न कचरता त्याच्याकडे झटकन् फिरून कुस्ती करू लागला व त्याचे हात पकडण्यात अितर दोन गृहस्थ गुतले असताही त्याने त्या सर्वांना झिडकारीत सर प्रोबेन ह्याना अितक्या जोराने खाली आदळून दिले की, त्याच्या दोन बरगड्या चिरडून गेल्या व त्याचा चेहरा विद्रूप झाला त्या वेळेस आणखी काही अिंडियन त्याचे अंगाशी लगटलेले होते व त्यानेही आपले पिस्तुल पुन्हा सरसावले होते परंतु अिंडियन लोकावर ते न झाडणे ठीक असे बहुधा वाटून त्याने ते परत फिरविले व शांतपणे तो अुभा राहिला तो अितका शांत की, त्याची नाडी त्वरित पाहताच डॉक्टरने म्हटले की, येथे असलेल्या या भयकर देखाव्याला पाहणाऱ्या सर्व लोकात डिंगराची नाडी अधिक शांत व सुव्यवस्थित रीतीने चाललेली होती ! त्याच्या खिशात दोन कागद त्याच्या कबुलीजबाबाने व स्वसमर्थनाने भरलेले सापडले. त्याला मगळ्यानी मिळून हातापायानी जखडून बाधले असता ' माझा चष्मा जरा नीट घालू द्या व मग मी पुन्हा हात बांधू देअीन ' असे तो म्हणाला व चष्मा नीट बसविण्यात आला पोलिस कचेरीत नेल्यावर तो डोळे मिटून भिंतीशी डोके टेकून काही मिनिटे बसला व मग हसून गप्पा करू लागला त्या रात्री त्याला गाढ झोप लागली होती दुसरे दिवशी जेवणावरही त्याने यथेच्छ ताव मारला. काही दिवसानी त्याचे अेक दोन स्नेह्यानी त्याला भेटण्यासाठी खटपट केली व अेकजणाला परवानगी मिळून तो त्याला भेटला. तेव्हा डिंगरा अितका निर्भय व अुल्हासी होता की, त्यानी मागितलेल्या जिनसामध्ये अेक आरसाही मागितला होता ! ' मला ड्रेस करण्यासाठी येथे अेक आरसा नाही तर अेक छानदार आरसाही धाडून दे ! ' म्हणून तो म्हणाला जणू काय त्याला लग्नाचीच तयारी करावयाची आहे ! असली निधड छाती पुण्यकर्मात खरोखरीच अभिलषणीय असते. पापकर्मात ती मनुष्याला जास्तच हिडीस स्वरूप देते !

त्याला भेटण्याची हिंदी लोकाना सक्त मनाअी करण्यात आलेली आहे. गेल्या वर्षापासून हिंदी विद्यार्थ्यांना अिंग्रजी वळण लावण्यासाठी व त्यांचेवर सूक्ष्म

नजर ठेवून त्याना राजकारणापासून परावृत्त करण्यासाठी ज्या ज्या अनेक निरनिराळ्या सस्था निघालेल्या होत्या त्यापैकी मोठमोठ्या अँग्लोअिंडियनानी आपल्या घरी अिंडियन विद्यार्थ्यांस चहा पिण्यास बोलावयाचे व अेक मोठा समारभ करावयाचा यासाठी अेक सस्था होती डिंगरा हा सव राजनिष्ठ व अँग्लोअिंडियनानी चालविलेल्या सस्थेचा नियमित सभासद होता व कित्येक अँग्लोअिंडियनाचा त्याचेवर फार विश्वास व त्याच्या राजनिष्ठेवर फार भरवसा असे अशा अत्यत भरवशाच्या मनुष्यानेच व जिथे सच्छील विद्यार्थ्याशिवाय राजकारणी चटोर विद्यार्थी कधी यथू शकत नाहीत अशा चहासमारभातच सर कर्झन सारख्याचा खून केल्यापासून अँग्लोअिंडियनानी सावजनिक पने लिहून कळविले आहे का, अिंडियन विद्यार्थी दुष्ट राजकारणापासून परावृत्त व्हावे म्हणून हा चहासमारभ करण्याचे आपणास आजपर्यंत कबूल होते पण आता तस समारभ आपण कधीही करणार नाही सर चार्लस अिलियट यानीही त्याची समारभ करण्याची पाळी जवळ आली असल्याने आपण तो समारभ करीत नाही अस स्पष्ट पन प्रसिद्ध केलेले आहे हिंदुस्थानी विद्यार्थ्यांवर नजर ठेवण्यासाठी नुकतीच नेमली गेलेली व आजपर्यंत रात्रदिवस नका नको होअीतोपर्यंत काम करणारी कमिटीही आज काल कर्डोक काढीत नाही प्रथम प्रथम गुप्तकटाचे शोधासाठी पोलिसने अचाट प्रयत्न केले असताही गुप्त कट मिळेना तव्हा चौकशी झटकन थावली, अितकेच नव्हे तर प्रत्येक हिंदी विद्यार्थ्याचे पायात लुडबुडणारे डिटेक्टिव्ह या खुनापासून जास्त होण्याचे अेवजी मुळीच नाहीसे झाले आहेत परतु त्याचे मुख्य कारण अस आहे की, अितःपर अिंग्लिश डिटेक्टिव्हाच अेवजी अिंडियन डिटेक्टिव्ह ठेवण्याच ठरलेले आहे मोठमोठ्या वतमानपत्रातून तक्रारी आल्या आहेत की, अिंडियन लोकाची भाषा माहिती नसल्याने त्याचेवर अिंग्लिश डिटेक्टिव्ह ठेवल्यान काडीचाही फायदा होत नाही हिंदी समजणारा अिंग्लिश डिटेक्टिव्ह ठेवला तर हे अिंडियन पजाबीत बोलतात, मराठीत बोलतात, बगालीत बोलतात, तेव्हा हिंदुस्थानातून अुत्तम स्वदेशी डिटेक्टिव्ह आणावत ही सूचना सर्वांस पसत पडलेली आहे परतु आजपर्यंत काय अिथे थोडे अिंडियन डिटेक्टिव्ह होते तर आता जास्त आणवून अधिक अुपयोग होणारा आहे ! डिटेक्ट करण्यास जर काही नसेल तर कितीही डिटेक्टिव्ह जमले तरी काय करणार ? आणि दुर्दैवाची कहाणी अशी की, अितर गरीबगुरीब विद्यार्थ्यांच्यामागे रात्रदिवस डिटेक्टिव्ह लागलेले असताना मुख्य डिंगरासारख्या भयकर मनुष्याच्यावर यत्किंचितही दाब नव्हता खुद्द डिटेक्टिव्हाचे मालक सर कर्झन वायली याचा खून ज्याना डिटेक्ट करता आला नाही, त्या डिटेक्टिव्ह खात्याची आदीपासून आजपर्यंत सुधारणा झालीच पाहिजे अशी सर्व राजनिष्ठ व शाततांप्रिय हिंदी लोकाची मनापासून अिच्छा व विनती आहे

गेल्या आठवड्यात डिंगराला सेशनकमिट केले. त्या दिवशी सध्याकाळी सर्व लडन शहरात डिंगराने दिलेला जवाब हाच अेक विषय होता त्या विस्तीर्ण शहराच्या भिंतीभिंतीवरून दुकानादुकानावरून डिंगराचे नाव अेकसारखे लटकलेले होते. 'डिंगराचा विलक्षण जबाब ' 'तो म्हणतो माझा सूड, माझे देशबांधव घेतीलच.' 'डिंगरा स्वसमर्थनात म्हणतो, मी देशभक्त आहे ' 'डिंगरा हिंदुस्थानच्या अभ्युदयासाठी मरतो ' वगैरे मोठमोठ्या टाअिपानी छापलेली पत्रके भिन्नभिन्न वर्तमानपत्राच्या जाहिरातीसाठी अेकाच रांगेने सर्व शहरभर — नव्हे सर्व अिंग्लडभर लटकत होती ! त्याने केलेल्या क्रूर खुनाने केली नाही अितकी क्षुब्धक्षोभक चळवळ अिंग्लडात त्याच्या कोर्टातील जबाबाने केलेली आहे ! सेशनमध्ये काम चालेल तेव्हा ती हकीकत देअीन डिंगराला फाशी होअीलच. परंतु त्याला तीच गोष्ट पाहिजे आहे कारण परवा कोर्टाचे जबाबाचे शेवटी तो म्हणाला —

I made the statement not because I wished to plead for mercy or anything of that kind I wish that the English people should sentence me to death for in that case the vengeance of my countrymen will be all the keener I put forward this statement to show the justice of my cause to the outside world, especially to our sympathisers in America and Germany.

—ता ६ ऑगस्ट १९०९

\+ \+ \+

## ४२. सावरकरांवरील 'ग्रेज अिन'मधील खटला !

लडन, ता. २३ जुलै १९०९.—दे सावरकर यांच्यावर ग्रेज अिनमध्ये चाललेल्या खटल्याचा निकाल गेल्या आठवड्यात अेकदाचा लागला आहे या खटल्यात पुरावा वगैरे गोळा करण्याचा सर्व खटाटोप हिंदुस्थान सरकारच्या साह्याने झालेला आहे अितके सांगितले म्हणजे या प्रश्नात मुख्य हट्ट कोणता होता हे अुघड होणारे आहे. प्रथमत बरिस्टरची परीक्षा पास झाल्यानतर सनद मिळण्यासाठी दोघा बेंचरांची शिफारस जी लागत असते ती मिळविण्यासाठी जेव्हा दे. सावरकर हे काही गृहस्थाकडे गेले तेव्हाच त्याच्यापैकी दोघानी साफ कळविले होते की 'आम्ही हिंदी लोकास शिफारस जी देतो ती यापुढे अिंडिया ऑफिसच्या अधिकाऱ्यानी परवानगी दिल्याशिवाय देणार नाही, तर मी तुमच्याबद्दल आज त्या अिंडिया ऑफिसकडे तपास करतो व अुद्या तुम्हाला नक्की काय ते कळवितो ' याच वेळेस

सर्व अिंग्लंडात हिंदी मनुष्यासंबंधी हिंदुस्थानाहून जास्त अुदारता दाखविली जाणे हे किती अयथार्थ व अनैसर्गिक आहे हें अुघड झालेले होतें. तथापि ग्रेज अिन-मधल्या दोघा बेंचरानी दे. सावरकरांची जेव्हा शिफारस केली तेव्हा मग त्याच्या-वर अुघड आरोप करण्याशिवाय अन्य मार्ग राहिला नव्हता व म्हणून त्याना त्यांचेवर असलेल्या आरोपाची नोटीस देण्यात आली. आरोप तर जितके भयकर ठेवणें शक्य तितके ठेवले गेले. राजक्रांति करणें, हिंदुस्थानच्या पूर्ण स्वातंत्र्याची महती गाणे, रक्तपात व युद्ध याचा अवलंब करण्यास अुत्तेजन देणे वगैरे कायद्यात सापडणारे सर्व भयकर शब्द अेकत्र करून ते आरोप ठेवण्यात आले ! अितकेंच नव्हे तर निम्मा खटला होअून गेलेला असतानाही नवीन आरोप जोडण्यात येतच होते. सार्वजनिक कोर्टात अेक क्षणही जो पुरावा येअू शकला नसता तो सर्व या खाजगी चौकशीत गुपचूप रीतीने चालू देणें भाग पडलेलें होतें. पुराव्यासाठी दे. सावरकरां-वर वाज दोन वर्षे ठेवलेल्या डिटेक्टिव्हाची साक्ष झाली. त्याचे रिपोर्ट हजर करण्यात आले. हिंदुस्थान सरकारजवळ असलेली व नाशिकच्या खटल्यात दाखल झालेलीं दे. सावरकराची सर्व पत्रें भाषांतर करून देण्यात आली व अशा रीतीने जितके शक्य तितके साहित्य अेकत्र करून हा खटला सजविण्यात आला व ही सर्व चौकशी अशा गृहस्थाकडे चाललेली होती की, हिंदुस्थान व त्यावद्दलचे राजकारण या विषयाबद्दल त्याच्या ज्ञानाची अगाधता वर्णावी तितकी थोडीच ! अुदाहरणार्थ, दे. सावरकर याच्या गुरु गोविंदसिंहाच्या सभेतील भाषणाबद्दल चर्चा चालली असता अेक जण विचारतात 'गुरु गोविंदसिंह कोण ?' 'हा शीख लोकाचा गुरु आहे' 'पण याचा तुम्ही अुत्सव काय म्हणून केला ?' 'हा हिंदुस्थानच्या थोर पुरुषा-पैकी अेक होता.' तेव्हा अुत्सुकतेने विचारण्यात आले, 'Yes; but was he prosecuted for sedition ? त्याजवर राजद्रोहाचा खटला भरला गेला होता काय ?'

अशी ही चौकशी चालता चालता अखेर तिचा निकाल लागला. दे. सावर-कर याची अुलट तपासणी तीन तास चालली व कसलेल्या बॅरिस्टरांनी त्याची कसून अुलट तपासणी केल्यानंतरही जेव्हा काहीच तथ्य बाहेर येअीना तेव्हाच आरंभी केलेल्या अवडंबराचा नायनाट होणार असे दिसलें. अितक्यात त्याच आठवड्यात कॅक्स्टन हॉलमध्ये जो सभेचा प्रकार घडला तोही आरोप आणखी वढविला गेला ! परंतु टाअिम्स पत्रामध्ये दे. सावरकराचें पत्र छापलें गेल्यापासून तो आरोपही पोकळ झाला. शेवटी असा निकाल लागला की दे. सावरकर याज-वर कोणताही गुन्हा शाबीत झालेला नाही व म्हणून ते ग्रेज अिनचे कायमचे मेंबर आहेत. त्याना मेंबरशिपचे सर्व अधिकारआहेतच; परंतु त्याच्यावर संशय आलेला असल्यामुळे त्याना आजच सनद देण्यात येत नाही.

अशा रीतीने दे. सावरकर यांना आज मज्जाव झालेला आहे. पुढे त्यांना सनद देण्यात येईल—जर मध्यंतरी त्यांचें वर्तन निरुपद्रवो राहील तर! परंतु मला असें कळलेले आहे की, दे. सावरकर हे ग्रेज अिनची मेंबरशिप सोडून देऊन व पैसे परत घेऊन आपण होऊन या वकिलीच्या धंद्यास रामराम ठोकणार आहेत. आणि त्यांनी तसें का करू नये? लो. सुरेंद्रनाथ बानर्जी यांची सिव्हिल सर्व्हिसची नोकरी अेका खाजगी वादाकरता गेली व लो. अरविंद बाबू हे घोड्यावर चढता न आल्याने आपल्या सिव्हिल सर्व्हिसच्या धंद्याला मुकले. परंतु त्याच्या या मुकण्यानेच देशसेवेला त्यांना तनमनधनाने वाहून घेता आलें. दे. सावरकर यांना तर वकिलीच्या धंद्याला सध्या तरी जे मुकावे लागत आहे तें खाजगी वादासाठी किंवा कोणत्याही शारीरिक कमतरतेसाठी नसून देशाच्या भक्तीसाठीच होय. व म्हणूनच त्यांच्यावर या क्षुद्र महत्त्वाकांक्षेला लाथाडून देशसेवेला सर्वस्वी वाहून घेण्याची जास्तच जबाबदारी आलेली आहे.

रत्न शाणोल्लीढ झाल्याने, चंद्रकला शेष झाल्याने, जलसंचय शारदक्षीणतेने व दाता विभवतेने जसे अधिकच शोभतात, तसेच देशभक्त त्यांच्यावर आलेल्या संकटपरंपरेने जास्तच विलसत असतात. राष्ट्राने जगावे म्हणून ते मरतात; राष्ट्र श्रीमंत असावें म्हणून ते दारिद्र्यात पडतात; राष्ट्राने पोटभर खावे म्हणून ते अुपास करतात; हें क्षुपास करण्याचें महद्भाग्य दे. सावरकरांचे घराकडे वळेवळेच येत असता ते त्याचा स्वीकार करतील अशी त्यांच्या देशबांधवाची अुत्कट आशा असल्यास त्यात काही नवल नाही. देशाला त्यांच्या बॅरिस्टरीपेक्षा त्यांच्या भिक्षावृत्तीचीच जास्त जरुरी आहे!

—ता. १३ ऑगस्ट १९०९

\+ + +

## ४३. भयंकर नाटकाचा शेवटचा पडदा

लंडन, ता. २० जुलै १९०९—सर कर्झन वायली व लालकाका यांच्या अमानुष खुनाचा आरोप ज्या तरुणावर ठेवलेला होता त्याची चौकशी पुरी होऊन त्याला फाशीची शिक्षा देण्यात आली. ह्या कहाती तरुणाला तुरुंगात ठेवला असता त्याचेवर फार सूक्ष्म पहारा ठेवला होता. परंतु त्याचे वर्तनात कोणतेंही वेडेपणाचें वा मेंदू बिघडल्याचें प्रत्यंतर देणारी गोष्ट घडली नाही. इतकेंच नव्हे, त्याला भेटावयास गेलेल्या त्याच्या काही ओळखीचे गृहस्थांबरोबर तो अत्यंत हसून

खेळून गप्पा करीत असे, त्याला भेटण्याला जाण्याची हिंदी गृहस्थाना प्रथम सक्त मनाई होती. परंतु मागाहून परवानगी देण्यात आली. आत जाणाराचा प्रथम सक्त झाडा घेण्यात येत असे. तुरुगात डिंगराबरोबर हिंदी भाषेत न बोलण्याची ताकीद देण्यात येत असे व मग अिंग्रजी पहारेकऱ्याचे अगदी सन्निध डिंगराबरोबर भाषणाची संधि देण्यात येत असे डिंगराला हस्तस्पर्श करणे वा मिठाअी वगैरे कोणतेही अन्न देणे हे जरी सक्त रीतीने बंद करण्यात आले होते तरी बाकी सर्व गोष्टी करण्यास मुभा होती त्याप्रमाणे रोज अेक-दोन हिंदी गृहस्थ जाअून डिंगराशी बोलत असत १५ मिनिटापेक्षा जास्त बोलण्याची मनाअी असे. डिंगराने त्याचा भाअू त्याला भेटावयास गेला असता त्याची भेट घेण्याचे मात्र साफ नाकारले दोनदा त्याने आपल्या भावाचे तोंडही न पाहता त्याला परत फिरविले याचे कारण असे आहे की कक्स्टन हॉलमध्ये भरलेल्या हिंदी लोकाच्या सभेत ह्या डिंगराच्या भावाने मिस्टर मॉरिसन याच्या प्रेरणेने 'आपण त्या मनुष्याचा भाअू असल्याबद्दल आपणास लज्जा व धिक्कार वाटत आहे' असे सार्वजनिक रीतीने म्हटलेले होते! परंतु आता त्या भावाला आपल्या या कृत्या-बद्दल अत्यंत खेद वाटत असून तो मरणाचे आधी आपल्या भावाने आपणास भेटावे म्हणून अश्रु गाळताना पुष्कळानी त्याला पाहिलेले आहे! या अेका हिंदी गृहस्थाशिवाय बाकी जितके हिंदी गृहस्थ जात तितक्याना तो भेटण्याचे नाकारीत नसे परंतु कोणीही अिंग्लिश गृहस्थ गेला असता तो त्याला भेटण्याचे नाकारी ज्या दिवशी फाशीची शिक्षा झाली त्या दिवशीचे आधल्या दिवशी डिंगराने त्याला भेटण्यास गेलेल्या त्याच्या पूर्व स्नेही सावरकराना नम्र प्रणिपात करून आपले दोन तीन हेतु सिद्धीस नेण्याची विनंती केली होती हे हेतु त्या तरुणाच्या विलक्षण व निधड्या मनाची थोडी तरी कल्पना देतात त्याला हे पक्के माहीत होते— नव्हे, मॅजिस्ट्रेटचे कोर्टात त्याने होअून हट्ट धरला होता की, 'I do not plead for mercy; nor do I recognize your authority over me All I wish is that you should at once give me the capital punishment. I want to be hanged, for then the vengeance of my contrymen will be all the more keen' परंतु आपल्या क्रूर व निर्दय कृत्याचे प्रायश्चित्त आपल्या देहान्तातच आहे हे जाणत असतानाही तो म्हणाला की माझा पहिला हेतु हा आहे की माझ्या देहाची अुत्तरक्रिया हिंदु धर्माप्रमाणे झाली पाहिजे व माझ्या प्रेताला कोणाही अहिंदूचा व माझ्या भावाचा स्पर्श न व्हावा, माझी दुसरी अिच्छा ही आहे की माझ्या दहनकाली कोणा तरी ब्राह्मणाने मंत्राग्नि द्यावा, (डिंगरा जातीने क्षत्रिय आहे) माझी तिसरी अिच्छा अशी आहे की माझ्या खोलीत काही कपडे व पुस्तके आहेत, ती लिलावाने विकून त्याचे पैसे येथील राष्ट्रीय फंडास देण्यात यावेत! भयंकर वेडा हा मनुष्य! बिचाऱ्याचे सर्व जीविताचे विऱ्हाड

अुचललें जात असला तो त्याची दादही घेत नाही. परंतु खोलीतील विन्हाडात फाटके कपडे व दहापांच पुस्तकें अनाठायी न जाता तीं राष्ट्रीय फंडास द्यावी म्हणून वारंवार बजावून सांगत आहे ! ! कोण अमानुष वेडेपणा हा !

ता. २० जुलै रोजी डिंगराला कोर्टात आणलें. कोर्टाबाहेर शंभरावर हिंदी विद्यार्थी व गृहस्थ आत घुसण्यासाठी अुभे होते. परंतु कोणाही हिंदी मनुष्याला आत जाण्याची मनाअी होती डिंगराला कोर्टात आणलें तेव्हा अत्यंत निष्काळजीपणाने व धीट रीतीने तो अुभा होता. शेवटपर्यंत त्याचें वर्तन व चेहरा अुद्दामपणाचा व तिरस्कारदर्शक असून तो चाललेल्या प्रकाराकडे अत्यंत अुपहास-मुद्रेने व बेमुर्वतखोरपणाने (defiant attitude) पाहत होता असें सर्व अिंग्रजी पत्रें म्हणत आहेत. त्याने कोर्टास कळविलें की, मी तुमची सत्ता मान्य करीत नाही व ज्याअर्थी माझ्या देशाच्या अुद्धारार्थ मी हें कृत्य केलें आहे त्याअर्थी मी पूर्ण निर्दोषी (Not guilty) आहे. डिंगराने सॉलिसिटर वगैरे देण्याचें नाकारलेंच होतें व म्हणून त्याला तुझ्या समर्थनार्थ काहीं बोलावयाचे असल्यास बोल असें सांगितलें, तेव्हा तो म्हणाला की, माझ्या खिशात लिहून ठेवलेली माझी अेक जबानी तुम्ही घेतलेली आहे तीच वाचली जावी, परंतु वर्तमानपत्रवाल्यांच्या सूक्ष्म शोधाची वा डिंगराने वारंवार केलेल्या विनंतीची दाद लागू न देता डिंगराच्या खिशात व घरात सापडलेल्या या जबानीच्या प्रती प्रसिद्ध करण्याचें पोलिसने साफ नाकारलें. ही जबानी काय आहे व सरकार काय म्हणून ती लपवून ठेवीत आहे याबद्दल सर्वत्र चर्चा व तर्क चालू आहेत. परंतु ती जबानी वाचणे नाही असें समजल्यावरून निरुपायाने मॅजिस्ट्रेटपुढे दिलेली जबानीच वाचून दाखविण्यात आली. त्यांत डिंगरा म्हणाला 'माझ्या देशात तरुण लोकांना देशभक्तीकरिता फाशी देण्यात येत आहे व जन्मठेपेच्या शिक्षा ठोठावण्यात येत आहेत. अिंग्लंडसाठी अिंग्लिशांनी जें करावें म्हणून शिकविण्यात येतें तेच माझे तरुण देशबंधु माझ्या देशासाठी करीत असता त्यांच्या दुर्बलतेचा फायदा घेअून त्यांना मारण्यात येत आहे. याचा सूड म्हणून मी हें कृत्य केलें. हिंदुस्थानात जाणारा व तेथे दहा हजार रुपये मिळविणारा प्रत्येक अिंग्लिश मनुष्य माझ्या गरीब देशबांधवातील एक हजार देशबांधवाचें खूनच करीत असतो. कारण तो चैनीत जे पैसे खातो त्यावर हे हजार लोक जिवंत राहू शकतात. ज्याप्रमाणे जर्मनीला अिंग्लंडवर ज्या बलात्काराने राज्य करण्याचा कोणताही हक्क नाही, त्या बलात्काराचा सूड म्हणून मी हें कृत्य केलें. माझ्या देशातील स्त्रियांवर बळजबरीचे अत्याचार होत आहेत. माझ्या देशातील लाखो लोक दरसाल अुपाशी मारण्यात येत आहेत. गेल्या पन्नास वर्षांत अब्जांनी गणती व्हावी अितकी संपत्ति माझ्या देशातून लांबविण्यात आली आहे व हें मी पहात असता जेव्हा अिंग्लिश लोक रशियाबद्दल व कांगो लोकांच्या दुःस्थितीबद्दल हळहळत असताना माझ्या नजरेस पडतात तेव्हा मला त्या

मानभावीपणाचा असहनीय तिरस्कार वाटतो व अशा स्थितीत अिंग्रजला जिंकून त्यावर राज्य करणाऱ्या एखाद्या जर्मनाला अुद्दामपणाने लंडन शहरात वावरताना पाहून अिंग्लिश तरुणाने त्याला मारले असता त्याची जी देशभक्ति तुम्ही वाखाणली असती त्याच देशभक्तीने मी हे कृत्य केले आहे मी हे सत्य सर्व जगास विशेषत अमेरिका व जर्मनी येथील आमच्या हितचिंतकास सांगत असून ते तुम्हासाठी सांगत नाही।'' वगैरे आशयाची जबानी झाल्यावर न्यायाधीशानी काळी टोपी घातली व कोर्टाने डिंगरास पुन्हा विचारले की, 'तुला फाशीची शिक्षा का देण्यात येअू नये याबद्दल जर काही सांगणे असेल तर सांग ' तेव्हा तो म्हणाला 'मी अेकदा सांगितलेच आहे की, तुमच्या कोर्टाची सत्ता मी मानीत नाही तुम्हाला जे योग्य वाटेल ते तुम्ही माझे करा मला त्याची पर्वा नाही पण ही खात्री बाळगा की, अेक दिवस असा येणार आहे की त्या दिवशी आम्ही सबल व सत्ताधीश असू व तेव्हा जे आम्हाला वाटेल ते तुमचं आम्हीही करू।' या अुत्तरानंतर न्यायाधीशानी म्हटले, 'मदनलाल डिंगरा ' मग्ज्या कोणत्याही बोलण्याचा तुदयावर यत्किंचित परिणाम होणार नाही हें मी जाणून आहे तुजवर खून केल्याचा आरोप शाबीत झालेला आहे व म्हणून तुला फाशीची शिक्षा देण्यात येत आहे रीतीप्रमाणे धर्माधिकाऱ्याने 'परमेश्वर तुला क्षमा करो ' म्हणून म्हटले तोच, डिंगरा अुभा राहिलेला दिसला व म्हणाला 'मला फाशी दिलीत ही तुमची फार मेहरबानी झाली, कारण माझ्या पवित्र देशभूमीसाठी माझा तुच्छ देह बळी देण्याचा सन्मान मला जो मिळाला त्याचा मला गर्व वाटत आहे मला कशाचीही चिंता नाही ' त्वरित तीन पहारेकऱ्यासह हसत हसत तो पिंजऱ्यातून चालता झाला

अशा या भयंकर नाटकाचा हा शेवटचा पडदा उघडला व त्यानंतर हा भयानक देखावा दिसला आता फक्त अेक प्रवेश अुरलेला आहे व तो संपताच ह्या नाटकाचे भरतवाक्य होअील अशी आशा आहे

ह्या खटल्याचा निकाल होतो न होतो ताच दुसरा अेक निराळ्याच प्रकारचा खटला अुपस्थित झालेला आहे दे सावरकर यानी कॅक्स्टन हॉल-मधील डिंगराविरुद्ध असलेल्या आगाखानाच्या ठरावाचा जो योग्य निषेध केला त्यानंतर त्याना टाअिम्समध्ये अेक पत्र लिहून आपण ठरावाला का विरोध केला ते त्यात स्पष्ट लिहिलेले होते पत्र सावरकरानी ज्या दिवशी लिहिले त्या दिवशी रस्त्यातील सर्व बाजूना वर्तमानपत्राच्या जाहीर पत्रकावर 'सावरकराचे समर्थन ' वगैरे मोठमोठ्या शब्दानी छापलेले मथळे दिसत होते ह्या सर्व पत्रानी ते पत्र प्रमुखत्वाने छापले, अितकेच नव्हे तर त्या विरुद्ध टाअिम्ससारख्यानीसुद्धा ब्रही काढला नाही अितकेच नव्हे तर हेन्री कॉटन वगैरेंच्या सभेने नंतर जो ठराव पास केला तो फक्त सहानुभूतीचा करून त्यात आरोप ठेवलेल्या तरुणाबद्दल चकार

हे विद्वान् व प्रसिद्ध लेखक असून ते आज दहा वर्षे अिंग्लडात पत्रलेखनाचा व्यवसाय करीत होते. त्याचे वडील हे हैद्राबाद व बंगाल या प्रांतात नावाजलेले गृहस्थ आहेत. दे. सावरकराप्रमाणे अुघडपणे समर्थन करण्यासाठी यानी टाअिम्सला पत्रे धाडली होती व त्यात ' 'I do not believe in the old-world idea of 'peaceful revolution' of Bipin Chandra Pal' वगैरे मजकूर प्रसिद्ध केलेला होता. दे. सावरकराना फक्त सनद देण्याचे नाकारले असून त्याचे सभ्यत्वें सभासदपण व अधिकार कायमच ठेवलेले आहेत. परंतु दे. चट्टोपाध्याय याजवर तीही मेहेरबानी झालेली नाही. दे. सावरकराची चौकशी चालली तेव्हा भोळे लोक म्हणत की फक्त ग्रेज अिन वाअीट आहे. आता मिडल टेंपलने तीवरही ताण केली ! ज्यास काही स्वाभिमान व प्रतिष्ठितता आहे त्यानी पुन्हा अिंग्लडात कायद्याच्या अभ्यासाला न शिवणेंच बरें. अिंग्रज येथून तेथून अेकच. मग ते हिंदुस्थानात असोत की अिंग्लडात असोत; ग्रेज अिनचे मेंबर्स असोत वा मिडल-टेंपलचे बेंचर्स असोत ! अितके जरी हिंदी तरुण शिकले तरी दे. सावरकर व चट्टोपाध्याय याचे छळाचा उपयोग झाला असे मानण्यास हरकत होणार नाही ! मृत्यूची शिक्षा झालेला मदनलाल डिंगरा ह्याचा कॉलेजातील अभ्यासक्रम फारच अुत्तम होता व तो परीक्षेत पहिला आलेला होता. तीन वर्षांचा अभ्यासक्रम संपवून शेवटची परीक्षाही त्याने अुत्कृष्ट रीतीने दिलेली होती व महिन्या दोन महिन्यात तो हिंदुस्थानातही परत जाता ! त्याची फाशी रद्द व्हावी म्हणून स्टेडसाहेब फार खटपट करीत आहेत. त्याचे मते त्याला जन्मठेप व्हावी. परंतु डिंगरा फाशी जाण्याविषयीच अधिक अुत्सुक आहे ! आपले प्रेत दहन करण्यात यावे अशी त्याची अिच्छा असल्याने व ही धार्मिक बाब असल्याने येथे हिंदु लोकानी सह्या केलेला अेक अर्जही सरकारकडे धाडण्यात येत आहे की, डिंगराचा मृत देह हिंदूचे स्वाधीन करण्यात यावा. या अर्जावर सह्या भरपूर होत आहेत. त्याचप्रमाणे डिंगराने मला ब्राह्मणानी अुपदेश द्यावा म्हणून अिच्छा केलेली असून ते धर्मकृत्य करण्यासाठी पदवीधर व धर्मज्ञ ब्राह्मणांनीही आपण तयार असल्याचे सरकारास कळविले आहे.

—ता. २७ ऑगस्ट १९०९

+ + +

## ४५. भरतवाक्य

लडन, ता २१ ऑगस्ट—लडनमध्ये सुरू झालेल्या महाभयकर नाटकाचा शेवटचा पडदा पडून भरतवाक्यालाही सुरवात झालेली आहे ! ज्या तरुणाने सर वर्झन वायली या अिंडिया ऑफिसच्या व अिंडियन सरकारच्या मुख्य अधिकाऱ्याचा निर्दय व क्रूर वध केला त्या डिंगराला गेल्या मगळवारी फाशी दिली गेली ! त्याला फाशीची माफी होअून जन्मठेप मिळावी अशी काही अिंग्रज लोकानी खटपट चालविली होती, परतु ती गोष्ट सरकारास रुचली नाही अितकेच नव्हे तर सरकारपेक्षा मि डिंगरालाच जास्त रुचली नाही ! तो सारखा हट्टच धरून बसला की, मला फाशी झालीच पाहिजे कारण 'So that the vengeance of my countrymen will be all the more keen !' अुभय पक्षानाही फाशी रुचली होती डिंगरा तुरुगात गेल्यापासून त्याचेकडे भेटण्यास त्याचे पुष्कळ अिंडियन स्नेही जात असता त्याच्याशी तो अत्यत हसून खेळून गप्पा करी, तुरुगात तो पुस्तक वाची व लेख लिही त्याला मरणानतर जाळावे म्हणून त्याने फार प्रयत्न केलेले होते त्याचप्रमाणे येथील लोकानी देखील सह्या करून अर्ज केला की, डिंगरा हा हिंदु असल्याने व त्याची हिंदुधर्माप्रमाणे अुत्तरक्रिया व्हावी अशी फार अिच्छा असल्यामुळे त्याच प्रेत जाळण्यात यावे परतु सरकारने त्या अर्जाची काही अेक दाद न घेता त्याला जाळण्याचे साफ नाकारण्यात आल मेल्यानतरही डिंगराच्या प्रेताला ही औध्वदेहिक शिक्षा दिली नसती तर काही वावगे झाल असत अस नाही

मगळवारी सकाळी डिंगरा गाढ झोपेतून जागा झाला त्याने अुत्तम प्रकारे पोशाक केला सकाळचा फराळही थोडासा केला सुमारे ९ वाजता ठरलेली घटा वाजू लागली त्या दिवशी आत कोणालाच, वर्तमानपत्राच्या बातमीदारानाही येअू दिल जाणार नाही अस आधीच सक्त हुकमाने प्रसिद्ध झाल असल्याने तुमती दरवाज्याबाहेर गर्दी होती आज्ञा नसताही आत जाण्यासाठी धडपड करीत हिंदी लोक तुरुगाभोवती घिरट्या घालीत फिरत होते अिंग्रजही दोनतीनशे जवळजवळ अुभे होते परतु आत कोणालाही जाता आल नाही घटा वाजू लागताच डिंगराकडे खिस्ती धर्माचे धर्माधिकारी आले परतु त्याचा अुपदेश आपल्याला नको, आपण हिंदु आहोत व हिंदुधर्माप्रमाणेच आपण मरणार असा त्यान हट्ट धरला नतर अनावृत मस्तकाने व दृढ पदन्यासान तो वधस्तभाकडे चालला वधस्तभावर चढला तेव्हा तो अितका बेफिकीर होता की त्याला कोणत्याही प्रकारचा हात देणे जरूर पडल नाही वधपाशात मान गुतली ठोकळा अुडाला व मदनलाल डिंगरा आठ फूट उचीवरुन मृत्यूचे जबड्यात कोसळला थोड्या वेळाने प्रेताची रीतसर चौकशी चालताना दे मास्तर या पारशी गृहस्थाना आत आणविल गेले ते डिंगराचे व सावरकराचे अेक स्नेही होते त्याचे समक्ष डिंगराचे प्रेताची चौकशी

झाली. त्या वेळेस धिंगराच्या प्रेताचे दर्शन भयप्रदच होणारे होतें! त्याचे चेहऱ्यावर दु:खाची वा भयाची छटा नव्हती. त्याचे अंग ताठ झालेले होतें. त्याचे डोळे वटारलेले होते. अंगात नेहमी जो पोशाख घालून तो कॉलेजात जाई तोच पोशाख चढलेला व त्याची मान कठमणी फुटल्यामुळे लुळी पडलेली!

धिंगराचा मृत्यु तत्काळ झालेला होता. अेका मिनिटात सर्व निकाल लागला. अेका मिनिटात शेवटचा पडदा पडला!

परंतु या अपूर्व नाटकाचे शेवटचे भरतवाक्य तो पडदा पडण्यापूर्वी सुरू झालेले होते. धिंगराची केस चालली असताना त्याने अेक स्वसंरक्षणार्थ लिहिलेला जबाब त्याचे खिशात सापडलेला होता. तो जबाब कोर्टात वाचावा असा त्याचा अत्यंत हट्ट असताही व तो जबाब आपणास मिळावा म्हणून सर्व पत्रकर्त्यांचा आटोकाट प्रयत्न चालला असताही ब्रिटिश अधिकाऱ्यांनी व पोलिसांनी तो लेख प्रसिद्ध करण्याचे साफ नाकारून आतल्या आत दडपून टाकलेला होता. ही गोष्ट सर्वत्र वर्तमानपत्रातून प्रसिद्ध आहे. ह्या दस्तअेवजाची प्रसिद्धि पूर्ण अशक्य होती. परंतु धिंगरा फाशी जाण्याचे आधीच अेक दिवस सर्व लंडन शहर अेखाद्या भूतबाधेमारखे दचकून वेडावले. झाले तरी काय? तर ह्या ब्रिटिशांच्या व पोलिसांच्या तिजोरीत दाबून टाकलेल्या अेकुलत्या अेक दस्तअेवजाची चोरी होअून कोण्या अेका हिंदूने तो छापून प्रसिद्ध केला. त्याच्या हजारो प्रति रस्त्यात हातोहात वाटल्या जाअू लागल्या! पोलिसांना तर तोंड बाहेर काढवेना. त्याची तिजोरीतील प्रत तशीच त्यांचेपाशी, मग ही दुसरी प्रत कशी पैदा झाली? अनेक शंका! ब्रिटिश तुरुंगातील कोणी गोरा अधिकारी तर हिंदी लोकांना फितूर नाही? कोणी म्हणे धिंगराचे कृत्य हे अेका गुप्त कटाचेच अंगभूत असले पाहिजे, त्याशिवाय ही त्याची जबानी दुसऱ्यास कशी माहिती असणार? कोणी म्हणाले, कट आधी नमावा, पण तुरुंगात असताना त्याचे कपडचाची ने आण होत असताना ही प्रत बाहेर छपवून धाडली असावी! अेसच गोंधळ चाललेला आहे. ती प्रत अस्सल आहे यात शंका नाही. कारण डेली मिरर म्हणते की, "त्यात चक्क असे लिहिलेले आहे की, 'ही प्रत धिंगराचे लेखाची हुबेहूब नक्कल आहे असे आम्ही प्रतिपादन करतो. जर ब्रिटिश सरकार तसे नाही असे म्हणत असेल तर त्यांना We challenge them to prove otherwise before the whole world' सर्व जगासमोर आव्हान करतो की, तसे त्यांनी मूळ नक्कल प्रसिद्ध करून सिद्ध करावे!" पोलिसही कबूल करतात की ही अस्सल प्रत आहे. ती निदान वर्तमानपत्रात तरी प्रसिद्ध होअू नये म्हणून सर्वांनी खटपट केली. पण तसे करणे निष्फळ होअून शेवटी खुद्द सरकारी प्रमुख पत्र डेली न्यूज ह्याने ती सर्व लेखी जबानी छापून काढली. टाअिम्स, स्टॅंडर्ड वगैरे पत्रे चिडून जाअून लेख लिहीत आहेत व गुप्त कटाबद्दल हिंदी लोकांना, ढिलेपणाबद्दल व गयाळवृत्तीबद्दल पोलिसांना व मूर्खपणाबद्दल 'डेली न्यूज' ला शिव्या हसडीत आहेत!

परंतु डेली न्यूजने त वक्तव्य छापले नाही त्याने ही challenge (आव्हान) प्रसिद्ध केली नाही तोच अमेरिकेतून चवताळलेल्या अिंग्रजाच्या तारा आल्या की डिंगरा ज्या दिवशी फाशी गेला त्याच दिवशी अमेरिकन पत्रानी हेच हस्तपत्रक मोठमोठ्या टाअिपात छापलेले होते ! ' ब्रिटिश सरकारला ठकविले ! डिंगराची दाबून टाकलेली जबानी ! अद्‌भुत चमत्कार !' वगैरे विलक्षण मथळ्याखाली हें ' आव्हान' छापून अमेरिकन पत्रे विसावा घेतात न घेतात तोच आयर्लंड दत्त म्हणून पुढे आले ! फार काय, पण कालच चहूकडे तारा प्रसिद्ध झाल्या आहेत की ' Ireland honours Dingra ! Huge placards with deep black borders and with the inscription ' Ireland honours Madanlal Dhingra who was proud to lay down his life for the sake of his Country in letters twelve inches in length were found posted today on walls within few miles of Dublin ! अेकेक फूट जाडीच्या अक्षराची जाहीरपत्रके भिंतीवर डकवलेली की ' आयर्लंड डिंगराचा सन्मान करत आहे !'

सावरकराचे स्नेही दे मास्तर या पारशी गृहस्थाची डेली मिररच्या वातमीदाराने भेट घेतली तेव्हा त्याने विचारले — ' Will he be considered as a martyr by the Indians ? दे मास्तर म्हणाले की, certainly He has laid down his life for his contry's good Whether his idea of this ' good' was right or wrong is a matter of opinion '

अेका अिटालियन वर्तमानपत्राने अेक चित्र दिलेले आह त्यात अेक मोठा कडा काढलेला असून पायापाशी हिंदुस्थान, त्यावर अिजिप्त, सोमालीलाड वगैरे घिटा, त्यावर वसाहती व त्यावर अिंग्लंड बसलल आहे, अितक्यात स्फोट होतो व ' हिंदु नॅशनलिस्ट ' बार अुडवितो हिंदुस्थानला खिंडार पडते व सर्व कडा डळमळू लागून घाबरलेला जॉनबुल म्हणतो ' अरे हा वाडा ढासळला ! ह्याचा पायाच पोखरला गेला ! माझे अंगास कोण कापरं भरल आहे !'

जर्मनी व फ्रान्स या देशातील पत्रात तर हिंदुस्थानच्या चळवळीची हकीकत देवून अिंग्लंडविरुद्ध फार कडक लेख येत आहेत हा सर्व मत्सराचा परिणाम असावा, झाल !

—ता १० सप्टेंबर १९०९

\+ + +

## ४६. दे. सावरकरांचें पत्र

लंडन —इ. स १८५७ साल्च्या युद्धप्रसंगाचा लिहिलेला एक इतिहास कस्टम खात्याच्या नियमाप्रमाणे हिंदुस्थानात आणणे मना करण्याविषयी हिंदुस्थान सरकारने सोडलेला व अिंग्लंड व हिंदुस्थान यातील बऱ्याच पत्रात प्रसिद्ध केलेला एक हुकूम माझे नजरेस नुकताच आणण्यात आलेला आहे. त्या हुकमात माझे नावाचा उल्लेख असल्याने मला त्यासबंधी हे पत्र लिहावे लागत आहे

हे पुस्तक अजून अप्रकाशित आहे हे सरकारासही कबूल आहे व म्हणूनच जें पुस्तक कोणत्या स्वरूपाचे आहे हे निश्चयात्मकतेने कोणासच ठरविणे अशक्य होणारे आहे, अशा अेखाद्या पुस्तकाला तें जन्म पावण्याचे आधीच राजद्रोही ठरवून तत्प्रसिद्धीची बंदी करणे हें कायदेशीर असेल वा नसेल—तरी हें न्याय्य नाहींच नाही. परंतु हे पत्र त्या मुद्द्याबद्दल नव्हे. हिंदुस्थानच्या गव्हर्नर जनरलने मला न कळविता वा यासबंधी माझे म्हणणे अैकण्याची तसदी मुळीच न घेता त्या हुकमात माझे नाव बेधडक घुसवून देण्याचा जो अश्लाघ्य प्रकार केलेला आहे त्याबद्दल हे पत्र मी लिहीत आहे. सरकारला मिळालेली माहिती विश्वसनीय होती वा नव्हती, जर ती माहिती विश्वसनीय होती तर मजविरुद्ध आणलेल्या या आरोपाची मला सूचना देअून माझे म्हणणे अैकण्यात सरकारच्या सरळतेला वा माहितीच्या विश्वसनीयतेला काही कमीपणा आला असता असे नाही. आणि जर ती माहिती विश्वसनीय व पुरेशी नव्हती तर तिच्यावर अंधळा विश्वास ठेवून माझे नाव त्या पुस्तकाशी जोडण्याचे आधी मला त्याबद्दल स्वसमर्थन करण्यास सांगणे हे सरकारचे कायदेशीर व नैतिक कर्तव्यच होते, परंतु घाअीने मजवर अचानक हल्ला करण्यातच सरकारला समाधान वाटलेले दिसते

अेतदर्थ अशा स्थितीत मला जे करणे शक्य आहे व अिष्ट आहे ते अितकेच की, सरकारच्या हुकमात केलेल्या अस्पष्ट अुल्लेखावरून त्याच्या कल्पनेसमोर असलेल्या त्या अज्ञात पुस्तकाचे स्वरूपाचा जो काही थोडाबहुत बोध होण्यासारखा आहे तशा स्वरूपाच्या कोणत्याही पुस्तकाशी माझे नावाचा अर्थाअर्थी काही अेक संबंध नाही हे सार्वजनिक रीत्या प्रसिद्ध करणे होय व म्हणूनच मी हें पत्र आपणास लिहिले आहे आपण व आपले व्यवसायबंधु हे पत्र छापतील अशी आशा करणारा,

वि. दा. सावरकर

—ता. १७ सप्टेंबर १९०९

\+ + +

परंतु डेली न्यूजने ते वक्तव्य छापले नाही त्यानें ही challenge (आव्हान) प्रसिद्ध केली नाही ताच अमेरिकेतून चवताळलेल्या अिग्रजांच्या तारा आल्या की डिंगरा ज्या दिवशी फाशी गेला त्याच दिवशी अमेरिकन पत्रांनी हेच हस्तपत्रक मोठमोठ्या टाअिपात छापलेले होते ! ' ब्रिटिश सरकारला ठकविले ! डिंगराची दाबून टाकलेली जबानी ! अदभुत चमत्कार !' वगैरे विलक्षण मथळ्याखाली हे ' आव्हान' छापून अमेरिकन पत्र विमावा घेतात न घेतात ताच आयर्लंड दत्त म्हणून पुढे आले ! फार काय, पण काल चहूकडे तारा प्रसिद्ध झाल्या आहेत की 'Ireland honours Dingra ! Huge placards with deep black borders and with the inscription 'Ireland honours Madanlal Dhingra who was proud to lay down his life for the sake of his Country in letters twelve inches in length were found posted today on walls within few miles of Dublin ! अकेक फूट जाडीच्या अक्षराची जाहीरपत्रके भिंतीवर डकवलेली की ' आयर्लंड डिंगराचा सन्मान करत आहे !'

सावरकराचे स्नेही दे मास्तर या पारशी गृहस्थाची डेली मिररच्या बातमी-दारानें भेट घेतली तेव्हा त्यानें विचारले – Will he be considered as a martyr by the Indians ? दे मास्तर म्हणाले का, certainly He has laid down his life for his contry s good Whether his idea of this 'good' was right or wrong is a matter of opinion '

अका अिटालियन वर्तमानपत्रात अेक चित्र दिले आहे त्यात अेक मोठा कडा काढलेला असून पायापाशी हिंदुस्थान, त्यावर अिजिप्त, सोमालीलॅड वगैरे विटा, त्यावर वसाहती व त्यावर अिंग्लंड बसलेले आहे, अितक्यात स्फोट होतो व ' हिंदु नॅशनलिस्ट वार थुंकितो हिंदुस्थानला खिंडार पडत व सर्व कडा डळमळू लागून घाबरलेला जानबुल म्हणतो 'अरे हा वाडा ढासळला ! ह्याचा पायाच पोखरला गेला ! मात्र अगास कोण वापर भरले आहे !'

जर्मनी व फ्रान्स या देशातील पत्रात तर हिंदुस्थानच्या चळवळीची हकीकत देऊन अिंग्लंडविरुद्ध फार कडक लेख येत आहेत हा सर्व मत्सराचा परिणाम असावा, झाले !

–ता १० सप्टेंबर १९०९

\+ + +

# ४६. दे. सावरकरांचें पत्र

लडन — इ स १८५७ सालच्या युद्धप्रसगाचा लिहिलेला एक इतिहास कस्टम खात्याच्या नियमाप्रमाणे हिंदुस्थानात आणणे मना करण्याविषयी हिंदुस्थान सरकारने सोडलेला व अिग्लड व हिंदुस्थान यातील बऱ्याच पत्रात प्रसिद्ध केलेला एक हुकूम माझे नजरेस नुकताच आणण्यात आलेला आहे त्या हुकमात माझे नावाचा उल्लेख असल्याने मला त्यासबधी हें पत्र लिहावे लागत आहे

हे पुस्तक अजून अप्रकाशित आहे हे सरकारासही कबूल आहे व म्हणूनच जे पुस्तक कोणत्या स्वरूपाचे आहे हे निश्चयात्मकतेने कोणासच ठरविणे अशक्य होणारे आहे, अशा अेखाद्या पुस्तकाला तें जन्म पावण्याचे आधीच राजद्रोही ठरवून, तत्प्रसिद्धीची बदी करणे हे कायदेशीर असेल वा नसेल — तरी हे न्याय्य नाहीच नाही परतु हे पत्र त्या मुद्द्याबद्दल नव्हे हिंदुस्थानच्या गव्हर्नर जनरलने मला न कळविता वा यासबधी माझे म्हणणे अैकण्याची तसदी मुळीच न घेता त्या हुकमात माझे नाव धडक घुसवून देण्याचा जो अश्लाघ्य प्रकार केलेला आहे त्याबद्दल हे पत्र मी लिहीत आहे. सरकारला मिळालेली माहिती विश्वसनीय होती वा नव्हती, जर ती माहिती विश्वसनीय होती तर मजविरुद्ध आणलेल्या या आरोपाची मला सूचना देअून माझे म्हणणे अैकण्यात सरकारच्या सरळतेला वा माहितीच्या विश्वसनीयतला काही कमीपणा आला असता अस नाही आणि जर ती माहिती विश्वसनीय व पुरेशी नव्हती तर तिच्यावर अधळा विश्वास ठेवून माझे नाव त्या पुस्तकाशी जोडण्याचे आधी मला त्याबद्दल स्वसमर्थन करण्यास सागणे हे सरकारचे कायदशीर व नैतिक कर्तव्यच होते, परतु घाअीने मजवर अचानक हल्ला करण्यासच सरकारला समाधान वाटलेले दिसते

अेतदर्थ अशा स्थितीत मला जे करणे शक्य आहे व अिष्ट आहे ते अितकेच की, सरकारच्या हुकमात केलेल्या अस्पष्ट अुल्लेखावरुन त्याच्या कल्पनेसमोर असलेल्या त्या अज्ञात पुस्तकाचे स्वरूपाचा जो काही थोडाबहुत बोध होण्यासारखा आहे तशा स्वरूपाच्या कोणत्याही पुस्तकाशी माझे नावाचा अर्थाअर्थी काही अेक सबध नाही हे सार्वजनिक रीत्या प्रसिद्ध करणे होय व म्हणूनच मी हें पत्र आपणास लिहिले आहे आपण व आपले व्यवसायबधु हें पत्र छापतील अशी आशा करणारा,

वि. दा. सावरकर

—ता. १७ सप्टेंबर १९०९

\+ + +

## ४७. विजयादशमीचा अुत्सव

लंडन, ५ नोव्हेंबर—हिंदुस्थानात ख्रिस्तमस साजरा करण्याची पद्धति जसजशी कमी होत व लज्जास्पद वाटत चालली तसतशी लंडनमध्ये विजयादशमीचे समारंभ करण्याची पद्धत माननीयतेची व वाढत्या जोराची होत चालली थोड्या वर्षांपूर्वी विशेषत बंगाल व मद्रासकडे ख्रिस्तमस हिंदुसणापेक्षा जास्त मानला जाअून 'सुशिक्षित' लोकांना ख्रिस्तमसची कार्डे शेकड्यांनी वाटली जात जरी 'अशिक्षित' हिंदु समाज या अुपऱ्या सणाचा विटाळ न होअू देता अभिमानीपणाने आपल्या वाडवडिलांच्या अुत्सवातच अुत्साह मानीत होता तरी अिंग्लंडमध्ये विजयादशमीच्या नावावर राहो पण आम्ही हिंदु आहो म्हणून सांगणे ही शरमेची व फाजील धर्मभोळेपणाची व रानटी आडदांडपणाची गोष्ट समजली जाअी ! तीन वर्षेही झाली नाहीत, अेके दिवशी अेका खानावळीत आम्ही जेवावयाला बसलो आमचे शेजारी दुसरा अेक आमचा हिंदु स्नेही बसला होता आम्ही येण्याचे सुमारे दोन वर्षे आधी हे गृहस्थ अिंग्लंडात आलेले असल्याने अिंग्लंडच्या चालीरितीविषयी केव्हा केव्हा साहजिकपणेच आम्हांस माहिती सांगत टेबलावर दुसरे बाजूस दोन अिंग्रज स्त्रिया त्याच खाणावळीत राहणाऱ्या व म्हणून जरा ओळखीच्या बसलेल्या होत्या गोष्टीवरून गोष्ट निघता रविवारी चर्चमध्ये जाण्याचे प्रश्न चालले व माझे स्नेही म्हणाले 'होय, मीही रविवारी चर्चमध्ये जातो प्रत्येक ख्रिश्चनने गेलेच पाहिजे.' आम्हाला आमच्या या हिंदु स्नेह्याच्या अुत्तराचे मोठे गूढ पडले अितक्यात त्या अिंग्रजी स्त्रियांनी आम्हालाही चर्चमध्ये जाण्याबद्दल विचारले तेव्हा आम्ही म्हणालो, 'कधी कधी आम्ही पाहण्यासाठी जातो बाकी आम्ही हिंदु लोक रविवारी चर्चमध्ये जाण्याची जरुरी मुळीच मानीत नाही' 'तर आपण हिंदु आहा काय?' मोठ्या दयार्द्र मुद्रेने ह्या स्त्रिया म्हणाल्या. स्वाभिमानस्वराने आम्ही अुत्तर दिले, की, 'आम्हांस फार मोठी धन्यता वाटत आहे की आम्ही हिंदु आहो' जेवणानंतर आमचा स्नेही म्हणाला, 'कशाला तुम्ही सांगितलेन आपण हिंदु आहात ? हे जरा अिंग्रजाच्या कानाला ठीक लागत नाही' आम्ही अुत्तर केले, 'त्यांच्या कानाला तुमच्या वडिलांचेही नाव ठीक लागत नाही मग ते तुम्ही फिरवाल काय ? कानाला वाअीट लागते म्हणून जर धर्म छपविणे शिष्टसंमत आहे तर मग अिंग्रजच आम्ही हिंदु आहोत असे का सांगत नाहीत ? त्यांचे ख्रिश्चन असणे हे आमचे कानाला वाअीट लागते हे त्यांनाच आपण जाअून कळवा'

ही तीन वर्षांच्या पूर्वीची स्थिति पालटली आणि आता हिंदुस्थानात ख्रिस्तमसची कार्डे वाटणे व अिंग्लंडात हिंदुस्थानची लज्जा वाटणे बंद पडले व त्या जागी खुद्द लंडन शहरात विजयादशमीचे अुत्सव मोठ्या समारंभाने गाजू लागले

मी हिंदु आहे हें सांगण्यास तरुणांना कोण अभिमान वाटू लागला आहे! आज आमचा हिंदूचा सण आहे याची त्यांना कोण धन्यता वाटत आहे! श्रीरामाचे नावाचा जयजयकार लंडनमध्ये कोण गजराने होत आहे! असे स्थित्यंतर तीन वर्षांत झालें!

विजयादशमीचे दिवशी सर्व हिंदी लोकांची अेक मेजवानी क्वीन्स्‌रोड हॉल्‌मध्ये झाली 'श्रीरामो विजयते' या मथळ्याच्या सुवर्णपत्रिका सर्व लंडनमधील हिंदी गृहस्थांस वाटल्या होत्या मेजवानीच्या पत्रिकेची वर्गणी तीन रुपये होती तरी शंभरावर हिंदी समाज हॉलमध्ये जमलेला होता त्यांत मोठमोठे व्यापारी, प्रोफेसर, डॉक्टर, विद्यार्थी असून देशभक्त मोहनलाल गांधी हे अध्यक्ष होते हिंदी स्त्रियाही हजर होत्या हा निव्वळ भारतीय अुत्सव असल्याने हिंदी मनुष्याविरहित दुसरा मनुष्य कोणी येअू दिला गेला नाही हॉल्‌मध्ये मेजवानीच्या सुंदर पंक्ति, धूपाचा धार्मिक दरवळ, मध्यभागी लावलेलें भव्य राष्ट्रीय निशाण व त्यावरील अेकेक फूट जाडीची 'वंदे मातरम्' ही अक्षरं व राष्ट्रीय गीतांचे स्वर यांनी फार शोभा आलेली होती हिंदु रीतीप्रमाणे समारंभ सुरू होअून दे गांधींचे चळवळीचे भाषण झाले ते म्हणाले 'आजच्या प्रसंगी पान वाढणे, पाणी घालणे, सैंपाक करणे वगैरे सर्व कामे प्रोफेसर, डॉक्टर वगैरे दर्जाच्या स्वयंसेवकांनी केलेली पाहून मला आमच्या लोकांत वाटत चाललेल्या लोकसेवातत्परतेची आणखी अेक प्रचिताच मिळाली अशा प्रसंगी मला व आपणाला अेकत्र होअून भेटी घेता यतात ही किती आनंदाची गोष्ट आहे लंडनमध्ये असला समारंभ होत असेल हे मला आतापर्यंत खरं वाटलं नसते हा समारंभ हिंदु असताही येथे माझे मुसल्मान, पारशी वगैरे देशबंधु प्रेमाने येतात हेही ध्यानात घेण्यासारखं आहे श्रीरामाचे सद्‌गुण जर आपल्या राष्ट्रांत पुन्हा अुतरतील तर आपल्या अुन्नतीला वेळ लागणार नाही नंतर हिंदुस्थानच्या नावाचा जयघोष होअून मातृभूला पुष्पांजलि अर्पण करण्यासाठी दे गांधींनी त्यांच्याबरोबर आलेले साअुथ आफ्रिकेतील प्रसिद्ध देशभक्त प्रतिनिधि अल्ली अजीझ यांना सांगितलें ही मातृभूला अर्पण होणारी पुष्पांजली देताना या मुसलमान देशभक्तांनी दोन मिनिटांच चटकदार भाषण केले व म्हटले की हिंदु व मुसलमान यांची जी भूमि ती हिंदुस्थानची भूमि त्वरित अुन्नत व समर्थ व्हावो त्यांना अंतःकरणपूर्वक दुजोरा देण्यास दे वीरेंद्रनाथ चट्टोपाध्याय अुठले तेव्हा लोकांनी त्यांचा सत्कार केला त्यांचे भाषण तीन चार मिनिटे होअून मग मातृभूला सर्वांनी पुष्पांजलि अर्पण केली अध्यक्ष दे गांधी यांनी नंतर श्रीरामचंद्रास पुष्पांजलि अर्पण करावी म्हणून दे सावरकर यांस सांगितलं व म्हणाले की, कांहीं मतभिन्नता असली तरी मला दे सावरकरांसन्निध बसण्याची संधि मिळाली याबद्दल अभिमान वाटत आहे त्यांच्या स्वार्थत्यागाची व देशभक्तीची मधुर फळे आपल्या देशाला चिरकाल लाभोत अध्यक्षांनी सांगितल्याप्रमाणे श्रीरामचंद्राचे चरणावर पुष्पांजलि

अर्पण करण्यास अुठताना दे. सावरकर म्हणाले, 'मी भाषण करण्यास अुठताना आपण सारखा पाच मिनिटेपर्यंत जो हा गजर करण्याची तसदी घेतलीत त्याबद्दल मी आपले फार आभार मानतो. कर्तव्य हे स्वत च सुखदायी आहे. परतु त्याच्यासाठी ते केले जाते त्याच्याकडून ते जेव्हा वाखाणले जाते तेव्हा जास्तच सुखदायी होणारे आहे आज मला आपले आभार आणखी अेका गोष्टीबद्दल मानणे आहे ती गोष्ट ही की, मला आपण प्रस्तुतच्या कोणत्याही विषयावर बोलणे भाग न पाडता श्रीरामाच्या काळाबद्दल बोलण्याची सेवा सांगितलीत प्रस्तुत स्थितीबद्दल काय बोलणार? प्लेग व दुष्काळ व गुरला ! त्यापेक्षा अेक तासभरच का होअीना पण भारतभूमीच्या वैभवकालात सचरणे हे किती तरी महत् भाग्य आहे ! जेव्हा कालिदास कविता करीत, गौतम अुपदेश देत, विक्रम सिथियनाना व चद्रगुप्त ग्रीक लोकाना जिंकीत, राम राज्य करीत व वाल्मीकि वीरकाव्य गात, त्या काळात मला आपण जाण्याची परवानगी दिलीत हे आपले आज मजवर दुसरे अुपकार आहेत !' नतर रामायणातील निरनिराळे भाग वाल्मीकीचे सरस वाणीने वाचून व विवर्णून दे. सावरकर म्हणाले 'जेव्हा श्रीराम आपले पित्याचे वचनासाठी बरवर, परतु रक्षणासाठी मुख्यतः राज्य सोडून वनवासात शिरले तेव्हा त्याचे ते कृत्य महत् होते. जेव्हा श्रीरामचद्रानी लकेवर चाल केली व अपरिहार्य व धर्म्य युद्धाला सज्ज होअून रावणाला ठार मारले तेव्हा ते कृत्य महत्तर होते परतु जेव्हा युद्धीनतरही सीतेला अुपवनात 'आराधनाय लोकस्य मुञ्चतो नास्ति मे व्यथा' म्हणून सोडून दिली तेव्हा त्याचे ते अवतारकृत्य महत्तम होत ! ! ! रामाचे व्यक्तिविषयक वा कुलविषयक कर्तव्य त्यानी त्याच्या लोकनायकाच्या राजाच्या कर्तव्यासाठी बळी दिले ! रामाचे अवतारकृत्य व श्रीरामचद्राची मूर्ति जोपर्यंत तुम्ही दृढतेने हृदयात धराल तोपर्यंत, हिंदूनो, तुमची अवनति सहज नष्ट होण्याची आशा आहे. तो दशरथाचा पुत्र, तो लक्ष्मणाचा भाअू, तो मारुतीचा स्वामी, तो सीतेचा पति, तो रावणाचा निहन्ता श्रीराम जोपर्यंत हिंदुस्थानात आहे तोपर्यंत हिंदुस्थानची अुन्नति सहजलभ्य राहणारी आहे श्रीरामाचा विसर पडला की हिंदुस्थानातला राम नाहीसा झाला. हिंदु हिंदुस्थानचे हृदय आहे तथापि अिंद्रधनुष्यात जसे सर्व सौंदर्य रगाच्या अनेकतेने न विघडता ते अधिकच खुलते, तसेच मुसलमान, पारशी, यहुदी वगैरे जगातील सर्व सुधारणेचे अुत्तमाश मिसळून घेअून हिंदुस्थानही कालाच्या आराधनात अधिकच खुलेल.' वगैरे आशयाचे सुमारे पाअूणतास भाषण झाल्यावर श्रीरामचद्रास पुष्पाजलि अर्पण केली गेली. नतर सभाध्यक्ष गांधींनी सावरकरांचे भाषण सर्वांनी अक्षरश लक्षात घ्यावे व त्यातील शेवटच्या अुद्दीपक भागातील स्वार्थत्यागाच्या विनतीची सर्वांनी पूर्णता करावी असे सांगितले व नतर राष्ट्रगीते होअून समारंभ पार पडला. —२६ नोव्हेंबर १९०९

+ + +

## ४८. श्रद्धानंदांची हत्या आणि गांधींचा निःपक्षपाती पक्षपात !

'केला मांहीच नृपा, धृतराष्ट्राच्या न घात लेकांनीं'

—मोरोपंती भारत

स्वामी श्रद्धानंदांच्या क्रूर हत्येविषयी सर्व देशांतून दुःखाचा आक्रोश अैकू यावा, हें साहजिकच होतें. बहुतेक नगरांतून, वृत्तपत्रांतून आणि प्रमुख हिंदी गृहस्थांकडून त्या वीर पुरुषाच्या ह्या अधम हत्येविषयी आणि तीमुळे अुपस्थित झालेल्या जातीय वैषम्याच्या प्रश्नाविषयी काही ना काही तरी सार्वजनिक अभिप्राय प्रसिद्ध करण्यात आलेला आहे. ही हत्या करण्यात आपला काय हेतु होता, हें त्या हत्यारी मनुष्याने स्पष्ट सांगूनच टाकिलें होतें. अिस्लामाचा अधःपात आणि दुर्दशा टाळण्यासाठी आणि मलकाना रजपुतांचे शुद्धीकरणाविषयी मूड अुगविण्यासाठी मी श्रद्धानंदांस मारिलें म्हणून त्याने स्पष्टपणें कथन केलेलें आहे. त्यामुळे या हत्येचा दोष तरी कोणच्याही प्रकारे हिंदु लोकांवर टाकण्यास मुसलमानांतील पुढारीही सहसा धजले नाहीत.

परंतु आश्चर्याची गोष्ट ही की, अशा प्रसंगीही हिंदु जातीवर दोषाचें खापर फोडणारा आणि या हत्येचें अुत्तरदायित्व मुसलमानांच्या बरोबरीनेच हिंदूंवरही लादणारा असा मुसलमानांत जरी कोणी प्रमुख मनुष्य निघाला नाही, तरी-आपणांस हिंदु म्हणविणारांतच तसा अेक हिंदु निघाला. हें हिंदु जातीच्या आत्मघातकी वृत्तीस साजेसेच आहे. हा हिंदु दुसरा कोणी नसून, अनेक वेळा अनुदारपणासच अुदारपणा म्हणून समजण्याच्या हिमालयाअेवढ्या घोडचुका—नव्हे पहाड चुका ज्यांच्या हातून घडलेल्या आहेत ते गांधीच होत !

आपल्या 'यंग अिंडिया'त ते श्रद्धानंदांच्याविषयी लिहिलेल्या लेखात म्हणतात, 'मी अबदुल रशीद—श्रद्धानंदांची हत्या करणारा मुसलमान याच्या पक्षाने बोलू अिच्छितो. या हत्येचा दोष आपला आहे. वर्तमान पत्रकार हा अेक चालता प्लेग झालेला आहे. तो असत्याचा आणि निंदेचा मारखा प्रसार करीत असतो. अबदुल रशीदला झालेल्या धर्मोन्मादाचें अुत्तरदायित्व, आम्हा शिक्षित, अर्धशिक्षित लोकांवर आहे. हिंदु आणि मुसलमान या दोन पक्षांत हा दोष कोणाचे माथी मारता येतो, याची चर्चा अनवश्यक आहे. कारण जेथें दोघेही अपराधी आहेत, तेथे कोण किती दोषाचा वाटेकरी आहे हे निश्चितपणे सोनेरी काट्याने तोलण्याचें काम कोणास साध्य होणार आहे ?'

त्यांच्या या अेकदर लेखात जीं विचित्र आणि विक्षिप्त विधानें केलेलीं आहेत, त्यांत वरील विधान अत्यंत भ्याड, अन्याय्य आणि पक्षपाताचें आहे. हिंदु आणि मुसलमान हे अुभयही दोषी आहेत, म्हणून शांतपणें सांगणें हें क्वचित्

साधार सिद्ध करून दिलेले होते की नाही ? मग त्या अेका मुसलमानाची अत्यंत वेधडक असत्याची साक्ष ज्या 'यंग अिंडियात' अेक विचारणीय आधार म्हणून प्रसिद्ध केली, त्याच 'यंग अिंडियात' वरील सन्मान्य आणि शेकडो लोकांची साक्ष का अुल्लेखिली गेली नाही ? खरोखर वर्तमानपत्रकार—निदान या विधानापुरता 'यंग अिंडिया'चा लेखक तरी—असत्याचा प्रसार करणारा चालता बोलता प्लेग आहे यात शंका नाही !

अेक स्वामी श्रद्धानंद परवा दिल्लीस मारला गेला तो प्रख्यात होता म्हणून त्याचा इतका बोभाटा झाला परंतु हिंदु धर्म आम्ही सोडणार नाही म्हणून म्हणण्यासाठी असे कित्येक अप्रख्यात श्रद्धानंद मलबारमध्ये याहूनही क्रूरपणाने मारले गेलेले आहेत ज्या महात्म्यांनी श्रद्धानंदास मारणाऱ्या हत्याऱ्याच्या दोषाचे खापर हिंदुमुसलमानांवर समसमान फोडिले आहे, त्यानेच मलबारातील त्या शेकडो दीन, दरिद्री, अप्रख्यात हिंदुधर्मवीरांच्या प्राणघाताचे खापर दसील असेच

त्याच्या स्वतःच्या माहात्म्यास धक्का लावणारे नसेल, पण राष्ट्रहितास आणि विशेषतः ज्या सत्याच्या समर्थनाचे स्तोम गांधीजींच्या लेखांतून आणि भाषणांतून वेळी अवेळी माजविण्यात येत असते, त्या सत्यासही बट्टा लावणारे आहे, यात काहीअेक शंका नाही

हिंदु मुसलमानांतील द्वेषाग्नि भडकविण्यास दोघेही सारखेच कारणीभूत झालेले आहेत हे सिद्ध करण्यास गांधीजींनी अेकतरी आधार दिला आहे काय ? हिंदी पत्रांतूनही किंवा प्रचारकांकडूनही क्वचित् प्रसंगी अन्याय्य किंवा अुत्क्षोभक टीका झालेली असेल, असे आपण गृहीत धरू, परंतु त्यामुळे अितकेच फार तर म्हणता येअील की हिंदूंचाही थोडा दोष आहे परंतु हिंदु आणि मुसलमान ह्या दोघांचाही दोष समसमान आहे म्हणून म्हणणे हे ' रामाय स्वस्ति, रावणाय स्वस्ति ' असे म्हणून रामाकडून आणि रावणाकडून—दोघांकडूनही—मान्यतेची दक्षिणा अुपटू पाहणाऱ्या ढोंगी भट्टाचार्याहून अधिक प्रामाणिकपणाचे आहे असे आम्हास वाटत नाही कारण हे विधान प्रचलित सार्वजनिक अुलाढालींशी अनभिज्ञ असणाऱ्या कोणा मूर्ख मनुष्याने केलेले नाही, तर ज्या वर्तमानपत्रकर्त्यांच्या वर्गाला, ' चालता प्लेग ' म्हणून गौरविण्यास गांधीजी धजले आहेत, त्याच वर्तमानपत्रकाराचा धंदा आज वर्षानुवर्षे करणाऱ्या आणि सार्वजनिक घटना पूर्णपणे अवगत असणाऱ्या मनुष्याने ते विधान केलेले आहे

अितर पुराव्यावरून वर्तमान पत्रकार हा असत्याचा आणि दुष्ट निंदेचा प्रचार करणारा चालता प्लेग आहे हे ठरत असो वा नसो, पण निदान महात्माजींनी आपल्या ' हिंदु आणि मुसलमान या हत्येच्या अपराधात समान वाटेकरी आहेत ' या असत्य आणि दुष्ट विधानाचा प्रसार करून आपले ' वर्तमानपत्रकार चालता प्लेग आहे ' हे दुसरे विधान ' यंग अिंडिया ' पुरते तरी सिद्ध केलेले आहे यात शंका नाही

मलबारच्या वडानं शेकडो हिंदूंस बलात्काराने बाटवून, शेकडो देवालये धुळीस मिळवून शेकडो हिंदूंस ते स्वधर्म सोडीनात म्हणून ठार मारून जे ' खिलाफती राज्य ' येअे होते ते हिंदूंनी की मुसलमानांनी ? ' यंग अिंडियात ' अेक वा दोन अुदाहरणेच बलात्काराच्या धर्मप्रसाराची मुसलमानांच्या हातून घडली असावीत असा दावा आहे म्हणून गांधीजींनी ज्या अेका मुसलमानाची साक्ष मोठ्या तोऱ्याने प्रथित केलेली होती, त्या मुसलमानास आणि त्याच्या त्या महात्म्या गुरूस सोडून अुभ्या हिंदुस्थानात असा मनुष्य विरळाच की, जो मलबारमधील हे अत्याचार झालेच नाहीत असे आता म्हणू धजेल ! त्या अेका मुसलमानाची साक्ष गांधीजींनी अुल्लेखिली—पण ह्याच स्वामी श्रद्धानंदांनी, डॉ मुंज्यांनी, श्री. देवधरांनी न्यायालयांतून चाललेल्या शेकडो मोपल्यांवरील खटल्यांतील न्यायाधीशांनी, अनपराध हिंदूंवर धर्मप्रसाराच्या निमित्ताने मोपल्यांनी राक्षसी अत्याचार केले हे

साधार सिद्ध करून दिलेले होते की नाही ? मग त्या अेका मुसलमानाची अत्यंत बेवडक असत्याची साक्ष ज्या 'यंग अिंडियात' अेक विचारणीय आधार म्हणून प्रसिद्ध केली, त्याच 'यंग अिंडियात' वरील सन्मान्य आणि शेकडो लोकांची साक्ष का अुल्लेखिली गेली नाही ? खरोखर वर्तमानपत्रकार—निदान या विधानापुरता 'यंग अिंडिया'चा लेखक तरी—असत्याचा प्रसार करणारा चालता बोलता प्लेग आहे यात शंका नाही !

अेक स्वामी श्रद्धानंद परवा दिल्लीस मारला गेला तो प्रख्यात होता म्हणून त्याचा इतका बोभाटा झाला. परंतु हिंदु धर्म आम्ही सोडणार नाही म्हणून म्हणण्यासाठी असे कित्येक अप्रख्यात श्रद्धानंद मलबारमध्ये याहूनही क्रूरपणाने मारले गेलेले आहेत ज्या महात्म्याने श्रद्धानंदास मारणाऱ्या हत्याऱ्याच्या दोषाचे खापर हिंदुमुसलमानांवर समसमान फोडिले आहे, त्यानेच मलबारातील त्या शेकडो दीन, दरिद्री, अप्रख्यात हिंदुधर्मवीरांच्या प्राणघाताचे खापर देखील असेच दोघांवरही फोडण्याचा घाट घातला होता, हेही ध्यानात धरण्यासारखे आहे. ज्याला अबदुल रशीदचा पक्ष घेअून तो अज्ञानी होता म्हणून खरा दोषी दुसराच आहे, असे सांगण्याचे धाष्टर्य करवले, त्यानेच त्या मलबारातील शेकडो अबदुल रशिदांनाही 'माझे शूर मोपला बंधु' म्हणून संबोधून अज्ञानाच्या टाळेखाली त्यांचेही अपराध असेच दुसऱ्याच्या माथी लादण्याचा प्रयत्न केला होता

मलबारनंतर गुलबर्गा, गुलबर्ग्यानंतर कोहाट, कोहाटनंतर दिल्ली, दिल्लीनंतर पानपत, कलकत्ता, पबना, अवघा पूर्वबंगाल फार काय ह्या गेल्या वर्षातील तीनशे पासष्ट दिवसात तीनशे पासष्ट लहान मोठे दंगे आणि मारामाऱ्या आणि अत्याचार जे झाले, ज्यात शेकडो लोकांचे बळी पडले त्या दंग्यातून किती दंगे हिंदूंनी आरंभिले होते, किती ठिकाणी पहिला वार हिंदूंनी केला होता, किती हिंदु भ्रष्ट केले गेले आणि किती मुसलमान भ्रष्ट केले गेले, हे गांधीजी स्पष्टपणे सांगू शकतील काय ? ह्या अवघ्या चार पाच वर्षात किती हिंदु कुमारिका आणि अर्भक मुले सिंध, पंजाब, बंगाल अित्यादि प्रांतात बलात्काराने पळविण्यात आली ? आणि अुलटपक्षी किती मुसलमानी स्त्रिया वा मुले हिंदूंनी बलात्काराने पळविली ?

स्वामी श्रद्धानंद हा अेकटाच पुढारी हिंदु संघटनाचे कार्यी बळी पडलेला नाही यापूर्वीच अजमीरकडे मलकाना रजपुतांचे शुद्धीप्रीत्यर्थ हिंदु पुढाऱ्यांची आणि शुद्धीकृत हिंदूंची लागोपाठ हत्या करण्याचा कट अुघडकीस आला होता जानराव पाटील यांची वऱ्हाडमध्ये हिंदूंचा पुढारी म्हणूनच हत्या करण्यात आली होती आणि विहारमध्यही अेक हिंदु पुढारी, हिंदु संघटनाचे चळवळीसाठीच मारले गेले होते. पंडित लेखराम यांच्या शुद्धीकरणाविषयी झालेल्या हत्येची गोष्ट तर जुनी म्हणून सोडूनच देअू पण मुसलमानांकरवी हिंदूंच्या पुढाऱ्यांच्या ज्या हत्या चालल्या असता आणि पंडित मदनमोहन आणि लालाजी यांच्याही

त्याच्या स्वतःच्या माहात्म्यास धक्का लावणार नसेल, पण राष्ट्रहितास आणि विशेषतः ज्या सत्याच्या समर्थनाचे स्तोम गांधीजींच्या लेखांतून आणि भाषणांतून वेळीअवेळी माजविण्यात येत असते, त्या सत्यासही बट्टा लावणार आहे यात काहीअेक शंका नाही.

हिंदु मुसलमानांतील द्वेषाग्नि भडकविण्यास दोघेही सारखेच कारणीभूत झालेले आहेत हे सिद्ध करण्यास गांधीजींनी अेकतरी आधार दिला आहे काय ? हिंदी पत्रांतूनही किंवा प्रचारकांकडूनही क्वचित् प्रसंगी अन्याय्य किंवा क्षोभक दोष झालेली असेल, असे आपण गृहीत धरू, परंतु त्यामुळे अितकेच फार तर म्हणता येईल की हिंदूंचाही थोडा दोष आहे. परंतु हिंदु आणि मुसलमान ह्या दोघांचाही दोष समसमान आहे म्हणून म्हणणे हे ' रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति ' असे म्हणून रामाकडून आणि रावणाकडून—दोघांकडूनही—मान्यतेची दक्षिणा अुकळू पाहणाऱ्या ढोंगी भट्टाचार्याहून अधिक प्रामाणिकपणाचे आहे असे आम्हास वाटत नाही. कारण हे विधान प्रचलित सार्वजनिक अुलाढालींशी अनभिज्ञ असणाऱ्या कोणा मूढ मनुष्याने केलेले नाही. तर ज्या वर्तमानपत्रकर्त्याच्या पगाला, ' चालता प्लेग ' म्हणून गौरविण्यास गांधीजी धजले आहेत त्याच वर्तमानपत्रकाराचा धंदा आज वर्षानुवर्षे करणाऱ्या आणि सार्वजनिक घटना पूर्णपणे अवगत असणाऱ्या मनुष्याने ते विधान केलेले आहे.

अितर पुराव्यावरून वर्तमानपत्रकार हा असत्याचा आणि दुष्ट निंदेचा प्रचार करणारा चालता प्लेग आहे हे ठरत असो वा नसो, पण निदान महात्माजींनी आपल्या ' हिंदु आणि मुसलमान या हल्लीच्या अपराधात समान वाटेकरी आहेत ' या असत्य आणि दुष्ट विधानाचा प्रसार करून आपले ' वर्तमानपत्रकार चालता प्लेग आहे ' हे दुसरे विधान ' यंग अिंडिया ' पुरते तरी सिद्ध केले आहे यात शंका नाही.

मलबारच्या नडानं शेकडो हिंदूंस बलात्काराने बाटवून शेकडो देवालये धुळीस मिळवून शेकडो हिंदूंस ते स्वधर्म सोडीनात म्हणून ठार मारून जे ' खिलाफती राज्य ' केले होते ते हिंदूंनी की मुसलमानांनी ? यंग अिंडियांत अेक का दोन अुदाहरणेच बलात्काराच्या धर्मप्रसाराची मुसलमानांच्या हातून घडली असावीत अशी शंका आहे म्हणून गांधीजींना ज्या अेका मुसलमानाची साक्ष मोठ्या तोऱ्याने ग्रथित केली होती, त्या मुसलमानास आणि त्याच्या त्या महात्म्या गुरूस सोडून अुभ्या हिंदुस्थानात असा मनुष्य विरळाच की, जो मलबारमधील हे अत्याचार झालेच नाहीत असे आता म्हणू शकेल ! त्या अेका मुसलमानाची साक्ष गांधीजींना अुल्लेखिली—पण ह्याच स्वामी श्रद्धानंदांनी, डॉ. मुंज्यांनी श्री देवधरांनी न्यायालयांतून चाललेल्या शेकडो मोपल्यांवरील खटल्यांतील न्यायाधीशांनी, अनपराध हिंदूंवर धर्मप्रसाराच्या निमित्ताने मोपल्यांनी राक्षसी अत्याचार केले हे

साधार सिद्ध करून दिलेले होते की नाही ? मग त्या अेका मुसलमानाची अत्यंत बेधडक असत्याची साक्ष ज्या 'यंग अिंडियात' अेक विचारणीय आधार म्हणून प्रसिद्ध केली, त्याच 'यंग अिंडियात' वरील सन्मान्य आणि शेकडो लोकांची साक्ष का अुल्लेखिली गेली नाही ? खरोखर वर्तमानपत्रकार—निदान या विधानापुरता 'यंग अिंडिया'चा लेखक तरी—असत्याचा प्रसार करणारा चालता बोलता प्लेग आहे यांत शंका नाही !

अेक स्वामी श्रद्धानंद परवा दिल्लीस मारला गेला तो प्रख्यात होता म्हणून त्याचा इतका बोभाटा झाला. परंतु हिंदु धर्म आम्ही सोडणार नाही म्हणून म्हणण्यासाठी असे कित्येक अप्रख्यात श्रद्धानंद मलबारमध्ये याहूनही क्रूरपणाने मारले गेलेले आहेत. ज्या महात्म्याने श्रद्धानंदास मारणाऱ्या हत्याऱ्याच्या दोषाचे खापर हिंदुमुसलमानांवर समसमान फोडिले आहे, त्यानेच मलबारातील त्या शेकडो दीन, दरिद्री, अप्रख्यात हिंदुधर्मवीरांच्या प्राणघाताचे खापर देखील असेच दोघांवरही फोडण्याचा घाट घातला होता, हेही ध्यानात धरण्यासारखे आहे ज्याला अबदुल रशीदचा पक्ष घेअून तो अज्ञानी होता म्हणून खरा दोषी दुसराच आहे, असे सांगण्याचे धाष्टर्य करवले, त्यानेच त्या मलबारातील शेकडो अबदुल रशिदांनाही 'माझे शूर मोपला बंधु' म्हणून संबोधून अज्ञानाच्या टाळेखाली त्यांचेही अपराध असेच दुसऱ्याच्या माथी लादण्याचा प्रयत्न केला होता

मलबारनंतर गुलबर्गा, गुलबर्ग्यानंतर कोहाट, कोहाटनंतर दिल्ली, दिल्ली-नंतर पानपत, कलकत्ता, पबना, अवघा पूर्वबंगाल फार काय ह्या गेल्या वर्षातील तीनशे पासष्ट दिवसांत तीनशे पासष्ट लहान मोठे दंगे आणि मारामाऱ्या आणि अत्याचार जे झाले, ज्यांत शेकडो लोकांचे बळी पडले त्या दंग्यांतून किती दंगे हिंदूंनी आरंभिले होते, किती ठिकाणी पहिला वार हिंदूंनी केला होता, किती हिंदु भ्रष्ट केले गेले आणि किती मुसलमान भ्रष्ट केले गेले, हे गांधीजी स्पष्टपणे सांगू शकतील काय ? ह्या अवघ्या चार पांच वर्षांत किती हिंदु कुमारिका आणि अर्भकं मुले सिंध, पंजाब, बंगाल अित्यादि प्रांतांत बलात्काराने पळविण्यात आली ? आणि अुलटपक्षी किती मुसलमानी स्त्रिया वा मुले हिंदूंनी बलात्काराने पळविली ?

स्वामी श्रद्धानंद हा अेकटाच पुढारी हिंदु संघटनाचे कार्यी बळी पडलेला नाही यापूर्वीच अजमीरकडे मलकाना रजपुतांचे शुद्धीप्रीत्यर्थ हिंदु पुढाऱ्यांची आणि शुद्धीकृत हिंदूंची लागोपाठ हत्या करण्याचा कट अुघडकीस आला होता. जानराव पाटील यांची वऱ्हाडमध्ये हिंदूंचा पुढारी म्हणूनच हत्या करण्यात आली होती आणि बिहारमध्येही अेक हिंदु पुढारी, हिंदु संघटनाचे चळवळीसाठीच मारले गेले होते पंडित लेखराम यांच्या शुद्धीकरणाविषयी झालेल्या हत्येची गोष्ट तर जुनी म्हणून सोडूनच देअू पण मुसलमानांकरवी हिंदूंच्या पुढाऱ्यांच्या ह्या हत्या चालल्या असतां आणि पंडित मदनमोहन आणि लालाजी यांच्याही

हत्या करण्याचा बेत होता हें अुघड झालें असता, आम्ही असें विचारतो की, कोणत्या हिंदूने कोणत्या मुसलमानी पुढाऱ्यावर हत्येसाठी आक्रमण केलें ? अुलट त्यांच्या पुढाऱ्यांस, ते अिस्लामचे खिलाफतीसाठीं कारागृहात गेले म्हणून हिंदूनी आपल्या खिशातले लाखो रुपये अुधळून आणि त्याच्या मिरवणुकी काढून त्याचे देव्हारे माजविले नाहीत का? तरीही हिंदु मुसलमानाअितकेच ह्या हत्येच्या दोषाचे वाटेकरी होतात !!!

स्वजनाच्या अपराधावर पांघरूण घालणें हा प्राकृतांचा पक्षपात दोषार्ह आहे; परंतु स्वजनांवर राक्षसी अत्याचार होत असता केवळ 'येन केन प्रकारेण' आपलें माहात्म्य प्रदर्शित करण्यासाठी परकीयाच्या अपराधाचें खापर स्वजनांवरच फोडू पहाणें हा माहात्म्यांचा पक्षपात त्याहून शतपट दोषार्ह आहे. हें केवळ कातरपण आहे. भ्याडपण न म्हणता आम्ही मूर्खपणा म्हटला असता. परंतु ज्या व्यक्तीने ही विधानें केलीं, त्या व्यक्तीस ह्या दोनचार वर्षांतील घटना पूर्णपणे अवगत आहेत. आम्ही वर विचारलेल्या प्रश्नास अुत्तर देणें त्यास सर्वथा अशक्य आहे आणि म्हणूनच मुसलमानांचीच आगळीक हिंदूच्या आगळिकीहून शतपटीने अधिक हें ढळढळीत दिसत असताही हिंदूस मुसलमानाअितकेच दोषी लेखण्याचा जो प्रयत्न करण्यात येतो, तो त्या कारणासाठीच मूर्खपणाचे द्योतक म्हणता येत नसून कातरपणाचेच किंवा ढोंगीपणाचेंच द्योतक आहे असें म्हणणें भाग पडत आहे. हा दुरात्म्याचा पक्षपात आहे. महात्म्याचा निःपक्षपात नव्हे !

तें तसें नसेल तर हिंदूस ह्या हत्येच्या किंवा जातिवैमनस्याच्या दोषाविषयी मुसलमानाअितकेंच दोषी कोणत्या पुराव्यावरून ते ठरवू शकतात हें गांधीजींनी अवश्य प्रसिद्ध करावें. ते स्वतःस अजून हिंदु म्हणवितात. आम्ही त्यास आव्हान करितों की सर्व हिंदूच्या आणि म्हणूनच आमच्या प्रत्येकाच्या बोडक्यावर हा जो भयंकर आरोप आपण लादू धजलात, त्याची अेकतर सिद्धता करा; नाहीतर

दिङ्मूढ, परंतु अत्यंत अहंमन्य मस्तकावरच होय ! तो दोष हिंदु समाजावर पडत नाही जर थोडासा दोष त्या समाजावर पडत असेल तर तो अितकाच की, अन्यायास आणि न्यायास, क्रौर्यास आणि कारुण्यास, छळकास आणि छळितास, पीडकास आणि पीडितास, रामास आणि रावणास, समान दोषी ठरविणे आणि सारख्याच दयेस आणि अुत्तेजनास पात्र समजणे, म्हणजेच नि पक्षपातीपणा होय अशी भ्रामक समजूत करून घेणाऱ्या तुमच्यासारख्या 'महात्म्यास' तो हिंदुसमाज वारंवार जन्म देतो !

अितकेच काय आणि हिंदूविरुद्धच काय, पण मुसलमानांची धर्मक्षेत्रे भ्रष्ट करणारे वाहबी, कादियानीस दगडांनी मारणे हे धर्म्य समजणारे अफगाण व सगळ्यांरीही धार्मिक कर्तव्य आहे म्हणून घोषित करणाऱ्या मुसलमानी परिषदापासून तो अबदुल रशीदला 'गाझी' म्हणून त्याची चित्रे विकणाऱ्या आणि घेणाऱ्या दिल्लीतील कागदविक्या मुसलमानी गटारगुंडापर्यंत, धर्मोन्मादी हत्यास धार्मिक कर्तव्य समजणारे दोकडो हजारो मुसलमान, मुसलमानी समाजात प्रमुख अप्रमुखपणे वावरत असता, *'अबदुल रशीदचे कृत्य व्यक्तीचे आहे—समाजावरच त्याचा दोष लादू नका' म्हणून शानपणे सांगणारे माहात्म्यच हिंदूंच्या ह्या* दुर्दशेचे आणि छळाचे अेक प्रमुख कारण होय

रोगाची चिकित्सा चुकली तर औषधोपचारही विपरीत होतो, हिंदु-मुसलमानांतील वैमनस्याच्या भयंकर रोगापासून जर आपणा सर्वांस मुक्त होणे असेल, तर स्पष्टपणे आपण त्या रोगाची खरी चिकित्सा केली पाहिजे ती चिकित्सा हेच सांगते की, मुसलमानी समाजातील धर्मोन्मादाची प्रवृत्ति हेच या रोगाचे मूळ कारण आहे आणि त्या प्रवृत्तीचे आविष्करण करण्यास भयाने किंवा भावडेपणाने किंवा मूर्खपणाने, स्वतःचे महत्त्व मुसलमानांत अधिक वाढावे अशा अक्षम्य अिच्छेने, हिंदुसमाज आणि मुसलमानी समाज सारखाच दोषी आहे म्हणून म्हणणारा हा नि पक्षपाती पक्षपात हाच खरा राष्ट्रविघातक 'चालता प्लेग' आहे

गांधींस प्रामाणिकपणे हिंदुसमाज—थोड्या अज्ञानी नव्हे—तर सर्वंशी *मुसलमानी समाजाअितकाच या हत्येच्या प्रकरणी दोषी वाटत असेल, तर त्यांनी* कारण प्रसिद्ध करावीं हिंदुसमाजाहून मुसलमानी समाजावर ह्या जातिवैमनस्याचा दोष अितक्या मोठ्या प्रमाणाने पडत आहे, की सूक्ष्मबुद्धीचा सोनेरी काटा जरी साबरमतीस मिळत नसला तरी तेथील स्थूल बुद्धीच्या गंजलेल्या लोखंडी काट्याने देखील मुसलमानांनी दोषाचे पारडे झटकन भूमीस लागावे अितके या प्रकरणी त्याच तामसी दोष भारी आहेत हिंदुसमाजाचे वर्तन सापेक्षतः अितके सात्त्विक आहे—आणि हिंदूंचा खरा दोष जर कोणचा असेल तर हाच असात्त्विक सात्त्विकपणा होय !

—श्रद्धानंद, ता १० जानेवारी १९२७

\+ + +

# गरमागरम चिवडा

## (१)

### महंमद अल्ली नि हसन निजामी यांची लायाळी

महमद अल्ली आणि हसन निजामी याची प्रेक्षणीय लायाळी दिवसेदिवस खूपच रंगात येत चालली आहे. परवाच्या डावात तर महमद अल्लीची लाथ अगदी अचूक निजामीच्या नाकाच्या अगदी बाडीवर जाऊन बसली ! हुतात्मा श्रद्धानंदाच्या हत्येने चिडून काही मुद्ध हिंदु हसन निजामी याची खोड मोडणार आहेत, असा धाक पडून हसन निजामी आजकाल शक्यतावर आपल्या घराचे किल्ल्यात बसूनच मुसलमानाची जी काय उन्नति करिता येईल ती करीत आहेत, ही गोष्ट दिल्लीच्या बाजारात बहुतेकांच्या कानावर आलेलीच होती पण अल्लीनी ती उभ्या हिंदुस्थानच्या कानावर घालण्यासाठी परवा निजामीवर प्रकटपणे उपाधिवर्षाव केला ! त्यानी त्यानी खालील पदव्या निजामीसाहेबास अपण केल्या " सरकारी हेर ! निजामाचे अन्न खाऊन त्याच्याच विरुद्ध, सरकारकडे चुगल्या करणारा, निमक हराम ! श्रद्धानंदाच्या हत्येनंतर भयभीत होऊन घरात दडून बसलेला भ्याड ! ! ! "

या पदवीदानाचा स्वीकार केल्यानतर अल्लीहून तरी आपण काही अधिक भ्याड नाही हे सिद्ध करण्यासाठी, महमद अल्ली जसे अबदुल रशीदला बंदिगृहात जाऊन भेटून आले तसे निजामीही घराबाहेर पडून बंदिगृहाकडे भेटावयास गेले, पण अर्थात्‌च दहा पाच शरीररक्षकाच्या मडळात आपला बिनमोल देह स्थापन करुन !

✦ ✦ ✦

श्रद्धानंदाची हत्या हे एका व्यक्तीचे कृत्य आहे, अशा प्रवृत्तीविषयी मुसलमान समाजासच दोष देऊ नका, ही महात्मा गाधीची दिव्यवाणी किती अर्थपूर्ण होती हे प्रथम कोणाकोणास कळल नव्हते ते म्हणाल, ' मुसलमानाची मनोवृत्ति ओळखण्याइतके गाधीजी चाणाक्ष नाहीत ' पण आता तो त्याची चूक होती आणि गाधीजीच्या दिव्य दृष्टीस दिसले तेच सत्य होते, हे प्रत्यही घडणाऱ्या मुसलमानी घटनावरुन सिद्ध होत आहे ! उदाहरणार्थ खालील घटना पाहून जाफरअल्ली म्हणाले, ' गाझी रशीदची तलवार मी चुंबिली असती ! – जर आज मुसलमानी

---

' गरमागरम चिवडा ' या मथळ्याखाली स्वा. वीर सावरकरानी चालू राजकारणावर लिहिलेले उपहासगर्भ लेख ' श्रद्धानंद ' या साप्ताहिकात प्रसिद्ध झालेले आहेत.

राज्य असत !' कल्कत्याच्या नगरसंस्थेत (म्युनिसिपालिटीत) श्रद्धानंदाच्या मृत्यूविषयी खेद व्यक्त करणाऱ्या ठरावास मुसल्मानांनी एकजात अडथळा केला मिरतच्या मशिदीतून मुसलमानांनी ती हत्येची बातमी ऐकताच दीपोत्सव केला गोरखपूरला मुसल्मानांनी मिठाई वाटली दिल्लीच्या जुम्मामशिदीत हाजी महमद अल्लींनी गाझी रशीदला या खटल्यातून निर्दोष होऊन सुटता यावं म्हणून सार्वजनिक प्रार्थना केल्या पेशावरपासून तो महाराष्ट्रातील ल्हानसहान जिल्ह्याच्या गावापर्यंत मुसलमानांतून रशीदचा खटला ल्ढविण्यासाठी निधि जमविण्यात आला काठेही महत्त्वाच्या अशा मुसलमानांच्या सभा श्रद्धानंदाच्या ह येविषयी खेद प्रदर्शित करण्यास झाल्या नाहीत अनेक ठिकाणी हरताळाचे दिवशी मुसल्मानांनी आपली दुकानं बंद ठेवण्याचे नाकारिले मुसलमानांच्या कित्येक प्रमुख पत्रांतून श्रद्धानंदाच्या हत्येविषयी टर उडविणारे उद्गार काढण्यात आले एकाने लिहिलं की, बहुधा श्रद्धानंदजींच्या सेवकानं (ज्याने त्यांचा प्राण वाचविण्याचे कार्यी स्वत ही घायाळ करून घेतलं त्याने) बहुधा त्यांची हत्या केली असावी आणि मग रशीदला निष्कारण पकडलं असावं दुसऱ्यानं लिहिलं, अजी जनाब एसा नहीं ! एवीतवी श्र नंद रोगाने मरणारच आहत असं पाहून त्या रोगाच्या अत्यवस्थ स्थितीत हिंदूंनी विचार केला की याना गोळी घालून मारून हुतात्माच का न करा ! मुसलमानांवर आग पाखडण्यास ही उत्तम संधि आहे !' आणि हिंदूंनी असा विचार करून श्रद्धानंदास स्वत च गोळी घालून मारिले ! जाफरअल्लीने लिहिलं,' श्रद्धानंद गांधींच्या जन्मास आले देखील आणि कोण्या मुसल्मानी कसायाच्या खुंटाशी बांधले देखील गेले असतील !'–आता या कसायाच्या खुंटयाची शपथ आहे, सांगा की श्रद्धानंदास मारणाऱ्या प्रवृत्तीचा सर्व दोष अेका अेकुलत्या व्यक्तीवरच असून त्याविषयी मुसल्मान समाजातील मोठ्या भागाला दोषी धरू नका, हे आपल्या या गांधीजींचं मत किती न्यायसंगत आणि सत्य होतं ते ! अगदी चटकन् सत्य ते त्यांच्या दिव्य दृष्टीस दिसून आलं ! अेका क्षणाचाही विचार करावा लागला नाही ! महात्माच तो ! खरा खरा अंतर्ज्ञानी !!!

अशा अंतर्ज्ञानी आणि दिव्यदृष्टि पुढाऱ्याचे हाती राष्ट्राची सूत्रं सोपवून त्यास ' सर्वाधिकार ' (डिक्टेटर) नेमलं म्हणूनच तर लोकमान्यांच मृत्यूनंतर एका चार वर्षात हिंदुस्थानात राजकारण आणि धर्मकारण इतकं रंगारूपास आलं ! जिकडे पहावं तिकडे अेकीच अेका, अुन्नतिच अुन्नति, जागृतिच जागृति, तेजच तेज !

केवळ हे हिंदुसंघटन तेवढं काय मुर्दाडपणा करीत असेल ते असलं ! जर का हे संघटनही मध्ये आले नसते तर या 'सर्वाधिकाऱ्याच्या अंतर्ज्ञानानं' प्रेरित झालेल्या या तेजाने आज हिंदुस्थान, निदान हिंदुजाति, स्वत अुभीची अुभी जळू लागली असती जळू !

+ + +

पंडित मोतीलाल नेहरू व डॉ. किचलु आदि कित्येक निस्सीम देशभक्त पुढाऱ्यांनी पुनः वकिली सुरू करण्याचे ठरविले आहे. ठीकच आहे. वकिली सोडून जो देशोद्धार व्हावयाचा तो झालाच आहे एका वर्षात स्वराज्य मिळून पुनः निघून देखील गेले ! तेव्हा आता ज्यांनी त्यांनी आपापले पोटापाण्याचे उद्योग पहावे हे साहजिकच आहे. वकिली वाईट म्हणून आपण वकिली थोडीच सोडली होती. लोक तिला वाईट म्हणत आणि लोकांवाचून पुढारी कोणाचे व्हावयाचे ते कळेना म्हणून वकिली सोडली होती. आता लोक तसे फारसे म्हणत नाहीत आणि वकिली आणि पुढारीपण हे दोन्हीही तीर आपल्या मोठेपणाच्या भात्यात राहू शकतात. तेव्हा आता वकिली सुरू करण्यास काय प्रत्यवाय आहे ?

—श्रद्धानंद, ता. ३ मार्च १९२७

\+ + +

## (२)

## पत्वाखाली सत्याग्रहाला आठ महिने झाले

पत्वाखालीचा सत्याग्रह आतापर्यंत अगदी नियमाने चालून आलेला आहे. मध्यंतरी सत्याग्रह करण्यासाठी आपले गुरखे बंधुही गेल्याची वार्ता 'श्रद्धानंदा'त आपण सर्वांनी वाचलीच आहे. शेवटी नम शूद्र म्हणजे (नामशूद्रांनीही) बंगालमधील आजपर्यंत अस्पृश्यातील अस्पृश्य गणल्या गेलेल्या आपल्या हिंदु बंधूनीही या सत्याग्रहास त्यांच्या जातीचे ५ स्वयंसैनिक पाठवून हिंदु जातीच्या झगड्यात आपली स्वत:ची वर्गणी सादर केली. श्रीहरीच्या ध्वजाखाली हिंदुधर्माचे रक्षणार्थ रणक्षेत्रात स्पृश्यांबरोबर जे त्याग्राम खांदा लावून झुजले, त्यांची अस्पृश्यता भस्म झालेली आहे. आता 'तुम्ही आम्ही सकल हिंदु, बंधु बंधु।'

हा पत्वाखालीचा सत्याग्रह आरंभ होऊन आता आठ महिने होत आले. प्रत्यही दहापाच हिंदु स्वयंसैनिकांसह भजनाची मिरवणूक निघते. मशिदीपर्यंत पोचेतो हरिनामाचे गजराने त्या गावचे वातावरण दुमदुमवून देते आणि अतो सशस्त्र शिपाई येऊन त्यास धरीपर्यंत स्वयंसैनिक वाद्ये वाजवीत आणि हरिनामाचा घोष करीत मशिदीपुढील राजमार्गाने पुढे घुमतात. लगेच दुसरे दिवशी पुन. दुसरे भजनवीर हाच क्रम पुढे चालवितात. शेकडो तुरुंगात गेले, अग्रत्याग झाले. मुसलमानी गुंडाचे दंगे झाले, डोकी फुटली, जादा पोलिस बसले, त्याच्या करासाठी लिलाव पुकारले, गव्हर्नर फणफणले, मुसलमान जळफळले; पण हिंदूचे हरिकीर्तन आणि सत्याग्रह जसाच्या तसा चालू आहे !

हसण्याकडे हिंदु शशिमोहननी लक्ष दिले नाही, ते त्यास तुमचे भय वाटत होते म्हणून नाही, — तर महत्त्व वाटत नव्हते म्हणून हे पूर्वीही सांगितले होते पुन सांगतो ऐका, नीट ऐका, रहीमचाचा, शशिमोहन काय म्हणतो, ते नीट ऐका ! 'मी माझ्या हिंदु भगिनींच्या सन्मान आणि सतीत्व रक्षणासाठी त्या अधमास कापून काढिल '

हिंदु स्त्रियांकडे पाहून खिदिखिदी हसणाऱ्या तुमच्या यमवेड्या गुंडगिरीचा हा शशिमोहन पहिला हिंदु प्रतिध्वनि आहे ! रहिमचाचा, अजून तरी पुढीवर या कारण तुमच्या हसण्याच्या प्रत्येक ध्वनीमागोमाग यापुढे शशिमोहनी प्रतिध्वनि गजत अुठतील असा संभव, क्रियेनंतर प्रतिक्रियेचा संभव जितका बळकट असतो, तितक्याच बळकटपणे दिसत आहे !

✦ ✦ ✦

## फुकट पडलेली शस्त्रास्त्रें

बंगालमध्ये गेल्या महिन्यात आणखी काही क्रांतिकारक युवकांना पकडून त्यांना त्यांच्यापाशी सापडलेल्या अनेक भयंकर बाँब आणि पिस्तुले अित्यादि हत्यारे बाळगण्यासाठी मोठमोठ्या शिक्षा ठोठावण्यात आल्या बंगालमध्ये जेव्हा पाहावे तेव्हा क्रांतिकारक शस्त्रास्त्रे बाळगूनच काय ते असतात हजारो रुपयांचा चुराडा करून आणि वाटेल त्या संकटास तोंड देअून बिचारे बाँब आणि पिस्तुले आणि हजारो गोळ्या जमवितात आणि पोलिस येअीपर्यंत वर्षानुवर्षे त्या शस्त्रागारास प्राणापलीकडे रक्षून, पोलिस येताच सरकारच्या हातात ती सर्व शस्त्रे आयतीच सापवून देतात खर पाहिले असता, अशा प्रकारच्या गुप्तपणे शस्त्रे बाळगीत बसणाऱ्या क्रांतिकारकांना सरकारने अुलट पारितोषिक देअून त्यांच्या या उद्यमास अुत्तेजन द्यावयास पाहिजे ! कारण सरकारास कवडीचाही व्यय न करिता फुकट शस्त्रे आणि बाँब आयते पुरविण्याचा या क्रांतिकारकांनी जो हा अुपक्रम चालविला आहे, तो सरकारास सर्वस्वी लाभकारक आहे शस्त्र पुरविण्यास सरकार जे अितर अडते ठेविते त्यांना अडतीचे पैसे आणि शस्त्राचे मूल्य असा दुहेरी खर्च द्यावा लागतो या क्रांतिकारकांनी साचविलेली शस्त्रें वेळ येताच फुकट फाकट सरकारास अुचलून नेता येतातच, पण त्यास त्यांच्या अपार परिश्रमाची अडत म्हणूनही कवडीच प्रतिमोल्ही द्यावे लागत नाही ! म्हणून सरकारास आमची साग्रह विनंती आहे की, शस्त्रे आणि भयंकर बाँब गुप्तते जमवीत राहण्याचाच छंद असणाऱ्या या क्रांतिकारकांना सरकारने शिक्षांशिक्षा देअून असा अुपयुक्त धंदा बुडविण्याची चुकी करू नये !

ट्रा; जर का शस्त्र वा बाँब हाती येताच त्याचा होओल तो अुपयोग करून टाकण्याची प्रवृत्ति या क्रांतिकारकांत असती, तर मात्र त्यास भयंकर दंड देणें प्राप्तच होतें. मागे अशी प्रवृत्ति या वर्गात असे आणि त्यायोगे पिस्तुल हाती पड-ताच गोळीची देखील वाट न पाहता ते तेवढेच अुडवून टाकीत ! निष्कारण गज लाल शस्त्रें आणि बाँब साचवून ठेवून पोलिसाची मार्गप्रतीक्षा करीत ते बसत नव्हते. तेव्हा तशा भयंकर क्रांतिकारकास भयंकर शिक्षा ठोठवाव्या लागल्या हें ठीकच झालें. पण नुसती शस्त्रे बाळगून ती पोलिसच्या हाती निर्विघ्नपणे सोपवि-ण्यान्या या क्रांतिकारकांची सरकारने ढेपापेक्षा कींवच अधिक करावी आणि सरकारास फुकटची शस्त्रे मिळवून देणान्या या संस्थेस प्रोत्साहन द्यावें !

✦ ✦ ✦

## नादानांची क्षमाशीलता

स्वर्गाची तो अेक पायरी चढला आहे परतु अजून त्याने स्वतःच कथन केल्या-प्रमाणे स्वर्गाकडे नेणाऱ्या लालाजी आणि मालवीयजी याच्या मस्तकाच्या अुरलेल्या दोन पायऱ्या त्याला अजून चढावयाच्या आहेत. तेव्हा त्याचे ते अवतारकृत्य पुरे होण्यापुरता आयुष्यकाळ त्यास लाभावा हे कोणीही परोपकारी हिंदु मनापासून अिच्छिल्याविना राहणार नाही. तेव्हा पहिल्या पायरीवरूनच ढकलीत नेअून त्यास फासावर लटकविण्याचे पाप अध्यापक अिंद्र यानी करण्यास प्रवृत्त होअू नये! त्यानी श्रद्धानदास डसलेल्या सापास दूध पाजावेच. नाहीतर अितर हिंदूस कोण डसेल? सनातनी लोक सापास पुजतातच. मग आर्यसमाजी मनुष्यानेही दया का दाखवू नये! आपण हिंदु अियून तिथून पृथ्वीराजाच्याच माळेचे मणी असलो पाहिजे! ! !

त्यावरहित स्वन.च्या पित्यास मारणाऱ्या आततायासही मी क्षमा करितो, असे म्हणू अिच्छिणाऱ्या श्रद्धानदाच्या पुत्राच्या भाग्याचा आणि थोरपणाचा पडित मालवीयजींच्या पुत्रास मत्सर वाटणे साहजिकच आहे. तेव्हा त्याच्या समाधाना-साठीही अबदुल रशीदला काही दिवस जिवत ठेवणे अिष्टच आहे म्हणजे तो श्रद्धानदाच्या पुत्राप्रमाणे जेव्हा मालवीयाच्या आणि आणखी कोण्या हिंदूच्या पुत्रास पितृहीन करील तेव्हा त्याना, त्यानाही 'दया करा' म्हणून आवेदन करिता येअील आणि या हिंदु राष्ट्रात आपल्या पित्याच्या हत्याऱ्यासही जीवदान देणारे अुदार पुरुष अेकटे अिंद्रच नसून तसे अनेक अिंद्र आहेत, असे सगर्व सागण्याचे भाग्य अुभ्या हिंदु राष्ट्रासही लाभेल! ! !

—ता. १८ एप्रिल १९२७

\+ + +

## (३)

## शहावादच्या मुसलमानांची हिंदु होण्याची धमकी

शहावादच्या अेका मुसलमानाने ख्वाजा हसन निजामीला अेक पत्र लिहिले आहे की, मी एका सावकाराचे अेक हजार रुपये देणे लागत आहे, आपण मला तेवढे देत असाल तर बरे, नाही तर मी शुद्ध होअून हिंदु होअून जाईन! या अुदाहरणावरून तरी आमचे मुसलमानबधु शुद्धि चळवळीवर जळफळण्याचे सोडून अुलट तिला आशीर्वाद देअू लागतील अशी आशा आहे. कारण निर्धन मुसलमानाना शुद्धीच्या चळवळीने अेक नवीन धदा मिळवून दिला, सावकाराचे ऋण फेडण्याचे अेक नवे साधन करून दिले. शुद्धि चळवळ नव्हती आणि हिंदु होणे अशक्य होते

तेव्हा मुसलमानीपणात जितका राम नव्हता जेव्हा एखादा मुसलमान झाला की, त्याला कवडीचे मोल नसे पण 'नाही तर हिंदु होतो' असे म्हणणे शुद्धि चळवळीने शक्य केल्यापासून मुसलमानीपणात थोडा राम शिरू लागला आहे. त्याला थोडे मोल येऊ लागले आहे ज्या कोणा अिस्लामच्या भक्ताला धरादाराबाचून पैसे काढण्याची आवश्यकता वाटेल, त्याने शुद्धीचे तारण लावून दिले की, त्यावर हजारो रुपये त्याला ख्वाजा हसन निजामीचे पेढीवर मिळू शकतील म्हणते म्हटले की, 'नाही तर मी हिंदु होतो!' की पटलीच हुंडी!

* * *

मौल्वी जाफरअल्ली 'रंगीला रसूल' विषयी म्हणतात की, जर आज मुसल्मानी साम्राज्य असते तर त्या लेखकास ते शंभर पानांचे पुस्तक लिहिण्यासाठी दगडफेकीने—सगसार—ठार करून टाकण्याचीच शिक्षा झाली असती! आहो खरं, मिय्याजी, मुसलमानी साम्राज्याच्या या पुण्याअीमुळेच तर भाऊच्या घणाखाली त्या साम्राज्याचे सिंहासन चूर्ण झाले! जर मुसलमानी साम्राज्य असते तर!—जर आत्याबाअीला मिशा असत्या तर!— 'रंगीला रसूल'च्या कर्त्यास ठार मारण्यात आले असते, असे मौल्वी जाफरअल्ली म्हणतात. जर हिंदु राज्य असते तर मी जाफरअल्लींस असे विधान केल्याविषयी जेव्हा अुंदराच्या पिंजऱ्यात बंद करून टाकण्यात आले असते असे आम्ही म्हणतो! हो, वचने किं दरिद्रता!

सुखाहून अत्यत उच्च असे जे स्वर्गीय सुख त ज्या दग्यात मरून किंवा घायाळ होऊन धर्मवीरास मिळावयाचे, त्या दग्याच्या प्रसगी मुसलमानातील कोणासही धर्मवीर म्हणवून घेण्याची सधि हिंदु मिळू देत नसत हा त्याचा आपलपोटेपणा अत्यत निंदनीय होता यात शका नाही गेल्या वर्षापर्यंत जो दगा पहावा त्यात मेलेले किंवा घायाळ आपले सगळे हिंदुच हिंदु ! दग्यात अल्लाचे नावाने मरून वा घायाळ होऊन 'शहीद' धर्मवीर होण्याची सधि मिळून स्वर्गात जाता येईल अितका चोप अेकाही मुसलमानास हे आपलपोटे हिंदु मुळीच देत नसत अितर सर्व गोष्टीत मुसलमानबधूस विशिष्ट प्रतिनिधित्व आणि शेकडा अधिक जागा देत असताही पारलौकिक सुखासारख्या महत्त्वाच्या प्रकरणी हिंदूनी प्रत्येक दग्यात मेलेल्याच्या आणि घायाळाच्या जागेवर आपलीच नेमणूक करुन घ्यावी ही गोष्ट त्याच्या औदार्याच्या लौकिकास साजेशी नव्हती

मुसलमान बाधवाम दग्यातील प्रसादही विशिष्ट प्रतिनिधित्वाचे तत्त्वावर अधिक वाटणे तर राहोच, पण बरोबरीनेही न वाटण्याच्या हिंदूच्या या कृपणते-मुळेच मुसलमानबधु त्याच्याशी अेकी करावयास मागे घेत असा पवित्रप्रपच त्यानी तरी काय म्हणून, किती दिवस सहन करावा ? दग्याचा प्रसाद सर्व स्वत च लाटून टाकणे हा हिंदूचा पक्षपातच हिंदुमुसल्मानाच्या एकीकरणास अशक्य करीत होता ह्या म्हणण्यात अितर सर्व म्हणण्याहून अधिक तथ्य होते हे उघड आहे

पण सुदैवाची गोष्ट की, कलकत्त्याच्या दग्यापासून हिंदूनी हा आपलपोटेपणा सोडण्यास हळूहळू आरभ करुन या वर्षी तर मुसलमान बाधवास बहुतेक दग्यात लोखडी चण्याचा बराचसा प्रसाद स्वहस्ते वाटण्यास मागे पुढे पाहिले नाही, उदाहरणार्थ, बरेलीचा दगा घेऊ गेल्या महिन्या दीड महिन्यात जे महत्त्वाचे दगे झाले, त्यात बरेलीचा दगा माडतो त्या दग्याचे वेळी घायाळ झालेल्या 'अर्ध धर्मवीराचे' अधिकार आणि पदव्या सर्वस्वी हिंदूनीच न उपटता आपले हातानी जवळजवळ शेकडा पन्नास या प्रमाणात आपल्या मुसलमान बाधवासही अर्पण केल्या आहेत हिंदु घायाळ ५४ आहेत तर मुसलमान ४३ आहेत हिंदूनी घायाळ-पणात जर थोडा पवित्रप्रपच करुन स्वत च्या पोळीवर थोडे अधिक तूप ओढिले असेल, तर 'मलेपणात' पूर्ण धर्मवीरत्वाच्या स्वर्गीय अधिकारात अधिक उदारपणा दाखवून ती उणीव भरून काढली आहे कारण दग्यात मरून स्वर्गातील ज्या अधिकाराच्या जागा पटकवावयाच्या, त्यापैकी हिंदूनी ६ आपलेकडे ठवून मुसलमानाना ७ जागा दिल्या आहेत ! दे दासानी केलेल्या शेकडा ५० जागाच्या कराराहूनही १ जागा मुसलमानास अधिक दवून टाकली

बरेलीस हिंदु ६ मेले आणि मुसल्मान ७ कानपूरच्या हिंदूनीही तितका अुदारपणा दाखविला नसला तरी आपलपोटेपणा काही केला नाही कारण

घायाळात हिंदूंनी १०५ लोक आपले भरती केले तर ८१ मुसलमानाचे भरती करून, राष्ट्रीय सभेने मुसलमानास जे शेकडा तीस विशिष्ट प्रतिनिधित्व अर्पण केले आहे, तो करार पाळला स्वर्गसुखाच्या वाटणीत तर मुसलमानास अगदी दासाच्या कराराप्रमाणे शेकडा ५० जागा राखून ठेवून अेक हिंदु स्वर्गाच्या शिडीवर चढताच अेका मुसलमानासही त्याच्याच मागच्या पायरीवर चढवून देण्यात आल

पण नागपूरला तर हिंदूंनी उदारपणात काडीचाही कसूर ठेवला नाही मुसल्मान नोकऱ्यातून, विधिमंडळातून, नगरसंस्थेतून कुठेही मागत नाहीत असे भरपूर–स्पेशल रिप्रिझेंटशन–विशिष्ट अधिकार त्यास अर्पण केले शेकडयामागे हिंदूच्या बरोबरीनच नव्हे तर अधिक अधिकाराच्या राखीव जागा त्याच्यासाठी ठेवून, घायाळपणाचे किंवा मेलेपणाचे–म्हणजेच अर्ध धर्मवीरत्वाचे किंवा पूर्ण धर्मवीरत्वाचे स्वर्गीय अधिकारात त्यास हिंदूहून कितीतरी अधिक भाग देअून टाकला कारण हिंदु ४७ घायाळ झाले तर मुसलमान ७३ आणि स्वर्गाकडे १० हिंदु धाडण्यात आले, तर १४ मुसलमान बंधु धाडण्यात आले

—ता ६ ऑक्टोबर १९२७

\+ + +

## (४)

## हिंदूंनी मशिदीवरून वाजवावे
## मअूच्या मुसलमानाचा बनाव

आम्हास कळविण्यास दु:ख वाटत की वायरोगाने पछाडलेल्या आमच्या मुसल्मान देशबंधूस जी वार्ता येकताच अगदी तीव्र वेदना होतील अशी एक वातमी सागण्याचे आमच्या दैवी आज याव ! हिंदुमुसलमानात दगेधोपे चालण्यावर ज्याचा चरितार्थ चाललेला आहे, अशा अनेक मौलवीमौलानास ती बातमी खरी असताही खरी वाटणार नाही अशी ती वातमी ही की, झाशीकडील मअू नावाच्या गावी हिंदुमुसलमानाची अेक मोठी सभा होअून, त्याच्यापुरता त्यानी वरील वाद्याचा प्रश्न सामोपचाराने सोडवून टाकिला आणि तो कशा प्रकारे ? तर मुसल्मानानी मान्य केले की, हिंदूंनी केव्हाही मशिदीवरून मिरवणूक चाल्ली असता वाद्ये वाजवावीत ! त्यास मुसलमानाची काहीअेक हरकत होणार नाही !!

हा निर्णय होताच दुसऱ्या दिवशी तो तोंडी निर्णय लेखबद्ध करण्याकरिता उभय पक्षाची पुन सभा भरली आणि खालील करारपत्र समत होऊन त्यावर उभय पक्षाच्या स्वाक्षरीही ( सह्या ) झाल्या ते करारपत्र असे:–' आझी जिल्ह्यातील मऊ नगरच्या हिंदु आणि मुसलमान याच्यामध्ये असा करार झाला की, मशिदी आणि मदिरे याजवरून वाटेल त्या वेळी वाद्ये वाजवीत जाण्यास कोणीही कोणास प्रतिबध करू नये. कारण की या मऊकडील भागात गावोगाव सर्व प्रकारच्या मिरवणुकी नाचरग, वाद्ये अित्यादि थाटासह मदिरावरून आणि मशिदीवरून जात आलेल्या आहेत आणि म्हणूनच आम्ही हिंदु मुसलमान आपसात यापुढेही वाद्याच्या य कश्चित् प्रश्नासाठी तटा करण्याचा मूर्खपणा न करिता जुन्या रूढीप्रमाणेच पुढेही वागणार हा करार आम्ही उभयतानी आपल्या अिच्छेने आणि कोणताही विकल्प चित्तात न ठेविता केला आहे.'

ज्या वाद्याच्या प्रश्नासाठी मौलाना महमदअलीपासून तो परवाखालीच्या गावगुडापर्यंत सर्व धर्मभिमानी आणि सुशिक्षित आणि सभ्य मुसलमान आज पिढ्यानपिढ्या शेकडो हिंदूची डोकी फोडीत आणि शेकडो मुसलमानाची डोकी फोडून घेत आलेले आहेत, त्या अत्यत बुद्धिमान् लोकाना अत्यत विकट वाटणाऱ्या प्रश्नास अगदी सोप्या रीतीने सोडवून या मऊच्या अडाणी मुसलमानानी त्या गभीर प्रश्नास अगदी गावठी स्वरूप दिले, ही गोष्ट मुसलमानीपणाच्या बाण्यास फारच लाछनास्पद आहे, यात काही शका नाही!

या करारपत्रातील दुसरा ठळक दोष म्हटला म्हणजे हा की, त्यामुळे अीश्वराच्या श्रवणशक्तीविषयी दाखविलेला अत्यत अनादर हा होय मशिदीपुढे वाद्ये वाजत असली तर आमच्या प्रार्थना भग होतात, अर्थातच अीश्वरास त्या जाव्या तशा अैकू जात नाहीत, हा विद्वान् मौलवीमौलानाचा मूळ सिद्धान्त! त्यास या करारपत्राने हरताळ फासला. कारण यात असे स्पष्ट सूचित केले आहे की, वाद्ये वाजली तरीही भक्ताच्या प्रार्थना भग पावत नाहीत आणि त्या अीश्वरास अैकू जातातच! कोण हें अनुदार पाखड! अीश्वर काय अत मासी आहे की, त्यास वाद्याच्या कोलाहलातही भक्ताच्या प्रार्थना अैकता याव्या! आणि ज्यास वाद्याच्या घणघणाटातही अेकाग्र मनाने प्रार्थना करता येते तो भक्त तरी कसला! प्रार्थनेतील अक्षरापेक्षा हिंदूची वाद्ये वाजतात केव्हा आणि मी त्याचे डोके फोडण्याच्या धार्मिक ढोगाखाली लूटमार करण्यास बाहेर पडतो केव्हा, अिकडेच ज्याचे सारे लक्ष वेधलेले असतें तो खरा भक्त— खरा 'दिल'दार! बाकी सर्व काफर—नादार! या मौलवींच्या मूळ सिद्धान्तास या मऊच्या मुसलमानानी अगदी धाब्यावर बसविले आणि हिंदूस म्हटले खुशाल वाद्ये वाजवा. ज्या अल्लाला ' चिंटियोंके पावमें घुगुर बाजा वो भी अल्ला सुनता है!' मुगीच्या पायातील घुगराचा आवाज देखील, मुगीच्या मनातील विचार देखील ज्या अल्लाला अैकू जातात,

त्याला आमच्या प्रार्थना वाद्याच्या घणघणाटामुळ अैकू जाणार नाहीत अितका काही त्या अतयामाची श्रवणशक्ति बहिर्गामी झालेली नाही !

या करारातील याहीपेक्षा महत्त्वाचा दोष म्हणजे त्यावर रक्ताचे चार थब देखील साडलेले नाहीत नुसत्या काळ्या शाअीचा करार ! हा शिष्टाचाराचा अक्षम्य भग होत आहे हिंदूनो तुम्ही मशिदीवर वाद्य वाजवा मुसलमानहो, तुम्ही मदिरावर वाद्ये वाजवा ! ! —या अेका लहान वाक्यात आज शेकडो हत्या करून आणि नदी नदी रक्त ओतूनही जो प्रश्न शेकडो शहाण्यास सुटला नाही तो चार अनाड्यानी सोडविण्याच धाष्टच करावे ! आणि पाच पन्नास डोका देखील फाडू नयन ! हे केवढ पाजीपण आहे अस करार रक्तात लिहावयाचे अशी स्पष्ट धर्माज्ञा—मौलवीय चालू आज्ञा (Order of the day) असता नुसत्या काळ्या शाअीच्या अेका वाक्यात प्रश्न मिटवून टाकिला !

हाय हाय ! आम्ही आता अशानी मुसलमानापासून निधि कसल्या वक्तव्याच्या नावाने जमवावा ! खिलाफत मला तरी वाद्याची आफत—आपत्ति हाताशी होती तीही जर अशा अेका वाक्यात मरेल तर मग कोणच्या तोडान आम्ही वर्गणी मागावी ! आणि निधि नसेल दाम नसल तर मग खिलापती मौलवीपणात राम तो काय राहिला !

तरीही मौलानाजी अगदी निराश होअू नका खिलाफत गेली तशी वाद्याफत गेली तरी पुन गुडाफत म्हणून मुसल्माना समाजात उर्वरित आहेच आहे तिच्या साह्याने आपल्या हिंदुविद्वषाच वळावरच जगू शकणार मौलानापण टिकू शकेल बगालकडे थोड पहा मशूच्या तारेच्या अगदी अुलट तार तिकडून आला आहे ! मशू त मशूच— पण बगाल्यात मुसलमान पूर्वीअितकाच कणखर आह अैकलात त्याचा अद्वितीय असा नवा पराक्रम ?

## पिशाच्च वृत्तीचा प्रभाव

नमनात तर अैका—मुसल्मानी गुडपणास तर काय परतु प्रत्यक्ष पिशाच्चाच्या गुडपणासही लाजविणारा ता पापी पराक्रम अैका — म्हणील सागण्यासही थरकाप आणि लज्जा वाटत पण वक्तव्यच म्हणून सागतो — राज शाही जिल्ह्यात भवानीपूर गावा पुजारी राजवशी राहतात त्याच्यात पडदा नसतो त्याच्या काही स्त्रिया पुरुषाबरोबर बाजारातून परत येत असता रात्र पल्ली ताच मुसलमानाच्या धर्मवीरानी त्यास अडवून अेक तरुण स्त्री उचलन पळविली ता गर्भवती होती तिच्यावर त्या पिशाच्चानी पाळीपाळीने बलात्कार करण्यास आरभ केला हा राक्षसी अत्याचार चालता चालता ती स्त्री बेशुद्ध झाली — रक्तबंबाळ झाला—तरी ते मुसलमानी गुड परावृत्त हाअीनात अितक्यात पुजारा पत्निसह धावपळ करीत तथे आल ता हे पराक्रमी धर्मवीर पळून गेलेले दिसल ती

स्त्री रक्तात लोळत पडलेली दिसली—आणि हाय हाय! तो तिचा गर्भ तडफडत बाहेर पतन पावून चेदामेदा झालेला दिसला! त्या अधमापैकी अेकास पकडले असून दावा चालला आहे!

ज्या 'स्वतंत्र' पत्रात ही बातमी दिली आहे त्याच पत्रात लगेच दुसरीही बातमी प्रसिद्ध झाली आहे की, 'फॉर्वर्ड' म्हणते की, प्रियसुंदरी नामक हिंदु स्त्रीच्या खटल्याचा कोर्टात निकाल होअून त्यातील अपराध्यास सात सात वर्षे सश्रम कारावासाचा दंड मिळाला आहे! हे अपराधी अर्थातच मुसल्मानी धर्मवीर होते हे निराळे सांगणे नकोच. २४ सप्टेंबरला रात्री कुरबान आणि लतिफ, या दोघा मुसलमानांनी प्रियसुंदरीच्या घरात घुसून अितर मुसल्मानांच्या धर्म-बधुत्वाच्या पवित्र साहाय्याने तिला अेका भाताच्या शेतात अुचलून नेले. त्या पाजी पशूंनी तिच्या सतीत्वावर घाला घातला. ती मरणोन्मुख होअून रक्त-स्रावात न्हालेली तशीच तडफडत पडली असता रमावात हवाल्दाराने तिला पाहिले. पोलिसांना बातमी कळताच त्यांनी दोघा आरोपींना पकडले. पण ती साध्वी अबला अठ्ठाविसावे दिवशी रुग्णालयात मेली. डॉक्टरने ती निर्दोष अबला भीषण बलात्काराने मेली म्हणून प्रमाणपत्र दिले. तिच्या लहानग्या मुलाने सांगितले की, मला सुरा दाखवून माझ्या आअीला ह्यांनी ओढून नेली! आपली ओळख पटू नये म्हणून त्या लतिफ आणि कुरबान यांनी आपली दाढीमिशी मुडून टाकिली होती. न्यायाधीशांनी त्यास सात वर्षांची शिक्षा दिली.

यावर काय लिहावे! ज्या संस्कृतीत हे असे शेकडो लोक जन्मास येतात किंवा नादू शकतात किंवा सत्यव्यवहार्य समजले जातात—नव्हे काही प्रत्यक्ष पुराव्यावरून असेही म्हणता येते की, हिंदूंच्या अनाथ अबलांना पळवून नेणाराची पाठही थोपटण्यात येते—त्या संस्कृतीचा त्रिवार धिक्कार असो. तिच्या सुधारणेचा एकच मार्ग म्हणजे तिचा आमूलाग्र नायनाट करणे हाच होय. दंडविधान (Criminal Law) पुरे पडत नसेल तर प्रत्यक्ष राजदंड हाती घेअून तो नायनाट केला पाहिजे!

या पैशाचिक प्लेगाची मुसलमान समाजात सध्या साथच आलेली आहे की काय अशी भीति वाटावी, अितक्या भीषण अनुक्रमाने प्रत्यही राक्षसी वृत्तीचे अत्याचारी स्त्रीपुरुष शेकड्यांनी अुघड होत आहेत. स्त्रियादेखील! अुदाहरणार्थ ही खालची फ्री प्रेसची बातमी पहा. २४ सप्टेंबरला बदलापटिया नावाच्या ठाण्यातील बुमार्गविल नावाच्या ठिकाणी अेका मुसल्मान बाअीने आपल्या नवऱ्या-साठी मासाचे भोजन करून ठेविले. पण नवरा परत येण्याचे आधी ते कुत्र्याने खाअून टाकिले. तेव्हा अेका दगडाने दोन्ही पक्षी मारावे अशा हेतूने तिने, दुसरे कशाचे मास नाही आणि तिचा सावत्र मुलगाही नाहीसा करण्याचे अजून अुरलेले आहे असे पाहून त्या लहान मुलाला मारून कापून त्याचे मास शिजविले

आणि ते आपल्या नवऱ्यास न सांगता मुलाचे मांस बापास जेवू घातलं ! असा सावत्र मुलाचा सूड अुगविला ! ती स्त्री सध्या अटकेत आहे. अशा पैशाचिक स्त्रिया जेथे आहेत त्या घरात त्यांचे पोटी वर वर्णिलेल्या नीचातील नीच 'धर्मवीराची' वीणच अुत्पन्न व्हावयाची !

अेकदा पिशाच्चवृत्तीसच धर्मकर्तव्य समजण्यात आले म्हणजे मग बापास बाप आणि मुलास मूल म्हणण्याअितकी माणुसकी मनुष्यात उरत नाही. कुत्रे पिसाळले म्हणजे प्रथम दुसऱ्यास चावावयास धावते, व रक्त जो जो ताडी लागते तो तो ते अधिकच पिसाळते आणि शेवटी दुसऱ्यास चावता चावता स्वतःसही चावू लागते. तसाच धर्मोन्मत्त पिसाट, 'काफर' म्हणून दुसऱ्याचे रक्त पिण्यास चटावता चटावता शेवटी रक्ततृष्णा अनिवार होअून स्वतःच्या घरातही रक्तपात करीत सुटतो. हा अितिहासाचा अनुभव आहे. सरसीमेवर हिंदूस काफर म्हणून भयंकर रीतीने छळून मारून लुटून हुसकून दिले. कारण ते अत्यल्प होते. पण ते गेल्यावर त्यांच्या रक्ताने पिसाळलेला धर्मोन्माद स्वतःच्या घराकडे वळताच आपल्या अंगासच फाडफाडून टाकू लागला. हिंदु काफर होते—पण मुसलमानात तरी सर्व मुसलमान कोठे धर्मनिष्ठ—अिमानदार—होते ! हे शिया पहा. सुन्नींच्या धर्ममताप्रमाणे तेही जवळ जवळ काफरच होते. हिंदु अत्यल्प होते तर ते शियाही अल्पच आहेत. ठीक तर मग, यांना आपला प्रांत जर निर्भेळ धर्मनिष्ठ मुसलमानांचाच देश करावयाचा असेल तर, जी हिंदूची गत तीच शियांची नको का करावयास ! असा विचार करून सरसीमेवरील पिसाळलेल्या सुन्नी बहुसंख्याकांनी शियांवरही धर्मयुद्ध पुकारले. हिंदूच्या रक्तास पिण्यासाठी शिया व सुन्नी अशा दोन्ही मुसलमानांच्या सुऱ्या चटावलेल्या होत्या. त्याच आता हिंदूचे रक्त संपताच अेकमेकांचे रक्त पिअू लागल्या. सुन्नी मुसलमानांनी शिया मुसलमानांसही 'अर्ध काफर' म्हणून हाणून, मारून, कापून काढीत ते अल्पसंख्याक असल्याने त्यास हुसकून दिले ! शिया मुसलमानांनी हिंदूवर जे अत्याचार ज्या कारणासाठी हसत केले, तेच अत्याचार त्याच कारणासाठी त्यास रडत भोगावे

पण हिंदूना याच धर्मोन्मत्त कौर्याची सुरी जेव्हा भोसकीत होती, तेव्हा याच शियास ती देवदूताची तलवार वाटत होती ! वाबानो, द्यावे तसे घ्यावे, पेरावे तसे भरावे धार्मिक मतभेद होताच 'कत्तल करा' हे भयकर राक्षसी मत जोवर तुम्ही कुराणी घरीत आहा, तोवर मुसल्मानहो, तुम्ही हिंदूचेच नव्हे तर स्वत चेही शत्रु आहात कारण हिंदु मूर्तिपूजा करितात म्हणून त्याना ठार मारणार, तर शिया अल्लीनतरच्या खलिफास मानीत नाहीत, अल्लीसही पैगबराइतकाच पूज्य मानितात म्हणून तेही काफरच ठरून मारिले जाणार जिथे शिया सबळ तेथे सुनी—अल्लीची कत्तल करणारे कुलागार म्हणून मारिले जाणार शिय्या मारिले गेले की, सुनीसुनीतही कत्तली होणार—झाल्या आहत —होत आहेत कारण त्याच्यातही शेकडो धर्मपथ आणि मतातर आहेत—आणि मत भिन्न की 'मारो बदमाश को' म्हणून धर्माज्ञा आहे ! — निदान अशी हजारो मुसल्मानाची समज तरी आहे

तीच खोजाची पाळी येणार ! कारण मुसलमानातील शिया आणि सुनी हे दोन्ही पथही खोजास इतक्या तीव्र वैमनस्याने लेखतात की, खोजास मुसलमानाच्या मशिदीत निमाज पढण्याचीही बहुधा बदी असते मुसल्मानाच्या आणि खोजाच्या धर्ममतात तसाच मतभेद आहे मनुष्यात ईश्वराश असतो, या अवतारवादाच्या मुळाशी असलेल्या तत्वाची मुसल्मानास भयकर चीड. पण खोजाचे मूळ धार्मिक तत्वच हे की, आगाखानच्या वशात ईश्वरी अश वसत असून आगाखानाच्या वशालाच ईश्वरी विभूति म्हणून पूजा आणि भक्ति करणे हे प्रत्येक खोजाचे धर्मकर्तव्य आहे ! सध्याच खोजाच्या समाजात सुधारणेची एक चळवळ उत्पन्न झालेली असून तिच्या पुरस्कर्त्यांनी एक अनावृत पत्र आगाखान यास उद्देशून लिहिले आहे त्याच्या प्रती सर्वत्र वाटण्यातही आलेल्या आहेत त्या पत्रात तर असे स्पष्ट विधान केलेले आहे की, स्वत आगाखान यानी म्हटले आहे की, प्रस्तुतचे कुराणात प्रक्षिप्त भाग पुष्कळच आहे मुसलमान म्हणणार महमद शेवटचा पैगबर खोजे म्हणतात आगाखानाचे मूळ पुरुष हेही पैगबर आणि आगाखानानी स्वत म्हटले आहे की, अप्रकट असलेले खरे कुराण लिहिण्यास मला सहा महिने तरी लागतील आगाखानाची ही वाक्ये त्याच्याच अनुयायानी प्रसिद्ध केलेली असल्याने आणि कुराणाची मूळ प्रत कोणची हा वाद, महमद महाशयाच्या मृत्यूपासूनच मुसलमानात पथ विपथ पाडण्यास कारणीभूत झालेला असल्याने खोजा समाजाच्या या मताविषयी मुसलमानास किती तिटकारा येत असेल हे निराळे सागणे नकोच प्रस्तुत अनावृत पत्रात आगाखानावर लाखो रुपये भोळ्या भाबड्या लोकाकडून गोळा करून आणि बहिष्काराच्या धाकाने उकळून विलायतेत स्वत च्या विलासार्थ उधळले जातात याविषयीही पुष्कळ सडेत टीका करण्यात आली आहे स्वतःच्या अनुयायाच्या

टीकानीच जे धर्मगुरु असे 'कलंकित' झालेले आहेत, तेच भोळया हिंदूस बाटविण्यासाठी 'निष्कलंकी' कलकीचा अवतार म्हणून मिरवू पहातात हे आश्चर्य आहे !

—ता ३ नोव्हेंबर १९२७

\+ + +

# ( ५ )

## धमकीचीं पत्रें

श्रीयुत राजपाल, स्वामी सत्यानंद, लाला नानकचंद या गृहस्थाच्या हत्या करण्याच्या पवित्र प्रयत्नास अपराध समजून काही मुसलमानास फाशीच्या शिक्षा ज्या ऑजिल्व्हे साहेबानी दिल्या, त्याचेवरही मुसलमानी धर्मभक्ताचा रोष झालेला आहे. त्यापैकी कोणा सात्त्विक साधु पुरुषाने मि. ऑजिल्व्हे साहेबासही अेक पत्र टाकून तुम्हासही अिस्लामचा शत्रु म्हणून मानण्यात येणार आहे, असे कळविण्याची कृपा केली आहे. मि ऑजिल्व्हेसाहेब या पत्राच्या धाकामुळे हिंदुस्थान सोडून येत्या बोटीनेच विलायतेस पळून जातील, यात काहीच शका नाही !

पण मग हे अिस्लामी धर्मवीर नुसत्या ऑजिल्व्हे साहेबावरच अशी कृपा करून का थांबतात ? अबदुल रशीदला फाशी देणारे साहेब आणि प्रीव्ही. कौन्सिलमध्ये त्याचे अपील अमान्य करणारे साहेबाचे टोळकेचे टोळके—तर अजून जिवतच आहे ! त्यासही तावडतोब मृत्यूची वारटे धाडून देण्यात आली पाहिजेत. म्हणजे तेही भयभीत होअून आपआपली कामे सोडून देतील. आणि दुसऱ्या अबदुल रशीदला आणखी कोण्या श्रद्धानंदाची हत्या केल्यानतर वेड्याचे ढोंग करण्याची आणि फाशीच्या आधी भयाचा ताप भरून थरथर कापत रडण्याची पाळी येणार नाही !

तळेगावला दोघा मुसलमानी सज्जनास हिंदूच्या देवाच्या मूर्ति फोडण्याचें पवित्र कार्य केल्यासाठी काही पारितोषिक देण्यास हवे होते. कारण मूर्तिभजन हे अिस्लामचे ब्रीद आहे असे मौलवीमुल्ला म्हणत असतात. पण तेथच्या अेका दुष्ट मॅजिस्ट्रेटने त्या सज्जनास दोन दोन महिन्याची कठोर कारावासाची शिक्षा दिली ! —या दुष्ट मॅजिस्ट्रेटलाही ऑजिल्व्हे साहेबाप्रमाणे धमकीचे पत्र रीतीप्रमाणे धाडण्यात यावे, म्हणजे तोही पळून जाईल.

मार्शीपूर ग्रामच्या अेम् थी शाळेतील अेक १२ वर्षांचा विद्यार्थी नरेन्द्रनाथ याला अकबर आणि त्याचा साथी या दोघा अिस्लामी धर्मभक्तानी पळवून नेले होते त्याला बलात्काराने मुसलमान करून टाकण्याचा त्याचा प्रयत्न असून त्याजवर खटला भरण्यात आला आहे ज्या मॅजिस्ट्रेटपुढे हा खटला चालला आहे, त्यालाही त्वरित मृत्यूचे वारंट धाडून बजाविण्यात यावं म्हणजे तोही जागा सोडून पळून तरी जाअील नाही तर त्या सज्जन आणि काफरास बळाने बाटविण्याचे पुण्यकृत्य करणाऱ्या अिस्लामी धर्मभक्तास भयभीत होऊन सोडून तरी देईल त्यास धाडल्या जाणाऱ्या धमकीच्या चिठ्ठीत असेहि लिहिले जावे की, त्या मुलास बाटविण्याचे अिस्लामी कर्तव्य करणाऱ्या मुसलमानास सोड, अितकेच नव्हे तर मुसलमानी धर्म, छळ होत असताही न स्वीकारणाऱ्या त्या १२ वर्षांच्या हिंदु मुलास या अुनाडपणाविषयी वेत मारण्याची शिक्षाही ठोठाव ! नाही तर—अुघडच आहे काय ते !

जुबेरखा, युसुफशेट अित्यादि खुलना येथील अिस्लामी सज्जनावरही असाच अेक प्रसंग ओढवला आहे स्वर्णमयी नावाच्या हिंदु कन्येला पळवून नेण्याचा त्यानी यत्न केला असे हजारो मुसलमान हिंदु कन्यकास पळवीत असतात. ही त्याची पिढीजात वहिवाट आहे या वहिवाटीचा अुपभोग जुबेरखा आदींनी घेणे त्याचे कर्तव्य होते पण खुल्नाच्या सेशन्स कोर्टात त्याचेवर ३६ आणि १४४ अित्यादि कलमाखाली खटला चालू असून ही अिस्लामी अनुयायाची धार्मिक वहिवाट बंद पाडण्याचा प्रयत्न होत आहे तरी त्या सेशन्स जज्जासही तत्काळ अेक चिठी धाडण्यात यावी म्हणजे तोही थरकाप भरून मुद्दीवर येअील आणि स्वर्णमयीला मुसलमानाचे हातीच सोपवून देअून तिचा अुद्धार करील

लाला नानकचदला ज्या गाझीने मारले त्याला तर फासावर लटकावले जाण्याची भयंकर शिक्षा झालीच. पण ज्या जागी ती हत्या झाली त्या मोची दरवाज्याच्या ( लाहोर ) वस्तीवर जादा पोलिस बसवून सरकारने तो व्यय तेथील मुसलमानापासूनच करावा म्हणून आज्ञा सोडली आहे ! मुसलमानाचा हा कोण छळ ! हत्याविन्यासारखे सहज घडून जाणारे किरकोळ अपराध घडताच निचाऱ्या हत्यारी धर्मनिष्ठास धडाधड फाशीच्या शिक्षा देण्यात येतात ते गाझी लोक रडले तरी त्याच्या माना फासातून सुटत नाहीत !—ते राहोच, पण ज्या जागी हत्या झाल्या त्या जागेने काय केले ? पण त्या जागेवरही जादा पोलिसाचा कर ! निर्धन मुसलमान ' हाय तोबा ' करीत आहेत ! — या लाहोरच्या कमिशनरलाही अेक धमकीचे पत्र टाकलेच पाहिजे म्हणजे आता त्या भ्याडाची घाबरगुंडी अुडून तो ते जादा पोलिस अुठवील आणि फाशी देअून टाकलेल्या मुसलमानाचे त्याने घेतलेले प्राणही परत देअून टाकील !

नागपूरलाही अेका गाझीचा असाच छळ चालला आहे या गाझीचे नाव अब्दुल कादर असे आहे हिंदूच्या कन्यका पळवून त्यास बलात्काराने मुसलमान करण्याचे

जे महत्कार्य सध्या मुसलमानातील अनेक साधूनी हाती घेतले आहे त्यात या गाझी-चीहि गणना आहे सत्रू नावाच्या अेका चालत्या हिंदु स्त्रीस तुझ्या बहिणीचे घर मला माहीत आहे, मी तुला तेथे पोचवितो अशी मार्गाने थाप मारून तिला अचानक आपल्याच घरी नेली नतर माझी बायको तुला आत बोलावते आहे म्हणून तिला आत नेली तत्काळ तिला खोलीत बद करून बदूक दाखवून चूप करून टाकली रात्री तिच्यावर बलात्कार करून, टाग्यात घालून दुसऱ्या अेका ठिकाणी आपल्या मुलीच्या घरी तिला घेअून गेला त्यास त्याच्या दोघा मुलानीही या पवित्र कामात साह्य केले ! त्याच्या बायकोने आणि बहिणीनेही त्या स्त्रीवर होणाऱ्या बलात्कारास हातभार लावून तिला मुसलमान हो म्हणून स्वत धमकावले शेवटी अेका कागदावर अेक्या मुसलमान दरोग्याचे घरी तिच्या अगठ्याचा ठसा घेण्यात आला – अर्थातच स्वसतोषाने मी मुसलमान होत्ये अशा अर्थाच्या कागदावर ! योगायोगाने त्या हिंदु कन्यकेच्या प्रार्थनेस अीश्वर पावून पोलिसला ती भुमका कळली आणि आता गझनिया पकडला गेला असून त्याच्यावर नागपूरला खटला चालला आहे ! वास्तविक पाहता हिंदु स्त्रीस पळवून बलात्कार, छळ अित्यादि पवित्र कार्टिक्रमानी मुसलमानी धर्मांची महती पटवून बाटविणे, हे कृत्य मुसलमानी समाजात कितो आदरणीय समजले जाते त, अबदुल्लाच्या या हिंदु कन्यकेला बाटविण्याच्या कामी प्रत्यक्ष त्याच्या आणि मुसलमान दरोग्याच्या मुसलमान स्त्रीने, बहिणीने, मुलानी आणि आजूबाजूच्या मुसल्मानी घरानी साह्य दिले यावरून स्पष्ट होत आहे पण या नागपूरच्या दुष्ट सिटी मॅजिस्ट्रेटने त्या लोकावर खटले भरावे हे केवढे काफरपण आहे! एतदर्थ या मॅजिस्ट्रेटलाही मृत्यूच्या धमकीचे पत्र रीतसर धाडण्यात यावेच !

हिंदु कन्यकास आणि अनाथ मुलास बलात्काराने बाटविणे हे कृत्य मुसलमानी स्त्रियाही किती पवित्र आणि आदरणीय मानतात याचे आणखी अेक अुदाहरण

उलथणें तापवून डाग देती आणि त्याचे संबंधीच नव्हत तर उभे हिंदु गाव काशी-रामेश्वरपर्यंत ऐकू जाईल अशी बोंब मारून उठते आणि तो हिंदु मुलगाच मुसलमान झाला असें म्हणून त्यास हुसकून देते. पण ख्रिस्तूची आई पहा किती साध्वी आणि धर्मशील बाई ती ! तें राहोच, पण या गाझी–गाझिणी जोडप्यास हवालातमध्ये बंद करणाऱ्या प्रत्येक नराधमास मृत्यूचें वारंट सोडून पकडलेंच पाहिजे. त्याचा पत्ता आहे " कटनी, पोलिस हवालत ".

आणखी एका ज्या पत्यावर धमकीचे वारंट धाडलेंच पाहिजे तो हा : 'रामस्वरूप मोटार ड्रायव्हर, बाजार मुहल्ला कानपूर.'–कारण एका मुसलमान स्त्रीला तिच्या नवऱ्याने टाकून दिल्यानंतर कित्येक दिवसांनी रामस्वरूपाने तिला शुद्ध करून हिंदु स्त्रीप्रमाणे तिच्याशी लग्न लावण्याचें निश्चित केलें. अर्थात् हा महान् अपराध मुसलमानांच्या धर्मभीरु हृदयास असह्य दुःख देता झाला. हिंदूच्या विवाहित स्त्रीला बंगालमध्ये यशोदा सुंदरीच्या आणि अन्य पटनात झालें तसें अगदी नांदत्या घरातून ओढून नेऊन बलात्कारून, मुसलमान करून घेणें हें असल्या मुसलमानांचें पवित्र कर्तव्यच आहे. तो त्यांचा, हे गाझी गुंड आणि मंडळ समजतात त्या अर्थी–धर्मच आहे. पण म्हणून हिंदुही मुसलमानांच्या टाकून दिलेल्या स्त्रियांना कांहीं केल्या पण शुद्ध करून त्यांच्याशी लग्न लावू पहाणार की काय ! काफर कुठले ! अर्थातच शेकडो गाझी गुंड आणि मंडळींनी त्या रामस्वरूपाचे घरावर चढाई केली आणि मुलगीला पळविणार तोंच–पोलीस आले ! कोतवालीवर जाताच स्त्रीने सांगितले ' मी शुद्ध होऊन हिंदु झालें आहे. रामस्वरूपावाचून परपुरुषास पाहणें हें मी पाप समजत आहे ! हें कथन होताच दुष्ट इंग्रजांच्या पापी निर्बंधाप्रमाणे ती स्त्री रामस्वरूपाला देण्यात आली. एतदर्थ रामस्वरूपाच्या पत्यावरही एक धमकीची चिठ्ठी धाडण्यात यावी आणि ते दुष्ट निर्बंध असलेलें इंडियन पीनलकोडच जाळून टाकण्यात यावें !

बंगाल्यांत फेनी येथे हरचंद्रदासच्या शामनाद नामक स्त्रीला बलात्काराने ब्यालमिया नांवाच्या गाझीने पळविली होती. त्याला दोन वर्षे सक्तश्रमाची शिक्षा झाली. तेंही अेकवेळ क्षम्य म्हणता येईल; पण अलीपूरच्या सबडिव्हिजन मॅजिस्ट्रेटच्यासमोर सहासात गाझींवर अेका सन्देशखाली गांवच्या शशिबाला नामक विवाहित हिंदु स्त्रीने जो कहर गुजरविला आहे त्याचा बचपा गाझी गुंड आणि मंडळ यांनी अगदी त्वरित काढलाच पाहिजे. शशिबालेचा नवरा अतिशय आजारी. ती सतरा वर्षांची धावऱ्या धावऱ्या औषध आणि साह्य मागण्यास दोजारीपाजारी फिरू लागली. अशा अवस्थेत तिची दया येणें साहजिकच होतें. तशी तिची दया येऊन अेका धर्मभीरु मुसलमानाने तिला औषधासाठी दुसऱ्याकडे नेलें. त्याला दया आली तशी आणखी अेकाला दया आली. होता होता दया हेंच ज्यांचें ब्रीद आहे असे सहासात गाझी अेकत्र जमले. त्यांनी त्या शशिबालेला अेकान्त स्थळी ओढली आणि प्रत्येकाने तिच्यावर

त्याची मुसलमानी दया करण्यास आरंभ केला ! सकाळी या अत्यंत यातनेने तळमळत अर्धमूर्च्छित अवस्थेत ती शशिवाला सडकेच्या बाजूस पडलेली होती तिला पोलिसाने पाहिले आणि त्या दुष्ट पोलिसानी तिच्यावर ' दया ' न करता तिला मॅजिस्ट्रेटसमोर नेल आणि तिचे कथन घेऊन त्या सहा सात गाझींचीच पकडापकडी मांडिली ! न्यायालयात ती १७ वर्षांची शशिबाला रडत रडत तिचे हाल जेव्हा सांगू लागली तेव्हा प्रेक्षकातील कित्येक निर्दय नरपशु त्या मुसलमान गाझींप्रमाणे हसण्याचे सोडून दुःखाने अश्रू गाळीत होते ! अर्थात् त्या शशिबालेचा कड घेऊन अश्रू गाळणाऱ्या या प्रेक्षकांस आणि त्या गाझीस पकडू पाहाणाऱ्या सर्व मंडळीस, पोलिसास, मॅजिस्ट्रेटास धडाधड धमकीची पत्रे धाडून साफ कळविले पाहिजे की, जर शशिबालेची चौकशी बंद न पाडाल आणि केवळ दया केल्याच्या अपराधासाठी सहासात मुसलमानी धर्मभक्तास पकडापकड करण्याचे क्रौर्य करण्याचे बंद न कराल तर—सहा आठवड्याचे आत तुमच्यापैकी प्रत्येकास, गाझी गुंड आणि मंडळी आपल्या पवित्र सुऱ्याने भोसकण्याचे धर्मवीरत्व गाजविल्यावाचून राहणार नाहीत ! म्हणजे उभे कलकत्ता पोलिस भिऊन जाईल ट्गार्ट साहेबही विलायतेस पळून जाईल ! !

अर्थात आम्ही दिलेल्या शेकडो पत्त्यावर निरनिराळी पत्रे टाकण्यास व्यय अतोनात लागेल हे खरे आहे त्यावाचून ठिकठिकाणी दंग्याचे अपराधाविषयी गेल्या केवळ दोन महिन्यात दहा बारा मुसलमानास जन्मठेप काळपाणी, वीस पंचवीस जणास मुलं पळविण्यासारख्या य:कश्चित गोष्टीसाठीही पाच पाच, सात सात वर्षांच्या कठोर कष्टाच्या शिक्षा आणि कित्यकास दोन चार वर्षांच्या बेड्या, अंधार कोठड्या, तुरुंग इत्यादि अमानुष शिक्षा देण्यात आल्या आहेत त्या सर्वांचा सूड उगवावयाचा आहेच ! तेव्हा इतक्या ठिकाणी धमकीच्या चिठ्ठ्या धाडण्यास गाझींचा व्ययही शेकडो रुपये करावा लागेल—पण यासही एक तोड आहे—

मुसलमानी सज्जनांचा हा छळ का होतो ? अर्थात इंग्रजी राज्याचे निर्बंध आपल्या गाझी गुंड मंडळाच्या मुसलमानी निर्बंधाशी जुळत नाहीत म्हणून काफरांस बलात्काराने मुसलमान करणे हे पुण्यकृत्यही या इंग्रजी निर्बंधान्वये पाप ठरते ! तेव्हा आजिल्हे साहेब किंवा प्रिव्ही कौंसिलचे साहेबाचे टोळके किंवा सैनिक, पोलिस आणि अलीगडचे मॅजिस्ट्रेट इत्यादि शेकडो लोकांस धमकीची पत्रं धाडीत बसण्यापेक्षा ज्या इंग्रजी राज्याचे धनी जे जॉर्ज बादशहा, त्यानाच एक धमकीचे पत्र टाकले की, काम होण्यासारखं आहे ! गाझी गुंड आणि मंडळाचे वतीने दिल्ली, मुंबई कलकत्त्याच्या गल्ली कुचीतील कोण्या तरी भाजीविक्या मौलानासारख्या उत्तरदायी (जबाबदार) नागरिकाने लंडनच्या पत्त्यावर जॉर्ज महाराजास निर्भीडपणे एक चिठ्ठी धाडावी की, तुम्ही हिंदुस्थानचे राज्य ही

चिठ्ठी पोचताच अेका आठवड्याचे आत साडून तो मुकुट अफगाणिस्थानच्या अमिराचे हाती सोपवून द्यावा !

अशा अेका चिठ्ठीसरशी मुसलमानी सज्जनाचा सर्व छळ बद होअील ! अेका दान आण्याच्या तिकिटात काम ! अेकदा चिठ्ठी पोचली की, मग जार्ज महाराजाची काय छाती आहे की, ते ती अमान्य करतील ! गांधी गुड आणि मडळीची धमकीची चिठ्ठी आणि ती अमान्य ! मुळीच नको ! चिठ्ठी पोचण्याचा अवकाश की, ते हिंदुस्थानचा मुकुट पासलने परत धाडून देतील पासलने ! ! !

—ता ९ डिसबर १९२७

\+ + +

## ( ६ )

## अरेरे ! नीलच्या पुतळयाच्या घोड्याचा पाय तोडला

अत्यत आनंदाची गोष्ट आहे की, नीलच्या पुतळ्यास हलविण्यासाठी चाललेला सत्याग्रह यशस्वी करण्याचे पूर्ण अहिंसात्मक साधन महात्माजींनी शेवटी शोधून काढले

अेका धटिंगण स्वयसेवकाने नीलच्या पुतळयाच्या घोड्याचा पाय अेका हातोड्याने तोडून टाकला ही बातमी अैकल्यापासून सर्व अहिंसात्मक अनत्याचारी वीरपुंगवास, त्या दगडी घोड्यास झाल्या नसतील अितक्या असह्य वेदना होत होत्या ! मागे अेका कोकरास दुखापत झालेली पाहून बुद्ध भगवान् व्याकूळ झाल्याची अनुभूति सागत असतात पण ते जिवत कोकरू होते जिवत प्राण्याच्या दुखापतीने कासावीस कोणीही होअील पण दगडास दुखापत झाल्यानेही ज्याचे अत करण तिळतीळ तुटेल तोच खरा अनत्याचारी वीरपुंगव ! असे अनेक वीर पुंगव कळवळून अहिंसेच्या आचार्यांकडे गेले आणि रडू लागले तेव्हा त्यांनी कळवळून मठाज्ञा सोडिली की, आता यापुढे कोणीही हातोडा घेअून सत्याग्रहात समाविष्ट होअू नये लाठी हातोडा ही हत्यार होत भारतीय दडविधानात (अिंडियन पीनल कोडात) त्यास शिक्षा नसेल पण अहिंसात्मक मडविधानात त्यासही शिक्षा असली पाहिजे हत्यार हाती घेणेच पाप आहे नागपूरला हत्यार धारण करण्याचा अधिकार मिळवावा म्हणून जेव्हा सत्याग्रह चालला, तेव्हा

आचार्यांनी अेवढ्याचसाठी साफ उत्तर दिलें होतें, की, ' शस्त्रासाठी आणि सत्याग्रह ! शस्त्र आणि सत्य एकत्र राहूच शकत नाहीत. शस्त्र धारण करण्याच्या अधिकारासाठी सत्याग्रह करणें म्हणजे सत्याग्रह शब्दाचा भयंकर दुरुपयोग करणें होय. शस्त्रें धारण करू नये, हा निर्बंध न्याय्य आहे. चोरी करू नये, दरोडा मारू नये, हें भारतीय दंडविधानातील निर्बंध तोडणे हें जसें पाप आहे, तसेंच शस्त्र धरू नये हा निर्बंध तोडणे हें अहिंसात्मक अनत्याचाराच्या शास्त्राप्रमाणे पाप आहे. ' म्हणून भारतीय दंडविधानाचे पुढे अेक पाअूल टाकून हातोडा—लाठी अित्यादि हत्यार तितके, अहिंसात्मक अनत्याचारी भंडविधान दंडनीय समजत असते!

पण मग अनत्याचारी वीरपुंगवानीं प्रश्न केला की, ' महर्षे, मशीनगन्स मिळत नाहीत, हातोडे, लाठ्या, दगड हे मिळत असताही अहिंसेचे दृष्टीने आम्ही हाती घेअू नये म्हणून आपली आज्ञा सुटत आहे. तेव्हा आम्ही नीलच्या पुतळ्याकडे जाताना हाती तरी काय घेअून जावें ? '

तेव्हा मठाज्ञा सुटली की ' चिखल घेअून ' !

चिखल हाती घेअून प्रत्येक सत्याग्रही वीरपुंगवाने नीलच्या पुतळ्याकडे जावें आणि चिखलाचे गोळे त्या पुतळ्यावर, पोलिस पकडीतो मारीत राहावें ! हा निर्णय अैकून अनत्याचारी अहिंसाभक्तांच्या सैन्यांतील ते झाडून सारे सत्याग्रही वीरपुंगव आनंदाने पुलकित झाले. पुंगवच ते !

आम्ही त्या पुंगवातील अेक नसताही आणखी अेक तोड सुचवू अिच्छितो. हातोड्याने दगडास दुखापत होते तितकी चिखलाने होणार नाही. परंतु अहिंसेचें पवित्र व्रत धारण केलेल्या मनुष्याने चिखल तरी कसा मारावा ? कारण चिखल झाला तरी दगडाच्या डोळ्याविळ्यांत उडाला असता तो खुपून दगडी पुतळ्यास शारीरिक दुःख थोडें बहुत तरी होणारच. अेतदर्थ आमची अशी नम्र सूचना आहे की, सत्याग्रही वीरांनी हाताता चिखलही न घेता नुसतें नीलच्या पुतळ्यापर्यंत जावें आणि —

आणि दुरून त्या पुतळ्यास वाकुल्या दाखवीत उभें रहावें ! शुद्ध अहिंसात्मक सत्याग्रहास हें, चिखल मारण्यापेक्षा अधिक शोभेल. हातोडा, लाठी, दगड, याप्रमाणेच चिखल हेंही अेक हत्यारच आहे. अेतदर्थ चिखलही अहिंसात्मक अत्याचाराच्या भंडविधानात बहिष्कार्य समजला जावा.

वास्तविक हात देखील अेक हत्यारच आहे. आणि म्हणून तोही कापूनच टाकूनच सत्याग्रह्यानी जावे — पण जाअू द्या, हाताची गोष्ट तेवढी सोडून देअू ! जेवणाखिवणाला आणि केळीं, नारिंगी, सत्रीं अित्यादि खाण्यास उपयोगी पडणारी वस्तु आहे ती ! ! म्हणून या सत्याग्रही वीरपुंगवानी नीलच्या पुतळ्यासमोर जाअून नुसत्या वाकुल्या दाखवाव्या !

—ता. १२ जानेवारी १९२८

✦ ✦ ✦

# ( ७ )

# हाती आलेलीं चार प्रमाणपत्रें

निःपक्षपाती तिऱ्हाअिताने तिऱ्हाअितास जर अेखादे प्रशस्तिपत्र दिले, तर ते भूषणास्पद असतेच. ते साहजिकही असते. पण जर अेखाद्या मुलाने अेखाद्या पंडितास, 'भले पंडितजी?' म्हणून म्हटले, अेखाद्या मुक्त झालेल्याने अेखाद्या मुंज होणाऱ्या मुलावर आनंदाने चार तांदूळ फेकून तो समारंभ साजरा केला, अेखाद्या बन्झनने सुरेंद्रनाथाची वाहवा केली किंवा अेखाद्या कुत्र्याने तुकड्यासाठी भांडणाऱ्या दुसऱ्या कुत्र्यास, 'खूप भांडलास' म्हणून त्याची पाठ आपल्या पंजाने थोपटली, किंवा डायरने जालियनवालांत कत्तल झालेल्या अेखाद्या मुलास पाहून अश्रू ढाळले, तर ती प्रमाणपत्रे मात्र अगदी अपूर्व होत यांत काही शंका नाही. अशाच प्रकारची दोन चार अपूर्व प्रमाणपत्रे आमच्या हाती आलेली आहेत, त्यांपैकी काही खाली देतो.

## मुसलमानाचें हिंदूस प्रमाणपत्र

हिंदु संघटनाविषयी मालवीयांनी किंवा मुंज्यांनी गोडवे गावे यांत काही आश्चर्य नाही. ममत्वाने त्यांची बुद्धि अग्रही झाली असल्याचा संभव आहे, पण मौलाना हजरत मोहानीही स्वतः म्हणतात की, 'संघटणाची चळवळ ठिकठिकाणी संघटित धोरणाने अेकसूत्री काम चालवीत आहे. कानपूर, नागपूर, बरेली अित्यादि सर्व जागी हिंदूनीच दंगा आरंभिला. त्या सर्व जागी हिंदूनीच मुसलमानांना मारले, पिटले. हिंदु मुसलमानांपेक्षा फारच पुढे असून ते राजनीतिज्ञ आणि मोठे चलाख आहेत. त्यांचा कट म्हणूनच मोठा पक्का आहे. प्रथम मुसलमानांना ते मारतात, मागून मुसलमानही मारू लागले म्हणजे लगेच हिंदु गवगवा करून आकाशपाताळ अेक करून टाकतात! जेव्हा अेकीने ढोंग करून बसतात, तेव्हा मुसलमानांची सामान्या ढालेखाली दडून हानि करितात. हिंदूवर सरकारने खटले भरले की, हिंदु वकील त्यांचे खटले फुकट चालवितात. मुसलमानांची घरे दारे व्ययाखाली अुजाड होतात. मुख्य काटा जर माझे मनात सलत असेल, तर तो हा की, घरात छपून बसणारे हिंदु आज शक्तिमान् होअून बाहेर लढण्यास येतात! ते होअून टकरा घेतात ते अेवढ्यासाठी की, त्यांच्या मनात आमची शक्ति पारखून बघावयाचे असते. हा संघटणाचा खेळ आहे.

## मुसलमानांचे मुसलमानास प्रमाणपत्र

विपक्षाने विपक्षाची स्तुति करणे हें प्रमाणपत्र जसे अपूर्व, तसेच मित्राने मित्राची आणि गुरूने अनुयायाची निंदा करणे हें प्रमाणपत्रही तितकेच विचारार्ह आणि अपूर्व होय यात शंका नाही. हिंदूनी मुसलमानांविषयी काही म्हटले, तर

ते खरंच असेल असं नाही पण मुसलमानांनी मुसलमानांविषयी जर काही म्हटलं तर त तरी मुसलमानांना पक्षपाती म्हणून सहसा म्हणवणार नाही अेतदर्थ स्वतः हसन निजामीसाहेब आपल्या 'मुनादी' पत्राच्या १४ सप्टेंबरच्या अंकात मुसलमानास ज प्रशस्तिपत्र देते झाले आहेत त्यातील काही अुतारे शुद्धि समाचारा वरून देतो हसन निजामी म्हणतात आज आम्ही मुसलमान आर्यसमाजावर जळफळतो आणि सर्व जगास मुसलमान वरं म्हणतो पण खरी वस्तुस्थिति अशी आहे की (१) आम्ही मुसलमान केवळ नावाचे मुसलमान आहो (२) अल्लाने सांगितले की खोटे बोलू नका पण आजचे मुसलमान अितर सर्वाहून खोटे बोलणारे आहेत (३) दारू पिऊ नका म्हणून धर्माज्ञा पण मुसलमान अुघड अुघड दारू पिऊन झिंगतात (४) चोरी करू नका म्हणून धर्माज्ञा पण बंदिशाळातून जाऊन पहा की अट्टल चोर तवढे मुसलमानच अधिक (५) धर्माज्ञा की वेश्यापण वाआीट, पण बाजारात जाऊन पहा वेश्यामध्ये बहुतेक दुकान मुसलमानिणीची! त्यांच्याकडे जाणाऱ्या वेश्यागामी लोकांतही अधिक संख्या मुसलमानांचीच! (६) आज सगळ्यात आळशी आणि वाताडे आणि गावगुंड जर कोणी असतील तर ते मुसलमानच (७) आमच्या पूर्वजांची कीर्ति कुठे! आज लोकांत म्हणच पडली आहे, कोणी मनुष्य असा क्रूर—किंवा असा दुष्ट किंवा असा पापी आहे का जसा मुसलमान! वाआीट दुर्गुणाचे आम्ही अुपमान ठरलो आहो!

(हे हसन निजामी असं म्हणत आहे — आपण नाही हो बुवा कधी मुसलमानांची अितकी अघळपघळ स्तुति करीत!)

## हसन निजामीस 'दुर्रे' अुमरचे प्रमाणपत्र

वर हसन निजामीने मुसलमानास दिलेले प्रमाणपत्र दिले आहे आता मुसलमानांच्या दुर्रे अुमर नावाच्या पत्राने हसननिजामीस दिलेले प्रशस्तिपत्र पहा 'दुर्रे अुमर' आपल्या अेका लेखास पहिल्या प्रतीचा शिवराळ म्हणून मथळा देअून त्यात म्हणते —हसन निजामी पहिल्या प्रतीचा शिवराळ आहे तो आपल्या शिष्यास आज्ञा देतो की मला सिजदा करा सिजद्याचे वेळी शिष्यांना म्हणावे लागते की हे हसननिजामी अकोजन—अिहलोक आणि परलोकचा तूच सरदार आहेस तुझ्यावाचून सिजद्याचा कोण अधिकारी नाही!! महमद अल्ली तर हसननिजामीस अुघड अुघड पैसे खाअू! सरकारचा गुप्त हेर! म्हणून गौरवीत असतात

+ + +

## कर्मठ हिंदूनीं अस्पृश्यांस दिलेले प्रमाणपत्र

भडोच जिल्ह्यातील अकलेश्वर गावी महारवाड्यातील महाराना पाण्याचा फार त्रास पडे. पण त्याना सार्वजनिक पाणवठ्यावर कोणी जाऊं देईना तेव्हा त्रासून जाऊन आणि मुसलमानाच्या फुशीने उत्तेजित होऊन त्या महारांपैकी ३० महार मुसलमान झाले तत्काल दुसऱ्या दिवशी कर्मठ हिंदूनी त्या महारास मुसलमानी धर्माच्या सुता नावाच्या सस्काराने ते शुद्ध झाले असल्यामुळे त्यास ' स्पृश्य ' झाल्याचे प्रमाणपत्र दिले ! अितकेच नव्हे, 'बोले तैसा चाले' ह्या उच्च कर्मठ तत्त्वानुसार त्या मुसलमान होऊन शुद्ध झालेल्या महारास त्याच सार्वजनिक पाणवठ्यावर त्याच दिवसापासून पाणी भरू देण्यास परवानगी दिली जे महार त्या पाण्याच्या त्रासाने तळमळत असताही अजून मुसलमान झाले नाहीत ते अशुद्धच आहेत. पाण्यास त्यास शिवता येत नाही हे सागणे नकोच. त्या मुसलमान झालेल्या महारास शुद्ध झाल्याचे प्रमाणपत्र लिहून देऊन आणि त्याच्याबरोबर पाणी भरून 'बोले तैसा चाले' असे वागले आमच्या वाचकास म्हणूनच आमचा अनुरोध (शिफारस) आहे की आपण सगळयानी प्रत्यही पहाटेस 'त्याची वदावी पाऊलें !'

✦ ✦ ✦

शुद्धीच्या बातम्या देता देता 'श्रद्धानद' थकत चालला ! फेब्रुवारीत अेक हजार अहिंदु कुटुंबे म्हणजे तीन चार हजार लोक हिंदु मिशनने शुद्ध केले समारभ चारा तास चालला होता.

स्वामी श्रद्धानदानी जवळ जवळ ६०,००० मलकाना रजपूत मुसलमानास शुद्ध करून घेतले तेव्हा त्याची अेका मुसलमान हत्याऱ्याने पिस्तूल झाडून हत्या केली

पण वर दिलेल्या कलकत्याच्या हिंदु मिशनच्या चालकानीही श्रद्धानदानतर गेल्या वर्षात, विशेषत बिहारमधील गद्दी मुसलमानातील जवळजवळ १५००० मुसलमानास शुद्ध करून घेतले, आणि बगालमध्ये ५०,००० हजारावर शुद्धिकार्य केली या हिंदुमिशनच्या शुद्धिकार्याचा आकडाही अशा रीतीने साठ हजारावर आल्याने त्याच्या चालकाचीही मुसलमानी आततायाकडून मारले जाण्याची योग्यता सिद्ध झाली होतीच तिचें सार्थक करण्यासाठी गेल्या महिन्यात श्रीमान् स्वामी परमानदजी (प्रो भाअी परमानद नव्हेत) याना अेका मुसलमानाने सुरा भोसकून घायाळ केले आहे हा मुसलमान ब्राह्मण वेषाने शुद्ध होणाऱ्या गद्दी मुसलमानात छपून बसला होता त्याचे अेकदोन वार होताच तो धरला गेला परतु परमानदजी श्रद्धानदाप्रमाणे मारले न जाता केवळ घायाळच होऊन सुटले.

हे फार वाअीट झाले, परमानदजीवर श्रद्धानदजीप्रमाणे वार झाला हे अितके वाईट नव्हे, तर परमानदजी श्रद्धानदजीप्रमाणे हत्येस बळी न पडता वाचले हें फार वाअीट झाले

कारण श्रद्धानदजी वाचले नाहीत म्हणून जशी शुद्धि वाचली आणि त्याच्यामागे त्याच्या न वाचण्यानेच हिंदु मिशनकडून साठ हजार मुसलमान-ख्रिस्त्याची

शुद्धि करवून घेतली, त्याप्रमाणे श्रीमान् परमानदजीच्या न वाचण्यान आणखी कोणाकडून आणखी कोणा साठ हजार मुल्ला मिशनऱ्यास शुद्ध करुन घेवविले असत. पण परमानद वाचल्याने शुद्धीस पुन्हा अेकदा जोराची चालना मिळण्याची सधि गेली,

परमानद स्वामींच्या डाव्या हातास घाव झाला आहे चिंता नाही अजून अुजवा हात आहेच त्याला घाव लागण्याची सधि येअीतो आणखी दहा वीस हजार गर्द्दी मुसलमानास तो हात शुद्ध करील्च

वीस हजार मुसल्मानाच्या शुद्धीसाठी अेक हात—! काही फारसा महाग सवदा नाही माला हा अशा दराने आज अेक अेक हात काणीही हाडाचा हिंदु मोठ्या आनदाने विकील

हो, हात जर चागला दाखविता यत असेल तर गोष्ट निराळी पण तो नुसताच खाद्यापासून लाबकळत राहाण्यापेक्षा वरील बाजार भावाने विकला गेला तरी पुर

+ + +

लाला लजपतरायजीनी भर विधिसमितीत (लेजिस्लेटिव्ह असब्ली) ठासून सागितले की त्यानी अेकट्यान आजवर जितका पैसा आणि प्रयत्न दलित आणि अस्पृश्य म्हणविल्या गेलेल्या जातीच्या अुन्नत्यथ व्यय केला आह तितका ब्रिटिश सरकारन शुम्या शभर वर्षात केलेला नाही ! त्याचप्रमाणे अेकट बिर्ला शेठही दरमहा २०००० रुपय अस्पृश्याच्या अुन्नतीप्रीत्यर्थ व्यय करितात पण सरकारने अस्पृश्याच्या अुन्नतीसाठी वीस हजार कवड्या देखील दरमहा कधी व्यय कल्या नाहीत

—आम्ही म्हणतो नसतील अेक कवडी देखील अस्पृश्यानरिता ब्रिटिश सरकारन व्यय केली नसेल पण त्यामुळे सरकारवर आरोप तो कोणचा आणि कसा लागू होता? ब्रिटिश सरकार म्हणजे कर गोळा करणारी सत्ता आहे ती काय मार्गान भिकाऱ्यासाठी मोहरा अुधळीत जाणारी कोणी अहल्याबाअी आहे की काय! अस्पृश्यापासून अितराप्रमाणेच कर अुकळण्यात ब्रिटिश सरकार काही कसूर करीत नाही ना? झाल तर मग ! अस्पृश्यासाठी काय अगर कोणाचसाठी काय कराचा व्यय करण्याच काम काही सरकारी काम नव्ह ब्रिटिश सरकारी काम अुकळण्याच, —अुधळण्याचे नव्हे !

+ + +

बारडोली पुन्हा कर न देण्याचा सत्याग्रह करणार आहे म्हणे! चोरीचोऱ्याच्या कानात कोणी मध्यच ही वातमी पुटपुटला नाही म्हणजे पुरे ! नाही तर तिकडे पुन्हा अेखादी चोरवाट मोकळी पडावयाची ! चोरीचोऱ्याच्या चोरवाटेने पळून जाण्याची बारडोलीच्या सत्याग्रहाची पुरातन प्रसिद्धि आह

—ता २२ मार्च १९२८

+ + +

## ( ८ )

## भरतपूरच्या महाराजांस गादीवरून काढावें, कारण काय तर मशीद पाडली

भरतपूरच्या महाराजास गादीवरून अुतरण्याचा प्रसग आला होता थोड-क्यात निभावले पण ते निभावण्याच्या आधी हसन निजामीस स्वर्देव अल्लाजींची काही पत्रें सापडली. त्यावरून निजामीने आपल्या पत्रात प्रसिद्ध केले की, ' भरत-पूरच्या महाराजावर हा दुर्धर प्रसग गुदरला नसता पण त्यानी त्याच्या राज्यात (ते नको म्हणत असता) बाधली गेलेली अेक मशीद पाडून टाकली म्हणून अल्ला क्रुद्ध होअून हे सकट त्याने आणले !' निजामीचे हे म्हणणे खरे आहे अल्ला ततेच जागृत दैवत आहे खरे !

पण रुद्रजीही आताशी काही निजूनच नसतात तेही थोडेसे जागे झाले आहेत असे दिसते. कारण अल्लाजी पाडलेल्या मशिदीचा सूड घेण्यास अुत्तरेस भरतपूरकडे गेले आहेतसे पाहून गुलवर्ग्यास आपल्या मदिराची मागे जी निजामाने पायमल्ली केली तिचा सूड अुगविण्यास रुद्रजीनी दक्षिणेस हैद्राबादेवर स्वारी केली निजामाची दाढी खेचून त्यासही गादीवरून कोलमडून पडू पाहीतो गदगद हल-विला आणि हैदराबादेस प्लेगची आग लावून दिली ! अल्लाजी देव, तर रुद्रजी महादेव !

\+ \+ \+

हसन निजामीस अेवा स्वर्देवाची ही पत्रे अुपलब्ध होण्याचे सधीसच अिक्डे भोळ्या भारतीयास 'नाविष्णु पृथ्वीपति' या वचनाधारे भूदेव वाटलेले अिग्लडचे विगत महाराज अेडवर्ड यांचीही काही पत्रे सर सिडेन ली याना अुप-लब्ध झाली आहेत ती वाचून नास्तिकाची देखील 'नाविष्णु पृथ्वीपति' या शास्त्रवचनावर अढळ निष्ठा बसल्यावाचून राहणार नाही

त्या पत्रांपैकी अेकात 'कर्मवीर' प्रसिद्ध करिते की, लॉर्ड मोर्लेने मि सिंह याना जेव्हा व्हाअिसरॉयच्या कार्यकारी मडळात नेमण्याची व्यवस्था केली, तेव्हा राजे अेडवर्ड यानी लिहिलेले अेक मत स्य पत्र आहे त्यात अेडवर्ड १९०१ मध्ये लिहितात:–

' तुम्ही म्हणता व्हिक्टोरिया राणीने हिंदी लोकास हे वचन दिले, ते वचन दिले, पण याविषयी मला वाटते की, काळ्या मनुष्यास (Native) व्हिक्टोरिया अशा साम्राज्याच्या अगदी अतरगमडळात नेमण्याच्या आज्ञेवर कधी स्वाक्षरी करती ना ! मला तर अशा घातक कागदावर केवळ निरुपायाने सही करावी लागत आहे !'

राजभक्त म्हणून प्रख्यात असलेल्या भारतीयास — या नेटिव्हास — साम्राज्याचे अतरग मडळात का मज्जाव असावा या विषयाचा अधिक ऊहापोह दुसऱ्या अेका पत्रात राजे अेडवर्ड परम कारुणिकपणे करीत असता लिहितात —

' साम्राज्याच्या अतरग मडळात कोणत्याही काळ्या माणसास घेणे हे मला फारच धोक्याचे वाटत आहे ! *कार्यकारी मडळात अशा कितीतरी गोष्टींची चर्चा* करावी लागते की जो ' नेटिव्हा समोर करणे अगदी अनिष्ट आहे ' बिचारा सायमन तो तरी अधिक काय म्हणता आहे !

अेडवर्ड राजे पुढे लिहितात काळा माणूस कितीही चतुर असो, तुमचे कार्यकारी मडळ त्यास कितीही राजभक्त समजो तरीही तो कधी आपल्या विरुद्ध जाओील हे कोणास सागता येणार आहे ? तुमच्या गुप्त गोष्टी तो वेळप्रसगी चव्हाट्यावर आणणार नाहीच म्हणून हमी कशी देता येणार ! मी निरुपायाने सही केली तरीही माझे हे विरुद्ध मत नादवून ठेवू अिच्छितो काळा मनुष्य प्रसगी घातक आहे हे मत बदलणे शक्य नाही '

अेडवर्ड महाराजानी हेही लिहिले आहे की ' व्हिक्टोरियाही याचे विरुद्ध जाती अितकेच नव्हे तर माझा पुत्र (आजचे राजे जॉर्ज हे) देखील माझ्याशी सहमत आहे ! ' बीज तैसी फळे । अुत्तम या अमगळ ।

काळघातील अेका चतुर मनुष्यास सुद्धा, तो राजभक्त असला तरी, सरकारच्या नेमणुकीनेही नुसत्या व्हाअिसरॉयच्या कार्यकारी मडळात बसविण्या-अितका विश्वासदेखील त्या लोकावर ठवण्यास परमदयाळू महाराजे अेडवर्ड सिद्ध नव्हते, अितकेच नव्हे, तर ते आणखी अेका पत्रात लिहितात की —

' मला हे वाचून आश्चर्य वाटले की भारतमत्र्याशी होणारा पत्रव्यवहार काळ्या लोकास दाखविला जातो, अितकेच नव्हे तर तुमच्या गुप्त कागदपत्राच्या प्रती ' नेटिव्हच ' करितात ! ही पद्धति फार भयावह आहे ! मला तो फारच आपत्तिजनक वाटतो ! '

कार्यकारी मडळात अेक अधिकारी म्हणून नेमला जाणारा ' नेटिव्ह ' अयोग्य आहे, अितकेच नव्हे तर गुप्त कागदाच्या प्रती करण्याच्या कारकुनीच्या जागसही हे काळे पाय लागणे हितावह नाही !

तरी देखील परमदयाळू अेडवर्ड महाराजानी शेवटी अेक ' नेटिव्ह ' व्हाअिसरॉयचे कार्यकारी मडळात नेमू दिला ! कोण प्रजावात्सल्य हे !

ही दु खाची गोष्ट आहे की, ह्या प्रजावत्सल पुरुषाची ही मनीषा तेवढी अपूर्ण राहून गेली की, ' तुम्ही नेटिव्हाना हा जो सुचप्रवेश करू दिलात त्याचा मुसलप्रवेश होण्याचे आधीच तो नेटिव्हास दिलेला अधिकार परत घेण्याचे धैर्य दाखविण्यास आता दुसरा अेखादा तसाच निधड्या छातीचा मनुष्य पाहिजे '

हा जो तसाच निधड्या छातीचा मनुष्य अेडवर्ड महाराजास पाहिजे होता तोच तर हा सायमन नसेल ना ?

✦ ✦ ✦

असल्या दैवी राजवटीत साधारण सृष्टीतही दैवी विपर्यास घडणारच ते पहा बिहारमध्ये अेका बकरीने मनुष्यासारख्या प्राण्यास जन्म दिला आहे ! ठीकच आहे त. जर मनुष्यप्राणी आज हिंदुस्थानात बकर्‍यासारख्या प्राण्यास धडाधड जन्म देत आहेत तर बकरीने मनुष्यासारख्या प्राण्यास जन्म द्यावा यात काय नवल !

जर रशियात अेखादी बकरी मनुष्यास जन्म देती तर नवल ! कारण तिथे मनुष्य–मनुष्यिणी बकर्‍यास जन्म देत नाहीत ही गोष्ट तिकडच्या मनुष्यमनुष्यिणींचे वेल्फर्ड वेलाकने काढिलेले खालील चित्रच समर्थील ते म्हणतात,

' मी रशियात शिरलो तेव्हा मला सांगण्यात आले की, ब्रिटनने रशियाशी संबंधविच्छेद केला तेव्हा सर्व रशियाभर रणोत्साह पराकाष्ठेला पोचला मातृभूवर परकीयाची स्वारी होण्याचा संभव आहे हे सिद्ध करण्यास जो तो पुढे येतो अेवढेच नव्हे तर मुलगे, मुलगेच नव्हत तर मुली सैनिकशिक्षण शिकू लागल्या श्रमिक लोका (Labourers) च्या शाळातून देखील मुलींची सैनिक पथके संघटविण्यात आली सक्तीच्या सैनिक शिक्षणाअितके वय झालेले नसताही कोवळी मुले स्वेच्छेने हट्ट धरून बसली की, आपलीही सैन्ये संघटविण्यात यावी महा-युद्धाचे दिवस सोडले तर रशियात मला आज आढळत आहे असा रणोत्साह मी कधीही पाहिला नाही विशेषत सप्टेंबर चारला मी जे दृश्य पाहिले त्याचा माझे मनावरच फार परिणाम झाला तो युवक संघाचे प्रदर्शनाचा दिवस होता. जवळ जवळ पाच लक्ष तरुण मुलाची सैनिक पथके मास्कोच्या लाल चौकातून त्या दिवशी चाल करून गेली शेकडो प्रकारानी त्या युवकसंघानी रशियाचे सशस्त्र संरक्षण करण्याचा आपला निश्चय व्यक्त केला त्या दिवशीचा तो उत्साह आणि निर्धार अपूर्व होता. खरोखर रशियावर स्वारी करणाऱ्या कोणत्याही राष्ट्राची कीव यावी असे ते युवक संघीय प्रदर्शन होते कारण जगातील कोणत्याही राष्ट्राच्या धनिक सत्तेची अशा युवक सेनेविरुद्ध लढाअी करण्यासारखे सैन्य धाडण्याची छातीच नाही ! त्या सगळ्या रशियन तरुणाच्या क्रोधाचे मुख्य लक्ष्य अिंग्लंड होते ऑस्टिन चेंबर्लेनच्या पुतळ्याच्या प्रतिमा ठिकठिकाणी अपमानित करण्यात येत होत्या जो त्या प्रतिमेस अचूक वेधील त्या युवकास पहिल्या प्रतीचे पारितोषक मिळे !'

असल्या सशस्त्र प्रदर्शन करणाऱ्या सिंहासारख्या दलनक्षयुक्त युवकसंघाचे देशात मनुष्यास जन्म देण्याची बकऱ्याची काय माय व्याली आहे !

या दलनक्षयुक्त क्रुद्ध युवकसंघाची सैनिक सशस्त्र प्रदर्शन पाहून विन्फर्ड विलॉक याच्या अंगावर जगात अजून भयंकर रक्तपाताची युद्धे घडणारच आहेत

'टाअिम्स 'ने जसा हा अचूक शोध अिकडे महाराष्ट्रात लाविला, तसाच कलकत्त्यासही पोलडच्या अेका गोऱ्या ज्योतिष्याने आणखी अेक त्याहूनही अद्‌भुत शोध लाविला होता तो ज्योतिषी म्हणाला, 'मी बारा वर्षे हिंदुस्थानात ज्योतिषादिक अभ्यास करण्यात घालविली असून माझी भविष्ये अचूक असतात येत्या मार्च २२ ला फार मोठा भूकंप होअून सर्व हिंदुस्थान त्यात ' गडप होणार आहे! ' ह्या भयंकर ' गडगडाटात ' सायमन कमिशनसहच हिंदुस्थान गडप होणार होते की अेकटेच, ते त्याने काही स्पष्ट सांगितले नाही.

मारवाडी बाजारात ह्या भविष्याने मोठी गडबड अुडविली कित्येक लोक अत्यंत चिंतातुर झाले परंतु अिंग्रजी राज्यातील हम करे सो कायद्यास कंटाळलेले चळवळे लोक मात्र अुलट अत्यंत आनंदभरित दिसू लागले कारण त्या बेबंदशाहीतून हिंदुस्थानची सुटका करण्याचा अनत्याचारी अहिंसेहूनही हा सुलभतर आणि अुत्कृष्टतर मार्ग होता ! आम्ही अेवढ्या चळवळ्यातील अेक अनत्याचारी, अहिंसक प्राणी असल्याने मार्चच्या २२ व्या तारखेस हिंदी स्वातंत्र्यदिनासारखा सुवर्ण दिवस समजून त्याची वाट पाहत बसलो अेवढ्या भूकंपात—ज्यात हिंदुस्थानचे हिंदुस्थान गडप होणार—त्यात शूच न लावले तर आपली दौत सांडून जाअीलच हीही गोष्ट आनंदाचे भरात आम्ही विसरून गेलो ! आमच्या शेजारच्या पानविडीवाल्या दुकानदाराने मात्र ' भूकंप होअू देअू नकोस देवा ! मी अेक मूठभर तांदूळ त्या ज्योतिष्यास देअीन ' म्हणून नवस केला होता

मार्चची २३ वी तारीख अुजाडली ! पाहतो तो न हिंदुस्थान गडप झाले न अिंग्रजी राज्य ! फार काय, शूच न घातलेली ती आमची दौत देखील अुपडी झाली नाही !

तो पानविडीवाला म्हणाला ' मोठे गंडांतर टळले ! ' परंतु त्या भविष्यवादी गोऱ्यास जो तो सतावू लागला आहे की, तुझे भविष्य खोटे ठरले, अशी बातमी आली तेव्हा तत्काल त्या पानविडीवाल्याने आपण मूठभर तांदूळ अर्पिण्याचा केलेला नवस त्या ज्योतिषीबुवास कळविला.

आता त्या ज्योतिषीबुवानी घाबरून जाण्याचे काही कारण नाही त्यानी चापून सांगावे, ' भविष्य चुकले नाही भूकंप होअून हिंदुस्थान गडप झालेच असते पण गणित ज्योतिषास फलज्योतिषाचा जो हातचा नेहमीच ठेवलेला असतो, त्याचे प्रतापाने ह्या पानविडीवाल्याने मूठभर तांदुळाचे जे दान दिले त्यामुळे तो भूकंप टळला नाही तर झालाच असता गणित ज्योतिषही बरोबर ठरले—फलज्योतिषही खरे ठरून भविष्यवाद्याच्या पोटास भात मिळण्याचीही व्यवस्था अखंड राहिली.

✦ ✦ ✦

ही झाली भविष्य कसें होओील हें सांगणारांची गोष्ट. आता भविष्य कसें व्हावें तें सांगणाराकडे थोडेसें वळू.

विलायतेच्या ' स्पेक्टेटर ' नांवाच्या पत्रात भारताच्या सर्व आपत्तींचा परिहार करणारा भविष्यकाळ कसा आणता येओील याविषयी चर्चा करून त्याचा अुत्तम अुपाय म्हणून अेका मुसल्मानानें असें सुचविलें आहे की, ' हिंदुस्थानचें सर्व राज्य दिल्लीच्या मोगल बादशहाच्या कोणातरी वंशजाकडे सोपवावें म्हणजे तो ब्रिटिश सत्तेखाली हिंदुस्थानची बादशाही अुत्तमपणे चालवील.' असें झालें तर वारसाहक्काचा हा अेक अपूर्व विजय होओील. ' लॉ रिपोर्टर ' चा जादा अंक काढावा लागेल !

मोगल बादशहाच्या कोणातरी वंशजाकडे भारताचें राज्य सोपविण्याच्या ह्या आमच्या मुसलमानबंधूच्या सूचनेस आमचा महाराष्ट्राच्या वतीनें पूर्ण पाठिंबा आहे. कारण वारसाहक्काच्या ह्या विजयानें जुन्या मोगल बादशाहीच्या वंशजाकडे हिंदुस्थानची बादशाही येताच, जुन्या पेशव्याच्या वंशजाकडे चौथाओी आणि सरदेशमुखीचा वारसाही महाराष्ट्राकडे अनायासेंच येअून तो वसूल करता करता महादजी शिंद्यांच्या कोणातरी वंशजासही त्या मोगल बादशहास पेनशन देअून सर्व बादशाही आपल्या खिशात केवळ त्याच वारसाहक्कानें घालता येओील.

हिंदुसभेच्या वतीनेंही ह्या सूचनेस अवश्य पाठिंबा मिळावा. कारण आता मुसलमानास शुद्ध करून हिंदु करता येणें अगदी सुलभ झाल्यानें त्या मोगलाच्या ' कोणातरी वंशजा 'स बादशाही मिळताच त्यासच हिंदु करून घेता येओील. हिंदुसभेचे मुख्य कार्यवाह पं. नेकीराम दिल्लीसच बादशाहीवाड्याच्या अेका हाकेवर राहतात

अेकवेळ ह्या मोगल बादशहाचा कोणीतरी वंशज पुरवेल. पण त्या क्रांतिकारकांच्या वंशजाचें नाव देखील अेकणें नको असें अिंग्रजांस झालें आहे. कारण वरील मुसलमानाच्या सूचनेचा कोणाही अिंग्रजी पत्रास राग आलेला दिसत नसला तरी सध्या गेल्या अेका वर्षांचे आतच ज्या क्रांतिकारकांच्या पाचसहा फुटळक अुठावण्या झाल्या आणि त्यांचे कटाचे खटले देवघर अित्यादि ठिकाणी अजूनही चालले आहेत, त्यांची बातमी अैकून पत्रें अगदी संतप्त झाली आहेत. पंजाबच्या श्रीमती पार्वतीदेवीचा अेक तरुण मुलगाही या कटात गवसल्याची बातमी आहे. अशा अुच्च कुलीन हिंदूच्या डोक्यात हे वेड कसें संचरलें आहे तें अिंग्लिश लोकांस विशद करून दाखविण्याचें कार्य अे- जी. वुलेकाट नावाच्या अिंग्लिश लेखकानें केलें आहे.

' भारतीय देशभक्त ' ह्या मथळ्याखाली या वुलेकाटसाहेबानें गेल्या अेक दीड वर्षातील बऱ्याच क्रांतिकारक कटांची माहिती प्रसिद्ध केली आहे. त्यात

काकोरीच्या क्रांतिकारकांच्या कटाचे वर्णन अर्थातच पुष्कळ विस्ताराने दिले आहे. त्याचा प्रत्येक शब्द रागाच्या लाल शाअीने अगदी रंगून गेलेला आहे

स्वदेशस्वातंत्र्यार्थ आपल्या प्राणाचाही बळी देणाऱ्या ह्या 'भारतीय देशभक्तास' बुलेकाटसाहेबांनी ज्या दहा शिव्या हासडल्या आहेत, त्याचे स्थली दहा हजार हासडल्या असत्या तरी देखील ह्या 'भारतीय देशभक्ता'ची कहाणी त्याने युरोपच्या–निदान अिंग्लंडच्या तरी कानावर अेकदाची घातली ह्याविषयी आम्ही बुलेकाटसाहेबांचे मन:पूर्वक अभिनंदन करतो हिंदुस्थानातील वर दिलेल्या अेक हजार गाळभरू 'My, lord' वाल्या व्याख्यानांनी अिंग्रजांचे कान जसे टवकारले जात नाहीत, तसे केवळ ह्या अेका कहाणीने जातात हिंदुस्थान दरिद्री आहे, आम्ही भुकेने मरतो अित्यादि डोळ्यांत पाणी आणणाऱ्या 'डाळेमरू' कहाण्यासच ह्या क्रांतिकारकाच्या 'डोळेवटारू' कहाण्या सांगण्याची हौस आम्हा कोणाही हिंदी मनुष्यास नसल्याने, ते कार्य बुलेकाटसाहेबांनी करून हिंदुस्थानची डोळेमरू आणि डोळेवटारू अशी दोन्हीही स्वरूपे अिंग्रजास परिचित करून दिली ह्याविषयी बुलेकाटसाहेबांस कोणीही सत्यप्रिय मनुष्य धन्यवादच देअील त्यामुळे हिंदी राजकारणाच्या दोनही बाजू अिंग्रजास कळतील

त्याच्यात फरक हाच असतो या 'डोळेवटारू' देशभक्ताच्या अशा दाडग्या कहाण्या आमच्या आम्हासही सांगताना देखील सभ्य लज्जाशीलतेमुळे आम्हा हिंदी लोकांना अगदी कसेसेच वाटते त्या दुसऱ्यास कोणी सांगितल्या तर अैकता मान येतात चोरून चोरून

सायमन कमिशनवर अविश्वास असल्याचा आरोप जेव्हा वरिष्ठ विधिसमितीत (लेजिस्लेटिव्ह असेंब्लीत) झाला, तेव्हा त्या अुत्तेजनेत 'हिंदुस्थान टाअिम्स'च्या वार्ताहराची लिहावयाची अेक हातपेटी वरून सज्जातून धाड्दिशी खाली पडली! पडली तर पडली, पण अगदी नेमकी सर ब्लॅकेटसाहेबांचे डोक्यावर पडली तत्काळ ब्लॅकेटना धक्का बसून क्षणभर मूर्च्छना आल्यासारखे झाले पण अेकदरीत निभावले फार वाअीट झाले!!

त्यातल्या त्यात अितके बरे झाले की, त्या वार्ताहरावर खटला भरला गेला तेव्हा त्याने लपवाछपव न करता आपले खर ते सांगून टाकले की, 'सर बेसिल ब्लॅकेट साहेबांच्या हिंदी हिताविरुद्ध झालेल्या भाषणामुळे मला अितकी अुत्तेजना आली की, माझ्या हातातील सामान मी कसे आणि कुठे ठेवीत आहे ते मला भानच राहिले नाही' त्या बेभान वृत्तीत तो पोकळीवरच हातपेटी ठेवता झाला. पण पोकळी बेभान झाली नसल्याने तिने तिच्या मूळस्वभावाप्रमाणे पेटीला तशीच खाली पडू दिली!

त्या वार्ताहाराला दंडाची वा थोड्याशा कैदेची–पण ल्हानशी शिक्षा झाली आहे म्हणे थोडी अधिक शिक्षा झाली असती तरी ठीकच होत. कारण जर

का वागदाच्या त्या हातपेटीचे स्थली त्याचे हातीं दुसर तिसरे काही असत तर केवढा आकांत अुडाला असता !

बेभान झाला म्हणून काय झाले – अिग्रजाच्या डोक्यावरचे हाड हातपेटीने देखील दुखावण्याअितकेच कोणाही हिंदी मनुष्याप्रमाणेच मानवी असत – आणि अिग्रजासही मूर्च्छा येअू शकत अितकं भान देखील त्यास राहू नये की काय ?

—ता १९ एप्रिल १९२८

\+ + +

## (१०)

## तुर्की मुलीना अमेरिकन शाळेत घालू नका!

आपल्या देशातील अमेरिकन शाळेत तुर्की मुली पाठविण्याचे काम चालते असं दिसून आल्यावरून, तुर्की सरकारने ब्रुसा येथील मुलींची अमेरिकन शाळा बद केली तुर्कांनी आपल्या मुली तुर्की शाळेतच घालाव्या असे आज्ञापत्र तुर्की सरकारने काढल आहे केमाल पाशा स्वत कुराण मानीत नसलं तरी तुर्की मुलींनी ख्रिश्चन होअू नये यास्तव ते सरकारी सक्ती देखील अुपयोगात आणतात ह यावरून अुघड होत आहे कारण असं वाटणे म्हणजे नुसत्या धर्मस्वातंत्र्याचा प्रश्न नव्हे, त्यात संस्कृतीचा, राष्ट्रीय अैक्यतेचा राष्ट्रीय संख्याबलाचा प्रश्न आहे, असं केमालपाशांना वाटत आहे काय खुळा बेटा ! आमच्या अिकडचे काही 'शिवशिव न हिंदुनं यवन' बोल शहाणे हे केमालपाशास तुर्की काय, ख्रिश्चन काय ? तुर्कस्थानच्या राष्ट्रीय अैक्यासाठी यानात तुमच्या तुर्की मुली त्या ख्रिस्त्याना' असा अनत्याचारी अुपदेश देतील तर बरे होअील

म्हणूनच गेल्या अेका श्रद्धानदात म्हटले होते की केमालपाशा जरी अुद्या हिंदुस्थानावर राज्य करण्यास आला, तरी तो महमद अल्ली होणारच नाही असं आम्हास म्हणवत नाही कारण मुसलमानीपणा धर्म म्हणून त्यानी अगीकारला नसला, तरी तुर्की संस्कृति म्हणून तो काही तरी मानीत असलाच पाहिजे ख्रिश्चनाच्या या तरुण तुर्कानीच आर्मेनियात कत्तली कल्या, त्या काही कुराण बाय बलातील अीश्वरविषयक तत्त्वज्ञानात, धर्मात भेद आहे म्हणून नव्हेत, तर ख्रिश्चन संस्कृति आणि तुर्की संस्कृति, या अुभयताची जाति, नीति, राष्ट्रीयता यात भेद आहे म्हणून होय अवढ्यासाठीच शुद्धि ही हिंदुत्वाची चळवळ आहे – नुसती

धार्मिक म्हणजे तत्त्वज्ञानविषयक वितंडवाद नव्हे ज्या कारणासाठी कुराणास आप्तवाक्य न मानणारा तुर्की राष्ट्रीय पक्ष ख्रिश्चनांनी तुर्की मुली बाटवू नये म्हणून त्यांच्या शाळा सक्तीने बंद पाडतो, त्याच कारणासाठी हिंदु मुली बाटविल्या जाऊ नयेत म्हणून हिंदु संघटन झटते शुद्धि म्हणजे काय ते आम्हास कळतच नाही असे म्हणणाऱ्यांनी तिचा अर्थ केमालपाशापासून तरी शिकावा

✦ ✦ ✦

परम दयाळू हिंदुस्थान सरकारने चित्रकलेविषयी विशेष ज्ञान मिळविण्या-करिता काही हिंदी चित्रकारास शिष्यवृत्त्या देऊन युरोपात पाठविण्याचे ठरविले आहे ! झाले आता हिंदुस्थानच्या भाग्योदयास काय उशीर !

कारण हिंदुस्थानची जी अत्यंत दुर्बळ दास्यग्रस्त दरिद्रावस्था झालेली आहे ती त्यास 'चित्रकलेचे विशेष ज्ञान' नव्हते म्हणूनच होय !

बाकी सारे ज्ञान विज्ञान त्याला करतलामलकवत् झालेलेच आहे मशीनगन्स, विमानपटुता, संचालन, विद्युत्शिक्षा, पाणबुड्या, सैनिक कौशल्य, विषारी धूर, विषारी धुराचा प्रतिकार करणारी रसायनशास्त्रे इत्यादि प्रबल राष्ट्रास अत्यंत अवश्य, ती ती कला शिकण्यास हजारो विद्यार्थी हिंदुस्थान सरकारने आजवर विदेशी धाडून हिंदुस्थानात ते येताच त्यांची मोठमोठी सबल पथके हिंदुस्थानचे संरक्षणार्थ सज्ज करून ठेविलेलीच आहेत ! राहता राहिली होती चित्रकला ! म्हणून आता तीही शिकण्यास विद्यार्थी विदेशात धाडण्यात येणार आहेत ते अेकदा का परत आले की मग काय छाती लागली आहे, त्या रशियनाची किंवा अफगाणाची या हिंदुस्थानावर स्वारी करावयास ! ते तर काय, या चित्रकलेत अेकदा का हिंदुस्थान तज्ज्ञ झाले की, अिंग्रजी पलटणे देखील पळून जातील पळून !

✦ ✦ ✦

सिद्दीक नावाच्या अेका मुसलमानाने आपल्या हिंदूतील जैन पंथाचे स्थापक श्रीमान् चन्न बसवेश्वर याचे आपण अनुयायी आहोत असे प्रथम प्रसिद्ध करून, आता त्याच श्रीबसवेश्वराचे नावाखाली हिंदूस मुसल्मानी धर्म हाच अत्युत्तम धर्म आहे म्हणून दीक्षा देण्यास आरंभ केला आहे ! आगाखानही कल्की अवताराच्या नावानेच हिंदूस मुसल्मानी दीक्षा देत असतात ! ! ते ठीकच आहे कारण—

ख्रिस्ती पुराणात अशी अेक अनुश्रुति आहे की, सैतान प्रथम आपल्या स्वतःच्या नावानेच लोकास सैतानी पंथाचा अुपदेश देअू लागला. पण आस्तिक लोक ते सैतानाचे मत आहे असे अैकताच ते अैकण्यास सिद्ध नसत हे पाहून चिंता-युक्त स्थितीत सैतान विचार करीत असता त्याला आपल्या जाळ्यात आस्तिकास देखील सहज ओढण्याची अेक युक्ति सुचली तेव्हा

The Devil said with wink and nod
The wisest way to work my will
Is to call it the Will of God!

सैतान डोळे मिचकावीत आणि मान हलवीत अुद्गारला : अुत्तम युक्ति सुचली! माझ्या सैतानी अिच्छा लोकाकडून पूर्ण करवून घेण्यास अुत्कृष्ट मार्ग म्हणजे त्या सैतानी अिच्छेस ही देवाची अिच्छा आहे म्हणून प्रसिद्ध करणें हा होय. देवाच्या नांवाने पुढे आले की, भावडे लोक सैतानाची देखील पूजा करतील!

याच युक्तीचा अवलंब करून मुंबअी, ठाणें अित्यादि जिल्ह्यातून काही पाताळ-यंत्री हसन निजामीवाले हिंदु अवधूताच्या वृत्तीनें संचारत आहेत आणि जनतेस आकर्षित करीत आहेत म्हणे! सुवर्णमृगात मारीच लपलेला असतो हें सीतेस देखील कळलें नाही; मग जनतेची कथा काय! लक्ष्मणाची चेतावणी व्यर्थ गेली, तिथे आम्ही काय चेतावणी देणार—पण आपलें सांगतो की हे खरेच असले, तर सावधान! ब्राह्मणवेषात येअून अेका मुसलमानानें गेल्या महिन्यातच हिंदुसंघटक स्वामी परमानंद यांस विहारात भोसकलें होतें हे हिंदूंनी विसरू नये. नाणें पारखून घ्यावें—निदान बद्द आवाज येताच दूर भिरकावून द्यावें.

ही चेतावणी हिंदूस दिली, त्यामुळे मुसलमान बंधूसही लगेच अेक चेतावणी देअून टाकणे भाग आहे. नाही तर हिंदुमुसलमानास समानतेने न वागविल्यामुळे तुम्ही 'अेकी' बिघडविता म्हणून 'राष्ट्रीयता' रागावेल! यासाठी मुसलमानांसही अेक चेतावणी देत आहों की,—

मथुरेत गेल्या महिन्यातच अेका धर्मनिष्ठ मुसलमानानें अेका हिंदु स्त्रीस आपले घरात कोंबून टाकिली. ही काही नवीन गोष्ट नव्हे. ही प्रत्यहीचीच घटना आहे. पण नवीन जें झाले तें हेंच की, त्याचा हिंदूस राग आला! याहूनही नवीन गोष्ट म्हणजे त्या नष्ट हिंदूंनी अेकत्र होअून मोठा दंगा केला! आणि त्याहूनही नवीनतम नवलाची गोष्ट म्हणजे त्या हिंदुमुसलमानाचे दंग्यात हिंदूच हिंदु न मरता सारे मुसलमानच मुसलमान दगावले!!! अेक विचारा मुसलमान मारला गेला आणि वीस विचारे मुसलमान घायाळ झाले. आता दंग्यानंतर पोलिसांनी अुत्कृष्ट बंदोबस्त केला आहे. लाठी घेअून फिरण्यास मनाअी करून धरपकड होअून खटलाही भरला आहे.

विसाचे भयंकर घाव येथे रुमालात गुडाळून घेअून मग त्या मुदलावारी तो सवदा करण्यास निघावे कारण दिवसेंदिवस आताशी प्रत्येक हिंदु पदार्थाचे बाजारभाव असे वाढतच आणि चढाढतच जात आहेतसे दिसते

—ता २६ एप्रिल १९२८

* * *

# (११)

## निजामाची तळी अुचलणारे मुसलमान

पुण्यास हैदराबादच्या अत्याचारी आणि हिंदुविद्वेषी राज्यपद्धतीविरुद्ध जी परिषद झाली, तिचा निषेध करण्यावरिता आणि निजामाची तळी अुचलून धरण्याकरिता मुसलमानाचीही सभा पुण्यास भरावी हे साहजिकच होते नाकर्या-प्रमाणे सभामध्यही स्वतंत्र आणि विरोधी प्रतिनिधित्व हवेच

त्या सभेत मुसलमानांनी ठासून विचारले आहे की, निजामाने जसे केव्हा केव्हा हिंदु दिवाण नेमले आहेत तसे कोणा हिंदु राजाने मुसलमान दिवाण नेमले आहेत की काय ? दाखवा !

या त्यांच्या आव्हानावरून म्हैसूरच्या महाराजानी मध्यंतरी जो मुसलमान दिवाण नेमला होता तो हिंदु झाला की काय अशी शंका येत ! शुद्धीच्या युगात कोणचा मुसलमान केव्हा हिंदु होअील याचा काही नियम राहिला नाही बुवा !

सभेत मुसलमानानी असाही अेक ठराव केला की, 'ब्रिटिश सरकारच्या आणि निजामाच्यामध्ये जो स्नेहसंबंध सतत वसत आला आहे, तो हिंदूंच्या अमलट्या दुष्ट ओरडीने विचकून विघडून जाअू नये'! आमचीही हीच प्रार्थना आहे ज्या 'सतत आणि अखंड स्नेहसंबंधा'ने आणि सकोमल प्रेमभावनेने प्रेरित होअून ब्रिटिशापाशी निजामाने आपल्या मित्राची आपण वाटेल ती वस्तु आपलीच समजून जशी संकोच सोडून मागतो, तसा वऱ्हाड मागितला आणि ब्रिटिश सिंहाने पण मित्रच मित्राला ज्या प्रेमाने 'देत नाही जा!' म्हणून कऱ्हा कऱ्हा नि सकोचपणे हसत म्हणतो तसे दात दाखवून 'देत नाही जा!' म्हटल—अितकेच नव्हे तर अगदी जीवश्चकंठश्च मित्राप्रमाणे निजामाच्या स्वतंत्र अस्तित्वाच्या भावनेच्या जिवाशी लगट करुन, कंठाशी चोवीस तासाच्या आत अुत्तर मागणारा पंजा विलगविला—तसा प्रकारचा स्नेहसंबंध ब्रिटिशाच्या आणि निजामामध्ये

सतत टिको अशी आमची प्रार्थना आहे ! तो तसा लोभ आहे याहूनही थोडासा वाढला तरी देखील आमचा ना नाही ! ह्या निजाम आणि अिंग्रज ह्याच्यात वसत आलेल्या स्नेहसंबंधाची पराकाष्ठा होअून, त्या दोन जिवाचा वऱ्हाडात कर्झनने जसा अेक करून टाकिला, तसा हैद्राबादेलाही होवो आणि आमच्या त्या स्नेहसंबंधास हपापलेल्या पुण्याच्या मुसलमानांचे तोंडात साखर पडो ! !

मुसल्मानांचा 'मुबल्लिक अखबार' आपल्या १ डिसंबरच्या अंकात लिहितो की, महमद फरुख साहेब ह्या 'अमल अि-अिस्लाम' पत्राच्या संपादक असलेल्या पंजाबातील थोर गृहस्थांनी पंजाब गव्हर्नरला खालील तार देअून मुसलमानांची अेक महत्त्वाची मागणी पुढे आणली आहे. ज्या अर्थी मुसलमानांच्या धर्माचा रोख मूर्तिपूजेविरुद्ध आहे आणि ज्या अर्थी हिंदूंच्या मूर्तींच्या मिरवणुकी पाहताच त्यास अुद्वेग येणे साहजिकच आहे त्या अर्थी सरकारने हिंदूंच्या मूर्तींच्या मिरवणुकी मुसलमानांच्या मशिदांवरून नव्हे तर दुकानांच्याही समोरून जाअू देअू नयेत. सरकार न्यायी आहे आणि मुसलमानांचा अुत्क्षोभ भडकण्याचे आधीच ते त्यांची मागणी मान्य करून त्यास संतोषित करील अशी आम्हांस आशा आहे.' —(अर्जुन)

वरील मागणी करण्याचे धैर्य दाखविले म्हणून 'अडिटर साहेब' महमद फरुख यांचे आम्ही आभार मानतो. मुसल्मानी पत्रातून काय चाल्ले असते याची वार्ता आपणास किती कमी मिळते याचे हे अुदाहरणच आहे की या मुसल्मानी पत्राच्या डिसंबरच्या अंकात काय लिहिले त्याचा पत्ता आज आम्हांस, आज सहा महिन्यांनी लागत आहे ! हिंदूंनी मूर्तिपूजा आणि मूर्तींच्या मिरवणुकी मुसलमानांच्या समोर शेजारी किंवा जवळ करू नयेत. कारण मूर्तिपूजा मुसलमानी धर्माच्याविरुद्ध आहे ! ही मुसलमानांची मागणी त्यांनी अनेकदा स्पष्टपणे सांगून

बंद करा, कारण तीही मुसलमानी धर्माच्या विरुद्ध आहे म्हणून मुसलमान मागणी करण्यास चुकणार नाहीत असें अपरिहार्य अनुमान आम्ही काढलें होतें. तेव्हा काही भावडे हिंदु आमच्यावर रागावत आणि म्हणत, 'छट् आमचे मुसलमान भाओ असले अतिरेकी नाहीतच. तुम्ही हिंदुच खोडसाळ आहा; नाही तर असे भय, अशा शंका तुम्हांस आल्याच नसत्या!' पण आमच्या पंजाबातील मुसलमानांपैकी काही पुढाऱ्यांनी तीच—अगदी तीच!—मागणी नाकावर टिच्चून केली आणि तर्कशास्त्राची लाज राखली! म्हणूनच आम्ही त्यांचे हे अुपकारच झाले असे म्हटले आहे.

'वाद्ये बंद करा म्हणताच लोण्याहून मअू हिंदूंनी मंडळें नेमून मुसलमान मौलवींची मतें मागविली की, 'वाद्यें मुसलमानी धर्माविरुद्ध खरींच आहेत काय?' आता ते सद्गृहस्थ पुन्हा मूर्तिपूजेच्या प्रश्नासाठीच मौलवी मंडळ नेमतील, आणि त्यांनी मूर्तिपूजा मुसलमानी धर्माविरुद्ध आहे असें मत देताच वरील पंजाबी गाऱ्हाणे खरें आहे असे मानून वाद्येंच नव्हेत तर मूर्तींच्या मिरवणूकीच,—आणि मशिदीसमोर नव्हे तर मुसलमानांच्या दुकानासमोर, शेजारी पुढे, मागे, वर, खाली बंद ठेवणें हेंच एकीच्या दृष्टीने हितावह आहे. *'वाद्यांच्या विषयीच नव्हे तर मूर्तिपूजा सोडून देण्याविषयीही आपल्या परम प्रिय मुसलमान बंधूंच्या भावना हिंदु विचारात घेतील'*—असा ठराव पुढील राष्ट्रीय सभा संमत करील अशी आम्ही अुत्कट आशा करितो.

वाद्यबंदीची मागणी राष्ट्रीय सभेने विचारात घेतलीच आहे. आता या वर्षी मूर्तिपूजा बंदीची मागणी तिने विचारात घेअून मान्य करावी की, पुढील वर्षी मुंजबंदीची मागणी, मुंज ही मुसलमान धर्माविरुद्ध आहे याच सर्वमान्य आणि राष्ट्रीय सभा-संमत तत्त्वाचे आधारावर पुढे करता येअील. असे अेक अेक करून आपण हिंदुमुसलमानात दुही माजविण्याचे सर्व प्रश्न हळूहळू सोडवून हिंदूंना मुसलमानच करून टाकू आणि राष्ट्रीय हित साधल्याचें महत्तम पुण्य शीघ्रच गाठी बांधू शकू.

खरें पाहिलें असता वाद्यापेक्षा किंवा मूर्तीपेक्षा मुसलमानांनी या मुंजीचाच समाचार आधी घेतला पाहिजे. कारण त्यांच्या तबलीगचा भयंकर शत्रु कोणी 'वाद्यें' किंवा 'मूर्ते' नसून अेक मुंजे'च आहे.

कोणचीही गोष्ट चांगली वा वाअीट हें मुसलमानी धर्मात ती आहे की नाही यावरून हिंदूंनी ठरवावें ही मुसलमानांची मागणी अगदी स्वाभाविक आहे. पण हा आर्यसमाज जिथे तिथे त्यास आडवा येतो. आणि आता हें संघटण: गडस्योपरि पिटिका संवृत्ता!

सतत टिको अशी आमची प्रार्थना आहे! तो तसा लोभ आहे याहूनही थोडासा वाढला तरी देखील आमचो ना नाही. ह्या निजाम आणि अिंग्रज ह्याच्यात वसत आलेल्या स्नेहसंबधाची पराकाष्ठा होअून, त्या दोन जिवाचा व-हाडात कर्झनने जसा अेक करून टाकिला, तसा हैद्राबादेलाही होवो आणि आमच्या त्या स्नेह-संबधास हपापलेल्या पुण्याच्या मुसलमानाचे तोंडात साखर पडो!।

मुसलमानाचा 'मुवलिक अखबार' आपल्या १ डिसेंबरच्या अंकात लिहितो की, महमद फरुख साहेब ह्या 'अमल-अि-अिस्लाम' पत्राच्या संपादक असलेल्या पंजाबातील थोर गृहस्थानी पंजाब गव्हर्नरला खालील तार देअून मुसलमानाची अेक महत्त्वाची मागणी पुढे आणली आहे 'ज्या अर्थी मुसलमानाच्या धर्माचा रोख मूर्तिपूजेविरुद्ध आहे आणि ज्या अर्थी हिंदूच्या मूर्तीच्या मिरवणुकी पाहताच त्यास अुद्वेग येणे साजजिकच आहे, त्या अर्थी सरकारने हिंदूच्या मूर्तीच्या मिरवणुकी मुसलमानाच्या मशिदीवरून नव्हे तर दुकानाच्याही समोरून जाअू देअू नयेत. सरकार न्यायी आहे आणि मुसलमानाचा अुत्क्षोभ भडकण्याचे आधीच ते त्याची मागणी मान्य करून त्यास संतोषित करील अशी आम्हास आशा आहे.' —(अर्जुन)

वरील मागणी करण्याचे धैर्य दाखविले म्हणून 'अेडिटर साहेब' महमद फरुख याचे आम्ही आभार मानतो मुसलमानी पत्रातून काय चालले असते याची वार्ता आपणास किती कमी मिळते याचे हे अुदाहरणच आहे की, या मुसलमानी पत्राच्या डिसेंबरच्या अंकात काय लिहिले त्याचा पत्ता आज आम्हास, आज सहा महिन्यानी लागत आहे। हिंदूनी मूर्तिपूजा आणि मूर्तीच्या मिरवणुकी मुसल-मानाच्या समोर, शेजारी किंवा जवळ करू नयेत. कारण मूर्तिपूजा मुसलमानी धर्माच्याविरुद्ध आहे। ही मुसलमानाची मागणी त्यानी अनेकदा स्पष्टपणे सागून टाकिली हे त्याचे हिंदूवर खरोखर उपकार आहेत.

खरोखरच हे हिंदूवर अुपकार आहेत कारण आम्ही मुसलमान म्हणूनच आमच्या धर्माचा खलिफा जो तुर्क त्याच्याशी लढणार नाही म्हणून जेव्हा मुसलमान म्हणाले आणि जेव्हा हिंदूनीही त्याच्या त्या कोटिक्रमास त्याच धार्मिक कारणाकरिता दुजोरा दिला, तेव्हाच मुसलमानाच्या धार्मिक समजुती हिंदूनाही बंधनकारक आहेत हे तत्त्व सिद्ध झाले खलिफाशी लढत नाही कारण ते मुसलमानी धर्माच्या विरुद्ध आहे आमच्या मशिदीसमोर वाद्ये वाजवू देणार नाही, कारण ते मुसलमानी धर्माविरुद्ध आहे. मशिदीसमोर तर काय, पण घराशेजारी शंख घंटाही वाजवू देणार नाही, कारण ते मुसलमानी धर्माच्याविरुद्ध आहे. अशी विचारपरंपरा ज्या मूलतत्त्वाच्या अुपजाअु कुसव्यातून आपोआप प्रसवली, त्या विचारपरंपरेला मान तुकवून मशिदीसमोर वाद्ये बंद करितो असे हिंदु मुसल-मानाच्या अेकीचे हिंदु भोक्ते म्हणू लागताच त्या पुढची पायरी चढून मूर्तिपूजा

बंद करा, कारण तीही मुसलमानी धर्माच्या विरुद्ध आहे म्हणून मुसलमान मागणी करण्यास चुकणार नाहीत असे अपरिहार्य अनुमान आम्ही काढले होते. तेव्हा काही भावडे हिंदु आमच्यावर रागावत आणि म्हणत, 'छट् आमचे मुसलमान भाओ असले अतिरेकी नाहीतच. तुम्ही हिंदुच खोडसाळ आहा, काही तर असे भय, अशा शंका तुम्हास आल्याच नसत्या!' पण आमच्या पंजाबातील मुसलमानां-पैकी काही पुढाऱ्यांनी तीच—अगदी तीच!—मागणी नाकावर टिचून केली आणि तर्कशास्त्राची लाज राखली! म्हणूनच आम्ही त्याचे हे अुपकारच झाले असे म्हटले आहे.

'वाद्ये बंद करा म्हणताच लोण्याहून मऊ हिंदूंनी मंडळे नेमून मुसलमान मौलवींची मते मागविली की, 'वाद्यें मुसलमानी धर्माविरुद्ध खरीच आहेत काय?' आता ते सद्गृहस्थ पुन्हा मूर्तिपूजेच्या प्रश्नास्तव मौलवी मंडळ नेमतील, आणि त्यांनी मूर्तिपूजा मुसलमानी धर्माविरुद्ध आहे असे मत देताच वरील पंजाबी गाऱ्हाणे खरे आहे असे मानून वाद्येच नव्हेत तर मूर्तीच्या मिरवणूकीच,—आणि मशिदींसमोर नव्हे तर मुसलमानांच्या दुकानासमोर, शेजारी पुढे, मागे, वर, खाली बंद ठेवणे हेच एकीच्या दृष्टीने हितावह आहे. 'वाद्याच्या विषयीच नव्हे तर मूर्तिपूजा सोडून देण्याविषयीही आपल्या परम प्रिय मुसलमान बंधूंच्या भावना हिंदु विचारात घेतील'—असा ठराव पुढील राष्ट्रीय सभा संमत करील अशी आम्ही बुलंद आशा करितो.

वाद्यबंदीची मागणी राष्ट्रीय सभेने विचारात घेतलीच आहे. आता या वर्षी मूर्तिपूजा बंदीची मागणी तिने विचारात घेअून मान्य करावी की, पुढील वर्षी मुंजबंदीची मागणी, मुंज ही मुसलमान धर्माविरुद्ध आहे याच सर्वमान्य आणि राष्ट्रीय सभा-संमत तत्त्वाचे आधारावर पुढे करता येअील. असे अेक अेक करून आपण हिंदुमुसलमानात दुही माजविण्याचे सर्व प्रश्न हळूहळू सोडवून हिंदूंना मुसलमानच करून टाकू आणि राष्ट्रीय हित साधल्याचे महत्तम पुण्य शीघ्रच गाठी बांधू शकू.

खरं पाहिले असता वाद्यापेक्षा किंवा मूर्तिपेक्षा मुसलमानांनी या मुंजीचाच समाचार आधी घेतला पाहिजे. कारण त्यांच्या तबलीगचा भयंकर शत्रु कोणी 'वाद्ये' किंवा 'मूर्ते' नमून अेक मुंजे'च आहे.

कोणचीही गोष्ट चांगली वा वाओीट हे मुसलमानी धर्मात ती आहे की नाही यावरून हिंदूंनी ठरवावे ही मुसलमानांची मागणी अगदी स्वाभाविक आहे. पण हा आर्यसमाज जिथे तिथे त्यास आडवा येतो आणि आता हें संघटण गंडस्यो-परि पिटिका संवृत्ता!

सतत टिको अशी आमची प्रार्थना आहे! तो तसा लोभ आहे याहूनही थोडासा वाढला तरी देखील आमची ना नाही. ह्या निजाम आणि अिंग्रज ह्यांच्यात वसत आलेल्या स्नेहसंबंधाची पराकाष्ठा होअून, त्या दोन जिवांचा वऱ्हाडात कर्झनने जसा अेक करून टाकिला, तसा हैद्राबादेलाही होवो आणि आमच्या त्या स्नेह-संबंधास हपापलेल्या पुण्याच्या मुसलमानांचे तोंडात साखर पडो!!

मुसलमानांचा 'मुबलिक अखबार' आपल्या १ डिसेंबरच्या अंकात लिहितो की, महमद फरुख साहेब ह्या 'अमल-अि-अिस्लाम' पत्राच्या संपादक असलेल्या पंजाबातील थोर गृहस्थांनी पंजाब गव्हर्नरला खालील तार देअून मुसलमानांची अेक महत्त्वाची मागणी पुढे आणली आहे 'ज्या अर्थी मुसलमानांच्या धर्माचा रोख मूर्तिपूजेविरुद्ध आहे आणि ज्या अर्थी हिंदूंच्या मूर्तींच्या मिरवणुकी पाहताच त्यास अुद्वेग येणे साजजिकच आहे, त्या अर्थी सरकारने हिंदूंच्या मूर्तींच्या मिरवणुकी मुसलमानांच्या मशिदीवरून नव्हे तर दुकानांच्याही समोरून जाअू देअू नयेत सरकार न्यायी आहे आणि मुसलमानांचा अुत्क्षोभ भडकण्याचे आधीच ते त्यांची मागणी मान्य करून त्यास संतोषित करील अशी आम्हास आशा आहे.' —(अर्जुन)

वरील मागणी करण्याचे धैर्य दाखविले म्हणून 'अेडिटर साहेब' महमद फरुख यांचे आम्ही आभार मानतो मुसलमानी पत्रातून काय चालले असते याची वार्ता आपणास किती कमी मिळते याचे हे अुदाहरणच आहे की, या मुसलमानी पत्राच्या डिसेंबरच्या अंकात काय लिहिले त्याचा पत्ता आज आम्हास, आज सहा महिन्यांनी लागत आहे! हिंदूंनी मूर्तिपूजा आणि मूर्तींच्या मिरवणुकी मुसलमानांच्या समोर, शेजारी किंवा जवळ करू नयेत कारण मूर्तिपूजा मुसलमानी धर्माच्याविरुद्ध आहे! ही मुसलमानांची मागणी त्यांनी अनेकदा स्पष्टपणे सांगून टाकिली हे त्यांचे हिंदूंवर खरोखर उपकार आहेत.

खरोखरच हे हिंदूंवर अुपकार आहेत कारण आम्ही मुसलमान म्हणूनच आमच्या धर्माचा खलिफा जो तुर्क त्याच्याशी लढणार नाही म्हणून जेव्हा मुसलमान म्हणाले आणि जेव्हा हिंदूंनीही त्यांच्या त्या कोटिक्रमास त्याच धार्मिक कारणाकरिता दुजोरा दिला, तेव्हाच मुसलमानांच्या धार्मिक समजुती हिंदूंनाही बंधनकारक आहेत हे तत्त्व सिद्ध झाले खलिफाशी लढत नाही कारण ते मुसलमानी धर्माच्या विरुद्ध आहे आमच्या मशिदीसमोर वाद्ये वाजवू देणार नाही, कारण ते मुसलमानी धर्माविरुद्ध आहे मशिदीसमोर तर काय, पण घराशेजारी शंख घंटाही वाजवू देणार नाही, कारण ते मुसलमानी धर्माच्याविरुद्ध आहे. अशी विचारपरंपरा ज्या मूलतत्त्वाच्या अुपजाअु कुसव्यातून आपोआप प्रसवली, त्या विचारपरंपरेला मान तुकवून मशिदीसमोर वाद्ये बंद करितो असे हिंदु मुसलमानांच्या अेकीचे हिंदु भोक्ते म्हणू लागताच त्या पुढची पायरी चढून मूर्तिपूजा

बंद करा, कारण तीही मुसलमानी धर्माच्या विरुद्ध आहे म्हणून मुसलमान मागणी करण्यास चुकणार नाहीत असे अपरिहार्य अनुमान आम्ही काढले होते तेव्हा काही भाबडे हिंदु आमच्यावर रागावत आणि म्हणत, 'छट् आमचे मुसलमान भाअी असले अतिरेकी नाहीतच तुम्ही हिंदुच खोडसाळ आहा, नाही तर असे भय, अशा शंका तुम्हास आल्याच नसत्या!' पण आमच्या पंजाबातील मुसलमानांपैकी काही पुढाऱ्यांनी तीच—अगदी तीच!—मागणी नाकावर टिचून केली आणि तर्कशास्त्राची लाज राखली! म्हणूनच आम्ही त्यांचे हे अुपकारच झाले असे म्हटले आहे

'वाद्ये बंद करा म्हणताच लोण्याहून मअू हिंदूंनी मंडळे नेमून मुसलमान मौल्वींची मते मागविली की, 'वाद्ये मुसलमानी धर्माविरुद्ध खरीच आहेत काय?' आता ते सद्गृहस्थ पुन्हा मूर्तिपूजेच्या प्रश्नासतव मौल्वी मंडळ नेमतील, आणि त्यांनी मूर्तिपूजा मुसलमानी धर्माविरुद्ध आहे असे मत देताच वरील पंजाबी गाऱ्हाणे खरे आहे असे मानून वाद्येच नव्हेत तर मूर्तींच्या मिरवणूकीच,—आणि मशिदीसमोर नव्हे तर मुसलमानांच्या दुकानासमोर, शेजारी पुढे, मागे, वर, खाली बंद ठेवणे हेच अेकीच्या दृष्टीने हितावह आहे 'वाद्यांच्या विषयीच नव्हे तर मूर्तिपूजा सोडून देण्याविषयीही आपल्या परम प्रिय मुसलमान बंधूंच्या भावना हिंदु विचारात घेतील'—असा ठराव पुढील राष्ट्रीय सभा संमत करील अशी आम्ही अुत्कट आशा करितो

वाद्यबंदीची मागणी राष्ट्रीय सभेने विचारात घेतलीच आहे आता या वर्षी मूर्तिपूजा बंदीची मागणी तिने विचारात घेअून मान्य करावी की, पुढील वर्षी मुंजबंदीची मागणी, मुंज ही मुसलमान धर्मविरुद्ध आहे याच सर्वमान्य आणि राष्ट्रीय सभा-संमत तत्त्वाचे आधारावर पुढे करता येअील असे अेक अेक करून आपण हिंदुमुसलमानात दुही माजविण्याचे सर्व प्रश्न हळूहळू सोडवून हिंदूंना मुसलमानच करून टाकू आणि राष्ट्रीय हित साधल्याचे महत्तम पुण्य शीघ्रच गाठी बांधू शकू

युरोपियन मुलीशी हिंदूचीं लग्नें होणें हें काही नवीन नाही. तीं पूर्वीही होतच होती हें अमेरिकेपासून रशियापर्यंत पसरलेल्या प्रत्येक राजधानीतील हिंदी वसतीत डोकावताच दिसून येअील. पण आजपर्यंत हिंदूचें युरोपिअन मुलीशी लग्न लागताच मुलगी घरी येण्याचे स्थली मुलगाच घरास पारखा होऊन ख्रिश्चन होअी आणि मुलगीच्या घरी जाअी. आता तसे न होता युरोपिअन मुलीच हिंदु होऊन आमच्या मुलाच्या घरी नांदण्यास येत आहेत. पूर्वी वायबलामागे हिंदु मुलें धावत. आता आमच्या '.पुराणा 'मागे नवीनांतील ' नवीन ' ख्रिस्ती मुली धावत आहेत. म्हणतात ना दोन दिवस सासूचे, दोन दिवस सुनेचे ! चाललेंच आहे ! चागलेच आहे.

\+ \+ \+

सध्या हिंदुस्थानातील अिंग्रजी थोर पुरुषाच्या पुतळ्यावर साडेसाती आल्या-सारखेंच दिसते. पंजावातील लॉरेन्सचा पुतळा हलविण्यासाठी प्रथमतः स्त्रीपुरुष मुलासह सर्व लाहोर नगराने तिथे जमावें —नुसतें जमावें, म्हणून गांधीजींनी त्यांच्या शेकडो सत्याच्या प्रयोगापैकी अेक प्रयोग करताना आज्ञा सोडली होती. पण पुतळा हलविण्यापेक्षाही अुभें लाहोर हलविणें अर्यातच जड गेलें. अितक्यात कोणाच्या डोक्यात काय कल्पना घुसली अीश्वर जाणे—त्याने रातोरात जाअून त्या पुतळ्याच्या हातातील तलवारच मोडून टाकली. सरकारने लगेच त्या पुतळ्या-वर लाजेचा पडदा सोडला. वादविषयक थुर्मटपणाचीं वाक्यें त्या पुतळ्यावरून खोडून टाकलीं आणि तें प्रकरण विझलें. सगळें लाहोर हलून जें साधावयाचें होतें तें अेक मनुष्य हलून साधले गेलें. पुढे नीलच्या पुतळ्यावरून मद्रासला राग आला. पण तिथे दगडी पुतळ्यास धण किंवा दगड मारणे—दगडास दगड मारणे ! —ही हिंसा कीं अहिंसा हा अत्यंत गभीर प्रश्न उत्पन्न होअून, शेवटी चिखल मारण्यास हरकत नाही असे ठरले आणि त्या चिखलातच तो प्रश्न अजून रुतून बसलेला आहे. तोंच—,

तोंच अिकडे मुंबअीची तार आली की, मुंबअीच्या व्हिक्टोरिया राणीच्या पुतळ्याच्या हातातील राजदंड मोडून त्यास कोणी तरी मनुष्याने विद्रूप केलेले आहे !

अेकाअेकी राजदंडालाच हात घातला ह्या मुंबअीच्या माणसाने ! लाहोर-सारखे काही मुंबअीची मुंबअी हलवून स्त्रिया पुरुष मुलांसह तिथे जाण्याचा बेत केला नाही की, अहिंसेच्या चिखलात मअू गोळे वळीत बसला नाही. विक्षिप्त कुठला ! नसती कुलंगडी अुपस्थित करण्यास मिळते तरी काय या लोकाना ?

अशा अचव्यात शहाणे लोक चिंतातुर झालेले आहेत, तोंच डोके असलेल्या पोलिसास तो पुतळा विद्रूप कसा झाला याची कल्पना आली आणि त्याने प्रसिद्ध

केल की, ' पुतळयाच्या हातातील तो राजदड रस्ते धुणाऱ्या नोकराच्या पाण्याच्या ववातील फवाऱ्यासरशी निसटून पडला अगदी सहज अपघाताची गोष्ट दुसर काही नाही ' तथास्तु ! दुसरे काही नसले म्हणजे सगळयासच वरे

कारण मागेही अेकदा याच पुतळयाची हालअपेष्टा झालेली होती किवहुना अिंग्रजी पुतळयाची अशी सभावना करण्याचा मूद, प्रथम या पुतळयास जे पचवात तीस वर्षांमागे विद्रूप करण्यात आले होत तेव्हापासूनच, हिंदुस्थानात निघाला आह

महाराणी व्हिक्टोरियाच्या अुत्सवाचा तो दुसरा दिवस होता अगदी अचूक त्याच दिवशी या त्या विख्यात राणीच्या पुतळयास पहारा चुकवून कोणा धाडसा मनुष्याने त्या अुत्सवाच्या गुलाबी रगाचा वरग करण्यासाठी डावराचा रग फासून त्याचे गळयात पादत्राणाची फाटकी माळ घातली होती ! पुढे तो डाबराचा रग काढून पुतळा नीट करावयास हजारो रुपये व्यय करावे लागल ज्या धाडसी मनुष्यान ह कृत्य कल त्याचे नाव पुढे सर्वतोमुखी झाले पुण्यात प्लेगचे दिवसात रँड साहेबास मारणाऱ्या चाफकर वधूनीच ह्या पुतळयाची ही विटवना केली होती अस मागून सिद्ध झाल

या मागच्या अितिहासानेच ह्या पुतळयास पुन्हा विद्रूप केल्याच्या बातमास थाडेस महत्त्व आलेल होत नाही तर कोण विचारतो, दगडी पुतळयाच्या हातातील राजदडास !

पण पाण्याच्या फवा याने तो राजदड निसटून पडला, ह सोप आणि अुभय पक्षासही सोयीस्कर अस स्पष्टीकरण तत्काळ झाल्यान वरे झाले

पण तो राजदड पडला तर सापडला कसा नाही ? पाण्याच्या फवाऱ्या वरोवर जो अुडाला तो अजूनही वर अुडतच चालला आह ? आणि तो नोकर पळून गेला म्हणतात तो का आणि दुसऱ्या हातातील ' भूगोल ' (orb) विच्छिन्न झाल्याचे जे छापले आहे तो गोळाही पाण्यानेच भगला की काय ?

पण हे प्रश्न दुय्यम आहेत त्याचे समाधानकारक अुत्तर केव्हाही देता येअील आता सावधानता अितकी ठेवली पाहिजे की, हा राजदड पाण्याच्या फवाऱ्यासरशी अुडाला या स्पष्टीकरणाचे अगदी दृढीकरण करीत राहिले पाहिजे आणि यापुढे प्रसगी पाण्याच्या फवाऱ्यासरशी वाहून जातील असे कच्चे राजदड हाती न देता त्या पुतळयाच्या हाती पक्के राजदड दिले जावत कारण पुतळयाच हातातील का होईना, पण राजदड गळून पडावेन ह भोळसट लोकास अशुभ चिन्हस वाटत म्हणून जपावयाचे, दुसरे काय ?

# (१२)

## संपूर्ण राजकीय स्वातंत्र्य ह्या शब्दांनी चिडलेले गांधीजी नि अिंग्रज

राष्ट्रीय सभेने हिंदुस्थानचे ध्येय 'संपूर्ण राजकीय स्वातंत्र्य' हेच होय, स्वराज्य शब्दाचा हाच खरा अर्थ होय, असे गेल्या डिसेंबर महिन्यात मद्रासला घोषित केलें.

त्या वेळेस त्या 'स्वातंत्र्याच्या' ठरावाचा दोघा जणांना फार तिटकारा आला. दोघेजण त्या ठरावाला 'पोरकट, अशक्य, वेडगळ' म्हणून अगदी चिडल्यासारखे झाले. ते दोघेजण म्हणजे अेक अिंग्रज आणि दुसरा—दुसरा—दुसरा आमचे गांधीजी !!!

हिंदुस्थानने 'पूर्ण स्वातंत्र्य' हेंच राजकीय ध्येय ठरवावे याचा राग त्या दोघांपैकी अिंग्रजाला यावा हें साहजिकच आहे. अशा वेळी असे होतेंच.

अुदाहरणार्थ, परवाच मुंबअीतील अेका न्यायाधीशाने अेका धंदेवाअीक चोरा-विरुद्ध जेव्हा निकाल दिला की, त्याच्यापाशी धरलेली सर्व मत्ता ज्या सावाला लुबाडून त्याने घेतली होती त्या सावास देअून टाकावी. तेव्हा त्या चोरीचा प्रामा-णिकपणे व्यवसाय करणाऱ्या त्या चोरासही साहजिकच असाच राग आला ! तो म्हणाला देखील की, 'निढळाच्या घामाने मी ही मत्ता मिळविली होती. चोर लोकांच्या थोरवीचे गौरवार्थ जे म्हणतात अगदी तेच वर्णन माझ्या प्रयत्नालाही लागू आहे. त्या सावाची मत्ता काही माझ्या अुशाशी कोणी आणून ठेविली नव्हती; तर सातव्या मजल्यावर तो साव निजला असता मी आपल्या बाहुबलाने त्या भयंकर अुच्चतेवर चढून गेलो.

*The height that I too reached and kept !*
Was not attained by a sudden flight !!
*But I while honest men had slept !*
Was toiling upwards in the night !!!

जर त्या चोरास तसा राग येणे साहजिकच होतें, तर अिंग्रजासही स्वातं-त्र्याच्या ठरावाचा असा राग येणे साहजिकच नव्हे काय ? तेही सहजच म्हणतात की, 'आमच्या बापजाद्यांनी हे हिंदी साम्राज्य निढळाच्या घामाने मिळविले आहे, सातारचे, झाशीचे, लाहोरचे, पुण्याचे, अयोध्येचे—अेक का दोन ! अितके मुकुट, सिंहासने, रत्नें, माणके, रुपये—अहो नुसते अुचलून कोठारात भरावयाचे असते तरी भीमासारखा हमाल देखील थकला असता ! मग आम्ही तर ती सर्व अुचल

आमच्या वाहुबलाने प्रथम लुटून मग अुचलून घेतरी आहे ! अितकच नव्हे तर या राजकीय लुटीला आणि अुचलीला आता आम्ही साम्राज्य हे नाव देखील देअून चुकला आहोत लुटीला 'साम्राज्य' म्हणून म्हटल्यानतर देखील का ती ज्याची त्याला परत मिळण्याचा अधिकार अुरतो ! पण आता चार पिढ्या लोटल्यानतर त्या साम्राज्यावर तुम्ही तुमचा अधिकार सागता ! केवढा अन्याय ! आम्ही आपल लक्ष देत नाही म्हणून, नाही तर १२१ चा आकडा माहीत आहे ना ? तो १२१ चा आकडा ! असला तर सरळ, नाही तर काळाच्या गळयासारखा वाकडा! हें विसरू नका !'

स्वातन्त्र्याच्या ठरावाची अशी अगदी चीड ज्या दोघाना – अिंग्रजाला आणि गाधींना – आली त्यापैकी अिंग्रजाला चीड यणे साहजिकच आहे हे बहुतेकास समजतच असेल पण महात्मा गाधींना – हिंदुस्थानच्या पोटा आलेल्या, या अेका वर्षात स्वराज्य मिळवू निघालेल्या महान देशभक्तास, हिंदुस्थानने अिंग्रजाच्या पारतन्त्र्यास झुगारून देण्याचा निश्चय करिताच अवढी चीड का यावी याच पुष्कळास कोडे पडल आहे त्याच्या भक्तास देखील ते कोडे अुलगडत नाही त्यापैकी दोघे तिघेजण परवा आजूबाजूस कोणी नाही अस पाहून आपसात कुजबुजत होते 'हे यस काय की बुवा ? स्वातत्र्य हा सर्व राष्ट्राचा, व्यक्तीचा, जसा जीवन तसा निसर्गसिद्ध अधिकार आहे अिंग्रजी सत्तेस सैतानी म्हणणाऱ्या या न्यायपरायण गाधीजींना स्वातत्र्याचा ठराव आवडू नये हे यस ! हे त्याच्या पूर्वचरित्रास अगदी विसगत दिसत खरे !'

परतु या कोड्याची किल्ली या पूर्वचरित्रातच सापडणार आहे हे त्याच्या या सहा सात वर्षाच्या आतच झालेल्या परिचित मडळीस ठाअुक नाही म्हणून तर त्याची ही फसगत झाली आहे गाधीजींचे पूर्व चरित्रच नव्हे तर प्रस्तुत चरित्रही या विसगततेच्या सूत्राने अगदी सुसगतपणे ग्रथिलेले आहे आणि तही त्यानी स्वत च ! आपल्या आत्मचरित्रात ते काय म्हणतात पहा !

झुलू लोकाशी अिंग्लिशाची कटकट चालू झाली झुलूनी हिंदुस्थानचे काही अेक घोडे मारले नव्हते अिंग्लिशाचे देखील त्यानी काय बुडविले होते हेही गाधीजीस कळत नव्हते किंबहुना त्या झुलूच्या रानटी स्वातन्त्र्यास हिरावून त्यास ब्रिटिशाच्या नखाचा धाक बसविण्यासाठी अिंग्रजानीच खाजवून खरूज काढिली असे सर्व जगाला कळत होते ! पण अिंग्रजानी झुलूवर स्वारी केली अिंग्रज हिंदुस्थानचे राजे, गाधी हिंदुस्थानचे अक सुपुत्र–अर्थात ते अिंग्रजाची प्रजा, तव्हा अिंग्रजानी स्वारी केली तर गाधींना त्या आपल्या आवडत्या साम्राज्याच्या आज्ञेस पाळण्याचा प्रजाधर्म साभाळलाच पाहिजे ! ते त्या स्वारीबरोबर अिंग्रजाचे वताने स्वयसेवक होअून गेले झुलूना पकडून क्रौर्याने अिंग्रज मारीत चालले हे ते पाहून

होते झुलूंचे स्वातंत्र्य अिंग्रज हरण करीत आहेत हें ढळढळीत दिसत होतें. पण दयार्द्र गांधीजींनी झुलूविरुद्ध अिंग्रजी सैन्यात स्वयंसेवा करण्याच्या कार्याचे त्यागपत्र दिले नाही ! अिंग्रजी राज्याविषयी त्यांचे मनात जी कळकळ वाटे, तिला झुलूंच्या कत्तलींनी दयेचा पाझर फुटेना हा सत्याचा अेक प्रयोग झाला

बोअर युद्धाची गोष्ट तर बोलावयासच नको. त्या शूर राष्ट्राचे स्वातंत्र्य हरण करण्यास निघालेल्या अिंग्रजी सैन्यात हे हिंदुस्थानचे सुपुत्र, स्वत चे स्वातंत्र्य गमावून बसलेले प्रामाणिक आणि अुपजत दास स्वयंसेवक बनून वळे वळे अिंग्रजी सैन्यात शिरले ! अेक दोघे नव्हत तर आणखी पाच पन्नास लोकास अेकत्र करून ! अुभे जगत् बोअराच्या स्वातंत्र्य युद्धातील पराजयाने हळहळले आणि अिंग्रजाच्या विजयाला धिक्कारू लागले पण बोअराच्या स्वातंत्र्याची हत्या करण्याच्या पवित्र कार्यात ज्याचे हात लाल रगले होते त्यास अिंग्रजानी पारितोषके वाटली, तेंव्हा गांधीजींनाही अेक मिळाले आणि ते पदक—तो प्रामाणिक आणि लोचट दास्याचा पट्टा त्यांनी अभिमानानें आपल्या गळयात घालून घेतला. हा झाला सत्याचा दुसरा प्रयोग.

तरी पण ह्र स्वत चे स्वातंत्र्य बुडवून मग दुसऱ्याचे स्वातंत्र्य, त्या स्वत चे स्वातंत्र्य बुडविणाऱ्या निसयाचेसाठी, बुडवीत जगभर हिंडत फिरणारे ' सत्याचे प्रयोग ' तिकडे सुदूर आफ्रिकेत चालले होते प्रत्यक्ष हिंदुस्थानास त्या सत्याची रुस टोचावयाची अुरली होती तेन्हा परमकारुणिकपणे सत्याचा तोही प्रयोग प्रत्यक्ष हिंदुस्थानातच करावा म्हणून गेल्या महायुद्धाचे वेळी अिंग्रजाच्या साम्राज्यास—म्हणजेच हिंदुस्थानच्या पारतंत्र्यास—प्रामाणिक लतकोडगेपणाने आपली निष्ठा विकलेल्या या अप्रामाणिक मूर्खतेचे प्रदर्शन हिंदुस्थानातही चालू झाले त्या महायुद्धाचे सुवर्णसंधीस लोकमान्याचा राष्ट्रीय पक्ष काय तितके हिंदी अधिकार अिंग्रजाचे हातून हिसकावण्यासाठी अिकडे पटांगणात बुद्धिबळाचे डावपेच खेळत होता, तर तिकडे तो अभिनव भारतीय क्रांतिपक्ष सर्व अधिकाराचे अधिष्ठान असलेला राजदंडच अिंग्रजाचे हातून छिनावून घेण्यासाठी प्राण पणास लावून ' शक्तीने मिळती राज्ये ' म्हणून गर्जत, वैठे डाव अुधळून देअून, रणांगणात घुसत होता, त्याच वेळेस गांधीजी आपल्या ' सत्याचे प्रयोगात ' अथवा आत्मवृत्तात लिहितात की, ' त्या वेळेस या जर्मन महायुद्धात माझे कर्तव्य काय आहे हा प्रश्न माझ्या समोर अुभा राहिला विस्तक हिंदी लोक म्हणत त्याप्रमाणे अिंग्रज आपले बलात्कारी धनी, आपण दास, त्याचा आमचा हा संबंध असल्याने त्याच्यावरील संकटाचा अुपयोग आपण आपल्या मुक्तीकडे करावा हा अुद्देश माझ्या गळयात तेंव्हा कसा अुतरू शकणार होता ! कारण मला माझी स्थिति अगदी दासासारखी वाटतच नव्हती. माझी धारणा ही की, दोष अिंग्रजी राज्यपद्धतीत आहे आणि अधिकृत.

अिंग्रजी अधिकाऱ्यात आहेत हे दोष आम्ही प्रेमाने दूर करू शकू. राज्यपद्धति सदोष वाटे, पण ती आज जशी असह्य वाटते तशी तेव्हा वाटत नसे परंतु आज या पद्धतीवरचा माझा विश्वास जितका अुडाला आहे तितकाच ज्याचा त्या वेळेसच अुडाला होता, ते त्या संकटात अिंग्रजाच्या हातून शक्य ते अधिकार हिसकावण्याच्या मार्गास लागले. ते अिंग्रजास साह्य वमले देणार ! पण मला अधिकार छिनण्याचे, तर वाजूसच राहो पण अधिकार मागण्याचेही धोरण अशा अिंग्लंडवरील संकटाचे वेळी असभ्य आणि अदूरदृष्टीचे वाटले आणि अिंग्रजास अुलट विनअट साह्य देणे हे आपले श्रेष्ठ कर्तव्य होय असं मी निश्चित केले ' ' या दूरदृष्टीच्या आणि सभ्य कर्तव्याचे पूर्तीसाठी ' गांधीजींनी प्रथम ८० अेक लोक जमवून त्या युद्धात स्वयंसेवा करण्याची परवानगी मिळविण्यासाठी अर्जावर अर्ज करण्यास आरंभ केला. पण शेवटी कुशाग्रबुद्धि अिंग्रजी राजकारणास त्या कोटयवधि लोकांच्या घुमाळीत ह्या मूठभर बापडयाची स्वयंसेवा दर्यात खसखस वाटून त्यांचा अुपयोग त्यापेक्षा हिंदुस्थानातील लोकमान्यांच्या राष्ट्रीय पक्षाचे डावपेच हाणून पाडण्यात अधिक होअील असे तत्काल दिसून येअून या ' दीर्घ ' आणि ' सभ्य ' अिंग्रजी राजनिष्ठास हिंदुस्थानकडेच त्यांनी वळविले आणिले अहिंसात्मक सभ्य सत्याने पुढे अिकडे मांडलेले थेर प्रसिद्धच आहेत जर्मनास सशस्त्र युद्धात ठार मारण्यासाठी हिंदुस्थानातल्या बिचाऱ्या शेतकरी लोकास सेनेच्या कत्तलखान्यात धाडण्यास हीच अहिंसा अिंग्रजांची ' स्वयंसेवक रिक्रूटिंग ऑफिसर ' झाली होती ! जुने नीतिशास्त्रज्ञ कधी कधी लिहितात ' धर्मासाठी केलेली हिंसा हिंसाच नसते सज्जनांचे रक्षणार्थ करावी लागणारी हिंसा अहिंसाच असते ' जुनी व्याख्या चुकीची आहे, निरपवाद अहिंसाच खरी अहिंसा असे म्हणणारे महंत त्या निरपवाद अहिंसेची सक्रिय व्याख्या अशी करितातसे दिसते की, अिंग्रजाच्या साम्राज्यासाठी जी हिंसा ती हिंसाच नव्हे ! जर्मन, झुलू, बोअर वाटेल तो जो अिंग्रजाच्या साम्राज्याविरुद्ध लढत असेल, त्याची हिंसा करण्यासाठी ' रगरूट ' भरती करण्याच्या निरपवाद अहिंसेच्या ' सभ्य ' कार्यक्रमात हिंसा संमत आहे !

गेल्या महायुद्धात गांधीजींनी राष्ट्रीय पक्षाच्या अडचणुकीच्या राजकारणास शक्य तो खो घालण्यास झटून त्यात थोडे यश मिळविले लोकमान्यांचे कार्यातच ते थोडाबहुत खो घालू शकतील अितकीच अिंग्रजाची अपेक्षा होती कारण क्रांतिकारक महात्माजींच्या अहिंसात्मक ' सभ्य ' ' दूरदृष्टीस ' कवडीच्याही अुधारीने विचारीत नाहीत हे सरकार जाणूनच होते

गांधीजींच्या आत्मचरित्रातील वरील अुताऱ्यावरून त्यांनी मद्रासच्या राष्ट्रीय सभेने संमत केलेल्या स्वातंत्र्याच्या ठरावाने चिडून जावे हे किती साहजिक आहे हे कोणासही समजून येअील त्यांचे पूर्ववृत्त आणि ' पहाडी चुकया 'ची परंपरा ज्यास माहीत नाही, त्यास च त्याचे आश्चर्य वाटेल तर वाटो

गेल्या महायुद्धात त्यास जी ' सम्य ' अहिंसात्मक ' दूरदृष्टीची ' धोरणे आणि तत्त्व वाटली ती त्यानी त्याच अुताऱ्यात आज मला तशी वाटत नाहीत म्हणून म्हटले आहे म्हणजे त्या वेळेस जे लोक त्यास त्याची धोरणे आणि वृत्ति चुकीची आहे म्हणून म्हणत, तेच बरोबर होते हे त्यानी मान्य केले आहे त्या लोकास जे वीसपचवीस वर्षांपूर्वी स्पष्ट दिसले त गांधीजीच्या ' दूरदृष्टीस ' आज अंधुकपणे दिसत आहे. अितकी त्याची राजकारणी ' दूरदृष्टि ' अदूरदर्शी असते ! त्याच्या जुन्या सत्याचे अनंत प्रयोगात ' जर कोणचे अेखादे सत्य सिद्ध झाले असेल, तर त हेच होय की त्याना सत्य म्हणून जे जे वाटल त त बहुश असत्य असत प्रयोग करण्यास लागणारी चिकित्सक दृष्टि आणि वृत्ति त्याच्यात वसतच नाही आज ज ' सत्य ' म्हणून ते मानतात त्यासच अुद्या अेक ' पहाडी चूक ' म्हणून तेच संबोधितात कालचं त्रिकालाबाधित सत्य आज ' पहाडी चूक ' होत, आजच सत्य अुद्या पहाडी चूक होत—अुद्याचे सत्य परवा पहाडी चूक ठरत—परवाचे तरवा असा हा क्रम अव्याहत चालू आहे

या परंपरेने पाहिले असता मद्रासच्या स्वातंत्र्याच्या ठरावास पोरकट आणि अदूरदर्शी म्हणून आज जे गांधी म्हणतात, तच अुद्या त्याच्या या अुद्गारासच ' पोरकट ' म्हणून ही अेक Himalayan mistake होता म्हणून ठरविण्यास बहुश पुढे येतील—पण त आणखी काही वर्षे अुलटल्यावर ! जे जगाला आज दिसत त त्याना दहावीस वर्षांनी दिसत ! दूरदृष्टि ! दूर गेल्यावर मागचं दिसणारी दृष्टि !

पण हजार वेळा अनुभवास आलेली ही गोष्ट आज पुन अेकदा सागण्याचं कटाळवाणे कर्तव्य करून टाकण्याचे मुख्य कारण हे की, त्याच्या काही अनुयायास स्वातंत्र्याच्या ठरावाला त्यानी केलेला विरोध पाहून अजूनही विचकल्यासारखे, बावरल्यासारखे होत आहे, त न व्हाव ज्याला ज्या सत्याची माहिती झालेली नाही, तो त्या विषयातील अज्ञ मनुष्य त्या सत्याचे प्रयोग करीत बसतो हे ठीकच, पण स्वातंत्र्य हे राष्ट्राचे, व्यक्तीचे जसे जीवन, तशी अुपजत पूर्वार्जित, अहरणीय मत्ता आहे हे राजकीय सत्य ज्याना सूर्यासारखं ढळढळीतपण दिसत आहे, त्यानी याविषयी आणखी प्रयोग ते काय करायचे ! पचवीस वर्षांपूर्वी जी राजकीय सत्ये अभिनव भारतास दिसली, ती आज गांधीजींना दिसत आहेत ! त्यात त्याचा अितकासा दोष नाही परंतु राजकारणात काय किंवा धर्मकारणात काय, पण त्याची दूरदृष्टि अितकी अदूरदर्शी असते प्रत्यही त्याच्या हातून त्यानाच अुद्या तिरस्करणीय वाटणाऱ्या घोडचुका घडतात, हें त्याच्या आत्मवृत्तातील सत्याच्या प्रयोगशाळेत पदोपदी अुघडकीस येत असता पुन त्याच्या त्या अद्यतमसावृत्ता दृष्टीलाच आपली राष्ट्रीय प्रगतीच्या मार्गातील यष्टि करू पाहणाऱ्या भाळ्या लोकाचाच हा दोष होय अंध नेत्याचा जितका दोष तितकाच अंधेनैव नीयमानाचाही असतोच

पण सुदैवाने आणि अशा वारंवार केलेल्या निर्भीड दोषाविष्करणानेच आज त्या दोषाच्या रोगापासून हे हिंदी राष्ट्र बहुतेक मुक्त होत चालले आहे ही आनंदाची गोष्ट आहे. हिंदुस्थानचें ध्येय पूर्ण स्वातंत्र्यच ! हे महात्माजींना जरी आणि अिंग्रजांना जरी आवडले नाही, तरी त्यापैकी पहिल्यांच्या निर्जीव शापांची किंवा दुसऱ्यांच्या मारक चापाची चिंता न करिता अुभे भारत त्या स्वतंत्रता-भगवतीच्या चरणावरच आपली अढळ निष्ठा अर्पण करावयास येत आहे ! ती केरळ प्रांतीय परिषद आणि तिचे अध्यक्ष पं. जवाहरलाल नेहरू यांचें भाषण पहा. ती कर्नाटक परिषद आणि तिचे अध्यक्ष नरिमन यांचे भाषण पहा. ती महाराष्ट्र परिषद आति तिचे अध्यक्ष सुभाष बाबूचे भाषण पहा. जिकडे तिकडे स्वातंत्र्य-लक्ष्मीचा जयजयकार चालला आहे ! स्वातंत्र्यलक्ष्मीच्या नगाऱ्याची घाअी तेथे अिंग्रजी साम्राज्यावरील लतकोडग्या निष्ठे ! तुझ्या टिमकीचे काअी !

स्वातंत्र्यलक्ष्मीच्या जयनादाने मागेही अेकदा या भारतभूमीच्या देवालयाचा हा सभामंडप नसला, तरी तिचा तो गाभारा, असाच दुमदुमून गेलेला होता ! ती गर्जना—अभिनव भारताची गर्जना—गाभाऱ्यातून निघून आज सभामंडप दुमदुमवीत आहे अुतम ! पण—पण—

पण अजून अेक मोठा फरक अुरला आहे. अेक मोठीच अुणीव भरून काढा-वयाची आहे ! तुम्ही सर्वांनी ' स्वातंत्र्य ' हेंच ध्येय म्हणून ठराव केलेत. साध्य ठरविलेत पण हे महाराष्ट्र—कर्नाटक—केरळ—वंगा !—हे भारता, नुसता साध्याचा ठराव केलास ! पण साधनाचे नाव देखील तेथे कोणी का बरें काढिलें नाही ?

स्वतंत्रता लक्ष्मीच्या पूजेची साधनें तिच्या गाभाऱ्यात जोवर जमलीं नाहीत, कोणी ती जमविण्याचा चकार शब्द काढिला नाही, तोवर नुसत्या सभामंडपात तिच्या चालणाऱ्या या पारोशा आणि रिकाम्या जयघोषानी तिचा अुत्सव साजरा कसा होणार ! पूजेवाचून, होमावाचून ती देवी कशी प्रसन्न होणार ?

म्हणून सावधान ! साधनाचा अेकही ठराव झाला नाही—म्हणून सावधान! नाही तर पुन: भलतेंच साधन, भलताच मनुष्य योजू लागेल. ती लतकोडगी अहिंसा, तें परधार्जिणे प्रेम, तो स्वपक्षघातकी—न्यायपक्षघातकी—नि.पक्षपात—ज्यांनी ज्यांनी गेल्या महायुद्धात सभ्यतेच्या आणि न्यायाच्या सोंगाखाली अन्यायापुढे धूप जाळले, ते ते सर्व आज अुद्याच्या अेखाद्या नव्या सुवर्णसंधीत पुन: तसलींच खुळें अुभारण्यास कमी करणार नाहीत. म्हणून तर त्याची ही सारखी झडती घ्यावयाची ! 'आणि चेतावणी द्यावयाची की—

साध्याचा ठराव झाला पण आता साधनाचें काय ते बोला ! कारण मुख्य गोम ती तेथेच आहे !

नाही म्हणावयास अेवढे पजावने मात्र साधनाचे अधुक दिग्दर्शन केले 'पूर्ण स्वातंत्र्य हच आमचं ध्येय आणि त्याम जें प्राप्त करून दण्यास दायत हाओील त आमचे साधन !'

सकल्प ठीक सुटला देवालयाच्या सभामडपात अितक झाले तरी पुरे आहे पण आता त्या गाभाऱ्यात चला मुख्य पूजेच साहित्य तेथे हवे पण तथे अजून अेकही फूल, अेकही समिधा, हुताशनाची अेकही पटलेली ठिणगी दिसत नाही !

—ता २८ जून १९२८

\+ \+ \+

## (१३)
## हुतात्मा अंदमानात मेले का नाहीत ?

याही दिवसापूर्वी आम्हास अेकाने सागितले की, हिंदुसघटनावर सदोदित शिव्याशापाची वृष्टि करून आपल्या हिंदुत्वाचे साधक करणाऱ्या डॉ मुजे केळकर यांच्या सघटन चळवळी देशद्रोही आहेत म्हणून समजणाऱ्या सिंध प्रात मुसलमानास आदण देअून टाकावा म्हणून तरवारलेल्या, कोणाअेका कानपूरच्या वीर पुरुषाने 'श्रद्धानदा'च्या सपादकास, स्वातंत्र्याच्या ठरावास विरोध केला म्हणून 'श्रद्धानदा ने त्या विरोधकावर केलेल्या टीकेने चिडून, विचारले आहे की, 'हुतात्मा' म्हणविणाऱ्यानी क्षमा कशी मागितली—ते तुरुगात मरणी मरून का मेले नाहीत ? नव्हे त्यानी सरकारला अर्ज तरी का केले ?

वास्तविक पाहता 'श्रद्धानद'च्या सपादकाने बदिगृहातून सुटण्यासाठी सरकारास अजविज कधीही केले नाहीत—मग क्षमेची गोष्ट तर दूरच म्हणून आम्हास प्रथम वाटले की, 'श्रद्धानदा'च्या सपादकाच्या नावाचा जितर कोण्या तरी थोर हुतात्म्याच्या नावाशी घोटाळा होअून आपली ही चूक झाली आहे असे त्या कानपूरच्या वीरपुगवास कळवावे

परतु पुन वाटले की, ज्या अर्थी त्याने अगदी हुतात्मा असे स्पष्ट लिहून त्यास क्षमा का मागितली म्हणून हडसून विचारिले आहे त्या अर्थी ही अगदी चूकच नसावी हुतात्मा म्हणून देशात ज्यास आज गौरविले जाते त्याच्यात कोणीही क्षमा मागितल्याचे आम्हास माहीत नाही हा, अेक गोष्ट मात्र प्रसिद्धच आहे की, पजाबपासून पाँडेचरीपर्यंत आणि सिंधपासून बगालपर्यंत शेकडो क्रांतिकारक—की ज्यानी आपले शिर आपल्या हातात घेअून आणि घरच्या ससारास आग लावून

स्वदेशाच्या संसारास थाटण्यासाठी राष्ट्रस्वातंत्र्यलक्ष्मीच्या जयजयकारात मृत्यूच्या खिंडीत 'मारिता मारिता' प्रवेश केला आणि त्या रणधुमाळीत आहत होऊन पाडाव झाल्यावर आणि वर्षानुवर्षे भयंकर छळ सोशिल्यावर पुनः देशसेवा करता यावी म्हणून थोडे दिवस झुज सोडण्याची विपक्षाची अट मान्य करून त्याचे हातून मुक्तता करून घेतली, त्यांसच हुतात्मे म्हणून संबोधिलें असेल – आणि त्यांच्या या अटीसच जर क्षमायाचना म्हटले असेल तर ?

तर काय ? असल्या हुतात्म्यांस की, ज्यांच्या साहसाच्या, स्वार्थत्यागाच्या आणि व्रतनिष्ठेच्या पराक्रमाने शत्रूंनी देखील दिपून जावें – त्यांस ललकारीत तू कारागारात मरून कां गेला नाहीस ? म्हणून हटकणारा अेवढा वीर पुरुष असावा तरी कोण – आणि असले वीर कानपूरला जिवंत असता तेथून दोन हातांवर असलेला ब्रिटिश कमांडर-अिन-चीफ अजून जसाचा तसा राहिला तरी कसा याचें आम्हांस सभय आश्चर्य वाटून आम्ही क्षणभर स्तंभित होअून राहिलो !

शिवाजीला देखील शत्रूच्या हातात पडला असता तुरुंगात 'मरणी मरून जाण्याचें' हें आत्महत्यारी शौर्य करवलें नाही. त्याने अर्जांची भेंडोळी तर किती धाडिलीं असतील याची गणतीच नाही. त्याने औरंगजेबाच्या पायाशी विनम्र विनंती केली, त्याने औरंगजेबाच्या हातावर तुरी दिल्या आणि त्याने औरंगजेबाच्या छातीवर हिंदुपदपादशाहीच्या सिंहासनाचा पाय दिला ! पण तो भित्रा दिल्लीच्या त्या कारागारात अन्न सोडून सत्याग्रह करीत मरणी मेला नाही. त्यास तें धाडसच झालें नाही. औरंगजेब जें साधू शकला नाही, तें स्वतः मरून त्यास साधून देण्याचें शहाणपण शिवाजीत कुठलें ! अफजुलखानापुढे तर तो हात जोडून गेला – ज्या हातांत वाघनखें होतीं ते हात जोडून ! त्या कपटाचा अधिक धिक्कार करावा की त्या हात जोडणाऱ्या भ्याडपणाचा हेंच समजत नाही! अहिंसेचीं कंकणें हाती भरून, सत्याच्या नांवाने आपल्या सेना कुठे कशा दवलेल्या आहेत तों सर्व ठावठिकाणें अफजुलखानाला सांगत अफजुलखानाच्या मार्गात आडवें पडून अुपास करीत त्याने सत्याग्रह कां केला नाही, असें शिवाजीसही पुन्हा हटकलें जातें की काय म्हणून आम्हांस शंकाविव्हल भय वाटू लागलें की, शिवाजीने डोक्यावर गांधी टोपी घातली असती, तर किती बरें होतें – शौर्याची ही अपूर्व कल्पना आणि धृति सुचविणारी अचाट बुद्धिमत्ता त्या टोपीत अुबलेल्या डोक्यावाचून कोणा अितर डोक्यात अुपजणार आहे ? कारण शिवाजीला आणि प्रतापाला मी त्यांचे काळात असतो, तर हिंसात्मक सशस्त्र क्रांतीविषयी दोषीच ठरविलें असतें, असें जर्मनांस अिंग्रजासाठी मारणाऱ्या अहिंसेने अलीकडेच प्रसिद्धपणे सांगितलेच होतें ! 'यंग अिंडिया'चे वाचकांस हें माहीत असलेंच पाहिजे.

पण भूतकाळाच्या कोठारात दडून बसल्यामुळे शिवाजी जरी सुटला, तरी आजकाल स्वातंत्र्ययुद्धातील पुरस्सर वीरपक्षाचा मान ज्या क्रांतिकारकास मिळाला आहे, त्या पथकात ज्याला The Morning Star of Indian Independence म्हणून सरोजिनींनी गौरवावे आणि The Prince of Indian revolutionists म्हणून शत्रूनीही सबोधावे त्या ' हुतात्म्या 'पासून तो वाल्च्या काकोरीच्या देशवीर रामप्रसाद, बिसमिल, सन्यालादिक मारणाऱ्या, फाशीवर मेलेल्या किंवा जिवत फाशीवर—जन्मठेपीवर—लटकत असणाऱ्या क्रांतिकारक हुतात्म्यापर्यंत सर्वांनीच सरकारास अर्ज केले आहेत फाशी रद्द करा म्हणून अिंग्रजाच्या राजास दयेचे अर्ज देखील सत्यद्रापासून तो काकोरीच्या रामप्रसादादिक हुतात्म्यापर्यंत सर्वांनी केले आहेत पण त्यास आजवर हे अर्ज करण्यापेक्षा मरणी मरून का जात नाही म्हणून विचारणारा कोणी शहाणा भेटला नाही. पण आज त्या 'Prince of Indian Revolutionist ' ला देखील तसे हटकणारा मनु"र कानपुरास अुत्पन्न झाला आहे हे कळताच तो मनुष्यपुगव असल तरी कोण, दिसेल तरी कसा, त्याने असे अद्वितीय पराक्रम तरी कोणकोणते केले आहेत, या प्रश्नांनी सभय आश्चर्य वाटत आम्ही क्षणमात्र स्तभित होअून राहिलो !

वाटले की, 'को अेष सम्प्रति नव पुरुषावतारो, वीरो न यस्य भगवान् भृगुनंदनोऽपि ! '

ताच कलकत्त्याच्या प्रसिद्ध ' स्वतंत्र ' दैनिकाच्या ४ ऑगस्टच्या अंकात बातमी वाचली की, कानपूरच्या 'प्रताप नावाच्या पत्राचे गणेश शकर विद्यार्थी नामक कोणी सपादक आहेत त्यांनी सरकारी कोर्टाची मानहानि करण्याच्या अभियोगातून आपली सुटका करून घ्यावी म्हणून सपशेल क्षमा मागितली नुसत दु खदर्शन करून मुख्य न्यायाधीश सोडीना तेव्हा Unconditional apology—विनाअट क्षमा मागून सरकारी कोर्टाच्या दयेवर आपणास सोडवून घेअून, ' क्षमस्व ' म्हणून, सरकारची त्रिवार याचना केली—आणि सरकारचा सर्व व्यय भरून देअून आपली सुटका करून घेतली !

ही बातमी वाचताच तत्काल आम्हास वाटले की, होय रे होय ' हुतात्म्यास ' अर्ज करून बदीतून का सुटलेत, मरणी मेला का नाहीत, म्हणून हटकणारा तो ' नव पुरुषावतार ' तो कानपूरचा मनुष्यपुगव हा ' प्रताप ' सपादकच असला पाहिजे ! पुगवच तो ! आपली शिंग आणि ' केसरी ' ची नखाग्रे यातील भेद अनुभवावाचून त्यास कसा कळणार !

कारण हुतात्म्यास मला का नाहीस म्हणून म्हणण्याचे धाडस असल्या कोणातरी क्षुद्रात्म्यास च व्हावयाचे ! ! Fools rush where angels fear to tread

स्वदेशस्वातंत्र्यार्थ झुंजताना शत्रूचे फासात गळा अडकून प्राणावरच बेतली असता, त्याच कार्यात पुनः झुंजता यावें म्हणून शत्रूच्या हातून निसटण्यासाठी अेखाद्या काकोरीच्या क्रांतिकारकाने अिंग्रजांच्या राजास दयेची याचना करण्याचे पत्र टाकिले, तर त्यास हसण्याचें साहस तोन मनुष्यपुंगव करू शकेल की, जो प्राणांची तर गोष्टच दूर, पण अेखादें दुसरे वर्ष बदीत पडण्याचा क्षुद्र प्रसंगही येताच — राजाविरुद्ध सशस्त्र युद्ध पुकारण्याच्या भयंकर आरोपाच्या भीषण दंडाची गोष्ट दूरच, पण अेका सरकारी न्यायालयाचा अपमान करणारा अेक यःकश्चित् लेख लिहिल्याचा आरोप येताच — गडबडून जाअून विपक्षाचे पाय चाटू लागतो!

तरीही हे 'प्रताप' संपादक! 'हुतात्म्या'कडे ज्या मत्सराच्या अुलट्या दुर्बिणीतून पाहण्याचें धाडस तुम्ही केलेंत, त्याच दुर्बिणीने तुम्हांकडे पाहिलें असता तुम्ही किती आणि कसे 'क्षुद्रात्मे' दिसता हे तुम्हास दाखविण्यापुरताच हा त्या दुर्बिणीचा अुपयोग दुःखाने पण निरुपायाने आम्ही केला आहे.

आणि म्हणूनच तुमचा निरोप घेण्याचे आधी आता तो तुमची भुक्कड मत्सराने तडकलेली दुर्बीण बाजूस फेकून देअून आपणास सांगतो की, आपण कोर्टाच्या क्षमायाचनेत जें केलेत ती नीति त्या परिस्थितीत क्वचित् ठीकही असू शकेल. त्या थोर हुतात्म्याचाच आदर्श आपण पुढे ठेविलात, तर आपणास आढळून येअील की 'कातर्यं केवला नीतिः शौर्यं श्वापदचेष्टितम्। अतस्तपःसमेताभ्यामुभाभ्यामन्वियेष सः!'

त्यातही नैनीतालच्या कारागृहातील बंदीवर अत्याचार होत असल्याविषयीच्या ज्या आरोपाची चौकशी न्यायालयात चालली आहे, त्याविषयी आपण जें लिहिलेत ते लिहिण्यात आपला हेतु जनतेची दुःखे निवारण करण्याचाच होता आणि अशा प्रकारे पूर्वीही काही वेळा आपल्या 'प्रताप' पत्राने तत्रस्थ जनतेची सेवा भूषणावह रीतीने केलेली आहे हेंही येथेच सांगणें आम्ही आमचे कर्तव्य समजतो. कारण आम्हाशी अितरानी अनुकूल आणि प्रतिकूल अशा दोन्ही बाजू विचारात घेअून जसे न्याय्य बुद्धीने वागावें असें आम्हास वाटते, तसेच आम्हीही अितराशी वागण्याचा शक्य तो प्रयत्न करीत असतो.

महात्माजीसबंधाने जे आपण लिहिलेंत त्याचा समाचार पुढे अेखादे वेळी घेअू. आणि तोही तेव्हा की जेव्हा गांधीजीसच त्याविषयी जर आणि जेव्हा काही विचारावेसे वाटेल तर आणि तेव्हा. महात्मा गांधीस आम्ही जाणतो आणि ते आम्हांस जाणतात. आमचे आम्ही आजपर्यंत पाहत आलो आहोत. पुढेही पाहून घेअू. कोणा गोमा गणेशास त्यात तोंड खुपसण्याची योग्यता नाही. अहिंसेस लतकोडगी म्हणणें आणि गांधीजीमच तसे म्हणणे या दोन भिन्न गोष्टी आहेत, अितके कळण्याचेही ज्ञान ज्यास नाही त्याच्याशी बोला ते काय! महात्माजीस अुत्तर देअू पण पुढे. आज तो थोर देशभक्त वार्डोलीच्या रणांगणांत ज्या धोरणाने

रुढन आहे ते धोरण अजून कुशल सेनापतीस योग्यच असल्यान आणि कोणच्याही राष्ट्रीय लढचात शक्यतो आपण सर्वांनी खांद्यास खांदा लावून एकजात लढणे युक्त असल्यान या वेळी आम्ही महात्माजीच्या सहकारितस आणि साह्यास अुपयोगी पडतील तेच शब्द बोलू आणि तच आचरण करू अिच्छितो राष्ट्रीय हेताचाच अगदी घात होतो तेथेच काय ते आडवे यणे प्राप्त होत. आणि तही राष्ट्रकार्यापुरतच व्यक्तिश 'परैस्तु विग्रहे प्राप्ते वय पचशताधिकम्' हेच आमच सर्वांच ब्रीदवाक्य असले पाहिजे, आगच आहे गोमागणेशास आता तरी ह पटेल काय ?

—ता ३ ऑगस्ट १९२८

\+ + +

## (१४)

## राष्ट्रीय सभेपेक्षा सर्वपक्षीय सभा मोठी !

प मोतीलाल नेहरू म्हणतात की, 'सर्वपक्षीय सभेस मी राष्ट्रीय सभेपेक्षाही अधिक महत्त्वाची समजतो ' अशा अर्थी ह खर आह कारण सवपक्षीय सभाच खरी राष्ट्रीय सभा—राष्ट्राच्या प्रतिनिधित्वान पूण प्रतिबिंब पडलेली सभा होय क्रातिकारक राष्ट्रीय सभेच्या जुन्या याचकशाहीच्या किंवा नव्या खादीशाहीच्या आज्ञास राष्ट्रीय आज्ञा म्हणून मानीत नसत तेव्हा त याच कारणाचा अुच्चार करात सवपक्षीय परिषद ही अेका अर्थी राष्ट्रीय सभेहून राष्ट्राची खरी प्रातिनिधिक सस्था होय, तिचा ठराव प्रागतिक नसला तरी प्रातिनिधिक आहे खरा

परतु तो ठराव नेहरूना कधी, कुठे, केव्हा अेकू आला ? आम्हास तर ठराव झाल्याचीच नव्हे पण सवपक्षीय परिषद भरल्याची देखील बातमी नाही —शक्यता देखाल दिसत नाही कारण हिंदुस्थानच्या अभ्युदयासाठी या सर्व पक्षामध्ये हातघाअीने आणि प्राण पणास लावून लढणारा जो क्रातिकारक पक्ष त्याला कोणत्याही परिषदत आमत्रण आल्याच, आमत्रण दिल्याच, त्याचे पक्षीय अस्तित्वही मानल्याच आमच्या अैकिवात नाही आणि जर कधी क्रातिकारक पक्ष अशा 'सर्वपक्षीय' म्हणविणाऱ्या परिषदेत, त्या नावातील अर्थासच आमत्रण समजून, मडपाच्या पुढच्या दाराने आत शिरला, तर हे प्रागतिक, जागतिक, अगतिक अित्यादि सव पक्ष त्या मडपाच्या मागच्या दारान—सुरतेला ज्या दाराने मेथाप्रमुख गृहस्थ नाहीस झाले त्याच दाराने—वाट काढून अदृश्य होतील हे सुघडच आहे

क्रांतिकारकांचे नाव तर दूरच, पण राष्ट्रीय सभेत प जवाहरलालचा स्वातंत्र्यपक्ष देखील खपत नाहीसा, झेपत नाहीसा झाला आहे तरी बरे, बिचारा जवाहरलालाचा 'स्वातंत्र्यसंघ'ही स्वातंत्र्याच्या साधनाचे नाव देखील घेत नाही 'काय हवे' तेवढेच काय ते ठरविणाऱ्या वादविवादाच्या दुंदुभि वाजविण्यात ते 'कस घ्यावयाचे' ह्या विचाराचा अुच्चार देखील स्वत चा स्वत सही अक यता कामा नये – ही जी पुरातन परंपरा सर्व राष्ट्रीयपक्ष विपक्षानी आजवर प्रामाणिकपणे पाळली, तिचा ह्या नवीनातील नवीन 'स्वातंत्र्य संघाने'ही मुळीच अुच्छेद केलेला नाही आम्हास अधिकार हवेत, मवाळ म्हणाले, आम्हास स्वराज्य हवे जहाल म्हणाले, आम्हास स्वातंत्र्य हवे, जवाहरलाल म्हणाले, पण ते आम्ही कसे घेणार हे सांगण्याचाच नव्हे तर योजण्याचा देखील अदूरदर्शीपणा त्यातील कोणाही केला नाही! स्वातंत्र्य हवे! पण ते कसे मिळवावयाचे ह्याचा आचार किंवा विचार करण्यास आम्ही कोणी 'माथेफिरू' आहोत किंवा काय? स्वातंत्र्याची साधनें जुळविणें हें अेका चुटकीचे काम! असे – जसे – तसे – कसे तरी – वाटेल तेव्हा पाहता येअील!! माथेफिरू माणसावाचून, त्या साधनाची खटपट करण्याअितका कोण अुतावळा किंवा रिकामटेकडा आहे! माथे असलेल्यानी स्वातंत्र्य की स्वराज्य या शब्दाच्या अुच्चारा प्रत्युच्चाराच्या धुमाळीत राष्ट्रीयसभेचा आठवडा गाजविला की संपले

तथापि वैदिक क्रियेचे आधी वैदिक मंत्राचे अुच्चार बरोबर करणे हेही जसे आवश्यक असते, तसेच ध्येयाचा अुच्चार तरी आता बरोबर 'वर्णस्थानसमीरित' असा लोकास करता येअू लागला याविषयी तरुण प जवाहरलालाचे आणि वृद्ध पडित आयगाराचे आभारच मानिले पाहिजेत गुप्त यज्ञागारातील यज्ञाग्नीतून आविर्भूत झालेला तो महामंत्र त्यानी राष्ट्रीय सभेच्या सिंहासनावर आणून बसविला

पण त्यामुळे राष्ट्रीय सभेच्या सिंहासनावर जी परधार्जिणी अवदसा आजवर बसलेली होती, तिचा भयाने आणि त्रासाने जळफळाट होअू लागावा हे सहजच होते यास्तवच आणखी अेकदोन वर्षे राष्ट्रीय सभेच्या सिंहासनावर या अवदसेची झेप न पडेल अशी सावधगिरी ठेविली पाहिजे स्वातंत्र्याचा महामंत्र राष्ट्रीय सभेच्या ध्वजावर, राष्ट्रीयसभेच्या सिंहासनावर राष्ट्रीय हृदयाच वेदीवर सारखा अुद्घोषित होत राहिला पाहिजे! 'ना तरी सटवी ती परवशता। करील निश्चित घाता' ही गोविंदाची सावधानता आपण विसरता कामा नये

तरुण जवाहरलाल स्वातंत्र्याचा दीक्षित झाला ह्यात आश्चर्य नाही पण श्रीमान् आयगारासारखा वृद्ध ऋषि पुराणो या पदवीस त्याच्या या ध्येयनिष्ठेने पात्र व्हावा हें आश्चर्य!

कोणी सशयतात की, आयगार पूर्वी सरकारचे अडव्होकेट जनरल होते! असतील! पूर्वी राष्ट्रीय सभेचे पुढारी देशभक्तीच्या जिन्यान चढत राष्ट्रीय सभेच्या

अध्यक्षपदाच्या पायरीवरून सरकारचे परवशतेच्या हायकोर्ट जज्जाच्या जागेवर पाय ठेवीत आज आयगार त्या सरकारच्या परवशतेच्या पायरीवरून अुतरून राष्ट्रीय स्वातन्त्र्याचा झेंडा अुचलीत आहेत आधी राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होअून मग हाय-कोर्ट जज्जशिपची जागा पटकविणाऱ्या परंपरेपेक्षा आधी अॅडव्होकेट जनरल असताही त्या पाशातून सुटून मग स्वातन्त्र्याच्या दिव्य ध्येयाकडे चढत जाणाऱ्या आयगाराची परंपरा पुष्कळच अधिक अनुकरणीय आहे

आयगारानी स्वातन्त्र्याच्या ध्येयाचा हट्ट धरला, तर कोणी म्हणतात राष्ट्रीय सभेत बेकी होअील ! नेहरू-प्रतिवृत्तास संमति सुखाने द्यावी ती संमति स्वातन्त्र्य-वाद्यानीही तात्पुरती तोड म्हणून देणेच योग्य परंतु म्हणून कोणी मद्रासच्या राष्ट्रीयसभेत सम्मत झालेल्या स्वातन्त्र्याच्या ध्येयाचा ध्वज खाली ओढू लागेल तर बेकीच्या बुजगावण्यास न भिता राष्ट्रातील सर्व तरुणानी श्रीमान् स्वातन्त्र्यवादी आयगाराचे नेतृत्वाखाली झुंजून ती आपत्ति टाळली पाहिजे अेकी राष्ट्रीय हिताकरिता हवी. राष्ट्रीय विमोचनाकरिता हवी — राष्ट्र अिंग्लंडच्या साम्राज्याच्या रथाचक्या चाकाशी निरयाचे बांधून टाकण्यासाठी नको !

पन्नास आळशाशी अेकी व्हावी म्हणून स्वत ही अधोगामी रिकामटकडेपणा करीत बसण्यापेक्षा अेकी करून राष्ट्रीय अुद्धारासाठी निरलस मेहनत करणे बरे वहा म्याडाशी अेकीच्यासाठी संगमनत करून स्वत ही म्याड होण्यापेक्षा अेकट्याने त्या सगळ्याशी बकी करून राष्ट्रासाठी जो साधेल तो पराक्रम करण्यास बेछूट निघून जाणे चांगले कोटी कोटी लोकांबरोबर 'माझी मातृभूमि अिंग्लंडच्या साम्राज्याची शिक्का मारलेली बटीकच राहणार' म्हणून अेकीसाठी सांगण्यापेक्षा त्या सर्व बुद्धिभ्रष्ट जगाशी साफ बकी करून अेकटा अेकाकी गर्जत राहणे बरं की नाही ! ही माझी मातृभूमि कोणाची बटिका — नावालासुद्धा राहणार नाही ! दुसऱ्याचा शिक्का तिच्या राजमुद्रेवर तिला सहन होणार नाही ! ती स्वतंत्र होअू अिच्छित ! नाहीतर झुंजत मरू अिच्छिते ! ! मला तरी तिचा हाच संदेश मिळाला आहे !

पूर्वी सुरतेला ह्याच अेकीच्या बुरख्याखाली 'स्वराज्या'च्या ठरावाची गळेचेपी होणार होती पण टिळकानी, राष्ट्रघात करते ती अेकीच खरी बेकी होय, असं म्हणून राष्ट्रहितकारक बकीच पत्करली आणि 'स्वराज्या'चा ध्वज पडू दिला नाही त्याचप्रमाणे स्वराज्य, म्हणजे अिंग्लंडच्या वसेनील अेक अनुग्रहाचे परावलंबी अस्तित्व, बिनसैन्यी, बिनविमानी, बिनजलसेनी, बिनराजमुकुटी, असे पंगु संस्थानी अस्तित्व — अशी व्याख्या जेव्हा होत आहे, तेव्हा हजार नव्हे लाख लाख लोक जरी त्या भ्रमात सापडले आणि अेकीसाठी तुही असाच भित्रा भ्रमिष्टपणा स्वीकार म्हणून सांगू लागले, तरी त्यातून तत्काल फुटून निघून स्वातन्त्र्याच्या ध्येयाचा ध्वज अुचलून धरण्यासाठी आपले अेकट्याचे हातानी तरी आपले शिर तुटून पडेतो झटलं पाहिजे अशा परिस्थितीत अेकी हेंच पाप, बेकी हेच पुण्य

✦ ✦ ✦

मुसलमानांशी अेकी व्हावी म्हणून खिलाफतीची आफत अुरावर बसवून घेणाऱ्या सज्जनांनीच आजही ह्याच अेकीच्या नांवावर स्वातंत्र्याविरुद्ध कोल्हेकुअी चालविली आहे. राष्ट्रीय सभेस परावलंबित्वाचें लागलेलें हें ग्रहण मद्रासला मुटलें होतें—तें पुन्हा लागू नये म्हणून कलकत्त्यास सर्व स्वातंत्र्यवाद्यांनी श्री. आयंगारादि पुढाऱ्यांस पाठिंबा दिला पाहिजे.

अयंगार म्हणे नेहरूंचें पुढारीपण हिसकावून घेण्याकरिता स्वातंत्र्याचा जयजयकार करीत आहेत! पण त्यात बिघडावयाचें तें काय? गोखले–मेथाचे पुढारीपण न साहवल्यामुळे टिळक स्वदेशी बहिष्काराचा अुदो अुदो करीत होते म्हणून किंवदंती ओरडत असेच कीं नाही! पण राष्ट्रहित त्यानेच साधले म्हणून टिळकांकडेच पुढारीपण जाणें योग्य ठरलें; तीच स्थिति आजची. जर मोतीलाल नेहरु स्वातंत्र्याचे ठरावास हाणून पाडू म्हणतील—बहुधा ते तसें करणार नाहीत—तर ते किंवा आणखी कोणी अिंग्रजाच्या ऋणानुबंधाने मिंधीं झालेली माणसें तसें करू लागतील, तर स्वातंत्र्याचे नावाने त्यांचें पुढारीपण आयगारांनी हिसकावून घेण्याचा प्रयत्न करणे हेंच योग्य आहे. पुढारीपण घेअू पाहणारास, तें पुढारीपण जाअू नये म्हणून झटणाऱ्यांना तरी काही दोष देता येणार नाही!

—ता. १३ डिसेंबर १९२८

\+ \+ \+

## (१५)

## लालाजींवर लाठीमार

देशवीर लाला लजपतरायजीस शस्त्रसंन्यस्त स्थितीत गाठून, हीन, दीन दुबळ्या अशा स्वदेश बांधवांच्या दुःखाचा परिहार करण्याचा यत्न केल्याच्या पापासाठी अिंग्रजांच्या अुन्मत्त लाठ्यांनी घायाळ केले.

परंतु लालाजींस मारहाण करूनच ते थांबले असते तर त्यांच्या ख्रिस्ती धर्माच्या पुस्तकातील वाक्याचें अर्धेच अनुसरण झाले असतें. ख्रिस्ती धर्माच्या धर्मग्रंथातील भविष्य तंतोतंत खरें ठरविण्याचें पुण्य त्यांना लागले नसतें. जें 'Prophets of Old' बोलले ते खरें व्हावे, 'should come to pass, म्हणून लालाजींना मारहाण केल्यानंतर अिंग्रजांनी अेक कमेटी नेमिली. आपण कोणीच अशी मारहाण केली नाही असें म्हणत ते लालाजींस विचारू लागले—

तुम्हास कोणी मारले ते तुम्हीच सागा पाहू ? बघू वर तुम्ही ओळखता का ? पाहू बरे तुम्हाला तेवढी तरी बुद्धि आणि धैर्य आहे की नाही ?

'For all this came to pass as foretold ' कारण ह सर्व त्याच्या धर्मपुस्तकात, बायबलात ग्रथित केल असच घडून आल त्या ख्रिस्ती अधिकाऱ्याचा बायबलावर विश्वास होता त्या शिकवणीच, त्या अितिहासाच अक्षरन अनर आचरून दाखविणे येशूच्या भक्ताचे कर्तव्यच होते

म्हणून 'बॉअिड कमिटी' नेमली

कारण बायबलात त्याच्या या कृत्याचे जे भविष्य आधीच ततोतत वर्तविले आहे त्यात स्पष्टच म्हटल आहे की, 'They then spat at him in his face and did buffet him They smote him in the face with the palms of their hands and jeeringly asked prophesy unto us, oh Christ, who of us smote thee !'

या चमत्कार सायमनप्रसगीच्या मारपिटीच आणि बॉअिड कमिटीचे त भविष्य किती बरोबर वर्णिले आहे ! बायबल खरोखरच भविष्यवादी ग्रथ आहे अिग्रज सरकार खरोखर ख्रिस्तीच आहे आणि वरील भविष्य परवाच्या घटनचच असल्या मुळे वरील बायबलातील वाक्यात सबोधलला ख्राअिस्ट शब्द लालाजीस सबोधूनच लावला आह कारण बॉअिड कमिटीन त्याच वाक्यात विचारले आहे,' Prophesy unto us, oh Lalaji, who of us smote thee !!

—ता २० डिसेंबर १९२८

\+ \+ \+

## (१६)

## काशीतील दोन समेलने
## माकड महासमेलन नि भाकड महासमेलन

काशी यथे गेल्या दान महिन्यापूर्वी जी दोन महासमेलन अेकाच वळी भरली त्याची विस्तृत माहिती आता वाचकाना कळलेलीच आहे

त्यापैकी ज्ञानवापीजवळ भरलेले पहिल महासमेलन म्हणजे मर्कट महासमेलन हे होय आणि दुसरे महासमेलन म्हणजे अज्ञानवापीजवळ भरलेले ब्राह्मण महासमेलन होय तच जरा प्राकृत भाषेत सोयीस्कर रीतीने सागावयाचे तर पहिल्यास माकड महासमेलन आणि दुसऱ्यास भाकड-महासमेलन म्हटल असताही चालेल

माकड महासमेलनाची माहिती काशीच्या पत्रातून जी आली ती साराश-रूपाने अशी आहे की, काशीला काही दिवसापासून विजेच्या तारा मार्गातून लावण्यात आल्या. त्यापूर्वी असलेल्या साध्या तारावर, मग त्या कुपणाच्या असोत, जाळीच्या असोत, काशीची माकड मडळी पूर्वापार बसत आलेली असत. तारावर बसणे, वेळी त्यास धरून लोंबकळणे हा माकडाचा जातिस्वभावच होऊन बसला होता. त्यायोगे त्यास कोणतीही हानि होत नसल्याने ते कृत्य, ती रूढि त्याच्या ज्ञाति-स्मृतीत शिष्टाचार म्हणून आजपर्यंत गणलेली असे विजेच्या तारा जेव्हा नवीन आल्या, तेव्हा त्या तारासही त्यातील विजेचे नावीन्य माहीत नसल्याने माकडे त्या आपल्या शिष्टसमत रूढीप्रमाणे लोंबकळू लागली परतु विजेचे चटके बसून त्याची अेकाअेकी फारच धादल अुडाली प्रथमप्रथम हे अपघात का होतात हे त्याच्या मुळीच ध्यानात येअीना ती अगदी गोंधळून गेली. शेवटी या अतर्क्य सकटाची काही चिकित्सा करावी आणि सर्वानुमते त्यावर काही तोड काढावी म्हणून त्या काशीच्या माकडानी त्याच्या जातीचे अेक महासमेलन भरविले. शेकडो माकडे अेका मैदानावर अेकत्र झाली त्याच्यात किती वेळा तरी माकडी भाषेत गिचमिच चालून शेवटी काय ठरले कोणास ठाअूक, पण त्यातील अेक वृद्धसा माकड अुड्या मारीत बाहेर पडला समस्त सभा त्याचेकडे टक लावून पाहत राहिली तो हळूच त्या नवीन ताराच्या खाबावर चढला. मग हळूहळू हात पुढे करीत त्याने त्या खाबावरूनच त्या तारास झटझट बोटे लावण्याचा प्रयत्न केला. अर्थातच त्यास काही चटके बसले तत्काल तो खाबावरून अुतरला. परत आपल्या ज्ञातिसमेलनात आला पुन्हा थोडी गिचमिच झाली आणि त्या दिवसापासून सर्व माकडानी तशा प्रकारच्या तारावर चढणे अेकाअेकी सोडून दिले. हे वृत्त आम्ही गमतीचे म्हणून कल्पितपणे देत नसून ही गोष्ट खरोखरच अशी घडली हे वृत्त वर्तमानपत्रे वाचणारास माहीत आहेच

वर दिलेली घटना जशी दिसली तशी स्थूल रूपाने वर्तमानपत्रानी प्रसिद्ध केल्याप्रमाणे आम्ही वाचल्यानतर त्या माकडाच्या सभेतील सूक्ष्म हेतुही कळावा म्हणून आमचे विशिष्ट वार्ताहर श्री मनकवडे यास आम्ही तिकडे धाडले होते. त्यानी माकडाच्या मनात शिरून त्या सभेविषयी काही अधिक माहिती जी धाडली तीही येथे देत आहो अर्थात् तिला वाचकानी कल्पित म्हटल्यास आमचा प्रत्यवाय नाही कारण श्री मनकवड्याप्रमाणे मनातले जाणण्याची शक्ति सर्वासच असते असे नाही. ते लिहितात : आजपर्यंत निरुपद्रवी असणाऱ्या तारावर हे अपघात का व्हावे हे न समजल्यामुळे माकडानी ते महासमेलन भरविले होते त्यात कोणी हनुमान नावाच्या माकडाने सुचविले की, कदाचित् ह्या तारात काही हानिकारक पदार्थ भरलेला असावा. ह्या तारा आजपर्यंतच्या ताराहून निराळ्या असाव्या. हे

त्या माकडाचे बोलणे अैकताच त्यातील अेक पुच्छवान नावाचा दुसरा माकड रागावून म्हणाला, ' छट् ! भलतीच शंका तारामध्ये अशा भयंकर तारा असू शकतात असे संभव असते, तर आपल्या त्रिकालदर्शी स्मृतिकारानी ते पूर्वीच सांगून टाकले नसते की काय ? तार पाहिली चढावे, लावकळावे हा आपला ज्ञातिनियम आज हजारो वर्षे आपण अबाधित पाळीत आलो पण असे अपघात कधी झाले नाहीत तेव्हा तारावरची ही शंका व्यर्थ आहे हा आपल्या त्रिकालदर्शी पूर्वजाचा आणि सनातन स्मृतिकाराचा अपमान आहे ! हा त्या रागावलेल्या माकडाचा आक्षेप अैकताच त्यातील अेक वृद्ध शीर्षवान् नावाचा माकड म्हणाला, ' आपल्या या आक्षेपकाचे नाव त्याच्या आअीबापानी ' पुच्छवान् ' म्हणून जे ठेवले ते योग्य आहे यात काही शंका नाही ' शीर्षाने विचार करण्याचे सोडून हा शेपटाने विचार करतो हे त्याच्या ह्या मूर्खपणाच्या आक्षेपावरूनच अुघड आहे याचे अुत्तमांग मस्तक नसून पुच्छ आहे ! अरे वेड्या, तूच म्हणतोस, पाहतोस की, आजवर न झालेले नवीन अपघात आज घडत आहेत, तेव्हा ज्या अर्थी त्रिकालदर्शी पूर्वजानी स्मृतीत न सांगितलेल्या आणि आजवर आपल्या जातीस ठाअूक नसलेल्या नवीन अपघातास आपणास भोगावे लागत आहे, त्याअर्थी ते अपघात मानणे हा देखील त्या स्मृतिकाराचा अपमानच आहे की काय ? आणि नवीन अपघात जर मानतोस तर त्याची नवी चिकित्सा ठरविणे हाही जुन्या स्मृतीचा अपमान नाही हेही तुला मानलेच पाहिजे ते काही नाही या तारा अितर ताराहून नवीन आणि अधिक भयंकर आहेत की काय हे अेकदा अजमावून पाहिलेच पाहिजे मी पुढे होतो आणि ह्या नव्या तारातच त्या अपघाताचे कारण आहे की काय हे तुमच्यासमक्ष नघून येतो समाजाचे कल्याणासाठी मला त्यापायी चटके बसले किंवा प्रसंगी मृत्यु आला तरी चिंता नाही ! ' हे त्या शीर्षवान् माकडाचे बोलणे अैकताच सर्व सभेने त्याची फार वाहवा केली आणि त्यास त्या कार्यावर धाडले त्याने करण्या बातमीत सांगितल्याप्रमाणे त्या तारावर प्रयोग करून ठरविले की, त्या तारा नवीन असून त्यात कोणच तरी भयंकर दाहक द्रव्य असल्यामुळे त्याना स्पर्श न करण्याची नवीन रूढि माकडानी पाडल्यावाचून अपघातापासून त्यांचे रक्षण होणार नाही हे मत त्याने परत येअून सभेत सांगितले ' परिस्थिति बदलली आहे आता तारा तितक्या निर्दोष समजण्याच्या जुन्या रूढीत बदल करून अशा ताराना शत्रुवत लेखण्याचा नवा नियम आपल्या स्मृतीत घातला पाहिजे ! '

' परिस्थिति बदलली आहे ! ' हे त्या शीर्षवानाचे शब्द अैकताच तो पुच्छवान माकड रागाने म्हणाला, ' भलतेच ! परिस्थिति हा शब्दच शास्त्रबाह्य आहे ! परिस्थिति काय, ती बदलली की काय याचा विचार करणे माकडधर्माविरुद्ध आहे ! ' हे त्याचे बोलणे अैकताच सर्व माकड खो खो हसले आणि म्हणाले,

# (१७)

## मुंबओीचा दंगा

झाला! अेकदाचा मुंबओीचा दंगा अुद्भवला, चेकाळला, शमला — अुत्पत्ति, स्थिति आणि लय या पदार्थमात्रास भोगाव्या लागणाऱ्या तिन्ही अवस्थांतून तो गेला. आता शमल्यानंतर और्ध्वदेहिक विधिसंस्काराचे चितेचे दिव्य तेवढे अुरले. दंग्याचे प्रेत चितेवर चढून भस्मावशेष होओीतो त्यात किती सर्पण टाकण्यात येते आणि सुक्याबरोबर ओलेही किती जळते येवढेच पाहणे बाकी आहे.

मुंबओीचा दंगा झाला पण हे काय? मुंबओीस किती तरी हिंदु अजून जिवंत! किंबहुना किती मेले तेच सहज मोजता येत आहेत — बाकी सगळेच जिवंत! अगदी पूर्वीसारखे सहज मोजमापीच्या मापात न मावतील अितके चिक्कार जिवंत! आश्चर्य आहे बुवा!

कारण संघटन चालू झाल्यापासून आणि विशेषतः नेहरू प्रतिवृत्तानंतर, हिंदु जगताच्या अगदी जवळ आलेल्या प्रलयाविषयीचीं भयंकर भविष्ये मोठमोठे मुसलमानी पैगंबर अेकसारखे करीत होते. शौकतअल्लीची जळजळीत जीभ म्हणाली, 'हिंदु मला चिडवितात काय? त्याची खोड लवकरच जिरेल. हिंदूनो, नेहरू प्रतिवृत्त सम्मत करता काय? War to the Knife! खंजिराखंजिरानिशी लढाअी!' महंमद अल्ली म्हणाले, 'हिंदु कोणच्या झाडाचा पाला!' मुस्लिम औटलुक म्हणाले, 'जर वेळच पडली तर पठाणाना आत बोलावून हिंदूच्या छातीवर मुसल्मानी पाच्छाअी अुभारू!' अितर मुल्ला आणि मौल्वींच्या फतव्याची आणि फितव्याची तर गणतीच नव्हती. त्यांचा मतभेद असा अेकाच गोष्टीवर होओी आणि ती म्हणजे या कीं, अेकंदरीत अेक मुसलमान लढाओीत किती हिंदूच्या बरोबर असतो — किती हिंदूस मारू शकतो — त्या खंजिराखंजिरानिशीच्या लढाअीत!!' काही तज्ज्ञ म्हणाले, अेक मुसल्मान ५ हिंदूस मारू शकतो, काही म्हणाले १०, काही म्हणाले

याचा नेम नाही! त्या दिवशी हिंदूची पृथ्वी फिरावयाचे सोडून भयाने कापत अुभी राहिली

अितक्यात बातम्यावर बातम्या आल्या की, मुवअीस पठाणाची आणि हिंदूची भिडली! शौकतअल्लींनी हीच आग हिंदुमुसलमानाचे दम्याच रूप घेणार म्हणून मागितले! आणि लगेच तसे झाले पठाण, शेख, सय्यद, शिय्या, सुन्नी मुसलमान तितका अेक झाला अक्षरश: खजिरासजिरानिशी खडाजंगी चालली मुसलमानाच्या हजारो हजाराच्या टोळ्या हिंदूची कत्तल करीत अुठल्या, अन् 'टाअिम्स'चे स्तंभचे स्तंभ भरत चाललेले पाहून अुभ्या हिंदु जगताची कदर खचून गेली वाटले हाच तो हिंदु जगताचा येणार येणार म्हणून गाजलेला प्रलय आला अखेर!! जो अेकेक मुसलमान निदान २८ हिंदूस अुपजतच मारी, ता मुरे घेअून हजाराच्या टोळ्यानी बाहेर पडलेला! —आता मुवअीस हिंदु म्हणून कुठला अुरणार? गणित करकरून पाहिले तो अुत्तर हेच आता मुवअी निर्हिंदु होणार! आणि त्यात पठाण मिळाले आता अर्थात् मुस्लिम पादशाअीही हिंदूचे छातीवर पुन: स्थापिली जाणार! भवितव्यता बलीयसी, असा निश्वास टाकून आम्ही आमच्या छाती त्या अुपजासू मुस्लिम बादशाहाच्या तख्ताची पहिली पायरी व्हावी अस

पण या संघटनाने राष्ट्रीयत्वाला अगदी काळोखी लावली हे आपले देशबंधु म्हणून मुसलमानी सुयास बळी पडण्याचे सोडून ते मुसलमानासच अुलटे म्हणू लागले, आम्ही हिंदुही तुमचे देशबंधुच–म्हणून तुम्हीच आमच्या सुर्‍याला चकार शब्द न काढता बळी पडा! आणि हिंदूनी मशिदीवर हल्ले चढविले, रस्त्यारस्त्यांनी मुसलमानास भोसकून काही भाग काही वेळ निर्यवन केले, हजारो मुसल्मानी रुपयाची लूट केली, पुरभय्ये ट्रामा अडवून अडवून पठाण भेटला की ओढीत चोपीत चालले म्हणे आम्हास शुक्रवारचे रात्रीचा सूड घ्यावयाचा आहे! मुसलमान पाहिला की, मारीत चालले! हिंदुच ते! वहकतील तिकडेच वहकतील चार पाच वर्षांपूर्वी मरत तर मरतच असत, आता मारीत तर मारीतच सुटतात.

काय करावे 'हिंदुमुसलमानकी जय'चे दुर्दैव! दुसरे काय? मोपल्याच्या बंडाचे वेळी जसे राष्ट्राचे पुढारीपण खिलाफतधुरंधर गांधीकडे होते, तसे आज जर मुंबईचे असते तर मोपल्याच्या त्या औरंगजेबी धादलीत जसे अेक का दोन हिंदु कुठेसे बलात्काराने बाटले तसेच मुंबईला 'अेक का दोन हिंदु कुठेसे' मरत आणि हिंदूच्या त्या पापासाठी अेखादा राष्ट्रीय अुपास पाळून त्याची आत्मशुद्धि करण्याची व्यवस्था सहज करून देता आली असती!

पण संघटनामुळे ही 'सुडाची' व्याद हिंदूचे मनात घुसली त्यामुळे सत्यानाश झाला विचारी शांततासमिति! हेतु किती अुच्च!—पण दोन तीन मुसलमान स्वयंसेवकास या क्रूर हिंदूनी जिवासह मारिले, अेका पठाणानेही अुलट काठी

सता, तर तो दंगा चालला असतानाच तिथे जाण्याचा गावढळपणा करता ! या
व्हर्नर महाशयांनी प्रजेच्या दंगा करण्याच्या अधिकारात तसा कोणताही अनधि-
ारी हस्तक्षेप न करता सर्व दंगा शमल्यानंतर त्या धर्मक्षेत्राची यात्रा केली आपण
ाही का महाभारतानंतर हजार वर्षांनी कुरुक्षेत्राची यात्रा करीत? गव्हर्नर आणखी
खादे वर्ष जाअू देअून मग दंग्याची ठिकाणे पाहते तर ही तीर्थयात्रा अधिकच
ोभिवत दिसली असती !

त्याचप्रमाणे गव्हर्नरांनी मि ब्रिस्टले याच्या कुटुंबासही त्याच्या हत्येविषयी
सप्रदर्शक महानुभूतीचे पत्र टाकले जे शेकडो अितरेजन दंग्यात मारले गेले
ाची कुटुंबे बेपत्ता ! मूर्खांना पर ना दार त्यांना सहानुभूतीच्या चिठ्ठ्या टाकणे
मवयच होते

अशा रीतीने अेक मुसलमान २८॥ हिंदूंना मारणारा वीर असूनही आणि
ना मीराच्या हजारोंच्या सेना 'दीन दीन' म्हणून लुटून पडल्या असताही दंगा
ोअूनही गेला, तरी मुंबअीत हिंदु जिवंतच जिवंत आहेत ! हजारो बाहेर गावी
ले खरे, पण त्या लुच्चयात दंग्यानंतरच्या धरपकडीच्या पारण्यास आपण हाअून
ुपस्थित राहण्याची फारशी आवश्यकता न वाटणारेही अनेक लोक क्षमू शकतील

सायमन कमिशनपुढेही बहिष्कारामुळे फारशी माणसे साक्ष देण्यास जात
ाली तरी हा दंगा जाअू शकेल ब्रिटिश पोलीस नसले तर तुम्ही राज्य कसे
राल? हा प्रश्न आता सायमनला विचारावयास नको कारण या दंग्याने ती साक्ष
ापण होअूनच देअून टाकली अनेक भागात मुंबअीत अेवढी सबळ पोलीस ठाणे
व्हते ब्रिटिश सरकार असे दोन चार दिवस कोणत्याही उपयुक्त कामापुरते तरी
दिसले नाही — तरी हिंदु जगलेच चांगले चाळीचाळीतून ललकारीत जगले अगदी
ारीत मारीत जगले ! तसेच हिंदुस्थानातही जगतील !

सरकारने अेक गोष्ट मात्र जरा विवचून पाहावी हे दंगे जर असेच चालले,
र गार्ड, मोटारी, मशीनगन्स चिलखते, गोळीबार लोकांच्या घरोघर सकाळी
ूध आणणाऱ्या गवळ्यासारखे काहीही धामधूम अुत्पन्न न करता वारवार येअू
ाअू लागले, तर या भुताच्या भयवर अवडवराचे भय लोकांतून कमी होअून, हे
ंग्याचे भस्मासुर प्रत्यक्ष भूतनाथाच्या डोक्यावरही हात ठेवण्यास धजावयाचे !
असले दंगे वडाचे वस्तुपाठ असतात हें अैतिहासिक सत्य ब्रिटिश सरकारास काही
कोणी शिकविणे नको पण आपले राजनिष्ठ अंतःकरणास राहवत नाही म्हणून
ुचवून ठेविले मायबाप त्याचा योग्य तो विचार करतीलच !

—ता २३ फेब्रुवारी १९२९

\+ + +

गाणिस्थानात झपाट्याने वाढत आहेत. वाहतूक निर्विघ्नपणे होत आहे र क्रांतिकारक सुधारणा झपाट्याने करीत आहेत अफगाणिस्थानची राज्यपद्धति ी प्रगतिपर नि बलिष्ठ नाहीतर नेपाळची किती कुचकामाची. अफगाणिस्थान चिस्थान घेईल दुसऱ्या बाजूने तिबेट घेईल. नतर त्याच्या नटार्थ पजाब ाही घेईल अफगाणिस्थानच्या पाठीमागे अिराण, तुर्कस्थान, रशिया, अिजिप्त यादि राष्ट्रे आहेत. अशी मुसलमानी राष्ट्राची जूट आहे तशी तुमची कोठे ? ! अमीर अमानुल्लाचा केवढा दरारा ! !

सय्यद खानानी जेव्हा हे अफगाणिस्थानचे सत्यदर्शन व्यक्त केले, तेव्हा क सशयवाज लोकानी त्यास नावे मुरडून म्हटले, हो, हो, जरा थाबा. मोटारी-वर धावण्यासाठी चेकाळून श्वान प्रथम असे बेफाम धावते की, हे मोटारला टाकते की काय म्हणून उकिरड्यावरील त्याच्या जातभाअीस वाटू लागावे !

सय्यद खानाची हिंदूनी केलेली ही टवाळी शेवटी हिंदूच्याच गळ्यात आली ी कारण सय्यद खानानी वर सागितलेल्या सर्व गोष्टीच्या यथार्थत्वाचा अमोघ वा त्याच्या सागण्याच्या मागोमाग धावत आला 'ऋपीणा पुनराद्याना चमर्थोऽनुधावति ! ' आता हिंदूस तोड अुघडण्यास जागा अुरली नाही

प्रथमत अमिराविषयी पहा ! ' अमिराचा केवढा दरारा, केवढा प्रताप ! ' णून सय्यद खान म्हणाले ते कसे अक्षरश खरे ठरले पहा ! भणग, भामटे, वारडे, फकीर, भिस्त्याची मुले, चोराच्या टोळ्या, दीडदमडीचे मुल्ला, जो तो मीर अमानुल्लाच्या डोक्यावरील मुकुटाचा त्रासदायक भार अुतरून अमिरास राम देण्यासाठी पहा कसा त्याच्या डोक्याशी झोबत आहे ! अमिराचा हा वढा दरारा ! आणि त्याच्या प्रतापाविषयी विचारूच नका, दुसरा अेखादा सेकड पता तर काबूलवर बच्चा साकूसारखा अुपटसुभ चढून येत आहे हे कळताच पल्या पूर्वार्जित राजधानीच्या वेशीपाशी झुजत रणात पडता, पण जिवतपणी ता ना. परतु अमानुल्लाने तसे कोणतेही भ्याड कृत्य केले नाही. जसा त्याचा ाप तशीच राज्यदक्षता ! अेक भिस्ती काबूलवर ससैन्य चढून येण्याअितका ाळ होतो याची क्रूर अमानुल्लाने प्रथम चौकशी ठेविली नाही चौकशी झाली हा प्रतिबध केला नाही आणि काबूलवर भिस्त्याचा मुलगा चढून आला तरी ाच्यासारख्या य कश्चित् प्रतिस्पर्ध्याशी आपणासारख्या राजकुलीन पुरुषाने लढणे आपल्या योग्यतेस काळिमा आणण्यासारखे आहे असे जाणून बदुकीचा अेकही र न वाढता पराक्रमी अमानुल्लाने पाच पिढ्याची पैतृक राजवट मुकुटासुद्धा येच्या तिथे ठेवून कदाहारला पलायन—नव्हे प्रयाण केले. भिस्त्याशी ते काय ढायचे ! अशी ल्ढाअी करण्याचा कलक अमानुल्लाने स्वत स आजपर्यंत नाही तर हीच लावून घेतला तो शूर अमानुल्ला चोवीस तासात राजधानी हरला, चार

तासांत राज्य सोडता झाला, चार मिनिटांत भावास राज्य देता झाला, पुन्हा चार मिनिटांनी त्याचे राज्यपद आपणांकडे घेता झाला आणि चार महिने झाले तरी कंदाहारच्या भिंतीच्या आडच्या आड दडण देऊन राहता झाला. अमिरी गादी-वर भिस्ती बसलेलाच आहे; अमानुल्लांच्या अंतःपुरातील नाल्यागोलाच्या राजकन्यका चोर पोर आपसांत वाटून घेतातच आहेत. अमानुल्लाच्या शयनागारांतले चोर लोळत आहेत, प्रांतोप्रांतीचे अधिकारी ‘ भिस्ती अमीर की अमानुल्ला! की आम्हीच स्वतः ? म्हणून अमानुल्लाच्या अमिरी आज्ञेस अवहेलनेचीं उत्तरें पा-

'नेपाळ रानटी' अगदी खरं, राजकुमारींना भिस्त्याची मुलं ओढीन नेऊन बलात्काराच्या वाहल्यावर नेपाळात कुठे लग्ने लावतात? अफगाणिस्थानात अमानुल्ला जमा सगसाराने अहमदीयास मारीत असे आणि बच्चा साक हिंदु शिखास मारीत आहे आणि मध्या सुन्नी जसे शियाना मारीत आहेत, तसे कोणतेही 'सभ्य' धार्मिक कृत्य नेपाळचे हातून आज हजारो वर्षांत अेक तरी घडलं आहे का? तिथे न मुसलमानाची काफर म्हणून कत्तल अुडत आहे न हिंदूत शैव वैष्णवाना मारीत आहेत 'मुसलमानाची जूट पाहा!' पाहिली बाबा! धन्य आहे मुसलमानाच्या जुटीची! अमानुल्ला बच्चाशी विलगता, बच्चा अहमद खानाशी शिनवारी दुराण्याशी, दुराणी खास खेलाशी! जूटच जूट! अेकीच अकी ज्याची त्याचा जीवरच कठरच गाठ पडलेली!

अशा जुटीच अफगाणिस्थान 'अेका बाजूस तिबेट, दुसऱ्या बाजूस सिंध-पंजाब जिंकून घेअील' हे काय सय्यदानीच सांगावयास पाहिजे! त्या वेळेस वीरवर अमानुल्लाच अफगाणिस्थानाचा पुढारी होता म्हणून सय्यद तिबेट, पंजाबच्या विजयावरच संतुष्ट झाले पण आता तर अमानुल्लाच काय, पण त्याची बायको, त्याची आअी, त्याचा भिस्ती, त्याचा भाअू त्याचा हुजऱ्या, त्याचा सेनापती — सगळेच रणांगणात अुतरलेले, सगळेच अमीर आता अफगाणिस्थान नुसत्या डाव्या अुजव्या, पुढच्या, मागच्या दशासच जिंकून न थांबता खाली भूगर्भीय अग्नि-लोकावर आणि वर आकाशीय चंद्रलोकावरही स्वारी नेल्यावाचून राहणार नाही

'अफगाणिस्थानास जेव्हा समुद्राची आवश्यकता भासेल तेव्हा पश्चिम समु-द्रास हस्तगत करण्यासाठी तो हिंदुस्थानचा सिंध ते काठेवाडपर्यंतचा देश जिंकील!' सय्यदाच्या या म्हणण्यात त्यांच्याच नव्हे तर अुभ्या अफगाण राष्ट्राच्या महत्वा-कांक्षेचा स्पष्ट अुच्चार झालेला आहे पण ही बातमी काही आजच आम्हास कळली नाही ती लहानपणापासून अैकत आहोत अमिराच्या बापाने त्याच्या आणि बापाच्या बापानेही हिंदी सागराच्या तटाकी अेकदा तरी समुद्रस्नान घडावे म्हणून धापा टाकीत जीव सोडले पण ते समुद्रस्नान घडले नाही सध्या अफगाणिस्थानच्या टाच-भर नद्यांतून जे राष्ट्र गटांगळ्या खात आहे, ते प्रथम त्या नद्या पार अुतरू द्या आणि मग जगून वाचले तर मग हिंदी महासागर आपल्या ओंजळीत भरून घेण्यास येअू द्या हिंदीमहासागर ही वाटच पहात आहे अफगाणाची समुद्रस्नानाचीच नव्हे तर समुद्रसमाधीचीही हौस फेडण्याअितका तो खात्र आहे

'अफगाणिस्थानात दळणवळण आणि वाहतूक निर्विघ्नपणे होत आहे' काय नाही म्हणता! अेका प्रवाशास शंभर शिपायांच सरक्षक सैन्य घेअून अेका मैलाला अेकअेक जिवावरच्या संकटांना गाठल्यानंतर जगला तर अगदी 'निर्विघ्नपणे'

दुसऱ्या मेळात प्रवेशता येत खरेच ! पण अफगाणिस्थानच्या प्रबलतेची शेवटची साक्ष म्हणजे सय्यद खान आणि शौकत अल्लीखान आणि अहमद अल्लीखान अिन्यादि खिलाफतधुरंधर लोक म्हणतात की मुस्लिम जगाच्या अमानुल्लाला असलेल्या पाठिंब्याची होय- 'अिराण, तुर्कस्थान, अिजिप्त, अरब या सर्व मुस्लिम जगाचा अमानुल्लाना पाठिंबा आहे ' आहे तर ! तसा तो पाठिंबा होता म्हणून तर अमानुल्लाना सिंहासनावरून ओढण्यासाठी बच्चा साकू २५ माणसानिशी काबुलात आला आणि अमानुल्ला कदाहारला निघून गेला ! अमानुल्ला नुकतेच युरोपातून, टर्कीतून, अिराणाहून त्या वेळेस देशी आलेले होते मध्यतरी रशियाच्या दिग्गजानेही आपल्या पाठीवर ही अफगाणी माशी क्षणभर बसू दिली होती. त्यामुळे रशियाही अमानुल्लाच्या कह्यात आहे, पाठीशी अुभा आहे असे सय्यदानी म्हटले ते ठीकच होते. आम्हीही म्हणतो रशिया अफगाणिस्थानच्या पाठीशी आहे— जसा पारधी मृगाच्या पाठीशी असतो रशियाच का, अिंग्लडचा नाही का अफगाणिस्थानला पाठिंबा ? अमानुल्लाना नसेल तर बच्चा साकूला असेल—पण कोणा तरी अफगाणास अिंग्लडचाही पाठिंबा आहेच ! खिलाफतवाल्यानी वर्णिलेले पॅन-अिस्लामी अैक्य खरोखर फार प्रबळ ! अमानुल्ला सकटात पडताच पाहा कसा केमालपाशा चार साडेचार तुर्की माणसे काबूलकडे धाडता झाला ! आणि ती चार माणसेही काबूलला जाण्याचे आधीच परत केमालकडे कशी तातडीने निघून गेली !

कोणाला तरी त्या अशुभ पदवीची अवदसा न भोवो या सद्धेतून आम्ही ही सूचना खिलाफतवाल्यास करीत आहों ! कारण अलीकडेच अैकलं की, गाजी बच्चा गावूशी महमदअल्ली सोन्याच्या दूरध्वनीतून—टेलिफोनमधून—बोलू लागले आहेत म्हणून ही विनती की, आता बच्चा साकूला तरी खलिफापणाची दृष्ट लावून त्याचा सत्यनाश करू नका ! अजून बच्चा आहे तो ! चार दिवस राजवाड्याची मजा मारू द्या त्याला ! पुढे मग त्याचा नाश जेव्हा अगदी जवळ येअील तेव्हा त्याला अिस्लामचा खलिफा होण्याची आकांक्षा आपण होअून त्याचे डोक्यात येअीलच !

आता सय्यद खानाचा निरोप घ्यावयाचा पण तो बिचाऱ्या 'जंगली, असभ्य व असंघटित' नेपाळी भाषेत न घेता त्याच्या अफगाणिस्थानच्या पूज्य असलेल्या कवि हजरत शेख सादी यांच्याच शब्दात घेणे बरं. सादी म्हणतात —

फारसी

*सादिया ! अज रोजे अजल्हुस्न व तुर्कां दादन्द*
*अक्लो दानाअी फहिम व यूना दादन्द*
*नाजो अजज क्रिश्मा हमा दर आलमे हिंद*
*बेवकूफी व जहालत खास अफगां दादन्द*

अर्थात् हे सादी ! सृष्टीचा रचना होताना रूप तुर्कांना मिळाल, विद्या आणि बुद्धि यूनाना (ग्रीकांना) मिळाली, कोमलता, माधुर्य, हावभाव, सभ्यता हिंदुस्थानच्या वाट्याला आली आणि अनाडं, मूढता नि पिशाच्चपणा अफगाणिस्थानला देण्यात आला ! '

*नमस्कार सय्यदखान, येतो आता*

—ना ३० मार्च १९२९

\+ \+ \+

## (१९)

## हुतात्मा राजपाल आणि महात्मा गांधी

गल्या पाळीला पार्लमेंट सभेत हिंदुस्थानला औपनिवेशिक सत्ता (Dominion status) द्यावयाची की नाही याविषयी जो मनोरंजक वादविवाद झाला, त्यात अेका गंभीर दुःखाची जो बातमी बाहेर फुटली, तीविषयी अिंग्लिश असो वा हिंदी असो, पण प्रत्येक सहृदय मनुष्यास सहानुभूति वाटल्यावाचून राहणार नाही. त्या वादाचे भरात अिंग्लंडचे अेक प्रमुख पुढारी आणि अुभ्या जगतातील अेक प्रमुख

पारस्थानी मि बाल्डविन हे म्हणाले की, 'तुमच्या आमच्या डोळ्यादेखत तरी *हिंदुस्थानला औपनिवेशिक सत्ता–वसाहतीचे स्वराज्य–मिळणे शक्य नाही !'* कोण दुःखावह बातमी ही !

हाय ! हाय ! मि. बाल्डविन आणि ज्या पार्लमेंटच्या सभासदास अुद्देशून ते असे म्हणाले की, 'तुमच्या आमच्या डोळ्यादेखत तरी हिंदुस्थानला स्वायत्तता मिळत नाही,' ते अिंग्लिश सभासद, ह्या साऱ्या सज्जनांचे डोळे अितक्या लवकर मिटणार ना ! आम्हास बॉल्डविनसाहेब अवघ्या वर्षाचेच आत सोडून जाणार ना ! हाय हाय !

कारण औपनिवेशिक स्वराज्य तर अेक वर्षाचे आतच मिळणार असे भगतसिंगादिकांनी परवा लाहोर कोर्टात सांगून टाकले, अितकेच नव्हे तर त्या समयी आमची सर्वांची मुक्तता होणारी असल्याने तुम्ही या खटल्याचा नसता त्रास घेत बसण्याचे सोडून खुशाल विसावा घेत बसावे म्हणून कोर्टास अनुरोधही (शिफारसही) केला तेव्हा औपनिवेशिक स्वराज्य–अेक वर्षातच मिळणार हे क्रांतिकारकांचे भविष्य आणि ते त्यास खरे करून घेणारच, आणि तिकडे बॉल्डविन म्हणतात की, आमच्या डोळ्यादेखत तो दिवस अुजाडणे अशक्य आणि बॉल्डविनही काही भलतीच प्रतिज्ञा करणारे अनुत्तरदायी (irresponsible) गृहस्थ नाहीत ! अर्थात् अेक वर्षाच्या आत मि बॉल्डविनांचे आणि पार्लमेंटातील त्यांच्या पुढच्या त्या दिवशीच्या सर्व सभासदांचे डोळे नित्याचे मिटणार हे अुघड आहे ! हाय हाय ! कोण हा दुःखद प्रसंग !

भारतभक्त भगतसिंग म्हणतात, अेक वर्षाचे आत स्वराज्य मिळणार ! ब्रिटनभक्त बॉल्डविन म्हणतात, माझ्या डोळ्यादेखत तरी काही स्वराज्य मिळत नाही या दोघांच्याही प्रतिज्ञा खोट्या होऊ नयेत अशी–

कारण ते दोघेही गृहस्थ आपल्या या ब्रिटिश साम्राज्यातील त्या त्या देशातील माननीय देशभक्त आहेत कोणीही खोटा ठरला तरी तुम्हा आम्हा ब्रिटिश साम्राज्यांतर्गत सुराज्यास राहू अिच्छिणाऱ्या अवघ्या हिंदी अिंग्रजी नागरिकांच्या ब्रिटिश साम्राज्याच्या सामष्टिक अभिमानाला दुःखापद होणारी आहे तेव्हा या दोन्हीही प्रतिज्ञा खऱ्या ठरविण्याचा अेकच अेक जो अर्थ, जो मार्ग त्यातून निघतो तोच साम्राज्याभिमानी बॉल्डविनसाहेब स्वीकारतील आणि आपले डोळे या वर्षाच्या पहिल्या अर्ध्यातच नित्याचे मिटून ह्या वर्षाच्या दुसऱ्या अर्ध्यात हिंदुस्थानास औपनिवेशिक स्वराज्य मिळण्याचा दिवस अुजाडू देतील यात आम्हास काहीच *शंका वाटत नाही तरीही बॉल्डविनसारखा मोहरा अितक्या अनपेक्षित शीघ्रतेने* आम्हा सर्वांस अंतरणार ही बातमी त्यांच्या स्वतःच्याच तोंडून अैकल्यामुळे दुःख मात्र अत्यधिकपणे झाल्यावाचून राहत नाही. अिंग्लिश पार्लमेंटवर हा मोठाच प्रसंग कोसळणार खरा गाय फॉक्सच्या वेळचे संकट देखील अितके भयानक

नव्हते ! जे हिंदुस्थानचे स्वराज्य ओका वर्षात मिळणारच आणि त्याच वेळी पार्लमेंटातील, 'तुमच्या आमच्या डोळ्यादेखत काही मिळण्याचा संभव नाही !' अितक्या तरुण, थाल वृद्ध अशा थोर थोर ब्रिटिश सभासदाच्या आयुष्याची दोरी अशी अकस्मात् अितकी थाखूड व्हावी ना ! हाय हाय ! अीश्वरेच्छा बलीयसी ! दुसरे काय !

तिकडे बर्कनहेडवर असा वाअीट प्रसंग गुजरणार तरी आहे पण अिकडे धर्मवीर राजपाल याची हत्या करणाऱ्या अिलामदिनावर तर याहूनही वाअीट प्रसंग गुजरून देखील गेला ! हिंदु धर्मवीर राजपालाची हत्या करणारा हा मुसलमान गाजी अिलामदिन—जीव वाचविण्याकरिता सारखी धडपड करीत असता तो सर्व निष्फळ ठरून शेवटी फाशावर लटकला ! आणि अशा प्रकाराने 'रंगीला रसूल' प्रकरणाला शेवटी अशी अगदी अक्षरशः मूठमाती दिली गेली. मुसलमानांचेच प्रेत पुरताना ! हिंदूचे नव्हे !

कारण राजपालाला मारले तेव्हा मौलवी जाफर अल्ली सन्तुष्ट अैटीत म्हणाले होते की, राजपालाच्या मृत्यूने 'रंगीला रसूल'ला मूठमाती मिळाली, पण शेवटी ती त्याची घोषणा फार घाअीची ठरली. कारण राजपालाचे प्रेताला हिंदूंनी अग्नि दिला—मूठमाती नाही आणि त्या अग्नीच्या डोंबाने होरपळून आज जेव्हा अिलामदिन फाशावर लटकला, तेव्हा त्याला दिलेल्या मूठमातीतच त्या 'रंगीला रसूल'ला खरी मूठमाती मिळाली

आता ती मूठमाती मातीत मिळून गेली असल्याने या प्रकरणाचा अेकंदर आढावा काढून हाती काय राहते ते पाहण्यासाठी जर आपण ती मातीची मूठ थोडीशी चाळून पाहू लागलो, तर असेच दिसून येते की, मुसलमानास तरी हा सवदा अेकंदरीत फारसा स्वस्त पडला नाही. कारण अेका हिंदु राजपालासाठी त्यांची तीन माणसे कामास आली. राजपालवर पहिला गाजी जो चालून आला, तो सात वर्षे तुरुंगात सडत आहे. दुसरा गाजी चालून आला तो चवदा वर्षे तुरुंगात डांबला गेला. ह्या तिसऱ्या गाजी अिलामदिनने राजपालला मारले पण तो तर स्वतःच फाशीवर खेचला जाअून पुरता ठार झाला अेका हिंदूसाठी मेले नि अर्धं मेले मिळून तीन मुसलमान सर्ची पडतात ! त्यावर पुन्हा पिंड दक्षिणा म्हणून खटल्यापायी प्रिव्ही कौन्सिलपर्यंत चार पाच लाखावरचा व्यय ! अशा महाग दराने हे नसते भाडण विकत घेण्याची मुसलमानाची खुमखुम अजूनही जिरली नसेल, तर त्यानी ते सुखेनैव चालू द्यावे. प्रत्येक मुसलमान अेक गाजी अिलामदिन झाला तरी ते आहेत सात कोटी. अेक हिंदु राजपालास तीन मुसलमान—याप्रमाणे फार फार तर तीन कोटी हिंदूवारी तो सात कोटी गाझीचा सगळा परिवार.

अगदी स-गळा कामास आला, तरी हिंदु १९ कोटी बाकी अुरणारच आणि मुसलमान ? शून्य !

ही गोष्ट ध्यानात ठेवून आता यापुढेही हा गुंडपणा चालविण्याची मुसलमानाची छाती असेल तर त्यानी सुखाने चालवावा ! राजपालाला मारले म्हणजे हिंदु दबतील ही त्याची समजूत त्याचाच सत्यनाश करण्यास कारणीभूत होअील हे या प्रकारावरून अुघड होत आहे. हिंदु पूर्वी केव्हा केव्हा गुंडगिरीने दबत. पण आता हे संघटनयुग आहे. आता ही तुमची गुंडगिरी तुम्ही थकाल तोपर्यंत सुखाने चालू द्या !

वास्तविक पाहता ' किशन तेरी गीता जलानी पडेगी ' अशा मुसलमानी कृष्णनिंदेस अुत्तर म्हणून राजपालाने ' रंगीला रसूल ' लिहिले. त्यात महमदमहाशयाच्या चरित्रातील अैतिहासिक गोष्टीच बहुधा असल्याने कोर्टाने राजपालास निर्दोषी म्हणून सोडून दिले. पण मुसलमानास हवेच होते तर त्यानी फारतर त्या पुस्तकातील विधाने खोडणारे दुसरे अेक पुस्तक प्रसिद्ध करावयाचे होते. कोटिक्रमाला कोटिक्रम चालू राहता. पण नाही. मुसलमानाना कोटिक्रम कशाशी खातात हे काय ठाअूक ! त्यानी लगेच आपला पैशाचिक लाठीक्रम मध्ये घुसडला ? पूर्वी त्या लाठीक्रमानेच केव्हा केव्हा काम भागे म्हणून त्यास तो चटक लागली. पण आता ते दिवस गेले. राजपाल धीटपणाने आपले आर्यसमाजी प्रचारकार्य करीतच चालला. मेला तेव्हा तीन मुसलमान खर्ची पाडून आणि हिंदूपेक्षा मुसलमानासच तो सवदा महाग करून मेला. त्याने हिंदुधर्माचा पक्ष घेतला म्हणूनच त्यास मरण आले. यास्तव हिंदु त्याचा धर्मवीर राजपाल म्हणूनच गौरव करू लागले आणि शेवटी जेव्हा दोन लाख मुसलमानांच्या डोळ्यातून पाण्याची टिपे आली, त्यानाही हाय तोबा ! करणारी प्रेतयात्रा ' गाझी ' अिलामदिनचे प्रेत घेअून काढावी लागली, तेव्हाच या 'रंगीला रसूल' प्रकरणास खरी मूठमाती मिळाली ! !

ज्या मुसलमानाने ' किशन तेरी गीता जलानी पडेगी ' म्हणून म्हटले आणि हा वाद माजविला, त्याच्या पापाचे प्रायश्चित्त दुसऱ्या मुसलमान अिलामदीनच्या फाशीवर द्यावे लागले आणि दोन लाख मुसलमानाना आरडत ओरडत त्याला मूठमाती द्यावी लागली.

राजपालाच्या सवद्याअितका महाग जरी नसला, तरी अलिबागच्या पटवर्धनाचाही सवदा मुसलमानाना स्वस्त तरी पडला नाहींच. पठाणाने पटवर्धनाना सुरीने भोसकले; पण पठाणास फाशीवर लटकून लवे व्हावे लागले. शेवटी अेकास अेक—डोळ्यास डोळा—दातास दात—गळ्यास गळा, जिवास जीव ह्या अटीवरही जरी मुसलमानाची हा खेळ असाच चालू ठेवण्याची छाती असेल, तरीही आमची ना नाही. त्याच्या सात कोटीस आमच्या सात कोटीचा छेद गेला तरी बाकी अुरले पंधरा ! —कोटी ! ! —हिंदु ! ! !

कोणी भला माणूस सहज विचारील की, अहो, पण हे डोळ्यास डोळा आणि दातास दात असे चालायचे कुठपर्यंत ? तर मग आम्ही म्हणू 'भावड्या माणसा, जो आततायीपणाही होऊन होऊन खाजवून खरुज काढतो त्याचे अंग रक्तबंबाळ होऊन त्यास खाजविण्याचा कंटाळा येईपर्यंत ! ते त्यास विचार ! आणि त्याची हौस नाहीच जिरली तर ? चाललाच आहे हा खेळ असा. आम्ही नको म्हणून काय होते ? तो होऊन चालून येतो, तिथे रडून काय अुपयोग ? दोघांपैकी कोण्या अेकाचे तरी दोन्ही डोळे आणि बत्तीसही दात अुखडून पडेतो हे डोळ्यास डोळा आणि दातास दात असेच चालणार असेल, तर अपापाचे सारे दात अुपटून खेळ बंद होण्यापेक्षा शक्य तर पापाचे दात अुखडून तो खेळ बंद करणे निदान अधिक अन्यायाचे तरी होणार नाहीच नाही ? म्हणून पुन्हा अेकदा हमी देअून सांगतो की, यापुढे हिंदु काही 'सोड' म्हणून म्हणत नाहीत. आततायीपणा धारी गुड्च्या चोतच नव्हे तर अगदी निपचीत पडेपर्यंत—असेल ज्याची छाती त्याने झुजून घ्यावें ! ह्या निश्चयास धर्मवीर राजपालाची चिता साक्ष ! दीनदयाळ पटवर्धनाचे प्राण साक्ष ! कारण ते दोन्हीही सौदे हिंदूना काही महाग पडले नाहीत—मुसलमानांना स्वस्त तर पडले नाहीतच नाहीत. तेव्हा आणखी कोणा मुसलमान कवीची छाती असेल तर त्याने 'किशन तेरी गीता जलानी पडेगी' अशी कविता पुन्हा लिहावी म्हणजे त्या सगळ्या नाटकाची पुनरावृत्ति होत होत पुन्हा अेखादा अिलामदीन फासावर लटकत लंबा होअील; त्यास आमची काही आडकाठी नाही. तुम्हास परवडेल तो तुम्ही पाहिजे तर तुमच्या प्राणान्तापर्यंत देखील ह्या गाजीपणाच्या निशेचा अुपभोग घेत असावे.

हो; परंतु अिलामदीनला दोन लक्ष मुसलमान गाजी म्हणून, 'शहीद' म्हणून, 'हुतात्मा' म्हणून लाहोरला मिरवीत असता त्या गोंगाटाने आमच्या महात्मा गांधीच्या समाधीचा लवमात्र भंग झालेला दिसत नाही कसा ! ती अभंग समाधी आहे असे म्हणावे तर राजपालाच्या प्रेतास जेव्हा लाहोरच्या लाखो हिंदूनी मिरवीत नेले आणि 'धर्मवीर राजपालकी जय' म्हणून गर्जना केल्या, तेव्हा हीच समाधि पिसाळून अुठून अेखाद्या लोहाराच्या भात्यासारखी फोफावत, अेखाद्या नागिणीसारखी फुत्कारत त्या मिरवणुकीस डसावयास धावली होती. राजपालाचें प्रेत मिळेना पण हिंदूनी पोलिसाच्या मोठ्या मारहाणोस न जुमानता ते प्रेत सोडवून आणले. अुभे हिंदु लाहोर त्या राजपालाच्या प्रेतावर फुले अुधळीत आणि 'जय धर्मवीर' म्हणून गर्जत चालले. मुसलमानांनी हिंदूच्या त्याच चिकाटीची नक्कल करून अिलामदीनचे प्रेत सोडविलें आणि 'गाझी' म्हणून गर्जत मिरविले. ह्या दोन गर्जनात अिलामदीन आततायी असल्याने, सुरा अुपसून हत्या त्यानेच केली असल्याने वास्तविक पाहता कोणाही अहिंसेच्या खऱ्या भक्तास त्याच्या मिरवणुकीचा अधिक तिटकारा यावयास पाहिजे होता; पण नाही. तिचा तिटकारा महात्मा

गांधींस आला नाही. त्याला गाझी म्हटल्याविषयी मुसलमानास दोष देणारा अेक शब्दही त्यांनी लिहिला नाही; पण राजपालला धर्मवीर म्हणून गौरविल्याविषयी मात्र त्यांची समाधि, शांति हिंदूंना शिव्या हासडण्याअितकी चिडून अुठली.

ते म्हणाले,— महाराष्ट्रीय वाचकास माहीत नसेल म्हणून पंजाबच्या हिंदूंच्या जिव्हारी लागलेली ही गोष्ट सांगतो की,—गांधीजी चिडून म्हणाले,— राजपाल अेक केवळ पुस्तक विक्रेता मुसलमानांच्या मनोवृत्ति दुखविणारे पुस्तक त्याने छापले त्यापायी तो मारला गेला त्यामध्ये त्याने कोणते मोठे धर्मवीरत्व दाखविले! त्याने छापलेली पुस्तके सगळी विकली गेली होती. तेव्हा त्याला चवडीचाही तोटा झाला नाही, मग कोणचा स्वार्थत्याग त्याने केला?

म. गांधीच्या म्हणण्याचा अेकंदरीत मथितार्थ असा की, पोटासाठी पुस्तक छापले ते पैसे घेअून विकले. त्या धंद्याच्या भानगडीत तो मारला गेला. त्यात धर्मवीरत्व ते कसले? यास्तव राजपालला 'हुतात्मा' म्हणून गौरविणे हिंदूंचा केवळ मूर्खपणा आहे.

'राजपालच्या पुस्तकाची विक्री झाली होती' म्हणून तो स्वधर्मार्थ मारला जात असताही त्यास हुतात्मा म्हणायचे नाही, मग गांधीजींची पुस्तकेही ते नेहमीच विक्रीस आल्याने आणि विशेषतः त्यांचा 'यंग अिंडिया'ही वर्गणी अुकळूनच चाललेला असल्याने, त्यास तरी महात्मा का म्हणावे? 'राजपालाला धंद्याच्या भानगडीत मृत्यू आला!' असे म्हणण्याचा निर्लज्ज कोटिक्रम असेही म्हणू शकेल की, टिळकांनाही धंद्याचे—केसरी पत्राचे—भानगडीतच कारावास घडला, शिक्षा झाल्या, मग त्यास लोकमान्य का म्हणा!

'राजपालाची धंद्याच्या भानगडीत हत्या झाली' समजा झाली. पण त्याने हत्या केली तर नव्हतीना? मग धंदा करीत होता म्हणूनच राजपालला 'धर्मवीर' म्हणून म्हणताच चिडून जाणार हे न्यायाचे आणि अहिंसेचे आचार्य, सुरा खुपसून दुसऱ्यास छपून भोसकीत सुटणाऱ्या भ्याड हत्यारी खिलाफदीनला गाझी म्हणणाऱ्या मुसलमानाविषयी का नाही निंदेचा अेक चकार शब्द काढीत? न जाणो क्वचित् असेही असेल की, हिंदूला मुसलमानांनी सुरा घेअून भोसकणे हे अहिंसेच्या तत्त्वास तितकेसे जाचक नसेल—जसे अिंग्लिशांसाठी जर्मनांना ठार मारणे हेही अहिंसे-विरुद्ध नव्हते.

महाशय राजपालांनी केवळ धंदा करूनच जीवन घालविले असते, तर तो मुसलमानांच्या डोळ्यात अितका खुपताच ना! ते आर्य समाजाचे कट्टर अभिमानी आणि सेवक होते. श्रीकृष्णाची मुसलमान करीत असलेली निंदा सहन होअीना म्हणूनच त्यांनी 'रंगीला रसूल' हे पुस्तक त्यातील धोका माहीत असून जाणून बुजून प्रसिद्ध केले आणि मुसलमानांचे डोळे त्या अंजनाने झणझणू लागताच ते अुलट प्रसन्न झाले. त्यांना धंदा करावयाचा होता, तर श्रद्धानंदांच्या मारेकऱ्याचे

अबदुल्ल्याचें चरित्र लिहून आणि त्यात ' भाओी अबदुल्ला ' म्हणून गौरवपर नाव देवून 'यंग-अिंडियासारख्या त्याच्या प्रती मुसलमानांत लाखानी खपविल्या असल्या किंवा ' आपल्या त्या शूर मोपल्यांच्या ' धर्मनिष्ठेचे गोडवे गाणारे आणि नळबाजारात त्यांनी अत्याचार केलेच नाहीत म्हणून सागणारे अेखादें कल्पित अितिहासाचें पुस्तक प्रसिद्ध करून खिलाफत कमिटीकडूनच नव्हे तर साबरमती आश्रमातूनही त्या हिंदुद्वेषाच्या पाप पुण्याचा पुरस्कार शेकडो रुपयात मिळविला असता !

निदान पक्षी आपले भोपाळचे नबाब तर होतेच की नाही ! हिंदु जनता धर्मच्छलाने त्या दुष्ट राज्यात सन्त्रस्त होत असता मुसलमानी गुंडगिरीला बळी पडणाऱ्या त्या राज्यातील हिंदु मुलांमुलींचे आक्रोश 'कर्मवीर'सारख्या गांधीवेड्या पत्रातूनही प्रति अकी अेकू येत असता, हिंदु भाषा, हिंदु धर्म, हिंदु संस्कृति यांस मारून सारखें मुसलमानीकरण त्या राज्यात चालले असता महात्माजी जसे त्या भोपाळाव जाअून जाणून बुजून सागते झाले की, भोपाळची प्रजा नवाबाच्या राज्यव्यवस्थेने सतुष्ट आहे ! ज्या नवाबाची नुसती अेक बेगमेची मोटार अितकी मूल्यवान आहे की, तीत स्नानगृहे, पानगृहें, शय्यागृह असा राजवाड्याचा राजवाडाच अुठवून दिला आहे आणि भर युरोपात तिला अेका चढाओढीत अलीकडेच भव्यतेत पहिल्या क्रमांकाचा पुरस्कार मिळाला आहे— ' त्या नवाबाची, गांधीजी म्हणाले, ' राहणी अगदी साधी आहे ! आणि तो जवळजवळ रामराजाच आहे !'
आम्ही म्हणतो, जर महाशय राजपालला केवळ पुस्तक विक्रीचा धंदाच करावयाचा असता, तर त्याने 'भोपाळचा रामराजा आणि त्याचा भाट साबरमतीचा वाल्मीकि' म्हणून अेक पुस्तक प्रसिद्ध करून हे गांधीविरचित भोपाळच्या नवाबाचें चरित्र त्यात छापलें असतें. म्हणजे महात्मा गांधीसारखा, महाशय राजपालाचा हातही भोपाळच्या नवाबानी ओला केला असता; अितकेच नव्हे तर त्या राजपालालाही मुसलमान लोक महात्मा म्हणून म्हणू लागते; हिंदु तर म्हणतेच म्हणते. कारण जो सावावर पडलेल्या घावापेक्षा चोरावर पडलेल्या घावास पाहून अधिक दु:खार्तपणे रडतो, त्यासच ते महादयाळू म्हणतात. जो मनुष्याच्या मुलाच्या पुढचे दूध ओढून घेअून, सापाच्या पिलास पाजतो, त्यासच ते महासात्त्विक समजतात. जो दोन्ही पायावर न चालता डोक्यावर चालतो त्यासच ते महान् तपस्वी मानतात.

हिंदु धर्माची निष्ठा आणि हिंदुत्वाचा यथार्थ अभिमान महाशय राजपालांनी तिनदा प्राणावर बेतली तरी सोडला नाही म्हणूनच तो खरा धर्मवीर होता. म्हणूनच संघटनाभिमानी लाखो हिंदूनी त्याच्यावर कृतज्ञतेचीं फुले अुधळली आणि म्हणूनच महात्मा गांधीस ते बावडें लागले. कारण संघटणाची प्रचंड चळवळ त्याच्या शिव्याशापास कवडीच्या अुधारीने न विचारता भरभराटत आहे. हें त्यास

सहन होत नाही हीच खरी गोष्ट आहे. त्याचा वचपा काढण्यासाठी ते संघटनावादी हिंदु ज्याला धर्मवीर म्हणतील त्याची हटकून निंदा करतात, आणि ज्याची निंदा करतील त्या भोपाळराज्यासारख्या हिंदुद्वेष्ट्या सस्थानिकांची हटकून स्तुति करतात. संघटनात त्यांचा वडेजाव नाही म्हणून त्याचा द्वेष आणि संघटनास मिळावें तर मुसलमानांची लाठी आणि सुरे डोक्यावर गरगर फिरत राहणार—ही भीति; हा पेच आहे. दुसरे काय?

बरें झालें; लंकेत सध्या रावणाचें राज्य नाही म्हणून. नाही तर हिंदु संघटणाच्या मत्सराने हिंदुद्वेष्ट्या भोपाळच्या नबाबाची जशी त्यानी हटकून धंदेवाल्या पाठकांनाही लाजवील अशी स्तुति केली, तशीच ते लंकेला सादी दौऱ्यावर जाअून रावणाचीही स्तुति करावयास सोडतेना! भोपाळच्या नबाबाविषयी म्हटलें तसेंच म्हटल्यावाचून राहतेना की, 'रावण राज्यात सर्व प्रजा संतुष्ट आहे—अशोक वनातील बंदिवान् सीतेसुद्धा! रावण रामराजाच आहे!!'

—ता. ३० नोव्हेंबर १९२९

* * *

# (२०)

## शंकराचार्य महाराजांची नि जॉनबुल महाराजांची सूचना

छळकांची ही अेक जात असते. जगभर छळकांची विचारपरंपराही म्हणूनच अेकसारखी आणि अेकसाची बनते. मग तो छळक कोट पाटलून टोपीधारी कोणी जॉनबुल असो किंवा काषायकौपीन मुंडधारी कोणी पीठेश्वराचार्य असो.

जर कोणास याचें प्रत्यंतर पहावयाचें असेल, तर त्यांनी शारदा पीठाच्या शंकराचार्यांच्या वतीने प्रसिद्ध झालेली अंत्यज वर्गाविषयीची घोषणा पहावी! अंत्यज वर्गांना शिवणें हें देखील पाप असल्यामुळे त्या पापापासून या पापप्रवण प्राणिमात्रांचा बचाव करण्याच्या परम पवित्र अुद्देशाने ही घोषणा परमहंस परिव्राजकाचार्य श्रि. श्रि. श्रि. याजकडून काढण्यात आली आहे. ती घोषणा अगदी नवीन असल्यामुळे तीत काही तरी नवीनच लिखाण असेल म्हणून आम्ही ती वाचू लागलो. तों त्यातील बहुतेक वाक्ये यापूर्वी कुठें तरी वाचल्याचे आम्हांस स्मरू लागलें. विचारपरंपरा तर अगदी कोणत्या तरी जुन्या लेखातून चोरली असावी असा संशय येण्याअितकी परिचयाची भासली; पण नो पीठासारख्या अधिकारी

संस्थेची घोषणा असल्याकारणाने ती कोणाची तरी चोरून केलेली प्रत असें म्हणण्याचें धाडस आमचें हृदय करीना. तेव्हा शारदा पीठासारख्याच मानसिक परिस्थितीत असलेल्या दुसऱ्या कोणा तरी तशाच थोर आणि दलितावर केवळ दया करण्यासाठीच त्याना दळून काढण्याचें पुण्यकृत्य करण्यात निर्ढावलेल्या दयाळू व्यक्तीने पूर्वी अेखादी अशीच घोषणा काढली असावी, ती आपण वाचली असावी आणि ती जाणून बुजून प्रत करण्याचा हेतु नसताही मनुष्यत्व समान असल्याने समान मन स्थितीत समान उद्‌गार सहज निघण्याच्या नैसर्गिक प्रवृत्तीमुळे त्या जुन्या घोषणेसारखीच विचारपरंपरा या नव्या घोषणेत अुतरली असावी असा आमचा समज होअून जुनी घोषणा आपण कुठे पाहिली आणि कुठे ठेवली तें आम्ही आमच्या स्मृतीतील हृदयकपाटात आणि खोलीतील काष्ठकपाटात शोधू लागलो.

काही वेळाने आम्हांस तो कागद सापडला. फार आनंद झाला. आमच्या कल्पनेप्रमाणे तीही अेका थोर अधिकारसपन्न संस्थेची घोषणाच होती. अितकेच काय, पण ही शारदापीठाची घोषणा जशी 'श्रीमद् राजराजेश्वर महाराज' याच्या वतीची होती, तशीच तीही अगदी थेट त्याच राजराजेश्वर महाराज याच थोर नावास अलंकृत करणाऱ्या विभूतीची-होती ! ह्या अैतिहासिक साम्याचें जसें आम्हास कौतुक वाटलें, तसेंच वाचकासही वाटेल या आशेने आम्ही त्या दोन्ही घोषणातील महत्वाचा भाग बाजूस बाजू लावून छापीत आहो. या घोषणापैकी शारदापीठाची घोषणा सध्या सर्वांसमोरच असल्याने तिचा अुतारा जो आम्ही देत आहोत तो अक्षरशः खरा आहे किंवा नाही हें कोणासही परीक्षून पाहता येअील. केवळ अर्थ स्पष्टीकरणार्थ कंसामध्ये कुठे कुठे जी वाक्यें दिली आहेत तेवढी आमची आहेत. बाकी आम्ही शारदापीठाची घोषणा जशीच्या तशीच दिली आहे. त्यातील अहिंदु शब्द देखील बदलले नाहीत; कारण न जाणो हिंदु शंकराचार्यांचे लिखाणात म्लेच्छ शब्द वापरणे हाही सनातन धर्मच असेल ! दुसरी घोषणा जो आहे ती मात्र केवळ आमच्या कपाटात असलेल्या अेका प्रतीवाचून बहुधा अनुपलब्धच झाली आहे. तरीही तीतील लिखाण कुठेंतरी वाचलेले हजारो लोक विद्यमान असल्याने तिच्यातील वाक्याच्या यथावत्‌पणविषयीही शंकेस जागा अुरणारी नाही. ही नवी घोषणा शंकराचार्य महाराजाच्या वतीने अंत्यज वर्गास सूचना म्हणून निघाली आहे. ती अगदी तिच्याचसारखी असलेली जुनी घोषणा जॉनबुल महाराजांच्या वतीने शंकराचार्यांसुद्धा झाडून साऱ्या भारतीयासच आज्ञापत्र म्हणून निघालेली आहे. शंकराचार्य शारदापीठ हे केवळ महार चांभारांना अंत्यज, अस्पृश्य म्हणून त्यांस ज्या त्यांच्या धर्माप्रमाणे राहण्याचा अुपदेश देत आहेत, त्याच अत्यज धर्माप्रमाणें राहण्याचा अुपदेशही महाराज जॉनबुल याची घोषणा शंकराचार्यांसुद्धा सर्व भारतीयांस अंत्यज, अस्पृश्य समजून हिंदी लोकांस देत आहे. त्या दोन्ही घोषणा अशा :—

## शंकराचार्य महाराज यांची

### धर्मनिष्ठ भारतीय अस्पृश्य वर्गास सूचना

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य जगद्‌गुरु श्रीशंकराचार्य शारदापीठाधीश्वर श्रीमद्राजराजेश्वराश्रम महाराज यांच्या वतीने अस्पृश्य वर्गास शुभ आशीर्वादपूर्ण सुचविण्यात येते की,—

१ थोड्या दिवसापासून लोभलालचीला वश होऊन कित्येक धर्मद्रोही लोकांनी स्पर्शास्पर्श मर्यादा म्हणजे सृष्टिक्रमाप्रमाणे चालत आलेली प्रणालिका तोडून टाकून सब गोलकार करण्याकरिता अत्यजस्पर्श करण्याचा आणि अत्यजांना उच्च वर्णाप्रमाणे देवमंदिर प्रवेश अधिकार देऊन उच्चवर्णीय प्रजेला भ्रष्ट करण्याचा आपमतलबी आणि धर्मद्रोही यत्न चालविला आहे या धर्मद्रोहाच्या वावटळीत तुम्ही अस्पृश्यांनी सापडू नये

२ तुम्ही अत्यज भारतवर्षाचीच प्रजा आहात व हिंदु जातीचे अेक अंगही आहात भारतीयांचा मुख्य धर्म (अर्थात गावात कुत्रे चालते तितके आम्हा स्पृश्याशी लगटून मार्गाने न चालणे, म्हशी पाणी पितात त्या स्थळीही नदीचे पाणी न पिता त्याच्या अगदी खाली नदीला शिवणे, मुसलमान किटल्या धुतात आणि कुत्री पाणी पितात, त्या चवदार तळ्याची चव चाखून ती भ्रष्ट न करणे, आम्ही सर्व लाभकारक धंदे करीत असता तुम्ही गावच्या स्मशानाच्या पलीकडे अेखाद्या खोपटातच राहणे अित्यादि पवित्र धर्मसूत्रानुरूप) आपला धर्म पाळाल, तर त्यातच तुमचें कल्याण आहे

३ ह्या नवीन धर्मद्रोही अत्यजोद्धारण लोकांनी कधी तुम्हास अन्नवस्त्र दिले आहे काय? (जसे आम्ही ग्रहण सुटले म्हणजे फाटक्या तुटक्या चिंध्या आणि सणावारास उष्टया पत्रावळी याचे सनातनी दान तुम्हास देतो) तुमचे ज्यामध्ये खरोखर कल्याण आहे असे त्यांनी काय केले आहे? (स्वामी श्रद्धानन्द, लाला लजपतराय, हिंदुसभा, यांच्या दलितोद्धार मडळासारख्या संस्थांनी हजारो अस्पृश्यांस पोटापाण्यास लावले ही गोष्ट साफ खोटी आहे ) तुमचे ज्यामध्ये खरोखर कल्याण आहे त्यामध्ये आम्ही अुच्च सनातनी लोक तुम्हाला साहाय्य करण्यासाठी सदोदित तयार आहोत ते धर्मद्रोही पुढारी तुमचे खरे शत्रु होत त्यांच्या वावटळीत सापडाल तर त्याचा परिणाम तुम्हास मुशीगज-पद्धतीप्रमाणे भोगावा लागेल, मोठे कलह अुत्पन्न होतील

४. तेव्हा या धर्मद्रोही चळवळयापासून सावध रहा आपला अस्पृश्य धर्म पाळून रहाल, तर परमेश्वर तुमच्यावर कृपा करून तुम्हाला पुढच्या जन्मी अुच्च वर्णामध्ये जन्म देअील (कदाचित् जसा आजचा अेखादा शंकराचार्य हा गेल्या जन्मीचा चांभार असू शकेल—तसाच अेखादा आजचा महार पुढच्या जन्मी अुच्च वर्णात जन्मून पुढचा शंकराचार्यही होअू शकेल याहून मेल्यानंतरचे आशादायी

भविष्य तें काय असणार? म्हणून मरेतो या जन्मी कुत्र्याहूनही अस्पृश्यावस्थेतच आनंद मानून तोच धर्म मानून रहा )

## जॉनबुल महाराज यांची

### राजनिष्ठ भारतीय प्रजावर्गास सूचना

श्रीमत्परमहंस (हंसाप्रमाणे अत्यंत गौरवर्ण असलेल्या) परिव्राजकाचार्य (चारी खंडात ज्याच्या स्वारीचा सारखा संचार चालू आहे ते) आंग्ल द्वीपाधीश्वर, श्रीमद्राजराजेश्वर (तुमच्या शंकराचार्यांसुद्धा सर्व राजामहाराजाचे अधिराज) श्रीमत् जॉनबुल महाराज यांच्या वतीने आमच्या भारतीय पददलित प्रजाजनास शुभ आशीर्वादपूर्वक आज्ञापिण्यात येते की—

१. थोड्या दिवसापासून लोभलालचीला वश होऊन कित्येक राजद्रोही लोकांनी (उदाहरणार्थ टिळक, लजपतराय, चाफेकर, सावरकर, अरविंद, गांधी, गोखले इत्यादि मोठाल्या नोकऱ्या न मिळाल्यामुळे असंतुष्ट झालेल्या दुष्टांनी) राज-प्रजा मर्यादा म्हणजे 'नाविष्णु पृथिवीपतिः' ही सृष्टिक्रमाप्रमाणे चालत आलेली प्रणालिका मोडून आम्ही गोरे इंग्रज पृथ्वीपति, तुम्हा काळ्या हिंदु लोकांचे राजे म्हणून विष्णूसारखे पूज्य, तुम्ही प्रजा म्हणूनच आमचे दास ही व्यवस्था भंगण्याचा आणि गोऱ्या इंग्रजांशी काळ्या हिंदी लोकांचा बरोबरीचा अधिकार सांगून सब गोलकार करण्याचा आणि आमच्या राजमंदिरातून या हीन-वर्णीय प्रजेस प्रवेशादिक अधिकार देऊन भ्रष्ट करण्याचा राजद्रोही प्रयत्न चालविला आहे. ह्या राजद्रोहाच्या चावटळीत तुम्ही आमच्या काळ्या हिंदी प्रजेने सांपडू नये

२ तुम्ही हिंदी लोक आमची प्रजा आहात आणि आमच्या ब्रिटिश साम्राज्याचे अंग अगही आहा. तुमच्या सनातन वर्णाश्रमधर्माप्रमाणे ह्या साम्राज्याचाही मुख्य धर्म वर्णाश्रमच म्हणजे colour bar हा आहे तुम्ही हिंदी काळे दास, प्रजा, आणि आम्ही इंग्रज गोरे, स्वामी, राजे हा वर्णाश्रम धर्म तुम्ही पाळावा. (अर्थात् आम्ही फर्स्ट क्लासमध्ये असलो तर तुम्ही त्या डब्यात बरोबरीने न बसणें, रस्त्याने इंग्रज पाहताच त्यास सलाम करणे, वरिष्ठ गोरा ऑफिसर रागावला तर त्याच्या लाथा प्रसाद म्हणून खाणे, आम्ही गव्हर्नर इत्यादि अधिकार चालविणे आणि तुम्ही खर्डेघाशी, चपराशी, बबर्जी बनणे, ऑफिस वगैरेमध्ये नगरातून आम्ही वसणे आणि तुम्ही गावाबाहेरच्या गचाळ 'Coloured area' तच वसणे, शाळातून ट्राम्वेतून, मार्गावरून आमच्या बरोबरीने न चालणे—त्या गोऱ्याच्या मार्गास न विटाळणे, आम्ही तुम्हावरचे स्वार, तुम्ही आमचे भारवाही पशु हा जो राजाप्रजासंबंधीचा सृष्टिनियम तो आनंदाने पाळणे) हा तुमचा धर्म तुम्ही पाळाल तर त्यात तुमचे कल्याण आहे

३. या नवीन राजद्रोही भारतोद्धारक म्हणविणाऱ्यांनी कधी तुम्हा हिंदी प्रजेस अन्नवस्त्र दिले आहे काय? त्यांची ही लबाडी उघडकीस यावी म्हणून

तुमच्या कल्याणासाठीच आमच्या राज्यात आम्ही जवळ जवळ दरवर्षाआड मोठमोठे दुष्काळ पाडून दाखवितो आणि तुम्ही काळे लोक लाखांनी अन्न अन्न करून मरत असता आम्ही लाखांनी पगार अुपटीत विलायतेत धाडतो (हेतु हा की, तुम्हास हे राजद्रोही भरपूर अन्नवस्त्र देतात की नाही याची कसोटी तुम्हास दाखवावी) तुमचे ज्यामध्ये खरोखर हित आहे (अुदाहरणार्थ भारामर कर बिनबोभाट देणे, हिंदुस्थानातील सोनेनाणे झाडून सारे विलायतेस वाहून नेअू देणे, आमच्या शत्रूची दारू सपेतो त्याच्या तोफांचे खाद्य बनणे) अशा कार्यी आम्ही अुच्चवर्णीय (White Races) तुम्हाला मदत द्यावयास सिद्ध आहोत हे टिळकादिक राजद्रोही पुढारीच तुमचे खरे शत्रु आहेत त्यांच्या नादाळीत सापडाल तर त्याचा परिणाम (जालीयनवाला बागेप्रमाणे) तुम्हास भोगावा लागेल. मोठा कहर गुजरेल

४. तेव्हा या राजद्रोही चळवळीपासून तुम्ही सावध रहा राज्यकर्ते अिंग्रज ते विष्णु समजून प्रजेचा दासधर्म पाळून रहाल, तर परमेश्वर तुमच्यावर कृपा करून पुढच्या जन्मी अिंग्रज जातीतच, क्वचित् अिंग्लंडमध्ये तुम्हास जन्म देअील. (न जाणो क्वचित् त्या मेल्यानंतरच्या पुढील जन्मी लॉर्डात जन्मून ब्रिटिश साम्राज्याचे मुख्य प्रधान व्हाल — नव्हे — राजवाड्यात जन्मून राजे व्हाल — पुढील जन्मी — मेल्यानंतर केवढे आशादायी भविष्य! )तेव्हा त्यावर दृष्टि ठेवून या जन्मी (मरेतो आमच्या पगाराची ओझी वाहणारी संतुष्ट गाढवे होअून) प्रजाधर्माचे यथावत् पालन करा

—ता १८ डिसेंबर १९२९

\+ + +

# (२१)

## सर टेगार्टच्या दंड्याविरुद्ध चितागांगचा प्रतिदंडा

जिकडे पहावे तिकडे निर्बंधभंग चाललेला आहे! हिंदी लोकांचा निर्बंधभंगाचा खेळ पाहता पाहता प्रत्यक्ष अिंग्रज सरकारला देखील निर्बंधभंगाच्या ह्या साथीत सामील होण्यावाचून राहवेनासे झाले

अिंग्रज सरकारच्या सर्व खेळाडूत कलकत्त्याचे सर चार्लस टेगार्ट हे अत्यंत तडफदार खेळाडू म्हणून पूर्वीपासूनच प्रसिद्ध आहेत तेव्हा या निर्बंधभंगाच्या खेळास अगदी रंग चढत असता त्यास सगळ्यांचे आधी त्यात अुडी घ्यावीशी वाटावी आणि त्या अुडीसरशी त्यांनी सगळ्या सरकारी आणि निमसरकारी खेळ गड्यांवर ताण करावी हे साहजिकच होते

यें सेनगुप्त, सुभाषबाबू आणि मडळी नुसत्या मिठाच्या निर्बंधाचा भग करतात काय ! सर चार्लस टेगार्ट म्हणाले, थावा मी निर्बंध प्रथाचाच, अुम्या भारतीय, दडविधानाचाच, अिडियन पीनल कोडाचाच, भग करून टाकतो घ्या ! असे म्हणून ते वाहेर पडले आणि नीट जे वाहेर पडले आणि नीट जे पहिले घर दिसले, त्या सरस्वती छापखान्यात शिरून व्यवस्थापक मुखर्जी ह्याच्या अगाशी लगटले ! मुखर्जीनी विचारले, 'पण तुमच्यापाशी 'वारट ' आहे का ? ' सर टेगाट रागाने फणफणत ओरडले, 'चूप रहो ! वारट ? ह वघ वारट ! ! '

स्वत त्या कलकत्याच्या पोलिस कमिशनरने मुखर्जी महाशयाच्या डोक्यावर आपला पोलिसी दडा जोराने गरगर फिरवीत म्हटले, 'ह वघ वारट !' याच्यापुढे ह्या दडा वारटानच सर्व कारभार चालणार !

आपल्या थोर थोर पुढाऱ्यानी मिठाचा निर्बंधभग केला तर सरकारच्या प्रत्यक्ष पोलिस कमिशनरनेच सगळ्या अिडियन पीनल कोडाचा आणि क्रि प्रोसिजरचाच निर्बंधभग करून टाकला ! सरकार देखील महात्मा गाधीच्या चळवळीत सामील झाल आता मात्र निर्बंधभगाच्या चळवळीस विरोध असा कोणाचाच राहिला नाही दडा हेच वारट ! गायीत जशा हिंदूच्या तेहतीस कोटी देवता शिरून बसतात तशा या अेक्या 'दडयात ' अिग्रजाचे तेहतीस कोटी निर्बंध घुसून सामावले जातात आता अमक कलम आणि अमक कोड आणि अमका छेदक हे पाठ करावयास नको, अेक शब्द ध्यान्यात ठेवला की पुरे — दडा ! दडा हाच निर्बंध, हाच नियम, हीच नीति, हाच धर्म — हेंच वारट ! दडा अिग्रजी कारभाराचे सगळे मम अेका शब्दात येतें, पण जो शब्द आजवर अेखाद्या गुरुमत्रासारखा गुप्त राखल्यामुळे मूर्ख लोक त्या अिग्रजी सत्तेची घटनासूत्रे पीनल कोडादि पन्नास कोडात धुडीत वसत असत, तो शब्द सर टेगार्टने स्पष्टपणे अेकदाचा सागून टाकला ह फार अुत्तम झाल — दडा ! यात अिग्रजाच्या शक्तीचे सारे मर्म आले 'दडा' हच अिग्रजी अस्तित्वाचे वारट ! — आणि 'सवशन'हि ! ! !

' होय ना ? तर मग ' चितागागचे क्रातिकारक म्हणाले, 'दडा तर दडा ' निर्बंधनियम, भयभानि, चालचलणूक, सारी पायाखाली तुडवून अिग्रजी सत्तेच्या ह्या 'चुप रहो ! दडा हच वारट ! ' म्हणून दिलेल्या आव्हानासरशी दड थोपटून चितागागच्या क्रातिकारकानीही प्रत्याव्हान दिले— 'चुप रहत नाही ! तुझ्या त्या दडयास हा घे प्रति दडा! तुलाच दड आहेत आणि आम्हास नाहीत की काय' तुम्ही सागदी वारट नाचवीत होता तोवर त्या ताल्यावर आम्हीही निर्बंधभगाची गाणी गात मिरवत होतो. पण आता जर तुम्ही हे वघ वारट म्हणून आमचे डोक्यावर दडा फिरवू पाहत असाल, तर आम्हीही पण त्या निर्बंधभगाची ललित-गीते सपवून ह प्राणभगाच्या रणगीताचे पहिल टिपरू मारल वघ ! ' जणू अस म्हणत ते अुग्र क्रातिकारक कोणास काही पत्ता देखील नसता अेकाअेकी चित्ता-गागला प्राणभगाची भयकर खळबळ अुडवून देते झाले !

ते प्राणभंगाची चळवळ करू निघालेले लोक सारे मूठभर होते. पराकाष्ठा शंभर असतील नसतील. पण या मूठभर प्राणभंगाच्या गर्जनेने निर्बंधभंगाच्या मैलभर पसरलेल्या हजारो मिरवणुकींच्या स्वीहाकारांनी, हाहाकारांनी किंवा जयजयकारांनी राजकीय वातावरण जितकें कधींहि हादरून गेलें नाही तितके हादरून दिलें. कारण त्या कठोर हृदयांनी स्वातंत्र्य-मोट टाकून अेकदम स्वातंत्र्य-पिस्तुलेंच मुठीत धरलीं. अेकदम प्राणाशींच गांठ घातली.

ती शुक्रवारची रात्र होती. त्यांतहि तो शुक्रवार 'चांगला शुक्रवार'! गुडफ्रायडे! अिंग्रजी अधिकारी सुटीची आणि सणांची मजा मारीत होते. अितक्यात रात्रीचा काळोख अेकदम चमकून अुठला! क्रांतिकारकांनी तीन तुकड्या करून अेकीने टेलिफोन अेक्स्चेंज कापून टाकला आणि पेट्रोल ओतून आग लावली. डॉक्क्याची आणि कलकत्याची रेल्वे यांचा संबंध तोडून दूर अंतरावरील रूळ अुखडून टाकले. मालगाडी रुळाखाली ओढून गाडीमार्ग सगळा बंद केला. दुसऱ्या तुकडीने आसाम बंगाल रेल्वे अधिकाऱ्यांवर हल्ला चढवून बंदुकीच्या दस्त्यांने त्याचें शिर ठेचून ठार मारलें. नंतर त्या स्टेशनलाही आग लावून तेथील बंदुका आणि दारू छिनली.

तिसऱ्या तुकडीने तर राखीव पोलिसांच्या छावणीवरच छापा घातला. अिंग्रजी सार्जंट आदिक पहारेकऱ्यांना घडाक्यासरशी अेकदम मारून टाकून ते शस्त्रागारात घुसले आणि नेता येतील तितक्या बंदुका, दारुगोळ्या अित्यादि शस्त्रांची लूट करून त्यांनी नेता येअीना त्या दारुगोळ्यास आग लावून दिली.

अितका सगळा भयंकर प्रकार झाल्यावर मॅजिस्ट्रेटसाहेब मोटारीतून बंदोबस्तास निघाले. पण मार्गात त्यांचाच बंदोबस्त केला गेला. क्रांतिकारकांनी त्यांचीच मोटार अडवून गोळ्या झाडून गाडीहाक्यास घायाळ केलें, शिपाअी ठार केलें—मॅजिस्ट्रेट मात्र मोठ्या कष्टांने जीव घेअून निसटू शकले.

अशा रीतीने बंड करून आणि शस्त्रें लूटून ते शंभर जणांचे पथक शेजारच्या दुर्गम पहाडांत घुसून सुखरूपपणे नाहीसें झालें!!

चांगल्या शुक्रवाराची रात्र चटगांवच्या अिंग्रजांना आणि अिंग्रजी सत्तेला अशी वाअीट गेली! सिंहाचें, ज्या नखांनीं व दातांनी भय वाटावयाचें त्या त्याच्या नखां–दातांनांच हात घालून ज्या क्रांतिकारकांनी अुपटून काढले, त्यांना त्या सिंहाच्या शेपटांचें भय थोडेंच वाटणार? शस्त्रागाराच्या भयाने ब्रिटिश सत्तेचे भय! तों शस्त्रागारालाच क्रांतिकारकांनी लुटून टाकलें. अिंग्रजांचीच शस्त्रें छिनावून अिंग्रजांची कत्तल केली. जुता भी अुसका और सिर भी अुसका! सर टेगार्टने मुखर्जीच्या डोक्यावर जो दंडा गरगर फिरवून म्हटलें, 'हें बघ वारंट!' तोच दंडा चटगांवला क्रांतिकारकांनी टेगार्टच्या अिंग्रजी भाअीबंदाचे डोक्यात हाणून म्हटलें, 'हें बघ मरण!'

कलकत्त्याला आणि कराचीलाही गेल्या महिन्यातच दंगे झाले. पण ते दंगे होते. हजारो लोक बेतबीत नसता पोलिसाच्या आणि सरकारच्या तत्कालच्या दडपशाहीने तत्काळ शुद्धबुद्ध होऊन ती मारहाण झाली. तरी देखील त्यात जो नेमका अिंग्रजावर भार पडला आणि भारतीय पुढाऱ्यावरच ज्या नेमक्या गोळ्या झाडल्या गेल्या, त्यामुळे निर्बंधभंगाचे पाऊल आपण होऊन प्राणभंगाकडे पडू लागले. परंतु या चितागांगचा प्रकार तसा नसून येथे जाणून बुजून क्रांतिकारकांनी अिंग्रजी सत्तेवर चढाओ केली. सत्तावनच्या स्वातंत्र्यसंग्रामाच्या अितिहासाचे फाडून नेलेले ते अेक पान होते. तो दंगा नव्हता; तो कोणा वडाच्या अुठावणीचा हुंकार होता

कारण सत्तावन साली प्रत्येक केंद्राचा हाच कार्यक्रम ठरलेला असे अकस्मात् टपाल तार रेल तोडून दळणवळण बंद पाडणे, अिंग्रजी सत्ताधाऱ्यावर होऊन छापा, स्थानिक अधिकाऱ्याला तत्काल मारणे, शस्त्रागारावर अधिकार आणि क्रांतिकारकांच्या जयाची द्वाही फिरविणे, हाच कार्यक्रम तंतोतंत अगदी घड्याळासारखा पार पाडला गेला अेक गोष्ट अुरली—सत्तावन साली सैनिक आणि पोलिस क्रांतिकारकांत प्रथम गुप्त रीतीने मिळून असत आणि अुठावणी होताच प्रकटपणे त्यांच्यात मिसळून जात! आणि त्याहूनही महत्त्वाचा जो फरक ह्या बंडाच्या स्थानिक अभिनयात आणि त्या सत्तावनच्या प्रचंड प्रयोगांत अुरला तो हा की, त्या क्रांतिकाराचा तो प्रचंड प्रयोग अेकदम सर्वत्र सुरु झाला होता अेकटे दुकटे अुठावणी नव्हे तर सार्वत्रिक अुत्थान! सर्वव्यापी अुठाव! ! ह्या दोन गोष्टी सोडल्या तर चितागांगची अुठावणी सत्तावनच्या पूर्वनिश्चित आणि आक्रमणशील स्थानिक कार्यक्रमाची पुरी पुरी बजावणी होती क्वचित् आगामी वादळाची पूर्व सूचना होती.

आणि म्हणूनच गव्हर्नर जनरल, गव्हर्नर, कलेक्टर, मॅजिस्ट्रेट, फार काय आमचे महात्मा गांधी देखील ह्या चितागांगच्या क्रांतिकारक हुंकारासरशी अकस्मात् चमकून, दचकून चिडून गेले! नाही तर अिकडे लाख लाख लोक जशी चळवळीची मौज करीत होते, मिरवणुकी मिठाच्या मुठी, पोलिसांची गंमत, हडताळी वातम्या की, आज अमक्याला पोलिसानी बोचकारले, तमक्याने तरी देखील मीठ सोडले नाही, तमक्या स्वातंत्र्यवीराला दोन महिने शिक्षा झाली, अमक्या देशवीराला तीन दिवस; सरकार आणि लोक दोघेही त्या चळवळीत कसे दंग झाले होते पण तो सारा रंग ह्या चितागांगच्या मूठभर शूरानी साफ बिघडवून टाकला! चळवळीच्या खेळात असे चिरडीवर कोणी येते का? त्या क्रांतिकारकांना खेळ म्हणून खेळताच येत नाही. अेकदम अेकेरीची बात! त्यामुळेच जसे अिंग्रजाचे आमच्याशी पटते तसे त्यांच्याशी पटत नाही!

आणि म्हणूनच आमची अिंग्रज सरकारला आणि लोकांना अशी साग्रह सूचना आहे की, अशा चिडक्या आणि अेकेरीवर येणाऱ्या ह्या लोकांचा वेळीच

नीट बंदोबस्त करावा. चितागांगचा हा शोककारक हल्ला त्यामागे अितका गाजावाजा झालेल्या चौरीचौऱ्याच्या दंग्याहूनही कितीतरी भयंकर अर्थाने भरलेला आहे. त्यातील स्वारस्य वेळीच ओळखून विशेषतः अिंग्रज सरकारने प्रत्येक ठिकाणी चितागांगची पुनरावृत्ति होण्याचे आधीच काही तरी मिटते घ्यावे.

गांधीजींनी चितागांगच्या या भयंकर अुठावणीला दोन चार शिव्या हासडून आज्ञा सोडली आहे की, माझ्या चळवळीत अहिंसेचे धारण म्हणून न पाळणाऱ्यांनी पडू नये, बाजूस रहावे. गांधीजींचे डोळे चौरीचौऱ्याच्या वेळेपासून अजूनपर्यंत अुघडू नयेत ही आश्चर्यकारक गोष्ट आहे!! अजून तरी त्यांनी ध्यानात आणावे की, अेकदा असले प्रचंड राष्ट्रीय वादळ अुत्पन्न झाले की, त्यास कोणा बार्डोलीच्या वाळवंटात 'माझ्या' नियमाचे तुरुंगाशी दाबून ठेवणे शक्य नसते.

महात्माजी! ही जी चळवळ चालली आहे ना, ही अेका अुभ्या क्षुब्ध राष्ट्राच्या अुत्थानासरशी होणाऱ्या हुंकाराचा प्रतिध्वनि आहे. ती माझी चळवळ नाही, ती तुमची नाही, ती भारताच्या युगायुगाच्या संचित पापपुण्याची, जयापजयाची, मानापमानाची, अेकवटित अशा कोटी कोटी जीवांच्या तळमळीसरशी अुद्भुत झालेल्या महाकालीची, प्रलयकारी शक्ति आहे. तीत 'माझा' 'तुमचा' 'त्याचा'—चा सगळ्यांचा भाग आहे. पण तिचे भाग्य, विधि, विधान आणि नियमन हे 'माझ्या', 'तुमच्या', 'त्याच्या' कोणाच्याच हाती नसून त्या महाकालीच्या अति मानुष अिच्छेवरच अवलंबून आहे. शांतिवाल्यांस बाजूस रहा, हे सांगणारे तुम्ही कोण? आम्ही कोण? हे राष्ट्र सगळ्यांचे आहे. त्याच्या दास्याच्या बेड्या तोडण्याची अुत्कंठा तुम्हाहूनही त्यास अधिक अुत्कटपणे लागली आहे. त्या बेड्या तुम्ही दर्भाने तोडू पाहता, आम्ही काठीने तोडू पाहतो, ते घणाने तोडू पाहतात. त्या बेड्या तोडून ही भारतभूमि स्वतंत्र करण्यासाठी झटण्याचा आणि झुंजण्याचा अधिकार प्रत्येकाचा आहे. त्यास कोण कोणास म्हणणार बाजूस रहा! तेव्हा हे असे होणारच असे गृहीत धरूनच आम्हा सर्वांनी त्या शक्तीशी तोंड दिले पाहिजे. आता यापुढे तरी अशा भलत्या आज्ञा, भलत्या

अिंग्रजाने व आम्ही मिळून घडवून आणावी हेच योग्य आहे—अजूनही शक्य आहे. या अुपर भवितव्यता बलीयसी !

पण ती भवितव्यता काहीही असली तरी आणि अगदी आजच जरी स्वातंत्र्याचे पार्सल अिंग्लंडने धाडून दिले, तरीही तें स्वातंत्र्य विनारक्तपात आणि विनाशस्त्राघात मिळाले असें म्हणण्यास आजही कोणासच तोंड अुरलेले नाही. कारण रक्तारक्ती आणि शस्त्राशस्त्री आज वीस वर्षे तरी सारखी चालू आहे. आणि सर टेगार्टचा दंडा आणि हा चितागांगचा प्रतिदंडा ही तिच्या अगदी अद्यावधि (up-to-date) अस्तित्वाची ताजी बातमी आहे !

—३ मे १९३०

\+ + +

# (२२)

## हो सुडाची ब्याद किंवा हत्येची ब्याद

लाहोरला सॉंडर्स या नावाच्या अेका अ. पोलिस सुपरिंटेंडेंटला कोणी गोळी घालून मारले आणि ते कृत्य लालाजींच्या हत्येचा सूड म्हणून करण्यात आले असा संशय सर्व जगास येत आहे ही गोष्ट आता सर्वप्रसिद्ध झालेलीच आहे. लालाजींवर सायमनच्या बहिष्कार-प्रदर्शक मिरवणुकीत जो अत्याचारी मार पोलिसांकडून पडला, त्या प्रसंगी सॉंडर्स हा तिथे अधिकारी म्हणून अुपस्थित होता आणि अर्थातच त्या दगलीत त्याचाही हात होता होही गोष्ट अनेक पत्रातून प्रसिद्ध झालेली आहे.

लालाजींनी स्वतः हाती छडी देखील घेतली नव्हती; अितकेच नव्हे तर मिरवणुकीत अितर काही लोकांच्या हातात लाठ्या होत्या, त्याही वेचून वेचून त्यांनी काढून घेतल्या आणि अशा लाठीशून्य समाजासह लाठीबाज, बंदूकबाज, बेयोनेटबाज पोलिसास तोंड दिलें. कारण अहिंसात्मक सत्याग्रहाच्या व्याख्येच्या चौकटीत ती मिरवणूक चपखल बसावी. तशी ती बसलीही आणि बिनलाठी जेव्हा लाठीशी तोंड देअू निघते, तेव्हा जो ह्या *अलौकिक युद्धकलेचा लौकिक परिणाम* व्हावयाचाच तो शेवटी निरपवादपणे झालाही. लाठीने बिनलाठीची छाती पहिल्या तडाख्यासरशी तडकविली; मिरवणूक अुधळविली गेली; लालाजी घायाळ झाले; पोलिसांची पाठ सरकारने थोपटली; आमची पाठ सरकारी लाठ्यांनी सडकून निघाली.

पुढे लालाजींचा अकस्मात् देहान्त झाला. लोक म्हणाले, लालाजी लाठीच्या घावास बळी पडले. सरकार म्हणाले, नाही; आणि पडले असले तरी 'शांतता आणि निर्बंध' मोडू पाहणाऱ्यांचा बंदोबस्त करीत असता तसे झाले तर तो आमचा दोष नाही. लोकांनी लालाजींच्या प्रेताची प्रचंड मिरवणूक काढली. लोकांनी लालाजींचे सुतक पाळले. पण सरकारास त्यामुळे दु:ख होण्याचे काही अेक कारण आढळले नाही. लोकांनी दारे, दुकाने दुकाने बंद केली. सरकारी ऑफिसे नेहमीप्रमाणे डोळ्यांच्या खिडक्या अुघडून ती लोकयात्रा, 'ते सुतक तो हरताळ यांची गंमत पाहत अुभी राहिली.

अितक्यात त्या लालाजींवर लाठ्या चालविणाऱ्या पोलिस तुकडीतील अेक वरिष्ठ अधिकारी सांडर्स हा अेका निरभ्र सकाळी ऑफिसबाहेर आला. त्याच्या मनात सायकलवर बसावे असे आले. तो सायकलवर बसला. तोच दुसऱ्या अेकाच्या मनात पिस्तुल झाडावेसे आले. त्याने गोळ्या झाडल्या आणि सांडर्स तत्काळ गतप्राण होअून धाडदिशी खाली पडला.

लाठीच्या मारानंतर काही दिवसांनी लालाजी मेले. तेव्हा ते लाठीने मेले नसावेत ही शंका सरकारास येणे साहजिक होते. पण गोळी लागताच सांडर्स मेला तेव्हा तो गोळीनेच मेला हे नि:शंक होते, म्हणून सरकारास तत्काळ दु:ख झाले. अशा वेळी कोणाही सहृदय मनुष्यास दु:ख होतेच आणि सरकार सहृदय आहेच.

लालाजी मेले तेव्हा लोकांनी त्यांची शोकयात्रा काढली, पण सांडर्स मेले

लालाजीचेही सुतक पाळले आणि सॉंडर्सचेही पाळले. 'ब्राह्मणे गवि हस्तिनि शुनि चैव श्वपाके च पंडिता समदर्शिन ।'

आणि पंडिताची समान बुद्धि जर निःपक्षपाती दुःख करू शकते, त्याहून काही तरी विलक्षण असे दुःख महात्म्याच्या बुद्धीला झाले नाही तर मग महात्म्याची बुद्धि ती काय राहिली !

वास्तव तुम्हा आम्हा सर्वांना सॉंडर्सच्या प्रकरणाविषयी जे दुःख वाटते त्याहून शतपट दुःख महात्मा गांधींना होणार हें अपेक्षितच होते आणि तसेच झाले त्या बिचाऱ्या महात्म्याचा आत्मा त्या दुष्ट वार्तेमुळे तळमळून गेला ! 'ही सुडाची व्याद' किंवा 'ही हत्येची व्याद' (This curse of assassination) नावाचा जो अेक लेख त्यांनी 'यंग अिंडिया'त लिहिला आहे, त्यात त्याच्या आत्म्यास झालेले हे तीव्र दुःख त्यांनी शक्य तितके ओकून टाकण्याचा प्रयत्न केला आहे तरीही ते सर्व बाहेर न पडता पोटातल्या पोटात अजून किती तरी मळमळत असले पाहिजे त्यांच्या अिंग्लिश मथळ्याचा सर्व अर्थ भाषांतरात चुकू नये म्हणून आम्ही त्याचे दुहेरी भाषांतर केले आहे

महात्माजींच्या सॉंडर्सच्या हत्येविषयी झालेल्या तीव्र दुःखाची जर कोणास कल्पना करावयाची असेल, तर ती या अेका गोष्टीने देखील स्पष्ट होअील की, स्वामी श्रद्धानंदांच्या वेळेस देखील 'हत्येच्या व्यादी'ची अितकी चीड त्यांच्या लेखांतून प्रकट झाली नव्हती. शहा मारले गेले, पशूसारखा त्यांचा देह बडवून चुरडला गेला पण गांधीजींच्या स्थितप्रज्ञतेची अेकही किंकाळी त्या वेळी कोणास अैकू आली नाही. मलबारच्या हत्याकांडाचे हालाहल देखील ब्र न काढता त्या स्थितप्रज्ञतेने पचवून टाकिले अेका अश्रूने देखील 'यंग अिंडिया'चे पान भिजू दिले नाही. पण ती स्थितप्रज्ञता सॉंडर्सच्या हत्येची वातमी अैकताच आम्हा प्राकृत जनांपेक्षाही विव्हल होअून दुःखाश्रूंत बुडून गेली. अितके ते कृत्य दुष्टपणाचे होते! काय सांगावे ! !

ह्या दुःखाच्या अुद्रेकासरशी महात्माजींना ह्या शोचनीय घटनेतील अितरांस न दिसलेली अनेक हृद्‌गते व्यक्त झाली आहेत कोणाच्याही ध्यानात न आलेली पहिली महत्त्वाची गोष्ट जी महात्माजींनी ह्या लेखाच्या पहिल्या वाक्यात सांगून टाकली ती ही की, ते कृत्य अत्यंत भ्याडपणाचे होते 'It was a dastardly act' होते का यापूर्वी कोणाच्या ध्यानात आले हें ! हिंदु पत्रे तर काय, हिंदुच ती. पण मुसलमानी पत्रांतून बऱ्या वाअीट धाडसी कृत्यांविषयी यथेच्छ अनुभव असणाऱ्या मुसलमानी लोकांनीही त्या कृत्यात जे निधड्ये साहस दिसून आले ते पाहून तोंडात बोट घातले होते फार काय अिंग्रजी पत्रांनी देखील ज्या अुग्र आणि कठोर अविचल धैर्याने तो तरुण हे भयंकर कृत्य करून पाटलणाची लाडगेतोड होत असता विजात ज्ञात घालून गंभीरपणे निघून गेला त्याचा अुल्लेख केल्यावाचून राहिले नाहीत !

ह्या घटनेस तुम्ही आम्ही सर्वांनी कोणी शोचनीय म्हणून म्हटले, कोणी निंद्य म्हणून म्हटले, कोणी आततायी म्हणून म्हटले—पण त्यात साहसाचा, धैर्याचा लवलेशही नव्हता अितकेच नव्हे तर ते कृत्य अगदी भ्याडपणाचे होते आणि ते करणारा कोणी भागूबाअीच होता ही गोष्ट अिंग्रजी पत्राच्याही ध्यानात आली नाही! पण गांधीजींनी कसे ओळखले 'Dastardly!' दुसरें काय!

कोणी म्हणतील गांधीजींना अत्याचाराच्या म्हणून वाटणाऱ्या कृत्यात धैर्य असूच शकत नाही असे वाटत असावे. अत्याचारास आततायीपणा आणि धाडस ह्या निरनिराळ्या बाजू असू शकतात हे गांधीजीस कळत नसल्यामुळे त्यांनी त्यास भ्याड म्हटले आणि धैर्य, साहस, शौर्य अित्यादि गुण ज्यांच्या नित्य परिचयाचे आहेत त्या अिंग्रजासच त्याची चटकन पारख झाली पण धाडस कसे ओळखावे हे गांधीजीस समजत नाही असे समजणे हा त्यांचा अपमान करणे आहे कारण मलबारमध्ये जेव्हा मोपल्यांनी अत्याचाराची दंगल अुडवून दिली आणि सूड म्हणून नव्हे तर धर्म म्हणून, निरुपद्रव्यासही अुपद्रव दिला तेव्हा त्या अत्याचाराकडेही दुर्लक्ष करण्याअितके त्यांच्या धाडसाने आणि शौर्याने गांधीजीस विमोहित केले होते. याच 'यंग अिंडिया'त त्यांनी त्या मोपल्यास 'My brave Mopla brothers' म्हणून अुलट गौरविले होते! तेव्हा गांधीजीस Brave कोणाला म्हणावें हें चांगले कळते पण तरीही ते मोपल्यासच शूर म्हणतात. अर्थात् अत्याचारी मोपलेच शूर आहेत आणि हा सांडर्सला मारणारा अत्याचारीच कोणी भागूबाअी आहे, Dastardly! दुसरें काय!

असेही म्हणता येत नाही की गांधीजी अत्याचाराविषयीच्या क्रोधाने असे काही तरी लिहून गेले कारण श्रद्धानंदाच्या हत्येमुळे सर्व हिंदुसमाज क्रुद्ध झाला असताही ह्या हिंदु महात्म्याने शांत वृत्ति ठेवून त्या हत्याऱ्यास 'भाअी अबदुल रशीद!' म्हणून संबोधिले आणि हिंदूंना सांगितले की, त्याची फाशी रद्द करण्याचा हट्ट धरा! हिंदु श्रद्धानंद मारले गेले असता अितके निर्विकार राहणारे गृहस्थ अिंग्लिश सांडर्स मारला जाताच जे बोलले ते विचारानेच बोलले असले पाहिजेत. Dastardly! अगदी असेच!

बरें, हा लेख त्यांच्यासाठी कोणी अुपसंपादकाने खरडला असेही दिसत नाही कारण त्यांच्यावाचून कोणालाही न साधणारी वदतो व्याघाताची मुद्रा त्या लेखास त्यांच्या अितर लेखाप्रमाणेच ठळठळीतपणे भूषवीत आहे कारण त्या कृत्यास Dastardly भागूबाअीपणाचे कृत्य म्हणून ते लगेच पुढे सांगतात की, अशा कृत्यास जी लोकांची गुप्त सहानुभूति मिळते ती त्या कृत्यात जे निधडे धाडस प्रकट होतें त्यामुळे मिळते! 'पाश्चात्य लोकातील लुटारू, चाचे, दरवडेखोर यांची धाडसाची कृत्ये वाचण्याची चटक आम्हासही लागल्यामुळे जिथे कुठे धाडस आणि निधडे शौर्य दिसेल तिथे तिथे त्याचा हेतु काय अिकडे न पाहता आम्ही चटकन त्याची

वीरपुरपाप्रमाणेच मान्यता करतो ! ही सवय चागली नाही ! लोकामध्ये साडसला ठार करणाऱ्याच्या धाडसामुळेच अशा कृत्याविषयी सहानुभूति आणि गुप्त आदर अुपन्न होत आहे याचे हे तात्त्विक कारण म्हणून गाधीजीनी दिले आहे अर्थात त्या 'भागूबाअीपणा'च्या कृत्यात 'निधडे धाडस' होते असा त्याच्या लेखाचा मथितार्थ निघतो

आहे की नाही वदतो व्याघाताचे हे अुत्कृष्ट अुदाहरण ! भ्याडपणाच कृत्यात निधडे धाडस प्रकट होते ! निधड धाडस हा भागूबाअीपणा ! Dastardly ! दुसर काय !

परतु नुसत्या धाडसाने मोहून जाण्याची चटक लोकास लागली म्हणावे तर ज्या युरोपियन चाचे लुटारु, दरवडेखोर यांची अुदाहरणे गाधीजीनी सवेतिली आहेत, त्याच्यापैकी अेकाचेही नाव कोणाच्या तोडी झालेले आढळत नाही फार तर काय, परतु हिंदुस्थानातील तुरुगातूनही अेकेकाने दहा दहा सशस्त्र दरवडे मारलेले अधम भरलेले असतात पण त्याची चित्रे लोकाच्या भितीवर काही आढळत नाहीत ! भले वीर म्हणून त्यास पाहताच त्याची पाठ कोणी थोपटीत नाही !

ही पुढील बातमी पहा, 'ता ३ राजी पुण्याच्या ला कॉलेजातील कुलेकर नावाच्या विद्यार्थ्याने भाबुडर्याजवळ रेल्वेवर पडून गाडीच्या चाकाखाली जीव दिला आता केवळ प्राण देण्याच्याच धाडसाचा प्रश्न असेल तर हे धाडसच आहे पण ह्याविषयी कोणी अग्रलेख लिहिले नाहीत त्याची वाहवा करणारी गुप्तपत्रक छापली नाहीत मग साडर्सच्या कत्तलीतील धाडसच तेवढे लोकास का आकर्षित ? असे गाधीजी म्हणतात हो, आम्ही नाही

कारण गाधीजी स्पष्टच म्हणतात की, आता देशातील वातावरणात पुन अेकदा अत्याचाराचे वारे सचरले आहे — Violence is in the air ! आम्हास तसे फारस आढळत नाही आणि आज आठ वर्षे अहिंसात्मक अनत्याचाराच्या गर्जनेने गुदमरून गेलेल्या ह्या देशाच्या वातावरणात जर पु हा खरोखरच अत्याचाराच प्रतिकारी ध्वनि अुठत असतील तर हा गाधीजीचे वर्चस्व फोल झाल्याचाच पुरावा नव्हे काय !

मारेकरी काहीही म्हणोत अैकोत न अैकोत पण त्यास चार अुपदेशाचे शब्द सागून शुद्धीवर आणणे हे आपणा सव शात, शिष्ट, सोसाळू, राजनिष्ठ प्रजाजनाच कर्तव्य आहे आपास तो अुपदेश देण्याचा अधिकारच नसेल तर दुसऱ्या कोणास असणार ? गाधीजीचा अधिकार तर शिवाजी, प्रताप, श्रीकृष्ण ह्यासही अुपदेश देण्याचा आहे, असे ते स्वमुखानेच सागत आले आहेत, म्हणून मारेकऱ्याना हितावह नव्हे तर तुम्हा आम्हासही हितावह असा आणखी अेक लाखाचा बोल ते त्या लेखात घालतात की पोलिस अधिकाऱ्याचे त्या वेळच वर्तन अगदी निरुपद्रवी हात

The innocent police officer discharged his duty, however disagreeable its consequence may be for the community to which the assassin belongs. ज्या समाजात तो मारेकरी निपजला त्या समाजाला न पटणारे परिणाम जरी त्या पोलिस ऑफिसरच्या कृत्याने घडले असले तरी देखील त्या निरुपद्रवी पोलिसाचें तें वर्तन हें त्याचें कर्तव्यच होतें.

मळलें ना आता सर्वांना? हेंच विधेय जवळजवळ ह्याच शब्दांत पार्लमेंटात अिंग्रजी अधिकाऱ्यांनी सांगितलें होतें. पण त्या वेळेस लोकांस तें पटलें नाही. पोलिसांनी त्या प्रसंगी अत्याचाराचें वर्तन केलें असेंच बहुतेक पत्रकर्तेही म्हणत. मारेकऱ्यांची तर गोष्टच निराळी. ते लोक गांधीजींच्या 'त्यानें तें कर्तव्यच होतें; मग परकीयांस त्याचा परिणाम कितीही अप्रिय वाटो' ह्या वाक्यातील ह्याच न्याय स्वतःचेंही समर्थन करण्यास अुपयोजिल्यावाचून राहणार नाहीत. पण आपण अमारेकरी शिष्टांनी तरी आता त्या लाहोरच्या निरुपद्रवी कर्तव्यरत पोलिसांविषयी आपली कल्पना बदलली पाहिजे. गांधीजींच्या लेखाचा अर्थ ध्यानात धरला पाहिजे 'Dastardly!' ह्या अेका शब्दात तें सर्व काही येतें.

परंतु तरीही अेक विधेय मात्र त्या लेखाच्या साराहूनही निराळें अुल्लेखिलेंच पाहिजे. अितके ते विशिष्ट महत्वाचें आहे. 'माणसाचा काय दोष ह्या पद्धतीचा दोष आहे! Whatever the Assistant superintendent did was done in obedience to instructions. No one person can be held wholly responsible for the assault and the aftermath. The fault is that of the Government system. What requires mending is not men but the system. लालाजीवर झालेल्या आघातांचा दोष कोणाही अेका माणसावर लादता येत नाही. त्या पोलिस सुपरिंटेंडेंटने जें केलें तें त्याचें कर्तव्यच होतें. त्यात त्याचा काय दोष? दोष राज्यपद्धतीचा आहे. माणसांची सुधारणा करणें अवश्य नसून ती पद्धत सुधारली पाहिजे.' पाहिलीत ना ही सारासारविचारणा किती सूक्ष्म आणि तरीही किती स्थूल आहे. आणि ती आठवली तरी कशी अगदी वेळेवर.

हो अगदी वेळेवर. कारण ओडवायर आणि डायर यांच्या वर्तनाविषयीच्या चौकशीमंडळात गांधीजींना ह्या महान् सिद्धान्ताचा किंचित् विसर पडलेला दिसला, तसा आता पडला नाही. ओडवायर आणि डायर ह्यांना गांधींनी दोष दिला आहे. मेण-मधू का होअीना, पण त्यांना शिक्षा त्यांनी सांगितली होती आणि ओडवायर डायर हीं माणसें होतीं असा सर्वसाधारण समज आहे. पण दोष माणसांचा नाहीं, पद्धतीचा आहे, ह्या महान् तत्त्वाचा महात्म्याला त्या वेळी विसर पडला. वास्तविक डायरांनी वरिष्ठांचेच हुकूम पाळले म्हणून तो निर्दोषी ठरावा. तथापि वरिष्ठांचे

हुकूम पाळले म्हणून कनिष्ठ माणसे निर्दोषी पण तें वरिष्ठ तरी माणसेच ना? म्हणून माणसाचा दोष नाही! राज्यपद्धतीचा दोष आहे! हे महान् तत्त्व त्या वेळी महात्माजींना देखील झटकन न कळणें साहजिक होतें पण आता शेवटी ते आठवलें· वेळच तशी आली. आता तरी सर्वांनी समजावे की हे कृत्य 'Dastardly' आहे, दुसरे काय!

'माणसाचा काय दोष, ती राज्यपद्धत सुधारा!' हें तत्त्व आजच आठवले हेही अेका परी बरे झाले नाही तर त्या गोपीनाथ शहाच्या वेळेलाच गांधीजी (ultimatum) धाडते की 'गव्हर्नर साहेब! माणसाचा काय दोष या त्या शहाला सोडून आणि चढवा त्या घातिकारक पद्धतीला फाशी!' असे अेखादे अतिमोत्तर (ultimatum) गांधीजी धाडते तर गव्हर्नर जनरललाही तें अंकावेच लागते. गांधीजीच्या अतिमोत्तराना—ultimatum ला गव्हर्नर जनरल कसे चळचळ कापतात हे त्या प्रख्यात अेकवर्षाविच स्वराज्ययुद्धाचे वेळी प्रत्ययास आलेलेच आहे असे झाले असतें तर शहा फाशीवरून सुटता आणि समाजाला आणखी अेखाद्या 'सूडाच्या ब्यादे'ची काळोखी लावीत फिरता! आता सॉंडर्संचा मारेकरी जर क्वचित् फाशीविधी चढू लागला, तर मात्र 'माणसाचा काय दोष'त्याला फाशी देणे म्हणजे ही हत्येच्या ब्यादीची शोण वाढविणे आहे' असला अेखादा अर्ज गांधीजी करतात की काय अेवढीच भीति!

माणसांना कोणत्याही प्रकारे अुत्तरदायी न धरता केवळ 'पद्धतीस' काय ते शासन करण्याची ही कुशाग्र बल्‍प्ति जर माणसे व्यवहारात आणू शकतील, तर सत्ययुग आजच अुदयाला येअील. मनुष्य मनुष्याचे शत्रुत्व सोडून देअील चोर पकडला जाताच त्यास गौरवाने निर्दोष म्हणून मुक्त करण्यात येअून त्याची ती चोरी तेवढी तुरुंगात टाकण्यात येअील. बिचारा सॉंडर्स! हा महान शोध जर तो जिवंत असता लागता तर तो किंवा त्याचे साथी देखील लालाजींच्या छातीपोटावर लाठीचे तडाखे न मारता मनुष्य म्हणून त्यास सोडून त्याचे भोवतालच्या पोकळ वातावरणात दडून बसलेल्या त्या अमूर्त सत्याग्रहाच्या 'पद्धतीच्या' पाठीवरच लाठीचे तडाखे लगावता! लखनोला सरकारी घोडेस्वार ती अनैर्बंधिक (illegal—बेकायदेशीर) मिरवणूक मोडण्यासाठी तीतील मनुष्यांना अुधळून न लावता त्याच्यातील ती मिरवणूक तेवढी निवडून काढून तिच्यावरच घोडे घालते. घोडे चालले नसते तर त्यांना चाबूक न लगावता त्याच्यातील शिथिलतेला तेवढे चाबूक लगावते! कारण जसा मनुष्याचा दोष नसून ज्या पद्धतीस तो अंगीकारतो तिचा दोष आहे, तसाच मंदपणा हा घोड्याचा दोष नसून त्याच्यातील शिथिलतेचा दोष आहे.

*अितकेच नव्हे तर मूर्त मनुष्याच्या व्यतिरिक्त जो वायुदेहधारी असा हा 'पद्धती'चा अमूर्त वर्ग गांधींच्या सूक्ष्म दृष्टीस ह्या लेखाच्या शुभमुहूर्तावर*

दिमला तो जर का अकदा सापडला तर मग मोठमाठी महायुद्धे दखील ल्हली जाअूनही त्यात मनुष्यरक्ताचा अेकही थब गळणार नाही जर्मन महायुद्धात लाखो जमन लोक आणि अिग्लिशलोक समोरासमोर अुभे राहून लाख लाख बदुका साडत पण कोणावर ? —माणसावर नव्हे माणसाचा काय दोष ? तर त्या पद्धतीवर त्या System वर British Imperialism म्हणून जी पद्धत अिग्लिश सैन्याच्या डोक्यावर आकाशात वायुरूपाने तरगत होती तिच्यावर तघडचा आपल्या तोफा अिग्लिश माणसाच्या डोक्यावर तानचार मैल अुचीवर राखून जमन लोक भडिमार चालवित आणि militarism म्हणून जी दुष्ट पद्धत जमन लोकांच्या आडून दडून सव खोडचा करीत होती, तिला शासिण्यासाठी जमनीतील रहिवाशाना प्रत्यही बेगारा भाताची पक्वान्ने खुशाल झोडीत बसता यअीत अितकी अन्न सामग्री जमनीच्या नगरात पोचवीत राहून केवळ त्या 'पद्धती'ला मात्र अक तादूळही मिळू नये म्हणून ब्रिटिश राष्ट blocade सिधुबदी करीत राहत !

असो भाले त झाल आता पुढील महायुद्धात तरी ह्या मनुष्यावाचून जिवत राहणाऱ्या 'पद्धत नावाच्या मायावी राक्षसाचा चक्काचूर अुडविता यावा यासाठी त्याच राहण्याच ठिकाण गाधीजीनी लवकरच प्रसिद्ध करावे आजीबाअीच्या पाळण्याजवळचे वायकी वागुलबोवा ज्या किल्ल्यात राहतात, त्यातच हा 'पद्धत बोवा ही बहुधा राहत असलेला सापडेल !

साँडसची हत्या अत्यत अनिष्ट ह सत्य खर, परतु त सिद्ध करण्यास ह असल असत्य, अतार्किक असबद्ध कोटिक्रम लढविण्याची काय आवश्यकता ? स्पष्ट त स्पष्टच, सत्य त सत्यच सागता यत

—ता १९ जानवारी १९२९

\+ \+ \+

## (२३)

## ' थूः तुमच्या जिनगानीवर '

आहात त अर्थात् कोणता तरी महान् पराक्रम करून दाखविण्यासाठीच होय तीनशे वर्षांनी का होईना, पण माझ्या मागे माझे घालविलेले राज्य परत जिंकून ते माझ्या चरणी अर्पण करण्याकरिताच तुम्ही गळा आमंत्रिले असाल—ह्या रणगर्जना आणि कोलाहल चालविला असाल !

पण पाहतो तो काय ? नाटकगृहात चाललेल ऐखादे नाटक यापेक्षा अधिक रंगत ! हे लोक सरड्यावर बसून स्वाऱ्या करीत आहेत, पिंडावर पोट भरू पाहत आहेत, जिभेचे पट्टे फिरवीत त्या पटाओत धारकऱ्यास धाववू इच्छीत आहत, युद्धाच्या भातुकली खेळत आहेत, स्वातंत्र्य, युद्ध, कूच, स्वारी—या शब्दांचीच नव्हे तर या वाचिवीरांनी माझ्या शिवाजी या नावाची देखील इतकी विटंबना केली आहे की, त्याचा आता कोणास काडीचा देखील धाक वाटत नाहीसा झाला माझे नाव घेताच अगदी तीस पस्तीस वर्षांपूर्वी देखील माझे शत्रु चमकून उठत त्यांना वाट शिवाजीचे नाव म्हणजे रणदेवतेचा ज्वाज्वल्य मंत्र आहे जर का ते महाराष्ट्रात उच्चारू दिले, जर का कोणास त्याच्या चित्राची मिरवणूक काढू दिली वा त्याचा जयजयकार करू दिला तर न जाणो महाराष्ट्र आपले गेलेले राज्य परत मिळविण्यासाठी तानाजी, बाजीसारखे शिर हातावर घेऊन शत्रूवर तुटून पडेल ! म्हणून ते नाव कोणच्याही कोनाकोपऱ्यात ऐकताच माझे शत्रु चिडून जात, भिऊन उठत, त्या वासुदेव बळवंताने माझे नाव घेतले होते, त्या चाफेकराने माझ्यावर ऐक कविता रचून म्हटली होती—तर केवढी खळबळ उडाली, माझे उत्सव भयंकर अपराध ठरले माझ्या नावास उच्चारण्याची बंदी झाली हरीच्या नावाने राक्षस चिडत तसे माझे नावाने ते चिडत पण हाय हाय ! माझ्या नावास तुमच्या वरच्या जिभेचा स्पर्श होताच त्यातील ती खरी जादू आज निघून गेलेली दिसत आहे दगडावर ठिणगीचा जसा काही परिणाम होत नाही तसा आजकालच्या या मुर्दाड महाराष्ट्रावर माझ्या नावाचा काहीच परिणाम होईनासा झाला पूर्वी त्यास वाटत होते महाराष्ट्र हे दारूचे कोठार, त्यावर ही शिवाजीच्या स्मृतीची ठिणगी पडणे नको, पण आता त्यांना कळून चुकले की, हे दारूचे कोठार राहिले नसून नाल्याची घाणेरडी दलदल झाली आहे शिवाजीच्या जळत्या नावाने ही दलदल पेटणे तर दूरच, पण उलट त्या नावातील जळती ठिणगी तीवर पडताच ती ठिणगीच विझण्याचा पक्का संभव म्हणूनच हे वाचिवीरांनो, तुम्हांस आता माझ्या नावाचे जयजयकार वाटेल तितके करू देण्यात येतात कारण माझ्या नावाने तुमच्या मुर्दाड मनात काही ऐक कर्तृत्वशील चेतना उत्पन्न होणे अशक्य झाले आहे त्या योगे माझ्या नावाचा दरारा ही नाहीसा होऊन माझे शत्रुदेखील माझे नावाशी विषारी दात काढून टाकलेल्या सापाशी गमतीने खेळावे तसे खेळत आहेत माझ्या अपमानाची परमावधि म्हणजे ज्यांनी माझे राज्य घेतले, माझ्या सिंहासनावर जे आज बसत आहेत, त्यांनीच माझा पुतळा उभारावा ! —भर महाराष्ट्रात

अुभारावा ! अगदी पुण्यास अुभारावा ! ज्या प्रांतात मी शाहिस्तेखानावर छापा घातला आणि अफजुल्ल्याला चिरून काढलें त्यात अुभारावा आणि तसें करण्यात माझ्या शत्रूंना यत्किंचितही भीति वाटू नये !! तुम्हांवर त्याचा काही लवलेश तरी परिणाम होअील अशी धास्ती वाटू नये !!!

दगडानो ! तुम्ही माझा या शिवाजीचा देखील अेक दगड करून टाकलात ! राखेत टाकलेली आहुति जशी निष्फळ होते, प्रतच्युताच्या तोंडी भैरवमंत्रही जसा निस्तेज होतो, प्रेताला बांधलेली तलवार जशी प्रेतासारखीच पडून राहते, तसा हा माझा ह्या पुण्यक्षयी, क्षयग्रस्त पुण्यास अुभारलेला पुतळा दगडासारखा अेक दगडच होअून पडला आहे आणि अेखाद्या साध्या दगडाची जितकी भीति वाटच्या चोरास वाटते, तितकी देखील त्या माझ्या पुतळ्याच्या दगडाची भीति त्यास वाटत नाही. कारण तुमचे हे लुळे हात, हे पंगु पाय, हीं मुर्दाड मनें ! ह्या माझ्या दगडी पुतळ्याच्या दगडाअितका देखील अुपयोग करून घेत नाहीत!!!

मग तुम्ही मला बोलाविलेत तरी का ? केवळ माझी अशी विटंबना करण्यासाठी ? ज्या प्रतापगडावर मी अफजुलखानाचें शिर टांगलें आणि शत्रूचा दहा हजार घोडा पाडाव करून बांधून टाकला — त्याच प्रतापगडाला अवघ्या दहा बारा पठाणांनी लुटावें, आणि माझ्या कुलस्वामिनीच्या मूर्तीस गदगदा हलवून सोडावें आणि त्या गडाच्या आजूबाजूस पसरलेल्या हजारो मराठ्यांनी बांगड्या भरून, लुगडीं नेसून परकी पोलिसांच्या पाया पडत फिरावें, ' ते बारा पठाण धरा ! आमची देवी लुटली ! ' थू: तुमच्या जिनगानीवर ! थू: तुमच्या जिनगानीवर !!

घालून किल्ल्यावर दुडदुड धावत जातेत तर याहूनही बहार होती ! खाली येताच लाडूंचें जेवण; आणि मग ती भगव्याची मिरवणूक—ती व्याख्याने— माझ्यावरील तुमच्या अलोट प्रीतीची व्याख्याने ! आणि माझ्या अितिहासाच्या साधनाचें भाराभर प्रसिद्ध केलेले भारुड. बस्स, हे काय ते तुमचे पराक्रम तुम्ही मला दाखविलेत !

माझ्या देशबधूनो, माझे तुमच्यावर निरतिशय प्रेम आहे ह्या माझ्या हिंदुस्थान देशासाठी आणि हिंदु जातीसाठी मी अनेकवार माझे प्राण धोक्यात घातले, जन्मच्या जन्म कष्ट काढले, म्हणूनच मला तुमचे काही चुकत असेल तर ते पडक्पणे सांगण्याचा अधिकार आहे वास्तव मी स्पष्टपणे सागतो की, तुम्ही माझेवर प्रीति करता याचा मला मुळीच सतोष वाटत नाही. तोवर केव्हाही वाटणार नाही को, जोवर तुम्ही या माझ्या मातृभूमीच्या श्रुद्धारार्थ आणि हिंदु जातीच्या गोरवार्थ काही मिळवीत नाही, त्याग आणि शत्रूला धाकविणारे धाडस दाखवीत नाही, पराक्रम करीत नाही आणि नुसती माझी स्तुतिस्तोत्रे गात बसता !

जे हरविलेत ते मिळविलेत का ? ज्या सकटाच्या फासाने तुम्हास बदीत टाकले त्या सकटाचा शिरच्छेद केला आहा का ? ज्या पूतनेने फसविले तिची फासळी नि फासळी विदारली आहात का ? तुम्ही दासचे दासच आहात ना ? या भूमातेच्या पायात परवशतेच्या बेडया जशाच्या तशाच आहेत ना ? मग तुम्ही माझी नुसती स्तुति करीत काय बसला आहात ? त्या स्तुतीसारखी माझी दुसरी विटबना नाही ! कारण ज्या भारतात मी शिवाजी जन्मलो तो भारत ज्याच्या हातात आहे तो मजहून, माझ्या जातीहून श्रेष्ठ ठरलाच पाहिजे. जितकी माझी अधिक स्तुति कराल तितक्या पटीने आपोआपच तो आपला विजेता अधिकाधिक श्रेष्ठ ठरत जातो रावणाला दहा तोंडे आणि वीस हात होते म्हणून जितका अधिक गौरवाल, तितक्या अधिक पटीने त्यास जिंकणारा राम अधिकतर पराक्रमी ठरणार. तेव्हा माझी खरी स्तुति करावयाची असेल तर हे भारत मुक्त करण्यासाठी, जनतेच्यासाठी तुम्ही काय केलेत ते कळवून घेण्यास मी आलो आहे, तर तुम्ही मला शिवकालीन अितिहासाचे संशोधनात्मक भारुड घेऊन सामोरे येता ! अरे, शिवकालीन अितिहास मला माहीत आहे; तुम्हाला माहीत आहे त्याहून शतपटीने मला माहीत आहे. तुम्ही तुमच्या काली कोणता वद्य वाजविलात ते मला सागा. तुम्हा स्वत:ला काळच नाही की काय ? तो तुमचा काळ अुत्पन्न करून तो मला वाचावयास द्या. ज्याला आपल्या स्वत:चे पौरुषाने स्वत:च्या कालाचा चक्रवर्ती होता येत नाही, तो मुर्दाड देश, ती मुर्दाड पिढी, पूर्वजांच्याच कालाचे तुणतुणे तेवढें वाजवीत बसते. करटाच आपल्या मोठ्याथोरा पणजाचे नावावर आपली पत नेहमी पटवू पाहतो. आजच्या करट्या महाराष्ट्रा, तीच स्थिति तुझी झालेली आहे ! जो अुठतो तो शिवकालीन म्हणून काही तरी खरड-

ण्यातच जन्मसाफल्य मानतो जी कादंबरी पाहावी ती 'शिवकालीन', पोवाड 'शिवकालीन, नाटके 'शिवकालीन', पुतळा 'शिवकालीन', अितिहास 'शिव कालीन', संशोधन 'शिवकालीन!' शिवकालीन कालावाचून दुसऱ्या कोण कालास शिवण्याची चोरी! प्रत्यक्ष मला शिवाजीला आणि माझ्या शिवकालीन पिढीला देखील या शिवकालीन स्मृतीचा अेखाद्या शिवीसारखा राग यावा तितक तिचा अतिरेक झाला आहे!

'देवा, माझ्या महाराष्ट्राच्या हितासाठी तरी आता महाराष्ट्राला माझा विसर पडू दे माझ्या झाल्या गेलेल्या शिवाजीच्या स्मरणात गुतलेला तो महा राष्ट्र अितका बेशुद्ध झाला आहे की, त्याला स्वत ला देखील शुद्ध अुरली नाही मी पूर्वीचा विगत शिवाजी त्याना अितका आवडतो आहे की, त्याना दुसरा अेखादा नवीन शिवाजी अुत्पन्न व्हावा ही अिच्छा देखील असह्य होते मी, तानाजी, बाजी आणि आमचे अितर खरे खोटे लहान मोठे सवगडी जी लहानमोठी साहसे करीत होतो, परिस्थितीशी टक्कर देअून लाथेसरशी अुलटून पाडण्याची जी पौरुषी हाव धरीत होतो, तिची वाहवा करता करता या लोकाना पुरेसे होतच नाही पण तसेच लहान मोठे साहस, तशीच अेखादी पौरुषी हाव जर ह्याच्यातीलच अेखादा धरू लागला, तर हेच लोक त्याला माथेफिरू, अत्याचारी, अराजय, वेडगळ म्हणून शिव्या हमडू लागतात आम्ही मूठभर होतो तरी झुजू निघालो म्हणून आमची जे लोक स्तुति करतात, तेच लोक त्याच्यातील कोणी त्याच हेतूने झुजू निघताच त्यास 'मूठभर' म्हणून वेडगळ ठरवू लागतात! जो गुण आमच्या शिवकालीन कादबऱ्यात 'साहस' होतो, तोच प्रस्तुत कालातील अेखाद्यात दिसताच माथेफिरू अत्याचार ठरतो! आणि आमचे पाय मागे ओढणाऱ्या पण सद्हेतुक वृद्धाच्या साहसशून्य शहाणपणास जे 'शिवकालीन' वाङमयात दोष देतात, तेच ती साहसशून्यता याच्या पिढीत दाखवतात व खरे शहाणे म्हणून मिरवू शकतात फार काय सागावे! पण आमच्या शिवकालीन आणि राजारामीय पिढीत जे काही देशभक्त जहागिरी अिनामावरच झुजत, त्यांच्याही देशभक्तीचे यथार्थ गौरव आणि योग्य कौतुक करणारे हे लोक याच्या पिढीत जे देशस्वातत्र्यार्थ झुजताना फाशीवाचून दुसऱ्या अितर कोणत्याही जहागिरीचे आमिष डोळ्यापुढे धरीत नाहीत, अशा जाज्वल्य देशवीरानाही देशवीर म्हणावयास सिद्ध नसतात त्याच्या-वर अेक अक्षरही लिहिणे म्हणजे असभ्यपणा होय असे समजतात आता हे मी जाणून आहे की, हा प्रभाव त्या अिंडियन पिनल कोडाचा असावा आणि जर कदाचित् त्या कोडात माझी स्मृति करणे दडय अपराध गणला जाता, तर या शिवकालीन काळालाही त्याच्या भीतीच्या काळोखातच तोड खुपसून राहवे लागते आणि आमचीही मराठी वाङमयात तशीच अेकेरी अुल्लेखिलेली सभावना होती की, जशी त्या वासुदेव बळवताची होते! त्या जाज्वल्य देशवीराचे अेक चरित्र

अलीकडेच माझे अवलोकनात आले त्यात न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे याना कित्येक ठिकाणी सन्मानार्थ बहुवचनी उल्लेखिल आहे सार्वजनिक कामानाही अहो जाहो म्हटल आहे ते ठीकच आहे तेही देशभक्त आणि त्यागी देशसेवकच होते, पण वासुदेव बळवत फडक्याना प्रत्यक्ष त्याच्या चरित्रातच येथून तेथून अकेरी अरे तुरेने संबोधिले आहे देशभक्तीत आणि देशसेवेसाठी केलेल्या त्यागात फडके त्याच्या पिढीत अितके कमी प्रतीचे ठरले ! कारण त्यानी देशहितार्थ आयुष्याच्या सायंकाळची शिळाप्याची वेळ किंवा पगाराचा अेक लक्षांश तेवढाच त्याग करण्याचा सभ्यपणा न करता आयुष्यचे आयुष्य आणि सर्वस्वचे सर्वस्व त्या देशासाठी त्यागाचे वेदीवर बळी देण्याचा हलकटपणा केला म्हणून त्याना दीड दमडीच्या लडेंधाशानी देखील अरे तुरे करावी !! वासुदेव बळवताचे साहस अयशस्वी ठरले, पण यश हेंच जर अहो जाहोचे अेकमात्र गमक असेल, तर माझे शिवाजीचे तरी काय ? अफजुलखानाच्या कैचीत मी सापडलो तिथे म्हणजे केवळ योगायोग होता जर का मी मरतो, तर ह्याच जात्यावरच्या ओव्या गाणाऱ्या बाया त्या मगळ्या डावाला मूर्खपणाची पराकाष्ठा म्हणत्या–म्हणत्या, आपण होअून गाढवासारखा अफजुल्ल्याच्या तवूत गेला ! आणि शाहिस्तेखानाच्या बगल्यात ! रतिभर चाहूल अवेळी होती, अेक ढेकूण भलत्याच वेळी त्या सैपाक घरातील मुसलमानापैकी कोणास डसून जागृत करता–मी जिवत धरलाच जातो ! आणि दिल्लीस त्या पेटाऱ्यात ? ते मुसलमान मत्री तबाखूची पिचकारी टाकण्यासाठी जरी पुढे सरकते नि सहज जरा नुसते त्या पेटाऱ्यात डोकावते, अेखाद्या अुदरासारखा सापडलो असतो ! केवळ योगायोग म्हणून निभावलो ! पण जर त्याच्या अुलट घडत तर हेच ' शिवकालीन ' आजचे भाट, यशाचे भोपे, मजवर ' माथेफिरू ', ' गोंधळ्या ' ' अुल्लू ' म्हणून भुकत सुटते ! म्हणून मला या तोंडपुज्या ' शिवकालीनाचा ' अगदी तिटकारा म्हणून येत आहे कारण याना पराक्रमाची पारख नाही ते केवळ यशाचे मिंधे आहेत त्याना हेतूची आणि त्यागाची आणि अुत्कटतेची ओळख नाही हे केवळ धुपाऱ्या तिकडे अुदो अुदो करणारे आहेत ! नाहीतर आमच्या पिढीतील वैयक्तिक पराक्रमाच्या तोडीस तोड देणारे पराक्रम आणि तेही क्वचित् आमच्या पिढीहून अेक रति अधिकच निर्मळ अशा ज्वलत्य देशभक्तीने अुत्स्फूर्त झालेले—याच्या ह्या स्वत च्या पिढीत याच्या डोळ्यासमोर घडत असताना याना असले देशवीरत्व, ते अजून अयशस्वी होत आहे, म्हणूनच काय ते हायकोर्ट जज्जपणापेक्षा किंवा वकीलपणापेक्षा सापेक्षत असभ्य आणि हलकटपणाचे वाटते ना ? दुर्लक्षार्ह भासत ना ? आणि तेच गुण केवळ यशस्वी झाले म्हणून ' शिवकालीन पिढीत ' वर्णनीय ठरले ना ? यश ! ह्याना अेक सैनिक पडला न पडला की, लढाओ जिंकली गेली पाहिजे, बीज टाकले न टाकले की, त्याचा आबा होअून पाडास लागून अगदी आढीत पिकून याच्या

यज्ञार्थं पशवः सृष्टाः स्वयमेव स्वयंभुवा ।
यज्ञश्च भूत्यै सर्वस्य तस्माद्यज्ञे वधोऽवधः ।। ३९
ओषध्यः पशवो वृक्षास्तिर्यंचः पक्षिणस्तथा ।
यज्ञार्थं निधनं प्राप्ताः प्राप्नुवन्त्युत्सृती पुनः ।। ४०

—अ. ५

प्रोक्षण करून खाल्ले असता मांस खाण्यास हरकत नाही. श्राद्धात प्राण-कटी किंवा अिच्छा झाल्यासही ब्राह्मणानी मांस खावे. ज्या अर्थी खाणारा वर्ग ाने अुत्पन्न केला, तसेंच खाद्य प्राणीही त्यानेच खाद्य म्हणून अुत्पादिले आहेत, ा अर्थी खाणाऱ्याने तें खाद्य प्राण्याचें मांसादि अन्न प्रत्यही खाल्ले तरी दोष घडत ही. [ यज्ञाविषयी तर बोलणेंच नको. कारण— ] पशु हे यज्ञार्थच स्वतः देवाने निर्मिले आहेत. सर्वांच्या कल्याणार्थ असणाऱ्या यज्ञात पशूंची हिंसाच खरी अहिंसा ाहे. यज्ञात मारलेले पशु जन्मांतरी अुत्कर्षच पावतात.

[ आपल्या सर्व वर्णांच्या माता-भगिनी मांस खात असत आणि तेंही धार्मिक र्तव्य म्हणून. हे दाखविणाऱ्या अशा अनेक श्लोकांमध्ये आगेमागे या स्मृतीत ्मी घडते तसें याही प्रकरणी घडून काही झाले तरी कोणीही मांस खाअू नये ता अर्थाचेही श्लोक घुसलेले दिसतात! अैतिहासिक दृष्ट्या प्रथम मांस बेधडक ह्मणादिक खात; पुढे ते वाअीट वाटू लागले. तेव्हा काहीजणानी ठरविले की, वळ वैदिक धर्मप्रसंगी श्राद्धयज्ञादि मंत्रपूत तेवढेंच मांस खावे; अितर प्रसंगी ही. आणि दया, अहिंसाप्रभृति भावनामुळे पुढेपुढे मांस मुळीच खाअू नये हाच र्म असें मत बळावले. ज्याने त्याने आपले श्लोक या स्मृतीत गोंवले. मांसाशना रुद्ध श्लोकाची वानगी म्हणून हे श्लोक पहा ]—

मधुपर्के च यज्ञे च पितृदैवतकर्मणि ।
अत्रैव पशवो हिंस्या नान्यत्रेत्यब्रवीन्मनुः ।। ४१
अेष्वर्थेषु पशून् हिंसन्वेदतत्त्वार्थविद्द्विजः ।
आत्मानं च पशुं चैव गमयत्युत्तमां गतिम् ।। ४२
नाकृत्वा प्राणिनां हिंसां मांसमुत्पद्यते क्वचित् ।
न च प्राणिवधः स्वर्ग्यस्तस्मान्मांसं विवर्जयेत् ।। ४८
समुत्पत्तिं च मांसस्य वधबंधौ च देहिनाम् ।
प्रसमीक्ष्य निवर्तेत सर्वमांसस्य भक्षणात् ।। ४९

—अ. ५

पशुलाही अुत्तम गति मिळवून देतो [पण लगेच याच्याविरुद्ध अुक्ती घेअून सांगतात– ] प्राण्याची हिंसा केली तरच मांस खाता येते, हिंसा कधीही स्वर्ग नसते, यास्तव अुत्तम गति हवी असलेल्यांना मांस खाअू नये प्राण्याचे हाल नि मांसाची (शुक्रशोणितादिकांपासून होणारी गलिच्छ) अुत्पत्ति विवचून कोणीहि मांस खाणे मुळीच वर्ज्य मानावे !

[ अशा प्रकारच्या अनेक परस्परविरुद्ध श्लोकांची खिचडी या प्रकरणी झालेली आहे ती अेकाच ग्रंथकाराने केली असल्यास तो भ्रांतच असला पाहिजे किंवा हे परस्परविरुद्ध श्लोक अनेकजणांचे असून ह्या स्मृतीत घुसत संग्रहिले आहेत या दोन अुलगड्यांपैकी मनुभगवानांवर पहिला अयोग्य आरोप करण्याऐवजी प्रामाणिक सुधारक दुसराच मार्ग स्वीकारतात आणि मांसाशन वर्ज्य का नाही हा प्रश्न प्रयोगशाळेतले वैद्यक ज्ञानानेच सोडवितात 'मांस खाणे तर त्या पशूसुद्धा खाणारा स्वर्गास जातो किंवा माणसाचा जीव गेला तरी पशूस जाअू नये म्हणून मांस खाअू नका हे हजारो वर्षांपूर्वी असुक ऋषीचे मत होते' अेवढ्या पोथीजात शास्त्राधारावरून नव्हे जे अमुक शास्त्राधार परस्परविरुद्ध मुळे परम्परांना परभारेच लटके पाडतात त्याच्या प्रकरणी प्रत्यक्षनिष्ठ, प्रयोगाने अद्यतन विज्ञान जे सांगेल तेच आज त्यातल्या त्यात ग्राह्य होय ] आता ब्राह्मण यांना कायकाय खाअू नये ते सांगताना मनुस्मृति येडे आज्ञा देते—

'छत्राकं विड्वराहं च लशुनं ग्रामकुक्कुटम् ।
पलाण्डुं गृञ्जनं चैव मत्या जग्ध्वा पतेद् द्विजः ॥' १९
—अ

स्त्रीस्वभाव नि संरक्षण

अस्वतंत्राः स्त्रियः कार्याः पुरुषैः स्वैर्दिवानिशम् ।
विषयेषु च सज्जन्त्यः संस्थाप्या आत्मनो वशे ॥ २
पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने ।
रक्षन्ति स्थविरे पुत्राः न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ॥ ३
अरक्षिता गृहे रुद्धाः पुरुषैराप्तकारिभिः ।
आत्मानमात्मना यास्तु रक्षेयुस्ताः सुरक्षिताः ॥ १२
नैता रूपं परीक्षन्ते नासां वयसि संस्थितिः ।
सुरूपं वा कुरूपं वा पुमानित्येव भुंजते ॥ १४
अेवं स्वभावं ज्ञात्वासां प्रजापतिनिसर्गजम् ।
परमं यत्नमातिष्ठेत्पुरुषो रक्षणं प्रति ॥ १६
नास्ति स्त्रीणां क्रिया मंत्रैरिति धर्मे व्यवस्थितिः ।
निरिंद्रिया ह्यमंत्राश्च स्त्रियोऽनृतमिति स्थितिः ॥१८

—अ. ९

स्त्रियांना त्यांच्या विषयासक्तीपासून रक्षिण्यासाठी रात्रदिवस पुरुषांनी आपल्या अधीन ठेवावें. कौमार्यांत पिता, यौवनात भर्ता, वार्धक्यात पुत्र हाच त्यांचा पालक. त्याच्या अधीन स्त्रियांनी रहावें. स्त्रिया स्वातंत्र्याला योग्य नाहीत. पुरुषांनी अगदी घरात कोंडून ठेवलें तरी त्या सुरक्षित राहणार नाहीत (स्वतःलाच रक्षील तीच खरी सुरक्षित;) कारण प्रजापतीने स्त्रियांचा स्वभावच असा घडवला आहे, की त्या रूपास वा वयास पाहत नाहीत. सुरूप वा विरूप, पुरुष म्हटला, की त्यास हवासा होतो. यास्तव त्यांस परक्यांपासून दूर ठेवण्याची पराकाष्ठा करावी. स्त्रियांचे जातकर्मादि सारे संस्कार मंत्रहीन असतात. ना त्यांना मंत्र म्हणण्याचा अधिकार! स्त्री स्वभावतःच अनृत आहे असे शास्त्र सांगते! [ याहूनही कडक भाषेत लिहिलेले अशाच विचाराचे स्त्रीदोषविषयक श्लोक बहुत आहेत. त्या प्रकरणी अितकेंच ध्यानी ठेवायचें की, शास्त्रकार पुरुष होते. जर शास्त्रकार स्त्रियाही असत्या तर पुरुषदोष वर्णिताना हेच श्लोक त्यांनी पुरुषांनाही अितक्याच यथातथ्यपणे लावण्यास सोडलें नसतें. पुन्हा स्त्रियांची थोरवी वर्णिणारे, या स्त्रीनिंदेच्या अगदी अुलट असे श्लोकही आहेत. त्यांची बानगी पूर्वी दिलेलीच आहे. त्या परस्परविरुद्धतेच्या दोषांचे कारण, हीं मतें निरनिराळ्या काळीं भिन्नभिन्न श्लोककारांची असताही अेका मनूच्याच नांवावर दडपून दिलीं आहेत हेंच होय. यास्तव त्यांत मनूचें कोणतें तेंही सांगणें कठीण पडते. त्या काळी महिलाविषयीं पुरुषवर्गाचे मतप्रवाह किती प्रकारचे होते, अितकी अैतिहासिक माहिती देण्यापुरताच त्यांचा

अुपयोग ह्ही विसरता कामा नये की, वायवलच्या जुन्या करारापासून तो अगदी अर्वाचीन करारापर्यंत स्त्रीवर्गाविषयीचे असेच आणि याहूनही निदक विचार वहुतक धर्मग्रथातून ठायीठायी विखुरलेले आढळतात ) स्त्रिया जात्या अशा 'चचल' नि 'अशुभ' असल्या तरी नोट रक्षिल्या तर—

> यादृग्गुणेन भर्ता स्त्री सयुज्येत यथाविधि ।
> तादृग्गुणा सा भवति समुद्रेणेव निम्नगा ॥ २२
> अक्षमाला वसिष्ठेन सयुक्ताऽधमयोनिजा ।
> शारङ्गी मन्दपालेन जगामाभ्यर्हणीयताम् ॥ २३
> अेताश्चान्याश्च लोकेऽस्मिन्नपकृष्टप्रसूतय ।
> अुत्कर्षं योषित प्राप्ता स्वै स्वैर्भर्तृगुणै. शुभैः ॥ २४
> —अ ९

समुद्रात नदी तशी भ र्याच्या सगतीत स्त्री अुत्कर्षही पावते अक्षमाला ही नीच जातीची स्त्री वसिष्ठाने वरली मन्दपाल ऋषीशी शारगीचा सयोग पाला अशा आणखी कित्येक चण्डालप्रभृति हीन जातीच्या स्त्रिया अुत्तम पति प्राप्त झाल्याने जगताला पूजनीय व्हाव्या अितक्या अुत्कर्षल्या ! [ वसिष्ठाने चाण्डालीशी लग्न लावले 'वसिष्ठश्चाण्डालीमु।येमे' अशी श्रुतिही आहे वसिष्ठासारख्या पतीमुळे ती चाडालीही थोरपद पावली सप्तर्षीच्यासह पूजनीय स्थान पावणारी अरुधती ती हीच चण्डालकन्या अक्षमाला होय स्कदपुराणातही ती कथा आहे या श्लोकात चाण्डालादि हीन समजलेल्या कन्याचे ब्राह्मणाशी झालेले हे विवाह जातिवाह्य म्हणून निंदिलेले नाहीत, अितकेच नव्हे, तर हितपरिणामी म्हणून प्रशसेने अुल्लेखिले आहत त अेकदानच ठिकाणी झाले नाहीत तर 'अशा प्रकारची अनेक हितपरिणामी अुदाहरणे' ही स्पष्ट निर्देशिली आहेत पुन्हा 'स्त्रीरत्न दुष्कुलादपि' या मनूच्या दुसऱ्या अशा नियमाचाही हाच परिणाम होत असला पाहिजे ब्राह्मणादिकाशी चण्डालाच्या स्त्रियादखील धर्मविधियुक्त विवाह लावीत आणि त्याची जात पतीची तीच ठरून त्या ऋषितुल्य थोरवीस चढून

# (४)

मागील सर्व लेखांकात बहुधा मनुस्मृतीतील अध्यायाचाच अनुक्रम अनुसरलेला असल्यामुळे महिलेच्या विवाह योग्यता राहणी प्रभृतिसंबंधीची माहिती त्या त्या विषयाच्या अनुक्रमाने ओकत्र सगतवार देता आली नाही कारण मनुस्मृतीत प्रत्येक विषयाचे सारे निबंध ओकत्र दिसलेच नाहीत पूर्वी मनुस्मृतीच्या मूळ ग्रथात तशी ज्या त्या विषयाची चर्चा त्या त्या अध्यायात सकलितपणे असावी हे अध्यायाच्या नामकरणावरून नि त्यातील ओकदरीतल्या श्लोकावरून स्पष्ट होते, पण शतकानुशतक ज्यास जे वाटले ते मत जुळेल तिथे आगमागे मध्ये प्रक्षिप्त श्लोक घालून गोवले जाता जाता आजची मताची खिचडी विषयाची सगति सुटून, शास्त्री त्या पुस्तकात आढळून असावी हेच अनुमान करणे भाग पडते उदाहरणार्थ, नववा अध्याय पहा यात स्त्रीपुरुषाच्या सयोगवियोगात काय सबंध असावे त्यात 'धर्म्यान् वदयामि शाश्वतान्' असा पहिल्याच श्लोकात प्रतिज्ञा केली आहे या-प्रमाणे त्या अध्यायात प्रथम व्यवस्था असता अचानक द्यूतादिक प्रकरणी शूद्र-प्रकरणी राजाने काय दंड द्यावा, हेर कसे असावेत प्रभृति अगदी निराळ्या प्रकरणीच्या राजधर्मांनी तो अध्याय खच्चून भरला आहे!

यामुळे महिलासंबंधाच्या निरनिराळ्या प्रकरणावरील मत, स्त्रियांच्या स्तुतिनिंदा, इत्यादि विषय पुन पुन्हा आल्यासारखे वाटले तरी अध्यायाच्या अनुक्रमास अनुसरणे तर अपरिहार्य होते तथापि विषय जरी तो तो फिरून आला तरी मत नि विधिनिषेध मागच्या अध्यायाहून जी नवीन तीच तेवढी आम्ही निवडल्यामुळे माहितीची मात्र पुनरुक्ति या लेखमालेत सहसा घडू दिली नाही

## पुनर्विवाहनिषेध

स्त्रीने तिचा पति शीलरहित, गुणरहित स्वेच्छाचारी असला तरी नेहमी देवाप्रमाणे त्याची शुश्रूषा करावी आणि तो मेल्यानंतरही पुत्र नसला तरीही आमरण ब्रह्मचर्य पाळून अविवाहित राहावे —

विशील कामवृत्तो वा गुणैर्वा परिवर्जित ।
उपचर्य स्त्रिया साध्व्या सतत देववत् पति ॥ १५४
काम तु क्षपयेद्देह पुष्पमूलफलै शुभै ।
न तु नामापि गृह्णीयात् पत्यौ प्रेते परस्य तु ॥ १५७
मृते भर्तरि साध्वी स्त्री ब्रह्मचर्ये व्यवस्थिता ।
स्वर्ग गच्छत्यपुत्रापि यथा ते ब्रह्मचारिण ॥ १६०

स्वत चा पति मेल्यानतर ब्रह्मचर्यव्रताने फलमूलानी देह झिजवीत, अय पुरुषाचे नावही न घेता स्त्रीने आमरण वागावे हा झाला सुशील स्त्रीचा धर्म पण स्वत ची सुशील स्त्री मेल्यावर पुरुषाने कसे वागावे? तर लगेच सागतात —

भार्यायै पूर्वमारिण्यै दत्वाग्नीनन्त्यकर्मणि ।
पुनर्दारक्रिया कुर्यात्पुनराधानमेव च ॥ १६८

—अ ५

पत्नी मेली असता तिचे यथाविधि दहन करुन पतीने पुन्हा लग्न करावें आणि गृहस्थाश्रमाची अग्निपूजा पुन्हा यथापूर्व चालवावी

आता वरील विधवाधर्माच्या अगदी उलट असा विधवाधर्म अध्याय ९ मध्ये कसा सागतात तो पहा —

## नियोगविचार

यदन्यगोषु वृषभो वत्साना जनयेच्छतम् ।
गोमिनामेव ते वत्सा मोघ स्कदितमार्षभम् ॥ ५०
तथैवाक्षेत्रिणो बीज परक्षेत्रप्रवापिण ।
कुर्वन्ति क्षेत्रिणामर्थं न बीजी लभते फलम् ॥ ५१
फल त्वनभिसधाय क्षेत्रिणा बीजिना तथा ।
प्रत्यक्ष क्षेत्रिणामर्था बीजाद्योनिर्गरीयसी ॥ ५२
देवराद् वा सपिडाद् वा स्त्रिया सम्यङ्नियुक्तया ।
प्रजेप्सिताधिगन्तव्या सतानस्य परिक्षये ॥ ५९
विधवाया नियुक्तस्तु घृताक्तो वाग्यतो निशि ।
अेकमुत्पादयेत्पुत्र न द्वितीय कथचन ॥ ६०

—अ ९

ज्याप्रमाणे गाअीना वृषभापासून शभर वासरं जरी झाली तरी ती त्या त्या वृषभाच्या धन्याची समजली जात नाहीत तर ती ज्याची गाय त्याचीच वासरे समजली जातात, त्याचप्रमाणे स्त्रियेला झालेली सतति, कोणच्याही बीजापासून असली तरी ती ज्याची स्त्री त्याचीच समजली पाहिजे क्षेत्रबीजाचा न्यायच येथे लागू ज्याच्या शेतात अुगवतं त्याच धान्य मग त्याच बीज [ सुडक्या पाखराने, वाऱ्याने वा अन्य कोण्या स्वामी नसलेल्या पगने ] टाकलेलं असो ! सततीच्या स्वामित्वाच्या प्रश्नी 'बीजाहून योनिच श्रेष्ठ' हाच न्याय खरा यास्तव स्वत च्या बीजापासून पुत्रप्राप्ति न झाली असता स्वत च्या स्त्रीला नियुक्त अशा परपुरुष बीजापासून जो पुत्र होतो तो त्या परव्याचा न होवा ता स्त्रीच्या पतीचाच ठरला पाहिजे कारण

पत्नी ही पतीचे क्षेत्र आहे. त्या क्षेत्राच्या अुत्पन्नाचा स्वामी तो पतीच होय म्हणून वंशक्षयाचे संकट टाळण्यासाठी अधिकृत अनुज्ञेने दिराकडून वा सपिंडातील पुरुषाकडून—ते परपुरुष असताही त्याशी पत्नीप्रमाणे संबंध ठेवून—प्रजोत्पत्ति करावी. [पति जिवंत असलेल्या स्त्रीचा हा विचार झाला तोच न्याय विधवेलाही लागू आहे तिनेही वडील माणसाची अनुज्ञा घेअून संततिक्षय टाळण्यासाठी नियुक्त पुरुषाचे बीज धारण करावे ] अशा रीतीने जो पुरुष नियुक्त होअील त्याने त्या दुसऱ्याच्या पत्नीशी समागम करताना सर्वांगास तूप लावून, मौन धरून, रात्री अेकांतात भेटी घ्याव्या. अेक पुत्र होअीतोपर्यंतच त्याने त्या परस्त्रीशी रतावे. ही मर्यादा अुल्लघून दुसरा पुत्र होअीतो केव्हाही तो नियुक्तसंबंध वाढवू नये. ('न द्वितीय कथचन'')

[पण अितक्या कडकपणे अेकाच पुत्रास अुत्पादिण्यापुरताच संबंध ठेवावा अशी स्पष्ट मर्यादा या श्लोकात घातलेली असताही लगेच खालच्या श्लोकात त्याच्या अगदी अुलट श्लोक येतो ] की:—

> द्वितीयमेके प्रजनं मन्यन्ते स्त्रीषु तद्विदः ।
> अनिर्वृतं नियोगार्थं पश्यन्तो धर्मतस्तयोः ।। ६१

—अ. ९

अेक मुलगा असून नसून सारखाच. कारण तो पटकन् मरता पुन्हा वंशक्षयाची भीति' असे समजून ती भीति शक्यतो नवकी नाहीशी करण्याच्या हेतूने काही धर्मवेत्ते आचार्य दुसरा पुत्र होअीतो त्या परस्त्रीशी नियुक्ताने रतावयास धर्माची हरकत नाही असे मानतात. पण मग मात्र ती दोघे पुन्हा पूर्ववत् पृथक् झाली पाहिजेत. त्यापुढेही त्यांनी कामसंबंध ठेवल्यास ती पतित होतील.

[वरील भागात नियोगविधीचें क्षेत्रबीजादि तात्त्विक सविस्तर कोटिक्रमासुद्धा समर्थन करून त्यात स्पष्टपणे धर्मानुकूल म्हटले असताही लगेच पाठोपाठ त्याच्या विरुद्ध हे श्लोक कसे येतात ते पाहा ! ! ]

> नान्यस्मिन्विधवा नारी नियोक्तव्या द्विजातिभिः ।
> अन्यस्मिन्हि नियुञ्जाना धर्मं हन्युः सनातनम् ।। ६४
> नोद्वाहिकेषु मत्रेषु नियोग. कीर्त्यते क्वचित् ।
> न विवाहविधावुक्तं विधवावेदनं पुन. ।। ६५
> अयं द्विजैर्हि विद्वद्भिः पशुधर्मो विगर्हितः ।
> मनुष्याणामपि प्रोक्तो वेने राज्यं प्रशासति ।। ६६
> समहीमखिलां भुञ्जन् राजर्षिप्रवरः पुरा ।
> वर्णानां संकरं चक्रे कामोपहतचेतन. ।। ६७

—अ. ९

ह्या दहा प्रकारच्या पुत्रात औरस नि क्षेत्रज हे श्रेष्ठ होत ह्या पुत्राच्या प्रकारावरून स्त्रीपुरुषासंबंधी मनुष्याची प्रवृत्ति त्या त्या सत्ययुगातही आजच्या कलियुगापेक्षा कोणच्याही प्रकारे अधिक संयत होती असे फारसे दिसत नाही. त्याचे असले संबंध अगदी अपवाद म्हणून शास्त्रकारांनी दुर्लक्ष करण्याइतके तुरळकही नव्हते इतकेच नव्हे, तर वरील प्रकारचे संबंध इतके वारंवार घडत की, त्याचे स्वतंत्र वर्गीकरण करून पितृसंपत्तीच्या वाटणीत त्या त्या पुत्राचे अंश ठरविणे धर्मकारानाही भाग पडावे !

विवाहसंबंध जितके संयत नि ऐकान्तिक असतील तितकी त्या समाजाची वैवाहिक नीति प्रशस्ततर होय असे जर म्हणावयाचे तर ह्या कलियुगातील वैवाहिक नीति त्या सत्यत्रेताद्वापार युगातील नीतीपेक्षा अधिक श्रेष्ठ होय असेही मानले पाहिजे कारण आजचे शास्त्र औरस नि दत्तक या दोन प्रकारच्या पुत्रानाच पुत्र समजत कानीन, सहोढ, गूढोत्पन्न, क्षेत्रज प्रभृति पुत्राना पूर्वीप्रमाणे मातापितरास पुनाम नरकातून तारणारे 'पुत्र' न समजता आज उलट तसे संबंध तशा माता-पितरास नरकात ढकलणारेच समजले जातात पण सत्ययुगादिक पूर्वीच्या युगात तर क्षेत्रज, गूढोत्पन्न, सहोढ, कानीन अशा संबंधाचे पुत्रही मातापितरास 'पु' नाम नरकातून तारणारेच समजले जात क्षेत्रज नि गूढोत्पन्न हे तर 'दायादाच्या' प्रशस्त वर्गात मोडत नि त्यास श्राद्धाचाही प्रकट अधिकार मिळे ! या प्रकरणी तरी कलियुग हेच सत्ययुगाहून अधिक संयत नि धर्मशील मानणे भाग आहे !

ह्या दहा पुत्राच्या वर्गीकरणात आणि गांधर्वादि विवाहात व्यक्त होणाऱ्या त्या सत्ययुगातील स्त्रीपुरुषसंबंधीय वैवाहिक नीतीवरून असे स्पष्ट म्हणावे लागते की, रशियातील आजची जी स्त्रीपुरुषसंबंधीय नीति, 'नवी नीति' म्हणून म्हटली जाते ती फारशी नवी नसून स्वैरतत तरी जवळजवळ 'जुनी नीति'च आहे, 'सनातन'च आहे आणि मनुस्मृतीला सनातन धर्माचा अपरिवर्तनीय आधारग्रंथ म्हणून म्हणणाऱ्या कोणाही 'सनातनीय' गृहस्थाला तरी त्या नव्या नीतिपद्धतीला पाखंड म्हणून नाके मुरडण्यास तोंड नाही ! पाखंड असलेच तर ते नवे पाखंड नाही, अगदी मनुप्रणीत, सत्ययुगीन, सनातन, पाखंड आहे ! ]

### कन्यादानविचार

काममामरणात्तिष्ठेद् गृहे कन्यर्तुमत्यपि ।
न चैवैनां प्रयच्छेत्तु गुणहीनाय कर्हिचित् ।। ८९
त्रीणि वर्षाण्युदीक्षेत कुमार्यृतुमती सती ।
ऊर्ध्वं तु कालादेतस्माद्विन्देत सदृशं पतिम् ।। ९०
पित्रे न दद्याच्छुल्कं तु कन्यामृतुमतीं हरन् ।
स हि स्वाम्यादतिक्रामेदृतूनां प्रतिरोधनात् ।। ९३

त्रिंशद्वर्षोद्वहेत्कन्यां हृद्यां द्वादशवार्षिकीम् ।
त्र्यष्टवर्षोऽष्टवर्षां वा धर्मे सीदति सत्वरः ॥९४

—अ. ९

कन्या ऋतुमती होऊन जन्मभर तशीच राहिली तरी चालेल पण तिला गुणहीन अयोग्य वराला केव्हाही लग्नात द्यायची म्हणूनच देऊ नये. ऋतुप्राप्तीनंतर तीन वर्षेपर्यंत वडिलांकडून लग्न ठरविले जाण्याची वाट पाहिल्यावर मग कुमारीने आपल्याला योग्य वाटेल तो समगुणशील पति स्वतः निवडावा, वरावा. अशा शुभवर कुमारीच्या पित्यास त्या वराने कोणचेही शुल्क देण्याचे कारण नाही. तिचा वेळीच विवाह न केल्याने आणि ऋतुप्राप्तीनंतरही तिला संभोगसुखापासून वंचित केल्याने तिच्या पित्याचे तिच्यावरील स्वामित्व त्याच्याकडे राहिलेलेच नसते.

## विवाहित जीवनाचा आदर्श धर्म

अन्योन्यस्याव्यभीचारो भवेदामरणान्तिकः ।
अेष धर्मः समासेन ज्ञेयः स्त्री-पुंसयोः परः ॥ १०१
तथा नित्यं यतेयातां स्त्री पुंसौ तु कृतक्रियौ ।
यथा नाभिचरेतां तौ वियुक्तावितरेतरम् ॥ १०२

—अ. ९

पतीने पत्नीशी आणि पत्नीने पतीशी कोणाच्याही प्रकारचा व्यभिचार न करता, अेकत्र असो, दूर असो, पण आमरण परस्पराशी निष्कपटपणे वर्तावे, हाच संक्षेपतः विवाहित जीवनाचा आदर्श धर्म होय !

[ स्त्री-पुरुषधर्माचा हा अुत्कृष्ट समारोप झाला. ह्या अेकंदर सर्व प्रकरणात अेक गोष्ट चटकन लक्षात आल्यावाचून राहत नाही ती ही की, पतिनिधनानंतर नियोग किंवा पुनर्विवाह किंवा आमरण ब्रह्मचर्ययुक्त जीवन नेण्याचे विधवेचे तिन्ही धर्मसंप्रदाय सांगितले असताही विधवेने पतीसह सती जावे, पतीमागे जगूच नये. असा विधि मात्र अिथे कुठेही धडधडीतपणे पुरस्कारिलेला नाही. सतीची रूढि प्रचलित झाल्यानंतरच्या कोण्या सतीच्या अभिमानी शास्त्रकाराने आपल्या त्या मताचेही पाचपंचवीस श्लोक ह्या स्मृतीत कसे घुसडले नाहीत देव जाणे ! क्वचित् तोपर्यंत ही मनुस्मृतीची शेवटची संकलित प्रत जी भृगुसंहिता ती अितकी मोजून मापून, लेखी तोंडी सर्वप्रसिद्ध झालेली असेल की, तिच्या त्या अनुक्रमणिकाध्यायाची पक्की कडीकुलपे ठोकून बंद केलेल्या पोलादी पेटीत बाहेरच्या अेका अक्षराची मुंगीही घुसणे अशक्य व्हावे ! ]

## पुत्र आणि पुत्री

यथैवात्मा तथा पुत्र पुत्रेण दुहिता समा ।
तस्यामात्मनि तिष्ठन्त्या कथमन्यो धनं रहेत् ।। १३०

—अ ९

मुलगा हा आपला आत्माच आहे. मुलगी ही पण मुलाप्रमाणेच आहे तेव्हा ती जिवत असता (निपुत्रिक पित्याचे धन) तिच्यावाचून कोण घेऊ शकणार!

अपुत्रोऽनेन विधिना सुता कुर्वीत पुत्रिकाम् ।
यदपत्य भवेदस्या तन्मम स्यात्स्वधाकरम् ।। १२७

—अ ९

निपुत्रिकाने (मुलीच्या ठिकाणी उत्पन्न होणारा पुत्र माझे श्राद्धादि विधि करो असे तिच्या लग्नाच्या वेळी ठरविणाऱ्या) विधीने मुलीलाच मुलाचे अधिकार अर्पावे, कारण—

पौत्रदौहित्रयोर्लोके न विशेषोऽस्ति धर्मतः ।
तयोर्हि मातापितरौ सभूतौ तस्य देहत ।। १३३

—अ ९

मुलाचा मुलगा आणि मुलीचा मुलगा यात धर्मदृष्टीने मुळीच अतर नाही; कारण ती दोघेही आजाच्याच देहापासून निर्मिलेली असतात. (याच्या उलटही काही वचने आहेतच!)

### स्त्रीवध

मनुस्मृतीत, ती आज ज्या भृगुसहितेच्या रूपाने आपल्यापुढे आहे, अशा स्थितीतही, स्त्रियाना ब्राह्मणाप्रमाणेच अेक विशेष सवलत मात्र अेकदरीत अगदी स्पष्टपणे आणि जवळ जवळ विरुद्ध श्लोकाच्या अभावाने अेकमते दिलेली आढळते. ती म्हणजे, स्त्री ही अवध्य आहे, तिला मारणे हे महापाप आहे. तिच्या हातून मोठमोठे अपराध घडले तरीही तिला वध दड होता कामा नये असा कडक दडक घालून देणे ही होय ह्या प्रकरणी मात्र स्त्रियाना आजच्या दडविधानापेक्षा (क्रिमिनल लॉपेक्षा) मनुस्मृतीचे प्राचीन दडविधानच परवडेलसे वाटते! अुदाहरणार्थ, खालील श्लोक पहा—

बालघ्नाश्च कृतघ्नाश्च विशुद्धानपि धर्मत. ।
शरणागतहन्तॄश्च स्त्रीहन्तॄंश्च न सवसेत् ।। १९०

—अ. ११

बालहत्या, कृतघ्नता, शरणागतहत्या आणि स्त्रीहत्या ही घोर पापे करणाऱ्या मनुष्याशी (प्रायश्चित्त घेतले तरीही) कोणी कोणच्याही प्रकारचा संबंध ठेवू नये.

**आतेबहीण, मावसबहीण, प्रभृतींशी विवाह करू नये !**

पैतृष्वसेयीं भगिनीं स्वस्रीयां मातुरेव च ।
मातुश्च भ्रातुस्तनयां गत्वा चान्द्रायणं चरेत् ॥ १७१
एतास्तिस्रस्तु भार्यार्थे नोपयच्छेत्तु बुद्धिमान् ।
ज्ञातित्वेनानुपेयास्ताः पतति ह्युपयन्नधः ॥ १७२

—अ ११

आतेबहीण, मावसबहीण, मामेबहीण (किंवा भाची, पुतणी) ह्यासारख्या बहिणीप्रमाणे असणाऱ्या स्त्रियांशी लग्न लावणाऱ्या (वा संभोग करणाऱ्या) पुरुषास अधोगति प्राप्त होते, तो पतित होतो [ आज अनेक जातींतच काय पर प्रत्यक्ष ब्राह्मण जातींतही ह्या काही चाली धडधडीत चालू आहेत आणि मनु स्मृतीत अस्पृश्यतादि जे आचार सांगितले आहेत त्यास तोडता म्हणून सुधारकाव तुटून पडणारे अनेक ब्राह्मण–ब्राह्मणेतर सनातनी ह्या चाली पाळणाऱ्या जातींतह आहेतच ! त्यांनी स्वत:च पतित म्हणणे सोडून मनूतील आचार परिवर्तनीः आहेत, त्रिकालाबाधित नाहीत आणि राष्ट्रहितास परवडतील ते घेऊन शेष सोडा असे तरी मानले पाहिजे. तीच स्थिति कन्येच्या शुल्काविषयी शूद्रांनी देखील शुल्क घेऊ नये शुल्क घेणे हे प्रच्छन्न कन्याविक्रयाचे पापच आहे असे अनेक कडव निषेधाचे श्लोक मनूत असताही कित्येक ब्राह्मण ज्ञातीसुद्धा, शुल्क धडधडीत धर्म सत्कारपूर्वक घेतात नि तरीही ' मनूतील अक्षर नि अक्षर त्रिकालाबाधित धर्म ' आहे म्हणून ओरडतच असतात ! शुल्कनिषेधाचे वानगी दाखल म्हणून अनेक श्लोकांपैकी खालील श्लोक पाहा ]—

आर्षे गोमिथुनं शुल्कं केचिदाहुर्मृषैव तत् ।
अल्पोऽप्येवं महान्वापि विक्रयस्तावदेव सः ॥ ५३

आददीत न शूद्रोपि शुल्कं दुहितरं ददन्।
शुल्कं हि गृह्लन्कुरुते छन्नं दुहितृविक्रयम् ॥ ९८
नानुशुश्रुम जात्वेतत्पूर्वेष्वपि हि जन्मसु ।
शुल्कसंज्ञेन मूल्येन छन्नं दुहितृविक्रयम् ॥ १००

—अ ९

शूद्राने देखील कन्येचे मूल्यच असलेले शुल्क घेऊ नये त्याला शुल्क नाव दिले तरी तो लबाडीने छपविलेला कन्याविक्रयच होय। पूर्वीच्या युगातही कन्याविक्रयाचे पाप ज्या गोंडस नावाने छपविले जाते ते शुल्क कोणीही घेतल्याची गोष्ट आम्हास ठाऊक नाही।

[मनुस्मृतीतले सारे श्लोक, जगदुत्पत्तीसहच मनुभगवानांनी सांगितले नि त्यातील अक्षर नि अक्षर अपरिवर्तनीय धर्म आहे या दोन्ही समजुती साफ खोट्या पाडण्यास हे तीनचार श्लोकदेखील अगदी बिनतोड पुरावा आहे। जर जगदुत्पत्तीसहच ही स्मृति रचली तर तिच्यात वारंवार जे 'कित्येक अमुक म्हणतात' अशी भिन्न आचार्यांची मते सांगून ती खुडली आहेत ते आचार्य काय साऱ्या सृष्टीच्याही आधी झाले होते? 'कित्येक असे पुढे म्हणतील' अशी भाषा देखील नाही. 'म्हणाले म्हणतात' अशी भाषा आहे. अर्थात् ऐतिहासिक दृष्टीनेच याचा अगदी नीट अुलगडा होतो की, भृगूने ही संहिता रचतेवेळी ज्या अनेक आचार्यांची मते प्रचलित होती ती अुल्लेखिली आणि प्राचीन मनुस्मृतीचे हे संस्कार सिद्ध केले. अनेक स्मृत्या त्या काळी असल्याचे बिनीतरी अुल्लेख 'या वेदबाह्या स्मृतय' प्रभृति श्लोकातून स्पष्टपणे आलेले आहेत। सर्व सृष्टि अेक दिवशी झाली नाही, मनुष्यच सृष्टीनंतर लाखो वर्षांनी झाला, तर मनूची गोष्टच दूर। ह्या सृष्टिविज्ञानाने सिद्ध झालेल्या घटना नाकारून या ग्रंथाचे योग्य ते महत्त्वही कमी करण्याचे पाप 'सनातन' थोतांडाने कोणी करू नये हेच युक्त पुन्हा वरील श्लोकात 'शुल्क घेण्याची चाल आम्ही कधीही अैकली नाही' असे ठासून सांगणारा हा ग्रंथकार स्वतःच 'आर्ष विवाहात शुल्क घेतात, ब्राह्मणाच्या सात पिढ्या तो विवाह अुद्धारतो' ह याच ग्रंथाच्या तिसऱ्या अध्यायात तितकेच ठासून सांगतो। अर्थात् तो ग्रंथकार अेकच होता हे मानून त्यास भ्रमिष्टात ढकलण्यापेक्षा हे असले अगदी परस्परविरुद्ध असे अनेक श्लोक अनेक शास्त्रकारांनी वेळोवेळी रचलेले नि नंतर अेकत्र सकललेलेच मानणे हेच त्या थोर स्मृतिकाराच्या योग्यतेस निष्कारण कमीपणा न आणणारे नाही काय? सामान्य ग्रंथकारालाही जी गोष्ट सुसंगतपणे सांगता येते ती मनुभगवानांना सांगता आली नाही आणि त्याच्या ग्रंथात अितकी विसंगतता आहे, की त्याचा समन्वय लावण्यास मीमांसादिकांच्या अवडंबरी नि

अतथ्य गृहीतकृत्याचे अुमने साहाय्य घ्यावे लागावे असे मानण्यातच मनुभगवानाची असह्य निंदा आमच्या 'सनातनी' थोताडात घडत आहे ! ]

## पुरुष हा स्त्रीहि आहे, पति हा पत्नीच्या अुदरी जन्मतो—

पतिर्भार्यां सप्रविश्य गर्भो भूत्वेह जायते ।
जायायास्तद्धि जायात्व यदस्या जायते पुन ॥ ८
अेतावानेव पुरुषो यज्जायात्मा प्रजेति ह ।
विप्रा प्राहुस्तथा चैतद्यो भर्ता सा स्मृतागना ॥ ४५
—अ ९

पति हा गर्भरूपाने पत्नीच्या पोटी पुन जन्मतो यास्तवच पत्नीला जाया म्हणतात त्या अर्थी पुरुष हा स्वयमेव पूर्ण शरीर नसून आपल्या स्त्रीशी समागम पावल्यावरच त्याचा देह पूर्णता पावतो नि प्रजोत्पादनक्षम होतो त्याअर्थी शहाणे लोक भर्ता हीच भार्या, पुरुष हाच स्त्री होय (ते दोन्ही मिळूनच अेक देह एक जीव होतो असे म्हणतात !)

## प्रसगी स्त्रीने शिल्पवृत्ति करावी

विधाय वृत्ति भार्याया प्रवसेत् कार्यवान्नर ।
अवृत्तिकर्षिता हि स्त्री प्रदुष्येत्स्थितिमत्यपि ॥ ७४
विधाय प्रोपिते वृत्ति जीवेन्नियममास्थिता ।
प्रोपिते त्वविधायैव जीवेच्छिल्पैरगर्हितै ॥ ७५
—अ ९

पतीने दूर प्रवासी जाताना पत्नीच्या पोषणाची व्यवस्था करून जाव चरितार्थाची सोय नसली म्हणजे चागली स्त्रीदेखील बिघडण्याचा सभव आहे पतीमागे पत्नीने नियमपालनाने दिवस काढावे अगदीच साधन नसेल तर योग्य ते शिल्पव्यवसायही करून पोट भरावे [ ह्या नि पूर्वी स्त्रीस्वभावाविषयी दिलेल्या अनेक श्लोकावरून सत्ययुगातील माणसे कलियुगातील माणसाहून काही निराळी नव्हती ह अुघड आहे तीही 'बिघडत' असत अितकी वारवार की, सत्ययुगामध्येही त्याना निर्बंधाच्या कडीकुलुपात ठेवता ठेवता स्मृतिकारानीही हात टेकून म्हणावे की, 'मात्रा स्वस्रा दुहित्रा वा नाविविक्तासनोऽभवेत् ! बलवानिंद्रियग्रामो विद्वासमपि कर्षति ॥' ]

## अनुलोमविवाही वाटणी

ब्राह्मणस्यानुपूर्व्येण चतस्रस्तु यदि स्त्रिय ।
तासा पुत्रेषु जातेषु विभागेय विधि स्मृतः ॥ १४९

त्र्यश दायाद्धरेत् विप्रो द्वावशो क्षत्रियासुत ।
वैश्याज. सार्धमेवाशमश शूद्रासुतो हरेत् ।। १५०

—अ ९

ब्राह्मणाला चारी वर्णांच्या चार लग्नाच्या भार्या असतील तर त्या चारीच्या मुलानाही त्याच्या मातेची वाटणी मिळावी. तीन भाग ब्राम्हणीपुत्र, दोनभागी क्षत्रियापुत्र, दीड वैश्यापुत्र नि अेक शूद्रपुत्र [मातृसावर्ण्य चालू केल्यावरही ब्राह्मणादिकाकडे भिन्नवर्णीय लग्नाच्या बायका असून त्याचे पुत्र दायादाचा धार्मिक अधिकार अुपभोगीत हे ह्या प्रकारच्या अनेक श्लोकावरुन अुघड आहे पण नेहमी. प्रमाणे त्या खाली लगेच अुलट श्लोक दत्त म्हणून अुभा आहे की, 'ब्राह्मणक्षत्रिय विशा शूद्रापुत्रो न रिक्थभाक्!' (अ ९ ११५) शूद्रास्त्रीच्या पुत्राला वाटा मुळीच देअू नये!!]

[१० व्या अध्यायात प्रतिलोम विवाहापासून होणाऱ्या सतति कोणच्या जातीत मोडतात त्याचे वर्णन आहे यावरुन आज चडाल, अम्ब, माग, निपाद, प्रभृति अस्पृश्य जाती आहेत त्या बहुतेक चातुर्वर्ण्याच्याच रक्तबीजाच्या आहेत असे मनुस्मृतीस सर्वथैव प्रमाण मानणाऱ्यानी तरी मानलेच पाहिजे.] अुदाहरणार्थ—

शूद्रादयोगव क्षत्ता चडालश्चाधमो नृणाम् ।
वैश्यराजन्यविप्रासु जायन्ते वर्णसकरा.।। १२

—अ १०

शूद्र पुरुषापासून वैश्यस्त्रीच्या ठायी झालेला तो अयोगव, क्षत्रिय स्त्रीच्या ठायी क्षत्ता नि ब्राह्मण स्त्रीच्या ठायी चाडाल अुत्पन्न झाला [म्हणजे समजा, अेका ब्राह्मणास दोन मुली. अेक ब्राह्मणाला दिली तिचा पुत्र ब्राह्मण दुसरी शूद्राला मिळाली तिचा पुत्र चाडाल म्हणजे आजचे महार प्रभृति अस्पृश्य हे आम्हा ब्राह्मणादिकाचे सख्खे मावसभाअू आहेत!! त्याच्यात आमच्यात अेकच रक्तबीज सनरत आहे! पुन्हा ब्राह्मणानी चाडालादिक स्त्रियाशी विवाह केल्याची अुदाहरणे ह्याच स्मृतीतील मागे दिलेल्या श्लोकातून दिलेलीच आहेत त्या चडाल स्त्रिया ब्राह्मणीच होअून 'जगद्वद्य' झाल्या!]

## जे जे श्लोक प्रक्षिप्त ते ते वाईटच आहेत असे नाही!

मनुस्मृतीतील महिलाविषयक बहुतेक महत्त्वाचे श्लोक या लेखमालेची स्थलमर्यादा साभाळून देता आले तितके येथे दिले मनुस्मृतीच्या यापुढच्या अकराव्या बाराव्या अध्यायात या विषयाचे फारसे श्लोकही नाहीत लेखावकाशही सपला. तेव्हा आता समारोपाच्या वेळी या लेखमालेत, प्रक्षेपक श्लोकानी मूळ ग्रथात परस्परविरुद्ध विधानाचा जो धुडगूस घातला आहे त्याविषयी वारवार जे दोषसूचक

अुल्लेख करावे लागले त्याची निःपक्षपाताने दुसरी बाजूही सूचित करणें आमचें कर्तव्य आहे.

राष्ट्राची परिस्थिति जशी बदलत गेली तसे मनुभगवानाचे काही निर्बंध, (कायदे) राष्ट्रहितार्थ पालटणे योग्य वाटूनच पुढील शास्त्रकारानी त्याच्या मते लोकहितास त्या नवीन परिस्थितीत ज्या अवश्य त्या नवीन सुधारणा घडवून आणण्यासाठी नवीन निर्बंध स्मृतीत घातले ह्या हेतूने जे श्लोक मनुस्मृतीत वेळोवेळी घातले गेले ते प्रक्षिप्त असले तरी ते घालणाऱ्याचा हेतु राष्ट्रहितकारकच होता, लबाडीचा नव्हता व्यक्तिशः त्याना त्यामुळे काही विशेष लुबाडायचे नव्हते हें आपण विसरता कामा नये मूळच्या निर्बंधाना विरुद्ध असे जे श्लोक मागाहून घातलेले दिसतात ते बहुधा नीतिकल्पनाचा आणि मात्त्विक सयमाचा विरासच व्यवस्थविणारे आहेत ही गोष्टच त्या प्रक्षेपकाच्या सद्हेतूचा बळकट पुरावा आहे. असल्या श्लोकाचे प्रक्षेपकच हे त्या त्या काळचे सदिच्छ सुधारकच होते.

अुदाहरणार्थ नियोगाची रीत घ्या आर्यराष्ट्र अल्पसख्य होते, त्याच्या शत्रूचा वेढा अजित होता, राष्ट्रवृद्धीस, सुपीक पण निर्जन भूमि वाटेल तेवढी पुढे मोकळी होती — तेव्हा राष्ट्राचे सख्याबल वाढविणे हितकर होते. यास्तव कुमारीपुत्र (कानीन) लग्नाच्या वेळी पूर्ण गर्भ असलेल्या कुमारीचा पुत्र (सहोढ) स्वतःच्या पत्नीने पतीस न कळविता परपुरुषापासून अुपार्जिलेला पुत्र मानून प्रतिपाळण्याचा अुदारपणा राष्ट्रहिताकडे दृष्टि देअून दाखवावा आणि त्यायोगे आर्यबीजाचा कण नि कण राष्ट्रीय सख्याबळ वाढविण्याकडे अुपयोजिला जावा हेच राष्ट्रहिताचे होते. पत्नी ही पतीचे क्षेत्र, त्यात जे अुत्पन्न ते पतीच्याच स्वामित्वाचे आहे. ह्या सूत्रान्वयें हे सारे पुत्र पुत्राप्रमाणे प्रतिपाळले जावे ही प्रवृत्ति अशा काळी राष्ट्रीय सख्याबळास हितकारक होती बीजक्षय होअू नये म्हणूनच धर्म्य मानलेल्या नियोगाचेही हेच समर्थन होय आजकालच्या जर्मनी, फ्रान्स, अिटली, रशिया

प्रचलविले नि नियोगादिक पूर्वधर्म वर्ज्य मानले त्या वैवाहिक अुच्चतर आदर्शांचे समर्थक श्लोक मनुस्मृतींतील पूर्वश्लोकाच्या आगेमागे प्रक्षेपून त्या निर्बंधांसही मनूच्या नावाचा आसरा घेतला. या मद्यपाननिषेध, नियोगत्याग, मांसाशनत्याग, यज्ञहिंसानिषेध, कानीनादि पुत्रांचा निषेध प्रभृति प्रकरणी तरी सत्ययुगातील पूर्वाचार्यांपेक्षा अर्वाचीन आचार्यांचा, धर्माचा नि नीतीचा आदर्शच अधिक संयमशील, दयादाक्षिण्यशील नि सत्यशील असलेला आढळतो. सत्ययुगीन निर्बंधानीं ज्या भोगांना ते प्रकटपणे भोगू शकत असा अनेक स्वैरभोगांस या नव्या आचार्यांना त्यांच्या स्वत च्या या कडक नव्या निर्बंधामुळे आचवावे लागले पण हे कळत असूनही त्यांनी आपल्या स्वैरतेवर आपण होअून कडक बंधने घालून घेतली हे त्या ब्राह्मण शासनकाराच्या नि क्षत्रियशास्त्रगोप्त्याच्या समाजहितार्थ केलेल्या त्यागाचे नि अुच्चतर नीतिमत्तेचेच दर्शन आहे खरोखर, सत्ययुगीन धर्मापेक्षा हे कलियुगीन धर्मच अधिक धर्मशील आहेत. कारण ह्या प्रक्षेपक अर्वाचीन आचार्यांनी प्राचीनात जे अेकदरीत वर्ज्य तेच बहुधा कलिवर्जात वर्ज्य ठरविले आहे

## ह्या गडबडगुंड्याचा सारा दोष आमच्या ‘ शब्दनिष्ठ सनातन ’ प्रवृत्तीचाच आहे !

प्रक्षेपकाचा हेतु चांगलाच होता हे वर दाखविले. आता मगळपान मोठा दोष म्हणजे त्यांनी त्यांना चांगल्या वाटणाऱ्या सुधारणा स्वत च्या श्लोकांत स्वत च्या नावावर न प्रसिद्धता प्राचीन मनुस्मृतीत मनूच्या नावे दडपून दिल्या हा होय. यायोगे त्या साऱ्या प्रथांची खिचडी होअून मूळ मनु काय म्हणतात नि प्रक्षेपकांचे प्रक्षिप्तमत कोणते हे निश्चितपणे सांगणे दुर्घट झाले हो घातात लबाडी होती. परंतु ती करण्यातही त्या प्रक्षेपकाचा हेतु अेकदरीत परोपकारक होता. कारण जे जे नवीन ते ते चांगले आहे म्हणून न स्वीकारता ते श्रुतिपुराणोक्त असल तरच स्वीकार्य होय असा दडक अगदी मनूपासूनच आमच्या रामरोमी खिळलेला होता. वेदात आहे तेच मी सांगतो, असा खऱ्याखोट्या शपथा मनूलादेखील वारंवार ह्या स्मृतींत घ्याव्या लागल्या तेव्हा मनुस्मृति धर्म्य ठरू शकली. स्वत मनुस्मृतीतही ‘ अितर स्मृति खोट्या आहेत, त्या पाळू नका ’ हे सांगतांना अगदी शेवटच्या

दडव ! त्यामुळे पुढच्या शास्त्रकाराना आपल्या सुधारणा लोकाच्या गळी अुतरविण्यास आपले श्लोक मनूच्या प्राचीन स्मृतीतच दडपण्यावाचून गत्यतर अुरले नाही ! हा दोष मुख्यत· त्या प्रक्षेपकाचा नसून त्याचे खापर पुष्कळ अशी ह्या आमच्या पूर्वापार 'शब्दनिष्ठ सनातन' प्रवृत्तीवरच फोडले पाहिजे !

## अैतिहासिक दृष्टीने मात्र ही अडचण मुळीच पडत नसून सारा उलगडा समाधानकारकपणे होतो

परतु कोणचा श्लोक प्रक्षिप्त, कोणचा मूळ, कोणचा वेदनिष्ठ नि कोणचा वेदबाह्य, ही मानगड अैतिहासिक दृष्टीने हा ग्रथ वाचणाऱ्या आम्हासारख्यास मुळीच नडत नाही. तो अेक अैतिहासिक चर्चेचा विषय अितकेच त्याचे महत्त्व. राष्ट्राच्या आजच्या परिस्थितीत राष्ट्रधारणास जो श्लोक अुपयुक्त वाटेल तो, मनूचा असो, प्रक्षिप्त असो, तो आम्ही आचरू, जेथे तो परवडणार नाही तेथे राष्ट्रहितसाधक असे अद्ययावत् ज्ञानाच्या कसोटीस अुतरणारे नवीन निर्बंध करू. खरेखोटे, चागलेवाअीट, हे ठरविण्याची 'अर्वाक्कालिकता' ही अेकमेव कसोटी आहे हे आम्हास मुळीच मान्य नाही तसेच जुने ते सोने हे जसे कधी खरे असते तसे जुने ते गिळे हेही खरच असते

मनूचे अक्षर नि अक्षर खरेच, ती स्मृति सुसगतच आहे असे मानणाऱ्या शब्दनिष्ठ सनातन्यानाही तीतील शेकडो धडधडीत अन्योन्यविरुद्ध श्लोकाचा समन्वय लावता नाकी नव येअून शेवटी प्रत्येक टीकाकार मनुस्मृतीचे श्लोक जरी पालटत नाहीत तरी अर्थ फिरवून अेकेक नवीन मनुस्मृति लिहितो. मनूत मास खाणे धर्म्य आहे असे म्हणून ब्राह्मणाच्या काही जातीच्या जाती मास खातात काही मास वर्ज्य पण मासे धर्म्य म्हणून मनूच्या नावे मासे खातात, काही मनू दोन्ही वर्ज्य मानतो असा समन्वय लावून केवळ शाकाहार करतात ! ही प्राचीन परपरा आजही चालवून कोणी अनुलोम विवाह मनूच्या नावे अधर्म्य समजतात तर कोणी त्याच मनूच्या नावे आज धडधडीत प्रतिलोम विवाह 'शास्त्रोक्त' मानून ब्राह्मणाची मुलगी वैश्यास देतात ! अशी बिचाऱ्या मनूच्या शब्दाशब्दाची वुतरओढ होअून आजही मनुस्मृतीच्या श्लोकाची अेकच प्रत असता तिच्या अर्थाच्या पाचशे-जणानी पाचशे मनुस्मृत्या करून साडल्या आहेत !

पण अैतिहासिक दृष्टीच्या वाचकाना तसा दुसराही शब्दच्छल करण्याचे कारणच पडत नाही आजची मनुस्मृति अेकटाकी, सुसगत, अेका ग्रथकाराची मूळस्मृति नाही, ती अेक भिन्न मताची सकलित सहिता आहे वेदकाळच्या अितिहासाप्रमाणे ज्या रूढि अत्यत प्राचीन ठरतात त्याचे समर्थक श्लोक पहिले, त्यानतरच्या अितिहासकालात ज्या रूढी गळलेल्या आढळतात त्याच्या—नियोग, मासाशनप्रभृति—निषेधाचे श्लोक त्यानतरचे प्रक्षिप्त, अशा अितिहासाच्या स्वतत्र

पुराव्याने प्रक्षिप्त श्लोकाची छाननी अेकदरीत बरोबर करता येते तरीही अमुक श्लोक मूळचा वा प्रक्षिप्त आहेच आहे असा दुराग्रहही धरणे दुर्घट आहे—अितकी ती खिचडी शिजून अेकजीव झालेली आहे—हीही अैतिहासिक वाचक विसरत नाही. शेवटी कोणचाही श्लोक मूळचा म्हणून चांगला, प्रक्षिप्त म्हणून वाअीट या स्मृतीतला म्हणूनच अनुल्लंघ्य असे मानीत नाही, तर आजच्या राष्ट्रीय परिस्थितीत हितकारक असेल तर मानतो, नाहीतर तसा हितकारक तो नवीन निर्बंध नवीन म्हणून चक्क सांगून स्वीकारतो. विज्ञाननिष्ठ, प्रत्यक्षनिष्ठ, अद्ययावत् प्रवृत्ति हीच. ह्याच प्रवृत्तीने नि ह्याच अैतिहासिक दृष्टीने मनुस्मृतिच नव्हे, तर श्रुतिही वाचल्या असता त्यांच्या अर्थाचा दुर्दशा न होता तो पुष्कळ अधिक सरळपणे लागतो, त्या ग्रंथांची नसती विटंबना टळते.

शेवटी या लेखमालेच्या आरंभी दिलेल्या कारणासाठी या प्राचीन नि पूज्य महाग्रंथाची थोरवी आठवून नि त्याचे आमच्या हिंदुराष्ट्रावर शतकानुशतके झालेले अुपकार स्मरून, अेका काळी जपानपासून यवनद्वीपापर्यंत (ग्रीसपर्यंत) धर्मग्रंथ वा निर्बंधशास्त्र म्हणून मूर्धाभिषिक्त पावलेल्या नि शतभाषांतून भाषांतरिलेल्या त्या मनुस्मृतीस नि मनुभगवानासच नव्हे तर भृगुसंहितेस नि भृगुऋषीसही वारंवार वंदून आम्ही ही लेखमाला संपवितो.

\+ \+ \+

# व्रतविधि आणि विवेक

## (उत्तरार्ध)

'व्रते आणि वैकल्ये'[१] या विषयाच्या पूर्वार्धात जे विवेचन केले त्यातील मुख्य विधेये (पॉअिंटस) या अुत्तरार्धाच्या अनुसंधानार्थ अवश्य तितका प्रारंभीच अुल्लेखिणे भाग आहे. ती विधेये अशी :—

(१) धार्मिक श्रद्धेच्या दृष्टीने सर्वांत श्रेष्ठ म्हणजे देव, अीश्वर हा सत्यस्वरूप आहे. सत्य म्हणजे जे आहे ते आहे तसे मानणे. सृष्टीचे वा सृष्टिकर्त्याचे ज्ञान नि अुपासना म्हणजे त्या सत्याचीच अुपासना असली पाहिजे. 'न हि सत्यात्परो धर्मो नानृतात्पातकं परम्' हे लक्षण नुसते सत्य बोलण्याच्या अेका व्यावहारिक आचाराचे

१ 'व्रते आणि वैकल्ये' हा निबंध दुसऱ्या खंडात मागे आला आहे. त्याच विषयाचा हा अुत्तरार्ध आहे.

नसून ते वर दिलेल्या अत्यंत व्यापक अशा तात्त्विक अर्थीच सर्व सुसंस्कृत धर्मांत समजिलेले आहे. तेव्हा ज्या ज्या व्रतात आणि अुपासनेत सृष्टीच्या यथातथ्य स्वरूपाची विकृति गृहीत धरलेली असते ती सर्व व्रतें असत्याचीच अुपासना होत असल्यामुळे अधर्म्य ठरतात. मनुष्याला सत्याचा प्रसार करण्याचे धर्मकृत्य त्या व्रतामुळे अडखळते आणि असत्याचा प्रसार करीत राहण्याचे पाप मात्र पदरी पडते. हजारो वर्षांपूर्वी अनेक वस्तूंच्या सत्यस्वरूपाचे ज्ञान मनुष्यास नव्हते. त्या वेळेस त्यांना जे स्वरूप त्या काळच्या अपक्व ज्ञानामुळे सत्य वाटले त्याची अुपासना करणारी व्रतें, कथा, आख्याने त्यांनी प्रचलविली यात त्यांचा तितकासा दोष नाही. परंतु त्यावर त्रिकालाबाधित धार्मिक सत्याचा छाप मारण्याच्या चुकीमुळे ते हजारो वर्षांपूर्वीचे मानवी अज्ञान चिरस्थायी करण्याचे मात्र पाप आता आम्ही करू नये. प्रत्यक्षनिष्ठ नि प्रयोगक्षम विज्ञानाच्या प्रगतीने ज्या ज्या पूर्वीच्या सृष्ट पदार्थांविषयीच्या कल्पना आज साफ खोट्या पडल्या आहेत, त्या आपण जरी पूर्वी त्यास धर्म समजत गेले असले तरीही असत्य म्हणून आज टाकून दिल्या पाहिजेत, आणि त्या असत्याच्या पायावर अुभारलेली तत्तद्विषयक जी जी व्रते वा अुपासना असतील त्या साफ सोडून दिल्या पाहिजेत

(२) आज केवळ असत्याचीच पूजा ठरणाऱ्या अशा शेकडो व्रतांचे अेक चटकन् लक्षात येण्यासारखे अुदाहरण म्हणजे ज्योतिर्गोलविषयक व्रतांचा गट होय. चंद्रसूर्यशनिगुरुमंगळप्रभृति ज्योतिर्गोल ह्या स्वतंत्र नि सजीव अशा देवता असून मनुष्याच्या स्तुतिनिंदेने त्या प्रसन्न वा प्रक्षोभू शकतात, अशी मनुष्याची पूर्वी जगभर समजूत होती. आपल्या हिंदूतच नव्हे, तर प्राचीन काळच्या बहुतेक राष्ट्रांतून नि धर्मांतून ही समजूत आणि तीवर आधारलेल्या त्यांच्या अुपासना, व्रतवैकल्यें प्रचलित असत. पण आता ज्योतिषशास्त्राच्या प्रगतीमुळे हे प्रयोगसिद्ध झालेले आहे की, हे सारे ज्योतिर्गोल निर्जीव पदार्थ असून त्यांच्या गतिस्थिति ह्या गणिताच्या कठोर नियमांनी बद्ध असून त्यांच्या प्रकाशघर्षणादिकांचे मनुष्यावर होणारे परिणाम हे मनुष्याच्या स्तुतिनिंदेने अथवा ब्राह्मणभोजनाने वा महारास दान दिल्याने वा दगडास तेलशेंदूर फासल्याने वा शनिवारमंगळवारी अुपाशी राहिल्याने वा अर्घ्यप्रदानाने वा शनिमाहात्म्याच्या वा सूर्यमाहात्म्याच्या पारायणाने लेशमात्र बदलू शकत नाहीत त्यांचे परिणाम टाळण्याचा मार्ग शनिमाहात्म्यातील भाकडकथाप्रमाणे वागणे हा नसून, गणितरसायनवैद्यक या प्रयोगक्षम विज्ञानाच्या नियमास समजून घेणे आणि त्याच्या आधारे ते ते वैज्ञानिक प्रत्यक्ष फलदायी अुपाय योजणे हा होय. मनुष्यास हें ज्ञान आता झाले असताही पूर्वीच्या अज्ञानाला 'धर्म' म्हणून अुराशी बाळगणे आणि त्याची ती ती अुपासना, व्रतवैकल्यें करीत राहणे ही असत्याचीच पूजा होणारी असल्यामुळे निर्भेळ अधर्म होय.

अगदी ताजें अुदाहरण आगगाडीचे घ्या. हिंदुस्थानात प्रथम आगगाडी आली,

तेव्हा शेकडो गावकऱ्यांना ती अेक देवीच वाटली ना घोडा, ना बैल, ना गाडव जुपलेले, पण अेखाद्या वाघिणीसारखी धावते आहे भरमसाट! अेक अद्‌भुत प्राणीच कोण्या अगम्य जगातून सुटला नि गावात शिरला जसा! आणि त्याची वीण वाढून जिकडेतिकडे आगगाडीच आगगाडी झाली! अेखाद्या आता नसलेल्या भुयाराचे तोंड फटकन् दगड ढकलताच अुघडावे नि आतून सापाचे पेव फुटून भराभर सापच साप जिकडेतिकडे धावू लागावे तसे ते आश्चर्य! कितीक वर्षे अनेक गावकरी लोहपथाच्या तारापाशी तिष्ठत नि आगगाडी येताच त्या देवीस प्रसाद-विण्यास्तव नवसाचे नारळ खटाखट फोडीत! त्यातल्या त्यात जितके बरे झाले, की केवळ अडाणी लोकातच ही भावना राहिली आणि अुपाध्यायवर्गाने ती अंगी-कारली नाही पण जर का कोण्या पंडितास त्या देवीवर काही संस्कृत अनुष्टुभ रचण्याची स्फूर्ति सुचली असती तर आगगाडीविषयीच्या त्या अडाणीपणावर 'धर्मा'चे पुट चढून आपल्या नवसास पावणाऱ्या देवतात अेका आगगाडीची नि अेका आगगाडीवाराची या व्रताची चिरतन भर पडली असती! पण धार्मिक वर्गास दुसऱ्याच अेका कारणाकरिता अशी बुद्धि झाली नाही नि ते अडाणीपण त्यावर धार्मिक छाप पडून चिरतन होण्याचे सकट टळले ते कारण असे की, ती आगगाडी तिच्या डब्यात महारासुद्धा मामाना मगमिमळ वमवी — सोवळे नेसून बसण्याची या यवाने धाणतीही स्वतत्र सोय केली नव्हती! यामुळे ती धार्मिक पूजेस पात्र ठरली नाही, पण तरीही धार्मिक निदेस पात्र ठरलीच! पुष्कळ वर्षांपर्यंत आगगाडी असताही अुपाध्याय नि भाविक वर्ग बैलगाडीतूनच तीर्थयात्रादिकास जात नि आग-गाडीतून वा आगनावेतून प्रवास केल्यानंतर कपड्यासुद्धा स्नान केल्यावाचून घरात प्रवेशत नसत! पण आगगाडीची वा आगनावेची सारी सळ हजारो लोकास प्रत्यक्षपणे कळताच आता आगगाडीस नुसता शिष्टाचाराचा कार्यी नमस्कारदेखील करीत नाही — मग नवसाचा नारळ फोडणे दूरच! आगगाडी, आगबोट, मोटारी यांच्यातही अपघात होतातच, प्राणहानिही होते, पण ती त्या वस्तु गंगावन्या म्हणून हात असे आता गृहीत धरून अडाणी खेडवळदेखील त्यात बसताना त्यांच्या-खाली कावडे मारून वा त्याना कुंकू लावून त्यास प्रसादवीत बसत नाही तर ते अपघात टाळण्यासाठी रस्ते नीट करणे, त्याची अटक (ब्रेक) ठीक आहे की नाही ते पाहणे, त्याचे अेंजिन गति पेट्रोल यथावत् प्रमाणात ठेवणे या प्रत्यक्षसिद्ध अुपायासच सेवढा अवलंबतो

आगगाडी, आगनाव, मोटारीप्रमाणे निर्जीव नि भावनाशून्य असणाऱ्या ह्या ज्योतिर्गोलानासुद्धा आता यंत्रे म्हणूनच लेखिले पाहिजे. यापुढे प्रत्येक पंचांगात, निदान टिळक पंचांगात तरी मकरसंक्रमणाचा वैज्ञानिक अर्थ द्यावा, ग्रहणाची वैज्ञानिक कारणे द्यावी, ग्रहांचे व्यास नि गति, सूर्यमालेची नि पृथ्वीची अवश्य ती आकृति वैज्ञानिक परिभाषेत निवेदावी आणि ते संक्रातीचे सोंग नि ती ग्रहणा-

दिवाची भाकड वर्णने साफ काढून टाकावी. लोकांना धडधडीत थापा मारून असत्यात नि अज्ञानात पंचांगप्रवर्तक मंडळासारख्या या गुरु संस्थांना ठेववते तरी कसे ! अशा विवेकाची कसोटी लावली असता विज्ञानाने जी गोष्ट धडधडीत असत्य म्हणून ठरविली आहे आणि प्रत्यक्ष प्रयोगाने जी तशी असत्य असल्याचे प्रत्ययास येऊ शकते तिची उपासना, पूजा, वा प्रचार करण्यास कारण होणारी ही चंद्र-सूर्य-ग्रहोपग्रहादि ज्योतिर्गोल नि ग्रहणासुद्धा ज्योतिर्घटना यासंबंधीची पंचांगसाठ व्रत-वैकल्ये निव्वळ असत्याची पूजा, निव्वळ अधर्म ठरतात. पूर्वी अज्ञानाच्या अंधेरात दोरी साप म्हणून भासली त्यामुळे भीति वाटली ती साहजिक समजता येईल पण आता ती साप नसून दोरीच आहे हे विज्ञानाच्या उजेडात स्पष्ट झाले असताना सुद्धा तो साप आहे म्हणून लोकांस थापा मारीत सुटणे, भिवविणे नि काठ्या घेऊन तीवर मारीत बसण्याचा वा तिला दूध पाजण्याचा देखावा करणे हा मात्र काही अशी निव्वळ वेडगळपणा नि काही अशी लुच्चेगिरीही होणारी आहे.

(२) विज्ञानाने आज जी सत्ये निर्विवादपणे प्रत्यक्ष प्रत्ययाच्या आधारे सिद्धिली आहेत त्यांच्या प्रचारास अडथळा करणारी अज्ञानमय व्रते जशी साफ सोडून दिली पाहिजेत तशीच या व्रतवैकल्यांची रूपे कोणचेही ऐहिक फल न देता निव्वळ पुराणातील भाकडकथांच्याच आधारावर प्रचलविली जातात त्या व्रत-वैकल्यांची ती रूपेही बदलली पाहिजेत. अशा प्रत्येक व्रतास जी कसोटी लावा-वयाची ती ही की, ह्या व्रताने ह्या लोकी स्वतःचा, स्वतःच्या राष्ट्राचा वा एकंदर मनुष्यजातीचा काहीतरी प्रत्यक्ष लाभ होतो आहे की नाही ? तसा ऐहिक प्रत्यक्ष लाभ होत असेल तरच त्या व्रतवैकल्यात दवडला जाणारा काल नि धन काहीतरी सत्कार्यी लागले असे समजावे. नाहीतर ती व्रतवैकल्ये अशा रूपाने करू नयेत. व्रताचा पारलौकिक लाभ पदरी पडायचा असेल तर तो पडूनसुद्धा त्यावाचून ऐहिक असा कोणचा तरी प्रत्यक्ष लाभही मनुष्यजातीच्या पदरात पडला पाहिजे. ह्या कसोटीस उतरतील तीच व्रतवैकल्ये तशा दुहेरी लाभास देणाऱ्या रूपात नि पद्धतीने आचरावी म्हणजे जरी क्वचित त्याच्यापासून होणारा कल्पित वा संभव-नीय पारलौकिक लाभ लटका पडला, तरीही त्यात दवडलेल्या समयाचा नि द्रव्याचा ऐहिक लाभ तरी निश्चयपणे पदरात पडणारा असल्याने ती केव्हाही अगदीच व्यर्थ जाण्याची आपत्ति येणार नाही. ह्या दुसऱ्या प्रकारच्या व्रतास ही कसोटी कशी लावावी हे विशदविण्यासाठी आता या लेखांकात उदाहरणासाठी तशा काही व्रतांची छाननी करावयाचे योजले आहे.

## लक्षवातींचे वा लक्ष दूर्वांचे व्रत

देवाची सेवा म्हणून केली जाणारी ही व्रते मकरसंक्रमणासारख्या एका घटनेला लागून आहे नि ती घटना गाढवावर बसलेली आहे अशा निर्भेळ असत्यास

फैलावणाऱ्या थापेबाजीची नसून सोज्वळ असतात, यास्तव ती तितकी आक्षेपार्ह नसतात. पण त्यात विवेक अितकाच करावयाचा की, देवास प्रसन्नविण्यासाठी केलेल्या या खटपटीचा प्रत्यक्ष व्यवहारानही काही अुपयोग आज होत आहे का? पूर्वी मोठमोठ्या देवळांचे गाभारे अंधकारमय असत. घरातही समया, लामणदिवे, पणत्या याचाच प्रचार असे. त्या कामी केलेल्या वाती अेक आवश्यकनाच असे. देवळात त्या अुपयोगी पडत, घरातही लागत. पण हजारो वर्षांपूर्वीचे हातवातीच्याच अुजेडात चाचपडण्याचे युग आता बदलले आहे. जुन्या प्रयात देवालयाच्या गाभाऱ्यातही आता विजेच्या वा ग्यासच्या झगझगीत दिव्यांनी वा बटनांनी मजावट होत आहे. घरोदारी तर खेड्यातूनही कदीलचिमण्या नि नगरातून विजेचे वा ग्यासचे दिवे खोल्याखोल्यातून झगझगत आहेत. मग आता ज्या देवळीत, सभामंडपात वा गाभाऱ्यात ग्यासच्या वा विजेच्या प्रकाशाचा झगझगाट झालेला आहे, तिथेच अेक लामणदिवा यापूर्वी केवळ पणजोबाच्या वेळेस तो लावीत म्हणून लावून ठेवणे हास्यास्पद नाही काय? मोटारीला बैल लावणे किंवा मशीनगनचा गोळा धनुष्याच्या तातीने फेकणे हे जितके विसंगत, वेडेपणाचे, तितकच विजेच्या झुंबरांनी दिवसासारख्या लख्ख प्रकाशलेल्या गाभाऱ्यात समईचा वा लामणदिव्याचा मिणमीण नंदादीप अुगीच धुरकटत ठेवणे हेही! तेव्हा ज्या देवळी वा ज्या घरी हातवातीच्या मिणमिणी दिव्याचा मुळीच अुपयोग होत नाही, त्या ठिकाणी लाख वातीचे हे व्रत म्हणजे वेळेचा, कापसाचा नि तेलाचा निव्वळ अपव्यय आहे. पणजीचे युग पणतीचेच असे. तेव्हा ती वाडवानी करी ते शोभे. पण आता या लख्ख विजेच्या युगात लाखवातीच्या व्रताला देवही हसत असेल! तेव्हा ते व्रत आता त्या जुन्या मोडीच्या लामणदिव्याच्या अडगळीतच टाकून देणे बरे.

पण तरीही त्या व्रतातील जो देवाच्या सेवेचा श्रद्धावंत मनाला अुदार करणारा हेतु, तो मात्र मुकता कामा नये. त्याच हेतूने पण ज्यायोगे प्रत्यक्ष व्यवहारात आज मनुष्यजातीचे अल्पस्वल्प हितही साधता येईल अशा स्वरूपात ते व्रत आचरावे. अेक कोणचा तरी तसा प्रकार सुचवावयाचा तर असे सुचविता येईल की, त्या वेळेत टकळीवर सूत काढावयास शिकून ते फक्कड सूत अमुक प्रमाणात देवाच्या नावे दान द्यावे अेखाद्या प्रामाणिक निर्धन विणकऱ्यास! किंवा मागावर ते स्वतः विणावे नि ती खादी हीनदीन पण स्वतः शक्य ती मेहनत करणाऱ्या सच्छील मुदुष्यास द्यावी. अशा लोकहिताने, नराच्या सेवेने—जर लाखवाती नि तेल निष्कारण भुरभुरू जाळण्याने तो संतापत असेल तर—नारायण अधिकच संतोषेल यात शंका नाही!

## तीच गोष्ट लाख दूर्वांची!

तासन्तास परड्यातून नि खिडारातून त्या गवताची अेकेक काडी मुडीत वेळ गमवावयाचा आणि तो भारा गणपतीच्या डोक्यावर द्यायचा! पत्र्या नि दूर्वा

वाहताना त्या भाऱ्याखाली बहुधा त्या गणपतिगौरीच्या टीचभर मूर्ति कापसाच्या ढिगात सरकी दबून गुदमरून जावी तशा नुसत्या गुदमरून जातात! एखाद्या अशा व्रतस्थ महिलेच्या भक्ताने जर स्वतःच्या महिलेला लाख कडव्यांच्या पेंढ्या वाहण्याचा प्रेमसंकल्प केला नि तिला मध्ये बसवून त्या पेंढ्या तिच्या अंतीभोंती, घरखाली, तिच्या कानात, नाकात, डोळ्यात, तोंडात त्या काड्या घुसतात की नाही तेदेखील न पाहता म्हण 'अर्पयामि' की रच पेंढी अशा वाहिल्या तर त्या भक्ताची तशी भक्ति जीव गुदमरून गेलेली ती स्त्री किती वेळ सोशील? मग सगुण भक्तीच्या दृष्टीने बोलायचे तर त्या गौरीगणपतीच्या मूर्तीस आपल्या गवत-पाल्यांच्या भाऱ्यात गुदमरून टाकताना त्याची काय काय दुर्दशा होत असेल हे नको का बघायला? श्वास घेण्यापुरती त्या मूर्तीच्या नाकापुढची जागा तरी रिकामी ठेवावी! पुन्हा हा लाख दूर्वांच्या गवताचा भारा गणपतीस का वाहायचा? गणपति गवत का खातो? गवताच्या भाऱ्यास वाहावयाचेच, तर तो गायीस तरी वाहावा; तो भारा खाऊन झाल्याने पशु प्रसन्न होईल. या जगात पिता येईल असे दूध देईल. पण मोदक खाणाऱ्या गणपतीस लाखो दूर्वांच्या गवताचे भारे वाहावयाचे आणि गवत खाणाऱ्या नि ओखटवाणीच हौशीने खाणाऱ्या 'गोमातेस' माणसासारखे मुग्रास पचपचवाण्याचे पान वाढून तो ग्रोग्रास वाहायचा! ही काय व्रते की विटंबना? भाकड पोथ्यांच्या नादाने असला पात्रापात्रतेचा लवलेश विचार न करणारा हा वेडगळपणा अक्षरश: आज खरोखरीच आचरला जात आहे की नाही बरे? पोथीच हवी तर ती भगवद्गीता नाही का? श्रद्धारेखील तिला श्रुतिपदासमान पूज्य मानते, तीत 'देशे काले च पात्रे' जे जे दान ते तेच सात्त्विक नि 'अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते। दीयते बहुलायास तत् तामस-मुदाहृतम्' असे सांगितले आहे. त्या प्रकारे व्रतात्मक दानात नि दानात्मक व्रतात आम्ही आता 'देशा'प्रमाणे नि 'काला'प्रमाणे पात्रापात्रविवेक केलाच पाहिजे.

तेव्हा हिरव्या गवतासवधी वा वनस्पतिविषयकच व्रत करायचे तर शेत-करणीसारखा चवक पातळाचा काचा मारून विळा घेऊन हिरव्यागार रानात जावे नि लाख दूर्वा खुडीत खिडारात जो तास घालवावयाचा त्यापेक्षा त्याच वेळात सचारच गवताच्या पधरावीस हिरव्यागार पेंढ्या कापून देवाप्रीत्यर्थ गायीस घालाव्या किंवा मुबालिक सुंदर फुलारानफुलाच्या परड्या भरभरून आणून त्यांचे गजरे मोगरी मुलींना भेट द्यावे, किंवा आपल्या वा कोण्या आप्ताच्या अंगणात स्वतः पाणी भरून फुलझाडे लावावी आणि मालती, सोनचाफा, जाईजुई, गुलाबाची सुंदर फुले प्रत्यही देवास वाहावी; सारीच्या सारी अंगीच देवावर ढीग रचून नव्हे, तर देवघरात शाभतील तितकी तिथे नि बाकी हार करून फुलपात्रातून घरात दाराशी नि घरात कुशलपणे विरचावी. आपल्या घरच्या नि ज्याना ती मिळत नाहीत अशा दीन कुमारिकांच्या वेसातून आपण स्वतः पाणी भरून वाट-

विलेल्या लतावेलींची ती ताजी टवटवीत फुले गुफावी, की ज्यायोगे जिथेजिथे त्या वावरतील तिथेतिथे त्या त्या दिवशी नि रात्री सुरेखपणाचे नि सुवासाचे वातावरण दरवळत राहावे! अशा आरोग्यप्रद नि आनंददायी सौंदर्याची पूजा हेही अेक व्रतच आहे वाल्मीकीसारख्या वानप्रस्थाने देखील सीतेसारख्या सयमशील ललनेस सुद्धा असेच अेक व्रत सागून लडिवाळ आश्वासन दिले नाही का, की 'पयोघटै राश्रमबालवृक्षान् संवर्धयन्ति स्वबलानुरूपै। असंशय प्राक्तनयोपपत्ते: स्तनधयप्रीतिमवाप्स्यसि त्वम्।'

## वडपिंपळांना लाख प्रदक्षिणा

अशा वर्गातल्या व्रतासही वरचीच कसोटी लावावी वनस्पतीशी जीवैक्याची भावना अनुभवावयाची वा संवर्धावयाची तर त्याच्या भोवतीभोवती फिरण्याचा मार्ग टाकाअू आहे हे विशाल विस्ताराचे वृक्ष आपल्या अुष्ण प्रदेशातील लोकास त्याच्या छायाशीलतेने अत्यंत वत्सल वाटावे नि त्याविषयी कृतज्ञता व्यक्तविण्याची प्रवृत्ति व्हावी हे आपल्या लोकांच्या दयाशील संस्कृतीस साजेसेच आहे पण *त्यासाठी त्या झाडाचा देवच करून टाकणे आपल्या संस्कृतीच्या पदरी बुद्धिहीनतेचा* दोष बांधण्यासारखे आहे! या विशाल नि अुपयुक्त वृक्षाची मनुष्याला अुपयुक्त होअील अशी लागवड वाढवणे, जोपासना करणे, अितर अुपयुक्त वनस्पतीना त्याच्या त्याच्या प्रकृतीप्रमाणे सतपाणी देणे हीच ते मर्तव्य प्रदर्शविण्याची अुचित रीत हीच झाडे बागली का? तर मनुष्याला अुपयुक्त म्हणून मग भरवस्तीची शोभा बिघडविणारा वडपिंपळ किंवा ज्याच्या फांद्या नि विस्तार पडायास झाली आहेत अशा भरवाटेवरचा वडपिंपळ तोडून टाकणे हेच जेव्हा मनुष्याच्या हितास अवश्य, तेव्हा तेही केले पाहिजे वडपिंपळ तोडायचाच नाही, ह्या हट्टापायी तो अेकदम वाऱ्यासरशी कोसळून त्याखाली माणसे मरतात अशा घटना या देशात ज्या घडतात त्या आपली मुसस्कृत दयाशीलता दाखवीत नसून रानटी क्रूरपणा मात्र दाखवितात

वडपिंपळासारख्या झाडाखाली तापलेल्या वाटसरूस जशी छाया मिळते तशाच त्याच्या प्रचंड फांद्या कोसळून प्रसंगी त्याचा प्राणही जातो ती निर्बुद्ध झाडे काही जाणूनबुजून आपले रक्षण करीत नाहीत, त्याना प्रदक्षिणा घातली काय नि लाथा मारल्या काय, फांद्या पक्क्या आहेत तो छाया देणे, पोखरल्या की अुन्मळून पडत खाली प्रदक्षिणा घालणारी बालबालिका जे सापडेल त्याचा चुराडा करणे, ह्या त्याच्या भावनाशून्य यांत्रिक क्रिया! अेक वेळ गाढवाच्या अंगावर हात फिरविला वा त्याला चुचकारले तर ते संतोषून अंगास खेटू लागते, काम अधिक हौसेने करते, त्याची खोडी केली तर लाथा झाडते, पण त्या गाढवाअितकीदेखील मनुष्याच्या प्रेमलोभाची वा हिताहिताची सुसंवादी जाणीव ज्या वडपिंपळास

तरी त्या घाण्यात गळेल. ते देवाच्या नावे कोणा मेहनती पण दरिद्री कुटुंबास दान द्यावे, म्हणजे अेका महिन्याचा फोडणीचा खर्च तरी निघेल! तसे करवत नसेल तर ही अशी पारलौकिक दृष्टचा अगदी भाकड नि व्यावहारिक दृष्टघा अगदी कुचकामी व्रते करण्यात समय नि श्रम दवडू नयेत '

महिलानो, फेऱ्या घालण्याचेच व्रत करायवाचे, तर स्वदेशी वस्तूच्या प्रचारार्थ प्रत्यही पचास धरातील कुटुंबात जाअून प्रचार करण्याचे व्रत घ्या तुम्ही पाचपाचजणी, देवाचे कार्य म्हणून मानअपमान न पाहता जर पन्नास घरी प्रत्यही आळीपाळीने भेट द्याल नि त्या कुटुंबात स्वदेशी साखर, बागडचा, स्टोव्ह, काचकाम, धारकाम (कट्लरी), कापडप्रभृति वस्तु वापरण्यासाठी स्त्रियाची मने वळविण्यास झटाल; ज्यानी तसे निश्चयिले त्याचा तो निश्चय टिकून आहे की नाही याची सतत वर्षभर पाहणी करीत राहाल, वेळी स्वत तें ते विकाअू स्वदेशी सामान नेअून दुकानात असते त्याहून स्वस्त द्याल तर आम्ही अशा चळवळीच्या अनुभवाची हमी देतो की, तुमचे गाव स्वदेशीने तसे कट्टर गिन्हाअीक होअील की जसे शभर व्याख्यानानी वा वृत्तपत्रीय अग्रलेखानी होअू शकत नाही! व्याख्यानालेखानी महिन्या दीड महिन्याची हुल्लड होते. पण स्वदेशीची साथ नि सतत ज्योत तेवत ठेवली जाते अशा सतत नि घरोघरी केलेल्या प्रचारामुळे, पाहणीमुळे. खरे ह्या स्वदेशीच्या जाणिवेची ज्योत घरोघरी अशी तेवत ठेवल्याने जी मानसिक राष्ट्रीय शिकवण लोकाम मिळेल, जी आर्थिक अुन्नति होअून स्वदेशी कामकऱ्याच्या तोंडात दोन घास पडतील, परदेशात जाणारा अितका पैसा स्वदेशात राहील त्या स्वदेशसेवेने, त्या नरनारीच्या सेवेने तो नारायण वडपिपळाभोवती लाख वेळा बैलामारखे गरगर फिरल्याने घा लाखवातीचा कापूर अुगीच जाळून टाकल्याने वा लाख दूर्वांचा नि बेलाचा भारा वाहिल्याने तो नारायण संतोषतो त्याहून लाख पटीने अधिक संतोषणार नाही असे कधीतरी घडेल काय? आणि त्या वडपिपळाच्या प्रदक्षिणानी मिळणारे जे काय तुमचे काम्य फळ असेल, तेही तो देव या व्रतानेही दिल्यावाचून राहील काय? मिशनरी बाया जशा ख्रिस्ती धर्माचा उपदेश करीत तुमच्या वस्तीत फिरतात, तशा तुम्ही शुद्धीचा अुपदेश करीत बाटघा ख्रिश्चन वस्तीत हिंडा, ते व्रत धरा! अमुकच प्रकारची लोकसेवा करा, हा आग्रह नाही. तुम्हास व्यक्तिश जी झेपेल ती लोकसेवा करा, पण या लोकी लोकोपकारक कोणते तरी प्रत्यक्ष फळ देणारे पुण्यकृत्य ज्यात साधते अशीच व्रते धरा म्हणजे राष्ट्रसेवा घडेल नि पारलौकिक दृष्ट्या ती लोकसेवा केव्हाही पुण्यप्रदच असल्याने व्रताने जो कोणचा सकाम वा निष्काम पारलौकिक लाभ तुम्हास हवा तोही जर वडपिपळाच्या सेवेने मिळत असेल तर त्या लोकसेवेच्या प्रत्यक्ष परोपकारी व्रतानेही मिळेलच मिळेल. कारण काही झाले तरी नारायणाची व्यक्ति वडपिपळ, दगडधोंडा, शेणमाती, याच्या जड मूर्तीहून नराच्या सचेतन मूर्तीतच अधिक अुत्कटत्वाने आलेली

पार्वती कोकिळाच राहिली असती तर तीच कोकिळा तेवढी भेटताच तिला कोणीही नमस्कार केला असता, पण ती पुन्हा पार्वतीची पार्वती झाली म्हणता. पार्वती अेक कोकिळा झाली म्हणून साऱ्या कोकिळा पार्वत्या होतात की काय? देव अेकदा डुक्कर (वराह) झाले म्हणून आजही घर डुक्कर की कर पूजा अस करायचे की काय? बर, अेवढ्यावरही कोकिळाच पुजायची, तर अुत्तम मार्ग म्हणजे कोकिळेच्या अेका खऱ्या जिवंत पिलास धरून हिरण्यागार वृक्षावर स्थापून त्याची पूजा करावी, ते पाळाव हवे तर! पण मग भटास काय लाभ राहिला त्या अुठाठेवीत! म्हणून पार्वती जिवंत कोकिळा झाली असता पुजायची कोकिळा हवी निर्जीव सोन्याचीच! नि पार्वतीच्या कोकिळेचे डोळे चांगले सजीव पाणीदार असता पुजायच्या कोकिळेचे डोळे हवेत पाढरे झालेल मोत्याच! बर, सोन्या-मोत्यारूप्याची का कोकिळा होअीना, पुजल्यावर ती यजमानानेच भक्तिभावाने स्वत च्या देव्हाऱ्यात ठेवावी हे साहजिकच! पण नाही! ती लगेच देअून टाकली पाहिजे भटाला! तरच ते व्रत सफळ, नाहीतर जित्यभूत निष्फळ! अर्थात त्या व्रताचे सार मर्म पोथीच्या शेवटच्या पानात त्या दक्षिणा पात्रूतच सापडणार आहे!

**सकटी सोमवार**—सोमवारी सबंध दिवस शक्य तर पाणीही न पिता अुपास करावा सध्याकाळी रोटाचे तूपगूळ घालून तीन लाडू करावेत, अेक गाअीला अेक देवाब्राह्मणास नि अेक आपण खावा असे कडक अुपास सोळा सामवारी करावे! नि शेवटी शक्यता सोळा जोडपी भटाची बोलावून त्यास रोटतूपगुळाच लाडू यथेच्छ जेववावे गायीस पान वाढून द्यावे नि मग ते अुपासव्रत सोडून आपण जेवावे! त्या बिचाऱ्या स्त्रीने सोळा सोमवार कडकडीत अुपास करावे, त्याचे प्रत्यक्ष फळ मात्र मिळावे सोळा भटाच्या जोडप्यास चमचमीत जेवण्याचे, आणि गायीस! माणसाने अुपाशी राहावे नि गायीस—पशूस लाडू चारावे! असल्या बाष्कळपणाने पोथी म्हणते तसा देव प्रसादत असो वा नसो, पण प्रत्यक्ष नि खचित जर कोणी प्रसादत असेल तर ती सोळा भटाची जोडपीच होत! 'दक्षिणा पातु'वाचून ह्या व्रताचे भारूड रचण्याचा दुसरा काय अुद्देश असणार!

वास्तव या व्रताच्या पोथ्याविषयी अेक सर्वसाधारण नियमच असा सागावासा वाटतो की, अशी व्रताची पोथी घेतली की ती अथपासून प्रथम वाचू नये कारण, देवाची मोठमोठी नावे, अद्भुत कहाण्या स्वर्गाच्या पुष्पितवाक गप्पा याच्या ढिगात पोथी रचणाराचा कावा अगदी दडून चमलेला असतो पण तो शेवटच्या पानात मात्र न हुडकता सहज सापडतो तेव्हा पोथी घेताच तिचे शेवटून पारायण करू लागावे, अितिश्री प्रथम वाचावी जर का त्या शेवटच्या पानात दक्षिणा पातुवरन मुख्य भर दिसला, तर खुशाल नव्वद असे हे व्रत कोण्या भक्ताने रचल नसून भाटूनच रचल असले पाहिजे असे बेधडक समजावे नि ते टाकून द्यावे.

आणि स्वीकारावें कोणकोणचें व्रत ? तर ज्या व्रतामुळे आज विज्ञानानें साफ खोटया पाडलेल्या कोणत्याही भौतिक वा भावनिक असत्याचा प्रसार करण्याचें पाप घडत नाही, ज्या व्रतात देवाप्रीत्यर्थ करावयाच्या दानाने वा स्वतःस भोगाव्या लागणाऱ्या उपास, प्रदक्षिणा देहदंडप्रभृति कष्टांच्या योगाने प्रत्यक्ष व्यवहारात आपल्या हिंदुधर्माच्या नि राष्ट्राच्या सद्यःस्थितीत काहीतरी ऐहिक हितही साधता येईल, मनुष्याची आज जिथे रोखठोक अशी काही हितावह सेवा केल्याचा परोपकार घडेल तें तेंच व्रत आचरावें. म्हणजे त्यायोगें ऐहिक फळ तरी प्रत्यक्षपणे ह्यिथल्या ह्यिथे हाती पडेल.

## व्रतें करावींत तर अशीं !

उदाहरणार्थ, महिलावर्गापुरतेंच बोलावयाचे तर येत्या चातुर्मास्यात महिलांनो, तुम्ही यथाशक्ति, यथापरिस्थिति ह्या आपल्या अत्यंत अडचणीत सापडलेल्या प्राणप्रिय हिंदु राष्ट्राच्या सेवेप्रीत्यर्थ खाली दिग्दर्शिलेल्या किंवा त्या हेतूने त्यासारख्या व्रतांपैकी एकेक जण एकेक व्रत जर धराल तर केवढी राष्ट्रसेवा करू शकाल बरें? 'आपल्या परसात स्वत आपल्या मेहनतीने कोथिंबीर, वांगी, मिरच्याप्रभृति शाकभाज्या लावीन नि देवा, तुझ्या नावे पुण्याच्या अनाथ विद्यार्थिगृहासारख्या एका प्रामाणिक संस्थेस चार महिने प्रत्यही ताजी भाजी पुरवीन.' असें व्रत लाखवाती, फूलवेल वाहण्याच्या व्रताहून कितीतरी देवप्रिय नि राष्ट्रहितकर होईल बरे ? किंवा असें व्रत घ्या की, 'या चातुर्मास्यात आपल्या हाताने विणलेले वा शिवलेले पंचवीस सदऱ्यापोलक्याचे जोड जीं हीनदीन पूर्वास्पृश्यांचीं मुलेंमुली शाळेत जातात त्यातील योग्य मुलात वाटीन.' चतुर्थीचे एकवीस मोदक वा सोमवारची सोळा जोडपी सावकारी वा विम्याची अडत वा व्यापार करणाऱ्या पोटभरू ठराविक भटासाठी राखून ठेवण्यापेक्षा तितकें सामान वा पैसे दक्षिणा म्हणून आज हिंदुसंघटनाचें कार्य खऱ्या रामदासी बाण्याने करणाऱ्या मसूरकर महाराजांच्या आश्रमास दान करीन.' येत्या चातुर्मास्यात एक स्वदेशी साखरेचाच प्रश्न हाती घेतला तरी जर प्रत्येक जिल्ह्याच्या नगरात दहावीस स्त्रियांनी प्रत्यही 'मी दहा कुटुंबास भेट देऊन स्वदेशी साखरेचा प्रचार करीन' असें व्रत घेतलें नि चालविलें तर त्या चार महिन्यात त्या गावी चार हजार रुपये तरी परदेशी साखरेत जायचे वाचतील ! करून पाहा होते कीं नाही असें तें. आमची हमी अनुभवाची आहे. किंवा ह्युग्या वर्षात वर्षभर 'रुपयाची स्वदेशी बांगडी घरोघर फिरून खपवीन' किंवा 'तुळशीच्या लग्नासाठी ताशेवाजंत्री लावण्याचा मूर्खपणा सोडून तशा व्रतांचा खर्च राखून अनाथ पण सत्पात्र अशा दोन शुद्धीकृत हिंदूच्या योगक्षेमाचा व्यय मी सोशीन वा त्या कार्यार्थ प्रत्यक्ष कार्यकर्त्या अशा हिंदुसभेस व आर्यसमाजास दान देईन !' रत्नागिरी हिंदुसभेसारख्या ज्या संस्था शुद्धिकार्य

सारखे करताहेत त्याना मुल्लामिशनच्या हातून सोडविलेल्या अर्भक वा अनाथ मुलामुलींचे संगोपन करताना नाकी नञ्‌ येतात. जर शभर रुपये मिळताच शभर विधर्मीयास हिंदु करून दाखविणारी अमरावतीची हिंदुसभा द्रव्यसाहाय्यास्तव अडकून पडत आहे तशा प्रत्यक्ष कार्यी तसा अेक रुपया दान दिलात तर अेक वश हिंदुराष्ट्राच्या गोटात आणल्याचे श्रेय सपादाल ! हिंदुधर्माचा क्षय थाबविणारा निदान रक्ताचा अेक बिंदु त्यात भर टाकून वा गळनाना वाचवून जे पुण्य लाभेल ते पाचशे अर्घ्य सूर्याला देअून लाभणार नाही ! पाणी ओतायचे तर ते व्रताचे पाणी तान्हेल्याच्या तोंडात ओता–साम्हनात वा नदीत नव्हे ! तो मुबईचा श्रद्धानद अनाथ महिलाश्रम पाहा ! त्याने मिशनमुल्लाच्या नावडीतून हजारो हिंदु स्त्रिया वाचविल्या; पण त्याला अजून अर्भकालय काढावयास दमडीही गाठी नसल्यामुळे त्या स्त्रियाच्या अर्भकाचे काय करावे हे सुचत नाही. सोन्याच्या कोकिळा–सावकारीचा धदा करणाऱ्या भटाना देण्यापेक्षा कोण्या श्रीमान् महिलेने जर त्या श्रद्धानद महिलाश्रमास स्त्रियासाठी बारा लुगडी चातुर्मास्यानिमित्त दान दिली वा स्वत च्या कुटुबातील मृत व्यक्तीच्या स्मरणार्थ अेक हजार वा अेक लाख जे यथाशक्ति ते दान, अर्भकालय बाधून देण्यासाठी दिले तर ते अत्येष्टीप्रीत्यर्थ गाय, भाडी, वस्त्रे, दाने, गावच्या धदेवाअीक भटास देण्यापेक्षा त्या दीन दयाळू देवास शतपटीने अधिक प्रिय होणार नाही काय ? किंवा विमानविद्या शिकणाऱ्या अेका सुयोग्य पण निर्धन विद्यार्थ्याचा खर्च सोसण्याचे व्रत घ्या !

महिलानो, जर हे हिंदुराष्ट्र जगेल, तगेल, जिकील तर हिंदुधर्मही जगेल, जिकील ! जर हे हिंदुराष्ट्रच मेले, हिंदुस्थानचे अहिंदुस्थान झाले तर ही हिंदु-सस्कृति, हा हिंदुधर्मही मेलाच पाहिजे ! अशा स्थितीत तुम्हा हिंदुमहिलास खरे धार्मिक व्रत आचरावयाचे असेल तर आजच्या परिस्थितीत ह्या हिंदुराष्ट्राची प्रत्यक्ष फल देणारी अशी काही तरी सेवा प्रत्यही करा ! तुमच्या द्रव्याचे दान, तुमच्या श्रमाचे दान, तुमच्या अन्नाचे दान, प्रसगी तुमच्या मानाचे नि अवश्य तर तुमच्या प्राणाचेही दान ह्या प्राणप्रिय हिंदुराष्ट्रालाच द्या ! तोच आजचा अैहिक धर्म, तोच आजचा पारलौकिक धर्म ! व्रतविधीत जो विवेक आज करावयाचा तोही हाच !

\+ + +

# विटाळाचें वेड

'बाळू! आलास का अेकदाचा शाळेतून? शाळेतली मुलं मघाच घरोघर जाऊन जुनीपुराणी देखील झाली नि तू आता घरास पोचलास काय रे? दहाला शाळा सुटायची नी तुला दहा पावलावर घरी यायला अकरा वाजायचे! थांब मेल्या, हे अुटण तर बघ कसं लाल करून ठेवलं आहे डाग देते थांब, ये असा! हं हं हं, चुलीपाशी अरे चल! हट् मागं, घटिगण मेला! पाय धुतल्यावाचून सैपाकघरात पाऊल टाकता कामा नये! जोडा घालूनच आत आला नाहीस हेच अुपकार!'

'कोणाचं अडलं होतं पाऊल टाकायला!' काळू ही ही ही हसत आओला म्हणाला, 'तूच म्हणालीस ये आत डाग देते, म्हणून आलो! पण काकू, आज तापलेलं अुटण नाही अं — आज पहिल्यानं चाकोलेटची पेटी काढ कुठं आहे ती! गेल्या महिन्यापर्यंत माझा मराठी चौथीत चौतिसावा क्रमांक असे, म्हणून हिणवीत होतीस न?'

'मग आज कोणता असा पराक्रम करून आला आहेस बाळू? गेल्या महिन्यात तुझा क्रमांक चौतिसाचा तेहतीस तरी झाला का? अेक क्रमांक जरी वर गेला असला न, तरी चाकोलेट देईन बरं बाळू!'

'तर मग अेक! आज आमचे नवे क्रमांक लागले, त्यात माझा अठरावा क्रमांक आला'

'काय म्हणतोस? बाळू, खोटं ठरलं तर थोबाड फोडीन हं!'

'शपथ! काकू! माझा खरोखरच अठरावा क्रमांक आला आज वर्गात!'

'भले वीर! आमच्या बाळूची बुद्धि वाईट नाहीच मुळी! पण अुनाड नि अचरट! या महिन्यात अभ्यास केलास तर बघ अेकदम सोळा क्रमांक वर चढलास न! हो घे, चाकलेटची भरलेली पेटीच घे हा बाळ! बघ, पेटी दिली न? जर तू पुढच्या महिन्यात आणखी सोळा क्रमांक वर गेलास न, तर अशा दोन पेटया देईन मी तुला! अभ्यास केलास की क्रमांक वर गेलाच पाहिजे बरं तुझ्यासारख्या बुद्धिमान मुलाचा!'

'अग काकू, अभ्यास कशाला हवा?' चाकोलेटाची पेटी घेऊन सैपाक-घरातून मधल्या घरात सुरक्षित अंतरावर गेलेल्या नि चाकोलेटाचा बोकणा तोंडात कोंबलेल्या काळूने अडखळत बोलण्यास आरंभ केला, 'अभ्यासच ग कशाला हवा? माझ्या वर्गात चौतिसाव्या क्रमांकावरून मी जो आज अेकदम सोळा क्रमांक वर चढून आलो, तो अभ्यास न करतासुद्धा वर आलो — हीच तर खुबी! बघतेस काय अशी काकू? शपथ! अभ्यास मी मुळीच केला नाही अग, ते असं झालं - सांगतो अं —' चाकोलेटाचा आणखी अेक बोकणा भरून काळू अेक पाय मधून मधून वेळीत नि शांतपणे हसत हसत सांगू लागला, 'अग, माझ्या वर्गात चौतीस

मुल नव्हती का ? तेव्हा मी चौतिसावा नव्हतो का ? आता आज काय झाल' की आमच्या शाळेच्या अुलट पक्षाची ती दाडेकर शाळा आहे ना ? त्यानी पुष्कळ पालकाना आमच्या शाळेविरुद्ध मयविल, आणि त्यामुळ आज आमच्या वर्गातील पधरासोळा खालची मुल आमची शाळा सोडून या महिन्यापासून दाडेकराच्या शाळेत निघून गेली. अुरली अठरा तेव्हा मास्तर म्हणाले, मिळून रागेन बसा नि नवे नमाक मोजा ! तेव्हा मी नुमता सरकलो नि अठरावा आलो ! असाच आणखी अेखादा लगा लागला तर पहिलाही पण येअीन हो काकू ! अभ्यासच ग कशाला हवा त्याला ?'

अितक्यात ताटदिशी अेक लाटणे बाळू होता तिथे येअून आदळले पण अनुभवाने ते तिथे काकूकडून फेकले जाणार हे आगाअूच ओळखून झटकन् मागे पळून जाण्यासाठी सज्ज असलेल्या बाळूने अेक मागे अुडी घेतली, पुन्हा झेप घाअून ते लाटणे अुचलले नि हटत हटत जोडे वहाणा ओटीवर ठेवीत तिथपर्यंत तो खिदळत आला ! त्याचा पाठलाग करीत काकूबाअीही पुढे पुढे घुसल्या. पण बाळू जोडे- वहाणा होत्या तिथे जातो हे पाहताच त्याचे सार अवसान खचून रागावण्याच्या ठायी त्या बाकुळती येअून म्हणू लागल्या, 'अरे, जोडे ! शिवशील मेल्या माझ ते सोळ्यातल लाटण घेअून ! दे रे बाबा ते अिकडे अेकदाच ! नाही, नाही, नाही,

'अरे काळचा, काळचा, मुतक न मेल्या! अुतर खाली! कालविला ग च्याअी विटाळ ह्या कारट्यानं!'

काळू देखील त्या किंचाळण्याने थोडा दबकला, बाजूस झाला. तोंच विष्णुपंतही बाहेरून घरी आले, 'काय झालं काय?' म्हणून आपल्या पत्नीस विचारताच अनुकाकूनी त्या आपल्या पतीकडे जळफळत पाहून बातमी दिली.

" व्हायच काय! ते असतात न कोणीसे आपल्या चुलत आजोबांचे भाअी-बंद तिकडे ब्रह्मावर्तास? कधी तुमच्या वा माझ्या जन्मात डोळेदेखील पाहिली नाहीत अेकमेकांचीं! त्याच कोणीसं मेलं आहे! बर, मेलं तर मेलं, नवव्या दिवशी तरी कळवावयाच न की स्नान केल नि सुतक फिटल! पण अुभ्या जन्मात ज्याना अेकसुद्धा पत्र टाकायची घाअी कधी होत नाही, त्यांना मरताना मात्र सगळ्या भाअुबंदाना सात पिढ्याची ओळख काढकाढून सुतकाचं पत्र टाकायची अगदी लगीनघाअी होते. आजचा चौथा दिवस सुतकाचा! तोंच पत्र हातात! सहा दिवस आता असं रखडत कुडकुडत पडायच! साध्या मेल्यानो काय गेल्या जन्माचं वैर होत तें! अगबाअी, चुलीवरची डाळ करपू लागली! अुतरायची तरी कुणी ती आता? भिकी पण अजून येअीना शाळेतून!"

अनुकाकू अशा जळफळत ठिकच्या ठिकाणी अुभ्या होत्या तोवर विष्णुपंत तें पत्र सावकाशपणे वाचीत होते, काही आठवीत होते. त्यानी त्यांच्या स्वतःच्या सख्या आजोबांनाही पाहिले नव्हते. चुलत आजोबाच्या ब्रह्मावर्तांच्या शाखेचे नाव काय जें त्याना ठाअूक होतें त्यापेक्षा काहीअेक ओळख नव्हती. काही वर्षापूर्वी असेच अेकदा कुणी तिकडे वारले होते तेव्हा अेकदा सुतक आलें होतें. कुणी मेलें की जे कोणाचे पिढीन अेकाददुसरे पत्र येअील तेवढाच काय तो त्या दोन कुळशाखातील भाअुबंदपणाचा पत्रव्यवहार!

अनुकाकू ही अेक देवलसी सोवळ्या ओवळ्याची आवड नि विटाळ-चंडाळाचा तिटकारा असलेली सुशील बाअी होती. जितकी प्रेमळ तितकीच तापट. विष्णुपंत त्या आपल्या बायकोच्या लहरीलहरीनेच घरातले व्यवहार ठेवीत. त्याचें सोवळेंओवळे फार कडकही नसे, अगदीच सुटलेलेंही नव्हतें. त्यांच्या त्या पत्नीला अनुकाकूला—अलीकडे ताप येत असे, त्यामुळे त्या जास्तच चिडचिड्या झाल्या होत्या. पण घरात मोलकरीण अित्यादि ठेवण्याची शक्तिही त्या कुटुंबास नस-ल्याने नि अनुकाकूच्या सोवळ्यालाही ते परवडणारें नसल्यामुळे त्या घरचें सारें काम स्वतःच करीत; आणि त्यामुळे त्याचा ताप अधिकच रेंगाळून प्रकृति खाला-वत चालली होती. हें सुतकाचं विघ्न येताच नेसलेल्या सोवळ्यासुद्धा जिकडे तिकडे त्यांना विटाळच विटाळ दिसू लागून त्या भावावल्यासारख्या झाल्या. चुली-वरची डाळ जों जों करपत चालली तों तों त्यांची बारा वर्षांची मुलगी भिकी शाळेतून येण्यास किती अुशीर करते याचा त्यांना अनावर राग येअू लागला.

शेवटी अेकदाची भिकी आली. भुकेलेली, नेहमीप्रमाणे येताच दफ्तर फेकून लडिवाळपणे कुरकुरतच आओजवळ गेली, 'काकू खायला दे न आधी काही!' तोच वसकन् तिच्या अंगावर अनुकाकू आल्या, 'अग शिवशील! शिवशील! भिके! सा मेल्यानो मलाच अेकदाच. हट् माग, मी सुतकी आहे!'

बिचारी भिकी मागे हटत, हा सुतकाचा विटाळ म्हणजे काय अरिष्ट आहे काय की, अशी घाबरून पाहू लागली ती मुलगी असल्यामुळे तिला सुतक नसते, स्वत आघोळून आता तिनेच काय येअील तसा सैंपाक करायचा नि सहा दिवस सुतक फिटेतो सारा पाणी-झाडलोटीसुद्धा संसार चालवावयाचा ही गोष्ट अनुकाकूनी समजावून देताच जड पावलानी ते बारा वर्षाचे लेकरू चुपचाप कामाला लागले अनुकाकू अेका दूरच्या कोपऱ्यात राहून भिकीला आनामागून आज्ञा सोडीत नि दर पळादोनपळामागे 'अग शिवशील!' म्हणून ओरडत काम करवीत बसल्या

प्रत्येक पात्राच्या विटाळाचे, पदार्थाच्या विटाळाचे धर्मशास्त्र स्वतंत्र— सामान्य तत्त्व, नियम असा नाही गव्हाला विटाळ नाही, ते निवडायचे, पण कणकेला विटाळ, ती शिवायची नाही, नदीला विटाळ नाही, विहिरीला विटाळ, विहिरीतल्या बेडकाचा, माशाचा पाणी लाटताना माळरहाटगाड्यावर बसल्या अुडत्या कावळ्याचा विटाळ नाही, माणसाचा विटाळ, कोऱ्या कपड्याला विटाळ नाही, धुपटाना विटाळ, तेल खायचे, तूप नाही; गोमूत्र प्यायचे, गोदुग्ध नाही, अुपरण्याची फेटयासारखी टापशी बांधायची, फेटा व पागोटे घालणे नाही, कोरड्या भुअीवर सैंपाकघरात पाय पडला तरी विटाळ नाही, ओल्या भुअीवर पाय पडता कामा नाही, असे पोथीतले नि पोथीबाहेरचे अनुकाकूना रूढि म्हणून सासरी माहेरी पाठ असलेले धर्मशास्त्राचे असत्य नियम पावलोपावली मोडताना नि पाळताना बिचाऱ्या लहानग्या भिकीला जीव नकोसा झाला! तिला सुतक नव्हते तरी

बाळूची मात्र चैन होती अनुताईंना ता भडावून सोडी गाद्याच्या डिगावर मधा बाळू चढला होता अनुताईंनी शास्त्रार्थ सांगितला की भिके, गाद्या काही धूत नसतात त्यावर गोमूत्र शिंपडले का झाले, पण त्याच्यातल्या चादरी तवढ्या धुवायला काढ बाळूचे मत का धुवायच्या तर मग हा धू नाहीतर चादरीवरही गोमूत्र शिंपडले की विटाळ गेला पाहिजे ! अनुताईंनी ते मत विचारात न घेता गाद्यावर गोमूत्र शिंपडणेच पुरे असे ठरवून त्या शुद्ध केल्या हे पाहून बाळू एका हातात गोमूत्र घेऊन गाद्याच्या डिगावर जाऊन पुन्हा पुन्हा नाचे ! अनुताई आरडत धावल्या की हातातील गोमूत्र शिंपडून म्हणे बघ गेला त्याचा विटाळ ! अगदी तुझे शास्त्र पाळले वर ! अशा वेळी मात्र बाळूला दोनचार चापट्या खाव्या लागत तेव्हा कोणच्या तरी पोथीत सुतकामध्ये चापट्या मारू नयेत असाही नियम दिलेला असता तर त्यात पाठांतरा अर्थ असता असे बाळूला वाटल्यावाचून राहत नसे

सुतकामध्ये साखर खाऊ नये हा नियम मात्र अनुताईंना अेका प्रकरणापुरता कल्पिण्यात आलेला होता त्या म्हणत चहात साखर खायला हरकत नाही नुसती साखर खाऊ नये बाळूचे मत अयाचेच असे पडे का दहा प्रकरणी साखर खावी लागली तरी नये अनुताई आपल्या तत्त्वाप्रमाणे स्नान करीत चहा पीत बाळू आपल्या तत्त्वाप्रमाणे चहाच्या वेळी अुघडपणे काकूसमोर नि नुसती साखर गुपचूपपणे काकूच्या आणि भिकाला पाणी भरण्यास साहाय्य देऊन त्याचे मूल्य म्हणून घेई नि खाई

विष्णुपंत अेक शांत स्वभावाचे आपल्या बाहेरच्या कामात गढलेले नि घर अनुताईंच्या हाती देऊन टाकलेले बापडे माणूस ते अनुताईंच्या तत्त्वाप्रमाणे अनुताईंस वागू देत भिकीच्या तत्त्वाप्रमाणे भिकीला बाळूच्या तत्त्वाप्रमाणे बाळूला आपण स्वतः घरी अनुताईंच्या धर्माप्रमाणे नि बाहेर त्यांचे मित्र डॉ पुरंदरे यांच्या मताप्रमाणे वागत

त्याच डॉ पुरंदऱ्यांकडे आज विष्णुपंतांना जाणे अवश्यही झाले ते थंड पाण्याची स्नाने तो थांडगार पाटपाणी चुलीपाशी नि दोन सांजा सैंपाक हा सारा खटपट त्या बारा वर्षाच्या भिकीला न झेपल्यामुळे तिला तिसऱ्या दिवशी ताप भरला अिकडे अनुताईंच्या अंगी तर आधीच मुरलेला त्यात चटईवर पडीत निजणे गार पाण्याने अंघोळणे भिकाचे कच्चेपक्के जेवण खाणे पथ्य तर सोडून जे कुपथ्य तोच सुतकातला धर्म ! त्यापायी अनुताईंचा तापही बळावला ! अंगाला सारखी ठणक पण सुतकात गादी न घेता चटईवर पडून दिवसरात्र कण्हत राहिल्या घरात ही दुर्दशा पाहून कामकाज संपल्यावर तिसऱ्या दिवशी संध्याकाळी विष्णुपंत नोकरीवरून आले तेव्हापासूनच त्यांच्या ओळखीचे नि विश्वासाचे जे अेकच गृहस्थ होते त्या डॉ पुरंदऱ्यांकडे काही औषध मागावयास नि थोड्या

गप्पाही छाटावयास गेले मृतकापायी घरी किती अडचण आली आहे ते विष्णु-पतांनी सांगितल्यावर डॉ पुरदरे तिथे बसलेल्या आपल्या दोघा स्नेह्याकडे वळून म्हणाले,

'पाहिलत ना ? ही मृतकाची आजची रूढि किती अर्थशून्य नि त्रासदायक झालेली आहे ती ? काय गोपूशास्त्री, मृतकात साखर खाऊ नये, गादीवर निजू नये, घराबाहेर पडू नये, थंडी असो नसो गार पाण्यानच आघोळाव, व कपड्याचे ढीग स्वच्छ असले तरी वोट लागल म्हणून धुवावे आणि अेका मनुष्याचा जीव गेला म्हणून दहा जिवत माणसाना जीव नकोसा करावा, हा काय धर्म म्हणा-वयाचा ? ज्या रूढीच्या योगे लवलेश सामाजिक असा लाभ न होता मनुष्यमात्रास निष्कारण त्रासच त्रास होतो, तो अधर्म होय ! —ही मृतकाची रूढि त्यापैकीच अेक अगदी बुद्धिशून्य भाबडटपणाची आहे '

गोपूशास्त्री अुपहासले, ' तर तुमच म्हणण काय की, आपल प्रिय मनुष्य मेल म्हणजे दु खी नातलगानी बासुदी, दूध, जिलब्या, लाडू, पेढे यथेच्छ सातपीत गाद्या-गिरद्यावर लोळाय ? अहो, ज्याचा कोणी प्रियजन मरतो त्याला साखरच सोमला-सारखी लागते, हसू येतच नाही, सुखोपभोग विषवत् होतात ! ह्यालाच आम्ही माणुसकी वा मनुष्यधर्म म्हणतो ! तिलाच मृतकाची रूढि म्हणतात, शास्त्र म्हणतात ! '

डॉ पुरदरे हसले, ' अहो अिथच तर मेख आहे दु ख मानण्याच शास्त्र—दु ख मानण्याची रूढि, या दोन परस्परविरुद्ध शब्दात मृतकाच्या आजच्या ढोग-धत्तु-याच तुम्ही, मला केव्हाही करता आल नसत अस, विडबन केल आहात ! '

डॉ. पुरदऱ्याच्या म्हणण्याचा प्रत्यक्ष पुरावा हवा असल्यास आमच्या राणी-महाशय नी युवराज काळे याचीच साक्ष काढा ! मृतक आल्याच पत्र येताच माझ्या पत्नीच्या डोळयात टच्कन पाणी आल—पण त माझ्या चुलत आजोबाच्या शाखेतील अेक म्हातारे गोनज मेले म्हणून दु खाने नव्हे ! - तर ते मेल्याच पत्र नवव्या दिवशी आमच्या हाती पडेल अशा वेतान न टाकता आम्हास सहा दिवस मृतकात खितपत पडाव लागेल अितक्या लवकर त्यांनी टाकल या रागान फण-फणल्यामुळ ! ' काय गेल्या जन्माच वैर होत त साऱ्या मेल्यानो ! ' हाच आमच्या

गाद्यावर निजायला धर्माची आडकाठी नाही; त्याच्या कपड्यांना विटाळ नाही, पण पोटच्या मुलीपेक्षा त्या मृत स्त्रीचे दुःख ज्यांना शतपटीने कमीच वाटणार त्या चुलत चुलत दीर-जावा प्रभृतींना सुतक कडकपणाने पाळावे लागते! कुलटपक्षी ज्याच्याशी जन्मभर द्वेष, असाही भाऊबंद मेला की त्याचे मला सुतक; पण माझा एखादा जिवलग मित्र वा मैत्रीण वारली आणि तिच्या दुःखाने मला जरी जीव-नही नीरस वाटण्याइतके असह्य दुःख होत असले, तरी मला त्याचे सुतक नसते! तेव्हा दुःख होते म्हणून माणस शास्त्रोक्त सुतक पाळतात किंवा आजची सुतकाची पद्धत नि त्याची ती विटाळवेडाच्या व्याधीची साथ यांचे समर्थन माणुसकीच्या समवेदनेने होऊ शकते ही कल्पित, या दोन्हीही गोष्टी अगदी लटक्या पडतात

' वर, मृत व्यक्तीच्या वियोगाने हळहळून खरोखरच ज्यांना शोक धायधा रडवीत आहे, विव्हळवीत आहे, त्यांना देखील दहा दिवस ह्या सुतकापायी जो आम्ही वळेवळे हाल अपेष्टा भोगण्यास भाग पाडतो—तो तरी धर्म म्हणता येईल का? तो निव्वळ निर्दयपणा होतो. आरोग्यशास्त्राच्या दृष्टीने तर अशा शोक विव्हल कुटुंबातील माणसांची मानसिक व्यथा थोडी कमी करावयासाठी आणि तिच्यापायी त्यांची शरीरप्रकृति ढासळून तेही रोगांना बळी पडू नयेत म्हणून त्यांना धीर देऊन सत्त्वस्थ सुग्रास अन्न वळेवळे जेवावयास वेळच्या वेळी घालावयास हवे. थंडीऊन्हापासून बचाव होईल असे कपडे, अंग स्नान, बाहेर हिंडणे फिरणे हेच उपचार समजूत पाडून पाडून करावयास हवे. मायेच्या माणसांनी त्यास पोटाशी घेऊन पाठीवर हात फिरवून, आपल्या घरी आदराने नि ममतेने शेजारी बसवून, त्यांना काही विरंगुळा पाडला पाहिजे पण दुःखाने त्यांची मन विव्हळ नि घायाळ जेव्हा झालेली असतात तेव्हाच सुतकाने आपण त्यांची शरीरही विव्हळ नि घायाळ करून सोडतो! एखाद्या महारोग्यासारखे 'विटाळ विटाळ' म्हणून हडहड करीत कोणी त्यांना शिवणार नाही चटईवर निजणे, रूक्ष नी वेळीअवेळी कोणी दुसरा काय घालील ते खाणे, कामधंदा बंद, घराबाहेर पडण्याची चोरी! जी ती वस्तु मागून घेणे, ताटकळत दिवसरात्र पडणे, ह्या आजकालच्या सुतकाच्या बाष्कळ नि अर्थशून्य रूढीमुळे मन नि शरीर ह्या दोहोंनाही मनाच्या दुःखाच्या भरीस सुत-काचा कठोर त्रासही सोसावा लागून अधिकच उदास, भयाण, कटाळवाणे वाटू लागते रोगापायी एकजण मेले नि सुतकापायी दोनदोन तीनतीन जणांची प्रकृति बिघडून ते आजारी पडले अशी कुटुंब मी अनेकदा पाहतो जेव्हा प्रियजन मेल्यामुळे जे कुटुंब खरोखरीच दुःखशोकाने विव्हळले आहे त्यातील लहान लेकरा-पासून थोरापर्यंत सुतकाच्या त्रासाने नसती आबाळ नि विटाळापायी हडहड करणे अगदी निर्दयपणाचे नि त्यांच्या आरोग्यास घातक आहे; म्हणून सुतकाची चाल टाकाऊ आणि ज्यांना मुळीच दुःखच नसते त्यांच्याकडून सुतकाचे ढोंग करविणे हा निर्भेळ मिथ्याचार, म्हणून सुतक त्या प्रकरणीही टाकाऊ! अहो, धड-धडीत भाड्याची माणसं आणून प्रेतापुढे पैसापासरीसारखे दर ठरवून रडत ओरडत,

अशी पिटीत जाण्याच्या ज्या चाली आहेत, त्या तशा मृतकधर्मास बाधक म्हणू नये तर म्हणावं तरी काय ? ' मोले घातले रडाया, नाहीं असू आणि माया ' अशी ही चाल आजही शेकडो लोकात अगदी तुमच्या अिकटच्या विटाळवेडचा सुतकी चालीसारखीच ' धर्म ' म्हणून अक्षरशः पाळली जात आहे ! मृतकात जो विटाळाचीं साथ घरीदारी आपणास पछाडते— तो तर अेक निव्वळ भ्रमिष्टपणाच नव्हे काय ? "

' काय ? डॉक्टर ! आता मात्र तुम्ही पुरते वाहवत चालले आहा अं ! ' तेथें बसलेले अेक समाजशास्त्रज्ञ बी. अे. (ऑनर्स) आश्चर्यून मध्येच म्हणाले, अहो, युरोपातील साहेबलोक देखील आमच्या सुतकातील विटाळ मानण्याच्या आचारास आजकाल प्रशंसीत आहेत ! मृत्यु घडतो त्या कुटुंबात नि घरात जें बिघडलेले वातावरण असते त्याचा संपर्क समाजात फैलावू नये यास्तव त्या कुटुंबास कोणी शिवू नये, त्यांनी दहा दिवस घराबाहेर पडू नये, त्याचे कपडे धुवून घ्यावे अित्यादि नियम आमच्या त्रिकालदर्शी पूर्वजांनी घातले आहेत महाराज, आहात कुठं ? अहो, गोपूशास्त्र्याचे ते शास्त्रोक्त राहो, पण शहाणे साहेब लोकसुद्धा प्लेगमध्यें क्वारंटाअीन सेग्रिगेशन प्रभृति जे अुपाय योजितात, ते देखील आमच्या सुतकातील रूढीपासून सुचले बरं का त्याना ? सुतक दहा दिवस स्मृति म्हणते, ते अेकवेळ खोटं म्हणाल, पण क्वारन्टाअीनदेखील दहाच दिवस साहेब लोकानी पाळावयाचे ठरविले ते खोटं म्हणायची कोणाची छाती आहे ? साहेब देखील सुतकाचं समर्थन करतात, समजलात ! समाजशास्त्राचा प्रश्न आहे हा ! थेप्टा नाही ! '

' हो, हो, हो ! प्रोफेसर महाशय, खरं सांगू का, जुन्या रूढिंच समर्थणारं ते ' शास्त्रोक्त ' अेक वेळ काहीतरी समजसपणाचं असतं; पण हें तुमचं ' साहेबोक्त त्या रूढीचं असह्य विडंबन करून सोडतं. म्हणे साहेबदेखील सुतकास समर्थितात ! साहेबात कोणी मूर्ख नसतात की काय ? मेयोदेखील अेक साहेबच आहे ! तिची निंदा साहेबोक्त असली तरी जशी कपटी, तशीच काही साहेबानी आपल्या वेडगळ रूढींची केलेली स्तुतिही कपटी असते. आम्हीं वेडेचार सोडू

आप्त मेल्याच पत्र गोत्रजातच तेवढं साथ पसरवीत जातं! त पोचताच दूरदर्शी वळ्ळ त्या ठराविक नात्याच्या माणसात तवढे रोगाणू सळसळू लागाव नि त्याच घरी तेच जलवायु सेवणाया अितर, राहत्या माणसाना मात्र त्यानी बाधू नय ? हे काय वैद्यक की वेड ? सुतक असाल त्या घरी मृत्यु घडो न घडो, त्या माणसाना म्हणे घराबाहेर पडू नये पण गावच्या वाटे त्या माणसान त्याच्या घरी सरसहा येत जात, खात-पीत राहाव हे सुतकाच शास्त्र , ह काय सम्रिगेशनच तत्त्व ? प्लेगची साथ काय घरचा मनुष्य बाहेर गला म्हणजे तेवढी पाळीव कुत्रीसारखी त्याच्याबरोबर जात, पण बाहरचा माणस घरी आली तर त्याच्या माग जात नाही, त्याना चावात नाही ? भयकर साथीतही सुतकाचा तोच ठराविक खाक्या! दहाव्या दिवशी गोमूत्र थोडफार शिपडल की ' शुद्ध ' झाल घर, कपडे, माणस सगळ! पण याला या ' डिसजिनफेक्शन ' म्हणायच ? कौलार अुलथून, बडक जतुघ्न फवारून, औषधीय धुरानी कपडेलत्ते, वस्तु वाफाळून ज्या साथीला आव रता येत नाही, ती काय घरातल्या वाटेवर चार थब गोमूत्र शिपडून पळविता येते ? विटाळ ' म्हटला की, ही धर्मभोळेपणावर आधारलेली भावना, डिस अिनफक्शन—क्वारटाअीन प्रभृति ' निरागीकरणा'ची साधन वद्यकाचे प्रयोगसिद्ध अुपाय ! सुतकाच्या चालीशी वैद्यकाय हतूचा मूळ सबध असा नाहीच ! मुळात ती चाल धार्मिक, परलोककल्पनामूलक !

विष्णुपत — हच कारण माझ्या ध्यानात आल होत वर का डॉक्टर जव्हा मी अिजिप्त प्रभृति देशातील ममी चा नि ' पिरामिडसची माहिती प्रथम वाचली तव्हा अ ! मेलेला राजा वा रक परलोकात जाताच अियला ससार असाच सुरु ठेवतो ही पूर्वीची धार्मिक समज असे म्हणूनच मनुष्य मरताच त्याच्या थडग्यात थाटमाटी कपड दिवे, पलग ज्याची जशी शक्ति तस पुरीत, परगावी बिर्‍हाड करताना जस आपण निवडक सामान बरोबर दतो

डॉ पुरदरे — घरगुता सामान नव्हे तर माणसही ! पूवकाली काणी मला की त्याच्या थडग्यात त्याच्या गुलामानाही जिवत पुरीत थार राजे असले तर त्याच्या आवडत्या वायकानाही जिवत पुरीत ! जपानसारख्या देशात सम्राट मरताच त्याचा सेनापति, प्रधान, मत्री अजूनही जो क्वचित हाराकारी '(स्वत च भोसकून घअुन प्राणार्पण) करतो ती देखील अतिप्राचीन अशा ह्याच सुतकी भावनेची अुरली स्मृति होय पूर्वी अस मनिमडळदेखील राजाबरोबर परलोकी धाडीत ! आमच्यात प्रेताबरोबर सता जाणारी पतिव्रताही परलोकी पतीच्या ससारात गृहिणीचा तूट पडू नय याच मूळ भावनेची अुदात्ताभूत (Sublimated) साक्ष होय जी प्रेमविव्हळ होअून प्रियासाठी प्राणापण करी तिची गाष्ट न्यारी तस प्राणापण आम्ही आवडत्या ठेकराच्या वियोगान वीर कीर्तीसाठी, हुतात्मे ध्ययासाठी करतात ! त निराळ पण सुतकातील कर्तव्य ', ' शास्त्र ' रूढि म्हणून ज्या स्त्रियाना सती जाव लागे, मृताला थडीत अुपयोगी पडेल म्हणून घागडी, टेकावयास

साठी, दुधास गाय जी भटास द्यावी लागते, ती ह्याच भावनेचा अवशेष ! त्या काळी सायकली नव्हत्या, नाहीतर मृतास परलोकीच्या सडकावरून झटपट जाता याव यास्तव भटास अेकेक सायकल द्यावी असही वचन गरुडपुराणातील सुतकशास्त्रात सहज सापडू शकत ! मुसलमान खिश्चनाचे सुतकी आचारही त्याच आदि मानवाच्या धर्ममताचे अवशेष, त्याची थडगी पिरामिडस्‌ची अगदी औरस संतति ! थडग्यात कृमिकीटकानी रक्तमासहृदय भक्षिल तरीही अस्थिपजर जे अुरतात, त्यात जगाच्या शेवटच्या दिवशी श्वास फुकून ओीश्वर सर्वांना पुन्हा जिवविणार नि त्याचा न्याय होणार ही मूळ भावना ! साराश की मनुष्यजातीत जे सुतकीय आचार आज शास्त्र म्हणून रूढ आहत, त्याच्या बुडाशी वैद्यकीय वा वैज्ञानिक अशी कोणचीही कसोटी नसून ते मुख्यत पारलौकिक नि जुनाट अशा धर्मकल्पनाचे भावडे अवशेष आहत पूर्वीच्या ज्ञानाच्या नि अज्ञानाच्या मानान पूर्वी ते शाभून गेले अस समजून ता प्रश्न टाळला, तरीही आता यापुढ तरी आपले सुतकाचे आचार आजच्या विज्ञानाच्या नि वैद्यकाच्या कसोटीस लावून, समाजहितार्थ अुपयुक्त ठरतील तसेच नि तेच काय ते ठेवावेत ह विटाळवेड तर तत्काळ साडून द्याव

विष्णुपत—पण मृताच्या स्मृतीप्रीत्यर्थ अेक सामाजिक सस्कार म्हणून तरी सुतक हव, नव्हे काय ?

डॉ पुरदरे—अवश्य तेवढाच त्याचा अुपयोग पूर्वी राजा प्रभृति काहीजण मले म्हणजे वर्षसहा महिने सुतक अस सुतकाच्या अशा चाली समाजव्यवहारात अत्यत त्रासदायक होतील, ह स्पष्टपणान सागून विरयक स्मृतीतून राजा, मत्री, सैनिक, शिल्पी प्रभृतीना 'सद्य शौचा प्रकीर्तिता' म्हणून वगळन समाजाची काम बद न व्हावीत अशी सोय केली, लाव सुतकही बद केली तीच विचारसरणी पुढ चालवून आता आपण बाकीच्या विटाळादि चालीही सोडाव्या ज्यायोगे मृताच्या शावात विहळलेल्या कुटुंबीयाच आरोग्य बिघडणार नाही, त्याच्या हळुवार मनास विरगुळा पडेल, मुलालेकराचे हाल होणार नाहीत, अशी त्याची शुश्रूषा आप्तेष्टानी ठेवावी वैद्यकीयदृष्ट्या अवश्य तितकी साफसफाओी, जतुघ्न निरोगीकरण प्रभृति अुपायानी गृहशुद्धि वा मनुष्यशुद्धि व्हावी तो प्रश्न डॉक्टरवैद्याचा—भटाभिक्षुकाचा नव्हे जो मृत त्याची साग्रार मुळकथा नि नात ही कुटुब अेकत्र जमवून सागावी, त्याचे गुण गावे, त्याच्या नावे यथाशक्ति काही रक्कम अेखाद्या समाजहितकारक सस्थेस वा सुयोग्य नि सत्पात्र अशा विद्वानास वा विद्यार्थ्यास दान द्यावी. समाजीय प्रदर्शनार्थ सुतकाच निदर्शक म्हणून अेखाद त्रासदायक नसलेल बाह्य चिन्ह दहा दिवस कुटुंबीयानी वा दुःखितानी वापराव वाङ्मयात म्हणजे सार्वजनिक मनुष्य मेला असता आज सार्वजनिक सुतक आपण ज्या केवळ दुःखप्रदर्शक, स्मृतिमूलक नि कृतज्ञताव्यजक अशा जनिक (Public) हेतूनच नि पद्धतीनच काय ती पाळतो तशीच कौटुंबिक सुतकही पाळावीं.

विष्णुपंत–अहो, पण हे तत्त्वज्ञान आता आमच्या घरापुरते बस व्यवहार-वायचं ? आम्ही आता विटाळवेड सोडलं बघा, पण आमच्या सौभाग्यवती त्या तापात तशाच चरफडत राहतील, प्राण सोडतील, पण सुतकाची चाल सोडणार नाहीत ! खरोखर या सुतकापायी खरा त्रास घरच्या बायकांनाच होतो, पण त्याच सुतक पाळण्यात अगदी मुंगळीचा फरक पडू देणार नाहीत !

डॉ पुरंदरे–अेकंदरीतच तसं नायकांचा छळ करणाऱ्या रूढि मोडण्यातही खरी अडचण बहुधा बायकांचीच येते सुधारणांना नाक मुरडण्याकरिताच देवानं आपलं नाक वर केलं असावं असो बहुतेक स्त्रियांची समज दिसते वरं आज ही दोन औषधं तेवढी तुमच्या कुटुंबाला नि मुलीला द्या, अुद्या मी येअो नि स्वत प्रवृत्ति पाहतो

दुसऱ्या दिवशी डॉ पुरंदरे विष्णुपंताच्या घरी जाअून पाहतात तो अनु-काकूंचा ताप भलत्याच थरास पोचलेला छातीत कळ मारीत आहे, त्यांना नळी लावून परीक्षावयास डॉक्टर जाअू लागले तो अनुकाकूंनी शिवू देण्याचे नाकारले चटअी-चवघडीची टोकं आखडून आवरून ' कूर्मोऽङ्गानीव सर्वश ' अशा त्या हटून बसल्या डॉक्टर म्हणाले, ' अहो, मला विटाळ होअील, तुम्हाला नाही ना ?' अनुकाकू म्हणाल्या, ' म्हणूनच मी शिवू देणार नाही कारण तुम्ही स्वत आघोळ-णार नाही नि गावभर विटाळ कालवाल ! '

तिकीही तापाने फणफणतच होती आता दहावा दिवस अुजाडणे येव्हा असे विष्णुपंतास होअून गेलं काय अुपचार ते अनुकाकूला त्यानंतरच करता यणार असावत, अुठवेना ! पण ती तशीच अुठून सारी आन्हिके घरी शेवटी ववर आली रात्री अेक वातासारखा झटका ! पण तोच पहाटे अेकदाचा दहावा दिवस अुगवला त्यासरशी त्या दु स्थितीतही अनुकाकू अगदी फुटते न फुटते तोच अुठल्या, आपले अयरूण पांघरूण खाकोटीस मारले, आणि दिसू लागल्यावर कुणी आपणास घरी थंड पाण्याने न्हाअूधुअू देणार नाही, सारा विटाळ कालवतील या भयाने तशा पहाटेस जावयास निघाली – गावच्या नदीवर !

तिथून तिला परत घरी जेव्हा आणली तेव्हा अुचलून आणली ! डॉक्टरांनी औषधपाण्याची पराकाष्ठा केली, पण वाताचा झटका अुतरेना कोणी दिसले की, अनुकाकू बेफामपणे किंचाळे, ' अरे दूर ! शिवशील ! सुतक ! '

पहिल्या सुतकाच्या बाराव्या दिवशी अनुकाकू वारल्या नि विष्णुपंतास दुसरे नि खरेखुरे सुतक आले दु खाची नि दुर्दैवाची त्यांच्या घरावर खरीखुरी सुतकी छाया पडली पण त्यांना नि त्यांच्या दोन्ही लेकरांना डॉ पुरंदऱ्यांनी आपल्या घरी आणून पहिल्या दिवसापासून कोणचीही विटाळ फिटाळ हडहड न करता आपल्या कुटुंबात बरोबरीने सांत्वन-सांभाळ केला म्हणून निभावले

\+ \+ \+

# अज्ञानयुगातून विज्ञानयुगाकडे

## किर्लोस्कर मासिकाचे कार्य

मी १९२४ च्या सनात अंदमानी नि हिंदी बंदिगृहाच्या आतिथ्याचा यथेष्ट अुपभोग घेअून स्थलबंदीची रुचि चाखण्यासाठी रत्नागिरीस ठाणे दिले. स्थलबंदीची अट माझ्यावर लादली गेल्यामुळे अितर काय लाभालाभ झाले असतील ते असोत, पण भाषाशुद्धीच्या आंदोलनास मात्र अेक सांगण्यासारखा लाभ झाला तो हा की, मला 'Internment' झाली आहे हे शुभ वृत्त सर्वांना कळविण्याचा प्रसंग गुदरल्यामुळे आणि शक्यतो अनावश्यक परकी शब्द वापरावयाचे नाहीत अशी मला अेक फार दिवसांची वाअीट खोड असल्यामुळे माझ्यावर सरकारने लादलेल्या त्या Internment & restraint on political movement, speeches etc.या दोन्ही अटींना मराठी शब्द शुद्‌धावणे मला भाग पडले. त्यायोगे 'स्थलबद्धता' नि 'विषयबद्धता' हे दोन नवे शब्द मराठीत मी योजले. ते आज त्या अर्थी रुढावलेही आहेत.

'अरे रामा रामा! आली पुन्हा ह्यांची भाषाशुद्धि! देशकालपात्र न पाहता वाटेल त्या विषयात लिहायचे म्हटले की भाषाशुद्धीचे घोडे सावरकरांनी पुढे दामटलेच म्हणून समजावे!' असे आमचे अप्रिय वाचक वैतागाने ह्या लेखाचा आमचा हा पहिला छेदक वाचताच जळफळले असतील! पण अप्रिय वाचकहो, तुम्ही म्हणता तो आक्षेप खरा असला तरी ह्या प्रसंगी मात्र तो आम्ही खोटा पाडणार आहोत अं!

किर्लोस्कर विषयीच्या माझ्या आठवणींशी भाषाशुद्धीचा संबंध केवळ विषयांतराचा नसून अगदी मुख्य विषयाच्या मंगलचरणाचाच आहे! कारण की, किर्लोस्करांशी माझा प्रत्यक्ष नि प्रथम संबंध जो आला तो भाषाशुद्धीमुळेच होय.

## किर्लोस्करांशी आमचा पहिला बादरायण संबंध

रत्नागिरीत स्थलबद्ध झाल्यावर तेथील किर्लोस्कर मंडळींचे अडते श्रीयुत खेर बंधु यांच्याकडे का अितर कुठेसे काय की, 'किर्लोस्कर खबर' नावाचे अेक लहान मासिक माझ्या पाहण्यात आले.

त्या वेळी भाषाशुद्धीविषयी आम्ही बहुतेक नियतकालिकाकडे पत्रव्यवहार करून त्या त्या व्यक्तींचे लक्ष या प्रश्नाकडे वेधीत होतो. त्या 'किर्लोस्कर खबर' मधील गहजगत्या येणार तो 'खबर' शब्द आमच्या डोळ्यांना नाकात घुगुरट शिरावे तसा त्रास देअू लागला. आपले वृत्त, वृत्तान्त, समाचार, वातमी असे तदर्थक शब्द आहेत; पण 'आजची वातमी काय?' विचारण्यापेक्षा 'आजची खबर काय?' हीच भाषा बायकामुलांच्या तोंडीमुद्धा रुळलेली! ज्यांना अर्थांच्या छटांची

अत्यंत चिंता लागलेली असते त्या चिंतातुर जीवांना देखील ' खबर ' शब्दात वरील स्वकीय शब्दापेक्षा अधिक छटा जर कोणची आढळलीच तर ती त्या 'खबर' शब्दाने व्यक्तविली जाणारी त्याच्या सुळचट सवयीचीच छटा काय ती होय, हे उघड आहे. तेव्हा अगदी अनावश्यक असा हा परकी शब्द आपल्या भाषेत न वापरता, तो जसजसा अधिकाधिक खळत गेला तसतसे अपरिहार्यपणे स्वभाषेतून अधिकाधिक गळत चाललेले ते तदर्थक स्वकीय शब्द आपण निर्धाराने वापरू लागावे आणि ' किर्लोस्कर खबर' हें नांव बदलून 'किर्लोस्कर वृत्त ' किंवा नुसतें ' किर्लोस्कर ' हें नांव ठेवावें, अशी सूचना आम्ही किर्लोस्कराचे येथील अडते (अेजंट) श्रीयुत सोर यांच्या हस्ते त्याच्याच पत्रातून कळविली. त्याविषयी अेकदोन पत्रेंही सोर याजकडे आलीं गेलीं.

आणि अेक दिवस पाहतो तों ' किर्लोस्कर खबर' हे नांव गळून मासिकाचे नांव ' किर्लोस्कर' असे मुटमुटीत ठेवलेलें आढळलें ! तेंच आज महाराष्ट्रीयच नव्हे तर हिंदुस्थानीय मासिकातील पहिल्या प्रतीचे पद पटकाविलेलें प्रख्यात 'किर्लोस्कर' मासिक होय !

माझी अिच्छा अशी होती की, 'खबर' हा अेक अनावश्यक परकी शब्द असल्यामुळे तो बहिष्काररण्यात आला आहे असा आमच्या सूचनेचा स्पष्ट अुल्लेख तो शब्द गाळताना यावा, म्हणजे त्यायोगे विदेशी शब्द टाळायची प्रवृत्ति चालू होण्यास थोडे अधिक साहाय्य होते. पण तसे कोणतेही कारण जरी तो शब्द गाळताना संपादकमहाशयानी दिले नव्हतें तरी दर महिन्यास त्या वेळी शेकडो, आणि आता हजारो वाचकाच्या तोंडो ' खबर ' हा बहिष्कार्य परको शब्द रुळविला जाण्याचें संकट तो हा प्रख्यात मासिकाच्या नांवातून गळल्यामुळे सहजीच टळलें हेंही त्या दृष्टीने काही थोडें अुपकारक झालें नाही.

अशा प्रकारे किर्लोस्कर मासिकाशी आमचा पहिला आणि अप्रत्यक्ष पत्रव्यवहार होण्यास आणि बादरायण संबंध जुळण्यास भाषाशुद्धिच कारण झाली असल्यामुळे ह्या लेखाच्या मैदानात तरी आम्ही आरंभीच भाषाशुद्धीचे थोडें अुगीचच्या अुगीच दामटलें नाही हे अुघड आहे.

## स्वदेशीचे धुरंधर किर्लोस्कर

वरील अप्रत्यक्ष परिचयाच्याही आधीपासून आम्हास किर्लोस्कर मंडळीचा विशेष अभिमान नि ममत्व वाटत असेच. ते त्यांच्या यशस्वी लोखंडाच्या स्वदेशी कारखान्यामुळे होय. महाराष्ट्रात तरी अेक स्वतंत्र औद्योगिक कारखाना अितक्या मोठ्या प्रमाणावर यशस्वी रीतीने चालवून दाखविणाऱ्या कुटुंबात किर्लोस्कर कुटुंबानें अग्रमान पटकावलेला आहे. त्यांचे लोखंडी नि पोलादी सजावट सामान (furniture) नांगर, पंप प्रभृति पदार्थ खपविण्याच्या कामी रत्नागिरी हिंदुसभेच्या द्वारे रत्नागिरी पुरते आम्ही प्रचारकाचें कार्य स्वदेशी आंदोलनाचा अेक भाग म्हणून

नेहमी भरीत आलो आहोत किर्लोस्कर लोखंडी सामानाचे आम्ही अेक फुकटे अडते आहोत. तीच गोष्ट डौलदार भाषेत सांगावयाची म्हणजे किर्लोस्कर स्वदेशी कारखान्याचे आम्ही अेक निरपेक्ष नि निर्वेतन प्रचारक आहोत किर्लोस्कर मंडळीशी आमचा हा दुसरा संबंधही पहिल्याप्रमाणेच अगदी अेकमेकांना न विचारता पुसता, नि अेकमेकांची आजही तोंडओळख देखील नसता असा जुळून आला होता

## किर्लोस्कर मंडळीशी प्रत्यक्ष पत्रव्यवहाराचा परिचय

लहानशा 'किर्लोस्कर खबर' चे 'किर्लोस्कर' मासिक झाल्यानंतर त्याला सध्याचे सर्वांगसुंदर स्वरूप कसेकसे प्राप्त झाले, ते आम्हास सांगता येत नाही कारण आमच्या वाचण्यात ते मासिक फारसे येत नसे. परंतु पुढे १९३४ च्या आगेमागे त्याचे नाव साहित्यसंसारात पुष्कळ वेळा अंकू येअू लागल्यामुळे, त्याचे दोनचार अंक आम्ही लक्षपूर्वक वाचले तेव्हा आम्हास त्या मासिकाच्या टापटिपीचा आणि मार्मिक बुद्धिवादाचा बाणा अितका आवडला की, आमच्या मतप्रसारास हवे तसे क्षेत्र सध्याच्या परिस्थितीत याच मासिकात सापडणारे आहे असे आम्हास वाटू लागले आम्ही त्यांना लगेच अेक पत्र टाकून विचारले की, जन्मजात म्हणविणाऱ्या पण वस्तुतः निव्वळ पोथीजात असणाऱ्या प्रस्तुतच्या जातिभेदाच्या अुच्छेदनार्थ आम्ही जी चळवळ हाती घेतलेली आहे तिच्या प्रचाराचे कार्य आपल्या मासिकातूनही करता येअील का ? निरनिराळ्या नियतकालिकातून आम्ही आधीपासूनच तो प्रचार चालविला होता, पण त्याच्यात भरीस किर्लोस्करासारख्या खंद्या मासिकाचेही साहाय्य मिळाल्यास केवळ जन्मजात जातिभेदासारख्या अेकटदुकट ठाण्यावरच नव्हे तर मानवी बुद्धीस नि यत्नास दुबळविण्याऱ्या धर्मभोळेपणाच्या नि धर्मवेडेपणाच्या यच्चयावत् दळवळावरच विज्ञानवादाचा चौफेर मारा चालू करता येअील.

आमच्या वरील आशयाच्या पत्रास संपादकमहाशयाचे लगोलग अुत्तर आले की, 'किर्लोस्कर मासिकाशी आपला लेखनसंबंध कसा जुळवून आणता येअील याच विचारात आम्हीही होतो आपले लेख किर्लोस्कर मासिकाच्या स्तंभातून सादर अुत्सुकतेने स्वागतिले जातील पहिला लेख लगेच पाठवावा आपल्या लेखातून 'अ ची बाराखडी योजण्याची आपली अटही पाळली जाअील' आम्ही आमच्या अुद्योगाला लागलो आणि लगेच किर्लोस्करच्या सन १९३४ च्या मार्चच्या अंकात आमचा 'रोटीबंदीची बेडी तोडून टाका !' हा पहिला लेख प्रसिद्ध झाला. किर्लोस्कर मासिकाची धर्मपत्नी 'स्त्री' नि त्याचे 'मनोहर' अपत्य ह्यांनीही लवकरच आमच्या लेखाची मागणी केली तेव्हापासूनच आजपावेतो ह्या तिन्ही मासिकात आमचे लेख आदरपूर्वक बहुधा प्रत्येक अंकी प्रसिद्ध होत आले आहेत

विज्ञाननिष्ठ बुद्धिवादाच्या प्रचारकार्यी ह्या तिन्ही मासिकाचा आम्हास अत्यंत अुपयोग झाला आहे आमच्या अपेक्षेहूनही अधिक विस्तृत नि अुपजाअू क्षेत्र ह्या

मासिकांत आम्हांस लाभलें. ह्या तिन्ही मासिकांचें आकर्षण आणि महाराष्ट्रीय सुशिक्षित वर्गावरची पकड प्रथमपासूनच अगदी बिनतोड असल्यामुळे त्यांच्या त्या मिष्ठान्न कादंबऱ्या, कथा, चित्रें, चरित्रें यांच्या मेवामिठाओस चटावलेल्या हजारो वाचकांनी त्या मिठाअीत लपलेल्या आमच्या लेखांच्या विबनाअिनच्या कडू गोळयाही अितक्या नकळत गटागट गिळण्यास आरंभ केला की, तोंड वाकडें करण्याचें सोडून अुलट आम्हांलाच हजारो वाचक अभिनंदू लागले की, 'वा! तुमचे विबनाअिन फारच गोड!' अशा तीन मासिकांचें अितकें अुत्कृष्ट संपादन करणारा श्री. शंकरराव किर्लोस्करासारखा संपादक त्या संपादनकलेत किती प्रवीण असला पाहिजे हें काहीं आम्ही सांगावयास पाहिजे असें नाही. प्रत्येक चित्र, व्यंगचित्र, लेख, शब्द, ओळ, कानामात्रासुद्धा, प्रत्येक लहानमोठ्या गोष्टीवर त्यांचें बारीक लक्ष असतें. त्यावर त्यांचा म्हणून अेक सफाअीचा हात फिरत असतो. लेखकाकडून आलेल्या कादंबऱ्या प्रबंधादिक लिखाणात मर्मस्थान कोणतें तें हुडकून काढून त्यावर अुद्बोधक चित्र वा व्यंगचित्र कोणतें कुठें नि कसें चितारावें यावर केव्हा केव्हा विचार करीत ते रात्ररात्र जागून काढतात असें तेच अेकदा अगदी सहजगत्या आम्हांस लिहून गेले होते. लेखानिमित्त त्यांचा आमच्याशी पुष्कळ पत्रव्यवहार होतो. त्यांतही त्यांचा मार्मिकपणा नि टापटीप किती असते म्हणून सांगावे! किर्लोस्करचा अेखादा अंक संपादताना जितका नीटनेटकेपणा करायचा, तितकाच लहानसहान पत्र लिहिताना सुद्धा ते करताना आढळतात. जें सांगायचें तें किती मनमिळाअू भाषेत पण तोललेल्या शब्दात, समर्पक मुचितसंगत असतें! अनेक जनिक (public) प्रश्नांवरही शंकररावांची साधकबाधक चर्चा करणारी पत्रें आम्हांस केव्हा केव्हा येतात. त्यांवरून आणि त्यांच्या तिन्ही मासिकांतील त्या आरंभीच्या आटोपसर संपादकीयावरून त्यांची लेखनशैली किती मर्मज्ञ आहे तें दिसून येतें. नेमकें जें हवें तेंच, नेमक्या ज्या हव्या त्याच शब्दांत झटकन् सांगून मोकळे होण्यात शंकररावांचा हातखंडा आहे. क्वचित् त्यांच्या चित्रकलेच्या कुंचलीनेच ते त्यांची संपादकीय स्फुटेंही लिहितात की काय न कळे! त्यांच्याअितकेंच टापटिपीचें अुपसंपादक मंडळही त्यांना लाभलें आहे. नव्हे त्यांनी वेचून वेचून गुंफलें आहे. तें किर्लोस्कराचें श्री. ताम्हनकर आणि तो त्यांचा बापसे बेटा सवाअी 'दाजी'! अेक वेळ वाचक ताम्हनकराना विसरतील, पण दाजीला नाही! अेकवेळ दाजीलाही विसरतील पण त्याचें ते शेंडा आगठ्यासारखे पुढे दाखविणारे नाक! —आम्हीतरी त्या दाजीच्या नाकाला कधीही तोंड वेंगाडणार नाही.

संपादकाने लेखकवर्गाशी सलोख्याने, सौजन्याने, नि सचोटीनें कसें वागावें याचें किर्लोस्कर हे अेक आदर्श आहेत. आमच्याशी तरी त्यांचा व्यवहार फारच सौजन्याचा नि सचोटीचा झालेला आहे. त्यांच्या किर्लोस्करादि तिन्ही मासिकांचे टापटीप, समयशीलता नि सचोटी हे विशेष गुण आहेत. पूर्वी मराठीत मासिक

म्हटले म्हणजे महिन्याने निघते ते असा अर्थ जो घेशी तो साफ तोंडघशी पडे. मासिक म्हणजे वर्षाच्या बारा महिन्यातून कोणच्या तरी अेका महिन्यात निघणारे पुस्तक अशा अर्थीच काय ते त्याना मासिक म्हणता येअी! आताही थोडीच मासिके वेळेवर निघतात. पण किर्लोस्कर, स्त्री, नि मनोहर ही तिन्ही मासिके अगदी त्या त्या महिन्यातच नव्हेत, तर त्या त्या ठराविक तारखेला वाचकाच्या हाती पडणार नाहीत म्हणजे काय!

सपादकाच्या अनेक गुणात किर्लोस्कर हे जरी आजकालच्या बहुतेक सपादकामध्ये अग्रेसर आहेत, तरी अेका गोष्टीत मात्र बहुतेक संपादकप्रकाशकाविषयी लोक जे बरेवाअीट बोलतात तेच किर्लोस्कराविषयीही बोलणे भाग आहे; हे जर आम्ही स्पष्टपणे न सांगितले तर तोंडदेखलेपणाचा दोष पदरी पाडून घेतल्यासारखेच होअील. आजकालचे बहुतेक संपादक, प्रकाशक हे लेखकवर्गाची वचनित लिखणावळ देण्यात हटकून जो खळखळ करतात त्याचा बोभाटा वृत्तपत्री देखील अनेक लेखकाना करावा लागतो. आमच्या स्वत:च्या अनुभवावरून आम्हाला किर्लोस्कराविषयीही निर्भीडपणे असेच सागणे भाग पडत आहे की, अितर बहुतेक सपादकाप्रमाणेच लेखकवर्गाची ठरलेली लिखणावळ देण्यात किर्लोस्करही हटकून खळखळ करतात! फरक अितकाच की, अितर बहुतेक सपादकप्रकाशकाची लिखणावळ वेळचे वेळी न देण्यात खळखळ आणि किर्लोस्कराची लिखणावळ वेळचे वेळी हटकून देण्यात 'खळखळे'! त्याचा स्थानिक अडत्या (अेजण्ट) ताजा किर्लोस्करचा अंक हाती देअून जातो न जातो तोच त्या अंकातील लेखाच्या लिखणावळीची मनीऑर्डर घेअून टपालवाला तो खळखळवीत दाराशी अुभा! त्यायोगे आपल्या लेखाला प्रकाशणारे नियतकालिक हाती पडताच प्रथम घाईघाईने आपला लेख काढून तो आपणच मिटक्या मारीत वाचण्याचा प्रत्येक लेखकाला होणारा अनावर मोहसुद्धा दूर सारून, किर्लोस्कराचा लेखक पहिल्याने त्या आपल्या लेखाच्या लिखणावळीचे ते वदे रुपये हाती खुळखुळवीत त्या मनीऑर्डरीवर सही करण्याच्या सुखकारक सकटास आपण होअून तोंड देतो आणि मागचा लेख लिहून थकलेली त्याची बुद्धि तरतरीत होअून किर्लोस्करात पुन्हा दुसरा अेक लेख लिहिण्यासाठी अगदी कशी तलवारते!

अशा प्रवीण सपादकाच्या नेतृत्वाखाली सहस्रावधि वाचकाच्या ज्यावर अुड्या पडताहेत अशा किर्लोस्कर, स्त्री नि मनोहर ह्या तिन्ही मासिकाचा मतप्रसाराच्या कार्यी आम्हास जसा उपयोग झाला तसा आमच्या लिखाणापासून त्या मासिकाच्या सपादकानाही काही प्रत्युपयोग झाला आहे काय?

याविषयी आम्ही अितकेच सागू अिच्छितो की, आमच्या लिखाणाचा अितर कोणत्याही दृष्टीने किर्लोस्कराना काही अुपयोग झाला असो वा नसो, पण त्या सपादकमहाशयांना अेका गोष्टीत तरी आमच्या लिखाणाचा अुपयोग झालाच झाला

ही गोष्ट आमच्या कट्टर शत्रूला देखील नाकारता येणार नाही. संपादकाला अन्यत अवश्य अशी अेक कला तरी किर्लोस्कराना आम्हीच शिकविली !

पटाअीत संपादकाला वाटेल ते हस्तलिखित हा हा म्हणता अुलगडता आले पाहिजे. किर्लोस्कराच्या दुर्दैवाने त्याचा पूर्वीचा लेखकवृंद पुस्तीसारखे जपून रेखाटलेले हस्ताक्षर काढणाराच मिळाला. त्यामुळे हस्तलिखिते वाचण्याचा तेवढाच त्याना सराव झाला होता—अुलगडण्याचा, deciphering चा नव्हता पण आम्ही काही पुस्ती लिहिणारे प्राथमिक शाळेतील मूल नव्हतो आम्ही पडलो पट्टीचे लेखक ! त्यामुळे आमचे ते फर्डेशाही पहिले हस्तलिखित हाती पडताच 'किर्लोस्करा'च्या संपादकमहाशयाची बुद्धि नुसती गुग होअून गेली ! त्याना वाटले, ह्या दुर्वाचनीय हस्तलिखिताचे कारण वाअीट कागद, चिरका टाक, पातळ शाअी असे काहीतरी असावे यासाठी त्यानी आमच्या अक्षराच्या वरेवाअीटपणाविषयी चकारशब्द न काढता आम्हास अुत्तम कागद, अखंड टाक (फाअुटन पेन), फक्कड शाअी पाठवून देण्याची तत्पर आश्वासने धाडली तेव्हा शेवटी आम्ही मोठ्या अभिमानाने त्याना कळविले की, 'महाराज ! हा दोषच असेल तर अंगणाचा नाही ! नाचणाराचा आहे ! ' प्रत्येक पानात दहापाच ठिकाणी तरी वाक्याची खाडाखोड नि शब्दांचे घुसडाघुसड केल्यावाचून आणि ती समजावी म्हणून लालहिरव्या पेन्सिलींच्या रंगीत काक्पदानी ते हस्तलिखिताचे पान हिंदुस्थानच्या आलेखासारखे (नकाशासारखे) रंगविल्यावाचून आमचा लेख रंगावा तसा 'रंगला ' असे आम्हास वाटत नाही, त्यास काय अुपाय ? या रत्नागिरीतील साऱ्या कावळ्याचे पाय कापले तरं आमच्या अेका हस्तलिखितास अवश्य तितक्या काक्पदाचा पुरवठासुद्धा होणार नाही ! तिथे नुसते चांगले कागद नि फक्कड शाअी करणार काय ? असे जेव्हा आमचे दुराराध्य अुत्तर गेले तेव्हा आमचे लिहिणे सुवाच्य होण्याची आशा सोडून देअून ' किर्लोस्करा'चे संपादक मंडळ ते अुलगडण्याची कलाच शिकणे अधिक साध्य असे मानते झाले. आताशी 'थोडे सुवाच्य लिहावे' अशी चेतावणी आम्हास देण्याचा नाद ज्याअर्थी त्यानी सोडून दिला आहे, त्याअर्थी आमचे हस्तलिखित

कोळशाची खाण खणता खणता त्यातच गुलाबाचे मनोहर अुद्यान सापडावे तसे लाखडी कारखानदारांनी चालविलेल्या या तिन्ही सुंदर सजावटीच्या मासिकांना प्रत्यक्ष पाहताच वाटू लागते!

परंतु ह्या साजसजावटीच्या सुंदर आराशीत जर ध्येयाची देवमूर्ति नसती तर ती शोभा अेका क्षणाची करमणूक काय ती होती. जी चिरंतन लोकहितकारक ध्येयासाठी झुंजण्यात नि झटण्यात जो आत्मिक आनंद अुपभोगिता येतो, जो माणुसकी असते, ती जीत नाही ती आरास म्हणजे प्रेताचे लावण्य, तिरडीवर अुधळलेला गुलाल, फोलकट फळ! सुदैवाने किर्लोस्करी मासिकांनी अेका लोकहितकारक ध्येयास वाहून घेतलेले आहे! धार्मिक नि सामाजिक क्षेत्रात बोकाळलेली धर्मभोळेपणाची नि रूढिपरत्वाच्या अंधळेपणाची रागट माथ हटविण्यासाठी ही तिन्ही मासिके विज्ञाननिष्ठ बुद्धिवादाचा अप्रतिहत प्रचार करीत आहेत.

या कामी त्यांच्या लाखडी यांत्रिक कारखान्याचे साहचर्यच ह्या बौद्धिक मासिकांना अुपकारक होत असावेसे वाटते. अितर धुरात नि यंत्राच्या धुरात हाच फरक असतो. अितर धुराने डोळे धुरकटतात, चिपडतात. पण यंत्राच्या धुराने मिटलेले डोळे अुघडतात, चिपडलेले निवळतात, दृष्टीला यथावत् निरीक्षू शकतात. प्रत्येक यंत्र अज्ञानयुगाचा अेक दिवस संपवून विज्ञानयुग अेका दिवसाने जवळ आणते.

आपल्या राष्ट्राच्या डोळ्यावर आलेली धार्मिक छापाची मगडगुगी घालवून त्याला प्रत्यक्षनिष्ठ विज्ञानाची दूरदृष्टि देण्यासाठी आगरकरांच्या 'सुधारका'नंतर अितका नेटाचा, निर्भीड नि निकराचा प्रचार अितक्या मोठ्या प्रमाणावर आज तरी किर्लोस्कर मासिकांनीच चालविलेला आहे. त्यातही जन्मजात जातिभेदाच्या, आम्ही सांगतो त्या सात स्वदेशी बेड्यातरी तोडून टाकण्याच्या कार्यी, त्या तिन्ही मासिकांचे विशेषच साहाय्य होत आहे. हिंदुसंघटनाच्या महनीय राष्ट्रकार्यास ह्या विचारक्रांतीचा त्या प्रकरणी तरी अुपयोग झाल्यावाचून राहणार नाही!

—किर्लोस्कर, सप्टेंबर १९३६

\+ \+ \+

# स्वा. सावरकरांचीं भाषणें

## १. मध्यप्रांतीय हिंदु परिषद

अकोला येथे दि. २७ नोव्हेंबर १९३७ रोजी वऱ्हाड-मध्यप्रांत प्रांतिक हिंदुपरिषदेच्या अध्यक्षपदावरून स्वा. सावरकर यांनी केलेलें भाषण

### 'मी बदललो नाही; पूर्वीचाच आहे!'

पूर्वी स्वराज्याची – स्वातंत्र्याची जी चळवळ झाली ती केवळ शब्दाकरित होती. तेव्हा स्वराज्याची मागणी करण्याचा आपला हक्क प्रस्थापित करणे जनतेत त्या संबंधाची उत्कटता उत्पन्न करणे हेच उद्दिष्ट होतें परंतु आज स्वराज्य नजरेच्या टप्प्यात आले आहे तेव्हा स्वराज्य म्हणजे काय याची स्प कल्पना आपण ठरविणे अवश्य आहे. माझ्या भाषणात अलीकडे स्वराज्य-स्वातं हे शब्द पदोपदी आढळत नाहीत, तेव्हा 'तो पूर्वीचा स्वातंत्र्यभक्त सावरकर आ राहिला नाही, आता जातिनिष्ठ बनला' असें लोक समजतात. परंतु ती चूक आहे आज जनतेत पुरेशी जागृति होऊन गेलेली असून सत्तेचा काही अंश आपल्या हाती आलेला आहे तेव्हा स्वातंत्र्य–स्वराज्य याच्या तात्त्विक विवेचनाची हद्द संपून व्यवहाराच्या पातळीवर राजकारण आज आलेले आहे. नर्मदेतल्या बाणा प्रमाणे आम्ही ती शब्दपूजा त्या वेळी केली त्याची त्या वेळी गरज होती. इंग्रजांचे हिंदुस्थानावरील राज्य ही ईश्वरी देणगी म्हणून त्या काळात मानणारे लोक होते. 'नाविष्णु पृथिवीपतिः' अशी त्याची व आमच्या तत्कालीन पुढारी मंडळींची ही धारणा होती तिला कलाटणी देण्यासाठी तरुणाच्या कैक पिढ्या ही गारद झाल्या

### फ्रान्समधील क्रांति व यादवी

परंतु आता आपली प्रगति झाली असून आपण फार पुढे गेलो आहो तेव्हा प्राप्त परिस्थितीत स्वातंत्र्याची व्याख्या करून तदनुसार आपले धोरण ठरविणे अनिवार्य आहे. 'स्वातंत्र्य' शब्दाची जपमाळा घेऊन बसणे आज निरुपयोगी आहे स्वातंत्र्य म्हणजे काय हे आपण आता निश्चित ठरविणार, तेव्हा संघर्ष अपरिहार्य आहे स्वराज्य म्हणजे काय हे ठरविण्याच्या दृष्टीने सर्व लोकसमाज जेव्हा विचार करू लागले तेव्हा संघर्ष सुरू झाला हे आपण पाहतोच आहो मागे फ्रेंच राज्य क्रांतीच्या वेळी सनदशीर, सुधारक, क्रांतिकारक वगैरे जे भिन्न नरम-गरम पक्ष फ्रान्समध्ये होते त्याच्या क्षोभाचे लक्ष्य राजा हा होता. त्यामुळे ते सारे पक्ष आपसा तील सारे मतभेद विसरून जणू काही आपण एकाच ध्येयाने प्रस्फुरित झालो आहो अशा भावनेने उठावणी करून उठले. राजा जोपर्यंत उभा होता तोपर्यंत हें

दृश्य टिकले. परंतु राजा अेकदा त्या क्षोभाला बळी पडल्यानंतर राजावर सुऱ्या घेअून चोहोंबाजूंनी धावलेल्या त्या लोकांच्या हातातील सुऱ्या समोरासमोर अुभ्या असलेल्या लोकांच्या मानांना भिडल्या. असें जे कार्लाअिलने म्हटलें आहे तें कोणत्याही देशाला लागू पडणारें आहे. *आज अशतः हिंदुस्थानात अशीच स्थिति* आहे; पण तें क्रमप्राप्तच आहे. अर्थात् स्वराज्याची व्याख्या ठरविण्याचा प्रसंग येताक्षणीच देशाच्या नावापासूनच झगड्याला प्रारंभ झाला.

## संस्कृतिप्रेम याचेंच नांव राष्ट्रप्रेम

हिंदुस्थानचें स्वराज्य म्हटलें की नामोच्चाराबरोबर हिंदूंचें राज्य असा अर्थबोध होतो. म्हणून हिंदुस्थान हें नाव नको! बरें, हिंदोस्थान, किंबहुना अिंडिया म्हटलें तरी त्यातून सिंधु–हिंदु ही परंपरा अजिबात लुप्त नसल्यामुळे, हिंदुस्थानचें नावच अजिबात बदललें पाहिजे, असा येथील अेका अल्पसंख्य समाजानें आग्रह चालविला असून, आपली बहुसंख्या असलेला हिंदुस्थानचा तुकडा अलग फाडून त्याचें 'पाकस्थान' असें नामकरण त्यांनी करुन टाकलें आहे. याप्रमाणें या देशातील अितर समाज आपल्या भविष्याविषयी अितके जागरूक असता आपण सुषुप्तींत राहून कसें चालेल? कित्येक लोक असेंही म्हणतील की नावांत काय आहे? पण मग त्यांना असा सवाल मी विचारतो की, 'स्वदेशाचें स्वातंत्र्य' असें जेव्हा तुम्ही बोलता तेव्हा त्या शब्दाचा अर्थ तरी तुम्हास कळतो का? स्वदेशाचें स्वातंत्र्य म्हणजे काय हिंदुस्थानातील, दगड, धोंडे, माती, नद्या, पर्वत यांचें स्वातंत्र्य तुम्हाला अभिप्रेत आहे? आपल्या घरासंबधींची आपली आत्मीयता काय त्या घराच्या भिंती, त्याच्या अंगणातील झाडें, घराचे वासे व विटा यात गुंतलेली असते? 'माझें घर' असें जेव्हा मी आपुलकीनें म्हणतो, तेव्हा त्या घराची माती-वासे-विटा या माझ्या मनात नसतात–तींत राहणारी माझी कुटुंबीय मंडळी माझ्या मनश्चक्षूसमोर असतात. तें घर मला प्रिय असतें, कारण त्यात माझे वाडवडील नांदले–वाढले, माझ्या मुलाबाळांची ती क्रीडाभूमि होती, आहे व राहील, या कल्पनेनें ना माझें माझ्या घरावर प्रेम असतें!

## खरा हिंदुस्थान हा !

जी गोष्ट लहान प्रमाणात घराची, तीच मोठ्या प्रमाणात देशाची होय. आमच्या देशातील हिमालय, गंगा, यमुना, मथुरा वगैरे पर्वत, नद्या व शहरें हीं जगातील अितर पर्वत, नद्या व शहरें यांच्यापेक्षा आम्हाला प्रिय वाटतात. याचें कारण हें की हा हिमालय, ही गंगा, ही यमुना–यांच्या आश्रयानें माझ्या अभिमानाचें स्थान *असलेली माझी संस्कृति जन्मली, नांदली व विकासली. मथुरेच्या* वाळवंटाहून सुंदर वाळवंटें जगात पुष्कळ असतील. परंतु मथुरेचेंच वाळवंट मला

विशेप प्रिय का? तर येथे कृष्णाची बासरी वाजली म्हणून, माझ्या पूर्वजांची स्मृति या वस्तूशी निगडित झाली आहे, माझे वेदवाङमय येथे जन्म घेत झाले, माझे वाडवडील येथे जन्मले व मेले, माझ्या ऋपिभूमीच्या पदरवाने ही भूमि पुनीत झाली आहे, माझ्या सस्कृतीचा भूत तसाच भविष्यकाळही ह्या भूमीशी निगडित झाला आहे हेच तिजसवधीच्या माझ्या प्रेमाचे कारण होय हे तिचे वैशिष्टय माझ्या प्रेमाचे केंद्र होय कारण देशाच्या भौगोलिक सीमा हे देशप्रेमाचे केंद्र कधीच नसते

## हिंदु सस्कृतीचे वैशिष्टय

पण कित्येकाना मुळी हेच कोडे पडते की, आपल्या सस्कृतीचे वैशिष्टय तरं कोणतें? त्याना अिंग्रजी सस्कृति समजते, जर्मन सस्कृति समजते, पण हिं सस्कृति मात्र अुमगत नाही ते म्हणतात, 'तुमची कसली सस्कृति? तुमचे कसले राष्ट्र?' अिंग्रजी किंवा जर्मन सस्कृतीचे किंवा त्याच्या राष्ट्रत्वाचे गमक कोणते म्हणून विचारले म्हणजे ते सागतात की, त्याचा देश, भाषा, अितिहास, वाङमय व वश ही अेक आहेत व त्याच्या आजपर्यंतच्या सक्रमणात त्याच्या सस्कृतीचे वैशिष्टय आहे मग काय ही सारी गमके आम्हालाही लागू नाहीत? अिंग्रजाचा देश घ्या त्यात काय आहे? –तर कोळसा! पण आमची भूमि तर सुवर्णभूमि म्हणून विख्यात कोहिनुरासारखी रत्ने ही भूमि प्रसवली आहे जाअी, जुअी, मालती ही पुष्पे, केळे सनी, आब, सिताफळे, ही मधुर फळे, हत्ती, सिंह, हरिण, मयूरादि पशुपक्षी यानं आमची भूमि समृद्ध आहे अिंग्लडात यापैकी अेक तरी आहे का? त्याचा तो फाद थेम्स? कोण अभिमान त्याना त्याचा!! पण असले ओढे आमच्या कोकणात अने आहेत! आमच्या देशाची भव्यता, त्याची चारुता, समृद्धता यापैकी अिंग्लडा अेकही नाही काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत अेकाच वेदाने व अेकाच परपरे बद्ध असा आमचा देश जसा अभिमान योग्य तसा अेकराष्ट्रही खास आहे

## अेक भाषा, अेक अितिहास

भाषेच्या दृष्टीने पाहिले तर अिंग्लडात तरी अेक भाषा कोठे आहे? खा लडन शहरातच टागेवाल्याची भाषा लॉर्डाच्या मुलाना समजत नाही स्कॉटलं वेल्स वगैरेंच्या भाषा तर स्वतत्रच आहेत परतु आमच्या देशात अनेक भाषा आ बोलल्या जात असल्या तरी त्या सार्याची मातामही सस्कृत ही अेकच आहे सा भाषा सस्कृतनिष्ठ आहेत, आणि आता हिंदी ही अेक भाषा करण्याचा आमच प्रयत्न चालूच आहे तेव्हा देशाप्रमाणे भाषेच्याही दृष्टीने आम्ही अेकच आहें अितिहासाविषयी तर बोलावयासच नको जेथे अिंग्लडला केवळ अेक हजा वर्षांचा अितिहास मोठ्या मेटाकुटीने सापडतो तेथे आमच्या मागे १० हजार वर्षा

अितिहास अुभा आहे. तुमचें वाङ्मय काय, तर येथून जाअून शेक्सपीयर. परंतु आमचें वाङ्मय किती भव्य—किती प्रचंड! चार वेद, सहा दर्शने, अठरा पुराणे, कालिदासादि कविश्रेष्ठांची काव्यनाटके असें कितीतरी मोठें नि गौरवास्पद वाङ्मय आमच्याजवळ आहे; आणि वंश अेक म्हणावा तर तुमच्या अेका अिंग्लंडात सात राष्ट्रें व पधरा वंश यांचे कडबोळें झालें आहे. अुलट अेका परंपरेनें बांधलेले व अेका परंपरेचे अभिमानी असे आम्ही लोक आहोत. मग आमचें अेक राष्ट्र का नव्हे व आमच्या संस्कृतीचें वैशिष्ट्य रक्षणार्ह कसे नाही? अर्थात् आहे.

## राष्ट्र म्हणजे भूप्रदेश नव्हे

आमच्यात अुणीव असेल तर आम्ही माणसें अधोगत झालों आहो, हीच काय ती आहे. वास्तविक आमच्याजवळ सामर्थ्य व समृद्धि आहे; अेक मनबळ असतें तर २५ वर्षांत आपल्याला युरोप पादाक्रांत करता येणे अशक्य नाही. खरी अुणीव आमच्यात अिच्छाशक्तीची आहे ती अिच्छा प्रबलतेने जागृत झाली तर आपणाला काय कठीण आहे? ज्यू लोकांत ती अिच्छा प्रबळ होती म्हणूनच आपल्या भौगोलिक राष्ट्राला आंचवल्यावरही त्यांचे राष्ट्र जिवंत राहिले व आज आपल्या बाइबलकालच्या जुन्या पॅलेस्टाअिनमध्ये ते पुनः आपले भौगोलिक राष्ट्रही वसवीत आहेत. आम्ही मात्र स्वतःचें स्वातंत्र्य गमावून बसून वर ज्यूंना त्यांचा देश आज परत मिळत असताना त्याला विरोध करीत आहो; व त्यांना तेथून अन्यायानें हाकून लावणाऱ्या अरबांचा पक्ष अुचलण्याचा खुळेपणा अधळेपणानें करीत आहो. असे काय अुपकार या अरबांनी आमच्यावर केले म्हणून आपण त्यांचा पक्ष अुचलावा, हेंच मला कळत नाही! त्यांच्या भाअिबंदांनी अितिहासकाळांत आमच्यावर केलेल्या अनन्वित अत्याचाराची फेड आपण अशा रीतीनें करीत आहो!

## बहुसंख्याकत्व हेंच पाप बनलें!

आमची जी स्वराज्याची व्याख्या आहे तीत अेका नागरिकाला अेकच मत दिलें जाण्यावर भर आहे. परंतु या देशातील काही अल्पसंख्य समाज, केवळ आपल्या अल्पसंख्याकत्वाच्या कारणासाठीच, अवास्तव सवलती मागत आहेत. जणू काय ते अल्पसंख्य आहेत हे त्यांचे आमच्यावर अुपकार असून, आम्ही बहुसंख्य आहोत हें आम्ही पापच केलें आहे! त्यांनी स्वतः बहुसंख्य बनून आम्हाला अल्पसंख्य बनविण्याचे थोडे का प्रयत्न केले? पण अेवढी त्यांनी पराकाष्ठा करूनही आम्ही जगलो हा आमचा दोष झाला का? पण आज तसा तो ठरला आहे खरा! ख्रिस्ती, पारशी वगैरे या देशातील अितर अल्पसंख्याकांनी असा जगावेगळा दुराग्रह धरला नाही. पण अेकट्या मुसलमानांनी धरला. त्यांच्या या अराष्ट्रीय दुराग्रहाला विरोध करण्याअैवजी आमच्यातले काही मोठे लोक अेक्याच्या भ्रामक कल्पनेनें

क्षध होऊन त्याचे कोड पुरवायला तयार झाले आहेत! त्यामुळेच आता स्वातंत्र्याची स्पष्ट व्याख्या सांगणे अपरिहार्य झाले आहे.

## हिंदुस्थानाकरिता कोण मेले ?

वस्तुत जो समाज देशात बहुसंख्य असतो त्याचाच तो देश मानला जाण्याची प्रथा सर्व जगात आहे. या नात्याने तर हिंदुस्थान हिंदूंचा आहेच, पण त्याशिवायही तो हिंदूंचा असल्याचे आणखी एक निश्चित गमक सांगता येईल. ते म्हणजे हिंदुस्थानाच्या उद्धाराचा प्रयत्न कोणी केला हे पाहणे, हे होय. या देशाच्या स्वातंत्र्याच्या १८५७ पासून सुरु झालेल्या लढ्यात कोणी खरा त्याग केला ? – हिंदूंनी की मुसलमानांनी ? अंदमानात कोण गेले ? — हिंदु की मुसलमान ? ज्या बंगालची सत्तासूत्रे आज मुसलमानांच्या हातात आहेत त्या बंगालमध्ये जे स्वातंत्र्याचे होमकुंड अहोरात्र पेटलेले असे त्यात बळी कोण गेले ? ते मुसलमान नव्हेत – तर हिंदुच ! सत्याग्रह-संग्रामात बळी गेले ते तरी कोण होते ? – मुसलमान ? छे छे, हिंदुच ! अंदमानातील भूमि खणून पहा व तेथे सापडलेली हुतात्म्यांची हाडे बघा म्हणजे तुम्हाला त्या सान्यांवर 'हिंदु' 'हिंदु' हीच अक्षरे लिहिलेली आढळतील ! यावरुन काय सिद्ध होते ? हच की, हिंदुस्थानाच्या उद्धारार्थ आत्मार्पण हिंदूंनीच केले आहे अर्थात् हा हिंदूंचाच देश आहे. ज्यांना अशी भीति वाटते की, मुसलमानांच्या सहकार्याशिवाय स्वराज्य मिळविता येणार नाही, ते ही गोष्ट दृष्टीआड करतात की, आजवर जे काही प्राप्त झाले ते एकट्या हिंदूंनीच आपल्या बळावर मिळविले आहे ! मग आजवर त्यांना करता आले ते यापुढे करता येणार नाही असे मनोदौर्बल्य का ? असे म्हटल्यावर लोक मला जातिनिष्ठ म्हणतील तर मुखेनैव म्हणोत. त्या तुमच्या मानीव राष्ट्रीयतेपक्षा ही जातिनिष्ठा मी भूषणास्पद मानतो.

## प्रयत्नाचे कृपाण हाती घ्या !

तेव्हा हिंदूंनी हे मनोदौर्बल्य टाकून देऊन स्वतःच्या बळावर स्वराज्य मिळविण्याची हिंमत धरली पाहिजे. कारण मुसलमानांना हा देश स्वतंत्र झालेला पाहण्याची उत्कटता नसून, त्याचे पाकिस्तान बनलेले पाहण्याची इच्छा आहे. मग सीमेला भिडून एकाशी एक लागून असलेल्या मुसल्मान राष्ट्रांचे संरक्षक व आक्रमक स्वरुपाचे तह झाले असून उद्या इंग्लंड एखाद्या जागतिक युद्धात गुंतून हतबल झाले, तर हे लोक अफगाणिस्तानाला हिंदुस्थानावर स्वारी करण्याला निमंत्रण करतील यात संदेह नाही. मग ते येणारे नवे राज्य हे स्वराज्य म्हणावयाचे काय ? नाहीच मुळी ! ज्यात हिंदु संस्कृतीचे संरक्षण व वर्धन होईल तेच स्वराज्य. असे स्वराज्य प्रस्थापित करण्याचे राष्ट्रीय सभेचे धोरण नसल्यामुळे हिंदुमहासभेला ते कार्य स्वत करणे प्राप्त आहे. हे ध्येय यशस्वी होईल काय, असा पापी

ंका मनात आणू नका त साध्य करण्याचा कृतनिश्चय करा ! प्रयत्नाची कृपाण ाती घ्या ! यशापयशाचे महत्त्व काय आहे ? यश न मिळाल तर ध्येयासाठी यत्नाची पराकाष्ठा करता करता प्राणार्पण केल्याचे समाधान तरी तुम्हाला ाभेल ज्यानी परिस्थितीपुढे मान वाकवून आपल्या कन्या भगिनी परधर्मीयाच्या ानान्यात लोटल्या त्याची नावेही दुनियेस विदित नाहीत पण ज्या प्रतापाने वात-यासाठी राज्यत्याग करून वनवास पत्करला त्याचे नाव जगात चिरजीव ाले त चिरजीवित्व प्राप्त करून घेण्यासाठी द्ष्काच्या अत्याचाराना बळी डलेल्या पूर्वजाच्या समाधानासाठी तरी अेवढ कराच

\+ \+ \+

## २ बगाल हिंदु प्रातीय सभा

खुलना यथे दि १८ फेब्रुवारी १९३९ रोजी बगाल हिंदु सभेचे आठवे अधिवेशन भरले असता स्वा सावरकरानी अध्यक्षपदावरून केलेले भाषण पुढे दिले आहे यात हिंदुमुसलमानाच्या अेक्यासबधी त्यानी आपले विचार स्पष्टपणे माडले आहेत

हिंदुस्थानातील मुसल्मानबाधवाना हिंदूनी अैक्य करावयास नको आहे ही गोष्ट आता स्पष्ट आहे कारणे देअून ती सिद्ध करण्याचा गरज आहे असे मला वाटत नाही अेक अेक दिवस अुगवतो तो कॉंग्रेसाकडून मुसलमानाना जादा सवलती देअून हिंदु मुसल्मानातील फूट वाढवूनच मावळतो अुदाहरणासाठी भाषेचा प्रश्न घ्या पाचदहा वर्षापूर्वी बगालमध्ये अेकच भाषा चालू होती हिंदुस्थानातील दुसऱ्या कोणत्याही प्रातापक्षा बगालमध्ये अैक्य अधिक होते पण आता मुस्लिम लीग अुघड अुघड असा प्रयत्न करीत आहे की, हिंदुस्थानची राष्ट्रभाषा अुर्दू हीच असावी अितिहास वगैरे विषयाची क्रमिक पुस्तके निम्मी बगालीत व निम्मी अुर्दूत लिहिली जावीत असे प्रयत्न करण्यात आले भाषाचे समेलन घडविण्याची कोण ही विचित्र तऱ्हा ! व्यक्तीव्यक्तीमध्ये अैक्य निर्माण झाल्याशिवाय त्याच्या धर्मामध्ये व समाजामध्ये अेकी निर्माण करणे कधी शक्य आहे काय ?

### जिनाची शेखमहमदी

बगाली व अुर्दू याचे असे समेलन करणे म्हणजे माणसाने अेक पाय विजारीत व अेक पाय धोतरात घालून चालण्यासारखे आहे पण अशा विचित्र वेषाचा ठराव

करून आपण तो मुस्लिम लीगकडे पाठविला तर ती काय म्हणेल माहीत आहे? दोन्ही पायात विजारच पाहिजे असा हट्ट तो धरील! आणि तो पुरवून घेण्यासाठी लढा खेळेल!! याचे बीज हे आहे की, हिंदुस्थानात आपले असे अेक स्वतंत्र राष्ट्र निर्माण करण्याचा हेतु लीगने मनाशी धरला आहे. अेखादा मौलाना, अेखादा मौल्वी अशासारख्याची ही शेखमहमदी आहे असे समजू नका, तर बॅ. जिनासारखे पुढारी व मुस्लिम लीगसारखी जबाबदार संस्था यांची अिच्छा हिंदुस्थानाची दोन शकले करावीत – अेक हिंदु फेडरेशन नि दुसरे मुस्लिम फेडरेशन! पिढ्यानुपिढ्या आपण आपल्या रक्ताचे शिंपण ज्याच्यासाठी घातले, त्या मातृभूमीची शकले करू पहाणाऱ्याशी तडजोडीची बोलणी करणे शक्य आहे काय? प्रांत, धर्म, भाषा, राजकारण, सर्व बाबतीत 'सवता सुभा' स्थापण्याची त्यांची मनीषा आहे. पुढील शंभर वर्षांत ते असा प्रयत्न चालविणार. याची खूणगाठ हिंदूंनी बांधली पाहिजे. काँग्रेसमधील हिंदु बांधव डोळे मिटून दुर्बिणीतून पाहत आहेत, त्यांनी हे भावित ध्यानी घेणे जरूर आहे.

## हिंदुत्वाची कसोटी लावा

याच्या अुलट, हिंदु मतदारांनी निवडलेले हिंदु मंत्री मात्र 'राष्ट्रीयत्वाच्या' नावाखाली हिंदुत्वाला विरोधक व राष्ट्रीयत्वाला विघातक असे वर्तन करीत आहेत. ते हिंदु सभेचे सभासद होत नाहीत. हिंदु सभेच्या अध्यक्षाला काँग्रेसचा सभासद होणे शक्य नाही. 'तू पुरता अहिंदु कोठे झाला आहेस?' असे त्याला विचारले जाअील. पण त्याला माझे अुत्तर असे की, माझ्या पूर्वजांचे हिंदु रक्त जोपर्यंत माझ्या शरीरात वाहत आहे, तोपर्यंत मी हिंदुत्वाचा त्याग करून काँग्रेसमध्ये प्रवेश करणार नाही. जिवात जीव असतो मी हिंदु आणि हिंदुच राहणार! पुढील निवडणुकीचे वेळी अुमेदवार तुमच्याकडे मत मागण्यास येतील. तेव्हा त्यांना तुम्ही पहिला प्रश्न हा करा की, हिंदूंच्या हक्काचे तू रक्षण करशील ना? तो जर म्हणेल 'मी राष्ट्रीय आहे,' तर त्याला सांगा, 'तर मग तू राष्ट्रीय लोकांकडे जा, आम्ही हिंदु लोक हिंदु अुमेदवारच निवडतो!' राज्यघटनाच जर जातिनिष्ठ आहे तर राष्ट्रीय अुमेदवाराला निवडणे शक्य कसे आहे? मग असा चमत्कार लवकरच घडून येअील की, निवडणुकीच्या दिवशी प्रत्येक काँग्रेसवाला 'मी हिंदु' असे म्हणत सुटेल, त्या वेळी हिंदुत्वाचा खरा अभिमानी असाच अुमेदवार तुम्ही निवडा हीच माझी कळकळीची प्रार्थना आहे.

## हिंदूंच्या राजवटीत

आम्ही हिंदु मुसलमानांच्या अेकीविरुद्ध मुळीच नाही. त्यासाठी आमचा दरवाजा सदा खुला आहे. पण ती अेकी होअीपर्यंत हिंदूंचे राजकारण हिंदूंच्याच

नजरेतून पहा हिंदूच्या मतावर निवडून आलेल्या अुमेदवारानी हिंदूच्या हक्काचे रक्षण न करणे ह दाभिकपणाचे आहे, विश्वासघाताचे आहे जातिनिर्णयाचा नि सदिग्ध धिक्कार कोणी केला असेल तर हिंदुसभेनेच केला, – कॉंग्रेसने नव्हे 'ना स्वीकार, ना धिक्कार' असे धोरण कॉंग्रेसने जातिनिर्णयाबाबत जोवर ठेवले आहे, तोवर हिंदुसमाज कॉंग्रेसपुढे कधीच मान लवविणार नाही, आणि कॉंग्रेसने जातिनिर्णयाचा अव्हेर केला, तरीही हिंदुसभा स्वतत्रपणे राहिली पाहिजे

हिंदुत्वाचा अभिमानी असा मनुष्य ना पताहून फार निराळ्या तऱ्हेने वागेल. मोहरमच्या वेळी हिंदूना वाद्यवादनाला बदी करा असे म्हणणाऱ्या मुसलमानाना तो बजावील, 'भाओी हो, हिंदूच्या दिवाळीत तुम्ही कोणतीही मिरवणूक नेअू नका की वारा मैलावर असलेल्या मशिदीतही प्रार्थना करू नका' असा नेट हिंदूनी दाखविला की, मुसलमान नमलेच म्हणून समजा हिंदु मुसलमानाच्या अेकीचा खरा मार्ग हाच की, हिंदूनी सघटित व सबल व्हावे आणि हिंदुत्वाचे रक्षण करण्याचे ककण बाधलेल्या अुमेदवारानाच निवडून द्याव

## अतर्गत भेद काढा

हिंदूनी अस्पृश्यता काढून टाकली पाहिजे व्यक्तीच्या खासगी जीवनात भेदभाव राहू शकेल, पण सार्वजनिक जीवनात त्याला मुळीसुद्धा थारा नाही नामशूद्र हा काही मुसलमानाप्रमाणे हिंदुस्थानच्या बाहेर आपले ममत्व ठेवीत नाही नामशूद्रापासून ब्राह्मणापर्यंत सर्व हिंदूचे पूर्वज येथेच भस्मसात् झाले त्या सर्वांची पुण्यभू, पितृभू, सर्व काही हाच भारतवर्ष आह सर्व हिंदु अेक दिलाने, अेक ध्ययाने, अेक विश्वासाने अेकत्र येतील, पुढे चालू लागतील, तर मायभूला सपूर्ण स्वातंत्र्य मिळणे ही गोष्ट दूरची खास नाही

* * *

# ३. बिहार प्रांतीय हिंदुसमेलन

मुगेर येथे ता २३ मार्च १९३९ रोजी वरील समेलनाच्या आठव्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदावरून स्वा सावरकरानी केलेलें भाषण

टप्याची काय आवश्यकता आहे ? आम्हाला तर तिची पूर्ण कल्पना आहे. होय, तुमचे म्हणणे यथार्थ आहे परंतु हिंदु महासभेविषयी काही लोकांचे मनात ज्या काही भलभलत्या कल्पना शिरल्या आहेत व जे विचित्र आक्षेप अुत्पन्न झाले आहेत, त्यांचा निरास करून त्याला योग्य अुत्तर देण्यासाठी हिंदूंच्या साम्प्रतच्या दु.स्थितीचे चित्र रेखाटणे हे अत्यावश्यक व अपरिहार्य आहे हिंदुधर्म व हिंदुत्व ही अेक नसून भिन्न आहेत. माझे असे ठाम मत आहे की, आम्हाला हिंदुधर्म अत्यंत प्रिय आहे व त्याच्यावर आघात होत असता तो आम्हाला पाहवणार नाही, अेवढेच काय पण प्रसंगी आम्हाला त्याचे संरक्षणासाठी प्राणसुद्धा अर्पण करावे लागतील परंतु हिंदुत्वाचे मोल त्याहीपेक्षा आम्हाला अधिक वाटते. हिंदुत्वाचा अपमान झाल्यास, पाहिजे त्या प्रकारे, प्राणही पणास लावावे लागतील. आज जगभर ज्या राष्ट्रीयतेची थोरड चालू आहे, ज्या 'राष्ट्रीयतेवर' हिटली, जर्मनी, अिंग्लंड अित्यादि देश तसेच आमची भारतीय राष्ट्रीय कांग्रेस फिदा झाली आहे, त्याच राष्ट्रीयतेची भावना आमच्या हिंदुत्वातही भरलेली आहे

## आजचा प्रश्न

हिंदुत्वाचा 'हिंदुधर्म' असा भ्रामक अर्थ नाही, तर हिंदुत्व हे ज्या राष्ट्रीयतेसाठी सगळे जग धडपडत आहे, त्या राष्ट्रीयतेचे प्रतीक आहे. जे लोक हिंदुधर्माला 'भ्रममूलक' समजतात, त्यांनी मुसलमान, ख्रिस्ती आदि धर्मांनाही भ्रममूलक म्हटले पाहिजे परंतु तसे कोणी म्हणत नाही म्हणूनच माझ्या मताप्रमाणे मुसलमान, यहुदी, ख्रिस्ती, यांना जर त्यांचा धर्म प्रिय आहे, तर मग आम्हा हिंदूनाही आपला धर्म प्राणाहूनही प्रिय मानण्याचा पूर्ण हक्क आहे परंतु सध्या आमच्या समोर हिंदुधर्माचा नव्हे तर हिंदुत्वाचा प्रश्न आहे आणि हिंदुत्व म्हणजे ते की ज्यात आमचा धर्म, आमची भाषा, आमच्या जीवनाची निरनिराळी अंगे, आमच्या 'भाकरीचा प्रश्न', आमचा गौरव, आमचा स्वाभिमान, 'राष्ट्रीयता' या शब्दांत ज्यांचा समावेश होतो ते ! ! आणि याच हिंदुत्वासाठी मला हिंदु महासभेचे संघटन हवे आहे.

## पूर्ण राजकीय ध्येय

दुसरी गोष्ट मला हिंदुसभेच्या ध्येयासंबंधी सांगावयाची आहे. आम्ही हिंदु २८ कोटी आहोत, तरीही आम्हाला हिंदुमहासभेचे ध्येय अजूनपर्यंत समजले नाही. अितकेच काय, काही लोक तर या ध्येयाचा भलताच अर्थ करितात परंतु मी येथे आपणा सर्व लोकांना स्पष्टपणे दाखवून देअीन की, हिंदुमहासभेचे ध्येय पूर्ण 'राजकीय' आहे. कांग्रेसला जे संपूर्ण स्वातंत्र्य हवे आहे, तेच हिंदु महासभेलाही हवे आहे. भौगोलिक राष्ट्रीयतेच्या साच्यात भारतवर्षाला ओतणे हे हिंदु महा

सभेचेही ध्येय आहे. अितकेच नव्हे तर हिंदु महासभेच्या दृष्टीने खरी राष्ट्रीयता तीच की, जिच्या छायाछत्राखाली प्रत्येक व्यक्ति समान असेल, जिच्या 'लोकसभेत' (पार्लमेंटात) तुम्ही कोणत्या धर्माचे आहा, हिंदु आहा, की मुसलमान आहा, ख्रिश्चन आहा की यहुदी आहा, हे कोणालाही विचारले जाणार नाही. आम्ही सर्वांना हिंदुस्थानी म्हणू. सार्वजनिक क्षेत्रात, सरकारी नोकऱ्यातून हिंदुस्थानचा मनुष्य आहे की नाही व त्याची योग्यता आहे की नाही, अेवढेच पाहू. याहून खरी राष्ट्रीयता ती दुसरी काय असते ? आणि जर हिंदुमहासभा याच राष्ट्रीयतेची पुरस्कर्ती आहे, तर मग तिच्यावर जातीयतेचा आरोप काय म्हणून लादला जातो ? आता राष्ट्रीयतेचा जर असाच अर्थ मानू लागले की, जो अधिक भाडखोर असेल त्याला अधिक वाटा मिळावा व जो येथीलच प्राचीन रहिवासी असेल, पण गप्प बसत असेल, सहनशील असेल, त्याला कमी अधिकार मिळावे, तर आमची हिंदुमहासभा अवश्य म्हणेल की, या राष्ट्रीयतेवर आमचा विश्वासच नाही. आम्ही समानतेच्या बाजूचे आहोत व याच दृष्टीने जर राष्ट्रीय असण्याचा कांग्रेसला अभिमान असेल, तर हिंदुमहासभेला पण त्यात तेवढाच अभिमान आहे. आम्ही तर छातीठोकपणे असे सांगू शकतो की, कांग्रेसअितकीच काय पण कांग्रेसपेक्षाही काकणभर अधिक हिंदुमहासभाच राष्ट्रीय आहे.

## हिंदूंच्या दुर्दशेची सीमा

आता मी हिंदुस्थानात जन्मलेल्या हिंदुपुत्रांना असा सवाल टाकतो की, आता जे मी हिंदुस्थानच्या दुर्दशेचे चित्र रेखाटणार आहे, ते मान्य होअील काय? आपण सीमा प्रांतापासूनच प्रारंभ करू या. मी जे सांगणार आहे ते सप्रमाण सांगणार आहे व त्याची जबाबदारी पूर्ण ओळखून सांगणार आहे. सीमा प्रांतात बन्नू व अितर शहरात लुटारूंच्या टोळ्या आजही अस्तित्वात आहेत. दरोडे घालण्याचे आधी ते लोक तसे स्पष्ट जाहीर करतात नि आज आम्ही दरोडा घालणार आहोत असे सांगतात तेथील शीख व हिंदु लोक कांग्रेसमंत्रिमंडळाला अशा प्रकारच्या धोक्याची सूचना देतात व सरकारी बंदोबस्ताची तेथील कांग्रेस सरकारजवळ मागणी करतात. पण कांग्रेस मंत्रिमंडळ काहीही बंदोबस्त करीत नाही. बंदोबस्त झालाच तर दरोडेखोरांची लुटालूट संपूर्ण होअून गेल्यानंतर ! ! पोलिसही जर आलेच तर अशा ठिकाणी येतात की, जेथे लुटालूटही झाली नाही नि जाळपोळही झाली नाही. त्यातही आश्चर्य हे की जेव्हा कांग्रेस मंत्रिमंडळावर असे आक्षेप घेतले जातात तेव्हा मंत्रिमंडळ म्हणते की, यात ' जातीय दंग्याचा काहीच संबंध नाही. भुकेले पठाण गरिबीने चिडून जाअून असे हल्ले करतात '

## हिंदु कुमारिकांवर धाड !

परंतु मी असे विचारतो की ' कायहो ! जर हे भुकेल्या पठाणाचे हल्ले आहेत, तर मग श्रीमंत मुसलमानाच्या घरावर का बरे ते हल्ले होत नाहीत ?

बायका पळविनात त्या केवळ हिंदु व शीख याच्याच का बरे पळवितात ?' ते लुटारू जाहीरपणे सागतात की ' आम्ही काफिर लोकाना लुटायला येत आहोत.' या गोष्टीची खात्री पटण्यासाठी मी अेक खरे घडलेले अुदाहरणच सागतो. अेका हिंदूच्या घरात चार मुली होत्या. दरोडेखोराचा हल्ला होताच, त्यापैकी अेका मुलीने विहिरीत अुडी टाकून जीव दिला, दुसरी पकडली गेली नि राहिलेल्या दोघीजणींनी शेजारच्या मुसलमानाच्या घरात आसरा घेतला. परतु त्या घरातील मुसलमान स्त्रियानी दरोडेखोराना बोलावून आणून त्या मुली त्याच्या ताब्यात दिल्या. नंतर त्यांपैकी अेक मुलगी कोणत्या तरी युक्तीने त्या लुटारूच्या हातातून निसटली व शेजारच्या कोर्टातील मॅजिस्ट्रेटसमोर तिने आपली जबानी दिली. त्यात तिने सागितले की, कादेवटाटघाप्रमाणे मुली बाजारात विकल्या जातात. त्याच्या किमती ठरवून, तेवढ्या किमतीचे बिल्ले त्याच्या शरीरावर लटकावतात व रात्री जनावराप्रमाणे गोठ्यात गळ्यात दोरी बाधून, त्यास खुट्याला बाधून ठेवतात. तसेच, ब्रिटिश फोजेच्या भीतीने त्याना अेका जागेहून दुसऱ्या जागी नेअून ठेवण्यात येत.'

## कॉंग्रेसची राष्ट्रीयता !

असे प्रसग पूर्वी तर अनेक घडून येत. परतु कॉंग्रेसमन्त्रिमडळ आल्यापासून अशा गोष्टी पुष्कळच अधिक घडून येअू लागल्या आहेत. असे प्रसग न घडावे म्हणून केंद्रीय सरकारने जेव्हा प्राताचे सरक्षणार्थ अधिक रक्कम अदाजपत्रकात लष्करी खर्चामध्ये घातली तेव्हा ' यामुळे पठाणाच्या स्वातत्र्यावर गदा येअील ' या मुद्द्यावर अेका मुसलमानाने त्या गोष्टीला विरोध केला. हिंदु राष्ट्रीय सभासदानीही या गोष्टीचे समर्थन केले. याचेच नाव राष्ट्रीय समानता आहे काय ? पण अेकदा अेलिस नावाची अेक अिंग्रज मुलगी पळविली गेली, तेव्हा ज्या प्रधानाने पठाणाविरुद्ध कारवाअी करण्यास विरोध केला होता, त्याचे गाव तोफेने अुडविण्यात आले, व लुटारूच्या भुकेवरोवर त्याची वासनाही जाळून टाकण्यात आली. आता कोणत्याही लुटारू टोळीच्या बापाचीही छाती होत नाही की, तो अिंग्रज स्त्रीच्या अगाला हात लावील ! अेकदा शीख हिंदु यानी जेव्हा कॉंग्रेसच्या मुख्य प्रधानाकडे शिष्टमडळ नेले नि सागितले की, बन्नू गावात हिंदु पोलिसाची सख्या जास्त ठेवा, तेव्हा मुख्यप्रधान खांसाहेब म्हणाले, ' पोलिसामध्ये हिंदु–मुसलमान असा भेद काय म्हणून ? ही अराष्ट्रीय वृत्ति आहे. तुम्हाला जर भय वाटत असेल, तर ज्या ठिकाणी हिंदु अधिक प्रमाणात राहतात, तेथे जाअून रहा.' अेकीकडे सीमाप्रातात राष्ट्रीयतेचा ढोल दाखविण्यात येतो, तर दुसरीकडे बिहार व सयुक्त प्रातात नोकऱ्यामध्ये मुसलमानाचा भरणा भरमसाट होत आहे. याचे नाव कॉंग्रेसची राष्ट्रीयता !!

पजाब, काश्मीर, दिल्ली कोठेही पहा, हिंदूच्या सपत्तीवर व प्राणावरच

सकट आहे असे नाही, तर हिंदूंचा स्वाभिमानही आज भयकर धोक्यात आहे मालमत्तेवर येणाऱ्या सकटाची आम्ही हिंदु तितकीशी पर्वा करीत नाही, परतु स्वाभिमान व संस्कृति यांच्या सरक्षणासाठी प्राणदान करणेही आम्ही श्रेयस्कर समजतो

## मुस्लिम लीगचा कांगावा

पहा ! आमच्या स्वाभिमानावर व संस्कृतीवर कशा प्रकारचे सकटाचे ढग गडगडत आहेत !! जेव्हा मुस्लिम लीगने 'काँग्रेस मुसलमानांच्या हिताची उपेक्षा करीत आहे' अशा तिजवर आरोप केला, तेव्हा ती गोष्ट काँग्रेसवाल्यांच्या काळजाला जाऊन भिडली त्यांनी मोठ्या काकुळतीने असे पटवून देण्याची शिकस्त केली की 'छे ! छे ! मुसलमानांवर आम्ही यत्किंचितही अन्याय केला नाही, उलट त्यांचा फायदाच आम्ही करीत आलो आहोत' आम्ही आमच्या कर्तव्यात कधीच कसूर केली नाही' पण हिंदूंनी असा आरोप केलाच तर काँग्रेस सरकार त्याला कवडीचीही किंमत देत नाही, त्याकडे कानाडोळाच करते

## ना पंताची कबुली

मुस्लिम लीगच्या आक्षेपांना सर्व प्रांतिक सरकारांनी आपापला खुलासा करून, ते आक्षेप खोटे असल्याचे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे या खुलाशात सयुक्त प्रांताचे मुख्य प्रधान श्री गोविंदवल्लभ पंत यांचा खुलासा लक्षणीय आहे ते म्हणतात की 'मुस्लिम लीगचा आक्षेप खोटा आहे जेव्हा राष्ट्रीय प्रश्न येतो, तेव्हा आम्ही सदैव मुसलमानांच्या बाजूनेच मत देतो (पण खरा राष्ट्रीय धर्म कोणत्याही जातीला झुकते न धरीत नसतो) मोहरम हा मुसलमानांचा 'मातमदिन' असल्याने आम्ही असे जाहीर केले आहे की, 'मोहरमात हिंदूंनी मशिदीसमोरच काय, पण कोठेही वाद्य वाजवू नयत, मंदिरातही घंटा वाजवू नयत, अेवढेच काय परतु देवाच्या आरतीचे वेळीही घटा वाजवू नयत (हिंदूंनी याविरुद्ध तक्रार केली परतु कोण अैकतो त्यांचे ! तक्रार व्यर्थ गेली) 'आम्ही हिंदूवर असाही निर्बंध घातला का, हिंदूंनी परवानगी घेतल्याशिवाय मिरवणूक काढू नये मुसलमानांना मात्र आम्ही ही अट ठेविली नाही' आपण विचार करा की हीच का राष्ट्रीयता ? हां ! जर हिंदूंच्या अेकादशीच्या दिवशी मुसलमानांनाही उपवास करायला लावला तर मात्र थोड्या प्रमाणात समानता होअू शकेल !!

मुसलमानांच्या धार्मिक भावनांना मान द्यावयास लावण्याची जर हिंदूवर सक्ती केली जाते तर मग हिंदूंच्या धार्मिक भावनांना मान द्यावयास मुसलमानांवर दडपण टाकिले पाहिजे सवलती दोघांनाही सारख्या असाव्यात अेकाची गैरसोय व दुसऱ्याची सोय असे का ? ही राष्ट्रीयताच नव्हे ! पंतप्रधानानें हें मान्य केले

आहे की हिंदूंच्याच मतांनी मी मंत्री झालो आहे. पण अशा प्रकारचें वर्तन करण्याचा हिंदूनी त्यांना कधी 'मँडेट' दिला होता ? अितकें असूनही पंतांच्या आमदानीतच अधिकांत अधिक जातीय दंगे झाले आहेत. संयुक्त प्रांतातील शौकत-अल्ली नांवाच्या मॅजिस्ट्रेटने 'मोहरमची मिरवणूक चालली असता हिंदूनी त्या रस्त्याने जाअू नये, होळीच्या वेळी वाद्यें वाजवू नयेत व रंग अुडवू नये' अशा तऱ्हेचें अेक व्यक्तव्य प्रसिद्ध केलें होतें.

## ही मात्र जातिवंत जातीयता

तुमचा बिहार प्रांतच का घ्या ना ! येथील कांग्रेस सरकारने लीगच्या आक्षेपांना अुत्तर देण्याकरिता अेक वक्तव्य प्रकाशित करून असे दाखविलें आहे की, या प्रांती सुमारे शे. १३ मुसलमान असूनही त्यांना मुल्कीमध्ये शे. २८, शिक्षण विभागात शे. ४१ व स्थानिक स्वराज्यात शे. २६ पर्यंत नोकऱ्या दिल्या गेल्या आहेत. मद्रास सरकारचें कथन आहे की, तेथे जरी शे. ७ मुसलमान आहेत तरी त्यांना अबकारीमध्यें शे. १६, शिक्षणविभागात शे. १०, जंगलविभागात शे. १५ व न्यायखात्यात शे. १८ नोकऱ्या मिळाल्या आहेत. हीच का खरी राष्ट्रीयता आहे? योग्यतेप्रमाणे जर नोकऱ्या मिळाल्या तर त्याला कोणी विरोध करणार नाही. योग्यता असेल तर शे. १०० नोकऱ्या द्या ! अहो, परंतु अेखाद्या जातीकडा विशेष सवलत म्हणून अितक्या नोकऱ्या काय म्हणून दिल्या जाव्या ? हिंदु महासभासुद्धा अल्पसंख्य जातींना त्याच्या हक्काची गॅरंटी द्यावयास तयार आहे. परंतु बहुसंख्य जातीला प्राप्त झालेल्या हक्कावर कुऱ्हाड मारून, या तऱ्हेने थैमान घालण्याला मी अल्पसंख्याकांची गॅरंटी म्हणणार नाही. आणि जर हिंदु महासभा या अमल्या सर्व गोष्टींना विरोध करते म्हणून जातीय ठरविली जात असेल, तर मला त्या जातीयतेबद्दल अत्यंत अभिमान आहे ! मला त्याचा गर्व वाटतो !! वस्तुतः हिंदु महासभेच्या या ध्येयाला जातीयता म्हणणे हा अगदी अन्याय आहे. राष्ट्रीयतेच्या नावावर भाषेची ही कत्तल होत आहे. राष्ट्रभाषा हिंदी होती, ती हिंदुस्थानी झाली. आणि अत्यंत शास्त्रीय व सर्वश्रेष्ठ देवनागरी लिपीशी विचित्र अुर्दू लिपीचें लग्न लावून देण्यात आले. हिंदु मुलांवर दोन लिप्या शिकण्याचा बोजा बळाने लादला जात आहे.

## हें अुलटें चित्र पहा

तीच आता मुस्लिम-प्रधान प्रांतांची अवस्था पहा. पंजाब-बंगालमध्ये हिंदूंकडून जमीन हिसकावून मुसलमानांना दिली जात आहे. बंगाल्यातील अेका मुस्लिम प्रधानानें विधिमंडळात असा ठराव मांडला आहे की, मुसलमान योग्य असोत वा नसोत, त्यांना शे. ६० नोकऱ्या मिळाल्याच पाहिजेत. बंगालमध्ये

धिकात अधिक मुसलमान शे ५१ टक्के आहत। आणि या सर्वांवर कळस म्हणने ा ठराव पुढे आल्यावर तथील काँग्रेसच्या सभासदानी तटस्थ राहणच योग्य ठर वले। श्री शरच्चंद्रासारख्या राष्ट्रीय कार्यकर्त्यांनी सुद्धा यावर आपले मत प्रकट रताना म्हटले आहे की, ‘मुसलमान हे योग्य नाहीत म्हणून ही अुणीव भरून ाढण्यासाठी प्रत्येक खात्याने अेक परीक्षा ठेवावी आणि ती पास झाली की मुसल ान वी अे झाले असे समजावे’ अशी ही काँग्रेसची राष्ट्रीयता आहे! आज द्राबादमध्ये काय होत आहे? हिंदूना पूजा अर्चा करू दिली जात नाही मंदि- ाचा कळस मशिदीच्या अुंचीच्या खालीच असला पाहिजे असा हुकूम निघाला आह जकडे पहाल तिकडे हिंदूचा धर्म, स्वाभिमान गौरव पोटाचा प्रश्न या सर्वांवर ाघात हात आहे

अशी अवस्था आह! आता आपणच विचार करा की हिंदुसभा का अुगीचच ोरडत आहे? आज ४० वर्षांनतरही आमची काँग्रेसही तेच रडगाणे गात आहे, याच दु खाच्या गोष्टी सांगत आहे तीच दु ख आळवून सांगण्यासाठी सभेलने रविली जात आहेत मुस्लिम राज्यातही तच दु ख व ब्रिटिशराज्यातही तीच ड *आणि आज सात कांग्रेसी प्रांतातही हिंदूंच बहुमत असूनही थोडीशी सत्ता* ाती आली आहे तरीही तीच रडकथा की ‘आमच्यावर अन्याय होत आहे’ ाम्हावर बळजत्काराने अुर्दू लादली जात आहे धिंग्रा आदि कितीतरी क्रांति- ारकानी बलिदान केले असहकार आणि सत्याग्रह-युद्धात अपूर्व त्याग ांग्रेसवाल्यानी केले त्यानतर जो थोडी सत्ता आम्हाला मिळाली आहे, तिचा हा सला अुपयोग किती दु खदायक होत आहे!!

## मुसलमानानी साधले

आता दुसरीकडे जिनासाहेबाकडे बघा! पंजाब बंगाल व सिंध यामध्ये ुसलमानाचं बहुमत असल्याने त्यानी तिन्ही प्रांतात कट्टर मुसलमानाचे प्रधान ंडळ कायम करण्याचा असा प्रयत्न केला की त्यातील दोन प्रांत जे बंगाल व ंजाब त्यात तर लीगच प्रधानमंडळ कायम केले तेव्हाच ते राहिले आणि *म्हणूनच तर पंजाबचे मुख्य प्रधान सर सिकंदर हयातखान यानी प्रकटपणे आपल्या* ांतात सर्व ठिकाणी मुस्लिम लीगच्या शाखा अुघडण्याचा आदेश दिला आहे अंतर सात प्रांतात हिंदु प्रधानमंडळ होअू शकले असत—आमच्या हिंदुबांधवानी ेवडणुकीचे वेळी आपापल्या प्रांतातील लोकाना स्पष्ट शब्दात हें मागितले असत ी, हिंदूंच हित पहाण्याचीच प्रतिज्ञा आपण करीत असाल तरच आपणास मत मेळेल’ असं झाल असत तर—हिंदूना हाच अुत्तम संधि होती की, ज्या प्रकारे ंजाब बंगाल व सिंध यामधील मतदारानी मुसलमानाच हित रक्षण करणाऱ्या ुस्लिम अुमेदवाराना टिपून मत दिला, त्याच तऱ्हेन हिंदूनीही हिंदु हित पाहणाऱ्या ुढाऱ्यानाच मत दिली असती तर!!

## निवडणुकीच जातिनिष्ठ आहेत

अशा रीतीने कमीत कमी सात प्रांतांत तरी हिंदु प्रधानमंडळ कायम झालें असतें, आणि मग आपणांस आपल्या प्रांतात नोकऱ्यांसंबंधी तक्रारी करण्याचा, भाषेसंबंधी रडगाणें गाण्याचा प्रसंग आला नसता. कानपूरमध्ये दंगा झाला. चौथ्या दिवशी लष्कर पाठविलें गेलें. हिंदु प्रधान मंडळ असतें, तर पहिल्याच दिवशी लष्कर गेलें असतें व अेका दिवसात दंगा शांत करून टाकला असता !! मुसलमान अिंग्रजांवर आक्रमण करीत नाहीत! तेथें त्याची गुंडगिरी चालत नाही. आमच्या प्रधानमंडळाच्या राजवटीत मोहरमच्या दंगली, मशिदीपुढील वाद्यांचा प्रश्न अुत्पन्नच झाला नसता. आघातास प्रत्याघात करून आपण सर्व काही ताळ्यावर आणलें असतें. आज आमचेच प्रतिनिधि ज्या चुका करीत आहेत, त्या झाल्या नसत्या. कारण निवडणुकीचे वेळीच आम्ही त्यांच्याकडून प्रतिज्ञा करविली असती की, 'हिंदुहिताचें रक्षण कराल, तरच तुम्हांला मतें मिळतील.' जर निवडणुकीचे क्षेत्रात राष्ट्रीयतेचा वासही नाही, तर राष्ट्रीयतेचा टेंभा मिरवणारे कांग्रेस अुमेदवार अुभे तरी न राहते किंवा राहिलेच तर ते आपल्या जातीच्यासाठीच !!

स्वत ला हिंदु समजणे ही लज्जेची गोष्ट समजणार नाही हिंदुत्वाच्या तिकिटावर अुभे राहतील त्यानाच आम्ही पाठिंबा देअू या वेगळी राष्ट्रीयतेच्या लाकाना नव्हे ' या 'राष्ट्रीयतच्या ' मोहात पडून तर आम्ही हिंदूनी हाती आलेली थोडी-बहुत सत्ताही जशी काही मिळालीच नाही असे समजून मुसलमानाना देअून टाकली म्हणून हिंदूनो ! आता सावध व्हा आणि पुढील निवडणुकीत सातही प्रांतात हिंदु प्रधानमडळ स्थिर होअील, अितकच नव्हे तर त्यात प्राप्त सत्तेच्या योग्य अुपयोगाने, हिंदुत्वाच्या जोरान ब्रिटनच्या हातातील राहिलेली सत्ताही प्राप्त करून देशात पूर्ण स्वराज्य स्थापन करण्याचा अुपाय करा

## हिंदुत्वाचा अक्षय्य वट

हजारो वर्षापासून निद्रित असलेल्या या हिंदु जातीत अुत्साह सचरण्याचे हे पहिलच युग आल आहे या वेळी मुसलमान आम्हाला मिळोत वा न मिळोत, आम्ही सव मिळून हिंदुराष्ट्राच्या पुण्यमय प्रयत्नात अेकत्र झालो आहोत वत्स ! तुम्ही आता तयार व्हा आणि असे सघटित व्हा की, तुमच्या भावी स्वातन्त्र्ययुद्धात विलक्षण जोर यावा ! ! जगातील कोणचीही शक्ति तुमच्यापुढे अुभी राहू शकणार नाही, असाही काळ यअील असा विश्वास वाळगा ! जोपर्यंत मुसलमान साहाय्य करीत नाहीत तोपर्यंत 'राष्ट्र ' याचा अर्थ ' हिंदुराष्ट्र ' असाच समजा हिंदूच्या हितावर दृष्टि ठेवूनच राजकारण खेळा, राष्ट्रीय हिताच्या गाष्टी बोल ण्याच ढाग सोडून हिंदुहिताच रक्षण करण्याऱ्या गोष्टी बालण्यात लज्जा मानू नका तुमच्या देशात हूण आले ग्रीक आल शक आले, यवन आले परतु त्या सवाच नाममात्रही राहिलेल नाही हिंदुत्वाचा नाश करायला आले व स्वत च धुळीस मिळाले ! ! आणि आम्ही २८ कोटी हिंदु आजही जिवत राहिलो आहो औरगजवाने अक्षय्य वटाचा नाश करण्यासाठी काय करायच ठेवल होते ! ! परतु आमचा अक्षय्यवट आजही अुभाच आहे सारांश जावर आमच्यात हिंदुत्वाची भावना जागृत असेल तोपर्यंत जगातील कोणतीही शक्ति आमचा नाश करू शकणार नाही हिंदुत्व विसरल्याने मात्र धुळधाण निश्चितपणे होअील हे ध्यानात ठेवा

\+ + +

# ४. प्रांतिक स्वराज्य कोणी आणलें ?

**अकोला येथे दि. २६ नोव्हेंबर १९३७ रोजी स्वा. सावरकर यांचा सत्कार रा. ब. आठल्ये यांच्या अध्यक्षतेखाली झाला त्या वेळी स्वा. सावरकर यांचें झालेलें भाषण.**

आपण जो आज माझा सन्मान केला हा माझा सन्मान नसून मी ज्या कार्याकरिता मागे झगडलो त्या कार्याचा, त्या स्वातंत्र्याचा, त्या स्वराज्याचा हा सन्मान आहे. ज्या वेळेला स्वातंत्र्य शब्द अुच्चारणें मोठें भयंकर समजलें जात होते त्या वेळी तो आम्ही अुच्चारला, अितकेच नव्हे तर त्यासंबंधी खटपट करण्यास प्रारंभ केला, आणि त्या भानगडीत त्या काळच्या सरकारच्या रोषास आम्हांला बळी पडावें लागलें. अशाही वेळी, आम्हाला पोलिसच्या सशस्त्र पाहाऱ्यात शिक्षा झाल्यानंतर बंदिशाळेकडे नेत असताना काही मंडळी स्नेहार्द्र बुद्धीने पाहत होती. पण ती किती होती? फक्त चारदोनच. पोलिसांच्या त्या गाडीतून मुंबअी ही आता शेवटचीच आपणांला दिसणार या आशेने चौफेर जेव्हा मी पाहिलें तेव्हा मैदानावर क्रिकेटची मॅच चाललेली होती. हजारो तरुण आनंदाने टाळया पिटीत खेळाची मजा पाहत होते! आणि माझ्यासारख्या चारदोन व्यक्तिच स्वातंत्र्याच्या मागे लागल्यामुळे त्या तुरुंगाची, काळ्या पाण्याची हवा खाण्यास चालल्या होत्या. पण त्या काळात आणि आजच्या काळात जमीनअस्मानाचें अंतर पडलें. आज स्वातंत्र्य आणि स्वराज्य शब्द घरोघरी अुच्चारला जात आहे. आज त्या स्वातंत्र्याकरिता नि स्वराज्याकरिता हजारो देशबांधव मोठ्या आनंदात कारावास सहन करण्याला नि हालअपेष्टा भोगण्याला तयार झाले.

## लक्ष्यावर झडप घाला

आज अितक्या हालअपेष्टानंतर थोडेबहुत, का होअीना, अगदी किंचित् म्हटलें तरीसुद्धा चालेल, पण काही हक्क आपल्याला मिळाले. मला फ्रेंच राज्यक्रांतीचा काळ आठवतो. त्या काळात समाजसत्तावादी होते, राजाविरुद्ध बंड करून आपली सत्ता प्रस्थापित करू पाहणारे होते, लुटालुटीकरिता क्रांतीची वाट पाहणारे लोक होते व भांडवलदारांच्या मिराशीविरुद्ध चळवळ करणारे लोक होते; आणि हे सर्व लोक अेका लक्ष्यावर लक्ष ठेवून – राजा लुअी याच्या वधावर लक्ष ठेवून– कारण सत्तेचा, अधिकाराचा, सामर्थ्याचा, आपल्या शब्दाबरोबर सर्व राष्ट्र अिकडच्या तिकडे हलविण्याचा गट्टा त्याच्या हाती होता – कार्य करीत होते. त्याच्यावर पक्षोपपक्षांनी आपल्या सुऱ्या, भाले, बरच्या नि तळवारी चोहोबाजूंनी अुगारल्या होत्या, पण त्याचा मानवी देह जो या सर्वांचें लक्ष्य होता, तो नाहीसा झाल्यानंतर त्या सुऱ्या, त्या बरच्या, ते भाले, त्या तलवारी अेकमेकांवरच आदळू लागल्या व

त्यातून स्फुलिंग निघू लागले तशी काही अशी आज आपली स्थिति झाल्यासारखी मला वाटते.

आपल्या दीर्घ परिश्रमानतर जे काही थोडेबहुत आपल्याला मिळाले—ते मिळाले हे नाकारण्यात अर्थ नाही—ते मिळाल्यानतर ही नोकरशाही जी आजपावेतो आपणा सर्वांचे लक्ष्य होती व अद्यापही आहे ती आपल्यामधून थोडीशी नाहीशी झाल्यानतर, आपल्या स्थलापासून विचलित झाल्यानतर, आपापसामध्ये आपण धुमसू लागावे, आपापल्यात पक्षोपपक्ष अुत्पन्न व्हावेत यात आश्चर्य नाही. पण अद्यापि आपल्याला जे साधावयाचे ते पुरते साधले नाही. जे आपल्याला मिळावयाचे ते पूर्णपणे आपल्याला मिळाले नाही. ते मिळेतो आणि मिळाल्यानतर हे पक्षोपपक्ष, हा मतभेद, हा विचारातील निराळेपणा अेकमेकाला मारक न होता पूरक झाला पाहिजे. हे पक्ष आहेत खरे पण ते विपक्ष नाहीत. पक्षी ज्याप्रमाणे आपल्या दोन्ही अलग पक्षाच्या आधारे अुडून लक्ष्यावर झडप घालतो त्याप्रमाणे आपल्याला आपल्या लक्ष्यावर झडप घातली पाहिजे

## पक्ष नाहीत कोठे ?

पक्ष नाहीत कुठे आणि त्याबद्दल अेवढी खत बाळगण्याचे कारण काय ? पक्ष आहेत तेथे जिवतपणा आहे प्रेताच्या समुदायात पक्ष असत नाहीत त्याना जसे ठेवाल तशा स्थितीत ते राहतील. जेथे बुद्धि आहे, जेथे विचारशक्ति आहे, जेथे अीर्षा आहे, तेथे पक्ष आहेत माझी मते तुम्हाला मान्य होण्यासारखी नसतील. दुसऱ्याची मते मला मान्य होण्यासारखी नसतील. आज सनातन्याना वाटते जुन्या परपरागत रूढि चालू ठेवून आपण आपले वैशिष्ट्य राखू, सुधारकाना वाटते, अनिष्ट अशा चाली नि रूढि बद केल्या तरच आपला तरणोपाय आहे साम्यवाद्याना वाटते, देशातील श्रमजीवी वर्ग सुधारला तरच खरी सत्ता हाती असल्याचे श्रेय आहे. राष्ट्रीय सभेची अशी दृढ श्रद्धा आहे की, आपल्याच मार्गांनी आपण या भारतवर्षाला ध्येयाच्या शिखरावर नेअू व हिंदुसभेची अशी खात्री आहे की, आपलेच मार्ग योग्य आहेत हे सगळे आपआपल्या दृष्टीने विचार करणारे आहेत पण याच्या बुडाशी अेकच सूत्र आहे आणि ते हिंदुराष्ट्राची अुन्नति हे आपण विसरता अुपयोगी नाही जो तो या अेकाच हेतूने प्रेरित होअून खटपट करीत आहे. ती खटपट करीत असता अमका चुकला किंवा अमका बरोबर आहे, हें वाटण्याचाही पण नैसर्गिक मनोधर्म आहे.

## चुका झाल्या म्हणून बिघडलें नाही

ज्या वेळेला आम्ही अत्यत अल्प, हाताच्या बोटावर मोजण्याअितके स्वातन्त्र्याची द्वाही पिटीत चाललो होतो आणि अितर अफाट जनसमर्दाकडे पाहत

होतो त्या वेळेला आम्हालाही मधून मधून वाटे, आम्ही चुकत तर नाही? पण आज २५–३० वर्षांनी त्या वेळी शृंखलाबद्ध असलेली आमची शरीरं आज या माळांनी नि हारांनी सुशोभित होत आहेत. आम्हा चार-दोन क्रांतिकारकांकडे पाहणारे त्या वेळचे तुरळक जीव कोणीकडे आणि आज आमचे हर्षभराने स्वागत करणारे हजारो आणि लाखो लोक कोणीकडे? काळ बदलतो. कालच्या चुका आज बरोबरशा वाटू लागतात. थोडे दिवसांपूर्वी महात्माजींनाच नव्हते का वाटत की, आपण हिमालयाअेवढाल्या चुका केल्या! परवा जवाहरलाल नेहरूंना हा मंत्रिपदे स्वीकारण्यात आपण चूक करीत आहोत असं नव्हतं का वाटत? चुका या चुकांसारख्या वाटल्या तरी त्यांची खरी कसोटी अनुभव हीच आहे. मी आज ज्या चळवळी हाती घेत आहे किंवा ज्या घेणार आहे त्यासुद्धा पुष्कळांना चुकत आहेत असे वाटण्याचा संभव आहे आणि ते अगदी बरोबर आहे. मला त्याबद्दल यत्किंचितही विषाद वाटत नाही.

## राष्ट्राचे स्वत्वरक्षण

आज देशातील बहुजनपक्ष नामशेष होअू पाहत आहे. बहुजनपक्षाला अल्पमतात खेचण्याचे प्रयत्न सुरू आहेत. मी ते स्वराज्य समजतो की, जेथे स्वत्व शिल्लक आहे. घरच्या माणसांना दारच्या ओटीवर बसावं आणि परकीयांची ज्यांची दृष्टि अिराण अफगाणिस्तानकडे वळलेली आहे, ज्यांच्या दृष्टीला बलुचिस्तान व अरबस्तानच दिसत आहेत अशांनी येथे कारभार करावा आणि प्रसंगी त्यांच्याशी संगमनत करून 'या पुण्यभूच्या चिंधड्या' अुडविण्यासही मागेपुढे पाहू नये अशांना किंवा त्यांच्याशी समरस झालेल्यांना राज्याची राज्यसूत्रे चालविण्याला मी स्वराज्य समजत नाही. अिंग्लंडात अुद्या चार जर्मन अगर चौघांनी हट्ट धरला की सर्वाधिकार आमच्या हाती पाहिजे तर ही गोष्ट अिंग्लंडच्या लोकांना रुचेल काय? ते म्हणतील 'बाबांनो! येथे तुम्ही आपली संस्कृति, भाषा मानवी हक्क हे सांभाळा. पण राज्यकारभाराचा दंडक अिंग्रजच चालवील.' अिंग्रज नव्हे तर कोणा जर्मनाला जर्मनांशी संधान ठेवून अिंग्लंडच्या राज्ययंत्रात शिरू पाहील तर तो दंड्य म्हणूनच समजला जाअील. तेव्हा देशातील बहुजन समाजालाच आपल्या मताप्रमाणे देशाच्या नियतीची सूत्रे हलविण्याचा अधिकार असतो आणि जेथे राष्ट्राचं स्वत्व कायम राहतं तेच स्वराज्य.

## आत्मविश्वास

हे माझे मत आपल्याला चुकीचे वाटत असेल तर वाटू द्या. पण काल मी जी करीत होतो ती चूक नव्हे. तसेच यापुढे दहा वर्षांनी मी आज जे म्हणत आहे ते चूक नव्हे असं वाटल्यावाचून राहणार नाही, असा माझा आत्मविश्वास आहे.

आपल्यापाशी या भावी कालाचा विसार म्हणून मागत नाही, पण आपण मला साथ द्यावयाची नसली तरी नुसता विश्वास माझ्यावर ठेवा एवढेच मी आपल्यापाशी मागतो.

### हुतात्म्यांचा सत्कार

आजच्या या माझ्या स्वागतातील पहिला हार, ज्यांनी आपले देह या मातृभूमीच्या स्वातंत्र्यसंपादनाच्या कार्यात रणांगणी ठेवले त्या हुतात्म्यांच्या चरणी, अर्पण केला आहे असे मी समजतो त्या हारानें आपण त्या हुतात्म्यांचा सत्कार करीत आहा जे राष्ट्र हुतात्म्यांचा सत्कार करते त्याच राष्ट्रात हुतात्मे निर्माणही पण होतात दुसरा हार अद्यापिही जे बंदिवासात अडकलेले आहेत व जे कारागृहाच्या अत्यंत हीन प्रतीच्या हालअपेष्टा भोगीत आहेत त्यांच्या चरणी अर्पण आहे असे मी समजतो त्यांना स्मृतिसुमनांजलि दिल्याशिवाय माझे स्वागत स्वीकारणे हे मी अिष्ट समजत नाही. आणि त्यानंतर आपण जो हा माझा सत्कार केला हा माझा नसून ज्या स्वातंत्र्याकरिता मी काही थोडेबहुत मागे केले व यापुढेही करणार आहे, त्या स्वातंत्र्याचा गौरव समजून मी हा सत्कारस्वीकार केलेला आहे आपल्या या अुपकाराबद्दल, सौजन्याबद्दल, स्नेहार्द्रतेबद्दल व आपुलकीबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहे

* * *

## ५. हिंदुसभेचें राष्ट्रीयत्व

*अजमीर येथे दि २० मे १९३८ रोजी स्वा सावरकरांचे झालेले भाषण*

हिंदुमहासभा ही राष्ट्रीय आहे की जातीय आहे, याविषयी पुष्कळ लोकांचे मनात संदेह वसत असे. हिंदुमहासभेच्या अहमदाबाद येथील अधिवेशनात हिंदुमहासभेचे ध्येय 'संपूर्ण राजकीय स्वातंत्र्य' (*Absolute Political Independence*) आहे, असे स्पष्टपणे घोषित केले आहे

### भारतीय लोकसभा कशी राहील

हिंदुस्थानात जितके लोक राहत आहेत त्या सर्वांना समसमान अधिकार मिळावेत असे हिंदु महासभेचे म्हणणे आहे हिंदूंना जास्तीत जास्त अधिकार असावेत असे हिंदु महासभा कधीही म्हणत नाही आमची तर अशी अिच्छा आहे की, स्वराज्य प्राप्तीनंतर जे हिंदुस्थानी पार्लमेंट किंवा हिंदी लोकसभा बनेल, त्यात हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती, यहुदी किंवा हिंदुस्थानवर प्रेम करणारा कोणीही मनुष्य

असो, त्या सर्वांना यथायोग्य अधिकार मिळावेत हिंदी भाषेप्रमाणेच थितर भाषांचेही सरक्षण केले जाअील आणि आमचे भारतीय पालमेंट अशा स्वरूपाचे तयार होअील की, त्या पालमेटात पाय ठेवताच हिंदु, मुसलमान व पार्शी या भेदाचा मागमूसही राहणार नाही! सारेच्या सारे 'भारतीय' या नावाने सबोधिले जातील कांग्रेसने जर अशी प्रणाली रचली असती तर मी प्रथम कांग्रेसचा सभासद झालो असतो व नतर हिंदुमहासभेचा!! परतु कांग्रेस राष्ट्रीयत्वाचा देखावा मात्र करीत आहे

## निम्मे पोलिस मुसलमान का ?

स्वराज्यप्राप्तीनतर सर्वांना ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे नोकऱ्या दिल्या जातील सयुक्तप्रांतात मी पडित गोविंदवल्लभ पताची भेट घेतली, तव्हा त्यानी मला काही आकडे दाखविले त्यावरून मला असे दिसून आले की, काही खात्यात मुसलमानाची सख्या शे २१ तर काही खात्यात शे ३० होती परतु या सर्वात पोलिस खात्यातील आकडे माझ्या पक्क्या स्मरणात आहेत सयुक्त प्रातात मुसलमानाची वस्ती शे १४ च असूनही त्या प्रातातील पोलिस खात्यात शे ५१ लोक भरती झालेले आहेत आणि तरीही मुसलमान अधिक जागाची मागणी करीत आहेत हिंदु व मुसलमान हा भेदच नष्ट झाला पाहिजे अशी माझी अिच्छा आहे योग्यतेप्रमाणेच नोकरी मिळाली पाहिजे याच तत्त्वाचा पुरस्कार हिंदु महासभा हिरिरीने करीत आहे काग्रेसच्या तत्त्वज्ञानात हे बसत नाही

कराची येथील अधिवेशनात काग्रेसने अल्पमतवाल्याना सरक्षण देण्यासबधाचा अेक ठराव केला आहे ठराव अुत्तम आहे अल्पमतवाल्याना सरक्षण दिले पाहिजे असे आम्हीही म्हणतोच की! परतु काग्रेस बहुमतवाल्याच्या सरक्षणाकडे लक्ष देण्यास तयार नाही सीमा प्रांताचीच गोष्ट घ्या ना! त्या प्रातातील सरकारने असे अेक परिपत्रक प्रसिद्ध केले आहे का सीमाप्रांतातील प्राथमिक शाळातून हिंदी व गुरुमुखी या दोन भाषाची हकालपट्टी करून अुर्दू भाषा सक्तीने शिकविण्यात यावी!!' सीमाप्रांतातील अल्पसख्याक असलेल्या हिंदूना व शिखाना त्याच्या भाषेसाठी मुळीच सरक्षण मिळत नाही आणि अुलट आमचे मुलाबाळाना जबरदस्तीने अुर्दू शिकविली जाते

## कांग्रेसविषयी ममत्व

अेकीकडे पाहिले तर यू पी सी पी आणि बिहार यामध्ये मुसलमान अल्पसख्य आहेत परतु या प्रातात जेव्हा मुसलमान लोकाना आमच्या भाषेला सरक्षण मिळाले पाहिजे अशी मागणी केली तेव्हा तेथील काग्रेस सरकारानी अुर्दू भाषेला प्रोत्साहन दिले ही जातीयता काग्रेसची आहे आमची नाही!! अशा तऱ्हेने वेळा

अवेळी कांग्रेस हिंदूना दाबून टाकते व त्याच्या अधिकारांविषयी बेपर्वा वृत्ति दाखविते ! मग अशा परिस्थितीत हिंदूंच्या अधिकारांचे रक्षण करणारी अेखादी संस्था असणे अत्यवश्य आहे. ती संस्था म्हणजेच हिंदुमहासभा होय. हिंदु महासभा कांग्रेसला केव्हाही विरोध करीत नाही. नव्वद टक्के ती कांग्रेसला अुचलून धरते. कांग्रेस ही आमचीच आहे. तिचे व आमचें अेकच ध्येय आहे. परंतु कांग्रेस जेव्हा जेव्हा हिंदूचे अधिकार पायाखाली तुडविण्याचे अुद्योग करील, तेव्हा तेव्हा हिंदुमहासभा कांग्रेसला योग्य मार्गावर आणील, आणि जोपर्यंत कांग्रेस नीट रस्त्यावर येणार नाही, तोपर्यंत हिंदुमहासभा कांग्रेसला तीव्र व अप्रतिहत असा विरोध करीत राहील.

## शिखांचा लढा

शहीदगंज गुरुद्वारचाच प्रश्न घ्या. १६० वर्षे ते शीखांच्या ताब्यात आहे. कायदा असा आहे की कोणत्याही मनुष्याचे ताब्यात १२ वर्षेपर्यंत अेखादी अिस्टेट असली, तर ती त्याचे मालकीची होते. परंतु तरीही गुरुद्वार लुबाडण्यासाठी मुसलमानांनी हरप्रयत्न केले. हायकोर्टपर्यंत ते लढले, पण तेथेही शीखांचाच जय झाला. पण तरीही शहीदगंजचा झगडा मुसलमानांनी चालूच ठेवला आहे. शहीदगंजसाठी ते अितके झगडताहेत, परंतु ज्या हजारो मंदिरांच्या त्यांनी मशिदी बनवून त्यावर आपला ताबा बसविला आहे, तीं हिंदूचीं मंदिरें ते का परत देत नाहीत? तसें करायला ते मुळीच तयार नाहीत. कांग्रेस तर या बाबतींत जीभ अुचलायलाही तयार नाही. मग अशा वेळी शिखांना कोणी साहाय्यकारी नको का? तो साहाय्यकारी म्हणजेच हिंदुमहासभा ! !

हिंदुलोक बहुसंख्य आहेत. होय आहेत ! पण ते दुसऱ्या कोणाच्या बळावर किंवा मेहेरबानीवर आजवर टिकून राहिलेले नाहीत. हिंदुजाति ही हिंदूची वीरता व आत्मत्याग यावरच आजवर टिकून राहिली आहे. पण आमची 'बहुसंख्याकता' खिळखिळी करण्यासाठी काही कमी प्रयत्न झाले नाहीत. सन १८५७ च्या स्वातंत्र्य-युद्धात व तदनंतरही ते आपल्या सामर्थ्यावर ब्रिटिश सरकारपर्यंत टकरा देत राहिले. या झगड्यात अनंत हुतात्म्यांनी आपल्या सर्वस्वाचा होम केला आहे.

## हा शुद्ध अन्याय

आज आम्ही कायदेशीर अहिंसेचा मार्ग स्वीकारला आहे. कांग्रेसचा तर तो अेकमेव मार्ग आहे. परंतु आम्ही दुर्बल व शस्त्रहीन आहोत, म्हणूनच या मार्गाचा आम्ही आश्रय केला आहे. निःशस्त्र क्रांतीच्या मार्गाने कांग्रेसने फारच मोठी कामगिरी केली आहे. टिळक, गोखले, रानडे, म. गांधी, जवाहर, सुभाष यांच्या

त्यागामुळे स्वराज्य थोडे जवळ आले आहे सारांश काय की हिंदूनीच आपल्या रक्ताचे सिंचन काँग्रेसला केले आहे व म्हणूनच काँग्रेस अुच्च शिखरावर आली आहे काँग्रेस ही हिंदूचीच आहे आम्ही कधीही तिला विरोध करीत नाही आम्ही काँग्रेसला साहाय्यच करू ! परतु काँग्रेस जेव्हा अन्याय करील, फलाण्याच्या मागणीवरून आमचे हक्क त्याला देअू लागेल, तेव्हा आम्ही तिला विरोध करू काँग्रेस जेव्हा म्हणेल की आम्ही हे सारे राष्ट्रीय अैक्यासाठी करीत आहोत तेव्हा मी म्हणेन की हे सारे थूट आहे अेकाचा अधिकार छिनावून घेअून तो दुसऱ्याला बहाल करणे याला मी राष्ट्रीयता म्हणणार नाही. हा शुद्ध अन्याय आहे

## आमचा देश

दि ११ मे १९३८ ला मला मौ शौकतअल्ली भेटले होते ते म्हणाले 'हिंदुस्थान जर गेलाच तर आम्ही मुसल्मान आपापल्या देशात जाअू, परतु हिंदू कोठेच जाता येणार नाही ' मी म्हणतो, 'तुम्ही अुद्या जाणार असला तर आज जा जेथे तुम्हाला सुख मिळेल, तेथ जायला विलब का करता ? आम्हाला तर त्यात आनद आहे परतु हिंदु लोक हिंदुस्थान सोडून कोठेच जाअू शकत नाहीत हिंदुस्थान आमची मातृभूमि, पितृभूमि व पुण्यभूमि आहे आम्ही तर हिंदुस्थानसाठी आजवर प्राण देत आलो आहोत व यापुढेही देअू '

जर हिंदूना पायाखाली तुडविले नसते व त्याचे हक्क छिनावून घेतले नसते तर आज मुसल्मानी मत्रिमडळाचा बगालमध्ये बोल्बाला झाला नसता हिंदू सरकार त्या ठिकाणी आले असते काग्रेसने अिकडे लक्ष दिले नाही हिंदूचे हक्क अेकसारखे हिरावले गेले अशा वेळी मुसलमानाची जशी मुस्लिम लीग, तशी हिंदूचीही अेक सस्था असणे अवश्य झाले

कोणताही देश पहा त्या देशात जे लोक बहुसख्य असतात त्याचेच त्या देशात राज्य असते अिंग्लड व जर्मनी ही याची अुदाहरणे होत तद्वतच आमच्या हिंदुस्थानात हिंदूचेच राज्य असणे अवश्य आहे

\+ + +

## ६ जातिनिष्ठा व राष्ट्रनिष्ठा

**कराची येथे ता ४ सप्टेंबर १९३८ रोजी अमील इन्स्टिट्यूशनमध्ये स्वा सावरकराचे पुढील आशयाचे भाषण झाले**

जातिनिष्ठा व राष्ट्रनिष्ठा यामध्ये खरं पाहिले असता महत्त्वाचा व मूलभूत असा भेद नाहीच राष्ट्रीयत्व म्हणजे तरी त्याचा अर्थ जगातील अितर देशापासून

आपले राष्ट्र अलग मानणे असाच होत नाही काय ? जातीयत्व हें त्याहून अेक पायरी अलीकडचे आहे—अेका जातीचे हिताहित पाहण्याची ती वृत्ति आहे. राष्ट्रीयत्वावरही टीका करणारे विचारी लोक थोडेथोडके नाहीत. 'राष्ट्रीयत्व हा मानवजातीचा अेक खड्डा आहे' असे टॉलस्टॉयने म्हटले आहे मनुष्याचे अंतिम ध्येय हेच की, सर्व विश्व हें अेक कुटुंब आहे नि आपण त्याचे घटक आहो—त्यात राष्ट्राला नि देशाला स्थान कोठले ? पण हे ध्येय जोवर हस्तगत झाले नाही तोवर आपला देश, आपले राष्ट्र, आपली संस्कृति या दृष्टीने विचार करणे अपरिहार्यच आहे.

राष्ट्रीयत्व म्हणजे तरी काय ? अेक परंपरा, अेक संस्कृति, अेक भाषा, अेक रूढि याचेच नाव राष्ट्रीयत्व. त्यामुळेच आपल्याला राष्ट्र प्रिय वाटते असे जर आहे तर हिंदुत्वावरील प्रेम पाहताच राष्ट्रीय म्हणविणाऱ्या लोकांच्या अंगावर काटा का अुभा राहतो ? राष्ट्रनिष्ठा जितकी समर्थनीय तितकीच हिंदुत्वनिष्ठाही समर्थनीय खास आहे ! हिंदूचा केवळ अेक वंश आहे, अेवढेच नव्हे तर त्याचे अेक स्वतंत्र राष्ट्रही पण आहे

## फरक प्रमाणाचा; प्रकाराचा नव्हे

राष्ट्रनिष्ठेचे महत्त्व मी अणुमात्र कमी करू अिच्छीत नाही जातिनिष्ठेच्या पुढे अेक पाअूल ती आहे हे मी मान्य करतोच. पण माझे म्हणणे असे की, दोन्ही-मधील फरक केवळ प्रमाणाचा आहे, प्रकाराचा नव्हे हिंदुसभेचे ध्येय पूर्ण राष्ट्रीय आहे, राष्ट्रीय सभेचे जितके आहे तितके ! किंबहुना, अेका बाबतीत तर हिंदु सभा हीच राष्ट्रसभेहून अधिक राष्ट्रीय आहे मुसलमानाना वश करण्याच्या नादी लागून त्या थोर संस्थेने मुसलमानाना पक्षपाती असे धोरण आखले आहे. हिंदुसभा ही अल्पसंख्याकाना धार्मिक, सांस्कृतिक आणि भाषिक असे स्वातंत्र्य देअून राजकारणात सर्वांना समानतेने वागवावे असे म्हणते दोन्ही संस्थांचे ध्येय संपूर्ण स्वातंत्र्य हेच आहे. मात्र राष्ट्रसभेने 'अनत्याचारी व शांततापूर्ण' साधनाचे व्रत घेतले आहे. हिंदु सभेलाही ती साधने मान्य आहेत, पण केवळ आज आपल्या दौर्बल्यामुळे त्यांची जरुरी आहे असे ती मानते आपल्या वैगुण्यालाच ती भूषण मानीत नाही आणि दुसरे साधन पेलण्याला आपण असमर्थ आहो अशी भलती कबुलीही पण ती देत नाही. तसेच अल्पसंख्याकाना भरमसाट हक्क अन्यायाने देता देता बहुसंख्य असणाऱ्या हिंदु समाजाच्या न्याय्य हक्कावर दुर्लक्ष होअू नये अशी तिची मागणी आहे हिंदुस्थानात अल्पसंख्याकांच्या प्रश्नाचा अुगाच बागुलबुवा करण्यात आला आहे युरोपात कोणत्याही देशात शेकडा दहा टक्केपेक्षा कमी लोकसंख्या असलेल्या समाजाला अल्पसंख्य मानले जात नाही व विशेष हक्कही दिले जात नाहीत. त्यांनी जमेल तसे राहावे. जर्मनी

अिटली, पोलंड वगैरे युरोपियन राष्ट्रांनी अल्पसंख्याकांचा प्रश्न कमा
आपण पहा.

हिंदुस्थानची परिस्थिति अशी विचित्र आहे की, येथील राजकारण निष्ठेवरच चालणे शक्य आहे अगदी कट्टर कांग्रेसवाला घेतला तरी निवडून यावे लागते जातिनिष्ठ मतदार-संघातूनच. ही अत्यंत शोचनीय आहे हे खरे, पण ती तशी आहे तोवर आपण तिला तोंड दिले पाहिजे, तितकेच खरे अितर समाज 'अेक राष्ट्र' या दृष्टीने वागण्यास तयार तर हिंदुमहासभा तसे करण्यास अेका पायावर तयार आहे. पण अितर तशी तयारी मुळीच नाही मुस्लिम लीग सवत्या मतदार संघासाठी आक्रोश आहे आणि म्हणूनच आपल्याला स्वतःच्या समाजाचा विचार स्वतनपणे प्राप्त झाले आहे.

\+ \+ \+

## ७. हिंदुत्वाचा अभिमान

अहमदाबाद येथील महाराष्ट्र समाजामध्ये दि. १–१–३८ या दिवशी स्वा सावरकर यांचा सत्कार झाला. त्याप्रसंगी त्यांनी केलेले भाषण.

### महाराष्ट्रात जन्माला घाल

आपण माझ्यावर प्रेम करणारे आहात म्हणून आपले प्रश्न हे म अपमानार्ह वाटणार नाहीत मी संकुचित प्रांताभिमान दाखवितो असा आपला सम आहे आणि देशाभिमानाच्या आड न येणारा प्रांताभिमान दाखविण्यात मल मुळीच कमीपणा वाटत नाही आपण स्थापन केलेला महाराष्ट्रसमाज व अि ठिकाणी सर्व हिंदुस्थानात असलेल्या महाराष्ट्रियांच्या वसाहती हे मराठ्य चालते-बोलते अितिहास आहेत. १८४८ साली मराठ्यांचे राज्य गेले आणि अवघ्य ९ वर्षांत ५७ सालचे स्वातंत्र्य-युद्ध मराठ्यांनी सुरू केले; त्या युद्धाल तत्कालीन कारणे निराळी असली तरी ते अुत्पन्न करणारे व चालविणारे मराठे होते. त्या युद्धात लढून ज्या स्त्रीने अिंग्रजांनासुद्धा खडे चारले ती बाअी महा राष्ट्रातीलच होती. त्याच्यानंतर महाराष्ट्रात स्वातंत्र्ययुद्धाचा झेंडा फडकविणा फडके, चाफेकर बंधु, लोकमान्य टिळक, महाराष्ट्रीय, अगदी आजपर्यंत ज्य लोकांनी स्वातंत्र्यसंगराची परंपरा कायम ठेविली असे अनेक वीर ज्या प्रांता जन्मास आले त्या प्रांताचा अभिमान मी का धरू नये? मला ब्रह्मदेवाने सव हिंदुस्थानची माहिती सांगून यातील कोणत्या भागात तुला जन्माला घालू असे

विचारले असते तर निरभिमान वृत्तीने मी महाराष्ट्राकडेच बोट दाखविले असते, मात्र हा प्रांताभिमान अितर प्रांताची अवहेलना करण्यास प्रवृत्त होणार नाही अगर अितरावर अन्याय करण्यास धजावणार नाही याची प्रत्येकाने काळजी घेतली पाहिजे

## वीराचे लक्षण कोणते ?

आपल्या दुसऱ्या प्रश्नाचेही अुत्तर वरील अुत्तरात आहेच हिंदुत्वाचा योग्य अभिमान न धरणे व राष्ट्रीयत्वाच्या पोकळ नावाखाली त्याविरुद्ध विचार मांडणे हे मला केव्हाही सहन होणार नाही आज जो अुठतो तो हिंदु समाजाला अन्याय करीत सुटतो अुलट हिंदु-समाजाने कोणालाही अन्याय केलेला नाही पं दादाभाअी नवरोजी पार्शी असूनसुद्धा त्याना राजकारणात अग्रस्थान होते, कारण ते कट्टे राष्ट्रीय होते हिंदु समाज समर्थ असतासुद्धा त्याच्या आश्रयास आलेल्या पार्शी समाजाला त्याने मानाने राह दिले अुलट मुसलमान समाज अशा अुदारतेने कधीही वागला नाही वायव्य प्रांताच्या असहाय हिंदु मुलींवर होत असलेले अत्याचार पहा ! अगदी आपली मुलगी अगर बहीण पळविली गेली आहे व तिच्यावर जुलूम होत आहे असे चित्र डोळ्यापुढे अुभे करा आणि मग या अत्याचाराविरुद्ध न बोलणाऱ्याच्या किंवा या कृत्याना मूक संमति देणाऱ्याच्या मालिकेत मी बसावे असे तुम्हाला वाटत असेल तर ते वीराचे लक्षण नव्हे नुसते होयबा करुन येणारे मोठेपण मला नको

## टिळक व गोखले

मी अमेरिकेत गेलो असतो व तेथेच कायमचा राहिलो असतो तर कदाचित् तेथील अध्यक्ष झालो असतो, म्हणून मी तथे जाणे हें काही वीराचे लक्षण नाही. त्याचप्रमाणे माझी प्रामाणिक मतें बाजूला ठेवून केवळ राष्ट्रीय सभेत अेखादी मानाची जागा मिळविण्याकरिता मी जर तिच्या सूत्रचालकापुढे मान तुकवीत राहिलो तर ते वीराचे लक्षण लक्षण नव्हे हें ठरावयाचे असत तर पूर्वीच लोकमान्याकडे न जाता मी आदराओत गोखल्याकडे गेलो असतो माझे विचार लोकमान्यानाही दिवसा कधीच पटले नाहीत फक्त रात्री १२ वाजताच ते माझ्याशी सहमत असत तरीही 'तूर्त हे नको' असाच त्याचा आदेश असे केवळ मानाकरिता त्याच्या 'दारवा' सपविण्यात व आता 'मजूर' खलास करण्यात शूरत्व नाही असे मला वाटते. शिवाय आपली प्रामाणिक मतें बोलून आपला 'नरिमन' व्हावा असे मला वाटत नाही आणि तुम्ही म्हणता तो मान तरी कसला ? गुलामाच्या राष्ट्रातील राष्ट्रीय सभेचा अध्यक्ष म्हणजे शेणाच्या ढिगात अेकावर अेक किड्याचे थर असतात त्यातील अगदी वरच्या थरातील वरचा किडा झाला तरी तो

शेणकिडाच ना ? प्रत्यक्ष संग्राम सुरू होईल त्या वेळी मी मागे राहणार नाही याची तुम्हाला खात्री असली म्हणजे मग आज राष्ट्रीय सभेशी आमचा मतभेद असला तरी काय हरकत आहे ?

माझ्या मताप्रमाणे सर्व व्यक्तींना समान अधिकार हे खरे राष्ट्रीय गमक आहे हिंदु महासभा ही हिंदूंना जास्त अधिकार मागणारी नाही अतओव तीच संपूर्ण राष्ट्रीय आहे आणि तू ख्रिस्ती म्हणून तुला अमुक जास्त, तू मुसलमान अतओव तुला ते अधिक असे म्हणणाऱ्या राष्ट्रीय सभेपेक्षा अधिक योग्यतेची आहे ज्या क्षणी राष्ट्रीय सभा खरोखर राष्ट्रीय होईल त्या वेळी मी तिचाच आहे असे समजा !

\+ + +

## ८. हिंदूचे संघटन

**पुणें येथें ता २६–६–१९३७ रोजी श्रीशिवाजी आखाड्याच्या मैदानात स्वा सावरकरांचे ' हिंदु संघटन ' या विषयावर झालेले भाषण**

आज आपण अितक्या मोठ्या संख्यने येथे जमला आहात असे मला निरोपा-वर निरोप येत गेले, म्हणून मी खरोखर आजारी असताही अगत्याने येथे आलो मनुष्याला चांगल्या किंवा वाओीट दोन्ही स्थितीत सतत असमाधानच वाटत असतें पूर्वी अंदमानच्या तुरुंगात क्षणभर तरी कोणी दोन शब्द बोलायला मिळेल का म्हणून असमाधान वाटे आज उलट अितके हजारो लोक बोलायला मिळत असूनही जाता येणार नाही म्हणून असमाधान वाटत होते पण पुढ़चा माझा काय होओील हे माझेच मला निश्चित सांगता येत नसल्याने आज तरी तुम्हा सर्वांना अेकदा पाहून घ्यावे, महाराष्ट्र कसा आहे ते निरखावे, म्हणून मी येथे आलो आजचा हा प्रचंड समुदाय येथे अेका हिंदुत्वाच्या अभिमानानेच अेकत्र झाला आहे याचे कारण त्या शब्दात अद्यापहि काही मंत्रामारले सामर्थ्य आहे हेच होय हिंदु समाज चैतन्ययुक्त आहे की नाही ते प्रत्यक्षच पाहा आज कुठे आहेत ते पक्षविपर्या? ते आज येथे प्रकट झालेले नाहीत यावरूनच हिंदुत्वाच्या अेकाच धाग्यात मणिमणि ओवलेला आहे हे स्पष्ट होय !!

### हिंदुत्व म्हणजे काय ?

मी आज फक्त दोनतीन विषयें तुम्हाला थोडक्यात समजावून सांगणार आहे हिंदुत्व म्हणजे काय ? जन्मावरून जातिभेद मानू नये असे म्हणणारे

लोकदेखील हिंदु-संघटन करा असे कमे म्हणतात ? भावडेपणा सोडा, जन्मजात अुच्चनीचपणा अुच्छिन्न करा, धर्माची सवती काढा असे मी म्हणतो तरी हिंदुसंघटन करा म्हणतो याचा अर्थ काय ? याचा अर्थ हिंदुत्व हे हिंदुधर्मापासून वेगळे नसले तरी त्याहून जास्त व्यापक आहे. अीश्वर, जीव आणि जगत् हे पारमार्थिक धर्माचे तत्त्वज्ञान, प्रत्यक्ष परिस्थितीशी त्याचा संबंध नाही. पुष्कळजण असे म्हणतात की, हिंदूचे अेक धर्मपुस्तक असेल तर बरे, पण त्यानेही निभाव लागत नाही. कारण अेकच कुराण असले तरी त्याच्या शब्दागणीक निरनिराळे अर्थ करणारे भाष्यकार होअून मुसलमानातही हाडवैऱ्यासारखे निराळे तट किंवा पंथ निर्माण झालेलेच आहेत. हिंदुधर्माबद्दल बोलावयाचे तर त्याला कोणत्याही अेका ग्रंथाचे अगर पुस्तकाचे नाव घेता यावयाचे नाही. कारण शंकराचार्यांनी अद्वैत प्रतिपादिले ! रामानुजानी द्वैत सांगितले. माध्व, बुद्ध यांनी तिसरे काही सांगितले. हा प्रकार पाहिला म्हणजे धर्मपुस्तक अेक नसण्यातच हिंदुधर्माचे वैशिष्ट्य आहे हे दिसून येअील. शिवाय अेकच पुस्तक असण्याने शास्त्रीय संशोधनाचे दृष्टीने प्रगति खुंटेल म्हणून सर्व विश्व या बाजूपासून त्या बाजूपर्यंत हेच या धर्माचे पुस्तक होय. ते तत्त्वज्ञान मानणे किंवा न मानणे हा व्यक्तीचा स्वतंत्र प्रश्न आहे.

## हिंदुत्वाची कसोटी

पारलौकिक अर्थी धर्माचा प्रश्न ज्याच्या त्याच्या अनुभूतीवर किंवा श्रद्धेवर सोडल्यानंतर मनुष्याच्या आयुष्याचा दुसरा जो भाग प्रात्यक्षिक, त्याच्याकडे पाहिले असता मग मात्र तेथे अेकवाक्यता होण्यास अडचण राहत नाही. हिंदु-संघटनास किंवा हिंदुत्वाच्या अेकीकरणास ज्या ठळक चारपाच गोष्टींच्या कसोट्या लावावयाच्या त्या अशा. पहिली भौगोलिक स्थान, दुसरी अेक भाषा, तिसरी अेक अितिहास, चौथी समान साहित्य, पाचवी समान संस्कृति. हिंदुस्थानच्या मर्यादा निसर्गाने स्पष्ट सीमांनी आखल्या आहेत. सिंधुनदापासून पूर्वेच्या सिंधूपर्यंत व काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत हा अेक देश आहे. अनादि काळापासून या देशाची ही मर्यादा निश्चित आहे. संस्कृतीच्या अेकीकरणाचा दुसरा घटक म्हणजे अेक भाषा. आमच्या हिंदुस्थानमध्ये साऱ्या भाषा संस्कृतोत्पन्न किंवा संस्कृतनिष्ठ असलेल्या आढळतील. काही वेळेला अेक भाषा व अेक देश नसताही अेक राष्ट्र होअू शकेल. पॅनअिस्लामिझम् हा त्यातलाच अेक प्रकार. ज्यू लोकांना तर देशच नाही. वाळूची मूठ घेअून फेकावी त्याप्रमाणे ज्यू लोक जगाचे पाठीवर विखुरलेले आहेत. पण ते सर्व अेका धर्माने बांधले गेले आहेत, म्हणून अेक धर्म असणे हा राष्ट्रीयत्वाचा तिसरा महत्त्वाचा घटक आहे. हिंदुलोकांना धर्मग्रंथाचे बंधन आहेच. पण ज्यांना ते नको असेल त्यांना त्याची आवश्यकताही नाही.

अेक अितिहास असणे हा चौथा घटक. अिंग्लंडला फार फार तर एक

हजार वर्षांचा अितिहास असेल, तर हिंदुस्थानाला कमीत कमी दहा हजार वर्षांचा अितिहास सांगता येअील हिंदुस्थानचा अितिहास अितका पुरातन आहे की, तो पुराणात लुप्त होअून गेला आहे अलीकडेच कानामागून येअून तिखट झालेले अमेरिकन राष्ट्र—त्याला २०० वर्षेच फक्त निर्माण होअून झाली, पण तसाहि आपला बडेजाव गाताना प्रौढीने म्हणते की, या राष्ट्राच्या मागे २०० वर्षांच्या परंपरेचा अितिहास आहे व पुढे निदान २०० वर्षांचा तरी भविष्यकाळ आहे! पण आमच्या २० हजार वर्षांच्या अितिहासाच्या मानाने त्यांची २०० वर्षे म्हणजे क पदार्थ आहे समान शत्रुत्व हा अेकराष्ट्रीयत्वाचा पाचवा घटक. प्रथम रावण, नंतर हूण, नंतर ग्रीक नंतर शक, नंतर मुसलमान हे आपणा सर्वांचे समान शत्रु होते आजही आपणा सर्वांचा शत्रु अेकच आहे अेका प्रांताचा जो शत्रु तोच दुसऱ्या प्रांताचा

बीज अेकच असल्यामुळे आपण अेका जातीनेही अेकत्र बांधले गेलो आहोत काही झाले तरी समाजाच्या तुकड्या वेगवेगळ्या असल्या तरी सर्व हिंदुमात्रांचे रक्त मुळात अेकाच जातीचे आहे वैदिक समाज प्रथम अेकाच वर्णाचा होता मागाहून त्याचेच चार वर्ण झाले पुढे अनुलोमप्रतिलोमाने जाती वाढत गेल्या मनूची स्मृति खरी असेल तर चांडाळ हे ब्राह्मणाचे मावसभाअूच होतात! तात्पर्य हेच की, निर्मळ चार वर्ण मानले आणि त्यापासून अनंत जाति अुपजाति निर्माण झाल्या तरी मूळ जातिबीज अेकच

आमचे साहित्यही अेकच आहे मद्रासमधील आयगार असो वा काश्मीरातील पंडित असो, तो अेकाच संस्कृतातून धर्मग्रंथ वाचील महाभारत, रामायण हे ग्रंथ सर्वांस समान आहेत विजेचा प्रवाह सुरू झाल्याबरोबर जसे सारे कण अेकत्र होतात, त्याप्रमाणे राम कृष्णाच्या नुसत्या नामोच्चाराने सर्व हिंदुस्थान अेकत्र होअू शकतो

वळतील. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याकरिता कोणी झटेल तर तो हिंदु. अंदमानात ठेले सर्व हिंदुच होते. फासावर ज्यांना टांगलें ते हिंदुच होते. हिंदु हाच या ाचा पाया आहे. तो संघटित झाला तरच देशाला स्वातंत्र्य मिळेल.

\+ + +

## ९. हिंदूंची अेकजूट करा

सोलापूर येथे दि. ९-८-१९३७ रोजी स्वा. सावरकर यांचें झालेलें भाषण. 

जेव्हा आम्ही पूर्वीचें काम केलें तेव्हा आमची अपेक्षा नव्हती की, आम्ही अशा सत्कारस्वीकारास हजर राहू शकू. परंतु ज्यांनी आजपर्यंत देशाच्या स्वातंत्र्या॰ करिता स्वार्थत्याग केला त्याच्या पुण्याओीने हे दिवस आले आहेत. याकरिता मी आजच्या प्रसंगी त्या सर्वांचे आभार मानतो. आज संपूर्ण स्वातंत्र्याचा अुच्चार करण्याचा काळ आला आहे. आपल्या राष्ट्राची फार प्रगति झाली आहे.

त्या वेळी ' संपूर्ण स्वातंत्र्य ' हे रात्री सांगावें लागत होतें. आज तें आपण अुघड रीतीने बोलू शकतो. राष्ट्रीय सभेचें संपूर्ण स्वातंत्र्य हें ध्येय पाहून मला आनंद वाटतो. स्वातंत्र्य मागणें हें पुण्य आहे, पाप नव्हे असें वाटू लागलें आहे. हा सन्मान माझा अेकट्याचा नाही. या सोलापुरात लष्करी कायद्याच्या अमदानीत जे वीर पडले त्यांची व आज अंदमानातील अडीचशे कैद्यांनी जो अन्नत्याग आरंभिला आहे. त्यांची आपण आठवण ठेविली पाहिजे. पं. जवाहरलाल यांनी या कैद्यांकरिता जो अेक दिवस पाळण्याकरिता घोषणा केली आहे, त्यावद्दल मला तर अत्यंत आनंद होत आहे. स्वातंत्र्याच्या चळवळीत कोणताही पक्ष झाला तरी आपण त्यांचाला खादा लावून कार्य केलें पाहिजे. आपण जो माझा सत्कार केला तो माझीं सर्व मतें सर्वांना मान्य आहेत म्हणून केलेला नाही. मनुष्य मतें बदलीत असतो व काही काही वेळी तीं बदलणें अत्यंत आवश्यकही असतें. पटेल त्यांनी माझे विचार घ्यावेत, नाहीतर सोडून द्यावेत.

मी सांगतो तेंच बरोबर असें माझें म्हणणें नाही. मी आपल्यापुढे दोन मुद्दे ठेवणार आहे. आजच झालेल्या चर्चेच्या वेळी मजपुढे पन्नास प्रश्न आले होते. त्या सर्वच प्रश्नांची उत्तरें द्यावयास बसलो तर वेळ पुरणार नाही. सूत्ररूपाने मी दोन चार गोष्टी सांगणार आहे. संपूर्ण राजकीय स्वातंत्र्य हें आमचें ध्येय आहे. आज आपण त्या मार्गाने प्रगति केलेली आहे. आज विधिमंडळात आपले प्रधानमंडळ

झालेले आहे मी आपले प्रधानमडळ हे खऱ्या अर्थानेच म्हणतो, कारण स्वतंत्र देशात प्रधानमडळ हे राष्ट्राचे असते. आपण फार पुढे गेलो आहोत. आज राष्ट्रगीतास पोलिसाकडून मान दिला जात आहे ही नि सशय प्रगति झालेली आहे. परतु जरी आपण प्रधान झालो असलो तरी अद्याप आपण राजे झालो नाही. प्रधानमडळातून स्वतं राज्य चालवीत असतानाच पुढे आपण खरे राज्यकर्ते होअू. त्याकरिता जे लढे होतील, त्याच्याशी काम करण्यास मी तयार आहे म गाधींच्या विधायक कार्यक्रमाशी माझा पटत त्याचा ग्रामोद्योग, अस्पृश्योद्धार या गोष्टी कराव्यात व त्याच्याशी माझा सहकार आहे हिंदूना सघटित करून त्याच्यात स्वातत्र्याची ज्योत कायम राखणे हे माझे दुसरे सूत्र आहे. हिंदुस्थान ही आमची पुण्यभूमि व पितृभूमि आहे, असे ज्याना वाटेल ते हिंदु – मग ते कोणीही असोत. काश्मीरच्या महाराजापासून रामेश्वरच्या महारापर्यंत सर्व अेक आहेत ही कल्पना ठेविली पाहिजे माझे मुसलमान बधु, पार्शी बधु याचेही देश स्वतत्र करण्याचे कर्तव्य आहे परतु देश स्वतत्र झाला नाही तर अितर धर्मांच्या लोकाना पुण्यभूमि म्हणून दुसरीकडे पाहता येते.

मुसलमानाची पुण्यभू अरबस्थानात आहे मुसलमान फार तर पितृभू म्हणून हिंदुस्थान मानतील, पण पुण्यभू म्हणून ते अरबस्थानाकडेच पाहतील हा त्याचा दोष नाही. ख्रिश्चन लोकाचीही पण तीच स्थिति आहे त्याची पुण्यभू सिरियात आहे. अेकदा चीन देशात पाच ख्रिश्चन लोकाना मारल्याबद्दल अेकवीस युरोपियन राष्ट्रानी निर्वाणीचे खलिते धाडले प्रत्यक्ष केमालपाशानी खिलाफतीची खिरापत केली, धार्मिक बड नाहीसे केले, परतु त्याच केमालपाशानी अिस्लामसाठी लढाअी करावी लागेल असे मुक्तेच अुद्गार काढले आहेत, परतु त्याना कोणी जातिनिष्ठ म्हणत नाहीत हिंदुस्थान ही हिंदूची पितृभूमि व पुण्यभूमि आहे ही भावना जागृत ठेवा, हिंदूनी हिंदु म्हणवून घेणे हे पाप नाही. मुसलमान, ख्रिश्चन याच्यामागे स्वतत्र देश आहेत म्हणून देशस्वातत्र्याची भावना हिंदूनीच जास्त ठेविली पाहिजे अेकी करा, असे म्हणण्यास दुसऱ्याकडे जाअू नका अेकीकरता अितरानी आपल्या मागे लागले पाहिजे अशी तयारी ठेवा स्वराज्य अेकीशिवाय मिळणार नाही, असे वाद अैकू येतात, तसे वाटू देअू नका लो टिळकानी काय दुसऱ्याकरिता थोडे दिले ? दासबाबूनी काय थोड्या सवलती दिल्या ? म. गाधींनी तर ' कोरा चेक ' दिला ! परतु पेढीवर पत नसल्यामुळे गाधींचा चेक वटला नाही आम्हाला अेकी पाहिजे ती अुपकारासाठी नको तर तिची अितराना जरुरी वाटली पाहिजे. मुसलमान व पार्शी या समाजाकडे मी निराळ्या दृष्टीने पाहतो तुम्ही कधी पार्शी-हिंदु असा दगा अैकला आहे काय ? पण हिंदु–मुसलमान दगा नेहमीचाच प्रकार आहे हिंदी राष्ट्रीय स्वातत्र्याकरिता पार्शी लोकानी फार मोठा स्वार्थत्याग केलेला आहे. प. वा दादाभाअी नौरोजी, वाच्छा, फेरोजशहा मेथा यानी राष्ट्रकार्याकरिता

देह समर्पण केले व आजचे ताजे अुदाहरण वीर नरिमन याचे आहे मोन्यामारुति प्रकरणात अितर कोणत्याही गोष्टीचा विचार न करता सार्वजनिक हक्कसंरक्षणा-निमित्त नरिमन यांनी स्वतंत्र पत्रक काढिले

आम्ही जर्मनीमध्ये असताना राष्ट्रीय निशाण कोणते असा प्रश्न विचारण्यात आला त्या वेळी आम्ही दहा जणांनी अेके ठिकाणी जमून राष्ट्रीय निशाण कोणते असावे याचा विचार केला मिस कामा यांनी तीनरंगी फडक्याचं निशाण दाखविले त्या वेळी जर्मन राष्ट्राने त्याला सलामी दिली पार्शी समाजात हिंदी स्वातंत्र्यवादी लोक निघाले आजपर्यंतच्या राष्ट्रीय सभेच्या अितिहासात सर्व मुख्य पुढारी हिंदुच आहेत मुसलमान म्हणून स्वतंत्र हक्क कोणी देशू शकणार नाही अल्पसंख्याक म्हणून त्यांना योग्य ते हक्क मिळतील व त्याप्रमाणे अितर स्वतंत्र राष्ट्रात व्यवस्थाही केलेली आहे मी राष्ट्रीय सभेत या नाही, तर मला वाटते की मध्या मी राष्ट्रीय सभेपेक्षा जास्त राष्ट्रीय आहे

मुस्लिम लीग आहे तोपर्यंत हिंदूंची संघटना राहणारच, कॉंग्रेस ही राष्ट्रीय सभाच राहावी अशी माझी अिच्छा आहे तिला हिंदुसभा करावयाचे नाही मुसल-मानांना अल्पसंख्याकांचे योग्य ते हक्क द्यावेत, त्याला कोणीच विरोध करणार नाही योग्य माणसाची निवड करावयाची तर त्याला अमुकच मनुष्य पाहिजे असं नाही जातीचा प्रश्न अुद्भवता कामा नये आजचे ना मुनशी, ना खेर व अस-फलीचे स्पीकर ही चांगली माणसे आहेत त्यांच्या अंवजी जातिविषयक तत्त्वाने जर कोणी असे म्हटले की, अमक्या जागी अमक्या जातीचा नेमा तर त कोण अैकून घेअील ?

+ + +

## १० हिंदु धर्म व हिंदु संस्कृति

पुणे येथे दि २-८-३७ रोजी टिळक स्मारक-मंदिरात स्वा सावरकर यांचे झालेले भाषण

माझी सर्व मते मान्य असलेल्या विद्यार्थ्यांनो, माझा आपण सत्कार केला त्याबद्दल मी आपला आभारी आहे याच कारण असं की, हिंदु संघटनेला अनुकूल असलेले अितके विद्यार्थी पुण्यात असावेत याबद्दल मला आनंद झाला

### हिंदु हिताची दृष्टि

आपल्या राष्ट्राचा पाया असलेल्या हिंदुत्वाच्या दृष्टीने मी राजकारणाकडे पाहू अिच्छितो त्या दृष्टीने अुपयुक्त तेच माझे समाजकारण, राजकारण वगैरे

सर्व काही आहे वेदकालापासून ग्रीक, बर्बर, मुसलमान, हूण याची सकटे आपल्यावर आली, पण आत्मप्रतीति ठेवून हिंदूनी परशत्रूचा नि पात केला. गेल्या २५ वर्षात हिंदुत्वावर अेक नवीन सकट येअू पाहत आहे पूर्वी परधर्मीय लोकापासून त्रास झाला, परतु आता स्वधर्मीयाचा विरोध होत आहे परमानदाचे आजोबा मतिलाल याचे डोके करवतीने कापले होते. डोळे काढणे — फोडणे, शिर अुडवणे अशा प्रकारचे हाल व हत्या पूर्वी धर्मवर्चस्वाने होत असत, पण ते सर्व साहून हिंदूनी सस्कृतीचे व स्वातत्र्याचे रक्षण केले

## आज घरचे वासेही अुलटले

हिंदु धर्मावरील गेल्या दहा वर्षांतील सकट पूर्वीपेक्षा विशेष बिकट आहे. परधर्मीय लोकच हिंदुत्वावर अुलटले नसून हिंदुही स्वधर्मावर अुलटले आहेत व तो नामशेष करण्याचा प्रयत्न चालू आहे यायप्रकारे घरचे वासे घरावर अुलटले आहेत. पूर्वी मुसलमानाच्या राजवटीत ते शत्रूला अेकच प्रश्न करीत की, 'तू हिंदु की अहिंदु ?' मुसलमान धर्म स्वीकारल्याबरोबर त्याला सर्व गोष्टीची माफी मिळत असे. हिंदु या दोन शब्दावर प्राणाचे मोल अवलबून असे. ' मी हिंदु नाही, मी अहिंदु आहे ' असे म्हटल्याबरोबर सर्व सपत्ति व अैश्वर्य त्याच्या चरणापाशी लोटांगण घालीत असे पण असे असूनही या दोन अक्षराकरता लक्षावधि लोकानी, दुर्वासापासून तो बाबा बदीपर्यंत सर्वांनी प्राणदड सहन केला. हल्लीच्या कालात दयार्द्र बुद्धीने फाशी जाणाराला क्लेश न व्हावे म्हणून विजेच्या धक्क्याने फाशी दिली जाते, पण पूर्वीच्या राजवटीत तसे नव्हते मला पहिल्या शिक्षेत जन्मठेप झाली होती व दुसरा फाशीच्या शिक्षेचा खटला माझ्यावर भरला होता. फाशी कशी देत असतील या सर्व गोष्टीचा अनुभव आम्ही जन्मठेपेची शिक्षा भोगताना घेतला होता. आमच्या मनाला समाधान हे वाटे की, फाशीत त्रास होणार नाही, कारण फासावर डोके ठेवले की झाले

## हिंदु ! हिंदु !! हिंदु !!!

पण विवेकानदाचे आजोबा तेजबहादूर याचे अुदाहरण पाहा त्याना त्याच्या शिष्यासह पकडून आणले होते व प्रत्येकाला विचारीत की, 'तू हिंदु धर्माचा प्रचार केलास काय ?' 'होय' म्हटले की शिक्षा करीत पण अहिंदु म्हटले की, चदनाची अुटी डोक्यावर घालीत व त्याला सरदार बनवीत पण चमत्कार असा की तेजबहादुराच्या सर्व शिष्यानी ' मी हिंदु ' असे अुत्तर दिले व त्या प्रत्येकाचा शेवटचा शब्द ' हिंदु ' हा असे शेवटी त्यानी गुरूना विचारले की, तुमचे अुत्तर काय ? ते म्हणाले की, ' अरे ! भ्याडातल्या भ्याड शिष्यानेही हिंदु म्हणून अुत्तर दिले, तेथे मी दुसरे अुत्तर देअीन असे तुला वाटते काय ?' मुलगा मरत असताना बाबा बदाने

शब्द उच्चारला नाही व हिंदुत्व सोडले नाही ते मेले असे समजून त्याचे प्रेत गावा-बाहेर फेकून देण्यात आले. पुढे त्या रस्त्याने नाग-गोसावी जात असताना त्याना बाबा वदाच्या फलेवरात थोडी धुगधुगी आहे अस वाटले व त्यानी त्याना जिवंत केले, पुढे त्याचे लग्न होऊन त्याना मुले झाली व तो वंश अद्याप जिवंत आहे. ह्या गोष्टी मी बनावट किंवा कादंबरीतल्या सांगत नसून त्या बखरीत नमूद आहेत

## सध्याचे संकट

या जुलुमाच्या प्रतिकारार्थ महाराष्ट्राने प्रथम आपला प्रदेश स्वतंत्र केला व अटकेपार झेंडा फडकविला त्या वेळी महाराष्ट्रानेच पंजाबला स्वतंत्र केला, ही बहादुरी तुमच्या पूर्वजानी केली. आता जे नवे संकट आपणावर येत आहे त्यालाही तोंड दिले पाहिजे हिंदूनीच हिंदुत्वाला विरोध सुरू केला आहे प्रत्येक विद्यार्थ्याला शपथ घालून मी सांगतो की, तू शपथ घे की, ' जिद्दपद जरी माझ्याकडे येत असले तरी पहिला अहिंदु म्हणून जगण्यापेक्षा शेवटचा हिंदु म्हणून मी मरण पत्करीन !' आशीर्वाद जरी हिंदुत्व विसरले, तरी तुम्ही हिंदुत्व सोडू नका

## सैनिक शिक्षण अवश्य घ्या

आपल्या संस्कृतीवर होणारे परकीयाचे हल्ले परतविणे हे आपले पहिले कर्तव्य आहे 'धर्मुत्थानाय हिंदूनाम्' हे वचन डोळ्यापुढे ठेवा तुम्ही बौद्धिक शिक्षणाकडे लक्ष देता तितकेच सैनिक शिक्षणाकडे लक्ष द्या संघटन व लाठी याचे शिक्षण महाराष्ट्रात फैलावले पाहिजे नाट्यसंशोधनमंदिर, काव्यशास्त्रविनोद वगैरेना मी पुरोगामी म्हणणार नाही पण हवाई बंदुकीचे शिक्षण देणाऱ्या संस्थाना मी पुरोगामी संस्था म्हणतो तुम्ही कॉलेजात यु टी सी चे शिक्षण घ्याच सर्वांनी हवाई बंदुकीचे शिक्षण तरी जरूर घ्यावे नाटकी तऱ्हेने का होईना पण ५०० विद्यार्थी रांगानी जाताना दिसले पाहिजेत केव्हा केव्हा नाटकी वर्तनातूनच खरा मनुष्य तयार होतो मुली बाहुलीचा खेळ खेळतात त्या बाहुलीचा शेवटचा मुका घेताघेता पहिल्या मुलाचा मुका घेतात खांद्यावर बंदूक टाकूनच बायकोचा मुका घेण्याचे दृश्य सुपरिचित आहे शेक्सपियरची नाटके विकत घेण्यास किंवा श्री अत्र्याची विनोदी नाटके वारंवार वेळा पाहण्यात जो खर्च विद्यार्थी करतात तेवढ्यात तुम्हाला हवाई बंदूक मिळू शकेल आजकाल काव्यशास्त्रविनोद, नाटक कादंबऱ्या या गोष्टी चालू आहेत त्या हव्यातच, पण वेळ कोणती ते पाहिले पाहिजे आई जर आजारी असेल तर त्या वेळी गच्चीवरून वारे व ग्रह पाहत राहणारा मुलगा मातृद्रोही ठरेल आपल्या मातृभूमीस घोर लागला आहे तुम्ही हिंदुत्व विसरू नका

\+ + +

# ११. माझें राजकीय धोरण

पुणे येथे दि ४-७-३७ रोजी शिवाजी मंदिरात अध्यक्ष या नात्याने स्वा सावरकर यानी आपल्या भावी राजकीय धोरणाची दिशा दिग्दर्शित केली, त्या वेळचे भाषण

आता लवकरच मला राजकीय कार्यात भाग घ्यावा लागणार आहे, आणि तसे कार्य सुरू झाले म्हणजे तुमच्या-माझ्यात विषमता अुत्पन्न होओल जोपर्यंत मी काहीच काम करीत नव्हतो तोपर्यंत ठीक होते, परंतु नंतर मात्र मी आपणास नकोसा होओन निदान मी स्वस्थ होतो तो बरा होतो असे आपणास वाटू लागेल. यात मी आपणास दोष देत नाही, निसर्गप्रवृत्तिच तशी आहे असे जरी असले तरी राष्ट्रहिताची प्रामाणिक अिच्छा असेल त्याप्रमाणे त्याविषयी आपणास जे सुचेल ते बोलले पाहिजे व त्याप्रमाणे केले पाहिजे. त्यामुळे माझ्याविषयी वैषम्य निर्माण झाले तरीही मला राष्ट्रास जे अुपकारक ठरेल असे वाटते, ते बोलून दाखविणे प्राप्त आहे आता त्याविषयीची सर्वच मते मला आज सागता येणार नाहीत, तरी पण मी अेक दोन विधेये सांगणार आहे

## खरी अेकी कोणती ?

आता आपण प्रथम 'अेकी' हा विषय विचारात घेअू अेकीमुळे राष्ट्राचे बळ वाढते अेक हाक, अेक आवाज, अेकजुटीचा प्रयत्न हे सर्व स्वातंत्र्येच्छु राष्ट्रास योग्य आहे यात शंका नाही परंतु या ठिकाणी अेकीचा केवळ शब्दार्थ घेअून चालणार नाही राजकीय क्षेत्रामध्ये आपण धर्माचा अर्थ, सत्याचा अर्थ, अहिंसेचा अर्थ ज्या पद्धतीने लावतो त्याच पद्धतीने या अेकीचा अर्थ लावावयाचा आहे

## अंधळा व काणा

ज्या अेकीमुळे आपल्या राष्ट्राचे अुत्तम धारण होणे शक्य असेल तेवढीच *'अेकी' सद्‌गुण या सदरात यअू शकेल आपण अेक दृष्टान्त घ्यानी आणा समजा* की, काही अंध माणसांची अगदी पूर्ण अेकी आहे ती सर्व मंडळी आपली प्रत्येक क्रिया अेकोप्याने करतात ती सर्व मंडळी, अंधाची ही मालिका कोठे तरी जाण्यास निघाली अेकोप्याने सर्व अंधळे रस्ता चालू लागले, पण पुढे मोठा खड्डा आहे, अशा वेळी त्या अंधाच्या मालिकेत जो अेक कोणी काणा आहे, त्याला संशय आला की या मार्गात खड्डा आहे या व ी अेकोपा मोडेल या भयाने आपण ओरडलो नाही तर आपणासह सर्व या खड्ड्यात पडणार अशा प्रसंगी अेकीची वकीच होणे अिष्ट या वेळी अंक्याला बाध येअील म्हणून न बोलता सर्वांनी खड्ड्यात पडणे हा

अेकीचा गुण नसून दोष होअील मतैक्यापेक्षा अशा प्रसंगी मतभिन्नताच अिष्ट होय, श्रेष्ठ होय

## प्रत्येकाचा हक्क

आपल्या राष्ट्रात आजच्या स्थितीत अनेक पक्ष आहेत, हे तर साहजिक आहे परंतु स्वतंत्र राष्ट्रातही खरी राजसत्ता गाजविणारी जी लोकांची प्रातिनिधिक संस्था पार्लमेंट त्या पार्लमेंटने अेकमताने किंवा बहुमताने केलेला ठराव मान्य नसला, तर त्याविरुद्ध बोलण्याचा 'राअिट ऑफ रिव्होल्ट' म्हणून अेक हक्क ठेवण्यात आलेला असतो मात्र अशा वेळी विरुद्ध बोलणारास त्याबाबत ठरविण्यात आलेला दंड भोगण्यास तयार असलं पाहिजे यात अेकच वारवाबा आहे आणि तो म्हणजे अेकीतून राष्ट्रहितार्थ फुटल्यानंतर शत्रुपक्षास मिळावयाचें नाही

आपणास जीवनाची अेकी पाहिजे देशातील ३५ कोटी लोकसंख्येपैकी ३४ कोटी ९९ लक्ष ९९ हजार ९ शे ९९ लोक अेका बाजूला असले आणि माझे मत त्यांच्याशी जमत नसल तरीही मी अेकटा बाजूला निघून माझे देशहिताविषयीचे मत बोलून दाखवीन व त्याबाबत होणारी शिक्षाही भोगीन जीझस ख्रािस्ट हा प्रथम अेकटाच निराळ्या मताचा होता मरपर्यंत बारापेक्षा जास्त अनुयायी त्याला लाभले नाहीत पण त्याने आपले मत सोडले नाही आज अर्धे जग त्याच्या मताचे आहे या पृथ्वीच्या दुसऱ्या बाजूस अमेरिका खंड आहे हे कालबसाने सर्वांच्या विरोधाला न जुमानता सांगितले त्या वेळी अेकमत बिघडू नये म्हणून तो स्वस्थ बसता तर त्यास आजचे श्रेय मिळाले नसते त्याच्या अेकट्याच्या मतानेच आज अमेरिकाखंडाचे अस्तित्व सिद्ध झाले आहे ना? अेकाच्या मनात अुपजले तेच आज बहुमतास मान्य झाले अशी अनेक अुदाहरणे आहेत

## जनहित की जनस्तुति?

देशहिताकरिता जसा काही अनेक गोष्टींचा त्याग करावा लागतो, त्याचप्रमाणे लोकप्रियतेचा त्याग करण्याची तयारी असावी लागते स्वजनांशी द्रोह करण्याची भीति नष्ट झाली पाहिजे आपली लोकांतील प्रतिष्ठा कमी होअील या शंकेने काही लोक पटलेले मतही बोलण्यास भितात तसे अुपयोगी नाही यासाठीच मी स्वतः अेक ध्येयवाक्य ठरविले, 'वर जनहित ध्येय वेचला न जनस्तुति ।' हे ते माझे ध्येयवाक्य स्तुति कोणाला नको? कोपायमान शंकरसुद्धा स्तुतीला भाळत असतो, तेव्हा जनस्तुति हवीच, पण जनहित हे सर्वश्रेष्ठ आहे अेवढें ध्यानी ठेवले म्हणजे ठीक जनस्तुति व जनहित ही दोन्हीही ज्याला साधता येतात तो मनुष्य धन्य होय

## राष्ट्रसभा सर्व राष्ट्राची

राष्ट्रीय सभा ही देशातील सर्वात मोठी राजकीय संस्था असून त्या संस्थेने या देशावर फार मोठे अुपकार करून ठेवले आहेत राष्ट्रीय सभा ही संस्था कोण्या अेका प्रांताची किंवा अेका व्यक्तीची नाही, तर ती सबंध देशाची आहे न्यायमूर्ति रानडे यांच्यापासून सर्व प्रांतातील निरनिराळया देशभक्तांच्या व राजकारणी पुरुषांच्या श्रमाचे खत या राष्ट्रीय सभारुपी वृक्षास लाभले आहे तेव्हा राष्ट्रीय सभेवर कोणा अेका व्यक्तीचा अगर प्रांताचा हक्क नाही आता परतंत्र देशामध्ये बहुजनांची अशी ही संस्था जितकी प्रगत असणे शक्य आहे तितकीच ही संस्था, ही राष्ट्रीय सभा प्रगत आहे परतंत्र देशातील बहुजनसमाज हा थोडासा भ्याड असाच असतो अर्थात् बहुसंख्य समाजाची संस्था तितकीच असणार काही थोडे शूर लोक असतात ते यातून फुटून बाहेर निघतात असे त्यांना निघावेच लागते

## पूर्वीचे तीन पक्ष

पूर्वी ही राष्ट्रीय सभा नेमस्तांच्या हाती होती मी नेमस्तांना कोणत्याही प्रकारे दोष देत नाही त्यांनी त्यांच्या काळात देशहितकारक जे जे करणे शक्य होते ते ते केले होते आजच्या जहालांपेक्षा त्या काळचे नेमस्त कोणत्याही बाबतीत मागे नव्हते त्या काळचे ते थोर जहालच होते ना गोखले वगैरे मंडळी तर आमच्या पितृस्थानी शोभतील अशी आहेत लोकमान्य टिळक हे जास्त धडाडीचे होते आणि म्हणून ते त्या वेळी राष्ट्रीय सभेस विरोध करून बाहेर पडले व म्हणूनच देशाची प्रगति झाली त्यानंतर आम्ही मंडळी थालो लोकमान्य आमच्या-पेक्षा धाडसी होते, पण त्यांना बहुजनसमाज की जो दुबळा होता, त्याला बरोबर घेअून जायचे होते म्हणून 'अभिनवभारत' या संस्थेच्या रुपाने आम्ही त्या वेळच्या लोकमान्यांच्या राष्ट्रीय सभेतून फुटून पुढे निसटलो

पायोनियर्स—पुरस्सर—असतात त मुख्य सैन्यापेक्षा पुष्कळच पुढे असावे लागतात, त्यामुळे हाल भागण्याचे व साहसाचे कार्य किती कराव लागते हे कळून आले आम्ही आमच्या कामगिरीने या देशातील साहसाचे तापमापन (थर्मामीटर) किती अुंच नेता येते हे व्यक्त केले तव्हा काही वेळा अेकीपेक्षा बेकी कशी श्रेष्ठ ठरते हे दिसून येअील

## अेकाच देवतेसाठी अनेक फुले

राष्ट्रीयसभा ही बहुसंख्य लोकांची संस्था आहे म्हणून तिच्याविरुद्ध ब्रही काढणे किंवा तिच्याबाहेर राहून आपल्या मताप्रमाणे कार्य करणे म्हणजे पातक आहे ही कल्पना समूळ चूक आहे, म्हणून ती सोडून द्या राष्ट्र ही अेकच सेव्य वस्तु आहे राष्ट्रीय सभा, ला स्व पक्ष, हिंदुमहासभा वगैरे सर्व संस्था या राष्ट्राची

पूजा करण्याची केवळ फुले आहेत. देवता अेक, देअूळ अेक पण प्रत्येकाने आपापल्या निरनिराळ्या साधनांनी ती पूजा करावयाची आहे. यात पूजकांनी किंवा भक्तांनी आपसात त्या पूजेच्या साधनाविषयी भांडण्याचे काहीच कारण नाही.

राष्ट्रीय सभा झाली काय किंवा दुसरी कोणतीही संस्था झाली काय, तिच्या हातून कार्य करताना काही चुका होणारच. राष्ट्रीय सभेकडून तशा काही चुका झाल्या हे आता सिद्ध झाले आहे; पण चुका करता करता 'आम्ही काही चूक करीतच नाही' असे म्हणणे मात्र चूक आहे.

## कार्य करा

राष्ट्रीय सभेशी पटत नसेल व आपण काही निराळे करून देशहित करू अशी आपली खात्री असेल तर त्यागपत्र देअून खुशाल आपला स्वतंत्र पक्ष काढावा. मात्र या दुसऱ्या पक्षाने राष्ट्रीय सभेपेक्षा जास्त कार्य, निदान तितके तरी कार्य करून दाखवावे. तरच निराळा पक्ष काढण्याचे साफल्य आहे आणि असे जास्त कार्य करणारे पक्ष निघत असल्यास राष्ट्रीय सभेनेही त्यांच्याविषयी वैषम्य न मानता स्पार्टन वीराप्रमाणे आपणापेक्षा चढाअी कार्य करणारे पक्ष देशात निर्माण व्हावेत अशी सदैव प्रार्थनाच करावी. कोणत्याही पक्षाची कसोटी तो राष्ट्रीयसभेत आहे किंवा नाही हे पाहून न ठरविता तो पक्ष कोणते देशहितकारी कार्य करतो हे पाहून ठरविली जावी. लोकांनी केवळ प्रेक्षकाची भूमिका सोडावी. दोन मल्लांची कुस्ती पाहण्यास लोक जमतात, त्याप्रमाणे अेक पक्ष दुसऱ्याविरुद्ध कसे बोलतो किंवा अेक वक्ता दुसऱ्याची कशी हजेरी घेतो अेवढेच पाहण्यासाठी तुम्ही सभेला येता. तसे न करता आपण प्रत्येकजण काही तरी कार्य करतो की काय हें मनाशी पडताळून पहात चला.

## माझी कसोटी कोणी पहावी?

मी सुटल्यानंतर आता काय करणार, प्रतिगामी होणार की पुरोगामी होणार, याविषयी अहोरात्र चिंता वाळगणारांना मला सांगायचे आहे की, तुम्ही काय देशकार्य करता त्याची तरी अेकदा यादी द्या. मी काय कार्य करणार याविषयी चिंता कोणी वाळगावी की, ज्यांनी माझ्यापेक्षा जास्त किंवा निदान माझ्याअितक्या तरी हालअपेष्टा सहन केल्या आहेत त्यांनी. या वेळी मी खोटा विनय सोडून बोलत आहे. अितर काही त्यागाप्रमाणे या वेळी मला विनयाचाही त्याग करावा लागत आहे. तसा खोटा विनय सोडून मी बोलतो की, श्रीशिवाजी महाराज किंवा त्यांच्यासारखे व त्यांच्यानंतर जे थोर देशभक्त झाले त्यांनाच माझा कान धरण्याचा अधिकार आहे. तसे थोर देशभक्त जितके जास्त निघतील तितका जास्त आनंद मला होअील. मी काय करणार याविषयी सध्या अेवढेच सांगतो की, जीव

गेला तरी मी हिंदूचा पक्ष सोडणार नाही मी आज राष्ट्रीय सभेत नाही, किंवा दुसऱ्या कोणत्याही पक्षात नाही पण मी कोणत्या पक्षात आहे किंवा नाही, हे मुख्य नसून माझे काम मुख्य होईल

कार्य हे मुख्य चिन्ह आहे म गांधी हे तरी राष्ट्रीय सभेत आहेत काय ? नाहीत मग त्याचा शब्द तेथ मानला जातो याचे कारण त्याचे कार्य आहे ते सभासद आहेत किंवा नाहीत हे कोणी पाहणार नाही

राष्ट्रीय सभा व लोकशाही स्वराज्यपक्ष यांच्या ध्येयामध्ये मुळीच अंतर नाही ध्येय अेक आहे तेव्हा त्या ध्येयप्राप्तीकरिता मी काठेही काय केले तरी ते ध्येयाप्रतच जाणार आहे तुम्हाला करता येत नाही, ते मी करणार आहे, असे कोणी म्हणाला आणि तो तसे देशहितकारी कार्य करीत असला तर केवळ तुमच्यात नाही किंवा राष्ट्रीय सभेत नाही, म्हणून तो देशद्रोही होईल काय ? तेव्हा जो कोणी देशहिताचे कार्य कोठेही राहून करील ते करण्यास त्यास पूर्ण वाव मिळणे अवश्य आहे तो अमुक अेका सभेत नाही, म्हणून त्याचे कार्य हिणकस ठरत नाही ज्या कार्यावर राष्ट्रीय सभेचा छाप नसेल ते अराष्ट्रीय ही कल्पना समूळ खोडून काढा आणि कार्याला लागा.

\+ \+ \+

## १२. टिळक–पंथ

पुणे येथे दि १ ८ ३७ रोजी लोकमान्यांच्या १७ व्या पुण्यस्मृतिदिनी टिळक स्मारक मंदिरात झालेल्या प्रकट सभेत आपण लोकशाही स्वराज्य पक्षात समाविष्ट होत आहोत अशी घोषणा स्वा सावरकरांनी केली त्या वेळी केलेले भाषण

आजच्या या पवित्र दिवशी लोकमान्यांचे काही वैशिष्ट्य वर्णन केल्यास ते आपणास मार्गदर्शक व चिंतनीय होईल म्हणून मी माझ्या आजच्या व्याख्यानाचा विषय ' टिळकपंथ ' हा निवडला आहे सध्या देशातील बहुतेक सर्वपक्ष ' आपण टिळकांचे अनुयायी आहोत असे सांगत आहेत लोकशाही स्वराज्य पक्ष टिळकांच्या अनुयायांचा आहे हिंदुमहासभा आपण टिळकांचीच तत्त्वे अनुसरतो असे म्हणते व राष्ट्रीय सभाही आपण टिळकांच्याच मार्गाने जात आहोत, असे मधून मधून मोठ्या अभिमानाने सांगते टिळक हे माझे गुरु आहेत असे सांगण्यात बहुतेकास अभिमान वाटतो अशा प्रकारे सबंध राष्ट्राचे गुरुत्व लोकमान्यांकडे जाते परंतु लोकमान्यांचे चरित्र सूक्ष्मपणे वाचील त्याला असे दिसून

येईल की, लोकमान्य हे त्यांच्या मृत्यूनंतर लोकमान्य झाले त्यांच्या हयातीची शेवटची चारपाच वर्षे वगळल्यास त्यांचे सबंध कार्य अल्पमतातच झाले तेव्हा आपण अल्पमतात आहोत याविषयी कोणी विषाद मानण्याचे कारण नाही लोकमान्य हे जरी अल्पमतात काम करीत होते तरी पण टिळकांचे मत हेच राष्ट्राचे मत असे त्यांचे शत्रु जेव्हा समजू लागले, तेव्हा त्यांच्या मित्रांनाही ते कबूल करावे लागले

## बहुमत अचूकच असते काय ?

टिळक हे कधीही कॉंग्रेसचे अध्यक्ष झाले नाहीत अखेरपर्यंत त्यांना झगडावे लागले प्रत्येक पंथाचे स्थापक प्रथम अल्पमतातच असतात जीझस ख्रिस्ताला फाशी जावे लागले, महमद पैगंबर पळून गेला, पण त्यांनी अल्पमतात राहून सत्यप्रकाशन केले व अखेरीस बहुमत त्यांच्या बाजूला गेले आपण म्हणतो ते सत्य असून राष्ट्राला तेच हितकारक आहे हे एकदा आपल्या मनाला पटले म्हणजे मग आपण अल्पमतात असलो तरी त्याची चिंता न करता सुगाल आपल्या सत्यास अनुसरून अखेरपर्यंत कार्य करीत राहणे हेंच आपले कर्तव्य होय आपल्या बाजूस बहुमत नाही म्हणून आपले काही चुकते आहे असे समजण्याचे कारण नाही

## टिळकांचे विभूतिमत्त्व कशात आहे ?

राष्ट्राचे स्वातंत्र्य हे टिळकांनी आपल्या आयुष्याचे ध्येय ठरविले होते. त्यांचा व्यक्तिश मोक्ष, धर्म, कर्म, व्रतपालन वगैरे गोष्टींवर विश्वास होता. व्यक्तिश थोर संत, उत्कृष्ट गणिती, उच्च संपादक किंवा महान् तत्त्ववेत्ता होण्यासारखे मार्ग त्यांच्यापुढे मोकळे होते त्यांनी तसे होण्याचे मनात आणले असते तर सहज तसे झाले असते पण त्यांनी वैयक्तिक मोठेपणाचा त्याग करून आपली सर्व बुद्धि व कर्तृत्वशक्ति राष्ट्राच्या स्वातंत्र्याप्रीत्यर्थ कामी लावली यातच त्यांची महती व त्यांचे विभूतिमत्त्व आहे

## संकुचित ध्येय कोणते ?

आजही राष्ट्राचे संपूर्ण स्वातंत्र्य हेच ध्येय आपणापुढे आहे राष्ट्रीय सभेचे हिंदुमहासभा व लोकशाही स्वराज्यपक्ष यांचेही ध्येय संपूर्ण स्वातंत्र्य हेंच आहे असे असता हिंदूंचे मात्र ते ध्येय म्हणताच त्यात काहींना संकुचितपणा दिसतो हिंदूंना संकुचित म्हणणारेसुद्धा सबंध मानवी समाजाच्या ध्येयाच्या दृष्टीने विचार करता संकुचितच ठरतात कारण हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंतच्या भूभागाचेंच राजकीय स्वातंत्र्य ते आपले ध्येय ठरवितात, म्हणजे ते संकुचित नाहीत काय ? पृथ्वीवरीलच काय पण अखिल विश्वातील सगळ्यांवरील मनुष्यसमाजाच्या दृष्टीने राष्ट्रीय सभेचे ध्येयही संकुचित ठरते पृथ्वीवरील मानवांच्या दृष्टीने बोलावयाचे

झाल्यास मग अिंग्रजानी हिंदुस्थानवर राज्य केले म्हणून तरी काम बिघडते ? अिंग्रजाच्या अिंग्लडमध्ये दगडी कोळशाशिवाय विशेष काही पिकत नाही त्याच्या हातचा जर हिंदुस्थान गेला, तर मग साहेबाना वेळी कोठून खाण्यास मिळतील ? आपल्या देशातून जाणाऱ्या सुवर्णावर निर्बंध कशास बरे घालता ? तसे निर्बंध घातले तर आग्ल युवतीच्या कर्णभूपणाना सोने कसे मिळेल ? सर्वव्यापक ध्येय सोडून आपले सुवर्ण आपणच अडवून ठेवावे असे म्हणता ना ? तेव्हा विश्वरूपी ध्येयावरून खाली येअून आपल्या राष्ट्रापुरते मर्यादित ध्येय आपणास ठरवावे लागते ना ? मग राष्ट्राचा मोठा भाग जो हिंदु, त्या हिंदूच्या ध्येयास तुम्हास केव्हाही सकुचित ध्येय असे म्हणता येणार नाही.

## रशियाच्या ध्येयालाही मर्यादा

'जगातील सर्व मानव सारखे' असे सागणारे रशियन सोव्हिअेट यानीही आपली सोव्हिअेट युनियन रशियापुरतीच मर्यादित ठेवली आहे जगात अितरत्र जोपर्यंत फ्रेंचाचा फ्रान्स; जर्मनाचा जर्मनी, अिंग्रजाचा अिंग्लड, अिटालियनाचा अिटली ही पृथक् राष्ट्रे आहेत तोपर्यंत त्याना आपली सोव्हिअेट युनियन निराळी ठेवणेच प्राप्त आहे जगातील अखिल मानवसमाजास समान दर्जा मिळवून देण्याचे ध्येय ठेवणाऱ्या सोव्हिअेट रशियाने आज अिंग्रजाशी मैत्रीचा सधी (तह) केलेला आहे स्वत चे स्वास्थ्य राखण्यासाठीच ना हे त्यानी केले ?

"Workers of the World Unite" असे रशियातील मजूरसघ जगाला ओरडून सागतात ! मग मुबअीचे अेक हजार बेकार कामगार अेका तारूवात घालून मास्कोला घेअून जा बरे ! तेथील मजूर त्याचे स्वागत करतात का ते पहा जगात अितरत्र जोपर्यंत विशालवादित्व नसून सकुचितपणा आहे, तोपर्यंत आपणही आपल्या राष्ट्रापुरते राष्ट्रातील बहुसख्य समाजाचे ध्येय हेच राष्ट्राचे ध्येय ठरविणे शहाणपणाचे होअील ही गोष्ट सिद्ध होते

## साधनांची भिन्नता

लोकमान्य टिळक ध्येयाच्या बाबतीत सपूर्ण स्वातत्र्यवादी होते परन्तु हें ध्येय साध्य करून घेण्याच्याबाबत साधेल ते साधन हाताशी धरावे अशी त्याची व्यवहारी दृष्टि होती 'साधनानाम् अनेकता' अस टिळकाचे साधनाबाबतचे धोरण स्पष्ट होते हे त्याच्या चरित्रावरून दिसून येते वेळप्रसगी त्यानी अगदी विनतीअर्जही करून पाहिले, पण अर्ज-विनत्याचे साधन वापरणारे टिळक व विष्णुशास्त्री चिपळूणकर हे श्रीमत नानासाहेब पेशवे याच्यासारख्या क्रातिकारका-बद्दल अभिमान धरीत. अेका प्रसगी चिपळुणकराच्या घरी चहापान-समारभ होणार होता, परतु त्याच दिवशीच्या 'टाअिम्स' पत्रात श्रीमत नानासाहेब पेशव्याना धरल्याची बातमी आली तेव्हा शास्त्रीबुवानी तो समारभ रद्द केला.

## अेकच साधन काय कामाचे ?

टिळक पथीय लोक देशाच्या स्वातंत्र्याकरिता शक्य असेल त्या साधनाचा योग्य त्या ठिकाणी योग्य तो अुपयोग करतील नीती अनीतीचा नसता तडेजाव करणार नाहीत सत्याग्रह बहिष्कार स्वदेशी, जे जे साधन जेथे जेथे अुपयोगी, तेथे तेथे ते अुपयोजिणे हे टिळकांचे व्यवहारी राजकारण आम्ही समजतो अेकाच साधनाशी आम्ही कायमचे लग्न बांधीच लावून घेणार नाही सत्याग्रहाने माथीच माणसे अेकसारखी कामास येत आहेत, प्रतिपक्षाचा ढेकूणसुद्धा मरत नाही, तेथे तो सत्याग्रह काय कामाचा ? पण असे असताही आपल्या लोकांच्या यातना प्रतिपक्षाच्या हृदयाला पाझर फोडतील हे धोरण टिळकांनी केव्हाही आखले नसते कारण प्रतिपक्षाला पाझर फुटणे शक्य नाही हे अुघड आहे असे त्यांचे मत होते अक्रोधाने क्रोध जिंकणे हे सतलक्षण अुत्तम आहे, हे मला मान्य आहे पण ते जेथे शक्य असेल तेथेच आओीचा क्रोध अक्रोधाने जिंकता येओील, पण पूतना-मावशी आली तर तिचा क्रोध शमन कसा करावा ?

त्यांनी शक्य तेथे निरोधन करून सत्याग्रह केला व बहिष्कार घातला जरूर तेथे सहकार व अजविनत्याही केल्या

## राजनीति कोणती ?

आपले वरचे बळ खर्ची पडते पण आपण प्रतिपक्षाचे काहीच नुकसान करू शकलो नाही, तरी पण माझाच विजय झाला या म्हणण्यात काय अर्थ आहे ? दुकानाचे सबंध दिवाळे निघाले तरी माझे दुकान छान चालले आहे असे म्हणण्या-अितकेच ते हास्यास्पद आहे पण टिळक असे नव्हते त्या वेळी टिळकापक्षाही खडतर मार्ग पत्करणारे माझ्यासारखे काही तरुण होते आमचे मार्ग त्यांना सर्वस्वी पसंत नसले तरी त्यांनी आमचे पाय मागे ओढण्याचे पातक केव्हाही केले नाही आजच्या पिढीच्या राजकारणापेक्षा मला त्या पिढीचे नेमस्तांचे राजकारण जास्त पसंत पडते त्यांच्यापैकी कोणीही साधनामध्ये नीति आणि अनीति आणिली नव्हती न्याय्य ध्येय लवकर ज्याने साध्य होओील ती नीति अशी त्यांची नीतीची व्याख्या होती

## मवाळाचा व्यापकपणा

सुरेंद्रनाथ बानर्जी हे नेमस्त समजले जात पण अंदमानमधील क्रांतिकारक राजबंदीविषयी त्यांच्याअितके तळमळणारे तेच ! त्यांच्याच प्रयत्नाने आमची तेथून सुटका झाली लढाओीच्या काळात अेक जर्मन सैन्याधिकारी ब्रिटिशांचा कैदी होऊन अंदमानात आला त्याच्याबरोबर सुरेंद्रनाथांनी मला धीराचा, प्रेमाचा निरोप धाडला होता क्रांतिकारकांशी त्यांचा तीव्र विरोध होता, तरी पण ती

मडळी त्याना आपली पोटची ठेकर समजत सुरद्रनाथानी ब्रिटिश सरकारला स्पष्टपणे बजावल की हिंदुस्थानात तुम्हाला शातता हवी असेल, तर प्रथम अदमानमधील क्रातिकारक सोडा ' या वेळी सुरद्रनाथाबरोबर त्याच्याही पाठीशी भूपेद्रनाथ बसू हे होते तरी पण त्यानी आमच्यावर अनीतीचा शिक्का कधीही मारला नाही माझ्या मताचा शिक्का घेऊन ज राजकारणात आले तेवढेच राष्ट्रीय, असा आग्रह बानर्जी टिळक किंवा गोखल याना केव्हाही धरला नाही लडनमध्ये सेनापति बापट याचा माझी भेट झाली त्यानतर मला ते आजच भेटले त्या वेळची आमच्याबरोबरची काही माणस आज विधिमडळात जाऊन बसला आहेत

## 'वदेमातरम्'चे भूतभविष्य

आज या घटकेलाही शेकडो राजबदी अदमान यथील अधारात तडफडत आहेत त्याना आपणास विसरता यत नाही राष्ट्रीय सभेच्या अेकदा अध्यक्ष झालेल्या देवी सरोजिनी नायडू याचे बधु वीरद्रनाथ चट्टोपाध्याय हे अद्याप परदेशात अडकून पडले आहेत वीरद्रनाथाप्रमाणे अनक लोक परदेशात अडकून पडले आहेत त्याना परत आणता आल तरच आपल स्वराज बजावावी बरोबर होअील आम्हाला या देशाची प्रगति फार मोठी झाल्यासारखी दिसते ज्या वदे मातरम्' या गीताबद्दल आम्ही त्या काळी पोलिसाच्या लाठ्या खाल्ल्या तच वदे मातरम गीत आज प्रकट रीत्या विधिमडळामध्य निमयतते म्हणता यत वदे मातरम' ह अेकच राष्ट्रगीत ठरले ही फार आनदाची गोष्ट आहे निदान देशातील सव हिंदूचे त राष्ट्रगीत आहे यात शका नाही परवा डाक्का विश्वविद्यालयाच्या पदवीदानप्रसगी तेथील मुसलमान विद्यार्थ्यानी त गीत म्हणण्याच नाकारल यावरून त हिंदूचे आहे अस मी म्हणतो मला अिताही भीति वाटते की उद्या अेखाद्या मुसलमानाने गाधीना अक पत्र लिहून वद्धविण्याचा अवकाश की भूषणकवि ज्याप्रमाणे बहिष्कृत ठरला त्याप्रमाणे या वदे मातरम राष्ट्रगीतासही काग्रेस मध्ये बदी व्हावयाची ! तस न होवो म्हणजे मिळवले

## टोपीपेक्षा डोक्याचे महत्त्व

आज सव सभासद खादीचा पोषाख व गाधी टोप्या घालून विधिमडळात गेले हीसुद्धा प्रगतिच आहे जी टोपी घालू नय म्हणून पूर्वी नोकरशाहीन आग्रह धरला तीच टोपी आज अधिकाराच्या ठिकाणी आहे, म्हणून टोपीला महत्त्व आले नाही तर टोपीपक्षा डोक्याचच महत्त्व अधिक आहे लोकमान्य टिळक आज असते तर त्यानाही ही प्रगति पाहून नि सशय आनद झाला असता अितक जरी झाले तरी ह काँग्रेस राज्य झाल अस म्हणणे ही चूक आह ह काग्रेसच राज्य नव्हे जर तुमचे राज्य झाल असत, तर तुम्ही प्रधान झाला असता, खुद्द राजेच झाला असता

## प्रधान की राजा ?

आणि म्हणून प जवाहरलाल नेहरू यानी या वेळी हे काँग्रेसच राज्य नाही आणि स्वराज्य तर नाहीच नाही, अशी सावधगिरीची सूचना दिली ती अगदी योग्य होय ही सूचना देऊन त्यानी आपली राष्ट्रपतीची भूमिका बरोबर ओळखली मला प जवाहरलाल नेहरू हेच त्यातल्या त्यात जास्त जवळचे वाटतात त्याच्याशी माझे काही थोडेबहुत जमल नर जमेल आज तुम्ही सव गव्हर्नरचे प्रधान आहात परिस्थितीप्रमाणे तुम्ही त्याच्या बगल्यावर जाऊन व विधिमडळात उभे राहून राजनिष्ठेची शपथ घेतलीच ना ? ती शपथ घेण्याच्या वेळी तुमचा स्वाभिमान जो माझ्या मुटकेच्या अर्जावर सही करण्याच्या कामी आड येत होता, तो त्या वेळी कोठे होता ? स्वाभिमानाचे ह कारण खरे नाही कोणत्याही गोष्टीचे कारण देताना त निदान खर तरी द्यावे, हे सत्यवादी माणसाना सागण्याची वेळ यावी हा दैवदुर्विलास होय !

आज राष्ट्राची जी प्रगति झाली आहे त्यात म गाधीच्या विधायक कार्याचा फार मोठा भाग आहे हे मी मोठ्या आनदाने कबूल करतो लडनमध्ये महात्माजी व मी काही दिवस अगदी अेकत्र राहत होतो आज त्याच्या आमच्यात जे मन-भेद आहेत, तेच अगदी ततोतत त्या वेळी तेथेही होते म गाधीच्या कार्याबरोबरच देशाच्या या यशस्वी प्रगतीमध्ये ज्याची नावे अितिहास नमूद करणार नाही असे अनेक आहेत त्या सर्वांच्या पुण्याओीने आज किंचित अधुक असे अुजाडल आहे स्वातत्र्याची सपूर्ण प्रभात होण्यास अद्याप बराच अवधि आहे

दिल्ली तर अजून खपच दूर आहे मोठ्या लढाओीमध्ये अेखादा लहानसा विजय होतो तसा हा मध्याचा तात्कालिक विजय आहे हा विजय अेका साधनाचा नसून अनेक साधनाचा हा विजय आहे अेकाच पक्षाचा हा विजय झाला पस कोणासही म्हणता येणार नाही हा जर अेकाच पक्षाचा विजय असता, तर कौन्सिले ‘ हराम ’ म्हणणारे व आठ दिवसापूर्वी ज्यानी हाती अधिकार घेतना त्याना काळी निशाणे दाखविणारे याना, त्याच हराम कौंसिलात रगीबेरगी रेशमी निशाणे फडकावीत आत जाता आलेच नसत

## हिंदुत्वरहित स्वराज्याला लाथ

स्वतत्रता ह या राष्ट्राच ध्येय निश्चित आहे ह ध्येय साधेल त्या साधनाने साध्य कराव असे टिळकाचे म्हणण होते हच म्हणण सूत्ररूपाने सागण्यासाठी मी पुढील अनुष्टुप् तयार केल आहे

' राष्ट्रस्वतंत्रता ध्येयं । यथा साध्यं च साधनम् ।।
अभ्युत्थानाय हिन्दूनां । अयं पक्षः प्रवर्तितः ।। '

या राष्ट्राचे स्वरूप ठरविताना या राष्ट्रातील वहुसख्य जे हिंदु ते या राष्ट्राचा पाया आहे. त्या हिंदूचे हिंदुत्व अविच्छिन्न नि अबाधित राहिले पाहिजे हे टिळकाचे तिसरे ध्येय होते. टिळक नेहमी ठासून सागत की, मी हिंदु आहे. त्यानी हिंदूवर कुरघोडी केव्हाही सहन केली नाही. जर्मनीत जर्मन, फ्रान्समध्ये फ्रेंच, तसेच हिंदुस्थानात हिंदु बहुसख्य आहेत, व म्हणून हा देश हिंदुस्थान देश होय. हिंदुत्व सोडले तर तुम्ही म्हणता तसे स्वराज्य देतो, असे त्याना कोणी म्हटले असते, तर टिळकानी हिंदुत्वरहित स्वराज्यावर लाथ मारली असती आणि आपले हिंदुत्व रक्षण केले असते. या भारतभूमीसवधी आपले मन अितके कां तळमळते ? या भूमीत आपली सस्कृति, आपला धर्म वाढला व नादत आहे, म्हणूनच ना ?

दगड, पहाड व भूमि म्हणजे राष्ट्र नव्हे; तर सस्कृति, धर्म, भाषा यानी राष्ट्राची बाधणी होत असते. पारशाची भूमि जी अिराण ती परकीयाच्या हाती गेली, तरी पण त्यानी आपली सस्कृति व आपला धर्म, आपला तो पवित्र अग्नि व झेदावेस्ताचे अेक पुस्तक बरोबर घेअून आपली भूमि सोडली व ते येथे आले. धर्म व सस्कृति त्याची त्याच्याबरोबर असल्यामुळे येथेही त्यानी स्वदेशाप्रमाणे आपला अभ्युदय करून घेतला आहे ना ?

## अनुयायांचें कर्तव्य

टिळक हिंदुत्वामध्ये राष्ट्र मानीत होते हिंदुत्वाविषयी त्याच्या ठिकाणी ममत्व होते अशी टिळकाची तत्त्वे ज्या पक्षात आहेत, तो लोकशाही स्वराज्य पक्ष मला जास्त जवळचा वाटतो आणि म्हणून आजच्या पवित्र दिवशी मी त्या पक्षात समाविष्ट होत आहे या पक्षाच्या हातून किंवा तात्याराव केळकराच्या हातून जास्त कार्य झाले नाही म्हणून त्याना हिणविण्यात काही अर्थ नाही त्याच्या हातून जास्त कार्य झाले नाही याचे कारण तुम्ही त्याचे अनुयायी म्हणविणारानी त्याना वेळोवेळी तोंडघशी पाडले हेच होय हे आपण ध्यानी घ्या गेल्या निवडणुकीच्या वेळी तुम्ही काय केले ? हिंदु-मुसलमान हे भेद तर बाजूलाच, पण हिंदूमधील जातीजातीचे भेद वाढवून मराठ्याने मराठ्याला नि ब्राह्मणाने ब्राह्मणाला मते द्यावी म्हणून प्रचार करण्यास मागेपुढे पाहिले नाही खुद्द प जवाहरलाल यानी आपले मत हिंदूच्याच पेटीत टाकले ना ? अशा मडळींनो ' न हिंदुर्न यवन. ' अशा तिसऱ्याच अेका पेटीत मत टाकणे जरूर होते

या गोष्टीचा विचार करून हिंदु या नात्याने टिळकपथीय म्हणून व राष्ट्राचे स्वातत्र्यध्येय डोळ्यापुढे ठेवून आज मी लोकशाही स्वराज्य पक्षाचा मन पूर्वक स्वीकार करीत आहे

## सहकार्याची मर्यादा

या लोकशाही स्वराज्य पक्षाच्या कार्यक्रमात मला अत्यंत प्रिय असलेले हिंदुसंघटनेचे सर्व कार्य येऊ शकते. या पक्षात राहूनही माझ्या हिंदुसंघटनेच्या कार्यास मी मोकळा आहे. राष्ट्राचे स्वातंत्र्य हे राष्ट्रीय सभेचे ध्येय येथे आहे. तें व अस्पृश्यतानिवारण, ग्रामोद्योग वगैरे महात्मा गांधींची कार्ये मला करता येतात. विधिमंडळामार्फत जे चांगले कार्य चालू असेल त्याला वाहेरून मनःपूर्वक साहाय्य देण्याचे कार्य मला येथे राहून करता येईल. राष्ट्रीय सभेशी जुळेल तेथपर्यंत आमचे पूर्ण सहकार्य राहील. मात्र जेथे त्याचा हिंदुत्वाला विरोध येईल, तेथे त्याचा आमचा मार्ग निराळा! तेव्हा टिळकांची सर्व लक्षणे ज्यात पूर्णत्वाने आहेत असा लोकशाही स्वराज्य पक्ष मी स्वीकारीत आहे.

\+ \+ \+

## १३. आद्य राष्ट्रध्वज

**१९०७ या वर्षी बर्लिन शहरी भरलेल्या आंतरराष्ट्रीय समाजवादी मंडळींच्या संमेलनात मदाम कामा यांनी फडकविलेला आद्य हिंदी राष्ट्रध्वज दि. २६ ऑक्टोबर १९३७ रोजी पुणे येथील टिळकस्मारक मंदिरामध्ये स्वा. सावरकर यांच्या हस्ते अनावृत करण्यात आला, त्या वेळी त्यांनी केलेले भाषण**

बंधुजनहो! कालपर्यंत डॉक्टरांनी मला घराबाहेर पडण्याची बंदी केली होती. परंतु तीस वर्षांपूर्वी मदाम कामा यांनी फडकविलेला हिंदी स्वातंत्र्याचा आद्य तिरंगी झेंडा येथे आला आहे असे समजताच अग्रजाप्रमाणे डॉक्टरविरुद्धही बंड करून मी येथे आलो. पॅरिसहून जर ध्वज येथे येतो तर मग मुंबईहून पुण्यास येणे माझे कर्तव्य नव्हे काय? ज्या वेळी हा ध्वज तयार झाला त्या वेळी इंग्लंड-मधील 'इंडिया हाउसमध्ये' जी काही आम्ही मंडळी जमत होतो, त्यांपैकी माझे मित्र सेनापति बापट हे आज येथे आहेत. म्हणून प्रथम त्यांची भेट घेऊन त्या वेळच्या स्मृतींना उजाळा दिला आणि नंतर येथे आलो.

## प्रतिस्पर्धी नाही

सध्याच्या राष्ट्रीय सभेने जो राष्ट्रध्वज तयार केला आहे त्यास प्रतिस्पर्धी म्हणून हा ध्वज समजावा असा कोणाचा गैरसमज होणे शक्य आहे. म्हणून याच

ठिकाणी त्याचा खुलासा करतो मनुष्याप्रमाणे देशाचे व वस्तूचे स्वरूपही पालटत असते परंतु आतील आत्मा जिवंत आहे तोपर्यंत त्या वस्तूची वरची रूपे कितीही बदलली तरी तिचे महत्त्व कमी होत नाही त्याप्रमाणेच हिंदी राष्ट्रीय ध्वजाचे स्वरूप बदलले असले तरी त्यामध्ये आत्म्याच्या रूपाने स्वातंत्र्यप्राप्तीचे तत्त्व जिवंत आहे, तोपर्यंत जो कोणता राष्ट्रीय ध्वज असेल तो आम्हास वंदनीयच ठरेल

## ध्वजाची जन्मकथा

आता हा ध्वज जन्माला कसा आला ते सांगतो १९०७ च्या सुमारास आम्ही अिंग्लंडमध्ये असलेले हिंदी क्रांतिकारक तरुण लंडनमधील 'अिंडिया हाअुसमध्ये' रात्रीच्या वेळी अेकत्र जमत असू तेथे अेका खालीमध्ये शेगडीच्या भोवती बसून अफिम्याप्रमाणे स्वराज्याचे मनातील मनोरे बांधणे हा आमचा अुद्योग असे त्या माझ्या प्रिय मित्रांपैकी सेनापति बापट आज माझ्याबरोबर येथे आहेत बाकीचे कित्येक फाशी गेले काही दुर्धर रोगाने पछाडले गेले व राणा-सारखे काही अद्यापि परदेशात पडून आहेत त्या वेळी आमच्या प्रतिज्ञा अशा असत की,

१ अेकत्रित व अखंड हिंदुस्थान हाच आमचा देश
२ शक्य त्या मार्गांनी मातृभूमि स्वतंत्र करू अशीच भावना आम्ही ठेवू ब्रिटिश हिंदुस्थान फ्रेंच हिंदुस्थान पोर्तुगीज हिंदुस्थान अशी नावे अैकली की आमच्या अंगातले रक्त अुसळून असे
३ हिंदी ही आमची राष्ट्रभाषा
४ देवनागरी ही आमची लिपी
५ लोकसत्तात्मक ही आमची राज्यपद्धति

## प्रतीकाचा भावार्थ

भावी स्वराज्याचे निशाण कसे असावे यावरही आमची चर्चा होत असे. तेव्हा आम्ही या राष्ट्रध्वजाचा आराखडा आखला तो असाच होता अमेरिकेतील संयुक्त संस्थाने तार्‍याच्या रूपाने अमेरिकेच्या निशाणावर असतात तेव्हा त्याप्रमाणे अखंड हिंदुस्थान तयार करणारे हिंदुस्थानातील त्या वेळच्या परिस्थिती-प्रमाणे भाषावार असे आठ प्रांत कल्पिले होते त्या आठ प्रांताची ही आठ कमळे निदर्शक आहेत अमेरिकन तार्‍याअैवजी कमलपुष्प हे हिंदुस्थानचे वैशिष्ट्य-निदर्शक असल्यामुळे त्याची योजना आम्ही केली ज्याकरिता शेकडो तरुणांनी आपली डोकी फोडून घेतली व फासावर लटकतानाही ज्याचा नामोच्चार केला तो 'वंदे मातरम्' हा राष्ट्रमंत्र म्हणून आम्ही या ध्वजावर योजला आणि 'यावच्चंद्रदिवाकरौ' आमचा हिंदुस्थान स्वतंत्र राहील हे दर्शविणारी ही

सूर्य व चंद्र यांची चिन्हे आहेत. यातील हिरवा रंग राष्ट्राच्या तारुण्याच्या जीवनाचे निदर्शक आहे. केशरी रंग यश दर्शवितो पण हे तारुण्य व यश ज्यावर अधिष्ठित करावयाचे तो रक्तरंग सर्वांच्या खाली योजला असून तो बलसामर्थ्य याचा निदर्शक आहे

## वंदे मातरम् नि मुसलमान

वंदेमातरम् या पदास मुसलमानाकडून आक्षेप आल्यामुळे पं जवाहरलाल नेहरू यानी कविवर्य रवींद्रनाथ टागोर याना दुसरे पद तयार करावयास सांगितले असे मी वाचले आहे पण त्या दुसऱ्या पदानेही मुसलमानाचे समाधान होणार नाही कारण टागोर हिंदुसंस्कृतीचे असल्यामुळे त्यानी दुसरे कोणतेही गीत केले तरी त्यात संस्कृत शब्द येणारच, आणि ते मुसलमानाना कसे पटणार ? कारण मुसलमानाना संस्कृत शब्दाचे भयंकर वावडे त्याना संस्कृत मान्य नाही, अुर्दू शब्द हवेत आणि नको तर 'अिन्क्लाब' हवे, अितका संस्कृतचा द्वेष करणाऱ्याचे नव्या राष्ट्रगीताने समाधान होणार नाही प. नेहरू याना मुसलमानाना पटेल असे पद हवे असल्यास त्यानी ते मौलवी जाफर अल्लीखान, बॅ जिना किंवा महमद अिक्बाल याना सांगावे

## प्रामाणिकपणालाही बळाची जोड हवी

देशात अैकी नांदावी, सर्व काही समेटाच्या धोरणाने व्हावे अशी पं जवाहरलाल नेहरू नि महात्मा गांधी यांची प्रामाणिक अिच्छा आहे परंतु हे जग प्रामाणिक नाही त्याला ते तरी काय करणार ? हे जग प्रामाणिकपणावर–सत्यावर किंवा न्यायावर अधिष्ठित आहे असे म्हणणे चूक आहे आपल्या प्रामाणिकपणाचाही अुपयोग होअील, पण तो केव्हा ? तर दुसऱ्यास प्रामाणिक बनविण्याअितका आपला प्रामाणिकपणा बलवान् असेल तेव्हाच या प्रकरणात तडजोड झाली तर आनंदच आहे, पण तसा संभव नाही जो जो तडजोडीच्या मागे लागावे तो तो ती दूर पळत असते तडजोड ही लक्ष्मीसारखी आहे तिला लाथ मारणाऱ्या विष्णूचे ती पाय चुरीत बसते, खिश्चन किंवा पारशी यांचा या ध्वजास विरोध नाही नि वंदे मातरम् या गीतासही नाही मादाम कामा या पारशी स्त्रीनेच परदेशात वंदे मातरम्‌चा पहिला अुच्चार केला पारशी किंवा खिश्चन हिंदूजवळ तडजोड मागत नाहीत हिंदु संस्कृतीशी त्याचा मुसलमानाअितका विरोध नाही धार्मिक मते निराळी असल्यामुळे ते आपल्या परमेश्वरास स्वतंत्र रीत्या पुजीत असले तरी हिंदु संस्कृतिनिदर्शक वस्तूस त्याचा विरोध नाही·

## तडजोडीचे दोन मार्ग

मुसलमानाशी तडजोड होण्याचे मार्ग दोनच आहेत. अेक तर ते म्हणतात त्याप्रमाणे आपले सर्वस्व सोडून पूर्णत्वाने त्याच्यात सामील व्हावे, किंवा त्यांची

कोणतीही पर्वा न करता बरोबर आल्यास त्याच्यासह, न आल्यास त्याच्याशिवाय, स्वातंत्र्याचा लढा स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंत पुढे रेटीत नेणे आजपर्यंतच्या स्वातंत्र्याच्या लढ्यात जास्तीत जास्त भाग हिंदूनीच अुचलला आहे. तेव्हा तडजोडीची अिच्छा कितीही प्रामाणिक असली तरी तशी परिस्थिति नाही परिस्थितीकडे कानाडोळा करून नुसत्या अिच्छेने कार्यभाग होत नाही कित्येक वेळा खडकावर बांधलेल्या दगडी किल्ल्यापेक्षा हवेवर बांधलेले किल्ले जास्त भरभक्कम ठरतात, हे या ध्वजाच्या आगमनावरून दिसून येते आम्ही ज्या वेळी अिंडिया हाअुसमध्ये बसून या ध्वजाविषयी कल्पना बांधीत होतो तेव्हा आम्हापैकी कोणाला कल्पनाही नव्हती की, पेशव्याच्या पुण्यात हा झेंडा मोठ्या सन्मानाने नेला जाअील व तेथे त्याच्याखाली शेकडो स्वातंत्र्यवीर गोळा होतील. केवळ त्या वेळच्या मनोराज्यातील त्या कल्पना होत्या

## ध्वजाचा जयजयकार

हे फडके तीस वर्षांनी परत येथे आले, पण ते तयार करणारी माणसे मात्र परत येथू शकली नाहीत मादाम कामा या नेमस्त पक्ष सोडून पुढे आम्हा क्रांतिकारकात समाविष्ट झाल्या, त्या वेळी जर्मनीमध्ये आंतरराष्ट्रीय समाजवाद्यांचे अेक संमेलन भरावयाचे होते आम्ही अिंग्रजांचे शत्रु म्हणून आम्हालाही त्या संमेलनाचे निमंत्रण आले प्रत्येकाने आपल्या राष्ट्राचे निशाण आणावे असे तारेने कळविण्यात आले तेव्हा आमचे मित्र श्री हेमचंद्र दास यांनी रात्रभर जागून हे निशाण शिवून तयार केले मादाम कामा यांनी आपल्या पोलक्यात लपवून ते जर्मनीत नेले व बर्लिन येथील प्रचंड जनसमुदायापुढे भाषण करून वंदेमातरम्‌च्या गर्जनेत हा ध्वज फडकाविला त्या वेळी त्या म्हणाल्या ' स्वतंत्र हिंदुस्थानचा हा ध्वज आताच जन्माला येत आहे, याला वंदन करा ' त्याप्रमाणे तेथील जर्मनांनी ' वंदे मातरम ' असे म्हणून या ध्वजाला अभिवादन केले आणि जर्मन राष्ट्राच्या बँडनेही सलामी दिली तेव्हापासून अभिनव भारत संस्थेचा हाच ध्वज झाला

भर दिवसा सूर्यप्रकाश असतो, परंतु अमावास्येच्या काळ्याकभिन्न रात्रीच्या अंधारात जेव्हा पाताळातील सूर्य प्रकाश पाठविण्यास असमर्थ असतो, अशा वेळी प्रकाश देणारा अेखादा क्षुद्र काजवाही बहुमोलाचा ठरतो, त्याचप्रमाणे हिंदुस्थानच्या त्या अंधकारमय परिस्थितीत हा ध्वज आम्हाला अंधाऱ्या रात्री चमकणाऱ्या चांदणीप्रमाणे आशादाता झाला होता न फाशीला भिता, न अंदमानला भिता, आपला जीवनत्याग करण्याची तयारी ठेवून ज्यांनी हा ध्वज तेजरूप ठेविला, त्यांचे आपण सर्व ऋणी आहोत त्यांच्यापैकी बॅ राणा व श्री वीरेन्द्रनाथ चट्टोपाध्याय (सौ सरोजिनी नायडूंचे बंधु) हे अद्यापि परदेशात

अडकून पडले आहेत. त्याना स्वदेशी परत आणण्याची चळवळ करण्यास हीच योग्य वेळ आहे.

## दुर्लक्षित देशसेविका

शामजी कृष्णवर्मा तर दिवंगत झाले, मादाम कामा या आपला देह ठेवण्यास येथे आल्या व अगदी दुर्लक्षित स्थितीत मरण पावल्या क्षयाने आजारी *असलेल्या कमला नेहरूंची प्रकृति सुधारण्यासाठी देशात ठिकठिकाणी सार्वजनिक* प्रार्थना झाल्या हे योग्यच झाले. परंतु ज्या मादाम कामानी तीस वर्षांपूर्वीच्या अंधारमय परिस्थितीत पाश्चात्य देशात आपल्या राष्ट्राचा ध्वज अुभारला, त्या मादाम कामाच्या शवावर मुंबअीमध्ये अेकही पुष्पहार अर्पण केला जाअू नये हे समजताच अुद्विग्नता येते. या थोर बाअीच्या स्मृतीस म्हणून मी या ध्वजापुढे हा पुष्पहार अर्पण करतो पूज्य अवशेषाचे प्रदर्शन म्हणून हा ध्वज सदैव सुरक्षित केला जाअील हे ध्यानात ठेवा. याचा कोणत्याही ध्वजाशी विरोध नाही.

आतापर्यंत मी सांगितलेला तो सर्व घडलेल्या गोष्टींचा अितिहास आहे पण आजची परिस्थिति लक्षात घेअून त्या परिस्थितीशी ज्याचा समन्वय होअील तेच करा.

## ध्वजाला काठी मिळवा

आज विधिमंडळे आपली आहेत; तोपर्यंत हत्याराचा कायदा नष्ट करून घ्या निदान अिंग्लंडमध्ये ज्या अटीवर हत्यारे बाळगता येतात तेवढी तरी सवलत *मिळविण्याची चळवळ करा. सध्या तशी चळवळ अगदी कायदेशीर पद्धतीने करता* येण्यासारखी आहे हा ध्वज येथे आला पण त्यास काठी नाही. ती काठी आपली शक्ति वाढवून मिळवून द्या म्हणजे तो अुंच अुंच जाअून मोठ्या डौलाने फडकेल.

हा ध्वज पुन पाहण्यास मी जिवंत राहिलो याबद्दल मी माझ्या देवाचे आभार मानतो. मला पूर्ण आशा आहे की, हिंदुस्थान हिंदु-स्थानच राहणार व स्वतंत्र हिंदुस्थानचे राष्ट्रगीत ‘वंदेमातरम्’ हेच कायम राहणार

* * *

## १४. हिंदु सभेने काय केलें ?

पुणे येथे टिळकस्मारक मंदिराच्या आवारातील मंडपात दि ३०-४-३८ रोजी स्वा. सावरकर यांचे ' हिंदुमहासभेने काय केले ? ' या विषयावर झालेले भाषण

### मनोवृत्ति बदलली

हिंदुमहासभेने काय काय केले असा प्रश्न नेहमी विचारण्यात येतो राष्ट्रीय सभा स्थापन झाल्यापासून चाळीच वर्षे तिने, प्रथम चूल मागली तापली म्हणजे ज्याप्रमाणे तिजवर जिन्नस शिजतो त्याप्रमाणे ४० वर्षे, तिने देशात अेक वृत्ति निर्माण केली व नतर पुढील वर्षात प्रत्यक्ष कार्याला प्रारभ केला

हिंदुमहासभा स्थापन झाल्यास वीस वर्षे झाली परतु अितक्या अल्पावधीत तिने जे कार्य केले ते राष्ट्रीय सभेला पन्नास वर्षातही करता आलेले नाही जनतेची मनोवृत्ति बदलून त्या जागी ध्येयाची तळमळ अुत्पन्न करणे हे काय हिंदुसभेने केलेले आहे आणि ज्यानी हे कार्य केले त्यानी अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत स्वजनाकडून अपमान सोसून ते केलेले आहे त्यानी आपल्या ध्येयास ताड पाडले व हिंदुत्वाचे कार्य पुढे रेटीत नेले

### टोपी बदलली पण डोके ?

आज राष्ट्रीय सभेत गेल्याने ज्याची तोंडे बद झाली आहेत अशा कित्येकाना गांधीनी जिनाकडे जावे हा अपमान वाटला, म्हणून त्यानी माझ्या घरी खेटे घालण्यास सुरवात केली ४०-५० मोठे मोठे राष्ट्रीयसभेवाले मजकडे आले व या प्रकारास मी काही तरी आळा घालावा अशी विनवणी केली मी जिनाकडे वा गांधीकडे यासबधाने कधीच जाणार नाही व बोलावल्याखेरीज तर नाहीच नाही असा माझा आग्रह तिऱ्हाअीत ठिकाणी दोघानीही भेटावे अस माझे मत आहे परतु माझ्याबरोबर तुमच्यापैकी कोणी आले पाहिजे, असे म्हणताच ' कृपा करून तेवढे बोलू नका ' आमची ताडे वायली गेली आहेत ' असे अुद्‌गार त्यानी काढले यावरून टोपी बदलली तरी डोकी बदलली नाहीत अशी माझी खात्री पटली

राष्ट्रीयत्वाच्या नावाखाली राष्ट्रीय सभेने हिंदुत्वाची गळचेपी चालविली आहे तिची पक्कड हिंदुसभेने ढिली केली. सीमा प्रातापासून कन्याकुमारीपर्यंत मुसलमानी आक्रमणे व अन्याय हिंदूवर होत आले ते राष्ट्रीय सभेकडून छपविले जात, ते हिंदुसभेने चव्हाट्यावर आणले. हिंदु सभा नसती तर विधर्मीयाच्या आक्रमणास वाचाच फुटती ना ! तुमच्या दु खाने रडणारी अेक तरी सस्था या देशात आहे व ती आपल्या परीने कार्य करीत असता तिने काय केले असा प्रश्न विचारणे हे कृतघ्नपणाचे आहे

सीमाप्रातात कॉंग्रेसच्या मत्रिमडळाने अेका गुन्हेगाराला, ज्याला हायकोर्टाने शिक्षा केली त्याला, पारितोषिक देअून मुक्त केले ज्या सीमाप्रातात हिंदु मुले व मुली बाजारात १०–२० रुपयास गुलामाप्रमाणे विकली जातात तेथे हा प्रकार घडला. या दुष्कृत्यास वाचा कोणी फोडली ? हिंदुमहासभेने ना ? मध्यप्रातातील शरीफ प्रकरण घ्या. मुबअीचे सटोडिया प्रकरण घ्या, याना वाचा फोडणारे हिंदु सभेशिवाय कोण आहेत ?

काश्मीरमध्ये शे. ९० मुसलमान आहेत. तेव्हा पं जवाहरलाल म्हणतात, बाकीच्या हिंदूनीही मुसलमान व्हावे गाधी म्हणतात, बहुसख्य जर मुसलमान आहेत तर राज्यमत्र त्यानाच देणे अिष्ट पण हाच नियम हैद्राबादला मात्र ते लागू करू अिच्छीत नाहीत ! या घातुक वृत्तीला आळा घातला असेल तर हिंदुसभेखेरीज कोणी घातला ?

राष्ट्रीय सभेची अशी स्थिति झाली आहे राष्ट्रीय सभा आपणास हिंदूची प्रतिनिधीभूत सस्था म्हणून जिनाशी वाटाघाट करण्यास जात आहे याचा अर्थ अेक तर राष्ट्रीय सभा पूर्ण राष्ट्रीय नव्हे असा होतो, नाही तर ज्या राष्ट्रीय सभेत हिंदु मुसलमान सर्वच असणार असा समज, त्या सभेने अेका जातीय सस्थेशी वाटाघाट करण्यास का जावे ?

## कॉंग्रेसवाल्यांना आव्हान

वरें, निवडणुकीच्या वेळी आम्ही हिंदु म्हणून आम्हास मत द्या असे राष्ट्रीय सभेच्या प्रतिनिधींनी न म्हणता आम्ही राष्ट्रीय म्हणून मत द्या अशी याचना केली व आता हिंदु म्हणून मुसलमानाची पायधरणी करू पाहतात, याचा अर्थ काय ? आम्ही जातीय निर्णयाला विरोध करू, आम्ही घटनाभग करू अशी आश्वासने दिली आणि आता त्याचा चालला आहे भग ! अशा स्थितीत प्रामाणिकपणा म्हणजे राजीनामा देअून त्यानी कौन्सिलाबाहेर पडावे व असे आम्ही करणार असे सागून पुन्हा निवडणुकीस अुभे राहावे !

राष्ट्रीय सभेचे अेक पुढारी प नेहरू प्रयागच्या दग्यामबधाने म्हणतात, 'ह ! त्यात काय विशेष, फक्त दोनच हिंदु मारले गेले, त्यात काय विशेष ?" जणू काय हे दोन हिंदु म्हणजे अुदीरच; मेले काय आणि जगले काय !

## मते देताना चूक झाली

हिंदु सभेचे दोन पुढारी भाओी परमानंद व डॉ मुंजे यांनी अत्यंत अपमान सोसून अुत्तर दक्षिण दिशातून सभेचं असंड कार्य चालविले आहे फाशीतून मुक्त झालेल्या लोकांनी फाशी जाणे बाओीट की चांगले हें सांगावें ! या मोलाची माणसं काँग्रेस-पुढाऱ्याचे थवेच्या थवे आज दिसतात त्यात किती आहेत ? नाहीतच तशी माणसे केवळ हिंदु सभेतच आहेत आपण आपल्या मताचा नीट अुपयोग केला नाही मुसलमानांनी केवळ कट्टया मुसल्मानास मते दिली तशी हिंदूंनी दिली असती तर आज वेगळेच रूप दृष्टीस पडल असते

हिंदुसभेने शुद्धीकरणाची प्रचंड लाट अुत्पन्न करून विधर्मीयांच्या भ्रष्टी करणास आळा घातला ही गोष्ट हिंदु सभेने काय केले याचीच निदर्शक नव्हे काय ? असे असता हिंदुसभेने काय केल असा प्रश्न विचारणारास मी असे विचारतो की, हिंदु सभा कोणाची आहे ? ती सर्वांची आहे प्रश्न विचारून आपली निष्क्रियता का दाखविता ? ती आपली आहे असं म्हणा, तिच बळ वाढवा म्हणजे हिंदूचा हिंदुस्थान ह नाव सत्य होओील

\+ \+ \+

## १५ निजामाला पेशवाओीची आठवण

पुणे येथे दि ११ ऑक्टोबर १९३८ रोजी शनिवारवाड्यापुढील पटांगणावर सेनापति बापट याचे व्याख्यान झाले त्या वेळी स्वा सावरकरांचे झालेले अध्यक्षीय भाषण

### प्रतिकाराचे दोन मार्ग

हैद्राबाद येथे हिंदु नागरिकांवर जे अत्याचार होत आहत, तेथे त्यांच्या स्वातंत्र्याच्या हक्कावर जे आघात होत आहेत, त्यांचा तेथे जो छळ होतो आहे त्याचा प्रतिकार करण्याची काही साधन आपल्या हाती आहेत की काय ह पाहून त्याचा अुपयोग आपल्या हैद्राबाद वधूच्या साहाय्याकडे कसा करता येओील याचा विचार सें बापट याच्या बरोबर मी आताच खाजगी रीतीने केला प्रतिकार करण्याचे दोन मार्ग असतात अेक सशस्त्र प्रतिकाराचा व दुसरा नि शस्त्र प्रतिकाराचा पैकी पहिला म्हणजे सशस्त्र प्रतिकाराचा मार्ग सध्या तरी ठीक दिसत नाही. सशस्त्र प्रतिकाराचा मार्ग अवलंबण ह पाप आहे असं मानणारा मी नाही व पापाच्या

भीतीने तो मी बाजूला करीत आहे असेही नाही असे असले तरी तो मार्ग अवलंबणे हे आपल्या सध्याच्या स्थितीत क्षेपेल की नाही याचा विचार करावयास पाहिजे. आणि या दृष्टीने विचार करता हैद्राबादेस नि शस्त्र प्रतिकार म्हणजे सत्याग्रहाचा मार्ग स्वीकारणे हे आज तरी योग्य ठरणार आहे. आजची सभा ही अनेक पक्षातर्फे आहे असे मी मानतो कारण हैद्राबादचा प्रश्न हा अेकाच पक्षाला बोचत आहे असे मुळीच नाही महाराष्ट्रातील सर्व पक्षानाच तो बोचतो आहे कोणालाच तो सहन होत नाही हैद्राबाद येथील अत्याचाराचा प्रतिकार करण्याचा प्रयत्न हजारोनी केला पाहिजे अेकट्या दुकट्याने किंवा अेकट्या दुकट्या पक्षाने हैद्राबादेचा प्रश्न सुटणार नाही

## आता पुढाऱ्याना त्रास देऊ नका

सेनापति बापट यानी सत्याग्रहाच्या बाबतीत जो पुढाकार घेतला आहे तो त्याच्या पदवीला शोभेसाच आहे से बापट यानी प्रत्यक पक्षाची वेगवेगळी पथके असावीत ही जी अेक सूचना केली ती मलाही मान्य आहे भागानगर अूर्फ हैद्राबाद येथील हिंदूना आपणाप्रमाणेच नागरिक स्वातंत्र्याचे मूलभूत हक्क मिळवून देणे हे महाराष्ट्रातील प्रत्येक व्यक्तीचे कर्तव्य आहे मग ती व्यक्ति कोणत्या अेका विशिष्ट पक्षाची असो वा नसो काँग्रेस निष्ठावतानी, समाजवादी पक्षाच्या निष्ठावतानी हैद्राबाद सत्याग्रहात भाग घ्यावा हैद्राबादच्याच प्रसगी काय, पण पुढे असा तऱ्हेचे दुसरे कसलेही प्रसग आले, तरी त्या प्रसगाना योग्य त्या प्रतिकारास तोड देण्याची तयारी प्रत्येकाने ठेवावयास पाहिजे प्रत्येकाने आपल्या देशासाठी यथाशक्ति मेहनत घेतली पाहिजे अुठल्या सुटल्या साध्यासुध्या गोष्टीतही पुढाऱ्याच्या मागे लागण्याची जुनी पद्धत आता तरुणानी मोडली पाहिजे जुन्या अनुभवी पुढाऱ्याच्या अनुभवाचा अवश्य फायदा घ्यावा, पण ज्यानी आपले देह देशकार्यार्थ तीन तीन चार चार तपे झिजवले, त्याची मने थकली नसली तरी, त्याचे देह थकले आहेत हे लक्षात घेअून व त्याच्या अनुभवाचा फायदा अधिक काळ आपणास लाभावा म्हणूनही त्यास त्रास देणे बरे नाही आपण स्वत काय काम करणार हे अगोदर मनाशी ठरवावे आणि मग आपल्या पुढाऱ्याना विचारण्यास जावे 'मी आहे अनुयायी, मी काय कार्य करणार ? आपण पुढारी तेव्हा आपणच पुढाकार घेतला पाहिजे' अस आता तरुण पिढीने म्हणू नये, नव्हे तस म्हणण्याचा त्याना अधिकारच नाही ज्या देशभक्तानी देशाकरिता देहदड सोसले त्यानी त अुपकाराकरता सोसले नसले तरी ते त्याचे आमच्यावर अुपकारच आहेत हे त्याचे अुपकार स्मरून व व्यक्ति-विषयक न्यायबुद्धि ठेवूनही त्याना वेळोवेळी त्रास देणे बरे नाही

## हैद्राबाद प्रकरणीं अेकनिष्ठ व्हा

सेनापति बापट हे जसे हैद्राबादचा लढा लढण्यास कोणाचीही वाट न पाहता

असल्यामुळे निजामाचे आपल्या पुण्यावर तेव्हापासून फार प्रेम (!) आहे पेशव्याचे वकील गोविंदराव काळे हे अेकदा हैद्राबादेस निजामाच्या दरबारात पेशव्याचे येणें वसूल करावयास गेले होते त्या वेळी निजामाच्या वजिराने पेशव्याच्या तसबिरी भर दरबारात आणून अपमान केला हा अपमान गोविंदरावाच्या मनाला अतिशय झावला तेथल्या तेथे, 'तुमच्या वजिराला पुण्यास भीक मागायला लावीन' अशी प्रतिज्ञा करून त्यानी आपल्या अंगावरचे अुपरणे तेथेच टाकले व ते तडक पुण्यास निघून आले ही हकीकत पेशव्याना कळताच नाना फडणीस व सवाअी माधवराव यानी लगेच सैन्य जमा केले व हैद्राबादेवर चाल केली निजामाला विस्ल्यात फोडले, दाती तृण धरून शरण आणले व त्याच्याकडून आपले येणे वसूल करून घेतले. त्याच्या वजिराला पुण्यास आणले आणि त्याच्या हातापायात बेड्या घालून त्याची गावभर धिंड काढली हा अैतिहासिक दाखला देण्याचे कारण असे की निजाम हा काही आकाशातून या लोकी आलेला नाही आपल्या पूर्वजानी त्याच्या पितराना पाणी पाजले आहे पेशव्याच्या वकिलाने जसे आपले अुपरणे दरबारात टाकले होते, तसेच ते बापट यानी आज हैद्राबादेत जाअून आपले अुपरणे तेथे टाकले आहे असे समजा आणि आपल्या बांधवावर होत असलेल्या अन्यायाचा प्रतिकार करण्याचा निश्चय करा कमीत कमी सहा महिनपर्यंत पंचवीस-पंचविसाची टोळी अखडपणे सत्याग्रहाकरता हैद्राबादेत जात राहील अशी व्यवस्था करून ठेवा नि शस्त्र प्रतिकाराचा प्रभाव तत्काळ दिसणार नाही, पण त्याचा परिणाम झाल्यावाचून व शेवटी यश प्राप्ति झाल्यावाचून राहणार नाही हे पक्के लक्षात ठेवा. प्रत्येकाने तन-मन धनद्वारा यथाशक्ति या लढ्यात भाग घ्यावा. ज्याना यापैकी काहीच करावयाचे नसेल त्यानी या कार्यास निदान विरोध तरी करू नये, स्वस्थ बसावे.

\+ + +

## १६. रडगाणीं नव्हेत, रणगाणी

श्री. ल. ब भोपटकर हे हैद्राबाद-सत्याग्रहास निघाले त्यावेळी दादर येथे दि २३-४-३९ रोजी भवानी शंकर रोडवरील ब्राह्मण सेवा मडळाच्या जागेत त्यास निरोप देण्याचा समारंभ झाला, त्यावेळी स्वा सावरकर यानी अध्यक्षपदावरून केलेले भाषण

हिंदूची सभा म्हटली की त्याला ठराविक स्वरूप असावयाचे. त्यातील भाषणे ठराविक, बहुतेक सर्व रडगाणी गाणारी, पण आजची सभा मात्र अगदी वेगळ्या

स्वरूपाची आहे. आजची सभा नेहमीप्रमाणे रडगाणी गाण्याकरिता नाही रणगाण्याचे सगीत म्हणणारी आहे आणि हे दिवस आता देवदयेने वारवार अुगवतील यात शका नाही. आज आपण ज्याना निरोप देणार आहो ते अण्णाराव हे काही अेखाद्या परिषदेला जात नाहीत, हैद्राबादेस सुरू होणाऱ्या सग्रामात भाग घेण्याकरिता जात आहेत ते अेकटेच जात नाहीत तर बरोबर दोन-अडीचशे नि शस्त्र प्रतिकारक घेअून जात आहेत निजाम राज्यात गुडाकरवी नि शस्त्र प्रतिकारकाना किती प्रकारे हाल सोसावे लागतात हे प्रसिद्ध आहे असे असूनही हे सैनिक मोठ्या घडाडीने लढ्यात भाग घेण्यासाठी जात आहेत हे अुत्साहवर्धक चिन्ह आहे महाराष्ट्रात जे नवे चैतन्य निर्माण झाले आहे त्याला अधिक चेतना मिळावी म्हणून वयाच्या ६० व्या वर्षी अण्णाराव भोपटकर हे स्वत जात आहेत त्याच्यामागून या लढ्यात असख्य मडळींनी भाग घेतला पाहिजे

२

## नुसती ठिणगी

आपण आता शाब्दिक ठराव करण्याच्या चाकोरीतून दूर जाअून प्रत्यक्ष कृति करावयास लागलो आहो. हीच वृत्ति आपण अशीच आणखी पाच वर्षे रेटीत नेली व आपण आपली बुद्धि दुसऱ्या कोणाजवळ गहाण टाकली नाही, त्याचप्रमाणे आपण आपला झेडा दुसऱ्याच्या हाती सुपूर्त केला नाही तर माझी खात्री आहे, जर्मनीने जशी पाच वर्षांत क्राति करून सोडली तशी आपण आपल्या देशात क्राति करून सोडू. गाधीजी ज्या वेळी 'अीश्वर राजाचे रक्षण करो' असे म्हणत होते त्या वेळी आम्ही पाचजणानी स्वातन्त्र्याची घोषणा केली व ती आज सर्व दशभर घुमू लागली आहे हैद्राबाद येथील नि शस्त्र प्रतिकाराचा लढा ही नुसती अेक ठिणगी आहे ही ठिणगी जर चेतली तर भुया तिच्यातून ज्वाला निघू लागतील व परवा भडका अुडाल्याशिवाय राहणार नाही आणि त्या वणव्यात हिंदुस्थानचे पारतन्त्र्य जळून खाक झाल्याशिवाय राहणार नाही

## गाधीजींना अुत्तर

डॉ मुजे हे गाधीजींच्या बोलावण्यावरून त्याना भेटावयास गेले त्या वेळी गाधीजी मोठा आव आणून म्हणाले की 'हे पहा डॉक्टर! सत्याग्रह हे अेक शास्त्र आहे व त्याचा प्रणेता मी आहे ते अितराना साधेलच असे नाही' हे त्याचे वाक्य पुरे होते न होते तोच डॉ मुजे म्हणाले, "हे पाहा महात्माजी, हैद्राबादचा जो हा लढा सुरू करण्यात आला आहे तो सत्याग्रह नाही तो नि शस्त्र प्रतिकाराचा लढा आहे" हे शास्त्र अेखाद्या सोम्या-गोम्याने काढलेले नाही. हे शास्त्र भगवान् श्रीकृष्णाचे आहे, श्रीछत्रपति महाराजाचे आहे 'तुम्ही आम्हाला शास्त्र काय शिकवावे? 'देव मस्तकी धरावा, अवघा हलकल्लोळ करावा' ही घोषणा अखिल भारतवर्षात

झाली त्याचे दृश्य फलही आपणास दिसू लागले आहे आता 'हिंदु तितका मिळवावा, हिंदुधर्म वाढवावा' ही घोषणा भारतवर्षात दुमदुमली पाहिजे आपण आज शस्त्रहीन आहो म्हणून आपणाला नि शस्त्र प्रतिकार करावा लागत आहे

**पाच वर्षे लढा चालवा**

नागपूरला दिलेले वचन महाराष्ट्राने दोन हजार नि शस्त्र प्रतिकारक पाठवून पुरे केले, पण अद्याप प्राप्त कर्तव्य पुरे झालेले नाही. तरी पण पेशवाओ गेल्यापासून निजामाने 'अरे' म्हटल्याबरोबर त्याला 'कारे' म्हणून छातीठोकपणाने विचारणारे हिंदु त्याला आताच भेटले, हे सुचिन्ह आहे. लढयाला आज प्रत्यक्ष यश जरी लाभले नाही तरी या लढ्यामुळे सर्व भारतातून खऱ्या हाडामासाचे जातिवंत हिंदु अेका भगव्या झेंड्याखाली अेकत्र झाले. त्याच्यामध्ये स्वतंत्रपणाने कार्य करण्याची वृत्ति निर्माण झाली हा फायदा काही लहान सहान नाही आपण हा लढा याच अुत्साहाने आणखी पाच वर्षे टिकवाल तर अेकट्या निजाम राज्यातलेच काय पण अितरत्र सुरू असलेले जुलूम पार नाहीसे होतील, अितकेच नव्हे तर हिंदु जनतेला स्वतंत्र स्थान मिळेल मी श्री भोपटकर याचे व त्याच्याबरोबर जाणाऱ्या नि शस्त्र प्रतिकारकाचे अभिनदन करतो व त्याना सुयश लाभो असे अिच्छितो

\+ \+ \+

## १७. टीकाकारांना अुत्तर

पुणे येथे ता १३-५-३९ रोजी शनिवारवाड्यासमोरील बाजीराव पटागणात स्वा सावरकर याचे 'भागानगरचा नि शस्त्र प्रतिकार' या विषयावर झालेले भाषण.

नि शस्त्र प्रतिकाराचा प्रारभ करताना मी येथे सुमारे सहा सात महिन्यापूर्वी भाषण केले होते दरम्यानच्या काळात या सग्रामाची फारच झपाट्याने प्रगति झाली आहे या प्रसगी येथे अुभा राहिलो असताना नि शस्त्र प्रतिकाराच्या लढ्यात भाग घेतल्याने जे धर्मबाधव या ठिकाणी अुपस्थित राहू शकले नाहीत, त्याचे मला प्रथम स्मरण होते या अनुपस्थित वीरात धर्मवीर अण्णाराव भोपटकर याचा नामनिर्देश मी मोठ्या अभिमानाने करतो. ते येथे अुपस्थित असते तर आनद

वाटलाच असता, पण आज ते येथे अुपस्थित नसल्याने मला अधिकच आनद व अभिमान वाटत आहे या चळवळीत धर्मवीर भोपटकर यानी जितक्या जोराने खाली अुडी घेतली, तितक्याच जोराने प्रतिकाराच्या सग्रामाची लाट अुच अुसळली आहे

## रडगाणे संपले, रणगाणे सुरू झाले !

आज या ठिकाणी अुभा राहून मी निजामशाहीविरुद्ध काही कागाळ्या सागू अिच्छीत नाही कारण त्याची जरुरीच नाही तेथील हिंदु बाधवाच्या अडचणी, हालअपेष्टा याची केविलवाणी रडगाणी मी सागत नाही आता ही रडगाणी सपली असून रणगाणी सुरु झाली आहेत हिंदूच्या अभ्युदयाच्या अुप कालाची सुखद झुळूक आता सुटू लागली आहे १८५७ च्या स्वातत्र्ययुद्धापासून परवापर्यंत आपण हिंदूच्या छळाची तीच ती रडगाणी अेकसारखी सागत आलो आहोत. आपल्या सुदैवाने ते दिवस आता सपले आहेत मी आता भागानगरातील हिंदूची दु खे सागत बसत नाही तर त्या दु खाचा परिहार करण्यासाठी हिंदु-सभेच्या विद्यमाने हिंदूनी काय प्रयत्न केले ते सागतो नि शस्त्र प्रतिकार ही अेक आपल्या सामर्थ्याची कसोटी आहे. आज आपल्याला अशा तऱ्हेची लढाअी खेळता येअू लागली हे यावरुन सिद्ध होअू लागले आहे या लढ्याविरुद्ध आपलेच काही बाधव व काही परके टीकाकार आक्षेप घेत असतात

## काश्मीर व हैद्राबाद

प्रथम हिंदुस्थानातील मुसलमान समाजाचे धोरण या बाबतीत कसे विसगत आहे ते आपण पाहू हैद्राबादेत राजा मुसलमान तर बहुसख्य प्रजा हिंदु याच्या अुलट काश्मीरात राजा हिंदु तर बहुसख्य प्रजा मुसलमान वास्तविक राजा व प्रजा याच्या अन्योन्य सबधाला अेकच न्याय दोन्ही ठिकाणी लावावयास हवा पण आपल्या मुसलमान बाधवाचे धोरण पहा काश्मिरात मुसलमान प्रजा बहुसख्य आहे म्हणून तेथील राजाला मर्यादित सत्ता असावी अशी मागणी ते करतात, पण हैद्राबादमधील हिंदूनी नेमकी तीच मागणी केली तर तेच मुसलमान विरोध करीत अुठतात! काश्मिरात बहुसख्य म्हणून मुसलमानाना हक्क हवेत याच्या अुलट

वल्गना करणारे कांग्रेसचे नेते काश्मीरच्या चळवळीला आशीर्वाद पाठवितात नि हैद्राबादच्या लढ्याला मात्र शिव्याशाप देत सुटतात संस्थानांतील प्रजेचा उद्धार करावयाचा आहे ना? मग त्यात भेदाभेद का करता? हिंदु राजा असलेल्या संस्थानातदेखील प्रजेवरील अन्याय हिंदुमहासभा सहन करणार नाही

## राजकोटच का?

संस्थानी लढाच चालू करावयाचा तर गांधीजींनी सर्वांत मोठें संस्थान का शोध नये? राजकोटमध्येच असे काय विशेष आहे? कुठे राजकोट नि कुठे हैद्राबाद लोकसंख्येच्या प्रमाणात दोघांची तुलनाच होऊ शकत नाही. राजकोटमध्येही प्रजेला त्रास होत असेल, पण हैद्राबादमध्ये चालू असलेल्या छळाच्या पासंगालाही तो पुरणार नाही राजकोटमध्ये आपले वाडवडील नांदले असे गांधीजी सांगतात. पण या निजामी राज्यात आमच्या वडिलांचे वडील नांदत होते हे त्यांनी का विसरावे? निजामी मुलूख ही आमची पितृभू वा पुण्यभू आहे, मग त्यासाठी लढण्याचा तुमच्याप्रमाणेच आम्हाला हक्क का नसावा? हैद्राबाद संस्थान सर्वांत मोठे हे मी सांगितलेच, पण सर्व संस्थानांत अत्यंत वाईट संस्थान कोणते असेल तर ते हैद्राबाद! स्वच्छता करावयाची तर सर्वांत गलिच्छ असेल तो भाग प्रथम सुधारावा! राजकोट तुम्हाला तुमचे माहेर वाटते, तसे हैद्राबाद हे आमचे माहेर आहे. हैद्राबादपेक्षा राजकोट निवडण्याचे असादे तरी विशेष कारण आहे असे आपण बुद्धिवादाची कसोटी लावून दाखवाल का? 'आतल्या आवाजाची' मात्र गोष्ट निराळी! याही उप्पर तुम्हाला मदत करावयाची नसेल तर करू नका सुमती सदिच्छा दाखवा, किंवा तीही दाखवू नका आम्ही तुमच्यापासून कशाचीच अपेक्षा करीत नाही. पण निदान विनाकारण शिव्याशाप देऊन नि बोटे मोडून आपले हसे तरी करून घेऊ नका! तुमचा हा विरोध पाहून हैद्राबादचा राजा मुसलमान आहे म्हणून तुम्ही हे धोरण स्वीकारीत आहा असे आम्ही स्पष्टच म्हणतो.

## 'परक्यांकरिता सहानुभूति का'?

हैद्राबादच्या लढ्यात संस्थानाबाहेरचे हिंदु लोक भाग घेतात असा आक्षेप आणला जातो हा आक्षेप कांग्रेसमधील काही पुढारी व त्यांचे नूतन मित्र अँग्लो-इंडियन वृत्तपत्रकार पुढे मांडू लागले म्हणजे मला हसू येते. सगळ्या जगाला सहानुभूतीच्या अश्रूंची पार्सले धाडणाऱ्या लोकांनी असले आक्षेप पुढे आणावेत हे आश्चर्य आहे! चीनमध्ये लढाई झाली की तुमची औषधे जाऊ शकतात. पॅले-स्टाईनच्या अरबांसाठी तुमचे कोवळे अंतःकरण भडभडून येते झेकोस्लाव्हा-कियाचा नाश झाला की तुमची झोप नाहीशी होते. स्पेनमधल्या लोकांना अन्न पोचविण्यासाठी हिंदुस्थानातून तुम्ही धान्याची बोट पाठवू शकता त्या वेळी तुम्हाला

आपण बाहेर राहणारे लोक आहोत, आपल्याला ही मदत करण्याचा काय हक्क आहे ही शंका स्वप्नात देखील येत नाही तुर्कस्थानच्या खिलाफतीची आफत डोक्यावर घेऊन साऱ्या हिंदुस्थानभर वेड्यापिशासारखे नाचत सुटला होतात ते काय खलिफा तुमचा सगासोयरा होता म्हणून? परके असूनही तुम्ही हे सारे अुद्योग सुखेनैव करू शकता मात्र आम्ही हिंदु आमच्या हाडामासाच्या आमच्या दाराशी राहणाऱ्या धर्मबांधवांच्या मदतीला धावून जाअू लागलो की तुम्हाला ही परकेपणाची सदय आठवते! असलीच टीका करणाऱ्या टाअिम्ससारख्या अँग्लो अिंडियन टीकाकारांना मी अितकेच सांगतो की आपण या देशात बाहेरूनच आला आहा, आपण आपला गाशा आधी गुंडाळा व चालते व्हा, म्हणजे तुमच्या या तक्रारीकडे लक्ष देण्याचा मी विचार करीन'

## अेक 'पोरकट' आक्षेप

निःशस्त्र प्रतिकाराच्या या लढ्यात लहान मुले पाठविली जातात असा आक्षेप आहे हा आरोप खोडसाळपणाचा आहे लढ्याचे चालक लहान मुलांना या लढ्यात भाग घेण्यापासून अेकसारखे परावृत्तच करीत असतात परंतु काही हट्टी पण निधड्या छातीच्या मुलांपुढे आमचे सारे प्रयत्न वाया जातात लहान अर्भकांना रणसंग्रामात अुडी घेण्याची आम्हा हिंदूंची परंपरा फारच जुनी आहे भारतीय युद्धात वीरमरण पत्करणारा अभिमन्यु नि पानपतच्या रणमैदानावर प्रचंड पराक्रम करीत पतन पावलेला विश्वास ही दोनही लहान मुलेच होती ब्रिटन सारख्या देशात असल्या हट्टी मुलांचे कोडकौतुक करण्यात आले असते, पण अिथे मात्र त्याच गोष्टीवर आक्षेप घेण्यात येत असतो निःशस्त्र प्रतिकाराच्या लढ्यात लहान मुलांनी भाग घेऊ नये हा नियम गांधीजींना तरी स्वतः सुरू केलेल्या लढ्यात स्वतः कधी पाळला का? असहकारितेच्या चळवळीत शाळांवर बहिष्कार घालण्याच्या आरोळ्या ठोकीत अुठला तेव्हा लहान मुलांच्याबद्दलची ही सारी माया कुठे आटून गेली होती? तसला अुपदेश करताना त्या मुलांच्या भवितव्याची तरी काळजी आपण कधी केलीत का?

घेते ना ! हिंदुसभेच्या नेतृत्वाखाली हिंदुस्थानातील सारेच प्रांत या लढ्यात सहभागी होत असले, तरी या लढ्याला द्रव्यबळ व मनुष्यबळ पुरविण्याचा मोठा वाटा महाराष्ट्रानेच अुचलला आहे. तसे करणे महाराष्ट्राचे कर्तव्यच होते नि ते बजावल्याबद्दल मी महाराष्ट्राचे मन पूर्वक अभिनंदन करतो.

\+ \+ \+

## १८. काँग्रेसचा विपर्यस्त दृष्टिकोन

**अमरखेड येथे दि ७ जून १९३९ रोजी सत्याग्रही जथ्यांना निरोप देताना स्वा. सावरकरांचे झालेले भाषण**

आमच्यावर सारखें आक्रमण सुरू असून आम्ही गेली ८० वर्षे सारखे झुंजत आहोत. कधीही स्वस्थ बसलो नाही. पण यापूर्वीची झुंज व आजची झुंज यात महदंतर आहे. आज आर्यसमाज व हिंदुमहासभा यांनी चालविलेली झुंज म्हणजे नि:शस्त्र का होईना पण प्रतिकार आहे; व तो आमचा जिवंतपणा दर्शवितो. आम्ही यापूर्वीपर्यंत पाश्चात्यांच्या तत्त्वज्ञानाने भलत्याच मार्गावर होतो आम्ही अग्नीवर दगडविटांचे ढीग रचून तो विझविण्याचा प्रयत्न करीत होतो व हेंच आमचे राष्ट्रकार्य असे समजत होतो. आजही कित्येक हिंदूंना हिंदु म्हणवून घेण्यास लाज वाटते.

आज माझें स्वागत करताना कित्येक घरावर, हातात नि हृदयात जो भगवा झेंडा फडकताना दिसत आहे तो फार दिवसांनी राजकीय चळवळीच्या निमित्ताने बाहेर पडतो आहे. वास्तविक आमचा हा भगवा ध्वजच खरा राष्ट्रीयत्वाचा निदर्शक आहे.

### आमचा झेंडा

अेकी दाखविण्यासाठी तीनरंगी व चरखा असलेला नवीन झेंडा अुत्पन्न करण्याची जरुरी नाही. तसे करणे हीनपणाचे आहे. आपल्या झेंड्याला अितिहास आहे भगवान् श्रीकृष्ण, श्रीशिवाजी महाराज, दयानंद आदींनी हाच झेंडा फडकविला होता. आम्हाला चरख्याचें चित्र काढण्याची जरुरी नाही. भगवान् श्रीकृष्णाचे सुदर्शन चक्र त्यावर पुराणकालापासून चितारलेले आहे. शिवाय ॐकार तर वेदकालापासूनच त्यावर कोरून ठेवलेला आहे. असा हा आमचा ध्वज अैतिहासिक आहे.

यापूर्वी आम्ही या झेंड्याखाली जमत असू त आमच रडगाणे गाण्यासाठी– आमच्या वायका मुसलमानानी पळविल्या आमच्यावर हल्ले होतात, आमची देवळे फोडली जातात, म्हणून आता आम्हाला बलिदान करावयास पाहिज अस बोलण्यास आम्ही जमत असू पण आम्ही आज म्हणत आहोत की, आता नुमत बलिदान नको आहे, नुसत हुतात्म नको आहेत

## रक्तातून अुसळणारे 'वंदेमातरम्'

निजामाने अमुक अपराध केला म्हणून आम्ही प्रतिकार केला हे सागण्या साठी आम्ही जमला आहोत आम्ही प्रतिकार करीत आहोत पूर्वीही मराठ्यानी असाच प्रतिकार केला होता फरक अवढाच की तो सशस्त्र प्रतिकार होता तर हा नि शस्त्र आहे गुरु गोविंदसिंगाचे दहा शिष्य मले तर आज निझामच्या तुरुगात १०००० प्रतिकारक आहेत त्याना वदमातरम म्हटल्याबरोबर फटके मिळतात पण त्याला न भिता प्रत्युत्तर म्हणून तो पुन्हा वदमातरम म्हणतो प्रत्यक फटक्या बरोबर अेक अेक रक्ताची चिळकाडी अुडत अेकेका चिळकाडीबरोबर वंदे मातरम !''वदे मातरम ! असा जयघोष तो करतो १-२ २५ मोजत बसत नाही फटकेच काय पण आमचे हातपाय तोडले तरी आम्ही माघार घेणार नाही आता सिद्ध झाल आह प्रतिकारापूर्वी सस्थानात अुघडपणे वंद मातरम म्हणण्यास चोरी अस आज त्या सस्थानातील तुरुगातसुद्धा रोज वंदे मातरम्' जयघोष अैकू यत आहे सस्थानात पूर्वी पडलेली देवळ दुरुस्त करावयास परवानग नसे आज श्री भोपटकराना तुरुगातील मुसलमानास जर नमाज पढावयास मना मिळते तर हिंदूस देअूळ असलच पाहिजे अस म्हणून आज औरगाबाद तुरुगा मारुतीच्या मूर्तीची स्थापना केली आह हा आमचा अपूव विजय आहे

## नवीन जागृति

सोलापुरात आर्यांनी व नागपुरात हिंदूनी हैद्राबादच्या नि शस्त्र प्रतिकारा ठराव केले, परतु त्या वेळस वाट की गेल्या ८० वर्षांत ज्या आम्ही प्रतिक म्हणून कधीच केला नाही त्याचे कस होअील? आम्ही प्रतिकार कसे करू शकू पण आज हिंदु समाजात जागृति झाली आहे पजाब सीमाप्रात, युक्तप्रात बगा मासारख्या दूरदूर प्रदेशातून येणारे प्रतिकारक पाहून कोण म्हणू शकेल का आम्ह विस्कळीत आहोत? या प्रतिकारात हिंदु आहेत जैन आहेत, सनातनी आहेत स लोक आहेत आमच्यात मतभद असले तरी ते आम्ही प्रसगविशेषी विसरू जातो हे आम्ही दाखवून दिल आहे

## राजकारणातही आम्ही पुढेच !

काग्रेसवाले हिंदुमहासभावाल्यास म्हणतात की, की तुम्ही जातीय आहात

राजकीय चळवळीत भाग घेत नाही ' पण त्याना मी या सभेतलेच अुदाहरण देतो आजच्या प्रतिकाराचे पुढारी श्री विष्णुशास्त्री केळकर आहेत याना 'अभिनव भारता 'चे वेळी सशस्त्र क्रांति करण्याच्या आरोपावरून ५ वर्षांची शिक्षा देण्यात आली होती असे कितीअेक क्रांतिवादी हिंदुमहासभेत आहेत हे काँग्रेसवाल्यानी ओळखून असावे

मुसलमान राजा असलेल्या संस्थानात जेवढी दडपशाही, अत्याचार होतात तेवढी अितर कोठेही होत नाही असे असून काँग्रेसवाल्याकडून मात्र त्यास ' रामराज्य ' म्हणून प्रशस्तिपत्रक देण्यात येते राजकोटसारख्या लहान व हिंदु संस्थानिकावर हात टाकून त्याला भीति घालण्याचा काँग्रेसचा डाव आहे वास्तविक पाहता राजकोटला 'अखिल भारतीय प्रश्न' करण्याचे कारण काय ? काय तेथे मुसलमानाच्या मुली पळविल्या जातात ? का मशिदी बांधून देत नाहीत ? का मुसलमानाच्या शाळा बंद केल्या आहेत ? या आणखी काही विशेष जुलूम करण्यात येत आहे ? असे काही नसताना हैद्राबाद, भोपाळसारख्या जुलूमी संस्थानाना सोडून गरीब हिंदु संस्थानिकाच्या मागे लागण्याचे कारण हेच की, काँग्रेसला मुसलमानाची भीति वाटते

## आमची पुण्यभू

हैद्राबादचा लढा जातीय असून तो बाहेरच्या लोकानी चालविला आहे असा आमच्यावर नेहमी आरोप करण्यात येतो गांधीजी राजकोटमध्ये जाण्याचे कारण काय ? तर त्याचे 'नाना' राजकोटचे रहिवासी होते मग त्याना हे माहीत नाही काय की, आमचेही नानाचे नाना रामराय हरिहरराय बुक्क यांची हाडे याच जमिनीत आहेत श्रीज्ञानेश्वर, अेकनाथ याच भूमीत नांदले, गोविंदसिंगाची समाधि येथेच आहे, आमची तीर्थे, आमच्या आयाबहिणी येथ आहेत या सर्वांवर हल्ले करण्यात आले, जबरदस्ती झाली, नि आम्ही त्याच्या मदतीकरिता गेलो तर काय परके झालो ?

## अेक न्याय पाळा

काश्मीरला शे २० हिंदु असून राजाही हिंदुच आहे. मुसलमान जास्त म्हणून मुसलमान अुर्दू भाषा हीच राजभाषा व्हावी असे म्हणतात नि राजास Limited monarchy देअून नुमते पेन्शन घ्या म्हणतात आणि सख्येच्या प्रमाणात प्रतिनिधित्व मागतात या चळवळीस प जवाहरलाल वगैरे लोक पाठिंबा देतात अुलट हैद्राबाद संस्थानात मुसलमान शे २० नि राजा मुसलमान आहे तरी तेथे अुर्दू भाषा राजभाषा आहे. तेथील मुसलमानासच बहुतेक मोठ्या नोकऱ्या मिळतात, हिंदूना बिलकूल प्रतिनिधित्व मिळत नाही म्हणून तक्रार केली तर आम्ही जातीय ठरतो

आमच्या कॉंग्रेसच्या पुढाऱ्याना अबिसिनिया अिटलीने घेतला म्हणून, चीनवर हल्ले होतात म्हणून पुळका येअून ते त्यास संदेश पाठवितात, वैद्य पाठवितात, रवींद्र टागोर स्पेनला कवने पाठवितात, परंतु अिकडे घरात चाललेला धुडगूस मात्र त्याना दिसत नाही हैद्राबाद सत्याग्रहात १० मृत्यु झाले याविषयी अेकानेही अेक ओळ लिहिली नाही. प्रतिकारासाठी अेकट्या महाराष्ट्राने ५,००० सैनिक पुरविले असून ४५,००० रु खर्च निव्वळ रेल्वे भाड्यासाठी केला आहे अेकटी महासभा हा प्रतिकार यमीत कमी सहा महिने चालविण्यास समर्थ आहे

## दोघांशीही टक्कर देअू

काही दिवसापूर्वी गांधी, हैदरी व व्हाअिसरॉय याची मुलाखत झाली असता हैदरींनी ब्रिटिश हद्दीतील शिबिरे नि खालसातील हैद्राबादविषयक चळवळी बंद करण्यासाठी *Princes Protection Act* लावा अशी व्हाअिसरॉयसाहेबाना विनंति केली त्यावर त्यानी सांगितले की, तो जर हैद्राबाद सत्याग्रहाला लागू केला तर अितरत्र ज्या संस्थानविषयक चळवळी सुरू आहेत त्यानाही तो लागू करावा लागेल त्यावर गांधीनी असे आश्वासन दिले की, बाकीच्या संस्थानातील सत्याग्रह मी थांबवितो आणि त्याचा परिणाम असा झाला की, अितर सर्व संस्थानातील सत्याग्रह थांबले आम्हाला हे पूर्वीपासूनच माहीत होते की प्रिन्सेस प्रोटेक्शन ॲक्ट लागणार नि त्या दृष्टीने आम्ही तयार आहोत. ब्रिटिशाना आम्ही सांगू अिच्छितो की, जशी आजपर्यंत आम्ही निझामाशी टक्कर दिली तशीच अुद्या तुमच्याशीही देअू.

\+ \+ \+

## १९. सन १८५७ चें स्वातंत्र्ययुद्ध

पुणे येथील १९३८ च्या वसंत व्याख्यान-मालेत दि १ मे रोजी स्वा सावरकर यांनी १८५७च्या स्वातंत्र्ययुद्धावर बोलताना केलेले भाषण

सत्तावन सालच्या युद्धप्रसंगाकडे आपले दुर्लक्ष होते, त्याचे कारण अिंग्रजाचे राज्य अद्याप येथे चालू आहे हे होय ते नष्ट झाले असते व स्वातंत्र्य स्थापले गेले असते, तर शिवाजी महाराजाप्रमाणेच त्या युद्धातील नानासाहेब पेशव्याचा आपण अुत्सव केला असता, गौरव केला असता, पुतळाही उभारला असता ! आजच्या क्रांतिकारक स्वातंत्र्यभक्ताना ' अत्याचारी ' ' माथेफिरू 'अशी दुरुत्तरे लावली जातात, तशीच विशेषणे सत्तावनच्या युद्धाला व त्यातील नेत्याना

रावली जात पारतंत्र्याचा प्रभावच अितका जाचक असतो की, आपल्या अुदार-वृत्तींचा मोठेपणाही सर्वांना गाता येत नाही कै विनायक कोंडदेव ओक यांचे ' शिपायांचे बंड ' मी वयाच्या १२ व्या वर्षी वाचले होते त्यात त्या नरवीरांची अितकी निंदा केलेली आढळली की, तशी अिंग्रज ग्रंथकारही करीत नाहीत ! कै पारसनिसांनी ' झाशीच्या राणीचे चरित्र ' लिहिले त्यातही ती स्वातंत्र्य-लक्ष्मी बळाने बंडवाली बनवली गेली असं त्यांना, त्या वेळच्या परिस्थितीमुळे दाखवावे लागल न्यायमंदिरामध्ये राजद्रोहाच्या खटल्यात आपल भाषण वा लेख राजद्रोही नाहीच असं जसें मांडण्यात येतें नि ते जस राजनीतीमध्ये युक्तच आहे, त्याप्रमाणे झाशीच्या राणीने बुद्धया अिंग्रजांवर हत्यार अुगारलं नाही, आपले राज्य गेल्यामुळे ती तरुण कोमल मुलगी तुळशीच्या पूजेला लागली होती, पण बंडवाल्यांच्या लाटेत ती सापडली अशी कैफियत पारसनिसांनी दर्ण त्या काळाला धरूनच होत

## पुस्तकावर पोलिसाचा छापा

प्रो बहरे यांचे अलीकडचे पुस्तक पुष्कळस सत्यकथन करणार असल, तरी त्यातही विसंगति, मुरड वगैरे प्रकार आहेतच अल्पस्पर्शा कै प्रो शिवरामपंत परांजपे यांनी आपल्या ' काळ ' पत्रातून नानासाहेब, लक्ष्मीबाओीप्रभृति क्रांति-कारकांचे गुणवर्णन प्रसंगाप्रसंगाने चालू ठेवल होत निबंधमालाकार विष्णु-शास्त्री चिपळूणकर यांना तर नानासाहेबांबद्दल अितका जाज्वल्य अभिमान होता की, त्यांना पकडल्याची वातमी कानी यताच त्यांनी आपल्या घरी होणारा समारंभ बंद ठेवला ! नानासाहेबांची दहशत अिंग्रजांना अितकी बसली होती की, कुंभ-मेळ्यासारख्या यात्रेच्या ठिकाणी दर ५-१० वर्षांनी त्यांच्यासारख्या कोणातरी सज्जनाला पकडून ते फासावर चढवीत !

सत्तावनच्या प्रसंगाची खरीखुरी राष्ट्रीय भूमिका समजावून घ्यावी अशी मला फार दिवस अिच्छा होती, ती पुरी झाली अिंग्लंडात गेल्यावर तेथील ' अिंडिया ऑफिसात ' अेक प्रशस्तिपत्र घेअून, अितिहासाचा अभ्यास करणारा म्हणून मी प्रवेश केला तेथे केवळ ' १८५७ ' ही चिठ्ठी लावलेली अनेक कपाटे मला दिसली त्यात निदान ५०० तरी ग्रंथ असाव अिंग्रज शिपायांनी लिहि-लेल्या पत्रांपासून तो पार्लमेंटच्या दप्तरापर्यंत त्या विषयाचे कागदपत्र मला अपरं-पार मिळाले ते वाचण्यात मी पाचसहा महिने घालविले तेथील टिपणे घेअून त्यावर ' अभिनव भारता 'त मी चर्चा केली व पुस्तक लिहिले ते प्रथम लिहिल मराठीत त्याची प्रत माझे बंधु श्री. बाबाराव यांजकडे पाठविली तो सोलापूरचे श्री लिमये यांच्या छापखान्यात छापण्याचेही ठरले, पण पोलिसांचा छापा आला म्हणून ती प्रत परत अिंग्लंडास सुखरूप गेली ! तेथे मराठी छापखाना कसा मिळणार ?

म्हणून जर्मनीतील संस्कृत मुद्रणालयात ती छापण्यास दिली. पण तेथेही पोलिसाची छाया पडली ! म्हणून आज सिव्हिलियन असलेल्या दोघा तरुणाकडून त्या पुस्तकाचे अिंग्रजी भाषांतर करून घेतले.

## जगातील पहिल्या ' प्रतीचा ' अन्याय

प्रश्न पडला त्याचे नाव काय ठेवावे ? National Rising of 1857 हे समर्पक होते. पण हिंदुस्थान, त्याचे स्वातंत्र्य व त्यासाठी युद्ध ही शब्दत्रयी अेकत्र आणावी या हेतूने अमेरिकेप्रमाणे War of Independence हे नाव दिले ते पुस्तक आमच्या गुप्त मंडळीत वाचले जात असता त्यातील अेक प्रकरण चोरीस गेले. हे चोर कोण असतील हे अुघड आहे ! पुस्तक प्रसिद्ध होण्याच्या आधीच अिंग्रज सरकारने ते जप्त केले या अन्यायाविरुद्ध ' लंडन टाअिम्स 'मध्ये मी पत्र लिहिले. त्यावर टाअिम्सनेही असे छापले की, ' ही गोष्ट सरकारला लांछनास्पद आहे ! असा अन्याय जगात पहिल्यानेच होत आहे ! ' ते पुस्तक छापण्यासाठी फ्रान्सकडे धाव घेतली. पण तेथेही अिंग्रजांचे दडपण आले तेव्हा हॉलंडमध्ये खूप पैसे खर्च करून ते छापले या अवाढव्य खर्चाचा वाटा श्री. दादाराव करंदीकर व श्री. दादाराव खापर्डे यानी प्रेमाने अुचलला हे लक्षात ठेवा. माझ्या त्या अिंग्रजी पुस्तकाच्या प्रती अिंग्रजी नाटककादंबऱ्यांच्या पुठ्यांतून अिकडे पाठविण्यात आल्या त्यापैकी अेक प्रत डॉ मुंजे यांच्या घरी गेली व तिच्या पाठोपाठ गेला पोलिसही ! अमेरिका, जपान वगैरे देशात त्या पुस्तकाचा प्रसार झाला. ब्राझिलमध्ये तर २०० रुपयांना अेक प्रत विकली गेली ५७ साली बंदुकीच्या ज्या गोळ्या अुडाल्या त्यांचे वर्णन करणाऱ्या पुस्तकातून जे पैसे आले, ते अर्थात्च नव्या गोळ्या झाडण्याकडेच खर्च झाले ! अलीकडे भगतसिंगाने दोन भागात तें जप्त पुस्तक प्रसिद्ध केले व त्याची दुसरी आवृत्तिही निघाली. ५-५,१०-१०, रुपये त्या प्रती खपल्या असे ' आनंद मंडळाच्या ' खटल्यातच अुघडकीस आले आहे.

## बंड कोणाचें ?

अिंग्रज लोक सत्तावनच्या क्रांतियुद्धाला बंड म्हणतात हे स्वाभाविक आहे, जसे औरंगजेबाने शिवाजीच्या कार्यास म्हटले. पण रामदास म्हणतात त्याप्रमाणे ' प्रस्तुत यवनाचे बंड ' हीच वस्तुस्थिति होय. बंड असलेच तर पेशवाअी बुडवून येथे तख्त बळकावणाऱ्या अिंग्रजांचे होते, हिंदी शिपायांचे नव्हते. दहा लक्ष रुपये पेन्शन देअून बाजीरावाकडून जो संधि शस्त्राच्या बळावर अिंग्रजांनी करून घेतला, त्याच तहाच्या कागदाच्या मागील बाजूस, फार काय, दोन ओळीमधील अंतरात, असे अलिखितपणे लिहिलेले आहे की, पुनः शस्त्र मिळेल तेव्हा माझ्या देशाचे स्वातंत्र्य मी पुनः मिळवीनच मिळवीन. यात अनैतिक काहीच

नाही. परराष्ट्राने आक्रमण केले की, त्याच क्षणी परतंत्र राष्ट्र स्वातंत्र्ययुद्धास सदैव सज्जच असते असे समजा. या युद्धास शिपायांचे बंड कसे म्हणता येईल? नानासाहेब काय शिपाई होते की तात्या टोपे अिंग्रजांचे जमादार होते? या युद्धात दिल्लीचे बादशहाही सामील होते. सर्व राष्ट्राने अुभारलेले स्वातंत्र्य-युद्ध ते होते, कितीतरी संस्थानिक या युद्धात समाविष्ट होते.

## सामुदायिक अुठावणीचा विवेक

डलहौसीने स्वतः म्हटल्याप्रमाणे, रोमन साम्राज्याअेवढा मुलूख ५-६ वर्षांत खालसा करून टाकला. यामुळे तेथले संस्थानिक हळहळत व चडफडत होते. अिनामदारी व तालुकदारी जप्त झाली होती. नानासाहेब पेशवे यांचे अंतःकरण तर असंतोषाने पेटलेले असे. पण गनिमी कावा लढवून त्यांनी रेसिडेंटाशी गोडी-गुलाबीचे वर्तन ठेवले. खाने, नाच यांची रेलचेल त्यांनी केली व त्यांचा विश्वास संपादन केला. रशियाशी अिंग्लंडचे युद्ध सुरू झाले होते. ही संधि साधून त्यांनी अजीमुल्लाखान याला अिंग्लंडास पाठविला. तो फ्रान्समध्ये जाअून आला. रशियाशीही त्याने संधान बांधले. सातारकरांतर्फे रंगो बापूजी विलायतेस गेला होताच. हरद्वारची यात्रा करण्याचे मिषाने नानासाहेब लखनौस गेले नि त्यांनी तेथील बेगमेशी सख्य केले. सर्व हिंदुस्थानातील वारे लक्षात घेअून त्यांनी दि. ३१ मे हा दिवस सामुदायिक अुठावणीचा म्हणून ठरविला. गावोगाव 'चपात्या' पाठवून क्रांतिकारकांच्या शपथा घेतल्या गेल्या. बाजारोबाजारात, घाटोघाटावर यात्रायात्रामध्ये या युद्धाच्या वार्ता व बाटाबाटी यांचे वारे वाहू लागले.

## नानासाहेबांचा गनिमी कावा

अशा तयारीचे काळात भारत येथे मंगल पांडे नावाच्या क्रांतिकारकाचा रेसिडेंटाला संशय आला. लगेच त्याने त्याला अटक केली, पण पांड्याने सेनापतीस ठार केले. त्याला ता. १० मे रोजी फाशी देण्यात आले. ही ठिणगी पडताच युद्धाने अेकदम पेट घेतला. तोफा अिंग्रजांवर गोळ्या गेल्या. जय क्रांतिकारकांचा झाला! बँड वाजवीत व निशाण नाचवीत ते नानासाहेबांकडे गेले. प्रत्येक क्रांतिकारकाला अिंग्रज लोक 'पांड्या' म्हणतो यावरून मंगल पांडे यांची कामगिरी लक्षात आली. नानासाहेबांनी रेसिडेंटास गनिमी काव्याने पत्र लिहिले, 'तुम्ही मजवर पूर्ण विश्वास ठेवा. मी अेकनिष्ठेने साहाय्य करीन. तुमची बायकामुले मजकडे रक्षणार्थ पाठवा. सर्वत्र माझे शिपाअी असू द्या.' रेसिडेंटाने ते सारे मान्य केले, पण दारूगोळ्यावर अिंग्रज ठेवले. 'याने लोकांचा गैरसमज वाढतो' असे म्हणून तेथेही नानासाहेबांनी आपलेच सैनिक ठेवले, व शेवटी मध्यरात्री १२ वाजता धडाधड् तोफा डागल्या. 'शिपाअी आपले अैकत नाहीत' असे त्यांनी लिहिले नि 'माझा प्राण बचावण्याचा अेकच मार्ग म्हणजे शिपायांचे पुढारीपण घेणे हाच आहे' असे सकाळच्या

साहेबासही कळविले पण शिंदे किंवा निजाम किंवा शीख याप्रमाणे ते अिंग्रजाच्या बाजूने लढले नाहीत, यावरून त्यांचे वृकयुद्ध किंवा गनिमी कावा दिसून येतो

## अिंग्रजांचे अत्याचार

क्रांतिकारकांची लाट जोराने पसरली 'अुद्या चवुगवाळे आटावले पाहिजे' असे अिंग्रज बोलू लागले वारुळातून भराभर मुंग्या निघाव्या त्याप्रमाणे ठिक-ठिकाणाहून स्वातंत्र्य योद्धे निघाले तात्या टोपे हा तर मांत्रिकाप्रमाणे जणू मातीतूनच सैन्य निर्माण करी तो जिकडे जाअी तेथून दहा दहा हजार सैन्य आणि तुरग मोकळे होत अिंग्रजांना कापीत रक्ताचे पाट वाहवीत हे स्वातंत्र्य योद्धे विजयाच्या मार्गाने लखनौ, दिल्ली, आग्रा वगैरे गावोगावी अुत्साहाने चालले अिटाव्याचा कलक्टर ह्यूम याला तर दवळात लपून, तोंडाला काळे फासून, स्त्रियाप्रमाणे बुरखा घेअून पळ काढावा लागला याची भीति बसल्यामुळेच त्याने ३० वर्षांनंतर हिंदुस्थानच्या असंतोषाच रक्षणद्वार (Safety valve) म्हणून काँग्रेस स्थापन केली मद्रासच्या तिसऱ्या अधिवेशनात बिपिनचंद्र पाल यांनी हत्याराचा कायदा रद्द करण्याचा ठराव आणला असता त्याला विरोध या ह्यूमनेच केला। यावरून त्याचा डाव अुघडकीस येतो कानपूर येथे तर तीन दिवस प्रळय झाला बनारसला अिंग्रजांनी अमानुष कत्तल केली झाडाझाडाला हिंदी लोकांना अुलटे-सुलटे टांगून फाशी दिले झोपड्याझोपड्यांना आगी लावून कच्चीबच्ची व म्हातारीकोतारी यांना जाळून टाकले तेव्हा नानासाहेब खवळले वचनभंग करून बनारसला हिंदी लोकांची कत्तल अिंग्रजांनी केली नि ब्राह्मणांना जिभेने जमिनीवरील रक्त चाटावयास लावले हे कळताच गंगेच्या अर्ध्या पात्रात नावेत बसून जाणाऱ्या अिंग्रजांची अेकसहा कत्तल करण्याचा हुकूम तात्या टोपे याने घाटावर बसून शख फुकून दिला।

## समर्थ भावना अुत्पन्न करा

तात्या टोपेचा पुतळा अजून आहे त्याच्यावर मी फुल अुधळली। कोणी म्हणतात, अिंग्रजांवर दया दाखवावयास हवी होती मी त्यांना विचारतो अिंग्रजांनी नानासाहेबांवर दया दाखविली ? माझ्यावर दया दाखविली ? कान्हेऱ्यावर दया दाखविली ? नानासाहेबांनी नेपाळच्या राण्याला कळवळून पत्र लिहिले पण त्याने फक्त 'तुम्हाला वैयक्तिक साहाय्य करू' असे अुत्तर दिले। तेथे नानासाहेब गेले, त्यांचा अंत केव्हा झाला हे अज्ञात आहे खुद्द महाराष्ट्रात कोल्हापुरास ज्वाला भडकली नरगुंदकराच्या संस्थानातही तीच स्थिति झाली डॉ मुंजे यांची आजी 'यटा 'त होती अिंग्रजांनी नर्मदेच्या तीरावर कडक बंदोबस्त ठेवला होता, तरी तात्या टोपे यांना चार वेळा नर्मदा ओलांडली महादजी शिंद्यांनी दिल्लीच्या

शहाला तीन पिढ्या पेन्शनर बनविले होते हे विसरू नका. पानिपत नि ठाणेश्वर याची आठवण देणाऱ्या फजलुल हकला मी महादजीची आठवण देतो. युद्धात पळून आलेल्या सैनिकांचा नाकावर धिक्कार करून कानपूर येथे वेश्यानीही या युद्धात भाग घेतला. आजही निराळ्या रीतीने आपल्याला स्वातंत्र्ययुद्ध खेळावयाचे आहे, लाक्षणिक अर्थाने कानपूर गाजवावयाचे आहे. अेकटे हिंदुही स्वराज्य मिळविनील ही समर्थ भावना अुत्पन्न करा म्हणजे मुसलमानांचे अैक्य घडण्यासाठी चें जिना म. गांधींना आपण होअून पत्र पाठवितील. आपल्या राष्ट्राचे भवितव्य अुज्ज्वल आहे. हिंदूंचा भूतकाल स्फूर्तिदायक आहे. स्वातंत्र्यसंपादनास हिंदु हे पूर्णपणे समर्थ आहेत!!

\+ + +

## (२)

**अमरावती नगरात सुदर्शन नाटकगृहात स्वा. सावरकरांचा सन्मान करण्याकरिता सभा घेतली होती. त्या सभेत त्यांचे '१८५७ सालचे क्रांतियुद्ध' या विषयावर झालेले व्याख्यान.**

१८५७ पेक्षा १९५७ साली आपण काय केले पाहिजे हा जर आज विषय ठेवला असता तर बरे झाले असते. १८५७ सालच्या युद्धात जे अिंग्रज गेले त्यांचा स्मृतिदिन साजरा करण्याकरिता १९०७ साली लंडनमध्ये असताना अिंग्रजांनी अेक मोठा अुत्सव करण्याचे ठरविले होते. त्याचा प्रतिकार करण्यासाठी लंडनमध्ये आम्ही ६०-७० विद्यार्थ्यांनी 'हुतात्मा दिन' साजरा करण्याचे ठरविले. 'अभिनव भारताच्या' आम्ही ६०-७० सभासदांनी त्या वेळी हुतात्मादिन साजरा करून १८५७ मध्ये बळी पडलेले हिंदी वीर हे हुतात्मे होते—बडखोर नव्हते असे जाहीर केले. नानासाहेब, तात्या टोपे, राणी लक्ष्मीबाओी यांच्या स्मृतीला श्रद्धांजलि अर्पण करण्याकरिता त्या वेळी मी जे पत्रक लिहिले होते, त्यात 'जो वेळ गेली ती गेली. पण ज्या कार्यासाठी आपण आपले प्राण अर्पण केले ते ध्येय आम्ही १९५७ साली तुम्हाला पुरे करून दाखवू' असे म्हटले होते.

सरदार हरदामदास हे त्या वेळी (१९०७ साली) आमच्याबरोबर होते. ते मला म्हणाले, 'तुम्ही १९५७ साल काय लिहिता, १९१७ का लिहीत नाही?' पण आज १९१७ साल गेले, ३७ साल गेले, तरी आपला देश पारतंत्र्यातच आहे. मला असे वाटते की, १९५७ साली जर आम्हाला आपले ध्येय मिळविता आले तर आम्ही आपणाला भाग्याचे समजू.

## लाला हरदयाळांना श्रद्धांजलि

खरा हुतात्मा कोण हेही आज आमच्या देशाला ओळखता येत नाही तिकडे अेक हिटलर निघाला की अिकडे ' सवाअी हिटलर ' निघतो नुकतेच फिलाडेल्फिया येथे लाला हरदयाळ निधन पावले त्यानी हिंदुस्थानच्या अुद्धारासाठी जे काम केले त्याचा आपल्याला विसर पडू देअू नका! पण किती लोकाना त्याचे चरित्र माहीत आहे ? आता तरी घरी गेल्यावर या हुतात्म्याचे चरित्र पहा

## १८५७ पूर्वीची स्थिति

१८५७ सालच्या क्रांतियुद्धाच्या अितिहासाचे पान अुलटल्यावरोबर आपणाला काही आलेख आपणासमोर ठेवावयाला पाहिजेत. तेराव्या शतकापासून शिवाजीमहाराजाच्या जन्मापर्यंतचा ( १६२७ पर्यंतचा) अेक आलेख या दरम्यान मुसलमानाचे आक्रमण व मोगल साम्राज्य हिंदुस्थानात प्रस्थापित झाले होते. १७२७ ते १७७५ या दरम्यानचा दुसरा आलेख या वेळी यावनी सत्ता अुरली नव्हती हिमाल्यापासून कन्याकुमारीपर्यंत हिदुत्वनिष्ठ राज्य हिंदुस्थानात स्थापन झाले होते, निजाम व लखनौचा नवाव अेवढीच काय ती दोन मुसलमान सस्थाने राहिली होती अितक्यात प्लासीची लढाअी होअून अिग्रजी सत्ता अुदयाला येअू लागली. अेक्जूट, देशप्रेम या दृष्टीने अिंग्रज लोक आमच्यापेक्षा सघटित होते अिंग्रजानी आमचा पराभव केला हे अैतिहासिक सत्य मानावयाला मी तयार आहे. पण त्याचबरोबर त्याचे अुट्टे घण्याची शक्तिही आमच्यात आहे हेही पण मला सागावयाचे आहे

## डलहौसीचा ब्रह्मदेवाशी करार

१८५४ त ५६ पर्यंत डल्हौसीने ल्हानसहान सस्थाने खालसा केली डलहौसीने असे करण्यापूर्वी ब्रह्मदवाशी करार केला असावा अस मला वाटते! कारण औरस सतति नव्हती तेथ त्याने सस्थान खालसा केली सस्थानिकाना औरस सतति देअू नका म्हणून त्याने ब्रह्मदेवाला आदश दिला यमाकडे त्या सस्थानिकाना मारुन टाकण्याचे काम दिले, नि डल्हौसीने ही सस्थाने खालसा केली. ही अेक प्रकारची अैतिहासिक कादबरीच आहे. पाच वर्षात छत्रपति गेले, पेशवाअीचे वतन खालसा झाले तजावर व नागपूरकर भोसले याचीही हीच स्थिति डलहौसी, ब्रह्मदेव व यम याच्यात झालेला हा करार प्रत्येकाने पूर्णपणे पाळला. पाळेमुळे त्यानी खणून काढली अुरली-सुरली मुसलमानी सस्थानेही त्यानी बुडविली डलहौसीच्या पूर्वजानी जेवढा प्रदेश २०० वर्षांत लढाअी करून जोडला तेवढा त्याने या वारघायानी ५ वर्षांत जोडला

## पुनः स्वराज्य स्थापण्याची स्फूर्ति

या काळात पुन आपले राज्य प्रस्थापित करावे म्हणून जी स्फूर्ति झाली तिलाच १८५७ चे क्रांतियुद्ध म्हणता येअील हिंदुस्थान अिंग्रजानी मराठ्यापासून घेतला म्हणून ही जी स्फूर्ति प्रथम निर्माण झाली ती मराठ्यांच्या राजात, नानासाहेबाच्या मनात निर्माण झाली या घडामोडीवर प्रकाश पाडणारे चांगले पुस्तक लवकरच निघणार आहे ते पहावे.

झाशीची राणी, तात्या टोपे व नानासाहेब हे बाजीरावाचे आवडते होते. ते अेकत्रच खेळले नि वाढले बाजीरावाच्या वाड्यात शिवाजीपासून सर्वांची चित्रे ठेविली होती. अितिहास शिकवण्यासाठी त्याना अेक शिक्षक ठेवला होता. हे प्रत्येक चित्र पाहताना त्याना काय वाटत असेल नि अिंग्रजाविषयी द्वेष कसा वाटत असेल याची कल्पना करा अिंग्रजावर चढाअी करण्यापूर्वी परदेशातून काही मदत मिळविता यणे शक्य आहे का हे पाहण्यासाठी अजीमुल्ला, रंगो बापू यांच्यासारखे वकील परदेशी पाठविण्यात आले अजिमुल्लाने रशियात जाअून बोलणी केली तिकडे तुम्ही चढाअी करा, आम्ही अिराणच्या बाजूने हिंदुस्थानात येतो, असे रशियाने आश्वासन दिले होते

## नानासाहेब महायात्रेला निघाले

अशा रीतीने पूर्वतयारी करून नानासाहेब महायात्रेचे निमित्त करून बाहेर पडले अिंग्रजाना वाटले, बिचारा भाबडा तर आहे, जाअू द्या यात्रेला नानासाहेब जे निघाले ते प्रथम लखनौला गेले ही त्यांची प्रथम तीर्थयात्रा. तेथे ते बेगमेला भेटले. तेथून दिल्लीला गेले लखनौ दिल्ली ही काही तीर्थयात्रास्थळे नव्हेत. निदान अर्वाचीन काळातील तरी खात्रीने नव्हेत. या वाटाघाटीत असे ठरले की, प्रथम सैन्यात प्रचार करावा सैन्यातील प्रचाराला काडतुसाच्या प्रश्नाचा अुपयोग झाला. या काडतुसाना गाअीची व डुकराची चरबी अेकत्र करून लावली होती व ती दाताने कुरतुडून मग काडतुसाचा अुपयोग करता येअी गाअीची व डुकराची चरबी होती ही गोष्ट खरी आहे धर्मभावनाचा विचार न करता ही चरबी लावण्यात आली होती तथापि लढाअीला गेले ते या चरबीमुळे गेले ही गोष्ट खरी नाही तो गाअी-डुकराच्या चरबीचा प्रश्न नसून स्वातंत्र्याच्या चरबीचा प्रश्न होता राज्य हाती असले म्हणजे हजारो गाअींचे रक्षण करता येअील हे त्याना माहीत होते कारण हीच काडतुसे पुढे याच सैनिकानी वापरली तात्पर्य काय की, काडतुसे ही अेक आग लावण्याची काडी होती

## १० मेची पहिली अुठावणी

ता. ३१ मे या दिवशी अुठावणी करण्याचे ठरले त्या दिवशी जिल्ह्याच्या ठिकाणी चढाअी करावी असा निश्चय ठरला परंतु कार्याचे काम हे धड्याळासारखे

नसून घोड्यासारखे असते मे १० लाच पहिली अुठावणी झाली तत्पूर्वी सर्वत्र चपात्या वाटण्यात आल्या होत्या अेका गावाहून दुसऱ्या गावाला चपात्या पाठविण्यात आल्या ही चपाती म्हणजे घेतलेली शपथ — निमक खाल्ले — ही कल्पना तिच्या मुळाशी होती काही कलेक्टरानी या चपातीचे शास्त्रीय परीक्षण करून पाहिल पण त्याना त्यात काही आढळून आले नाही

मगल पाडे हा पहिला क्रांतिकारक होय अुत्तर हिंदुस्थानातील पलटणीचा हा नायक होता १० मे रोजी त्याने पहिली अुठावणी केली दोन दिवसाच्या आत अिंग्रजानी त्याला फासावर लटकावले या मगल पाडेची अिंग्रजाना अितकी दहशत बसली की, जो कोणी क्रांतिकारक तो पाडे ! पाडे आले — पाडे एढले अशी त्यानी कागदोपत्री भाषा वापरली आहे मीरत येथे रात्री १२ वाजता अुठावणी झाली तोफखाना ताब्यात घेअून व अधिकाऱ्याना मारून क्रांतिकारकाचे सैन्य बँड वाजवीत दिल्लीकडे गेल, पण बँडवर त ' God save the king ' हेच पद वाजवीत होते ! ६ महिने दिल्ली स्वतत्र होती ३-४ महिने दिल्लीचा वढा अिंग्रज सैन्यालाच लढवावा लागला

## मराठी साम्राज्याचा पुनर्जन्म

कल्पना करा, अुद्या प्रसिद्ध झाले की ' दिल्ली स्वतत्र झाली ,' दुसरी बातमी आली की, 'मीरत गेले,' तर क्रांतीचे प्रमाण केवढे मोठे होअील! नानासाहेबाकडेदेखील अिंग्रज सेनानी गेले ते त्या वेळी कानपूर येथे गेले ' आपण आमचे राजे, आपण रक्षण करा ' म्हणून त्यानी नानासाहेबाना विनविले नानासाहेबानी त्याना सरक्षणाचे आश्वासन दिले मात्र तुमचा तोफखाना माझ्या हाताखाली ठेवा, खजिन्यावर माझी शिवदी असू द्या अशा अटी नानासाहेबानी घातल्या त्या अिंग्रज सेनानीने कबूल केल्या कानपूर येथे बरोबर ३१ मे रोजी रात्री धाराला सुरवात झाली रात्री २ वाजता नानासाहेबाचे राज्य सुरू झाल अेका रात्रीच्या आत मेलेले मराठी साम्राज्य जिवत झाले अेक दिवस जरी ' माझे साम्राज्य पुन्हा सुरू झाले' ही कल्पना आली तरी मी माझ्या जन्माचे सार्थक झाल असे समजेन

मुसलमानाशी सगनमत करून चढाअी करण्यात आली हातातली तरवार स्वत वर अुलटली अशी अिंग्रजाची स्थिति झाली ३१ मे ते ३१ आगस्टपर्यंत सारखी धुमाकूळ सुरू होती क्रिमियन युद्ध बद करून अिंग्रजी फौज घेअून नवीन कमाडर अिकडे आले

## कानपूरला कत्तल का झाली ?

या अिंग्रज फौजेने प्रत्येक गाव घटक समजून नि तोफा लावून गावाना आगी लावून दिल्या झाडापाशी फाशीचे खाब अुभारून गावकऱ्याना फासावर लटकविण्यात आले या गोष्टी कानपूरला हाअू लागल्या युद्ध आहे तेथे सूड आहे म्हणून

मी त्याना दोष देत नाही अिंग्रजाच्या कैद्याना मात्र कानपूर येथे चागल्या रीतीने वागविण्यात आले होते पण त्या लोकानी कबूतराच्या गळ्यात चिठ्ठ्या बाधून आपल्या सेनानींना कळविले की, या ठिकाणी अमुक अमुक लोक पुढारी आहेत, आपण कानपूर घेतल्यानतर त्याना प्रथम फाशी द्यावे अशा लोकाना त्याच्या या देशद्रोहाबद्दल—अिंग्रजाच्या दृष्टीने तें देशप्रेम असेल—आजच्या युद्धनियमाप्रमाणे देखील ठार करण्यात येअील तेव्हा अशा लोकाची कत्तल जर त्यानी केली तर *अिंग्रज लोक जसे 'कोर्ट मार्शल' करतात, तसे त्यानी केले असे म्हणता येअील.*

## अिंग्रजांनी भाकलेली करुणा

अिंग्रजी फाजेने चालविलेल्या कत्तलीची वर्णने जेव्हा कानपूरला येअू लागली तेव्हा त्याचा सेनानी नील याचे मन आम्ही वळवितो, आमची हत्या करू नका, असे अिंग्रजानी सागितले त्याप्रमाणे त्याना नौकेवर चढविण्यात आले. अितक्यात बनारसच्या कत्तलीची बातमी आली या लोकाना आम्ही अितक्या चागल्या रीतीने वागवितो, पण ते मात्र आमच्या बायकामुलाची कत्तल करीत आहेत हे हिंदी सैनिकाना कळताच त्याना या लोकावर सूड अुगविण्याची अिच्छा होणे मनुष्य-स्वभावाला सोडून नाही सूड अुगविणाऱ्या नीलसारख्याचे जर पुतळे अुभारण्यात येतात, तर नानासाहेबासारख्याचे देखील पुतळे का अुभारू नयेत ?

अशा कत्तलीच्या गोष्टी घडू नयेत तर त्या अुभय पक्षाकडून घडू नयेत. आमचे स्वातंत्र्य तुम्ही हिरावून घेतले होते म्हणून या कत्तलीचे आम्हाला समर्थन तरी करता येअील, पण तुम्हाला आमची हत्या करण्याच्या कृत्याचे समर्थन करता येणार नाही चोरानी सावाला कुऱ्हाड मारली नि सावाने चोराला कुऱ्हाड मारली यात कुऱ्हाड मारण्याचा गुन्हा जरी दोघानी केला असला तरी चोराला आपल्या कृत्याचे समर्थन करता येअील का ?

## नानासाहेब व टोपे याचे पुतळे अुभारा !

जर लॉरेन्स, नील याच्यासारख्याचे पुतळे अुभारले जातात तर नानासाहेब, तात्या टोपे याच्यासारख्याचे पुतळे पुण्याला शनिवारवाड्यासमोर अथवा कानपूरला का अुभारले जाअू नयेत ? ज्या ठिकाणी कानपूरला अिंग्रज लोकाची कत्तल झाली त्या ठिकाणी अेका स्तंभावर असे लिहून ठेवण्यात आले आहे की, 'या ठिकाणी राक्षस लोकानी याची कत्तल केली आहे' हे वाचून हिंदी लोकानी लाजेने मान खाली घालावी असा लिहिणाराचा अुद्देश असेल पण तें वाचून मान अुच झाली. कारण साडलेल्या रक्ताचा तो सूड होता ! ! म्हणून मी नुकताच कानपूरला गेलो असता सूड अुगविणाऱ्याच्या या स्मृतीला मी जवळची फुले वाहिली आपला देश स्वतंत्र होताच *या लोकानी अुभारलेले हे पुतळे काढून त्या जागी आपल्या देशा-साठी जे लढले त्याचे पुतळे अुभारले पाहिजेत.*

## झाशीची संग्राम देवता

कानपूरच्या कत्तलीचा सूड अिंग्रजांनी कसा घेतला, त्यांनी रक्त साफ कसें करून घेतलें, हे आपण वाचले असेल कानपूर अिंग्रजांनी ताब्यात घेतल्यावर नानासाहेबांनी गंगेत नाव टाकली. तीतून ते कोठे गेले याचा पत्ता लागत नाही. कानपूर अिंग्रजांनी घेतल्यानंतर तेथे विजयोत्सव सुरू असता व युरोपचा नामांकित कमांडर तेथे असता तीन दिवसांच्या आत तात्या टोपेने पुन कानपूर घेतलें. झाशीच्या राणीला हे कळताच तिने अुठावणी केली झाशीच्या राणीची हकीकत आपणाला माहीत आहेच 'या वेळी जर शिंदे वडाला मिळाले असते तर आम्हाला आपले चंबूगवाळे सावरून स्वदेशी पलायन करावे लागले असते ' अशी तार अिंग्रज सेनानींनी पाठविली होती झाशीची राणी, तात्या टोपे हे खरे शूर आपल्या तत्त्वाला शेवटपर्यंत चिकटून राहणारा तो खरा शूर. नेपोलियनचा पराभव झाला म्हणून तो शूर नव्हता असे म्हणावयास कोणाची माय व्याली आहे ? तसेच झाशीची लक्ष्मीबाअी व तात्या टोपे हे शूर नव्हते असे म्हणावयास कोणाची माय व्याली आहे ?

## सेनापति तात्या टोपे

तात्या टोपे याच्या पराक्रमाचे वर्णन काय करावे ? कमीत कमी दीडशे लढाया हा वीर लढला. दहा हजार अिंग्रज फौजेशी त्याने तीन वर्षे सामना दिला. अिंग्रजांचे दोन नमलेले सेनानी मारले दक्षिणेकडे येण्याचा तात्याचा डाव होता. निजामाने असे आश्वासन दिले होते की, आम्ही तुम्हाला मिळू म्हणून अिंग्रजांच्या विरोधाला न जुमानता तात्या टोपेने आपल्या सैनिकांसह नर्मदा ओलांडली पण निजामाने वचन मोडले व सांगितले की, 'याद राखा जर तुम्ही पुढे आलात तर अिंग्रजांच्या वतीने तुम्हाला ठार करावे लागेल.'

तात्याचे सैनिक कामी आले होते साथीदार त्याला सोडून गेले होते तरीही 'मी पेशव्याचा सेनापति आहे ' हे तो शेवटपर्यंत विसरला नाही मानसिंह नावाचा अेक लहानसा संस्थानिक काय तो त्याला शेवटपर्यंत चिकटून होता. पण त्यानेच शेवटी फितुरी करून तात्याला पकडून दिले ! तात्याची न्यायासना-समोर चौकशी करण्याचा तमाशा करण्यात आला. 'तुम्ही बंडखोर आहात. तुम्ही मनुष्यहत्या केली,' असा त्याच्यावर आरोप ठेवण्यात आला. तात्याने या प्रसंगी जें वक्तव्य केले त्यात त्यांनी असे सांगितले की, 'मी मुळीच बंडखोर नव्हतो मी पेशव्याचा नोकर आहे. तुमचा शत्रु म्हणून मला गोळी घाला.' पण अिंग्रजांना न्यायाचा तमाशा करून त्यांना फाशी द्यावयाचे होते. विष द्यावयाचे असले तरी तें अमृत आहे असे सिद्ध करून तें देण्याचा अिंग्रजांचा रिवाज आहे. शेवटचे

मागणे काय म्हणून तात्याला विचारण्यात आले 'माझ्या वृद्ध वडिलाना त्रास देऊ नका' म्हणून त्याने सांगितले

आपल्या हातानी तात्यानी स्वत फास लावून घेतला मान आवळली गेली. धड खाली पडले तेव्हा या वीराला पाहण्याला तेथे हजर असलेल्या अिंग्रज फ्रेंच बायका माणसांची गर्दी लोटली. या वीराच्या केसाचे झुपके त्यानी तिकडे नेले

## तात्याची स्मृति कायम ठेवा

'तात्या टोपे हे मराठ्याचे शेवटचे सरसेनापति होते' असे त्याच्यासबधी अिंग्रज नि फ्रेंच बातमीदारानी आणि अितिहासलेखकानी लिहून ठेवले आहे शिवाजी महाराज यशस्वी झाले, त्याची आपण पुण्यतिथि करतो पण तात्या टोपे याना जरी अपयश आले तरी त्याची स्मृति आपण कायम ठेवा अेवढेच मला आपणास सागावयाचे आहे

\+ \+ \+

## (३)

## स्वातंत्र्यलक्ष्मीचें पुण्यस्मरण

**८० वर्षांपूर्वी ग्वाल्हेरच्या पायथ्याशी ज्या स्थली महाराणीचा देह पडला त्या ठिकाणी साप्रत अेक सुदर छत्री बाधली आहे दि १७ जून १९३८ रोजीं ग्वाल्हेर येथील नगरभवनात स्वा. सावरकराचे झालेलें भाषण**

केवळ अैतिहासिक दृष्टीने सत्तावनच्या क्रातियुद्धाच्या चार गोष्टी मी सागणार आहे त्याचा सबध साप्रतच्या राजकारणाशी नाही साप्रतच्या कालमानानुसारच साप्रतच्या कार्यकर्त्यांनी वागले पाहिजे स्वातन्त्र्ययुद्ध म्हणजे 'काडतुसाला चरबी लावल्यामुळे झालेले शिपायाचे बड होय' अशी कल्पना प्रसृत करण्यात आली आहे, पण ती चूक असल्याचं अिंग्रज ग्रथकाराच्या लेखा-वरुनच सिद्ध होते केवळ काडतुसास गायीची व डुकराची चरबी लावल्याचे समजल्यामुळे—आणि ही गोष्ट खोटी नव्हती—शिपायाच्या धार्मिक वेडाने अुचल खाल्ली म्हणावे तर नानासाहेबादिकाच्या पक्षातर्फे तींच काडतुसे वापरली जात होती, तसेच हे केवळ शिपायाचे बड होते तर त्यात नानासाहेब पेशवे, राणी लक्ष्मीबाअी झाशीवाली, बिहारचे वीर कुवरसिंह, लखनौचे नबाब, दिल्लीचे

याच ग्वाल्हेरच्या पायथ्याची शत्रूच्या हातून निसटून जाण्याचा प्रयत्न करीत असता तिच्या स्वतःच्या तोंडावर वार झाला. जिवाला जीव देणाऱ्या दासीचे सर्व शरीर तलवारीच्या घावानी भरून ती मरणाच्या दारी पडली पाठीशी ११। वर्षांचे मूल बांधलेले, अशा स्थितीत मर्दपणाने शत्रूशी झुंज देत नि स्वतःच्या शरीरास परक्याचा अपवित्र स्पर्श होऊ नये म्हणून उडी घेत असता दुर्दैवी नाला आडवा आला तो नाला राणी लक्ष्मीबाओलाच आडवा आला असे नव्हे, तर भारताच्या स्वातन्त्र्यलक्ष्मीलाही तो आडवा आला त्या नाल्याच्या काठीच राणीचा देहान्त झाला। अेका साधूने तिच्या मुखात पाणी घालून शेवटी त्या पवित्र देहास अग्निसंस्कार केला

## सेनापति तात्या टोपे

या स्वातन्त्र्ययुद्धातील दुसरे संस्मरणीय वीररत्न म्हणजे तात्या टोपे होत तात्या टोपे म्हणजे पराभूत शिवाजी शिवाजी महाराजाचे प्रयत्न यशस्वी झाले आणि त्यांच्या प्रयत्नास यश आले नाही अेवढाच काय तो फरक, बाकी सेनापतित्वामध्ये दोघेही सारखेच तात्यानी हा लढा सतत दोन वर्षे चालविला होता पण दगाबाजीने ते पकडले गेले आणि अिंग्रज सरकारने आपल्या कायद्याप्रमाणे त्याना फाशी दिले या वीरपुंगवाचे नित्यस्मरण आपणास असले पाहिजे

## हत्यारबंद मिरवणूक काढा!

या ठिकाणी महाराणीचा अश्वारूढ पुतळा अुभारण्याचा कोणाचा मानस असेल तर तेही स्मारक करावे पण खरे स्मारक तेच की, ज्या योगे प्रत्येक व्यक्ति राणी लक्ष्मीबाओसारखी तेजस्वी व वीरश्रीसंपन्न होअील दगडी मंदिरापक्षा जिवंत मंदिराने राणी लक्ष्मीबाओचे स्मारक झाले पाहिजे या समारंभाच्या व मिरवणुकीच्या प्रसंगाने सरकारी अधिकारी व सामान्य लोक हे सर्व अेकच आहेत हे येथे दिसून आले ही आनंदाची गोष्ट आहे, पण त्याबरोबरच खेदाची गोष्ट अशी की, या संस्थानात हत्याराचा कायदा नसता अवघी अेखादी दुसरी तरवार अेवढ्या मिरवणुकीत असावी। तरुणानी नुसते नेकटाय घालून भाग सजविण्यातच भूषण मानावे? लाहोर, अमृतसरला हत्यारबंद मिरवणुकी निघाल्या, त्याप्रमाणे येथील मिरवणुकीत कमीत कमी पाचशे तरवारी तरी हव्या होत्या तरवार हाती घेतली की हिंसा होते, ही कल्पना चूक आहे तरवारीचे प्रदर्शन म्हणजे आत्मशक्तीचे प्रदर्शन होय बंदूक घरात ठेवून हातात छडी घेअून बाहेर मिरवणे याला काय म्हणावे? यापुढे तरुणानी निशाणबाजीचे व तरवारीचे शिक्षण अवश्यमेव घेतले पाहिजे, तरच भावी काळात तरणोपाय आहे

\+ + +

## २०. लाला हरदयाळ

**पुणे येथे दिनांक १४ ५ १९३९ रोजी वसंत व्याख्यानमालेत स्वा सावरकर यांचे 'कै लाला हरदयाळ' यांच्या जीवनचरित्रावर सेनापति बापट यांच्या अध्यक्षतेखाली झालेले भाषण**

आपल्या बगल्यात थोड्याफार स्वार्थत्यागी माणसाच्या तसबिरी सापडतील पण तुमच्या बगल्यात कान्हेयाची तसबीर सापडणार नाही की, वैद्याची तसबीर सापडणार नाही ! आणि याचे कारण हेच ना की, त्यानी अमोल असा स्वार्थत्याग केला? आमची चित्रे दिसतात याच तरी कारण ? आज सरकारला आम्ही मोकळे असावे असे वाटते हेच की नाही ?

हिंदुस्थानच्या हिताकरता जगभर पसरलेल्या कित्येक देशभक्ताची तीन-पानीही चरित्रे नाहीत हीच अपेक्षा 'हरदयाळ' याच्या वाट्यास आली म्हणूनच काही आठवणी व अितर भाषात जी काही प्रसिद्धि मिळाली त्या आधारे मी 'हरदयाळ' याचे वृत्त निवेदन करणार आहे

### तीव्र बुद्धिमत्ता

त्याच्या बाल्याचे बाबतीत नक्की माहिती अुपलब्ध नाही पजाबमध्ये त्याचा कुठेसा जन्म झाला त्याच्या शालेय शिक्षणाबद्दलही माहिती अुपलब्ध नाही पण कॉलिजच्या अूर्फ विश्वविद्यालयीन शिक्षणात मात्र त्याचे तेज फाकू लागल त्याच्या साध्यासुध्या बावळटपणाखाली असलेली बुद्धिमत्तेची तेजस्वी तरवार चमकू लागली अेम् अे मध्ये अिंग्रजी भाषेत सबंध युनिव्हर्सिटीत पहिला क्रमांक मिळवून त्यानी आपले असामान्यत्व अितरास पटवून दिल, व म्हणूनच त्यास सरकारी शिष्यवृत्ति मिळवून विलायतेस जावयास मिळाल

### ख्रिस्ती धर्माचा पगडा

आधीच तैल्बुद्धि तशात अगी विभूतिमत्त्वदर्शक विक्षिप्तपणा व भोवताली ख्रिस्ती कॉलिजातील मिशनरी वातावरण, यामुळे त्याच्या मनावर ख्रिस्ती धर्माचा पगडा बसू लागला त्या भावनामय मनाची अशी खात्री होत चालली की, हिंदुस्थान ख्रिस्ती झाल्याशिवाय सुधारायाचा नाही 'लजपतरायावरही अिस्लामी धर्माचा पूर्ण पगडा बसत होता त्याच्या वडिलांचीही अिच्छा होती की लजपतराय यांनी मुसलमानी धर्म स्वीकारावा पण आमच्या सुदैवाने तो प्रसग टळला तसच हरदयाळाच्या बाबतीत झाले त हिंदु म्हणून जगले आणि हिंदु म्हणून मेले

### अिंग्लडात

पुढे अिंग्लडात जाअून त्यानी ऑक्सफर्डमध्ये नाव दाखल केल लगेच आपल्या बद्धतेची त्यानी तेथील अध्यापकावर पूर्ण छाप पाडली. त्याचे आणि अध्यापकाचे

विचारविनिमय होअू लागले धार्मिक व तात्त्विक विचाराची चर्चा चालू असताच बगालयातील वगभगाच्या चळवळीचे वृत्तान्त अिग्लडात अुमटू लागले बिपिनचद्र पाल, लालाजी, टिळक, याच्या नेतृत्वाखाली धुमधडाक्याने चालणाऱ्या चळवळीत भाग न घेणे म्हणजे जिवत नसण्यासारखे ठरले असते ह्याच चळवळी चालू असण्याचे सुमारास मी अिग्लडात जाअून दाखल झालो तेथे प श्यामजीबरोबर ' अिडिया हाअूस' मध्ये गेलो हिंदु विद्यार्थ्यांची चौकशी करीत असता हरदयाळ याचे नाव प्रामुख्याने माझ्यापुढ आले

त्याच्या व माझ्या गाठीभटी झाल्या त्याच्या अगच्या असामान्य गुणाचा मला परिचय झाला त्याच्या ठिकाणी असणाऱ्या विक्षिप्तपणाचा अनुभव यअू लागला व हळू हळू अस आढळून आले की, त्याची खिश्चन धर्मावरील श्रद्धा अोसरत जाअून हिंदी राजकारणाचे प्रश्न त्याच्या डोक्यात घोळू लागले आहेत

याच सुमाराम गोखलेही पण तेथे होते गोखले हे सरकारला अधिक जवळचे, म्हणजे सरकारला गोखले आवडत होते अस नव्हे टिळकापक्षा हे बरे, अस सरकारचे म्हणणे पण आमचे तसे नव्हते! आम्ही क्रातिकारक अिग्रजास भीतिदायक वाटत होतो म्हणजे असे म्हणता यअील की, आम्ही मुळीच नकोत म्हणून टिळक चालतील पण टिळकापेक्षा बोलणे चालणे करण्याच्या दृष्टीने गोखल बरे, म्हणून गोखले जवळचे असे सरकारास वाटे सरकारास यापैकी कोणीच आवडणारे नव्हते आजही अशाच गोष्टी दिसून येण्यासारख्या आहेत ज्यावर विश्वास ठेवला असता आपल्या पायास धक्का बसण्याचा सभव कमी अस सरकारला वाटत, त्यास सरकार जवळ करत व त्यासच भेटी—मुलाखती देत

## क्रातीची शपथ

क्रातिकारक विचारसरणीचा हरदयाळाच्या मनावर पगडा बसला अिग्लडला जबरदस्त दहशत बसविणारी चळवळ झाल्याविना हिंदुस्थानवरील त्याची पकड ढिली होणार नाही अस वाटून तशी परिस्थिति निर्माण करण्याच्या दृष्टीने हरदयाळने माझ्यासमार, माझ्या घरी सशस्त्र क्रातीची शपथ घेतली अेखादा बेत ठरला म्हणज मग तो पार पाडावयाचाच ही त्याची वृत्ति! लगेच ते ऑक्सफर्डला गेले नि शिष्यवृत्ति आणि विद्यार्थिदशा याचे राजिनामे देअून मोकळे झाले अध्यापनवर्गाने त्याचे मन वळविण्याचे नाना प्रकारचे प्रयत्न केले त्याच्या विद्वत्तेपासून होणारे फायदे त्यानी त्याच्या निदर्शनास आणले पण त्याचा त्याच्या मनावर काहीच परिणाम झाला नाही

## अेकातिक भावना

येथेच ते थाबले नाहीत ज्याच पारतत्र्य आपण झुगारून देण्यास निघालो आहोत त्याचे कपडे आपण घालणे म्हणजे गुन्हा असल्याची त्याची खात्री झाली

तसल्या थंड प्रदेशात नुसती कफनी, धोतर वगैरेसारखा पोषाख वापरणें प्रकृतीच्या दृष्टीने हितावह नसल्याचें आम्ही त्यांना खूप सांगून पाहिलें, पण त्यांच्या अुदात्त विक्षिप्तपणापुढे आमचें चालेना नि अेका कपड्यानिशी ते राहू लागले. त्यानतर जेवणाचे बाबतीत. जो हिंदु नाही त्याच्या हातचें अन्न खावयाचें नाही असा त्यानी सकल्प केला व हिंदु आचाऱ्याकडून हिंदु पद्धतीचें अन्न ते खाऊ लागले.

आमचा त्यांचा येथे मतभेद होता. ' जन्मभर आम्ही अिंग्रजांचे ववर्जी होअून हिंदुस्थानात बसलोच आहोत, आता तरी त्याच्याकडून आपली सेवा करून घेअू या ! त्याच्या बायकाना आपली भाडी घासू द्या ! त्यांना आमच्याकरिता स्वयपाक करू द्या ! ' असें आम्ही म्हणत असू. पण तें त्यांना रुचत नसे. असो ! याचा व्हावयाचा तोच परिणाम झाला. त्यांना ब्रॉंकेटाअीस्‌चा आजार झाला. पहिल्या पहिल्यादा त्यानी तो लपवून ठेवला; तरी पुढे तो त्याना असह्य झाला; तेव्हा त्याना औषधपाणी देणें जरूर होतें. थोडें बरें वाटल्यावर त्याना पॅरिसमध्ये डॅ. राणा याजकडे पाठविण्यात आले. हे राणा अद्याप जिवंत आहेत. त्यानी नि त्यांच्या जर्मन कुटुंबांनी त्याची अुत्तम व्यवस्था ठेवली आणि ते बरे झाले. पण त्या जर्मन बाअीच्या हातनें ते खाअीनात की तिच्याशी बोलेनात.

## क्रांतीचा जोर

बरे झाल्यावर ' अभिनव भारत ' सस्थेच्या सल्ल्याने ते क्रांतीच्या तत्त्वाचा प्रचार करण्यासाठी हिंदुस्थानात दाखल झाले. लगेच त्यांनी पंजाबात अेक आश्रम-वजा केंद्र अुघडलें. धुमधडाक्याने प्रचारकार्याचा सुरवात झाली. पण नवभारताचें केंद्र हिंदुस्थान असून तेथे हरदयाळ काम करीत असल्याचा सुगावा लागल्यामुळे त्यांच्यावर सरकारी वारंट सुटलें. ही बातमी कळताच ते स्थलांतर करू लागले; पण आता निभाव लागत नाही असे पाहून हरदयाळ पुनः अिंग्लडात आले. अिकडे अिंग्लंडातील क्रांतिकारक चळवळ अधिकाधिक जोरावू लागली होती. बॉंब तयार होत होते. फ्रान्समधून बुटांच्या पार्सलमधून पिस्तुलें येत, तीं हिंदुस्थानात पाठविली जात होतीं.

## गुप्त शिपायांच्या हातावर तुरी

आमच्यामागे गुप्तपोलिसाचा ससेमिरा लागून राहिला. आमचे ते सहचरच झाले. आम्ही कित्येक वेळेस त्याच्या हातावर छत्री अडकवून मोकळ्या हाताने चालावें नि त्या बिचाऱ्यांनी आमच्या छत्र्या घेअून मुकाट्याने आमच्या मागून चालावें ! आमच्यातला चारी नावाचा अेक मद्रासी गुप्त पोलिसात असे, हें कित्येक दिवस सरकारला माहीत नव्हतें. त्यामुळे आम्हास माहिती कळे. असाच अेके दिवशी अेक गृहस्थ मजकडे आला. आम्ही त्यास ओळखलें. त्याचें स्वागत

नेले तो म्हणाला, 'मला आपली खोली पाहावयाची आहे.' मी म्हणालो, 'ठीक आहे' त्याम मी खोलीत नेले खोलीत चारदोन वर्तमानपत्रे होती अेक आराम खुर्ची होती आम्ही त्यास खुर्चीवर बसविले त्याच खुर्चीत बाँब होते! अुद्देश हाच की, बाँब अुडालाच तर तो आणि आम्ही सर्वच खलास

आमच्या वातमीने ब्रिटिशाम दहशत बसली धिंग्राने कर्नल वायलीचा वध केला ब्रिटिशाना चागलीच दहशत बसली हजारो सह्यानी जे काम झाले नसते तें अेका घटनेने घडवून आणले

## जर्मनीशी संधान

याच वेळेस हरदयाळ पॅरिस येथे परत गेले तेथून मध्ययुरोपात संधान बाधण्याच्या कारवाया सुरू झाल्या जर्मनीशी सख्य जोडणे हेहि शक्यतो साधावे, हा हेतु, पण पण हा अितिहास पट्टाभिसितारामय्यान। अवगत नाही त्याच्या मते राष्ट्राचा अितिहास १९२० नंतर सुरू झाला! मुलास आपल्या जन्मापासूनच जग सुरू झाले असे वाटत असेल तर वाटो, पण वापही माझ्यासमोर जन्मला असेच तो म्हणेल काय? पट्टाभिसितारामय्याना हा अितिहास माहीत नाही, म्हणून तो घडलाच नाही असं का म्हणावयाचे आहे? हेच का 'सत्य'? असो

अितिहास, सत्य सांगितलाच पाहिजे त्यातले काय घ्यावयाचे, काय सोडावयाचे ते आपण ठरवावे सगळ्याच्या सगळ्या अैतिहासिक घटना असलात आणा असे मी म्हणत नाही, मुळीच आणू नका असेही मी सागत नाही, मी फक्त अितिहास सागत आहे.

अिंग्लंडमध्ये 'तलवार 'पत्र सुरू झाले मध्ये १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धाचे पुस्तक प्रसिद्ध झाले हरदयाळने पॅरिसमध्ये 'वंदेमातरम्' पत्र चालू केले. जिकडे तिकडे हिंदुस्थानचा बोलबाला सुरू झाला.

## म गांधींचे धोरण

म गाधी त्या वेळी युरोपातच होते त्याचा व हरदयाळाचा परिचय झाला. विस्तार सोडून बोलावयाचे म्हटले तर असे म्हणता येअील की, त्याचे आमचे खटके अुडू लागले त्याच्या आमच्या विचारात फार अंतर होते. कुठे God save the king म्हटले गेलें की ते ताडकन अुभे राहत नि आम्ही बसून राहत असू. ते यावर टीका करीत ते म्हणत 'राजा श्रेष्ठ आहे अीश्वरी अंश आहे त्याला मान देणे साम्राज्यातील प्रत्येक व्यक्तीचे काम आहे' अर्थात ही विचारसरणी आम्हास पसत नसे गाधीचा ओढा साम्राज्यरक्षणाकडे असे. आफ्रिकेत बोअराचे स्वातंत्र्यहरण करण्यास ब्रिटिश साम्राज्यसत्तेस गाधीनी जी मदत केली ती काय अहिंसातत्वास धरून झाली! पण त्याची ती वृत्तिच बनून गेली होती त्या वेळेस

वादविवाद चालू असता आम्ही क्रांतिकारक टेवलाच्या अेका बाजूस बसत असू व गांधी आणि त्यांचे आफ्रिकेतील अनुयायी टेवलाच्या दुसऱ्या बाजूस बसत. वादविवाद होअी ! दररोज अशी मौज होअी की, गांधींच्या बाजूचा अेक अेक शिष्य क्रांतिकारकाच्या बाजूस येअून बसू लागला अखेर गांधी अेकटेच अेका बाजूस राहिले ! आमच्या पक्षाबद्दल ' मारो काटो पथ ' असा अुल्लेख करून त्यांनी त्या नावाचे अेक पुस्तकही प्रसिद्ध केले

## मनाची द्विधा स्थिति

आमच्यावर अशी ही स्वकीयांची प्रखर टीका व परकीयांचा जुलूम चालू होता, तरी आमचे कार्य सुरूच होते हिंदुस्थानात पाठविलेल्या शस्त्रास्त्रांचा अुपयोग होअू लागला धरपकड होअू लागली. सहोदर, आप्त यांना पकडण्यात येअू लागले आमची नावे समजावीत म्हणून त्यांचे छळ होअू लागले मी बेचैन झालो दररोज बातम्या येत रोज मनाची बेचैनी वाढे ! हरदयाळ माझी समजूत घाली· पण माझे मन द्विधा झाले ' माझे सहोदर, माझे मित्र तुरुंगात हालअपेष्टा सोशीत असता मी मात्र फ्रान्समधील बागांतून फिरावे अरे, हें कसले जीवन ! ' हरदयाळ म्हणत, ' तू गेलास म्हणजे शक्ति गेली तू पुढारी – तू चळवळीचा आत्मा – 'छे ! मला ते पटेना मी म्हणालो ' मी पुढारी आहे किंवा नाही ते ठरावयाचे आहे जे हाल माझे आप्तेष्ट सोशीत आहेत ते मी सोसल्याशिवाय कार्याची पूर्तता होणार नाही मी जाणार जेथे माझे सगेसोयरे तडफडत आहेत तेथे मी जाणार त्यांच्यात मी जाणार '

### तत्त्वज्ञानाकडे कल

मी निघालो ! स्टेशनवर बरीच मंडळी जमली होती पण दोन बाजूस दोन म्लान व वरून बावळट दिसणारे चेहरे मी पाहात होतो अेक मॅडम कामा यांचा व दुसरा हरदयाळांचा हरदयाळांचे ते शेवटचे पुण्यदर्शन तथून मी निघालो अिंग्लंडात आलो नि पकडलो गेलो आमच्या कारागृहामुळे चळवळीचा विचका झाला हरदयाळांच्या कानावर गोष्टी गेल्या नवभारताच्या मंडळींनी शपथा मोडून साक्षी दिल्याच्या बातम्या अैकून ते पूर्ण अुदास झाले त्यांनी राजकारणाचा अभ्यास सोडून दिला व ते तत्त्वज्ञानाचा अभ्यास करू लागले !

अिंग्रजी, फ्रेंच, पर्शियन, अुर्दू संस्कृत अित्यादि भाषा त्यांना चांगल्या अवगत असून युरोपातील अितर भाषांचेही चालचलाअू ज्ञान त्यांना होते निरनिराळ्या भाषांतून धर्म व तत्त्वज्ञान यावरील विचार त्यांनी समजावून घेतले नि शेवटी बौद्ध धर्म आचरणात आणण्याचे त्यांनी ठरविले

## नवा धर्म

पुढे त्यांनी होनोलुलू येथे जिवंत राहावयास लागणारें तेवढेंच खाअून अत्यंत हालात दिवस काढण्यास सुरवात केली; पण अभ्यास सोडला नाही. हळुहळू नवा धर्म, की जो नवें व जुने यांची सांगड घालील असा, स्थापन करण्याचा निश्चय केला. विचारांची चौकट बनत चालली. त्यांच्या विचारास मूर्त स्वरूप येअू लागलें. त्या वेळेस भाअी परमानंद सरकारच्या रोषास पात्र होअून देशत्याग करून तेथे गेले. त्यांची व हरदयाळांची गाठ पडली. भाअी परमानंदांनी त्यांस अध्यात्मवादापासून परावृत्त केले. आधीच आपल्या देशात पुष्कळ आचार्य झाले आहेत. त्यांत आपली भर कशाला ? हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा प्रश्न हातात घेण्यास हा काळ अनुकूल आहे. भाअी परमानंदांच्या कोटिक्रमाने हरदयाळांचें मन पुनः वदललें. हिंदी स्वातंत्र्याची कल्पना त्यांना पटली व लगेच आपल्या नेहमीच्या स्वभावास अनुसरून ते त्यात हिरिरीने पडले.

## महायुद्धाची संधि

त्या वेळेस महायुद्धाचे ढग जमू लागले. अिंग्लंडचा जो शत्रु तो आपला मित्र ही भावना जागृत झाली नि जर्मनीत प्रयत्न करण्याच्या अिराद्याने हरदयाळ युरोपात गेले. पण जगायचें कसें? ज्या देशात जावें त्या देशात, त्या भाषेचा अेखादा लेख लिहावा व काय मिळेल त्यावर निर्वाह करावा! त्या वेळचे त्याचे हाल अवर्णनीय आहेत. आजच्या दोकडो कांग्रेसभक्तांचे हाल अेकवटले तरी 'अभिनव भारता'च्या अेकेका सभासदाच्या हालाची अन् त्यागाची बरोबरी होणार नाही. या गोष्टी पट्टाभिसीतारामय्यांना खऱ्या वाटणार नाहीत. पण अितिहास कोणाच्या वाटण्याबिटण्याचा विचार करीत नाही.

## वीस सालापूर्वीचें राजकारण

आम्हांस जर्मनांशी संधान बांधण्याचे कामात हळूहळू यश येअू लागलें. युरोपातील युद्धाचे प्रसंगी हिंदुस्थानात बंडाचा वणवा पेटला पाहिजे ही कल्पना जर्मनीला पटली. पैसाही येअू लागला. जगभर पसरलेली हिंदी माणसें वाटेल ती मदत देण्यास तयार झाली. काय सांगावें ! अहो, जगभर ठिकठिकाणी हिंदी माणसें आहेत. ती तेथे तेथे थोडीफार सुखी आहेत. काटकसर, हिंदु संस्कृतीस पोषक अशी राहणी अित्यादि गुणांमुळे त्यांनी गाठीशी बांधलेला पैसा हिंदवी स्वराज्याकरता पुढे केला. हिंदूंनी मिळविलेले स्वराज्य अुद्या साम्राज्य ठरणार आहे ! पण परराष्ट्रात या अशा तऱ्हेच्या चळवळी—वणवण फिरत केलेल्या चळवळी—विमानातून परराष्ट्रात फिरून आलेल्या चळवळ्यांच्या चळवळीपेक्षा आपणांस अत्यंत कमी वाटतात म्हणून का आपण १९२० नंतर खरें राजकारण सुरू झालें असें म्हणता ?'

अरे, आम्ही जिवत असताना तुम्हाला हे म्हणवले तरी कसे ? अिकडे हरदयाळ जमवाजमव करीत अमेरिकेत गेले तेथील शीख वगैरे मडळीच्या मदतीने हिंदुस्थानातील पल्टणीत भेद पाडण्याची खटपट सुरू झाली

## अमेरिकेच्या कैदेतून पलायन

याच वेळी गदर ' नावाच वर्तमानपत्र हरदयाळ मात भापात चालवू लागले प्रत्यक अकात ' १८५७ च स्वातत्र्ययुद्ध ' नावाच्या माझ्या पुस्तकाच भापातर प्रसिद्ध होअू लागल गदरचे अक पाठ करण्यात येअू लागले व सवत्र ब्रिटिशाविरुद्ध क्रातीचा प्रचार करण्यात यअू लागला या व अशा तऱ्हेच्या वातम्या अिग्रजाच्या कानावर जाअू लागल्या असल्या पाहिजेत म्हणूनच त्यानी अमेरिकेवर दडपण पाडून हरदयाळाना पकडण्याची खटपट केली पण अमरिकेस त्यापासून काडीचा फायदा नसल्यामुळे नि त्या वेळेस तिचे धोरण दारूगोळा व शस्त्रास्त्र विकून पैसा मिळविणे हें असल्यामुळे तिने हरदयाळास वरकाती कैद केल असल तरी आतून त्यानी पळून जाव अशी व्यवस्था केली त्याचा फायदा घेअून हरदयाळ पळाले नि मेक्सिकोत आले

तथून पुन हालचाली सुरू झाल्या

## बडाची तयारी

पसिफिक महासागरातून ब्रह्मदेशात यावयाचे, तेथील बदर ताब्यात घेअून बगाल्यात अुतरावयाच आणि बडाचा वणवा पेटवून द्यावयाचा—अदमानावर हल्ला करून तेथील क्रातिकारकाची मुक्तता करावयाची—अस झाल्यास फायदा घ्यावा म्हणून मद्रासच्या बाजूस अेमडन जहाज अुतरल पण तसे व्हावयाचे नव्हत अेक नवीनच वातमी वातावरणात अुमटू लागली हिंदुस्थानात अिस्लामी राज्य होणार! खलिफास हिदुस्थानात राजा करण्याच अभिवचन कैसरने दिले ! हो—त्याना काय? हिंदुस्थानात बड झाले म्हणजे झाले ! मग तिकडे खलिफा राजा होवो नाही तर आणखी काही होवो हरदयाळाचे तस नव्हत त्याना हिंदुस्थानात हिंदूच राज्य पाहिजे होत हे त्याचे ध्यय त्या ध्येयास धक्का बसल्याबरोबर त्यानी आपल अग काढून घेतल पण मुसलमानाना अतिशय आनद झाला ते हजारोंनी येणाऱ्या खलिफाच्या स्वागताथ सामोरे निघाले त्यात कित्येक अुपाशी मेले ही गोष्ट वेगळी

हिंदुस्थानात बड अुभारण्याची कल्पना विलयास गेली त्याबरोबर हरदयाळाचे भावप्रधान मन पुन अुदास झाले चळवळीतून अग काढून घेतल्यावर त्याची अनुकपनीय स्थिति झाली अन्नान्नदशा येअून वणवण फिरू लागणाऱ्या त्या थोर देशभक्ताची अिकडे आठवणही होअू नये ही केवढी शरमेची गोष्ट आहे !

## अपकारकर्त्यांची अपेक्षा

ज्याच्या प्रयत्नाने वॉर्सालि यशस्वी जर्मनाच्या तहाच्या वाटाघाटीकरिता तयार केलेल्या खर्ड्यात 'हिंदुस्थानास स्वातंत्र्य' अशी अट होती, त्या देशभक्ताच्या राजकारणास दडपून १९२० नंतरच राजकारणास सुरवात झाली असे म्हणणे केवढे अन्यायाचे आहे ! आनंदाची गोष्ट ही की, ते गेले खरे, पण निदान ही गोष्ट सांगण्यास मी जिवंत राहिलो.

पुढे थोडी निवळानिवळ झाल्यावर हरदयाळांना अिंग्लंडात राहावयाची परवानगी मिळाली, पण ज्या मातृभूमीकरता त्यांनी जीवाचे रान केले ती मातृभूमि डोळ्यांनी पाहावयाची त्यांना अनिवार अिच्छा झाली. त्यांनी तसे बरेच प्रयत्न केले. शेवटी त्यास परवानगी मिळाली, पण अिकडे येण्यास तिकिटाचे पैसे नव्हते. कोणास कशी गोष्ट सांगायची ही ? शेवटी भाओ परमानंदाच्या कानावर ही गोष्ट गेली. त्यांनी हरदयाळांना मनीऑर्डरने पैसे पाठविले आणि परत पावती हातात पडते न पडते तोच हरदयाळांच्या मृत्यूची बातमी येथे आली !

त्या महान् देशभक्तास आपल्या मातृभूमीचे पुन दर्शन झाले नाही ! !

या महान् देशभक्ताच्या मृत्यूच्या बातमीला वर्तमानपत्रात कोपऱ्यात स्थान मिळाले. अरे, तुमच्यातला अेखादा अुंदीर मेला तर तुम्ही स्तंभच्या स्तंभ भरून टाकता 'प्रसिद्ध देशभक्त अुंदीर मरण पावले' असे जाड्या अक्षरात छापता आणि हरदयाळसारख्या महान् देशभक्तास कोपऱ्यात जागा देता ? अगदी शरमेची गोष्ट आहे

\+ + +

जगातील निरनिराळ्या राजकीय पंथांकडे पाहताना आपण त्या विशिष्ट पंथाने व विचारप्रणालीने त्या त्या राष्ट्राचें भाग्य अुदयाला आलें कीं नाही हें पहावें. तें जर अुदयाला आलें असेल तर त्या राष्ट्रापुरता तोच पंथ चांगला व अितर वाअीट असेंच आपण म्हटले पाहिजे.

## हिटलरची कर्तबगारी

महायुद्धानंतर जर्मनीवर शस्त्रनिर्बंध व सैनिकनिर्बंध घालण्यात आ जर्मनीची लाडगेतोड करण्यात आली. जर्मनीने अमुक-संख्येपेक्षा अधिक लष्कर ठे नये, अमुक लांबीच्या तोफांपेक्षा मोठ्या तोफा तयार करता कामा नयेत, अ तऱ्हेचीच आरमारी जहाजें ठेवावीं वगैरे निर्बंधांनी त्याला जखडण्यात आलें हो त्या असहाय स्थितीतून हिटलरने जर्मनीला वैभवाच्या शिखरावर चढवलें नि अ परिस्थिति निर्माण केली की, हिटलरच्या कपाळाला किती आठ्या पडल्या याची नोंद परराष्ट्रांतील मुत्सद्द्यांनी घ्यावी. कारण हिटलरच्या मनोरचनेवर युरोपाती राजकारणात आंदोलनें होत असतात. या हिटलरने 'नॅशनल सोशॅलिझम' अर्था नाझीझमचा पुरस्कार केला. त्या वेळी प्रारंभी त्याला फक्त तीन अनुया मिळाले. आज सर्व जर्मन राष्ट्र त्याच्या पाठीशी अुभें आहे. जर्मन राष्ट्र अेकजिनस करण्याकरिता जर्मन आर्यवंशाच्या अेकीची त्याने घोषणा केली. ठिकठिका विखुरलेले जर्मन त्याच्या निशाणाखाली अेकत्र झाले. या दृष्टीने पाहता जर्मनां नाझीझमच चांगला असें म्हटले पाहिजे. जर्मनीला तो वाअीट आहे असें आपण क म्हणणार? अेकाचे विष तें परिस्थितीप्रमाणे दुसऱ्याचें अमृत ठरतें. तद्वतच निर निराळ्या राष्ट्रात वाढलेल्या तत्त्वज्ञानांची स्थिति आहे. म्हणून सर्व परिस्थिती अमुकच धोरण चांगलें व तमुकच वाअीट असें म्हणणें अदूरदर्शीपणाचे आहे.

## दुबळ्यांची सहानुभूति

हिंदुस्थानातील कवीने झेकोस्लोव्हाकियाला म्हणे संदेश पाठविला नि हिंदु स्थानातील लोकांची त्याना सहानुभूति आहे असें कळविलें. स्वतःचें स्वातंत्र्य गमावून बसलेल्या निर्बल लोकांनी झेकोस्लोव्हाकियातील वा अबिसिनियातील लोकांना सहानुभूति दाखविणें म्हणजे अेका अंधळ्याने दुसऱ्या अंधळ्याला सहानुभूति दाखवून त्याच्याविरुद्ध असलेल्या समर्थ डोळसाचा स्वतःवर राग ओढवून घेण्या-सारखें आहे. हिंदुस्थानसारख्या परतंत्र देशांतील लोकांनी स्वतःची कोणतीही मदत दुसऱ्याला करता येण्यासारखी नसता त्याला सहानुभूति दाखविणें म्हणजे दुसऱ्या समर्थ राष्ट्रांची सहानुभूति अकारण घालविण्याप्रमाणे आहे. दुर्बलाबद्दल कोणी कितीही सहानुभूति दाखविली तरी स्वतःच्या हिताच्या आड ती सहानुभूति येते असें दिसताच ती सहानुभूति मावळते. हेर हिटलरने दरडावताच ग्रेट ब्रिटन व

फ्रान्स यानी कसे तोंड फिरविले यावरून हेच स्पष्ट दिसून आले आहे. झेको-स्लोव्हाकियाच्या प्रश्नापासून हा पहिला धडा हिंदूनी घेतला पाहिजे.

## खरें राष्ट्र कोणतें ?

हिंदुस्थान हे हिंदुराष्ट्र आहे. त्यातील लोकानी असे स्पष्ट घोषित केले पाहिजे की, आमचे जपानशी, जर्मनीशी वा अिटालीशी मुळीच भाडण नाही. हिंदुस्थानला जे जे मदत करतील ते ते आमचे, मग त्याचे स्वराष्ट्रीय धोरण कोणतेही असो हिंदुमहासभेच्या कारभारी मडळाकडून हिंदु राष्ट्रातर्फे मी अशी घोषणा करवून घेणार आहे.

झेकोस्लोव्हाकियाच्या प्रश्नापासून हिंदुस्थानाने दुसरा महत्वाचा धडा घेतला पाहिजे, तो ' राष्ट्र ' व ' देश ' यामधील भेदाचा होय व्हर्सायच्या तहाने सध्याचा झेकोस्लोव्हाकिया अनेक भिन्न राष्ट्रीयत्वाच्या लोकाचा बनविला नि त्यालाच राष्ट्र म्हटले ! परतु आज अनुभवाला असे आले आहे की, ते राष्ट्र नसून अेका विशिष्ट क्षेत्रफळाचा तो अेक देश होता. सुडेटन जर्मन हे अनेक वर्षे जर्मनी-पासून अलग राहत आले होते; परतु हेर हिटलरने जर्मन आर्यवशाच्या अेकराष्ट्राची घोषणा केल्यापासून, आपले अतिम हित हे जर्मन राष्ट्रात सामील होण्यात आहे; त्याची व आपली पुण्यभू व पितृभू अेकच असली पाहिजे, आपण अेकमेकापासून अलग राहू शकत नाही या भावनेने सुडेटन जर्मनाच्या मनोभूमीची अशी पक्कड घेतली की, त्यानी आपण जर्मन राष्ट्राशी अेकजीव होणार अशी घोषणा केली नि ते आज जर्मन राष्ट्राशी अेकरूप झाले

झेकोस्लोव्हाकियाची झालेली शकले पाहून आपण हिंदुस्थानवासीयानी हिंदुस्थान हे राष्ट्र कोणाचे याचा खोल विचार करून आपले कोण नि परके कोण हे नीट ओळखले पाहिजे काश्मिरापासून कन्याकुमारीपर्यंत व कराचीपासून कामोरियनपर्यंत पसरलेल्या प्रदेशातील हिंदु लोकाना हिंदुस्थानाशिवाय बाहेर आपले म्हणून कोणी नाही. जे कोणी आपले आहेत ते याच देशात आहेत असे ज्याना वाटते त्याच्यावरच आपली सारी भिस्त ठेवली पाहिजे.

## मुस्लिम फेडरेशन

कराचीच्या मुस्लिम लीगच्या अधिवेशनात मुसलमानानी भावी फेडरेशनचे मुस्लिम फेडरेशन व हिंदु फेडरेशन असे दोन घटक असावेत असे घोषित केले. बगालचे मुख्य प्रधान फझलूल हक हे ' हिंदुओको सताअेगे ' असे घोषित करतात. मुसलमान सख्याधिक्य असलेल्या प्रान्तात मुस्लिमनिष्ठाचेच प्रधानमडळ झाले पाहिजे असे ते स्पष्ट म्हणतात ते स्वत ला प्रथम मुसलमान व मग हिंदी समज-तात. याचे कारण उघड आहे. मुसलमानाची पुण्यभूमि हिंदुस्थानाच्या बाहेर आहे.

ते पवित्र मानतात त्या भाषा हिंदुस्थानाबाहेर प्रचलित आहेत मुसलमानांची राज्ये व पादशहा हिंदुस्थानाबाहेर असल्याने त्यांच्याशी आपला घरोबा असावा, आपले भ्रात त आहेत असा त्याचा ग्रह आहे आजपर्यंत हिंदु राष्ट्राचे पुरस्कर्ते मुसलमानांच्या याच मनोवृत्तीची ग्वाही देत असत, म्हणून त्यांच्यावर जातिनिष्ठेचा छाप मारला जात असे परंतु आम्ही म्हणत होतो तेच बरोबर होते, असे मुस्लिम लीगने अंगीकारलेल्या धोरणावरून स्पष्ट होत आहे हिंदुस्थानातील मुसलमान हिंदूंच्या रक्ताचे आहेत फझलूल हकचे घराणे हे काही पिढ्यापूर्वी हिंदु असेल, परंतु आज त्याची भावना काय आहे हा प्रश्न आहे

## आमचे राष्ट्र

राष्ट्र हे प्रादेशिक मर्यादांनी होत नाही, केवळ अेक भाषेनेही होत नाही, तर परस्परस्वत्वाच्या भावनेने होत असते ज्यांना आपल्या मायभूबाहेर धार्मिक वा आधिभौतिक विलोभन नाही अशाच लोकांचे राष्ट्र होत असते

मुसलमानांना अरबस्थानाबद्दल आपुलकी वाटते कारण त्यांची ती पुण्यभूमि आहे त्यांना तुर्कस्तान, अिराण, अफगाणिस्तान हे जवळ वाटतात, कारण तेथे त्यांच्या संस्कृतीची राज्ये आहेत उद्या हिंदुस्थान विरुद्ध ही राष्ट्रे असा लढा आला तर मुसल्मान बावचळण्याचा संभव आहे, पण हिंदूंची स्थिति काय होअील ?

## हिंदूंना हिंदुस्थानावाचून गति नाही

हिंदुस्थानात हिंदूंचे पूर्वज राहिले नि वाढले त्यांची सर्व पवित्र स्थाने याच पुण्यभूमीत आहेत त्यांना जिवंत राहण्याला व मरण्यालाही या देशाबाहेर दुसरी जागा नाही त्यांना पृथ्वीतलावरच नव्हे तर स्वर्गात स्थान मिळवावयाचे असेल तरी हिंदुस्थानाविना दुसरी गति नाही त्यांचे देव क्षीणपुण्य झाले तरी त्यांना हिंदुस्थानच्या कर्मभूमीवर येअून पुण्य करून स्वर्गपद प्राप्त करून घ्यावे लागते म्हणून हिंदुस्थान हे हिंदुत्वनिष्ठांचे राष्ट्र आहे हिंदुस्थानातील हिंदेतरांशी आमचे भांडण नाही परंतु त्यांना जर हिंदूबद्दल अभेद्यपणा वाटत नसेल तर हिंदूंनी काय करावे ? मुसलमान हिंदूबरोबर असले तर हवेच आहेत परंतु ते नि हिंदु याचे राष्ट्र आज अेक आहे असे त्यांच्या वृत्तीवरून म्हणता येत नाही मुसलमानांचे राष्ट्र पाकिस्तान आहे अशा स्थितीत हिंदूंनी हिंदुत्वनिष्ठच राहिले पाहिजे

## हिंदूंच्या हिताचा बळी

हिंदुस्थानात हिंदूंचे राष्ट्रीयत्व नि हिंदुत्व ही विभिन्न असूच शकत नाहीत ते हिंदु पहिल्याने व दुसऱ्याने हिंदुच, कारण हिंदुस्थान हे हिंदुराष्ट्र आहे मुसल्मान हे मात्र मुसल्मान प्रथम व हिंदुस्थानवासीय नंतर होअू शकतात मुसलमान ज्या प्रांतातून बहुसंख्य आहेत त्या प्रांतात मुस्लिमनिष्ठ मंत्रिमंडळे

आहेत व सरहद्द प्रातासारख्या ठिकाणी जेथे कॉंग्रेसच मन्त्रिमडळ आहे तेथेही ते मुसलमानाचेच व्हावे असा त्याचा आग्रह आहे कारण त्याची दृष्टि पाकिस्तानाची आहे याच्या अुलट हिंदूकडे पहा ज्या सात प्रातात हिंदु बहुसख्य आहेत तेथील कॉंग्रेसची प्रधानमडळे राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेने भारली जाअून हिंदूच्या हिताचा बळी देअून मुसलमानाची आराधना करीत आहेत सोलापूरच्या कुळकर्णी वकिलाच्या खुनी माणसाला मुबअी सरकारने का सोडले तर तेथील मुसलमान समाज खूप व्हावा म्हणून! परतु हिंदुत्वाला जातीय मानणाऱ्या या कॉंग्रेस राष्ट्रीयाना मला असे विचारावयाचे आहे की, तुमची मतदारात असलेली गणना हिंदु म्हणून आहे तुम्ही मत हिंदूची मागता, परतु त्याच्या हितसबधाच्या रक्षणाची वेळ आली म्हणजे मात्र हिंदुत्वाबद्दल तुम्ही नाके मुरडून राष्ट्रीयत्वाच्या नावाखाली हिंदूची गळचेपी करता

## हिंदु तेवढा अेक

माझा असा सवाल आहे की, हिंदुत्वाची जर तुम्हाला अितकी चीड असेल तर हिंदु म्हणून स्वत च वर्णन केल्याविना जोपर्यंत स्वत च्या निवडणुकी होत नाहीत तोपर्यंत तुम्ही निवडणुकीला अुभे का राहता ?

आज जर हिंदूच्या हिताची हिंदूचे मताधिक्य असलेल्या प्रातातून गळचेपी होत असेल तर त्याचा दोष तुम्हा मतदारावर आहे हिंदुस्थानातील हिंदु तेवढा अेक; मग कोणत्याही धर्मपथाचा तो असो, अशी भावना ठेवून यापुढील सर्व निवडणुकीत तुम्ही हिंदुत्वनिष्ठ अुमेदवारानाच निवडून द्या हिंदुत्व आणि राष्ट्रीयत्व ही अभेद्य आहत, हिंदुस्थानाचे स्वातत्र्य हिंदूच्या बळावर मिळेल व टिकेल

✦ ✦ ✦

# २२. त्यांचा शत्रु तो आमचा मित्र

**पुणे येथे दि १-१-३८ रोजी विजयानद नाटकगृहात सकाळी ८॥ वाजता स्वा सावरकर याचे कै. न चि केळकर याच्या अध्यक्षतेखाली 'हिंदुस्थानचे आतरराष्ट्रीय धोरण' या विषयावर झालेले भाषण**

अिंग्रज लोक हे जर हिंदुस्थानवरील राज्यकर्ते नसते तर जपानी, अिटालियन अगर जर्मन या परराष्ट्रीय भाषाहून अधिक महत्त्व अिंग्रजी भाषेला आपण खास दिले नसते अिंग्रजी भाषेवरील प्रभुत्वामुळे अिंग्रजाच्या ठिकाणी आपणाबद्दल अधिक आदर अुत्पन्न होतो असे कित्येकाचे मत आहे, पण मला तसे वाटत नाही हा आपला अेक न्यूनगड आहे मी आज अिंग्रजीत बोलणार आहे माझे भाषण

चागले झाले तर त्यावद्दल शाबासकी देण्याची आवश्यकता नाही. तसेच माझें अिग्रजी भाषण चागले झाले नाही तर त्यामुळे वाटणारा आदर कमी होअील किंवा कार्यहानि होअील असेही मला वाटत नाही परराष्ट्रीय भाषात प्रभुत्व सपादन करण्याच्या कामी हिंदी लोकाचे अभिनदन केले पाहिजे. हिंदी गृहस्थ परकीय भाषा तेव्हाच आत्मसात् करतात. परतु परकीयाना आपली भाषा आत्मसात् करता येत नाही सबध जन्मभर सस्कृतचा अभ्यास करून, सस्कृत शब्दाचे अुच्चार नीट करता येत नाहीत असे परराष्ट्रीय विद्वान् आहेत

## प्रारंभीचे तीन प्रयत्न

चाणक्य-कालात आतरराष्ट्रीयसबधाचे शास्त्र परिणत स्थितीस पोचले होते. त्याच्या अर्थशास्त्रावरील ग्रथात मित्रराष्ट्र, शत्रुराष्ट्र, मित्रशत्रु-राष्ट्र शत्रुमित्र-राष्ट्र वगैरे शब्दप्रयोग पहावयास मिळतात. परतु तो काल गेल्यानतर समुद्र-पर्यटन हे पातक समजण्याचा विपरीत काल आला; आणि हिंदुस्थानचे अितर राष्ट्राशी असलेले सबध तुटले त्यामुळे आपले फार नुकसान झाले आहे. १८१८ साली स्वराज्य गेल्यापासून आमच्या दास्याच्या नि आग्ल-प्रभुत्वाच्या युगाला प्रार झाला. त्या वेळेपासून हिंदुस्थानच्या आतरराष्ट्रीय सबधात प्रगति कशी झा तेच मी सागणार आहे. राजा राममोहन रॉय हे अिग्रजाचा पेन्शनर बनलेल मोगल बादशहाच्या वतीने अिग्लडला गेले होते राजा राममोहन रॉय प्रसि समाजधुरीण होते. त्याच्या परराष्ट्रातील चळवळीत राजकीय हेतु असला तर त्यात आतरराष्ट्रीय सबध ठेवण्याचा हेतु नव्हता. त्यानतर या दृष्टीने दुसर मोठा नि महत्त्वाचा प्रयत्न म्हणजे रगो बापूजी याचा. युरोपातील परिस्थितीचाहि अभ्यास करण्यावद्दल त्याना आदेश देण्यात आला होता.

तिसरा अुल्लेखनीय प्रयत्न प वा. दादाभाअी नौरोजी याचा होय. तें त्यानी ' अिंडिया सोसायटी 'नावाची सस्था स्थापन केली. या सस्थेने बरेच अुपयुक्त कार्य केले. अिग्रज लोक हे जात्या चागले आहेत नि हिंदी लोकाचे कितो हाल होतात, त्याच्यावडून पैसा कसा देशाबाहेर नेला जातो हे त्याच्या निदर्शनास आणून दिल्यास ते ह्या परिस्थितीला आळा घालतील, असा त्या वेळी समज होता पण तावडा समुद्र नि अरेबियन समुद्र याचे पाणीच वाअीट ! त्याचा परिणाम होताच अिग्रज लोकाच्या विचारात अेकदम पालट होतो.

## नवीन संस्था

त्या वेळी अिग्लडमधील वृत्तपत्रात हिंदुस्थान-विषयक मजकूर येण्यासाठी, वृत्तपत्राना पैसे द्यावे लागत. पण त्यानतर ' अभिनव भारत सोसायटी ' स्थापन झाल्यावर परिस्थिति पालटली. त्या वेळेपासून, अिग्लडमधील लोकाचे हिंदुस्थान-कडे अधिक लक्ष वेधले नि हिंदी वृत्त छापून आणण्यासाठी त्याना पैसे द्यावे लागत

ते अुलट हिंदी लोकाना त्यासाठी पैसे देअू लागले. हिंदी लोकाचे रक्त अगदीच थड नाही, वेळप्रसगी ते तप्त होअू शकते याचा अिग्रज लोकाना प्रत्यय आला. परतु तत्पूर्वी ना. गोखले नि सुरेन्द्रनाथ बानर्जी याच्यामुळे हिंदुस्थानच्या आतरराष्ट्रीय धोरणात वाढ होअून, त्याला अिष्ट असे वळण लागले हिंदुस्थान दास्यत्वाचे जोखड भिरकावून देण्यास किती अुत्सुक झाला आहे हे या देशभक्तानी अिग्लडच्या निदर्शनास आणून दिले तथापि आतापर्यंत राजकारणाच्या दृष्टीने विशेष परिणाम झालेला नाही विवेकानदानाही हाच अनुभव आला होता भारताच्या वेदान्ताची वगैरे महती मान्य करून लोक सभेच्या शेवटी त्याना विचारीत, ' हिंदुस्थानचा वेदान्त अेवढा मोठा आहे तर मग मूठभर अिग्रज लोक त्याना दडपून कसे ठेवू शकतात? ' हा प्रश्न अर्थातच त्याना निरुत्तर करी

## प्रचाराचें महत्त्व

' अभिनव भारत ' सस्थेच्या चळवळीमुळे हिंदुस्थानातील चळवळीकडे लक्ष देणे जरूर आहे असे अिग्रजाना वाटू लागले, अेवढेच नव्हे तर अितर राष्ट्रातही हिंदी राजकारणाला महत्त्व प्राप्त झाले या चळवळीसबधात श्री हरदयाळ, प श्यामजी, बॅ राणा वगैरे पुढाऱ्याचा प्रामुख्याने अुल्लेख करणे जरूर आहे. जर्मनी वगैरे राष्ट्रात ' अभिनव भारत सस्थेच्या ' शाखा स्थापन करण्यात आल्या. जर्मन कैसरने तर आपल्या अटींत हिंदुस्थान स्वतत्र झाला पाहिजे अशी अट घातली होती त्यावरून या पुढाऱ्याच्या प्रचारकार्याचे महत्त्व लक्षात येअील त्यापूर्वी कोणतेही राष्ट्र अिग्लडला असा प्रश्न विचारू शकले नव्हते. सिंगापूरला बड अुद्भवले तेव्हा अमेरिकेतून शेकडो हिंदी लोक तेथे जमा झाले होते. ' देशको आझाद करनेको चलो ' या ध्येयाने ते प्रेरित झाले होते मी आता जी माहिती सागत आहे ती सरकारी रिपोर्टातीलच माहिती सागत आहे अदमानात असतानाच मला तो रिपोर्ट पहावयास मिळाला तेव्हा फक्त मी अितिहासाचा पुनरुच्चार करीत आहे

## गांधीजींचा अदूरदर्शीपणा

प वा. लोकमान्य टिळकानाही परराष्ट्रातील प्रचाराचे महत्त्व पटले होते नि त्यासाठी ते पैसा खर्च करावयासही तयार होते आजच्या सभाध्यक्षाची त्यानी त्या कामासाठी निवडही केली होती आपला स्वातन्त्र्याचा लढा आपण जर्मनी, जपान, वगैरे राष्ट्रातही चालविला पाहिजे असे त्याचे मत होते. पण अैन वेळी लोकमान्य गेले ! त्यानतर कॉंग्रेस आली. म. गाधींनी याही गोष्टी चागल्या केल्या, परतु काही बाबतीत त्याचे धोरण अदूरदर्शी ठरले आहे. आम्हाला आतर-

राष्ट्रीय सवधाशी कर्तव्य नाही असे म गांधीनी जाहीर केले आणि अशा रीतीने दादाभाअीपासून लोकमान्यापर्यंत चालू असलेली नि ना गोखले नि लाला लजपतराय यांच्यासारख्या पुढाऱ्यानी पुरस्कारिलेली ही परराष्ट्रीय प्रचाराची चळवळ थाबविण्यात आली साम्राज्यातर्गत स्वराज्य अशी पूर्वीची कल्पना नव्हती, परतु नतर 'अिंग्लडचे शत्रु ते आमचे शत्रु व अिंग्लडचे मित्र ते आमचे मित्र' असे जाहीर करण्यात आले! कित्येक वर्षे कांग्रेसला आतरराष्ट्रीय धोरणच नव्हते काँग्रेसमध्ये ती जाणीव अुत्पन्न करण्याचे श्रेय प जवाहरलाल याना आहे. परराष्ट्रीय राजकारणात आपण काही तरी भाग घेतला पाहिजे असे त्याचे मत आहे नि जवाहरलालाच्या या धोरणाला माझा पाठिंबा आहे

## हरींद्रनाथाची आठवण कोणाला आहे ?

परराष्ट्रात प्रचार करणारानी किती हालअपेष्टा सोसल्या त्याची या लोकाना कल्पनाही नाही बरोबरच आहे! ते अदमानात गेले, त्याचा या राष्ट्राच्या किनाऱ्यावरून दुसऱ्या राष्ट्राच्या किनाऱ्यापर्यंत पाठलाग करण्यात आला त्याचा अनानदशा हाअून त्याना कल्पनातीत हाल सोसावे लागले, परतु ते काँग्रेसचे अध्यक्ष कोठे झाले? कांग्रेसचे अध्यक्ष झाले की सब काही झाल! श्रीमती सरोजिनी नायडू, हिंदुस्थानच्या थोर सेविका (She patriot) नि बगालच्या बुल्बुल याचे नाव सर्वतोमुखी आहे, कारण त्यानी कॉंग्रेसचे अध्यक्षस्थान अलकृत केले होते! पण त्याचा भाअू हरीद्रनाथ चट्टोपाध्याय याचे नाव कोठेच अैकू येत नाही! त्याला हिंदुस्थानच्या बाजूने प्रचार करीत असता रशियात अटक करण्यात आली असे म्हणतात

त्यानी हिंदुस्थानसाठी सरोजिनी नायडूपेक्षा अधिक कष्ट नि हालअपेष्टा सोसल्या आहेत, पण ते सरोजिनी नायडू याच्याप्रमाणे बुल्बुल थोडे आहेत? युरोपातील हद्दपारीची शिक्षा किती तापदायक असते याचा अनुभव प्रत्यक्ष ते कष्ट सोसणारासच माहीत अेका अर्थी अदमान पुरविले, पण युरोपातील हद्दपारी वाअीट! आजची दोन प्रहरची वेळ कोठे भागवावयाची हा प्रश्न रोज त्याच्यापुढे दत्त म्हणून अुभा असतो, पण देशासाठी सर्व हालअपेष्टा सहन करून ते आतरराष्ट्रीय चळवळ करीत आहेत

## जवाहरांना जगाच्या स्वातंत्र्याची काळजी

हिंदी तरुणानी आतरराष्ट्रीय धोरण निश्चित करून त्या दृष्टीने सघटित प्रयत्न केले पाहिजेत प्रभावी आतरराष्ट्रीय धोरणाची सध्या अत्यत जरुरी आहे. हे धोरण कसे असावे यावद्दल तीन चार प्रमुख तत्त्वे मी आपणास सागणार आहे. अिंग्लड अैखाद्या महायुद्धात गुतले म्हणजे तीच आपली योग्य सधि होय अिंग्लडशी

आज ज्यांचे शत्रुत्व आहे त्यांच्याशी सहमत करून आपण त्याना सामील होऊं असा त्याचा अर्थ नाही. पं जवाहरलाल यांनी सध्या जी भूमिका स्वीकारली आहे तीमुळे गैरसमज होण्यास जागा आहे. 'अचल न्याय नि नीतितत्त्वें' यावर त्याची भूमिका आधारल्यासारखी दिसते. दुसऱ्या कोणत्याही राष्ट्राकडून आपल्या संपूर्ण स्वातंत्र्याच्या भूमिकेचा स्वीकार कधीतरी केला जाअील काय, याचा आपण विचार केला पाहिजे. जणू काय सर्व जगाला स्वातंत्र्य बहाल करायलाच आपण आज निघालो आहो! अबिसिनियाचें नि चीनचें स्वातंत्र्य नष्ट झालें म्हणून नेहरूना हळहळ वाटते! परतु तुमच्या स्वतःच्या स्वातंत्र्याची वाट काय?

## प्रथम आत्मरक्षण करा

तथापि हिंदुस्थान स्वातंत्र्य-संपादनार्थ अुत्सुक झाला असून तें तो मिळविणारच हे अिंग्लंडात जाहीर करण्याच्या कामी पं. जवाहरलालजींनी दाखविलेली धडाडी अभिनदनीय आहे यात शंका नाही. आम्हांला स्वातंत्र्यलाभ झाल्यानंतर आम्ही काय करू ते आता सागण्यात येत आहे. पण मी स्वातंत्र्यसंपादनाच्या आधी आमचें काय धोरण राहील, ते सांगतो. अबिसिनियाबद्दल सहानुभूतीचा ठराव करून तो कॉंग्रेसकडून अबिसिनियन बादशहाकडे पाठविण्यात आला. परतु ते पत्र त्याना मिळाले काय? अबिसिनियन बादशहा हेलेसिलासी याच्या हातात पत्र नेअून देणारें अेकही पोस्ट आज जगात नाही. चीनसाठी फंड जमविण्यात येतो, परतु चिमूटभर द्रव्याने त्यांचा काय कार्यभाग होणार आहे? 'दानधर्माचा अुगम स्वगृही झाला पाहिजे' ही अिंग्रजी म्हण लक्षात ठेवा. फॅसिझम व बोल्शेव्हिझम हे शब्द द्वैत-अद्वैत या शब्दांअितकेच अज्ञात आहेत. युरोपातील 'अिझम' आपला सर्वनाश करतील. त्यातील अमुक तत्त्व वाओट नि अमुक तत्त्व चांगले असे म्हणता येणार नाही. त्या त्या राष्ट्रातील परिस्थितीला तो तो ध्येयवाद योग्यच आहे.

## हिटलर नि मुसोलिनी

मुसोलिनीने सत्ता हाती आल्यानंतर अवघ्या चार वर्षांच्या अल्पावधीत आपले राष्ट्र अुन्नत स्थितीला आणलें. मग फॅसिझमला तुम्ही कशाच्या जोरावर नावे ठेवता? बोल्शेव्हिझमचे तत्त्व रशियाच्या बाबतीत परिणामी ठरले. जर्मनीला बोल्शेव्हिझम मान्य नाही, पण नाझी तत्त्वाच्या जोरावर हर हिटलरने जर्मनीचे स्वरूप पार पालटून टाकले आहे. जर्मनी काही हिंदुस्थान नाही. जर्मनीने ज्यू लोकाना बाहेर घालविल्याबद्दल तुम्हाला वाओट का वाटावें? दुसऱ्याला पोसण्याचा काही त्याने मक्ता घेतलेला नाही. 'जर्मनीसाठी जर्मनी' हें हर हिटलरचे धोरण आहे. याच तत्त्वावर हर हिटलरने आज, अेका काळी सर्व जगाचें हसें झालेल्या जर्मनीत क्रांति घडवून आणली आहे. 'माझें राष्ट्र कसे जगेल?'

हाच आज सर्व राष्ट्रापुढे प्रमुख प्रश्न आहे सर्व जग अेक होअून जगाचे पालमट स्थापन होण्याचा काल येअील तेव्हा येवो, परतु तत्पूर्वी प्रत्येक राष्ट्र राष्ट्रीय वृत्तीलाच प्रधान स्थान देत आहे हे विसरू नका

## माझें राष्ट्र माझ्यासाठी

रशियाचे अुदाहरण पहा सर्व जगातील कामगाराचे अेकीकरण करणे ह प्रथम त्याचे ध्येय होत पण रशियात आता खरी स्थिति काय आहे ? सर्व जगातील कामगाराबद्दल प्रेम बाळगणारा रशिया हिंदुस्थानला पिळणाऱ्या अिग्लडशी व्यापारी करार कसा करतो ? प्रथम अबिसिनियाबद्दल सहानुभूति दाखविणारी राष्ट्रेही आज अिटालियन सत्तेला प्रकट मान्यता देत आहेत 'माझे राष्ट्र माझ्यासाठी व मी माझ्या राष्ट्राकरिता' अस आपणही अितर राष्ट्राप्रमाणे जाहीर केल पाहिजे अदमानात चार व साव या सर्वांना अेकत्रच ठेवण्यात यअी. तेथील कैदी हा कोणी तरी मोठा आहे असे समजून मला 'बडा बाबू' म्हणत नि आपल्या तक्रारी मला सागत बारा वेळा चोरी केल्याबद्दल बारा हातकडचा परिधान केलेला अेक गुन्हेगार नि आम्ही सर्व अेकदा जेवत बसलो होतो जेवण झाल्यावर गुप्तपणाने मिळविलेली अेक सुअी चोरीस गेल्याचे त्याला आढळून आले, तेव्हा त्याला अतिशय राग आला नि त्याचा ज्यावर वहीम होता त्याला पकडून नि चोरीच्या १०–१२ निशाण्या असलेला आपला हात वर अुगारून तो म्हणाला 'देखो, बडा बाबू, चोरी करता है'! त्याची न्यायबुद्धि खरोखरच जागृत झाली होती, कारण त्याची सुअी चोरीस गेली होती सध्याची आतर-राष्ट्रीय परिस्थिति काहीशी अशीच आहे

## राष्ट्रीयत्वाचे युग

जपान व अिटली याविरुद्ध ओरड करण्यात येते. परतु चीनने पूर्वी अितर प्रात गिळकृत केलेले आहेतच की नाही ! 'अबिसिनियाचा बादशहा' या नावावरूनच अबिसिनियन साम्राज्यात अनेक राष्ट्रे समाविष्ट होती हे सिद्ध होत आहे अबिसिनिया नि चीन याची सत्ता आज नष्ट झाल्यामुळे ती राष्ट्रे साधु कोटीला पोहोचलेली दिसत आहेत सपूर्ण सत्यव्रताचे पालन आज कोण करीत आहे ? या जगात फक्त दोनच वर्ग अस्तित्वात आहेत अेक पिळवणूक करणारा नि अेक पिळला जाणारा जपानजवळ सत्ता आहे तो आज चीनला लुबाडीत आहे अुद्या कदाचित् रशिया नि अिग्लड चीनवर सत्ता गाजवितील द्वितीय रोमन साम्राज्याची स्थापना ह मुसोलिनीचे ध्येय आहे नि त्या ध्येयाच्या जोरावर अखिल राष्ट्रात त्याने जीवन अुत्पन्न केले सध्या राष्ट्रीयत्वाचे युग आहे आम्ही हिंदुस्थानकरिता आहोत, असे अिटालियनाना जाहीर करा, जर्मनीला ओरडून

सागा, आणि ते साहाय्य करायला तयार असतील तर त्याचे साहाय्य अवश्य घ्या. त्याना नावे ठेवायला आपणाला काय अधिकार आहे ?

## अिंग्लडला जाणीव द्या

नि शस्त्रावर शस्त्र कसे चालवितात ते पाहू अशी विचारसरणी पुढे करण्यात येते. परतु जगात नैतिक बल आहे कोठे ? फ्रान्स अुद्या राष्ट्रसघात अिंग्लडविरुद्ध तक्रार करू शकेल काय ? रशिया हिंदुस्थानमध्ये तुम्ही असे का करता म्हणून अिंग्लडला आव्हान करील काय ? अेकमेकाला न लुबाडता तिसऱ्याला लुबाडू द्या असे जगाचे धोरण दिसते बुद्धाचे अुदार तत्त्व आपल्या धोरणाआड येत आहे म्हणून त्याला माझा विरोध आहे आम्हास साहाय्य करायला तयार असेल त्याच्याशीच आम्ही सगनमत करू आमची सदैव प्रतिकूलता पत्करण्यात अिंग्लडची मोठी चूक होत आहे हें अिंग्लडच्या निदर्शनास आले पाहिजे चीन व अबिसिनिया याचे साहाय्य लगडया माणसाच्या साहाय्यासारखे आहे. पागळयाने लगडयाच्या साहाय्याने ध्येयसिद्धीची आशा करणे फोल आहे जे राष्ट्र आमच्या मदतीला धावून येअील तेच राष्ट्र आमचे दोस्त राष्ट्र राहील चाग कै-शेकला तुम्ही सहानुभूतीची तार करता व त्याला आर्थिक मदत देता ! पण जालियन-वाला बाग प्रकरणाच्या वेळी चाग कै-शेककडून तुम्हाला तार आली होती काय ? राष्ट्राला सामर्थ्यवान् करील अशा धोरणाचा आपण स्वीकार केला पाहिजे.

\+ \+ \+

# २३. जागतिक राजकारणातील नीति

नागपूर येथे दि. ११-१२-१९३८ रोजी स्वा. सावरकर याचा सर्वपक्षीयातर्फे सत्कार झाला; त्यावेळी त्यानी केलेलें भाषण.

नागपूरच्या नागरिकानी अेवढया मोठया जमावाने समारंभानी येअून माझे मोठया अुत्साहाने स्वागत केले याबद्दल मी अत्यत आभारी आहे. लहान मुलाने जसा अेखादा लहानसा पराक्रम करावा व त्यासाठी आअीकडे दुडदुड धावत जावे आणि मग तिच्याकडून गौरव झाला म्हणजे त्याला जशी धन्यता वाटावी तसाच अल्लड आनद मला आज झाला आहे हाच आनद पुन पुन अुपभोगता यावा म्हणून पुन अदमानात जाअून यावे असे मला आता वाटू लागले आहे ! माझ्याबरोबर ज्यानी देशभक्तीने प्रेरित होअून हालअपेष्टा सहन केल्या नि जे विरयेव कामावर

लटकले गेले, त्यांचें मी अशा प्रसंगी स्मरण न करणें हें अुचित होणार नाही. ज्या कार्यासाठी आम्हाला अपमानपत्रें मिळालीं त्याचसाठी आता आम्हाला मानपत्रें मिळत आहेत! ही आपल्या देशाची खरोखर प्रगति आहे. तुम्ही स्वातंत्र्याच्या चळवळीची प्रगति केली याबद्दल आम्हांला मोठें समाधान वाटतें. आज जे काही हक्क आपणाला मिळाले त्यावरून आपणांला स्वराज्य मिळालें अशी भ्रामक कल्पना करणे मात्र चूक होओील.

## आम्हांला अत्याचारी कां म्हणता ?

देशभक्तीने प्रेरित होअून क्रांतिकारक लहानसहान अत्याचार करतात म्हणून त्यांना वर्तमानपत्रे अत्याचारी म्हणतात पण तें बरोबर नाही. फार तर त्याना 'शस्त्राचारी' म्हणा. जे लोक मोठमोठ्या युद्धसामग्रीने चुटकीसरशी लहान व निर्बल राष्ट्रे गिळकृत करण्याचा सपाटा लावतात नि त्याना अुपद्रव देतात तेच लोक खरोखरी अत्याचारी नाहीत काय? सगिनीच्या नि विमानाच्या साहाय्याने जे लोक अितरांना अुपद्रव देतात–ते मग राजे असोत की आणखी अितर कोणी असोत–ते अत्याचारी होत. अखिल हिंदी लोकाचें जे ध्येय त्याच ध्येयासाठी जर आम्ही हातात शस्त्र घेतले तर आम्ही का अत्याचारी झालो? तुमच्यासाठी जे लोक फासावर गेले त्याना तुम्ही अत्याचारी व माथेफिरु म्हणता! आमचा माथा फिरला म्हणून तर देश फिरला आहे!

## सत्कार्यार्थ हिंसा ही अहिंसाच होय !

आमची क्रांति रक्तपूर्ण म्हणून जर दोषार्ह असेल तर तुमची क्रांति तरी रक्तशून्य कोठे आहे? ज्या अिंग्रजानी आपले रक्त शोषण केले आहे नि ज्यांच्या विरुद्ध तुम्ही चळवळ करीत आहा त्याना तुम्ही दुखवीत आहातच की नाही? तुमच्या स्वदेशीच्या चळवळीने मचेस्टरच्या पोटावर पाय येतो, त्यामुळे त्यांची मनें तुम्ही दुखवीत नाही काय? अेवढेंच नव्हे तर तुम्ही त्याचे रक्त न सांडलेत तरी तुम्हा निःशस्त्र सत्याग्रहीचे रक्त सांडावयाला तर अिंग्रज कमी करीत नाहीत ना? मग काय अिंग्रजाचें रक्त सांडले तर हिंसा नि हिंदी लोकाचे सांडले तर अहिंसा होते? अहिंसेची ही व्याख्या सर्वथैव चुकीची आहे. सत्कार्यासाठी केलेली हिंसा ही वस्तुतः अहिंसाच होय, ह्याची खूणगाठ आपण मनाशी बांधा. अर्थात् हिंसेचा अवलंब करा, असा याचा अर्थ नाही. अहिंसेचा भलताच बडिवार करून 'शस्त्राचारी' लोकांना दूषणे लावू नका, अेवढेच माझे म्हणणें.

## जपान नि हिंदुस्थान

परराष्ट्रीय राजकारणाचें निरीक्षण करा. काही काळापूर्वी वामन विष्णु खरे याच्यासारखे अस्सल क्रांतिकारकदेखील पाहिजे तर होमरूल बोला पण संपूर्ण

स्वातंत्र्याची गोष्ट बोलू नका असे म्हणत कारण 'नाविष्णु पृथिवीपति' अशी त्याची विचारसरणी होती परंतु ती विचारसरणी आता काळाच्या ओघाबरोबर बदलली आहे आपल्या देशाच्या स्वातंत्र्याच्या दृष्टीने आपण आता परकीय राजकारणाकडे बारकाईने लक्ष दिले पाहिजे जपान चीनला गिळंकृत करीतच आहे तसे पाहिले तर चीन हा आपल्या अत्यंत संनिध आहे नि म्हणून आपण या घटनेकडे डोळ्यात तेल घालून पहात बसले पाहिजे अखंड हिंदी राष्ट्र निर्माण करावे म्हणून आजपर्यंत आपण प्रयत्न केले आहेत तरी पण या चीन जपानच्या लढ्यामुळे आता किनाऱ्यावर ज्याप्रमाणे ब्रिटिश हिंदुस्थान, फ्रेंच हिंदुस्थान, डच हिंदुस्थान त्याप्रमाणेच 'जपानी हिंदुस्थान' असाही अेक भाग निर्माण होतो की काय अशी भीति मला वाटू लागली आहे

## जपानचा हिंदुस्थानावर डोळा

जपान अिंग्लंडचा नुसता पराभव करून थांबणार नाही, तर त्याचा डोळा हिंदुस्थानवर राहील पश्चिमेकडे अिटलीने भूमध्य समुद्र रोखून धरला आहे नि अिकडे पूर्वेकडे जपानचा हिंदुस्थानवर डोळा आहे याचा बाहेरून नाही तरी आतल्या आत तरी मंत्रिमंडळानी विचार करणे अवश्य आहे प्राचीन काळी रोमचे अिंग्लंडवर ५०० वर्षे साम्राज्य होते परंतु अिटलीवर जर्मनीने जेव्हा स्वारी केली नि अिटली धोक्यात आला, तेव्हा या संधीचा फायदा घेअून अिंग्लंड आयतच स्वतंत्र झाले तशीच स्थिति आज हिंदुस्थानच्या राजकारणाची आहे हे हिंदुस्थानच्या प्रजेने नि पुढाऱ्यांनी विसरून चालावयाचे नाही पण त्या वेळीसुद्धा रोमन लोक गेल्यास आपले कसे होअील या विवंचनेने अिंग्रज लोक रोमनांनी आपल्यास सोडून न जाण्याची याचना करू लागले ! तसे येथे होता कामा नये अिंग्रज लोकांविषयी आपल्या लोकांत ज्या काही भ्रामक कल्पना होत्या नि आजही आहेत त्या सर्व आतापर्यंत फोल ठरल्या आणि सुदैवाने आता हिंदुस्थानच्या लोकांना अिंग्रजांची राजनीति कशी आहे हे कळू लागले आहे

## ते ठग, तर हे महाठग

परंतु जगात नीति आहे, अिंग्लंडसारखी नीतिमान् राष्ट्रे नि शस्त्रांवर कधीही शस्त्र अुगारणार नाहीत, ही जी गेल्या १०-१५ वर्षांपासून हिंदुस्थानात समजूत पसरली आहे ती अगदीच चुकीची आहे आजच्या प्रबळ राष्ट्रांत असे कोणते राष्ट्र आहे की, ते नि शस्त्र राष्ट्रांवर शस्त्र चालवू नये अशी नीतिमत्ता दाखवील ? किंवा असे कोणी चालविल्यास त्याला विरोध करील ? तेव्हा जगाचा नैतिक पाठिंबा मिळेल या खुळ्या समजुतीत काय स्वारस्य आहे ? अिटली, जर्मनी, जपान ही राष्ट्रे जर ठग असतील तर अिंग्लंड, अमेरिका, फ्रान्स ही राष्ट्रेही महाठग आहेत.

म्हणजे थोडक्यात, राष्ट्रसंघ निर्माण करणारी राष्ट्रेसुद्धा काही मोठ्या नैतिक बळावर अधिष्ठित नाहीत.

## हबसाणाच्या वेळेला नीति कोठे लपली ?

याच राष्ट्रसंघनिर्मात्या राष्ट्रांनी ॲबिसिनियाला अिटलीबरोबर लढण्याची भर दिली, पण आज हा राष्ट्रसंघ त्या हबसाणी ॲबिसिनियासाठी काय करीत आहे? बिचारा ॲबिसिनिया गुलाम बनलाच की नाही? ज्या वेळी अिंग्लंड ॲबिसिनियाची कड घेत होता, त्याच वेळी तो अिजिप्तमध्ये तेथील विद्यार्थ्यांची चळवळ दडपून टाकीत होता.

चीन–जपान लढ्यात चीनचा तरी काही अपराध आहे की नाही, हेंही आपण पाहिले पाहिजे. १५० वर्षांपूर्वी चीन जपान ही राष्ट्रे असंघटित होती. पण जपानने परिस्थिति ओळखून आपला असंघटितपणा तावडतोब घालविला, पण चीन अफूच्या गुंगीत तसाच झिंगत राहिला. दुसऱ्या जपानलाच दोष देण्यात काय अर्थ आहे? परराष्ट्रीय राजकारणात अजून न्यायान्यायाचे मापन निघालें नाही. माझा जीव कसा वाचेल, हेच प्रत्येकाने पाहिले पाहिजे. तेव्हा निष्फळ न्यायाच्या गोष्टी न बोलता परराष्ट्रीय राजकारणाचा आपल्या स्वातंत्र्याच्या दृष्टीने विचार केला पाहिजे. वस्तुत जपानचे चीनवरील आक्रमण ही वाईट गोष्ट तर खरीच, पण जपानला ही पाश्चात्य राष्ट्रे तरी कोणत्या तोंडाने दोष देणार? ही सारीच राष्ट्रें

आढवे आले आणि जर ती लहान हिंसा डॉक्टरने टाळली तर मूल नि माता दोन्ही जीव मारण्याची हिंसा केल्याचे पाप त्या डॉक्टरावर येते .

## हिंदुस्थानचे यापुढील कर्तव्य

अिटलीने भूमध्य समुद्र अडविला आहे ना? फार चागली गाष्ट झाली. अिंग्लडच्या पाठीचा कणाच त्याने आमच्या स्वातंत्र्याच्या दृष्टीने मोडला आहे. आता जर यापुढे महायुद्ध अुद्भवलेच तर हिंदुस्थानला गप्प बसून चालावयाचे नाही मागच्या महायुद्धाच्या वेळी हिंदुस्थानला त्यापासून काही भय नव्हते, पण आता मात्र तशी स्थिति नाही तेव्हा हिंदुस्थानच्या लोकानी सावध राहून या सधीत आपले हात धुवून घेतले पाहिजेत त्याने मागच्या महायुद्धासारखी अिंग्लडला मदत करण्याची पुन चूक करता कामा नये त्या चुकीचे आता तरी हिंदुस्थानने परि-मार्जन केले पाहिजे गेल्या महायुद्धामुळे आपल्याला अिंग्लडने जे काय दिले ते आपण पाहिलेच आहे तेव्हा या वेळी जर महायुद्धाची झळ अिंग्लडला लागली, तर त्या वेळी अिंग्लड तुम्हाला मदत मागेल हे अुघडच आहे त्या वेळी त्याच्यावर जास्तीत जास्त अटी लादा शस्त्राचा कायदा आम्हाला नको ही पहिली अट त्याच्यावर लादा, हातात शस्त्र आल्याशिवाय तुमच्यात वीरवृत्ति तरी कशी येणार? तेव्हा हा कायदा प्रथम रद्द झाला पाहिजे अशी चळवळ हिंदुस्थानने करणे हे त्याचे प्रथम कर्तव्य आहे

\+ \+ \+

## २४. परराष्ट्रीय धोरणाचे मर्म

कलकत्ता येथे आल्बर्ट हॉलमध्ये दि २०-२-३९ रोजी श्री श्यामाप्रसाद मुखर्जी याच्या अध्यक्षतेखाली स्वा सावरकर याचे झालेले भाषण

देशात जेव्हा जेव्हा नवा प्रश्न अुपस्थित होतो, तेव्हा तेव्हा महाराष्ट्राचे डोळे तुमच्या बगालकडे लागून राहतात बगाली हिंदूचे मत काय आहे हे आधी अजमावून पाहिल्याशिवाय महाराष्ट्रीय हिंदूनी कोणत्याही प्रश्नास कधीही हात घातलेला नाही न्या रानडे याच्यापासून लो टिळकापर्यंत ही परपरा अविच्छिन्न-पणे चालत आलेली आहे आणि आपणही मजकडे कानाडोळा करणार नाही अशी मला आशा आहे

म्हणजे थोडक्यात, राष्ट्रसंघ निर्माण करणारी राष्ट्रेसुद्धा काही मोठ्या नैतिक बळावर अधिष्ठित नाहीत.

## हव्यासाच्या वेळेला नीति कोठे लपली ?

याच राष्ट्रसंघनिर्मात्या राष्ट्रांनी अॅबिसिनियाला अिटलीबरोबर लढण्याची भर दिली, पण आज हा राष्ट्रसंघ त्या हतभागी अॅबिसिनियासाठी काय करीत आहे ? बिचारा अॅबिसिनिया गुलाम बनलाच की नाही ? ज्या वेळी अिंग्लंड अॅबिसिनियाची कड घेत होता, त्याच वेळी तो अिजिप्तमध्ये तेथील विद्यार्थ्यांची चळवळ दडपून टाकीत होता.

चीन–जपान लढ्यात चीनचा तरी काही अपराध आहे की नाही, हेंही आपण पाहिले पाहिजे १५० वर्षांपूर्वी चीन जपान ही राष्ट्रे असघटित होती पण जपानने परिस्थिति ओळखून आपला असघटितपणा तावडतोब घालविला, पण चीन अफूच्या गुंगीत तसाच झिंगत राहिला नुसत्या जपानलाच दोष देण्यात काय अर्थ आहे ? परराष्ट्रीय राजकारणात अजून न्यायान्यायाचे मापन निघाले नाही माझा जीव कसा वाचेल, हेच प्रत्येकाने पाहिले पाहिजे. तेव्हा निष्फळ न्यायाच्या गोष्टी न बोलता परराष्ट्रीय राजकारणाचा आपल्या स्वातंत्र्याच्या दृष्टीने विचार केला पाहिजे वस्तुत जपानचे चीनवरील आक्रमण ही वाअीट गोष्ट तर खरीच, पण जपानला ही पाश्चात्य राष्ट्रे तरी कोणत्या तोंडाने दोष देणार ? ही सारीच राष्ट्रे चोर नाहीत काय ? जपानने चीन न गिळला तर पाश्चात्य राष्ट्रे त्याला गिळायला आ वासून बसलीच आहेत तेव्हा जपानच्या निष्कारण निषेधाच्या भानगडीत हिंदुस्थानाने का पडावे ? तुमच्या निषेधाने चीनला तर साहाय्य होत नाहीच, पण तुम्ही जपानचे शत्रुत्व मात्र विनाकारण संपादिता त्यापेक्षा जपानच्या चीन-दिग्विजयानतर त्याचा पुढील टप्पा साहजिकपणे पूर्व भारत राहणार हे लक्षात घेअून जपानच्या या आगमनाचा व अिंग्लडच्या दुर्बलतेचा हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या दृष्टीने कसा अुपयोग करून घेता यअील याचा विचार हिंदुस्थानने करणे हेच अधिक सयुक्तिक ठरणार नाही काय ?

## निर्मळ अहिंसा कोठे आहे ?

आत्मघात ही अेक हिंसाच आहे हे आपण विसरू नका. हे जर खर तर निर्मळ अहिंसा नि निर्मळ सत्य कोठे आहे ? अत्यंत मोठी हिंसा टाळण्यासाठी ज्या लहानसहान हिंसा कराव्या लागतात त्या अहिंसाच होत हें लक्षात ठेवा अत्या-चाराच्या प्रतिकारासाठी जर लढावयाचे असेल तर ती काही हिंसा होत नाही, असे बुद्धाने अेकदा आपल्या शिष्यास सांगितले होते जर आवश्यक अशी लहान हिंसा करण्याचे टाळले तर आपण मोठी हिंसाच करतो असे समजा अुदाहरणार्थ, मूल

आडवे आले आणि जर ती लहान हिंसा डॉक्टरने टाळली तर मूल नि माता दोन्ही जीव मारण्याची हिंसा केल्याचे पाप त्या डॉक्टरावर येते.

### हिंदुस्थानचें यापुढील कर्तव्य

अिटलीने भूमध्य समुद्र अडविला आहे ना? फार चांगली गोष्ट झाली. अिंग्लंडच्या पाठीचा कणाच त्याने आमच्या स्वातंत्र्याच्या दृष्टीने मोडला आहे. आता जर यापुढे महायुद्ध अुद्भवलेच तर हिंदुस्थानला गप्प बसून चालावयाचे नाही. मागच्या महायुद्धाच्या वेळी हिंदुस्थानला त्यापासून काही भय नव्हते; पण आता मात्र तशी स्थिति नाही. तेव्हा हिंदुस्थानच्या लोकांनी सावध राहून या संधीत आपले हात धुवून घेतले पाहिजेत. त्याने मागच्या महायुद्धासारखी अिंग्लंडला मदत करण्याची पुन: चूक करता कामा नये. त्या चुकीचे आता तरी हिंदुस्थानने परिमार्जन केले पाहिजे. गेल्या महायुद्धामुळे आपल्याला अिंग्लंडने जें काय दिलें तें आपण पाहिलेंच आहे. तेव्हा या वेळी जर महायुद्धाची झळ अिंग्लंडला लागली, तर त्या वेळी अिंग्लंड तुम्हाला मदत मागेल हें अुघडच आहे त्या वेळी त्याच्यावर जास्तीत जास्त अटी लादा. शस्त्राचा कायदा आम्हाला नको ही पहिली अट त्याच्यावर लादा, हातात शस्त्र आल्याशिवाय तुमच्यात वीरवृत्ति तरी कशी येणार? तेव्हा हा कायदा प्रथम रद्द झाला पाहिजे अशी चळवळ हिंदुस्थानने करणे हें त्याचे प्रथम कर्तव्य आहे.

\+ + +

## २४. परराष्ट्रीय धोरणाचें मर्म

**कलकत्ता येथे आल्बर्ट हॉलमध्ये दि. २०-२-३९ रोजी श्री. श्यामाप्रसाद मुखर्जी यांच्या अध्यक्षतेखाली स्वा. सावरकर यांचे झालेलें भाषण.**

देशात जेव्हा जेव्हा नवा प्रश्न अुपस्थित होतो, तेव्हा तेव्हा महाराष्ट्राचे डोळे तुमच्या बंगालकडे लागून राहतात. बंगाली हिंदूचे मत काय आहे हें आधी अजमावून पाहिल्याशिवाय महाराष्ट्रीय हिंदूंनी कोणत्याही प्रश्नास कधीही हात घातलेला नाही. न्या. रानडे यांच्यापासून लो. टिळकापर्यंत ही परंपरा अविच्छिन्नपणे चालत आलेली आहे आणि आपणही मजकडे कानाडोळा करणार नाही अशी मला आशा आहे.

मराठ्यांनी दिल्ली कशी सर केली, शिखांनी अेकजुटीने स्वतंत्र राज्य कसें स्थापिलें आणि बंगालमधील प्रतापादित्याने मोगली फौजेचा कसा वारंवार धुव्वा अुडविला हें सारे आपण अितिहासावरून जाणतच आहा. हीं सर्व स्वातंत्र्ययुद्धें प्रचंड नि अेकसूत्र प्रमाणावर मात्र पूर्वी खेळली गेलीं नाहीत. आता अशी वेळ आली आहे की, मी हिंदु, मी बंगाली, मी मराठा, मी शीख अशा भावना टाकून आपण सर्वांनी हिंदुत्वाचा अभिमान वहून अुठले पाहिजे. बऱ्याच लोकांची—विशेषत: हिंदूंची—अशी कल्पना आहे की, राजनीतिशास्त्रात वर्णिलेल्या लोकशाहीच्या तत्त्वावर आपण आपले आंतरराष्ट्रीय धोरण आखणें हेंच युक्त. पण आपण हें लक्षात ठेवलें पाहिजे की, आंतरराष्ट्रीय नीति म्हणून काही आता जगात अुरलेली नाही. व्यक्तीव्यक्तींचे व्यवहार नीतीच्या तत्त्वावर कितीही चालत आले, तरी राष्ट्राराष्ट्रांचे कारभार नीतिनियमानुसार कधीही चाललेले नाहीत. राष्ट्रें म्हणजे समूह. त्यांच्यापुढे अेकच ध्येय असते आणि तें म्हणजे स्वसंरक्षण नि स्वहितवर्धन. सध्या तरी आंतरराष्ट्रीय अुलाढालीत नीतीचा मागमूसही अुरलेला नाही. सत्य नि अहिंसा हीं तत्त्वें कानाला कितीही गोड लागोत, त्यांचा अुपयोग राष्ट्राचें धोरण ठरविताना काहीमात्र होत नाही. तसा अुपयोग झाल्याचा अेकाही राष्ट्राचा दाखला नाही.

## मूळ तत्त्वें पहा

हिंदी लोक चीनची बाजू घेनात व चढाओ करणाऱ्या जपानला नैतिक दृष्टीने नांवे ठेवतात. चीनला अेक शुश्रूषा-पथकही धाडण्यात आलें. या सर्वांची फलश्रुति काय ? तर जपानला निष्कारण आपला वैरी बनविले. चीन तर पूर्वी साम्राज्यवादीच देश होता आणि तेथे लोकशाही आल्यावरही त्याचे साम्राज्यशाहीचें धोरण सुटलें नाही. चँग कै शेक याच्या नेतृत्वाखालीच साम्राज्यवादी लोकहितात्मक चीनने मंगोलियावर स्वारी केली—तिबेटवरही त्याने हल्ला केला होता. आता चीन जर्जर झाला आहे आणि जपानपुढे पराभूत होत आहे. जपानने चढाओ केली नसती तर अिंग्लंड नि रशिया यांनी चीनचे तुकडे पाडले असते आणि ते आपसांत वाटून घेतले असते. मी जपानी लष्करशाहीचें वर्तन योग्य आहे असें म्हणतो असा याचा अर्थ नव्हे. पण आंतरराष्ट्रीय घडामोडीच्या बुडाशी कोणती नैसर्गिक तत्त्वें खेळत असतात हेंच मला दाखवावयाचे आहे.

हिंदुस्थानाने चीनला आपत्प्रसंगी शुश्रूषापथक पाठविले, पण चीनने हिंदुस्थानाला कधी मदत पाठविली आहे काय ? आज अिंग्लंड जपानला नावे ठेवीत आहे, त्याच्या जुलुमाची वर्णने अिंग्रजी पत्रे तिखटमीठ लावून करीत आहेत; पण हें सारें लोकशाहीचा पान्हा फुटल्यामुळे होत आहे की जपान हिंदुस्थानच्या फार जवळ येत चालला या धास्तीने घडत आहे ?

## चेंबर्लेन व गांधीजी

झेकोस्लोव्हाकियाचे बाबतीत हिंदुस्थानने जर्मनीचे निष्कारण वैर संपादिले. झेकोस्लोव्हाकिया हा देश व्हर्सायच्या तहाने अस्तित्वात आणला. त्याचा हेतु अितकाच की, जर्मनी व ऑस्ट्रिया या दोन देशांच्यामध्ये अेक स्वतंत्र राष्ट्र असावे. तेव्हा जर्मन राष्ट्राची शकले करण्यात आली ती अेकत्र सांधण्याचा व जर्मन भाषा बोलणाऱ्या लोकांचे देश परत मागण्याचा हिटलरला पूर्ण हक्क आहे. या बाबतीत अिंग्लंडने आधी खूप दमदाटी देअून पाहिले, पण तिला हिटलर धूप घालीत नाही असे जेव्हा दिसून आले, तेव्हा अिंग्रज प्रधानाने, आतापर्यंत कधीही न केलेले, म्हणजे स्वदेशाबाहेर जाण्याचे धाडस केले, अेवढेच नव्हे तर आपण स्वत: थोड्याच दिवसांपूर्वी चेक सरकारला काय आश्वासन दिले याची आठवण बुजवून त्याने हिटलरच्या कृत्याला संमति पण देअून टाकली ! हिटलर म्हणजे काही मि. जिनाकडे हिंदु-मुस्लिम अैक्याची याचना करणारा म. गांधी नाही. ब्रिटिश प्रधानाने जे धोरण आखले त्याच्या बुडाशी कोणते तत्त्व खेळत होते ? आत्मरक्षण !

## जपान–जर्मनी–अिटलीशी वैर कां ?

अॅबिसिनियामध्येही असेच दृश्य दिसून आले. मुसोलिनीच्या नेतृत्वामुळे अिटली सामर्थ्यवान बनला नि त्याने अॅबिसिनिया जिंकला. आमच्या हिंदी पत्रांनी मात्र मुसोलिनीवर टीकेचा भडिमार केला. दुर्दैव अितकेच की, ती पत्रे मुसोलिनी वाचीत नाही ! अिंग्लंडने मुसोलिनीलाही आधी दमदाटी देअून पाहिले, पण ती फोल ठरलेली पाहताच अॅबिसिनियावरील त्याच्या स्वामित्वाला त्याने संमति दिली ! अिटालीला राज्यविस्तार हवा होता व तो त्याने साध्य करून घेतला.

पाशवी म्हणा पण निसर्गाचा कायदा आत्मरक्षणाचाच आहे. आंतरराष्ट्रीय व्यवहारात नीतीचा अंमल असेल अशा भ्रमात राहू नका. ती नीति केवळ पुस्तकातच सापडते. स्पेनमधील आपद्ग्रस्त जनतेच्या मदतीसाठी हिंदुस्थानातून तांदूळ पाठविण्याची योजना केली जात आहे पण मी विचारतो हिंदुस्थानातील कोटयनुकोटि अर्धपोटी, अुपाशी स्त्रीपुरुषांची दया येअून स्पेनने आजवरच्या प्रदीर्घ अितिहासात कधी धान्याचा अेक तरी कण आपल्याकडे पाठविला आहे काय ? या लढ्यात कोणतीही बाजू हिंदुस्थानने घेण्याचे कारण नव्हते.

पण ही सारी राष्ट्रे स्वत च चोरी, दरोडे नि फसवेगिरी याच्या गाळात आकंठ बुडालेली आहेत नैतिक हेतूने प्रेरित होअून ती हिंदुस्थानच्या काही अुपयोगी पडतील असे मानण्याअितका दुसरा मूर्खपणा कोणताच नाही व्यक्तीव्यक्तींच्या व्यवहारात नीतीचा प्रश्न येतो, पण राष्ट्राराष्ट्रांच्या कारभारात नीतीला मुळीच स्थान नाही हे मी ठामपणे सांगतो प्रत्येक राष्ट्र स्वार्थाच्या दुर्बिणीतूनच पाहत असते ज्याच्याशी मैत्री केली असता आपला लाभ होण्यासारखा असेल, त्याचेच सख्य जोडण्याकडे हिंदुस्थानने लक्ष द्यावे 'आत्मान सतत रक्षेत्' हेच आपल्या परराष्ट्रीय धोरणाचे सूत्र आपल्या स्वातंत्र्यसंपादनाचे कामी जो कोणी अुपयोगी–मग तो नाझी असो, फॅसिस्ट असो की बोल्शेव्हिक असो–तो आपला मित्र, अुलट जो आपल्या स्वातंत्र्याचे आड येतो तो आपला शत्रु

## प्रथम आत्मरक्षण

हिंदु व मुसलमान यांनी अेक होअून अिंग्लंडच्या हातून सत्ता हिसकावून घेतली पाहिजे हे खरे, पण समजा, अेखाद्या मुसलमान राष्ट्रानेच हिंदुस्थानवर स्वारी केली आणि येथले मुसलमान त्या मुसलमान राष्ट्राकडे खेचले गेले, तर आपण मुसलमानांशी कसे धोरण ठेवावे याचा पुन विचार करावा लागेल आत्मरक्षण हें आपले सूत्र आपण आपल्या डोळ्यापुढे ठेवले पाहिजे हिंदुस्थानवर आक्रमण करू पाहणाऱ्या शत्रूच्या रक्ताने आपली मातृभूमि रंजित झाली, तर ती जशी राष्ट्रसेवा होअील, तशीच ती सत्य नि अहिंसा यांचीही सेवाच ठरेल !

\+ + +

## २५. सशस्त्र व संघटित व्हा

दि १४-२-३८ रोजी स्वा सावरकर यांनी नगर येथील रा स्वा संघ शाखेला भेट दिली त्या वेळी झालेले भाषण

राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या संघटनेचे जाळे आज नुसत्या महाराष्ट्रातच नव्हे तर अखिल भारतवर्षात पसरलेले मला आढळले आतापर्यंत मी जेथे जेथे गेलो तेथे तेथे साधारणपणे या संघाच्या लहानमोठ्या प्रमाणात शाखा असल्याचे माझ्या निदर्शनास आले आहे या संघाच्या वैशिष्ट्यपूर्ण कार्यपद्धतीचे सानंद कौतुक वाटून माझा अूर भरून येतो ! याच्या शाखांचे धागे पेशावर लाहोरला आहेत, तसेच कोल्हापूर-सांगलीला आहेत ! दिल्लीला तर परवाच त्यांच्या अेका कार्यक्रमाला मी अुपस्थित होतो या संघाच्या द्वारे तरुण पिढीला लागत असलेल्या सैनिकवृत्तीच्या वळणाची आजकालच्या राष्ट्राला अत्यंत आवश्यकता आहे

## लढाऊ वृत्तीचा वध

अिंग्रजानी आमच्यावर राज्य करण्यास सुरवात करण्यापूर्वी आमच्यातील लढाऊ वृत्ति पूर्णपणे जागृत होती पण त्यानी येअून आमच्यावर जर कोणता मोठा सुधारात्मक अुपकार (!) केला असेल तर तो हा की, आम्हाला निःशस्त्र करून आमची लढाअू वृत्ति मारली त्याचे आतापर्यंतचे धोरण असेच ठेवण्यात आले आहे की, तुम्हाला त्याच गोष्टी करण्याला मोकळीक देण्यात यावयाची की, ज्या त्याना त्याचे येथील आसन अस्थिर करण्याचा धाक घालू शकणार नाहीत ! अुलट दयाळू अिंग्रज सरकार आपल्याला किती सुधारणा, किती प्रोत्साहन देते आहे असेच त्यानी आम्हा लोकाना आमच्या मदबुद्धीचा फायदा घेअून आतापर्यंत फसविले ! आम्ही भोळे ! त्याच्या या मायाजालात आपण बरोबर फशी पडलो नि आधीच मरू घातलल्या आमच्या मनाना सपूर्णतया ठार करण्याच्या त्याच्या प्रयत्नाना यशच मिळत जाअून त्याची परमावधि म्हणजे आपल्या माथी बसलेला शस्त्रनिर्बंधाचा कायदा होय ! अितर राष्ट्रात आत्मसरक्षणार्थ शस्त्रे वापरण्याची व्यक्तिमात्राला जवढी मोकळीक आहे तेवढा तरी यमीत यमी हक्क मिळविण्या-साठी आपण प्रयत्न करायला हवाच

## बलवान् व्हा

'बळी तो कान पिळी' हा सिद्धान्त अजून तरी कायम आहे आपल्याला कोणाचा कान पिळण्यासाठी नव्हे पण यापुढे आपल्याला कोणी दुसऱ्याने कानपिळी देअू नये म्हणून तरी निदान आपण 'बळी' व्हायला पाहिजे अिटली–अॅबिसिनिया किंवा चीन–जपान या दोन जोड्यामध्ये अॅबिसिनिया किंवा चीन या राष्ट्राचा पाडाव ती त्याच्या प्रतिपक्षाहून कोणत्या बाबतीत कमी होती म्हणून झाला ? अिटालियन सैनिकापक्षा अॅबिसिनियन हबशी नि सशय शूर होते युद्धाच्या दृष्टीने निसर्गाचा वरदहस्त तर अॅबिसिनियावरच पूर्णपणे होता लोकसख्यन अॅबि-सिनिया अिटलीपेक्षा जास्त हाता ! बौद्धिक दृष्ट्या किंवा धार्मिक दृष्ट्या अिटली-हून अॅबिसिनिया जास्त सरस होता पण अिटलीच्या रायफलचा आणि मशिनगन्सचा पल्ला हा अबिसिनियाच्या रायफलपक्षा किंवा मशिनगन्सपेक्षा जास्त प्रभावी ठरला वरील सर्व गोष्टीना धक्का मारून या अेकाच गोष्टीमुळे अिटलीने पाहता पाहता अॅबिसिनियाला धुळीला मिळविले ना ?

## चीनजवळ कमी काय होतें ?

चीनमध्ये जपानपेक्षा काय कमी होते ? चीनच्या पासगालाही न पुरण्या-अितकी लोकसख्या अन् क्षेत्र असणारा जपान ! चीन त्यापेक्षा प्रत्यक बाबतीत श्रेष्ठ होता धर्माच्या दृष्टीने तर चीन जपानहून जास्त सनातनी आहे दानही

राष्ट्रें बुद्धधर्मीय ! अहिंसावादी !! आणि तसेंच बघितलें तर चीन जपानपेक्षा जास्त धर्मश्रद्धाळू. पण युद्धाच्या प्रत्यक्ष घुमश्चक्रीत चीनची धर्मश्रद्धा, अध्यात्मवाद, आस्तिक्यबुद्धि जपानचे काहीही वाकडे करू शकली नाही ! न्याय, अन्याय म्हणाल तर चीनने जपानची कोणतीही आगळीक केली नव्हती. अशा तऱ्हेने सत्याच्या दृष्टीने नि धर्माच्या दृष्टीने पूर्णपणे वरचढ असणाऱ्या चीनला टीचभर जपानने बाँबच्या वर्षावाखाली जाळून बेचिराख करून टाकलेच की नाही !

## कवितेपेक्षा तरवारीला जास्त मान

म्हातारा झालेलें आपलें पुरातन रोमन साम्राज्य पुनः स्थापण्याच्या निष्ठापूर्वक प्रतिज्ञेने आज सबंध युरोप हादरून सोडतो आहे नि जर्मनी सबंध जगाला कापरें भरायला लावतो ते कशाच्या जोरावर ? केवळ जाज्वल्य राष्ट्राभिमान नि त्याला पोषक असणाऱ्या लढाऊ वृत्तीचें पोषण नि वर्धन करूनच ना ! पांच वर्षांचा अिटालियन बालक बंदुकीच का हवाअी बंदूक घेअून कवाअीत करतो ? जगाच्या बाजारात आज तरी कवितेपेक्षा तरवारीला जास्त मान आहे हें विसरू नका ! आणि ही स्थिति जोपर्यंत कायम आहे तोपर्यंत तुम्हांला तरवार चालविता आलीच पाहिजे ! न आली तर तुमचा विपरकाल संपायची आशाच नको ! आमच्यावर अिंग्रज सरकारानें जय का मिळविला ? काय आमच्याकडे वाचनालयें नव्हती म्हणून ? की कविसम्राट आणि लेखक नव्हते म्हणून ? असें मुळीच नाही! तर पेशव्यांजवळ याच्यासारख्या तोफा नव्हत्या म्हणून ! आणि आजही ते टिकून आहेत ते देखील त्यांच्या रायफलच्या सामर्थ्यावर हें सूर्यप्रकाशाअितके लख्ख आहे. हिंदुस्थानचे लोक अिंग्रजांपेक्षा कुठे कमी असतील तर ते धूर्तपणात ! दुसरे कशातही कमी नाहीत हे अितिहास सांगेल. फक्त आमची रायफल अिंग्लिश रायफलीपेक्षा समर्थ झाली आणि आमच्या अंगी धूर्तपणा आला की आम्हांला कोणाचीही भिण्याचे कारण नाही नि त्यांना आपले बिऱ्हाड येथून अुठवावेच लागेल हें निर्विवाद !

## राष्ट्रसिंहाचीं नखें

वाघाचीं नखें जोपर्यंत तीक्ष्ण असतात तोपर्यंत गायीला त्याच्यापुढे गम खाअून मेलेंच पाहिजे ! मग ती जिवावर अुदार होअून त्याच्याशी टक्कर घेवो नाही तर सत्याग्रह करून त्याला म्हणो की, 'ये बाबा ! खा हं मला !! प्रतिकार करणें हा माझा धर्म नाही ! ती हिंसा होते !'—तसेंच राष्ट्रसिंहाचीं नखें जोपर्यंत तीक्ष्ण आहेत तोपर्यंत कोणत्याही शत्रूला त्याच्या पंजापुढे गाय बनायलाच हवें ! तुम्ही सत्याग्रही असा नाही तर शस्त्राग्रही असा, प्रबलाचाच जगात विजय व्हायचा हा अीश्वराचा न्याय आहे. आणि म्हणूनच आपण प्रबल नि स्वसंरक्षणक्षम बनायला

हवे ! अखिल भारतीय हिंदूंची अेकसूत्री प्रबल संघटना करण्याचे या संघाचे ध्येय याचसाठी अत्यंत व्यापक अन् अुच्च आहे हे कोणीही कबूल करील.

## प्रथम रायफलसंघ काढा

मुसलमान लोक दांडगे असतात म्हणून किंवा अिंग्रज लोक लुच्चे असतात म्हणून हात चोळीत बसण्यात अर्थ नाही. त्यांच्या लुच्चेगिऱ्या तर बाहेर काढल्याच पाहिजेत ! पण हे करताना प्रसंगी आपण त्यांच्यापेक्षाही लुच्चे आणि दांडग बनायला पाहिजे ! ' घटासि व्हावे घट । अुद्धटासि व्हावे अुद्धट । '—शेरास सव्वाशेर हाच न्याय माणसाला वा समाजाला मानाने जिवंत राहण्यास सर्वथैव अुपयोगी पडतो हें लक्षात ठेवा, आणि याचसाठी सैनिक वृत्तीचे तरुणपिढीमध्ये पोषण होणे हे राष्ट्राच्या आत्यंतिक हिताच्या दृष्टीने सर्वतोपरी अगत्याचे आहे. अेक वेळ आमच्या तरुण लोकांत लेखक, कवि नसले तर चालतील, वाङ्मयावर व्याख्यान न झाली तरी चालतील, पण आमची लढाअू वृत्ति फिरून फोफावलीच पाहिजे. नाटकगृह किंवा बालपट गृह यांची आज आम्हाला अेवढी जरुरी नाही. पण रायफल क्लब सगळीकडे स्थापन व्हायलाच हवेत. त्याही गोष्टी आम्हाला हव्याच आहेत, नकोत असं नाही. पण प्रथम हे आणि नंतर अितर सर्व.

## बॅट नको बंदूक हवी

सुदैवाने सध्या आपली मंत्रिमंडळ बऱ्याच प्रांतांतून अस्तित्वात आहेत. याचा फायदा घेअून आपण ही चळवळ नेटाने पुढे ढकलून शस्त्रांचा कायदा आपल्याला हवा तसा करून घेतला पाहिजे. वऱ्हाड मध्यप्रांताकडे मी हिंडलो त्या वेळी मुख्य मंत्री ना. डॉ. खरे वॅ. रामराव देशमुख अि. वजनदार सद्गृहस्थांशी माझे या बाबतीत बोलणं झाले आहे. कायद्याच्या ठराविक कक्षेतल्या सर्व गोष्टींपर्यंत आपल्या हाती असलेल्या सव सवलतींचा संपूर्ण फायदा आपण जनतेला देअू शकतो असं त्यांनी मला आश्वासन दिलं आहे. तिकडे सध्या त्यामुळे नि. डा. मुंजे यांच्या सारख्यांच्या प्रयत्नांमुळे ठिकठिकाणी रायफल क्लब स्थापन होत आहेत. तिकडील तरुणांच्यामध्ये सैनिक शिक्षणाकडे जास्त ओढा असलेला मला दिसतो. नगरसारख्या मोठ्या शहरात अेकदेखील रायफल क्लब नाही हें पाहून मला खेद वाटतो ! अशा अेक्का संस्थेची तरी प्रत्येक शहराला आज अत्यंत आवश्यकता आहे. आपल्याकडील प्रतिष्ठित लोकांनी प्रयत्न केला तर मुबअी अिलाख्यातही ही गोष्ट होणे अवघड नाही. प्रत्येक पालकाने आपल्या मुलांना यापुढे क्रिकेटची बॅट घेअून देण्याअैवजी हवाअी बंदूक घेअून देअून संघासारख्या संस्थांमध्ये त्याला पाठवून ल्ष्करी शिक्षणाच्या मदतीने त्याच्यातील सुप्त सैनिक जागा करण्याचे दिवस आज आले आहेत !

## संघाचे यश

स्वयंसेवक संघाने या बाबतीत आज निम्मा प्रदेश व्यापला आहे. सांघिक संचलन, आज ते जरी नामधारी शस्त्रे घेऊन करीत असले तरी ५० टक्के यश त्यात आहे. अुद्या यांना रायफल दिली तर नेम मारण्याच्या शिक्षणात ते हा हा म्हणता प्रगति करून दाखवतील. शस्त्र वापरण्यापूर्वी ते व्यवस्थित हाताळण्याचा अभ्यास असणे ही गोष्ट कमी महत्त्वाची नाही. ती पुढील संघ यशोमंदिराचा पाया आहे. रा. स्व. संघ आज तो रचीत आहे यातच त्याच्या यशाचे रहस्य आहे अशी माझी ठाम समजूत आहे. शिवाय यात तयार होणारे सांघिक मन ही गोष्ट तर अत्यंत महत्त्वाची आहे! अेका आज्ञेबरोबर 'अुजवा' म्हटल्यावर 'अुजवाच' पाय अुचलणाऱ्या हजारो तरुणांची संघटनाच आज आमच्या गलित हिंदुराष्ट्राचा अुद्धार करू शकेल. त्या सर्व तरुणांमध्ये राष्ट्रप्रेमाची नि स्वातंत्र्याची दिव्य ज्योत प्रखरपणे तेवत ठेवून त्यासाठी अतुल स्वार्थत्याग करण्याची शिकवणूक स्वयंसेवकांना दिली जाते ही गोष्ट असामान्य आहे!

## राष्ट्रोद्धाराची प्रार्थना

आमच्या राष्ट्राचा अुद्धार जर कशाने होणार असेल तर याप्रमाणे संघ राष्ट्र जागे करण्यानेच. ही गोष्ट या संघाचे जनक डॉ. हेडगेवार यांनी पुरेपूर जाणून सर्वस्वी प्रतिकूल अशा परिस्थितीतही आत्मविश्वासपूर्वक संघाची स्थापना करून ते या कार्याला लागले आहेत ही गोष्ट त्यांच्याबद्दल व त्यांच्या या कार्याबद्दल मला आणि प्रत्येक हिंदूला अत्यंत अभिमान वाटण्यासारखी आहे, यात शंका नाही. थोडक्यात म्हणजे आज आमच्या राष्ट्राचे अत्यंत अपरिहार्य असे पुनरुज्जीवन संघ करीत आहे व त्यात अेकदिलाने भाग घेणे हे प्रत्येक तरुणाचे कर्तव्य आहे असे मला वाटते.

हिंदुत्वाचा प्रखर अभिमान ठेवून राष्ट्रकार्याला शपथपूर्वक वाहून घेणारे हे तरुण आज अखिल हिंदुस्थानभर अेकाच वेळी अेकाच आवाजात धीरगंभीरपणे 'हे प्रभो आमच्या राष्ट्राचा सर्वांगीण अुद्धार करण्यासाठी आम्हास भरपूर सामर्थ्य दे!' अशा आशयाची प्रार्थना करतात. अितर तरुण ज्या वेळी नानातऱ्हेचे मनोरंजक खेळ खेळतात, गप्पा मारतात, फिरायला जातात, त्या वेळी रोज नेमपूर्वक तीच तीच लाठी, तेच तेच 'अुजवा—डावा' आणि तीच तीच प्रार्थना हे निष्ठापूर्वक करतात ही गोष्ट कोणाचे हृदय अुचंबळविणार नाही?

\+ + +

# २६ सैनिक शिक्षण

### सोलापूर येथे दि १० ऑगस्ट १९३६ रोजी स्वा सावरकर यानी हरिभाई देवकरण हायस्कूलमध्ये केलेलें भाषण

व्यायामशाळा आता सर्वत्र निघालेल्या आहेत, त्यामध्ये मुल हौसेने व्यायाम घेत आहेत मुलीसुद्धा लाठीशिक्षण घेऊ लागल्या आहत मुलींच्या हातच लाटण जाऊन त्या ठिकाणी लाठी आल्याने पुरुषानी आता त्यांच्याशी जपून वागल पाहिजे ! आता नुसत्या व्यायामाबद्दल बोलण्याचे कारण उरलेले नाही बौद्धिक शिक्षण घेत असताना तुम्ही यापुढे सैनिक शिक्षण घेतल पाहिजे याच्यापुढे तुम्ही सैनिक शिक्षणाकडे लक्ष द्या डॉ मुंज्यानी तिकडे नागपूरला सैनिकाच कॉलेज काढले आहे त्या धर्तीवर सैनिक शिक्षण देणाऱ्या संस्था सर्वत्र निघाल्या पाहिजत माझी सूचना अशी आह की, ययल्या शाळेत बदूक चालविण्याचे वर्ग काढावेत हवाओी बदुकीच शिक्षण लाठीशिक्षणाप्रमाणे देण्याजागे आहे लढाओीच्या दृष्टीन air guns हा पोरखळ आहे ह मी जाणून आहे पण प्राथमिक अवस्थेत तो आवश्यक आहे नेम मारण्याच तुम्हाला साधले तर अेअरगन व रायफल यामध्य फक्त धक्का बसण्यापलीकडे जास्त फरक नाही

### राष्ट्रीय सैनिक

आता मी काही मुलानी केलेले सचलन पाहिले सचलन हा Drill करिता शब्द आहे ह लक्षात ठेवा सम् – अेकत्र नि चलन म्हणजे हालचाल Drill मध्ये अेकाच वेळी सर्वांची हालचाल होत असते म्हणून Drill म्हणजे सचलन होय पण हे सचलन आता सैनिक पद्धतीने शिकविल पाहिजे सध्याच्या तरुण पिढीची अशी तयारी पाहिजे की जरूर लागेल तेव्हा तुतारी फुकल्याबरोबर देशरक्षणार्थ आपले सैनिक तयार पाहिजेत परचक्रापासून स्वसरक्षण करण्यास देश असमथ आह ह म्हणणे आपण फोल ठरविल पाहिजे तीन महिन्यात रिक्रूट निमाण होतात ह गत्या महायुद्धावरून दिसून आले वेस राखणे, भाग पाडणे, चित्रपट पाहणे हें जस तुम्हास आवश्यक वाटते, तसे खाद्यावर बदूक टाकून चालणे हें तुम्हास भूषणास्पद वाटल पाहिजे मी सर्वच ठिकाणी व्यायामशाळाना या बाबतीत विनती करीत आह हीं रायफलची नाही तरी, अेअरगनची व्यवस्था पुढच्या वर्षापर्यंत अमलात यओील अशी मला अुमेद आहे

### जपान नि चीन

जपान देश गेल्या १५० वर्षांत सुधारला चीन मात्र अफू खाऊन स्वस्थ राहिला जपानने नवीन नौका, नवीन विमान अित्यादि सर्व नवीन यात्रिक साहाय्य

घेऊन स्वतःची कमालीची प्रगति केली. निव्वळ देशभक्तीने चीन पुढे येणें शक्य नाही. जेवढें सैनिक सामर्थ्य आवश्यक तेवढें चीनमध्ये नाही; आणि त्यामुळे जपान-सारख्या देशापुढे त्याचा टिकाव लागणें शक्य नाही. यापासून आपण योग्य तो बोध घेतला पाहिजे. देशभक्ताला विजयी व्हावयाचें असेल, तर त्याने सैनिक शिक्षण घेतले पाहिजे. तुमच्या शाळेत १००० विद्यार्थी आहेत. पुढच्या वर्षी मी येथे आलो म्हणजे तुमच्यापैकी पांचशे, निदान शभर विद्यार्थी तरी अेअरगन वापरणारे मला या ठिकाणी दिसतील अशी आशा आहे.

\+ \+ \+

## २७. मराठी भाषेचें शुद्धीकरण

### दि. २६-६-१९३७ रोजी पुणें येथे स्वा. सावरकर यांचें झालेलें भाषण

### पराभवाचीं स्मारकें अुद्ध्वस्त करा

परक्या भाषेतील शब्द आमच्या भाषेत निष्कारण घुसून त्यांनी आमचे जुने शब्द मारू नयेत हाच काय तो शुद्धीकरणाचा अर्थ होय. नवीन वस्तु, नवीन कल्पना, नवीन विचार याना व्यक्तविणारे परको शब्द घेअू नयेत अशी आमची मुळीच भूमिका नाही. पण ज्या वस्तूंना नि विचारांना द्योतक असे शब्द आपल्या भाषा-भांडारात भरलेले आहेत, त्यानाही परके नवे शब्द योजणें हे मनोदास्याचेच लक्षण आहे. बुटाला बूट म्हणा, पण जोड्याला 'शू' म्हणू नका म्हणजे झालें. जिलबी, गुलाब वगैरे परशब्दाचा यथेच्छ अुपयोग करा; पण निष्कारण आलेले परके शब्द टाळा. तें आपल्या पराभवाची स्मारकेंच नव्हेत काय? जेतें राष्ट्र काय करीत असते? सापाने बेडूक गिळावा नि त्याचे हाडन् हाड, स्नायुन् स्नायु पिचून–पचवून टाकावा, त्याचप्रमाणे जेतें राष्ट्र जितांचें राजकारण, त्याचा धर्म, त्यांची संस्कृति, त्यांची भाषा या सर्वांना आत्मसात् करू पाहतें — अितकें की, 'तेच म्हणजे आपण' असा भ्रम जितांना व्हावा!

### आयर्लंडचा कित्ता

बेडूक गिळल्याबरोबर सापाला ठार केलें तर तो बेडूक जशाच्या तसा सुर-क्षितपणे बाहेर पडतो. त्याचप्रमाणे अद्याप आपल्याला मराठी भाषा सुखरूप ठेवता येअील अशी स्थिति आहे हें आपलें भाग्य समजा. नाही तर आयर्लंडमध्ये ग्रिफिथला जेव्हा स्वभाषेचा प्रसार करण्याची अिच्छा झाली तेव्हा त्याला कोण

प्रयास पडले! आयरिश भाषेतील शब्दच मुळी अेकत्र नव्हते तेंव्हा खेडयाखेडयात व घराघरात हिंडून त्याने लोकगीतातून नि लोककथातून आयरिश शब्द जमविले आणि त्याचा कोश निर्माण केला आज डी व्हॅलेराने आपल्या राजसभेचे नाव बदलून 'आयर' असे आर्यत्वदर्शक नाव ठेवले आहे हेही स्वभाषाभिमानाचेच अुदाहरण होय तेथे परवाच अेका अिंग्रजाचा पुतळा जसा अुडविला, तसेच आपल्या पराभवाचे किंवा अकिंचित्वाचे स्मरण करून देणारे परशब्दही अुडविले पाहिजेत हा त्याचा निर्धार आहे आपल्याकडे नीलचा पुतळा आदोलनाच्या बळावर हलविण्यात आलाच की नाही ?

## सोन्याची वाटी कां फेकता ?

केमालपाशानेही असेच केले अरबी शब्दाना त्याने अर्धचंद्र दिला नि तुर्की शब्द रूढविले त्यालाही शब्दाची वाणच पडली पण रोज पाच पाच शब्द राजाज्ञेच्या द्वारा घोषित करून त्याने स्वभाषेचा सत्ताबळाने पुरस्कार केला त्याची लिपि मुद्रणाला अत्यत अक्षम, म्हणूनच रोमन लिपी त्याने आपल्या भाषेत स्वीका-रली आपल्याला भाषा-दारिद्र्य नडणारे नाही जिच्यापुढे ग्रीक, लटिन अित्यादि भाषानीही आनतमस्तक व्हावे अशी आपली सस्कृत भाषा किती सघन आहे! तिला अव्हेरून अिंग्रजी, फारसी अित्यादि दुसऱ्या परक्या भाषातून शब्द घेणे म्हणजे घरातील सोन्याची वाटी फेकून चिनी मातीचे कप हाती घेण्यासारखेच नव्हे काय? सूर्य, चद्र याना अिंग्रजीत अेकअेकच शब्द, पण सस्कृतात किती पर्याय आहेत! आणि तेही असे की, अेकेक शब्द म्हणजे श्लोक, जणू काव्यच! अशी बहुमोल खाण अगणात असताना परक्याच्या दारी भीक का मागता? आपल्या नित्याच्या व्यवहारात चार साडेचारशे शब्द परकी आहेत. त्यांचे अुच्चाटन करण्याचा निश्चय करा. वाटते अितके हे अवघड काम नाही. गेल्या बारा वर्षांत हुतात्मा, अुपस्थित, स्तभ, बोलपट अित्यादि शब्द बोल बोल म्हणता रूढ झालेच की नाही! आपण स्वभाषाभिमान टाकला असता तर, पुणे, नाशिक, काशी, वगैरे नगराना मुसुलमानानी दिलेली मुसुलमानी नावेच रूढ झाली असती आजही दौलताबाद, अहमदाबाद हे परके शब्द, परक्याच्या वर्चस्वाचे स्मरण करून देणारे शब्द, आपल्या जिभेवर नाचत आहेतच की नाहीत? सिंहगडाला औरगजेबाने 'बक्षिदा बक्ष' असे नाव दिले, पण शिवाजीमहाराजानी ते बदलून स्वदेशाबरो-बर स्वभाषेचीही सेवा केली आपण अशीच स्वाभिमाना वृत्ति ठेवली पाहिजे.

\+ + +

## २८. बडोदें साहित्य संमेलन

अध्यक्ष स्वा. सावरकर यांचें दि. १२-९-३७ रोजी भाषण झालें. त्यात त्यांनी पुढील सूत्रें सांगितलीं. आपली भाषा शुद्ध करण्यासाठी आपण आपल्या भाषेत ठाण मांडून बसलेल्या अनावश्यक अुर्दू नि अिंग्रजी शब्दांचें अुच्चाटन केले पाहिजे. त्याप्रमाणे जुन्या मराठी शब्दांचें पुनरुज्जीवन केले पाहिजे आणि शक्य तेथे नवीन मराठी समर्पक शब्द बनविले पाहिजेत.

साहित्यासंबंधीची माझी भावना थोडी विशिष्ट स्वरूपाची आहे. साहित्य हे राष्ट्राच्या बुद्धीचे, सामर्थ्याचे, शौर्याचे, प्रतीक आहे अशी माझी भावना आहे. मी स्वतंत्र हिंदुस्थानात जन्माला आलो असतो किंवा पेशवाअीत जन्माला आलो असतो तर माझ्या खऱ्या साहित्याच्या कल्पनेचा अर्थ तुम्हाला अधिक चांगला पटवून देता आला असता. सध्याच्या हिंदुस्थानच्या परिस्थितीत माझे साहित्य हे केवळ प्रचारात्मक स्वरूपाचे आहे. आजच्या माझ्या अध्यक्षीय भाषणात मी कोणतीच तात्त्विक चर्चा करणार नाही. तशी चर्चा करण्याला माझ्यापेक्षा लायक विद्वान् येथे कितीतरी आहेत. यासाठी आजच्या प्रसंगाचा अुपयोग मी माझ्या प्रचारकार्याकडेच करणार आहे.

### भाषाशुद्धीची दुसरी बाजू

आजच्या स्वागताध्यक्षांनी आपल्या भाषणात भाषाशुद्धीच्या प्रश्नावर आपले विचार प्रकट केले आहेत. त्यांनी घेतलेली या प्रश्नाची अेक बाजू असून दुसरी मी आता आपल्यासमोर मांडणार आहे प्रत्येक देशावर किंवा संस्कृतीवर जेव्हा परकीय देशाचा आणि संस्कृतीचा आघात होतो तेव्हा जित राष्ट्राची भाषा नि साहित्य यावर जेत्या राष्ट्राची भाषा व साहित्य याचे आक्रमण सुरू होते आपल्या हिंदुस्थानात प्रथम मुसुलमान नि नंतर अिंग्रज या दोन राज्यकर्त्यांच्या भाषाचे आपल्या भाषेवर आक्रमण झाले. आयर्लंडमध्ये अिंग्रजांनी आपली सत्ता प्रस्थापित केली तेव्हा तेथेही अिंग्रजी भाषेने आक्रमणच केले. अेकाकाळी आयर्लंडात आयरिश भाषा बोलणे हा गुन्हा होता. शाळांतदेखील आयरिश भाषा शिकविण्याला अेका काळी बंदी होती. सुदैवाने आपल्या भाषेवर परकीय भाषाचे जे आघात झाले ते म्हणण्यासारखे तीव्रही नव्हते आणि आपण काही तत्काळ परतवूनही टाकले. त्यामुळे आपल्या भाषेची आयरिश भाषेसारखी गळचेपी झाली नाही ही गोष्ट खरी; तथापि परकीय भाषेचे स्वामित्व स्वाभिमानास केव्हाही दुःसह होते.

## आयर्लंडमधील दु स्थिति

आयरिश भाषा अस्तगत होत चाललेली पाहून अेका पत्रकर्त्याने आपल्या पत्रात आयरिश भाषेचा अेक स्तभ देण्यास प्रारभ केला आज त्या देशाचे आयर्लंड असे नाव आहे तोही अिंग्रजांच्या आक्रमणाचाच अेक पुरावा होय पूर्वी त्या देशाचे आयरीन म्हणजे आर्यभू असे नाव होते; परतु जेत्या अिंग्रजानी त्याला 'लॅंड' हा अिंग्रजी शब्द जोडून त्याचे आयर्लंड बनविले आपल्या सीमाप्राताकडे तुम्ही दृष्टिक्षेप कराल तर तेथे अशीच परिस्थिति असल्याचे तुम्हाला आढळून येअील त्या प्रातात अुर्दू भाषेचे वर्चस्व अनोनात आहे प वा लाला लजपतराय नि स्वामी श्रद्धानद यानी सस्कृतोद्भव हिंदी भाषा जगविण्याची तिकडे पराकाष्ठा केली तिकडील शिक्षण अुर्दूमिश्रित हिंदीत मिळते खुद्द भाअी परमानदाना देखील अदमानातून सुटल्यावर निर्भेळ हिंदीचे शिक्षण घ्यावे लागल

## केमालपाशाचे अुदाहरण पहा

परकीय राज्यसत्तेखाली असताना तुर्की भाषा व तुर्की लिपि याचा तुर्कस्थानात पूर्ण लोपच झाला होता. परतु केमालपाशाने तुर्की भाषा व तुर्की लिपि जिवत केली त्याने प्रार्थनादेखील तुर्कीतच झाल्या पाहिजेत असे फर्मान काढले कुराणाचे तुर्कीत भाषातर करविले व 'अल्ला' या देवनिदर्शक शब्दाच्या ठिकाणी त्या अर्थाचा 'तारी' हा तुर्की शब्द जारी केला औरगजेबाच्या कारकीर्दीत जिंकलेल्या गावाची नावे बदलून मुसलमानी करण्यात येत अहमदनगर, अहमदाबाद, वगैरे-सारखी गावाची नावे अशीच पडलेली आहेत फार काय पुण्यातील पेठाची नावेही पूर्वी मुसलमानी होती आज तेथील पेठाची जी नावे आहेत ती माधवराव पेशवे यानी बदलून दिलेली नावे आहेत, शिवाजीमहाराजानी भाषाशुद्धीचे काम हाती घेण्यापूर्वी मराठी भाषेत अुर्दू भाषेतील शब्द खूपच बोकाळले होते पजाबात आज अुर्दूचे अितके वर्चस्व आहे की, परमानदानाही आपल पत्र अुर्दूतच काढावे लागते सिंधमध्ये आपण गेलात तर तेथील सिंधी भाषा अुर्दूमय आहे नि सिंधी लिपि अुर्दूसारखी आहे असे दिसून येअील

## अिंग्रजी वातावरण

सिंधीतील रामायण, भागवत अुर्दूप्रमाणे अुजवीकडून डावीकडे वाचावे लागत मराठ्याच्या काळात भाषाशुद्धीच्या दृष्टीने बरेच प्रयत्न झाले रघुनाथ पडिताचा राज्यव्यवहारकोश, मोरोपतांचे काव्य, रामदासाचा दासबोध वगैरे ग्रथ या प्रयत्नाचेच निदर्शक होत परतु अिंग्रजी सत्तेबरोबर आपल्या भाषेवर अिंग्रजीचे आक्रमण सुरू झाले या आक्रमणाचे परिणाम आज प्रत्यही आपल्या दृष्टीस पडत आहेत आज कोठल्याही चौकात आपण जाअून जरा सभोवारच्या पाट्यावर नजर

टाका म्हणजे आपणाला टेलर, सलून वगैरे अिंग्रजी शब्दांचाच भरणा आढळून येअील फार काय, शाळेतील मुलेदेखील 'अर, व्ही. डी ' 'अरे, अेम के' अशा हाका मारताना तुम्हाला दिसतील आज जरी न चिं केळकर हा शब्दप्रयोग रूढ झाला असला तरी आमच्या वेळी ते अेन सी केळकर म्हणूनच प्रसिद्ध होते लोकमान्य टिळकही अुत्तर हिंदुस्थानात बी जी टिळक म्हणूनच ओळखले जात असत अिंग्रजी भाषा आपल्या बोलण्यात येते त्याला आपण अितके सरावलो आहोत की, त्याचे आपणास काहीच वाटत नाही ! परवा फुगडी, सागरगोटे खेळणाऱ्या छोट्या मुलीसुद्धा अेकमेकींना 'रेडी का ग?' असा प्रश्न करीत असलेल्या पाहून मला आश्चर्य वाटले

## भ्रष्टतेची अुदाहरणें

अिंग्रजी शब्दप्रयोग करणे हे अेक प्रतिष्ठितपणाचे लक्षण असेही कित्येकांची कल्पना असते नि त्यामुळे कमी शिकलेल्या अिसमाची जास्तीत जास्त अिंग्रजी शब्द वापरण्याची प्रवृत्ति दिसून येते घराची शाकारणी करून खाली अुतरलेल्या दोन कामगारांपैकी अेकाने दुसऱ्याला 'कसे काय केले काम आज?' असा प्रश्न करताना दुसऱ्याने त्याला 'अगदी थपटुडेट' असे अुत्तर दिल्याचे मी अेकदा अैकिले ! अप, टु, किंवा डेट यांपैकी अेकाही शब्दाचा अर्थ माहीत नसताना केवळ चांगल्या कामाच्या अर्थाने तो शब्द योजतात, अवदशा अनुमानावर त्या कामगाराने तो शब्द येथे योजला मध्यमवर्गीय सुखवस्तु माणसाच्या घरी तुम्ही गेलात तर तो तुम्हाला 'वाअिफ' घरी आहे व 'सन्' बाहेर गेला आहे असे सांगेल बायको शब्द वाटला तर नका वापरू, पण कुटुंब म्हणायला का तुम्हाला लाज वाटते? पण नाही वाअिफ म्हणणे शिष्टपणाचे लक्षण, अशी त्याची कल्पना असते जी पाक्षिस्तान' मी प्रथम 'रिझ्यूम' केली तीच मुळी 'फॉल्स' होती हे असलेच तऱ्हेच वाक्य आहे ही स्थिति लाजिरवाणी नाही काय?

## दोन कारणे

मला भाषाशुद्धि हवी ती दोन गोष्टींकरिता हवी आहे अेक आपली भाषा निर्मळ राहावी यासाठी आणि दुसरी म्हणजे तिच्यावरील आक्रमण हे आपल्यावरील परकीयांच्या स्वामित्वाचे निदर्शक आहे यासाठी आमचा पहिला कटाक्ष असा की मराठी भाषेत जे अनावश्यक परकीय शब्द घुसले असतील त्यांना हुसकावून लावा. पत्नी, जाया, भार्या असे अनेक शब्द तुमच्या भाषेत असताना 'वाअिफ' शब्दाची काय जरुरी? आमचा दुसरा कटाक्ष असा की, आपल्या भाषेत रूढ झालेल्या ज्या परकीय शब्दांना सुटसुटीत नवे शब्द बनविता येतील किंवा त्या अर्थाच्या जुन्या शब्दांचे पुनरुज्जीवन करता येअील ते करा

## हिंदी हीच राष्ट्रभाषा

यासाठी हिंदी राष्ट्रभाषा असली पाहिजे असही आमचे म्हणणे आहे अुत्तर हिंदुस्थानात आजही अुर्दूचे आपल्यावर आक्रमण होत आहे, त्याचा आपण प्रतिकार केला पाहिजे रेडिओत आजकाल मुबअीचा समाचार अैवजी 'सुनो मुबअीकी खबर' असे अुर्दू शब्दप्रयोग अैकू येअू लागले आहत अुर्दू हीच राष्ट्रभाषा असली पाहिजे असा बॅ जिना याचा आग्रह आहे बिहारमध्ये हिंदु मत्रिमडळ असताना तेथे तडजोड म्हणून अुर्दू ही राजभाषा म्हणून स्वीकारण्यात आली, ह अैकून मला विस्मय वाटला! बगालमध्ये हिंदु नि मुसलमान दोघेही बगाली भाषा बोलतात तथीग बगाली लोकानी मुसलमानाच्या आहारी स्वत जाण्याअैवजी त्या मुसलमानानाच सस्कृत पडित बनविल भोपाळ नि निजाम या सस्थानातून आज अुर्दू भाषेचा जोराने पुरस्कार केला जात आह पण मी त्याना त्याबद्दल दोष देत नाही.

### स्वामित्वाची स्मृति कशाला ?

दुसऱ्याना दोष न देणे ह हिंदु सस्कृतीचे वैशिष्टय आह परतु आपली भाषा शुद्ध करण्यासाठी आपण आपल्या भाषेत ठाण माडून बसलल्या अनावश्यक अुर्दू नि अिंग्रजी शब्दाच अुच्चाटन केल पाहिजे, त्याचप्रमाणे जु या मराठी श दाचे पुनरुज्जावन केले पाहिजे, आणि शक्य तेथे नवीन मराठी समर्पक शब्द बनविले पाहिजेत विशेषत 'कायदा हा अुर्दू शब्द आपण आधी काढून टाक ला पाहिजे कारण त्या शब्दाच्या मागे जी सूचकता आह, ती आपल्या स्वाभिमानास धक्का लावणारी आहे यासाठी त्या अर्थाचा निर्बंध' असा शब्द आपण योजल्यास बर होअील गुजराथी वगैरे भाषा आपल्या आहेत नि त्यानी आपल्या भाषेत भर टाकला तर मला आनद आहे परतु स्वामित्वनिदर्शक अुर्दू नि अिंग्रजी भाषांतील श दावर माझा मोठा कटाक्ष आहे

\+ \+ \+

## २९. मध्यप्रांतीय साहित्य समेलन

नागपूर येथे विद्यापीठाच्या स्नातक मदिरात मराठी मध्यप्रांतीय साहित्य समेलनाचे सभापति म्हणून स्वा सावरकर यांचे दि १२-१२ १९३७ रोजी पुढील आशयाचे भाषण झाले ' हिंदी हीच आमची राष्ट्रभाषा आणि देवनागरी हीच आमची राष्ट्रलिपि हा सिद्धात त्यात प्रतिपादिला आहे

आता समेलनाचे अुद्घाटन करताना आपल्या प्रांताचे प्रधान ना डॉ खरे यानी हिंदीसबधी जे सागितले त अत्यत अुचित आहे आपण प्रथम भारतीय आहो

च नंतर महाराष्ट्रीय आहो. नर्मदा नि कृष्णा या नद्यांनी परिवेष्टित अेवढाच केवळ महाराष्ट्र न मानता पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत आणि हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत पसरलेला सबंध भारत हा महाराष्ट्रच मानण्याला आपण शिकले पाहिजे अर्थात् त्या दृष्टीने हिंदी ही राष्ट्राची अेक राष्ट्रीय भाषा होणे हे केवळ अुचितच नाही तर आवश्यकही आहे पूर्वकाली जरी संस्कृत हीच देशाची अेकमेव भाषा होती व सर्वदेशीय महत्त्वाचे असे ग्रंथ व काव्ये जरी संस्कृतमधून लिहिली जात तरी पुढे कालांतराने तिची जागा हिंदीने पटकाविली. मराठी संतकवि नामदेवाने हिंदी भाषेत रचना केली असून ती आजही पंजाबसारख्या दूरच्या विभागात प्रसिद्ध आहे आणि तुकारामाचेही काही अभंग हिंदीत आहेत यावरून हिंदी ही त्या काळात सर्वराष्ट्रीय भाषा कशी होअून बसली होती ते बरोबर दिसून येअील. या प्राकृत भाषेचा प्रचार चारी धामाच्या यात्रा करणाऱ्या साधुवैराग्यांच्या-मुळे वाढल्याने तिला साधूंची किंवा वैराग्यांची भाषा असे अभिधान त्या काळी प्राप्त झाले होते. धर्माने मुसलमान असलेल्या कवींनीही आपली काव्यरचना त्या काळी व्रजभाषेतून केली आहे

## हिंदी ही जुनीच राष्ट्रभाषा

अर्थात् पंडिताची भाषा मात्र संस्कृत हीच राहिली. संस्कृत भाषेचा सामान्य जनातून लोप होअून हिंदीचा प्रादुर्भाव होण्याला आपल्यावर परकीयांची आक्रमणे ही जशी कारण झाली, तसे आपले शैथिल्यही त्याला बऱ्याच अंशाने कारण झाले. ते कसेही असले तरी अेवढी गोष्ट खरी की, हिंदी ही राष्ट्रभाषा मानण्याची कल्पना नवी असली, तरी तिचा प्रचार मात्र नवीन नाही. तिने पूर्वीपासूनच राष्ट्रभाषेचे स्थान पटकाविलेले आहे यात पुढे अिंग्रजी राजवट सुरू झाल्यापासून खंड पडला. पण हा फरक नवीन अिंग्रजी शिक्षणाने अलंकृत झालेल्या म्हणजे वरच्या वर्गातच मुख्यतः पडला आता हिंदी हीच आपली राष्ट्रभाषा व तिचा अधिकाधिक प्रचार होणे अवश्य आहे, ही गोष्ट ठरली. परंतु अलीकडे हिंदीचे जे भ्रष्टीकरण सुरू झाले आहे त्यामुळे राष्ट्रभाषा हिंदी हिचे स्वरूप कसे असावे यासंबंधी वाद अुपस्थित झाला.

## राष्ट्रभाषेचें चाललेलें भ्रष्टीकरण

'हिंदी यानें हिंदुस्थानी' हे नवे नाव तिला मिळू पाहत आहे. अुर्दू, पारसी वगैरे जे शब्द मूळच्या संस्कृतनिष्ठ हिंदीत शिरले ते तसेच कायम राहू देअून जी भाषेची खिचडी होअील ती राष्ट्रभाषा मानावी, असे मानण्याकडे सध्या या देशातील काही बड्या लोकांचा कल आहे. परंतु ही गोष्ट मात्र अनुचित आहे. राष्ट्रभाषा तीच होअू शकते की जी सर्मान्वित राहील. आपला अितिहास आणि परंपरा

यात वसणारी ही भाषा नाही शिवाय नवशब्दप्रसवाला जी भाषा समर्थ आहे तीच भाषा हिंदीची जननी असणे योग्य आहे नव्या युगात अुदभवणा या अभिनव कल्पना नि वस्तु याचे निदर्शक अशा शब्दाचा पुरवठा करू शकेल अशी भाषा सस्कृत-शिवाय आज जगात दुसरी कोणती आहे? अरेबिक भाषा नि लिपि या दोन्हीही या कामी असमर्थ आहेत अरेबिक लिपि तर या कामी अितकी निकृष्ट आहे की तुर्कस्थानातून तिचे अुच्चाटन करून रोमन लिपि केमालपाशाला तेथे प्रचारात आणावी लागली. जगात देवनागरीअितकी पूर्णतेस पोचलेली लिपि नि सस्कृतअितकी नवशब्दप्रसवक्षम भाषा जगात दुसरी नाही

## मुसलमानाचा हट्ट कोठवर पुरवाल ?

काव्य, शास्त्रे, विज्ञान या सर्वांना शब्दाच्या राशी पुरवू शकेल अशी सस्कृत ही अेकच भाषा आहे ग्रीक व लॅटिन याही या कामी अपुऱ्या आहेत निझाम सरकारने आपल्या अुस्मानिया विद्यापीठात अुर्दू भाषा या कामी लावण्याचा प्रयोग करून पाहिला होता, पण तो असफल ठरल्यामुळे तो नाद त्याना शेवटी सोडून द्यावा लागला शेवटी नाअिलाजाने त्याना अिंग्रजी शब्दच जसेच्या तसे अुचलावे लागले मग आता हा प्रयोग आपण करून पाहण्यात काय अर्थ ? आणि हे करावयाचे तरी कशासाठी ? तर मुसलमानाना खुश करण्यासाठी ! परतु याने तरी ते प्रसन्न होतात का !

## शब्दाची जातवार वाटणी !

आता तर त्यानी अुर्दू हीच राष्ट्रभाषा नि अरेबिक हीच लिपि हिंदुस्थानात नादली पाहिजे अशी घोषणा केली आहे मग तुमच्या त्या त्यागाला काय फळ आले ? तुम्ही जसजसे पाअूल मागे घ्याल तसतसे त्याच्या दुराग्रहाचे अेकेक पाअूल पुढे पुढेच पडत जाणार हे दिसतच आहे कलकत्ता विद्यापीठाचे प्रतीक श्रीयुक्त कमल हे त्याच्या डोळ्याना आता सलू लागले असून 'वंदे मातरम्' हे आजवर सर्वमान्य झालेले राष्ट्रगीत त्याना अेकवेनासे झाले आहे डाक्का विद्यापीठात क्रमिक पुस्तकातून बगाली शब्दाचे अुच्चाटन करून तिथे अुर्दू शब्द घुसडण्याची कारवाअी सध्या चाललेली आहे अेका पुस्तकात बगाली शब्द किती असावेत नि अुर्दू किती असावेत याची जणू काय वाटणी करून घेण्याचा प्रयत्न त्यानी चालविला आहे विधिमडळातील जागाच्या वाटणीचे प्रमाण भाषेतही शिरले तर कसा अनवस्थाप्रसग अुद्भवेल याचा आपण विचार करा, पण ही त्याची भूक तुमची भाषा सबध गिळून टाकल्याखेरीज थांबणार नाही सरसोमा प्रातात हिंदी नि गुरुमुखी याची चाललेली गळचेपी ही मुसलमानाच्या अेतद्विषयक वृत्तीच अुत्तम प्रत्यतर आहे अर्थात त्याच्या ह्या हट्टापुढे सदाच मान वाकवीत राहूनही त्याचे कधी तरी समाधान होअील का? अर्थात नाही, हे अुघड आहे

## ही गुळमुळीत भाषा सोडा !

मग त्याची पत्राज कुठपर्यंत करावयाची ? आता गुळमुळीत भाषा वापरून निभत नाही अेकदा हिंदूंनी हे स्पष्टपणे सांगून टाकले पाहिजे की, या देशाची राष्ट्रभाषा अुर्दू नाही, अुर्दूमिश्र हिंदी म्हणजेच 'हिंदी याने हिंदुस्थानी' नव्हे, तर संस्कृतनिष्ठ हिंदी हीच राहील गुळमुळीत भाषेनेच आपण आजवर आपला घात करून अितरांच्या आक्रमक वृत्तीला जीवन पुरविले आहे अर्थात् यापुढे आपण आपल्या राष्ट्रभाषेचे भ्रष्टीकरण सहन करता अुपयोगी नाही अहो, 'हिंदी याने हिंदुस्थानी' ह्या नव्या भाषेच्या नावातही संस्कृत नि अरबीचे मिश्रण आहे ! अुर्दू ही वस्तुत बाजारू भाषा आहे कायरोसारख्या शहरात देशोदेशीच्या प्रवाशांच्या सरमिसळीपासून नि त्यांच्याशी व्यवहार करण्याच्या स्थानिक लोकांच्या गरजेतून तेथे अेक वेगळीच भाषा अुत्पन्न झाली अुर्दू ही असलीच भाषा आहे

## अुर्दूची कुरघोडी हिंदीवर नको

पण बाजारातील भाषा हीच राष्ट्रभाषा झाली पाहिजे असाच तर आज कित्येकांचा आग्रह आहे! परंतु ते ही गोष्ट विसरतात की, यामुळे नवशब्दप्रसवक्षमतेच्या व श्रुतिमधुरतेच्या दृष्टीने आपल्या राष्ट्रभाषेची अपरिमित हानि होणार आहे आणि या दोन्ही गोष्टी भाषा सामर्थ्यशाली होण्याच्या दृष्टीने अत्यंत आवश्यक आहेत अशी भाषा या देशात अेक संस्कृतनिष्ठ हिंदी हीच होअू शकते आणि म्हणून आपण अेकदा अितरांना हे स्पष्टपणे सांगून टाकले पाहिजे की, तुम्ही सुखेनैव आपली अुर्दू भाषा स्वत पुरती ठेवा, पण आम्ही आपल्यावर तिचा जुलूम चालू देणार नाही नाही तरी देवनागरीबरोबरच अुर्दू लिपिही दुसरी राष्ट्रीय लिपि म्हणून मान्य केलीच ना ? मुसलमानांच्या हट्टासाठी जर काही करणे आवश्यकच असेल तर लिपीप्रमाणेच त्यांच्यापुरती अुर्दू भाषाही मान्य करा, परंतु हिंदीवर तिला कुरघोडी करू देअू नका त्याने अैक्यही साधणार नाही नि भाषेचा गौरवही वाढणार नाही हे तुम्ही अेकदा कळत म्हणजे अुद्या असा प्रसंग आपोआपच यअील की तुमची हिंदी भाषा हीच त्यांना शिकावी लागेल कारण, आपण बहुसंख्य आहात नि आपल्याशी व्यवहार करावयाचा तर आपली भाषा शिकणे त्यांना प्राप्तच आहे. तुम्ही मात्र आपले दौर्बल्य मोडून दिले पाहिजे म्हणजे खरी सांधजोड घडून यअील

## अितिहासाचे हाल का ?

मुसलमानांच्या रागालोभाचा पर्वा करण्यापायी अितिहास विकृत करण्यापर्यंत आपली मजल गेली आहे आमच्या बाजूची काही क्रमिक पुस्तके माझ्या सहजगत्या अवलोकनात आली त्यात देवगिरीच्या यादवांचे राज्य मुसलमानांनी घेतल्याच नि त्या वेळी हरपाळदेवाला कैद केल्याचे लिहून पुढे हिंदु मुस्लिम

अैक्याचे गोडवे गायिले आहेत. या अैक्याचा पुरस्कार करून मुलांचीं मनें पवित्र राखावीं हे युक्तच आहे. परंतु अितिहास त्यांना पूर्णपणे कां निवेदीत नाही ? त्या हरपाल देवाचें कातडें जिवंतपणी आपादमस्तक सोलून काढण्यात आलें हें त्यांच्या-पासून कां लपवून ठेवता ?

संभाजीला नुसती अटक केली असेंही मी अेका क्रमिक पुस्तकात वाचलें! हा ढोंगीपणा कां ? त्याचे हालहाल करून मारण्यात आलें आणि शिर अेका ठिकाणी नि धड दुसऱ्या ठिकाणी बारा मैलांच्या अंतराने अुंटावरून लोटून देण्यात आले. हे त्यांना कां निवेदीत नाही ? हें का ? तर ज्यांनी हे अनन्वित प्रकार केले त्यांना राग येतो म्हणून ! ! यापेक्षा निर्लज्जपणा कोणता हवा ? आता राष्ट्रीय सभेची राजवट बहुसंख्य प्रांतांतून सुरू झाली आहे; तेव्हा ही चूक सुधारता येणें शक्य आहे नि अवश्यही आहे. आपल्या प्रांताचे प्रधान डॉ. खरे यांनी या गोष्टीकडे अवश्य लक्ष द्यावें अशी माझी त्यांना सूचना आहे.

## देवनागरीत मुद्रणसौकर्य आणा

आपल्या लिपि-सुधारणेची योजना आपण समजावून घेतली पाहिजे. प्रारंभी जगात हातवारे नि नेत्रसंकेत यांनी भावनांचें प्रकटीकरण पूर्णपणे होत नाही असा प्रत्यय आल्यामुळे जमा बोली भाषेचा जन्म झाला तसेच विचाराचा संग्रह करून ठेवण्याची आवश्यकता अुत्पन्न झाल्यामुळे लिपि जन्माला आली. प्राचीन काळातील प्रगत राष्ट्रात चित्रलिपि प्रचलित होती नि आजही चीन-जपान वगैरे देशांत ती प्रचलित आहे. परंतु तिजमुळे अक्षरसंख्या अितकी वाढली की, तिच्यात सुधारणा करण्याची आवश्यकता अुत्पन्न झाली. यातूनच ब्राह्मी म्हणजेच देवनागरी लिपीचा जन्म झाला. ही लिपि ज्या क्षणी जन्मास आली, तो मोठा युगप्रवर्तक क्षण समजला पाहिजे. ही लिपि अितकी विचारपूर्वक बसविली आहे नि तिची रचना अितकी शास्त्रीय आहे की, तिच्याशी जगातील कोणतीही विद्यमान लिपि स्पर्धा करू शकत नाही.

## 'अ'ची बाराखडी

अेका अुच्चाराला अेक अक्षर हे तिचें वैशिष्ट्य आहे. परंतु अितकी शास्त्र-शुद्ध अशी जरी आपली लिपि असली तरी मुद्रणसौकर्याच्या दृष्टीने तीत काही फेरफार करणें आज आवश्यक झालें आहे. अिंग्रजी भाषेशी मुद्रणाच्या बाबतीत तोंड द्यावयाचें असलें तर तीत सुधारणा अनिवार्य आहे. देवनागरी लिपि सुटसुटीत नि कमी अक्षराची करणे हाच त्यावर अुपाय आहे. या दृष्टीने माझ्या पद्धतीने जर देवनागरी लिपि लिहिण्यात आली तर 'अ'च्या बाराखडीतील ८ अक्षरें, १०० जोडाक्षरें नि २५ 'र'कारांचे प्रकार अितकी अक्षरें वाचून सुमारे ५६ खणात मराठी

जुळाऱ्याची पेटिका पूर्ण होऊं शकते. सध्याची जोडाक्षरें लिहिण्याची पद्धति ही काही सर्वांगी पूर्वापार नाही. त्यात निरनिराळ्या काळी आवश्यकतेनुसार फरक पडलेला आहेच. मग आज मुद्रणसौकर्याच्या दृष्टीने आपण आणखी सुधारणा करावयाला काय हरकत आहे?

## याने लिपि विद्रूप होत नाही.

या सुधारणापैकी कित्येक तर प्राचीनाचे पुनरुज्जीवनच आहेत. शिवाय ही नवी लिपि मुलांना समजण्यास सोपी आहे. सौंदर्याच्या दृष्टीने या सुधारणेमुळे लिपीची हानि होते हे म्हणणेही बरोबर नाही. हा फक्त दृष्टीला लागलेल्या सवयीचा परिणाम आहे. वृत्तपत्रकारांनी नि शिक्षणमंत्र्यांनी जर ही गोष्ट मनावर घेतली तर देवनागरी ही लौकरच अेक चांगली मुद्रणक्षम लिपि बनेल 'अ'ची बाराखडी तर आता प्रचारात येऊं लागलीच आहे. परंतु माझ्याच साऱ्या सूचना स्वीकारा असाही माझा आग्रह नाही. अितरांनी वाटल्यास आपल्या सूचना पुढे मांडाव्यात आणि तज्ज्ञांनी सर्वांचा विचार करून ही सुधारणा घडवून आणावी.

\+ + +

## ३०. महाराष्ट्र साहित्य संमेलन

[ मुंबई येथे दि. १५ अेप्रिल १९३८ रोजी संमेलनाचें २२ वें अधिवेशन भरलें असता त्याच्या अध्यक्षपदावरून स्वा. सावरकर यांनी पुढील भाषण केलें. मराठी भाषेचें आणि लिपीचें शुद्धीकरण, राष्ट्रभाषा हिंदी आणि राष्ट्रलिपि देवनागरी यांचा पुरस्कार आणि त्यावरील आक्रमणाला जोराचा प्रतिकार, मराठीतील क्रियापदांचें आणि मराठी भाषिकांतील क्रियाशीलतेचें दारिद्र्य दूर करण्यासाठी 'सैनिक व्हा' असा संदेश अित्यादि विषयांचा प्रपंच करणारा अधिकृत प्रबंधच गणण्याअितकें हें भाषण महत्त्वाचें आहे ]

आपण मला महाराष्ट्र साहित्यसंमेलनाचें या वर्षीचें अध्यक्षपद देअून जो मान अर्पिला आहात आणि जो विश्वास व्यक्तविला आहात त्याविषयी मी आपला आभारी आहे. तो मान माझ्या साहित्यविषयक योग्यतेपेक्षा आपल्या ममत्वाचाच

अधिक द्योतक आहे हें मी जाणून आहे, आणि तो विश्वास अनाठायी पडल्या-सारखें होअू नयें यास्तव साहित्यविषयक काय काय सुधारणा केल्या पाहिजेत ह्याचा जो कार्यक्रम मला आपल्या राष्ट्राचे हितार्थ पथ्य वाटतो तो, प्रिय असो वा अप्रिय असो, त्याची चिंता न करता, या निबंधात जितका शक्य तितका मी दिग्दर्शिणार आहे

## स्वागताध्यक्षाचेंच स्वागत

नेहमीचा शिष्टाचार म्हणजे अध्यक्षाचे स्वागत स्वागताध्यक्षाने करावयाचे, परंतु या वर्षी आपण अध्यक्षपदी मला नियोजून, स्वागताध्यक्षाचे पदी न्यायमूर्ति मुकुंदराव जयकर यांची योजना केल्यामुळे प्रथमारंभीच त्या शिष्टाचाराचा भंग करण्याचा प्रसंग माझ्यावर आढवला आहे असा हवा तोच गोड प्रसंग माझ्यावर आणण्यात आपण मला अुपकृतच केलें आहे न्यायमूर्ति जयकरांसारखी थोर व्यक्ति जेव्हा स्वागताध्यक्षाचे पदी असते, तेव्हा कोणत्याही अध्यक्षाला शिष्टाचार बाजूस सारूनसुद्धा स्वागताध्यक्षाचेंच स्वागत केल्यावाचून कसें राहवेल? ज्या मुंबओ नगरात हें संमेलन भरत आहे त्या मुंबओ नगरांतील अग्रगण्य नागरिक, नामांकित वक्ता, नामांकित विद्वान्, नामांकित राजकारणी, नामांकित समाज-सुधारक, महाराष्ट्रीय वाण्याचा अेकनिष्ठ अभिमानी असा हा स्वागताध्यक्ष मला लाभल्यामुळे अध्यक्षपद लाभल्यापेक्षाही माझा गौरव अधिक झाला आहे असं मी समजतो वें बाबाराव जयकरांना भारतीय संघराज्याच्या अत्युच्च न्यायालयाचे—Federal Court चे न्यायाधीश नेमण्यात सरकारनें स्वतःच्या अभिज्ञतचाच नव्हे, त्या थोर पुरुषाचाच नव्हे, तर आपल्या ह्या अवघ्या महाराष्ट्राचाच अुचित तोच गौरव केला आहे पारतंत्र्यात म्हणून अितक्यावरच संतोष मानावयाचा, नाही तर जर आज आपले भरतखंड स्वतंत्र असते, तर न्यायमूर्ति जयकरांसारखे पुरुष युरोपा-तील प्रबळ राष्ट्रांमध्ये स्वतंत्र भारताचे राजप्रतिनिधि म्हणून Ambassador म्हणून जागतिक राजकारणेंही लढवू शकते

## सरदेसाओ यांना कृतज्ञ प्रणिपात

नैबंधिक क्षेत्रात आमच्या बाबाराव जयकरांनी जशी अखिल भारतीय कीर्ति संपादिली त्याचप्रमाणे ज्या आमच्या महाराष्ट्रीय विद्वानाने अैतिहासिक क्षेत्रात आपले भारतीय महत्त्व प्रस्थापिलं आहे त्या आपल्या वयोवृद्ध नि ज्ञानवृद्ध रावसाहेब सरदेसायांना प्रथमतः कृतज्ञ प्रणिपात केल्यानंतरच काय ते मला या अध्यक्षपदी चढता येणार आहे. बहुतकाची थोरवी अशा अुच्च अध्यक्षपदावर चढल्यानंतरच अधिक अुठावदार दिसू लागते पण काही पुरुषाची थोरवी अशी असते की, त्यांच्या आरोहणाने तें अध्यक्षपदच अधिक अुठावदार नि अुच्च दिसू लागते. राव-

साहेब सरदेसाअी यांची गणना साहित्यक्षेत्रातील या दुसर्‍या प्रकारच्या थोर पुरुषांतच केली पाहिजे. आपल्या हाडांची काडें करून जसा अेखादा शेतकरी कापसाच्या नि धान्याच्या राशींच्या राशी रचून ठेवतो, तशा अैतिहासिक साधनांच्या राशींच्या राशी ज्यांनी आपल्या परिश्रमानें रचून ठेवल्या त्या राजवाड्यांच्या आणि खऱ्यांच्या अैतिहासिक सेवेचे अुपकार तर आहेतच अमित! तथापि नुसत्या कापसाच्या राशी काही अंगावर घेता येत नाहीत, नुसतें धान्य कच्चेंच खाल्लें तर सहसा काही पचत नाही. बहुजनसमाजाला जें अन्नवस्त्र हवें तें वेळच्या वेळीं शिजवून नि विणून देणाऱ्याचे परिश्रम हेही त्याच कारणासाठी अत्यंत अुपकारक नि प्रशस्य ठरल्यावाचून राहत नाहीत.

## अिंग्रजीत महाराष्ट्राचा अितिहास लिहा

मुसुलमानी राजवटीपासून तो थेट ब्रिटिश राजवटीपर्यंत हिंदुस्थानचा आणि विशेषतः आपल्या प्रतापशाली महाराष्ट्रीय राजवटीचा अितका विस्तृत, अितका तरी साधार नि सुसंगत आणि अितका प्रचंड अितिहास अेकट्या सरदेसायांच्या प्रयावाचून मराठीमध्ये दुसरा असा आजही झालेला नाही. ही अेक गोष्टसुद्धा त्यांच्या प्रदीर्घ परिश्रमाचें नि अैतिहासिक योग्यतेचें पुरेसें द्योतक आहे. मराठीतच काय पण, मी स्वानुभवानें सांगतो की, हिंदुस्थानाच्या नि विशेषतः मराठी साम्राज्याच्या अितिहासावर असा ग्रंथ बंगाली, हिंदी प्रभृति प्राकृत भाषांमध्ये वा अिंग्रजीमध्येही झालेला नाही. यास्तवच जाता जाता श्रीयुत सरदेसाअी यांना मी विनवितो की, त्यांनी आपलें सारें लक्ष अेकवटून नि अितर फुटकळ लिखाण बाजूस सारून निदान महाराष्ट्र-अितिहासावर तरी अितकाच व्यापक, असाच समग्र नि अधिक सुसंगत असा अेक अिंग्रजी ग्रंथही प्रत्याही अिंग्रजी भाषेत शक्य तितक्या लवकर लिहून काढावा.

हिंदुस्थानातील अितर प्रांतामध्ये आणि युरोपमध्ये मराठ्यांच्या अितिहासाची स्फूर्ति, वीरत्व नि महान् ध्येयें यांची ओळख किमपिही झालेली नाही. त्या राष्ट्रीय अुत्थानाचें नि त्या हिंदु स्वातंत्र्ययुद्धाचें भव्य हृद्गत आपल्या परप्रांतीय हिंदु बांधवांच्या तरी ध्यानात यावें आणि महाराष्ट्र-अितिहासाविषयी त्यांची झालेली काहीशी अज्ञानी आणि काहीशी मत्सरी समजूत खोटी पाडावी, यास्तव मी लिहिलेल्या Hindupad Padshahi ह्या अिंग्रजी ग्रंथाचें मनःपूर्वक अभिनंदन ते रत्नागिरी येथे माझ्या भेटीस आले असता, रावसाहेब सरदेसायांनी जेव्हा केलें, तेव्हा आपल्यालाही परप्रांतीय हिंदुसमाजाच्या नि युरोपीय अितिहासकाराच्या ह्या अज्ञानाची नि मत्सराची तीव्र जाणीव आहे आणि अेक विस्तृत महाराष्ट्रीय अितिहास अिंग्रजीमध्ये लिहिण्याची आवश्यकताही पटलेली आहे असें त्यांनी बोलून दाखविलें. हें कार्य आज तरी तेच करू शकतील. तें कार्य त्यांच्या हातून पार पाड-

ण्यास अवश्य ते निरपवाद आरोग्य, अुदंड आयुष्य ही त्याना लाभोत हीच आम्हा सर्वांची प्रार्थना असणार

## भाषण की निबंध

आता अध्यक्षपदावरून जे साहित्यविषयक निवेदन मला आपणास करावयाचे ते मी मनातल्या मनात जेव्हा प्रथम योजू लागलो, तेव्हा अेकदोन गमतीच्या गोष्टी घडल्या, त्या मी आपणास प्रथमत: सांगतो माझ्या मनात खरेखुरे असे अध्यक्षीय भाषणच करावयाचे होते भाषण म्हणजे अर्थात् जे आपण बोलतो ते, पण ह्या साहित्यसमेलनाच्या अुत्साही चालकानी माझी अध्यक्षपदी निवडणूक होताच मला भेटून सांगितले की, ह पहा, तुम्ही साहित्यसमेलनातून बडोदे-नागपूरकडे आयत्या वेळची भाषणे केलीत. तशी ल्टपटपची अिथे चालणार नाही अध्यक्षीय भाषण म्हटले म्हणजे ते आधी लिहून, आधी छापून, त्याच्या छापील प्रती श्रोतृवृंदाच्या हाती आधी वाटलेल्या हव्यात आणि मग तुम्ही त्याप्रमाणे तोंडी बोलले पाहिजे। असं त्यानी मला हडसून-खडसून सांगताच माझ्या पोटात भीतीचा गोळाच अुठला। अेखाद्या सांग्रसंगीत नाटकाच्या पुस्तकाअेवढे हे भाषण छापून तोंडपाठ करावयाचे नि बिनचूक बोलून दाखवावयाचे। ह काम करू गेल्यास गणपतराव जोश्यासारख्या कसलेल्या नटाचीही बोबडी वळावयाची। त्यातही छापील भाषणे तोंडपाठ म्हणून दाखविण्याच्या कलेची मला तर तोंडओळखही झालेली नाही।

## ह्याही एक शिष्टाचारच

तेव्हा मी जर माझे भाषण छापून लोकाच्या हाती आधी दिल आणि मग त तोंडपाठ बोलू लागलो तर त्यात शब्द, वाक्ये, छेदक याची भयकर अुलटापालट नि गाळागाळी होणार माझी अशी बोलता बोलता गाळागाळी चाललेली आहे आणि आपण हातात माझे छापील भाषण घेअून, नाटकाचे पुस्तक हातात घेअून बसलेले प्रेक्षक जसे त्या त्या पात्राच्या भाषणात चुका होताच अेकमेकाना कोपर-खळग्यानी डिवचून 'टिंगल' करतात, तसे आपण माझी टिंगल अुडविता आहात असे दृश्य मला दिसू लागले छापलेल्या भाषणातील माझी बोलता बोलता जी गाळागाळ नि अुलटापालट चाललेली आहे, त्यायोगे आपल्या तोंडावर प्रथम हासाच्या नतर अुपहासाच्या आणि शेवटी तिरस्काराच्या लहरी अुमळताहेत नि मी त्यात बुडून चाललो आहे, असे मला भासू लागले। मला कासावीस झालेला पाहून ह्या समेलनाचे परिश्रमी कार्यकर्ते श्री अप्पाराव पेंडसे मला असे काहीसे म्हणाले 'भिअू नका तुम्ही त्या अडचणीला। तुम्ही छापून काढाल ते भाषणच तुम्ही बोलले पाहिजे असे नाही आजपर्यंत अनेक संस्थाचे अध्यक्ष त्याच्या छापील भाषणाप्रमाणेच बोलत आले की काय। अध्यक्षाचे भाषण म्हणून छापले जावे अेक

आणि बोलले जावे दुसरेच, हाही अेक शिष्टाचारच आहे अध्यक्षीय भाषणाचा! युरोपातही तसेच होते!

## अखेर तोड काढली!

त्याची युक्ति मला पुष्कळच सोयिस्कर होती कारण, क्रांतिकारक आदोलनात भाग घेत असता गुप्त पोलिसाना चकविण्यासाठी बोलावे कसे अेक आणि काय बोललो त्याचे प्रतिवृत्त म्हणून छापावे कसे दुसरेच या दुटप्पी कलेत मी चागलाच पटाअीत झालेला होतो परतु 'शठ प्रति शाठ्य' हा न्याय तिथे जरी मला रुचला तरी बिचाऱ्या सज्जन साहित्यिकाच्या निरुपद्रवी श्रोतृवृदाशी नि वाचकवृदाशी वागताना तोच आचरणे मला कमेसेच वाटू लागले शेवटी मी विनविले की 'सज्जन हो! मी माझे अध्यक्षीय निवेदन तुम्ही सागता तसे वाढतो लिहून! हो, सापडलो आहे खरा आपल्या कचाटचात! पण आता अितकेच करू द्या मला, त्या माझ्या लिहिलेल्या नि छापलेल्या लिखाणास 'अध्यक्षीय भाषण' असे भलतेच नाव न देता 'अध्यक्षीय निबध' असे यथावत् नाव मला देअू द्या. आणि त्याची अेक प्रत चकचकीत हातात धरून मला ते आपले वाचू द्या अध्यक्ष जे खरोखरच बोलतो त्याच्या तिप्पट चौपट अुलट सुलट भाषेचे लिखाण अध्यक्षीय भाषण म्हणून प्रसिद्ध करण्याचा जुना शिष्टाचार आता ह्या सत्यअहिंसेच्या सुकाळात तरी अशिष्ट समजावा. अध्यक्ष जे काय बोलेल तेच काय ते त्याचे अध्यक्षीय भाषण तो जे लिहून वाचील तो अध्यक्षीय निबध' अशी शेवटी आमची नवी नि यथावत् परिभाषा ठरली, आणि त्याप्रमाणे मी हा अध्यक्षीय निबध लिहावयास घेतला

## तत्त्वात्मक नव्हे कार्यात्मक!

पण निबध लिहू लागलो न लागलो, तो दुसरी अेक सागण्यासारखी गमत घडली मला पहिल्या पायीच तत्त्वाचे माजर आडवे आले! मी निबधात काय लिहावे याविषयी अिष्टमित्राच्या नि अनिष्ट मित्राच्यासुद्धा अनेक सूचनाचा माझ्यावर नुसता मारा चालू झाला त्यात बहुतेकानी व्यक्तविलेली आशा म्हणजे मी काही तात्त्विक अूहापोह करावा! आणि बहुतेकानी व्यक्तविलेली भीति म्हणजे मी त्यात भाषाशुद्धीचाच काय तो प्रपच थाटू नये. परतु या आशेला कोणतेही आश्वासन किंवा या भीतीला अभयदान मला देता आले नाही ही गोष्ट जितक्या खेदाची तितक्याच निरुपायाची होती. साहित्याविषयीही तात्त्विक नि बौद्धिक चर्चेचा अुपयोग आहेच आहे, यासबधी माझे दुमत नाही. साहित्यविषयक तात्त्विक प्रश्नासबधी माझीही काही मते आहेत. अशी केवळ बौद्धिक करमणूक मलाही आवडते. चादण्या रात्री माडीवर माडी ठोकून किंवा अेठा मारून बसल्याबसल्या मनोराज्येची मनोराज्ये जिकीत चालण्याची सुखाची सोय ह्या जगात आहे हे मला

ठाअूक आहे परतु केवळ अशा तात्त्विक नि केवळ बौद्धिक काथ्याकुटीत रुतून बसल्यामुळेच आपण क्रियादुर्बल होअून पडतो आहोत, आपली भौतिक राज्ये गमावून बसलो आहोत, याचे शल्य माझ्या हृदयात सारखे बोचत आहे त्याला काय करणार!

## कार्यशक्तीचे दौर्बल्य

ज्या काळी अलकारशास्त्रावर जगन्नाथपडितासारख्याचे अुत्कृष्टातील अुत्कृष्ट ग्रथ लिहिले जात होते, त्याच वेळी आपल्या राष्ट्रमातेच्या अगावरील मुकुटकुडलादि राणीपणाचे अलकार अेकामागून अेक ओरबडून अकबर-औरगजेब तिला बटीक बनवीत होते! आणि ज्या काळी स्मृतीच्या समन्वयास्तव निर्णयसिधु-धर्मसिधूसारखे प्रचड ग्रथ लिहीत, सध्येची पळी किती मोठी असावी याची तात्त्विक नि शास्त्रीय चर्चा करीत, नि गीतेच्या अेकेका शब्दावर पाचपाचशे श्लोकात आपली बुद्धि तात्त्विक विवेचन करीत बसली होती, त्याच वेळी अनेक अल्लाअुद्दीन आणि मलिकबर त्या स्मृतींच्या नि गीतेच्या लाखो अनुयायावर अवघ्या दीड दोन हजार सैनिकानिशी झडपा घालून त्याना कापून काढीत होते—रामेश्वरापर्यंत आपली राज्ये पालथी घालून बसले! ते का? आपली तत्त्वप्रवणता किंवा बुद्धिशक्ति दुर्बल होती म्हणून नव्हे, तर आपली कृतिप्रवणता, आपली कार्यशक्ति दुबळी होती म्हणून! त्या अलकारशास्त्रावरील वा वेदान्तावरील ग्रथाचा किंवा त्या आपल्या बुद्धिवैभवाचा मलाही अभिमान वाटतो अलकार, कविता, काव्य, तत्त्व, याची मलाही अतिशय आवड आहे पण जी अपथ्य आवड तेंच व्यसन! आणि जें अप्रासगिक तेंच अपथ्य हे कृतिदौर्बल्य आपल्या हाडीपेरी आजही मुरलेले आहे. राजकीय, सामाजिक वा साहित्यिक अशा ज्या कोणत्या क्षेत्रात मी काम करीत आलो, त्या प्रत्येक क्षेत्रात मला, आम्हा सर्वांचे हे कृतिदौर्बल्य पाहून अत्यत विषाद वाटत आलेला आहे मीही आपल्यातीलच अेक! पण मला माझे मन या दोषासाठी जसे खात आहे तसेच आमच्या सर्व राष्ट्राचे लक्षही या दोषाकडे वेधले जावे अशी मला तळमळ लागली आहे विशेष काही असेल तर अितकेंच काय ते!

न्यायमूर्ति रानड्याच्या काळापासून ज्या सुधारणाचा काथ्याकूट सारखा चाललेला आहे, ज्या सुधारणा मनात येताच करून टाकणे बहुताशी तरी आपल्याच हातात आहे, अशा शेंकडो सुधारणा आपल्यापुढे अुभ्या असता, आपण त्या तडकाफडकी आजही करून टाकीत नाही! त्याचा वजूनही नुसता तात्त्विक नि बौद्धिक काथ्याकूटच करीत बसलो आहोत ज्याना त्या पटल्या नाहीत त्याचा प्रश्न वेगळा. पण ज्या लाखो लोकाना त्या राजकीय, सामाजिक वा साहित्यिक सुधारणा पटल्या आहेत तेही त्याचे नुसते ठरावच पुन पुन करीत बसले आहेत! त्या आचरून

सोडण्याचा प्रसंग आला की मागे घेतात ! काही अपवाद वजा जाता, आपल्या लोकांत अेकंदरीत मुरलेली ही कृतिदुर्बलता आणि बौद्धिक चर्वितचर्वणाचे तत्त्वव्यसन नाहीसे झाल्यावाचून, आजच्या राष्ट्रीय पुनरुत्थानार्थ अवश्य असलेल्या कार्याचा अुठाव होणार नाही, अशी माझी कटुतम अनुभवाने निश्चिति पटल्यामुळे लहान वा मोठ्या ज्या कोणच्या सार्वजनिक क्षेत्रात मला पाअूल टाकण्याचा प्रसंग येतो तेथे तेथे, 'केल्याने होत आहे रे । आधी केलेचि पाहिजे' 'हा 'सामर्थ्य'—डिंडिम निनादवीतच काय ते पुढे पाअूल टाकावेसे वाटते आणि यास्तव या लहानशा साहित्य क्षेत्रातही पाअूल टाकताना, त्यात ज्या काही क्रियात्मक सुधारणा करणे अवश्य आहे असे मला वाटते, त्याच्याकडेच आपले लक्ष या निबंधात मी मुख्यत्वे करुन वेधणार आहे काही तात्त्विक चर्चा आली तरी ती अशेल केवळ आनुषंगिक तेवढीच

त्यातही या संमेलनाच्या पूर्वीच्या अनेक विद्वान् अध्यक्षांनी साहित्यविषयक अवश्य ती बहुतेक तात्त्विक चर्चा आधीच केलेली आहे तेव्हा साहित्याच्या अुत्पत्ति, अुपपत्ति, प्रतिपत्ति प्रभृति विषयासंबंधी तीच ती घटपटादि तार्किक वा तात्त्विक खटपट पुन्हा एकदा करीत बसण्याची आवश्यकता अुरलेली नाही यास्तव त्या तात्त्विक भागाकडे पाठ फिरवून ज्या ज्या लहान मोठ्या साहित्यविषयक सुधारणा किंवा जी जी लहानमोठी साहित्यविषयक कार्ये आपण करुन टाकावी असे मला वाटते, त्या क्रियात्मक भागाकडे मी वळतो

या क्रियात्मक भागाकडे वळताना प्रथमपदीच मला क्रियापदाची आठवण व्हावी हे नामसादृश्यामुळे तरी अगदी स्वाभाविक आहे आपल्या मराठीतच नव्हे, बंगाली, हिंदी, गुजराथी अित्यादि आपल्या सर्वच प्राकृत भाषात क्रियापद दारिद्र्य पदोपदी अनुभवावे लागते या सर्व भाषामध्ये देणे, घेणे, असणे, करणे अशी काही मोजकी क्रियापदे तेवढी स्वतंत्र रुळलेली आहेत आणि अुरलेल्या शतावधि क्रियापदाचे कार्य त्याच त्या मोजक्या क्रियापदाच्या मागे भिन्न भिन्न नामे किंवा अितर शब्द लावून साधावे लागते त्यामुळे एका शब्दाने जे काम व्हावयाचे त्यासाठी दोन तीन शब्द वापरावे लागतात जसे संमति देणे, अुत्तेजन देणे, प्रचार करणे, निषेध, करणे, प्रकाशित करणे, अनुमोदन देणे, आशीर्वाद देणे, शाप देणे, वचन देणे, शोक करणे आनंद होणे, दुःख होणे, अुत्तर देणे, चिकित्सा करणे, उपहास करणे अित्यादि, या दुशब्दी क्रियापदामुळे त्याच त्या देणे, करणे असणे अित्यादि शब्दाची कंटाळवाणी पुनरुक्ति करावी लागते केव्हा केव्हा तर एकाच धातूची द्विरुक्ति हास्यापद घाटू लागते, जसे, प्रतिकार करणे, स्वीकार करणे, धिक्कार करणे, अंगीकार करणे अित्यादि अशा ठिकाणी तरी आपण प्रतिकारणे, स्वीकारणे, धिक्कारणे, अंगीकारणे अित्यादि अेकेरी स्वतंत्र क्रियापदे वापरण्याची पद्धत अेक वैयक्तिक पर्याय म्हणून तरी पाडावी असे मला वाटते

## इंग्रजीची प्रवृत्ति पहा

अिंग्लिशमध्ये अशा अर्थाची स्वतंत्र अेकेरी क्रियापदे असतात जसे To consent, to encourage, to denounce, to publish, to bless, to curse, to reply, to decide, to lecture, to second, to propose, etc etc किंबहुना कोणतेही नवीन नाव प्रचलताच त्या नावाचेच एक स्वतंत्र क्रियापदही बनवून टाकण्याची अिंग्लिशमध्ये रूढिच पडलेली आहे Motor हे नाम प्रचलित होताच to motor हे त्याच नामाचे क्रियापदही लगोलग प्रचलले Wire ह्या नामापासून to wire हे त्याच नामाचे क्रियापदही लगेच रुळले आपल्या भाषाशैलीस अगदीच विरुद्ध न जाईल अशा बेताने, आपल्याही नामविशेषणापासून अशी अेकेरी नि स्वतंत्र क्रियापदं बनविण्याची प्रवृत्ति असावी जे जे चांगले ते ते परकीय असले तरी ग्राह्यच होय.

## ग्राह्याग्राह्य विचार

कोणी म्हणेल अिंग्लिशचे हे अनुकरण तुम्हाला कसे खपते ? इंग्लिश शब्द परकी म्हणून बहिष्कारावे अशा भाषाशुद्धीच्या तुमच्या अट्टहासास हे परकी भाषेच्या वाक्प्रचाराचे अनुकरण विसंगत नाही का! त्याना आम्ही अितकेच सांगतो की, आम्ही भाषाशुद्धीवादी मंडळी अिंग्लिश शब्दांना जे बहिष्कारतो ते ते केवळ परकी आहेत म्हणूनच नव्हे! तर ते परकी असून अनवश्यकही आहेत म्हणून. त्यापेक्षा वा तितकेच अन्वर्थक असे आपले व स्वकीय शब्द असताना परकीय शब्द वापरू नयेत. आपले सदर्थक शब्द मरू देऊ नयेत, असं भाषाशुद्धीचे म्हणणे. आमच्यात नसलेली वा आमच्याहून चांगली असलेली अशी कोणतीही हितकारक नि अवश्य गोष्ट—मग तो शब्द असो वा शस्त्रअस्त्र, आचार वाक्प्रचार ज्ञान विज्ञान काही का असेना—ते परदेशात जेथे आढळेल तेथून आणून आत्मसात् करण्याची तर प्रतिज्ञाच आहे आमची!

## संस्कृत भाषेची समृद्धि

क्रियापदांच्या या सुधारणेपुरते तरी आम्हास कोणत्याही परकी भाषेच्या तोंडाकडे पाहण्याचे काहीच कारण नाही आमची संस्कृत भाषा अितर शब्दसंपत्ती-प्रमाणेच धातुसंपत्तीतही समृद्धतम आहे स्वतंत्र नि अेकेरी हवी तितकी क्रियापदे तिच्यात आहेत *अितकेच नव्हे तर नामादिक शब्दापासून 'नामायते' प्रमाणे वाटेल* तितकी क्रियापदं बनविण्याची सूत्रबद्ध सोय आहे तेव्हा संस्कृत भाषेप्रमाणेच प्राकृतातही अशी स्वतंत्र क्रियापदं आपण हळूहळू योजावी

## जुन्या काव्याचा आधार

त्यातही मराठी साहित्याला किंवा भाषेला ती अगदीच नवखी वा नावडती आहेत असेही नाही आजच्या मराठी गद्यालाच काय ते त्याचे वावडे आहे परंतु

जुन्या अत्यंत सन्मत अशा काव्यातून अशी क्रियापदे आग्रहाने आदरलेली आढळतात. मुक्तेश्वरादि महनीय मराठी कवींचे हे दोन चार अुतारेही माझ्या म्हणण्यास समर्थितील.

"जरासंधे राज्यासनी अभिषेकिले सहदेवा। राज्य रक्षावे अतिविवेके मध्यभागी कपिला गाढा॥" ज्ञानेश्वर तर सर्वांत अग्रणी. "अैशी हें अवधारी। निरूपिति परी॥ अधिष्ठानले अंगे॥" मोरोपंताच्या अेकाच चरणात अशा अेकेरी क्रियापदामुळे किती अर्थ, किती थोड्या स्थलात सामावला आहे पहा! 'आलिंगुनि चुंबुनि शिर हुंगुनिया पुसुनि लोचने पदरे।'

## ग्रामीण वापर

या मराठी अभिजात पद्याप्रमाणेच दुसऱ्या टोकाला खेड्यापाड्यातील मराठी जिवंत नि जातिवंत बोलीतही अशी क्रियापदे आढळतात "तू आघोळलास का रे? शेती पाणवली, कोथिंबीर वामाळली, मका वणसाळला" अशी किती तरी सुटसुटीत क्रियापदे अुणवाणू किंवा ग्रामीण लोक अुपयोजिताना आढळतात. तशीच शैली मराठीच्या आजच्या गद्यातही रुळवावी. अुदाहरणार्थ, वर्णिणे, परीक्षिणे, प्रतीक्षिणे, सतोषिणे, अुपकारणे, स्वीकारणे, शापणे, अभिनंदणे अभिवादणे, नमस्कारणे, चुंबिणे, आलिंगिणे, अुपहासिणे, अुल्लेखिणे प्रकाशिणें, संपादिणे, स्वागतिणे, आनंदणे, प्रार्थिणे, निवेदणे, अर्पिणे, चर्चिणे, विवेचिणे, इत्यादि क्रियापदे आजही प्रयोजू लागण्यास काही प्रत्यवाय नाही. आजच्या पद्धतीला अगदीच बावडी वाटतील अशी क्रियापदे मात्र भरधाव योजीत जाअू नये झेपेल तितकीच हळूहळू भाषेच्या अगवळणी पाडावीत, सवयीने जशी पद्यात तशीच गद्यात रुळतील, आणि मराठीतीलच नव्हे तर साऱ्याच प्राकृतातील क्रियापद-दारिद्र्य घालविण्याचा मान महाराष्ट्रास मिळेल. कारण की ही सुधारणा पद्धतशीरपणे अशी प्रथमत महाराष्ट्रानेच पुरस्कारिली आहे.

## हरिभाऊंचा प्रारंभ

आमच्या लहानपणी के हरिभाअू आपटे यानी त्याच्या कादंबऱ्यातून 'अुत्तरणे' हें आणि अशी दोनचार क्रियापदे वापरली तेव्हा त्यावर पुष्कळ टीका नि विडम्बन झाले; पण ती सुधारणा मला तेव्हापासून पटत आली. हरिभाअूनी काही फुटकळ क्रियापदें वापरली खरी; परंतु माझ्या माहितीप्रमाणे त्या प्रवृत्तीचा सोपपत्तिक असा अेक प्रश्नच करून त्याला वाचा अशी स्त्री मासिकातील आणि प्रतिभेतील 'मराठीचे क्रियापद-दारिद्र्य घालवा' या माझ्या सन १९३५–३६ च्या निबंधातूनच फोडली गेली. मी आपल्या लिखाणात झेपेल तितक्या प्रमाणात ती सुधारणा प्रयोजीतही असतो. या विषयाची सविस्तर चर्चा जर कोणास हवी असेल तर माझ्या या दोन्ही निबंधात मिळून सापडेल.

## वाक्यरचनेचें वैचित्र्य

नवी अेकेरी नि स्वतंत्र क्रियापदे ग्ळविण्याच्या सुधारणेप्रमाणेच आपल्या वाक्यरचनेत अर्थानुरोधानेच थोडेसे वैचित्र्य आणण्याची पद्धतही पाडावी असे मला वाटते आपल्या वाक्यरचनेची ठराविक घाटणी म्हणजे क्रियापद घालावयाचे ते शेवटीच, आणि शेवटी क्रियापद हे असलेच पाहिजे आजच्या गद्य लिखाणातच ही घाटणी ठराविक झाली आहे परंतु बखरीतील मराठीत मी म्हणतो तशी क्रियापदे, अर्थात् बळकटी येत असेल तर शेवटी न घालता मध्ये घालून जो शब्द विशेष साभिप्राय असेल तोच शेवटी घातलेला आढळतो जसे– आता तुमची–आमची गाठ पडेल रणांगणात ! होय, आहे, होते अित्यादि क्रियापदे जी अेकसारखी आजच्या गद्य लिखाणात शेवटी येतात ती बखरीतील लिखाणात बहुधा माफ गाळलेलीच असतात जसे 'समर्थ परम तपस्वी, निश्चयाचे केवळ मेरु त्या युद्धास अुपमा तर अेक कुरुक्षेत्राचीच ! म्हणतील ते प्रमाण ! ' अित्यादि यगाळीमध्ये शेवटची अशी अनावश्यक क्रियापदे गद्य लिखाणातून आजही गाळतात संस्कृतमध्ये तर अर्थानुरोधे क्रियापद कर्ता, कर्म यांची स्थाने वाक्यरचनेत पालटण्याचा आहे संप्रदायच ! त्यायोगे संस्कृत वाक्यरचना किती वैचित्र्यपूर्ण असते ते बाणाच्या कादंबरी-सारख्या अभिजात ग्रंथात पदोपदी आढळते

## ते आहे बखरीत व बोलीत

आपल्या बोलण्यात मात्र जो विशेष साभिप्राय तोच शब्द आपण शेवटी घालतो आणि क्रियापदे मध्ये टाकतो, आपण कुठे होतो हे स्थलावर बळ देऊन सांगावयाचे तर आपण म्हणतो त्या दिवशी होतो दिल्लीला,'उद्या जाणार लाहोरला' 'दिवसावर बळ द्यायचे असेल तर म्हणतो, ' दिल्लीत काल होतो, ' 'लाहोरला जाणार आज. ' तशीच घडण 'कुठे ग आहे तो माळ? आहेच तो थूर, 'गाण गा पाहू एक छानस ! ' या वाक्यातही आहे, तेव्हा बोलण्यात वा बखरीत आपल्या गद्यामध्ये अधिक साभिप्राय तो शब्द शेवटी घालून किंवा अनावश्यक क्रियापदे गाळून वाक्यरचनेत जसा आपण आटोपशीरपणा वा ठसकेबाजपणा आणतो तसे वैचित्र्य आजच्या आपल्या गद्य लिखाणातही आणावे अशी मला आहे हौस.

अर्थात् अशी अुलटपालट केवळ टूम म्हणून करता यामा नये. वाक्याची शोभा नि अर्थात् बळकटी वाढत असेल तरच वाक्यरचनेचे वैचित्र्य अुपयुक्त, प्रयोजक, अुदाहरणार्थ, हे वाक्य पहा 'जपानला का मिळाला विजय? चीनचा का झाला पराजय? काय जपानचा पक्ष न्यायाचा होता? आणि चीनचा अन्यायाचा? नाही ! पण जपानचा विजय झाला ! कारण, त्याची तलवार होती तिखट, दारू कोरडी, संघटना भक्कम, छाती निधडी ! तेव्हा जयापजय हे न्यायान्यायावरच काय ते अवलंबून असतात, अशी जी श्रद्धा तीच मुळात आहे भ्रामक ! मानपत्राचे शेवटी

आजकाल जे वाक्य लिहितात तेही वाक्यरचनेच्या अनुकरणीय वैचित्र्याचे अुदाहरण सांगता येअील! जसे 'आम्ही आहो, आपले कृतज्ञ, दिल्लीचे नागरिक!'

## लिपिशुद्धि

वरील दोन्ही सुधारणा अेक वेळ झाल्या नाहीत तरी चालतील. अेक वेळ सांस्कृतिक नि भावनिक दृष्टचा महत्त्वाची असलेली भाषाशुद्धीची चळवळही आजची अुद्यावर ढकलता येअील. परंतु जर आपल्या नागरी लिपीला राष्ट्रीय लिपि करून मोडावयाची असेल तर लिपिशुद्धीची सुधारणा मात्र आपल्याला शक्य तितक्या लवकर हातानिराळी करून टाकलीच पाहिजे. कारण की आपल्या आजच्या लिपीत ह्या दोन चार लहानसहान सुधारणा करताच ती मुद्रणक्षमतेत नि शिक्षणसुलभतेत अिंग्रजीहून वरचढ ठरणारी आहे. आपली नागरी लिपि अिंग्रजीहून मुळचीच शास्त्रशुद्ध असल्यामुळे तिच्यात ज्या सुधारणा अवश्य आहेत त्या मुळातच आहेत अगदी थोडचा नि अगदी सहजसाध्य! त्या अशा :—

( १ ) 'अ' ची बाराखडी सुधारणेमुळे सातआठ अक्षरे शिकण्यात अुणी होतील आणि सातआठ टक टकपेटीत कमी लागतील.

(२) सलग जोडाक्षरें:– आपल्या लिपीत शिकण्यात नि छापण्यात जे अवजड रूप आलेले आहे ते मुख्यत. विक्षिप्त नि नियमबाह्य जोडाक्षरामुळेच होय. क्त क्क, न, क्क, ( जसे पक्का ), छ ( जसे पछा ) अित्यादि जोडाक्षराची सध्याची रूपे स्वतंत्र टकानेच छापावीं लागतात. अशी रूपे ३०।४० तरी भरतात, पण जोडाक्षर म्हटले की, काना गळून अुच्चाराप्रमाणे सरळ नि सलग लिहीत गेले की हे ४०।५० टक टकपेटीतून अुडून जातील आणि मुलाना जोडाक्षरे अशी शिकवावीच लागणार नाहीत. अेक नियम शिकविला की सारी जोडाक्षरे आपोआप लिहिता येतील. व्यंजनाच्या मूळच्या थोडयाशा खिळयावरच छापता येतील. जसे :— क्त, क्र, ल्ला, च्चा, र्र अित्यादि

(३) क, फ, र–ही तीन अक्षरे कानायुक्त करणे. आज अेकटे 'र' हे अक्षर आपण पाच प्रकाराने लिहितो, जसे-र, ऱ्या, ष्ट्र, प्र, सर्व . . . परंतु 'र' हा कानायुक्त केला की हा घोटाळा मोडतो. तीच स्थिति 'क ची व फ' ची त्यायोगे शिक्षण सुलभ होते. दहा टक तरी छापण्यात अुणावतात. रेफही वाचते. जसे- 'सर्प'.

(४) शेंडीवाल्याची पायमोड! –ट ठ ड ढ छ,ह, प्रभृतीना जोडाक्षरात व्यंजनरूप द्यायचे म्हणजे त्याना पायमोड चिन्ह लावावे! जसे मोठ्या हृया अित्यादि.

## दुप्पट स्वस्त मुद्रण

झाले! या चार अगदी सोप्या सुधारणा केल्या की, आज मराठी टकपेटिकेत जे न्यूनात न्यून २०० टक तरी लागतात ते अुणावून अवघ्या ६० अेक टकात

संस्कृतसुद्धा सारें लिखाण शास्त्रशुद्धपणे छापता येतें. लिपि शिकताना मुलांना ६० अेक अक्षरें कमी शिकावीं लागून शिक्षण सुलभतर होतें. छापखान्यात पूरणाचा (डिग्रीचा) जो अेक अिंग्रजीला नसलेला अुपसर्ग आपल्या लिपीला असतो तोही अगदी नाहीसा होतो. या चार अगदी सोप्या सुधारणा करताच आपल्या लिपीचें मुद्रण दुप्पट सुलभच नव्हे, तर दुप्पट स्वस्तही होअील. अर्थात् ही लिपिशुद्धीची सुधारणा नुसती भावनिक नाही, तर हा रुपये-आणे-पैचा अगदी व्यावहारिक नि त्वर्य (*urgent*) प्रश्न आहे.

ही योजना मी काही लहरीसरशी अुचलून धरली नाही. गेली पन्नास वर्षे कै. गजाननराव वैद्य, कोल्हापूरचे देवधर, श्री. शितूत प्रभृति अनेक गृहस्थांनी तिचा अुपक्रम चालविला होता..अुप्यापुन्या चाळीस पन्नास योजना पुढे आल्या होत्या. 'श्रद्धानंद' पत्रात मी त्या सर्वांचा नामोल्लेख करून त्यांना तोलून–पारखून जो न्यूनात न्यून पालट आजच्या रूपात करावा लागतो अशी ही योजना अुचलून धरली. कै. डॉक्टर भांडारकर नि लोकमान्य टिळक यांनीही या योजनेस संमतिपत्रें दिलीं होतीं, तीं देवधरांकडे आहेत. लोकमान्य देवधरांना या प्रकरणी छेडीत: 'अहो योजना आहे अगदी ठीक! पण व्यवहारविणारा कोण आहे तो दाखवा!' आम्ही जर काही केलें असेल तर हेंच! त्या योजनेला स्वतः आचरून टाकली आणि महाराष्ट्राच्या मागे तिचे सारखें टुमणें लावून तिला अेका संघटित आंदोलनाचें स्वरूप आणून दिलें. त्यायोगे या साहित्यसंमेलनातही तिचें लोण येऊन मागेच पोहोचलें आहे. अेक समितिही साहित्याचार्य तात्याराव केळकर याचे प्रमुखत्वाखाली नेमली गेली. तिने सर्व प्रश्न विवंचून प्रतिवृत्त लिहिलें आणि त्यात 'अ' ची बाराखडी नि मलग जोडाक्षरें ह्या दोन सुधारणा तर तत्काल चालू कराव्या म्हणून अनुरोध ( शिफारस ) केला. अुरलेल्या दोनही संमतिल्या पण हळूहळू व्यवहाराव्या असें सुचविलें.

## प्रत्यक्ष आचरण

मध्यंतरी हिंदी पत्रांतूनही आम्ही लेख लिहिले. हिंदी साहित्य संमेलनाचे वतीने श्री. काकाराव कालेलकर यांच्या प्रमुखत्वाखाली विचार होअून त्यांनीही बहुतेक योजना ग्राह्य ठरविली. रत्नागिरीच्या ज्या दोघा वृत्तपत्रांनी 'श्रद्धानंदाचे' मागोमाग ह्या सुधारणांप्रमाणे छापणेंही थोडचा फार प्रमाणात चालू केले, ते 'बलवंत , नि 'सत्यशोधक' आणि सह्याद्रि, केसरी, साहित्यपत्रिका, सकाळ, स्वराज्य, गोरक्षण, निर्भीड, किर्लोस्करी मासिकें प्रभृति अनेक नियतकांतून 'अ' ची बाराखडी नि मलग जोडाक्षरें ह्या दोन प्रमुख सुधारणा बहुंशी वा अल्पांशी आज व्यवहारिल्या जात आहेत. आमच्या समग्र लिखाणात नि ग्रंथात त्याचप्रमाणे सर्वांचे आधी रत्नागिरी हिंदुसभा, किरण मंडळ, दादर हिंदुसभा, प्रभृति

सस्था नि प्राध्यापक माधवराव पटवर्धनासारखे लेखक वरील दोन मुख्य सुधारणा वहृशी नि अितर अुपागेंही काही अशी प्रयोजीत आहेत.

लिपिशुद्धीपासून जो लाभ होणारा आहे तसे लिपिसुधारकाचे म्हणणे असतें, त्याविषयी आजवर पुष्कळ अुलट-सुलट चर्चा झाली आहे. आमच्या अनेक लेखातून तिच्यावरील आक्षपाची अुत्तरें आहेत. तथापि अितक्यावरही लिपि-सुधारणेची आवश्यकता ज्या कोणा साहित्यिक-मित्राना अद्याप तत्त्वत च पटली नसेल; त्याना पुन पुन्हा तोच तो अूहापोह करून ती पटविण्याचा यत्न करण्याचे हे स्थळ नव्हे तो प्रचार अितरात करूच आणि त्याच्यापुरती, त्याना ती पटेतो धीर धरून वाट पाहू. परतु ज्या शेकडो मित्राना ती पटली आहे त्याना मात्र आम्ही विनवितो की, त्यानी आता त्याच्यापुरते अेक ' लिपिशुद्धिमडळ ' स्वतत्रपणे स्थापून त्याच्या स्वत.च्या वैयक्तिक नि सार्वजनिक लिखाणात शक्य तो तीच सुधारलेली लिपि वापरण्याचा सघटित प्रयत्न करावा.

## महाराष्ट्र लिपिशुद्धि मंडळ

आजवर ह्या लिपिशुद्धीच्या आदोलनाला जे वर दर्शविल्याप्रमाणे बरेचसें यश आले आहे ते तिचा नुसता तात्त्विक काथ्याकूटच जर आपण करीत बसतो तर आणखी पन्नास वर्षेंसुद्धा आले नसते अशा सुधारणा सर्वांची अेकमुखी समति मिळवून मग आचरू म्हणून म्हटले, तर कधीच व्यवहारुन टाकल्या जात नाहीत. वास्तव ज्याना त्या पटल्या तेवढ्यानाच सागाती घेअून आपण स्वत: त्या आचरून टाकल्या पाहिजेत तसा अुपक्रम रत्नागिरी लिपिशुद्धिमडळासारख्या सस्थेने नि, व्यक्तीनी केला, म्हणूनच आज ही सुधारणा लोकाच्या दृष्टीस सवयीची होत चालली आहे, आणि सवयीची होता होता पटत चालली आहे. तरी येथे असलेल्या लिपिसुधारकानी त्या ' रत्नागिरी लिपिशुद्धि मडळाचे ' धर्तीवर अेक महाराष्ट्र लिपिशुद्धिमडळ याच मुहूर्ती स्थापावे त्याच्या शाखा प्रत्येकाने आपल्या गावोगावी अुघडाव्या ' मी आजन्म स्वत हीच सुधारलेली लिपि वापरीन ' अशी प्रतिज्ञा केलेल्या सभासदाची नोद ठेवावी. त्या प्रत्येकाने आपल्या मुलाबाळातून, घराघरातून आणि आपल्या हाती असलेल्या शाळा, वृत्तपत्रे, ग्रथप्रकाशने प्रभृति सस्यातून तिचाच प्रचार करावा. सर्व व्यक्तिगत पत्रव्यवहारातून हीच लिपि प्रत्येकाने वापरली तर फार मोठा प्रचार सहजासहजी होअू शकतो हा आमचा ठाम अनुभव आहे.

ज्याना आज ही लिपि पटत आहे तितक्यानी जरी असा सघटित नि सरळ प्रचार आणखी पाच वर्षे केला, तरी हा लिपिसुधारणेचा एक प्रश्न आपल्यास हातानिराळा करता येअील! अुदय, महाराष्ट्र, सावधानप्रभृति वृत्तपत्राच्या सपादक महाशयानी आपण निदान ' अ ' ची बाराखडी नि सलग जोडाक्षरें आपल्या

वृत्तपत्रांतून वापरू असे अभिवचन आम्हास दिले आहे तसेच ज्याना ही लिपिशुद्धि पटली आहे ते ते संपादक जरी निदान ह्या दोन सुधारणाना व्यवहारवू लागतील तरी लिपिशुद्धीची ही दोन मुख्य अुपांगें तरी पूर्णपणे रुळून जातील, तोवर आम्ही क, फ, र्चीं रूपेही लोकाच्या दृष्टीस तरी अगदी सवयीची करून सोडू.

## रोमन लिपीचा पुरस्कार ! ! !

आपल्या लोकातील वृत्तिदुर्बलत्वाच्या ज्या दोषासबधी आम्ही या निबंधाचे प्रारंभीच खेद व्यक्तविला, त्याचेच लिपिसुधारणेचा हा प्रश्नही अेक लज्जास्पद अुदाहरण आहे. तुर्क लोकामध्ये शेकडो वर्षें अरबी लिपि धर्मलिपि म्हणून घर करून बसलेली; पण ती अगदी बोजड नि मुद्रणास अक्षम अशी वाटताच तुर्कोनी अेका वर्षांत ती अुखडून फेकून दिली; आणि अवध्या चारपाच अक्षराची रूपें पालटताच आपली नागरी लिपि अिंग्रजीहूनही शिक्षण-सुलभतेत, मुद्रण-सुलभतेत नि स्वस्ताअीत वरचढ होअू शकते हे ज्याना पटते त्याच्यातसुद्धा शेकडा पचाहत्तर लोक ती स्वतः वापरून सोडण्यात अळटळ करतात ! पण जितके आम्ही वृत्तीचे पगु तितकेच नुसत्या योजना आखण्यात किती एटाअीत आहो पहा ! अिकडे चार अक्षरे पालटण्यास चाळीस वर्षे पुरत नाहीत ! तो तिकडे सुभाषबाबूसारखे राष्ट्र-सभाध्यक्ष या देशात अेकदम रोमन लिपिच राष्ट्रलिपि करून टाकण्याची योजना आखून मोकळे आहेत !

## हीही अेक राष्ट्रीय सुधारणाच

लिपिसुधारणेची चळवळ प्रथम पाडली आपल्या महाराष्ट्राने. आता ती सहजसाध्य व्यवहारामध्ये रुळवून नागरी ही अितर कोणत्याही लिपीपेक्षा अधिक शिक्षणसुलभ नि मुद्रणसुलभ आहे हे प्रत्यक्षपणे सान्या हिंदुस्थानास पटवून दिले पाहिजे महाराष्ट्रानेच ! लिपिशुद्धि ही महाराष्ट्राची कर्तृत्वि आहे. तिच्या प्रयोगाने आपली राष्ट्रलिपि अिंग्रजीहून वरचढ करून सोडण्याचा मानही महाराष्ट्राने पटकाविला पाहिजे ! लिपिसुद्धीचा प्रश्न म्हणजे अेक राष्ट्रीय सुधारणेचा प्रश्न ! कारण नागरी हीच लिपि होणार ! त्यातही हा प्रश्न अेका दमडीचाही व्यय न करता किंवा अेका दिवसाचाही वदिवास भोगावा न लागता, केवळ मनात आणे की सुटण्यासारखा आहे. वापरीत चला की, लिपि सुधारणा रुळलीच म्हणून समजा. ही अेक राष्ट्रीय सुधारणा तरी हातानिराळी झालीच समजा !

## शुद्धीकरणाचीं दोन सूत्रें

तीच गोष्ट भाषाशुद्धीच्या प्रकरणीही सतोतत लागू आहे. या विषयाचा यथास्थित अूहापोह आजवर झालेला आहे. प्रचार म्हणून आणखीही होत राहील. परन्तु, या निबंधात तो अूहापोह करण्याचे कारण या स्थळही नाही. अितके

सांगितले म्हणजे पुरे आहे की, भाषाशुद्धीवर येणारे शेकडा नव्वद आक्षेप तरी अशा अेका गैरसमजाने आलेले असतात, की मराठीत कोणताही अुर्दू वा अिंग्रजी शब्द असा वापरावयाचाच नाही असे भाषाशुद्धीचे म्हणणे आहे! परंतु असे तिचे म्हणणेच नाही मुळी भाषाशुद्धीची मुख्य सूत्रे दोनच :–

( १ ) आपल्या भाषेत ज्या अर्थाचे शब्द होते, आहेत किंवा अुद्भवणे सुसाध्य आहे अशा अर्थाने परकीय शब्द काय ते आपण वापरू नयेत मग ते जुने असोत वा नवे आपले तदर्थक शब्द मारून जे परशब्द रुळतात त्यांनी काही आपली शब्द-संपत्ति वाढत नाही.

( २ ) परंतु ज्या अर्थाचे शब्द, त्या वस्तुच पूर्वी आपल्यात नव्हत्या म्हणून आपल्या भाषेत मुळातच नाहीत किंवा अुद्भावणे दुर्घट आहेत असे परकी शब्द वापरण्यास आडकाठी नाही त्या परशब्दांनी मात्र आपली शब्दसंपत्ति काही अंशी वाढेल जसे – कोट, बूट, गुलाब, जाकीट, पेन्सिल अित्यादि

ही भाषाशुद्धीची दोन मुख्य सूत्रे जर ध्यानात ठेविली तर तिच्यावर गैर-समजाने येणारे शेकडा नव्याण्णव आक्षेप गळून पडतील ज्याच्या तोंडी जो येअील तो परशब्द – फादर, मदर, अिलेक्शन, हाअूस, डोअर, मुबारक, अफ्ताब, वाकिफ, मीटिंग, अिम्प्रिहेशन प्रभृति सरसकट नि रोखठोकपणे आपल्या बोलण्यात या साहित्यात घुसू द्यावे असे म्हणणारा सद्‌गृहस्थ विरळाच! बाकी मतभेद जे आहेत ते फुटकळ प्रकरणीच अुरलेले आहेत अमका शब्द स्वकीय वा परकीय, अमक्या शब्दात विशेष छटा आहे की नाही, तमका नवा शब्द सुटसुटीत आहे वा बोजड, हे मतभेद मुख्य धोरणाला बाध आणीत नाहीत अेकाने काढलेला स्वकीय नवा शब्द बोजड वाटेल तर दुसऱ्याने दुसरा योजावा जो सजेल तो जगेल आपले शब्द मारून अनावश्यक परकीय शब्द भाषेत नि साहित्यात घुसू देअू नयेत या मुख्य धोरणाकडे आपण पाठ फिरविली नाही, म्हणजे झाले

## दोन आक्रमणे

आणि त्या दृष्टीने पाहता गेल्या दहाबारा वर्षांतील भाषाशुद्धीच्या आंदोलनाचे कार्य किती तरी यशस्वी झालेले आहे आज आमच्या भाषेवर मुख्यत दोन परकीय भाषांचे प्रबळ आक्रमण चालू आहे. त्या दोन परकीय भाषा म्हणजे अुर्दू नि अिंग्रजी. ह्यामुळे आपल्या भाषेत त्या अुर्दू नि अिंग्रजी परशब्दांना निष्कारण घुसडू देअू नये, ह्यावरच भाषाशुद्धीचा विशेष कटाक्ष प्रथमपासूनच आहे त्याचा अेक महत्त्वाचा परिणाम आज असा झाला आहे की, विवेकासाठी असो वा विडंबनासाठी, पण हा शब्द परकीय की स्वकीय, याची चालना शाळेतील मुलापासून तो साहित्य-सम्राटापर्यंत घरी दारी चालू आहे शक्य तो अनावश्यक असा अुर्दू वा अिंग्रजी शब्द वापरावयाचा नाही, या धोरणाची छाप, या वा त्या प्रमाणात, मराठी

लिखाणावर पडली आहे. मुसलमानी राजसत्तेच्या काळात लब्धप्रतिष्ठिताच्या परधार्जिणेपणामुळे घरीदारी अुर्दू शब्द घुसून तदर्थक जे मराठी शब्द साहित्यातून नामशेषले, परतु जे जुन्या ग्रथांतून आणि विशेषतः आमच्या खेड्यापाड्यातून आजही कसेबसे जीव धरून राहिलेले आढळतात, त्याना पुन्हा प्रचलविण्याकडे प्रबोधनकार श्री ठाकरे याच्यासारख्या लेखकाचा ओढा वाढत आहे. अशा स्वकीय, सुटसुटीत नि सरस जुन्या मराठी शब्दाची आम्हालाही नव्या बोजड शब्दापेक्षा अधिक आवड आहे पुन जे नवे स्वकीय शब्द भाषाशुद्धीच्या आदोलनामुळे मराटीत भर टाकीत चालले आहेत, त्यातही अनेक सग्रहणीय असेच ठरलेले आहेत; मराठी साहित्यातच नव्हेत तर बोलता बोलता सर्व हिंदुस्थानभरही काही काही रुळून जात आहेत

## काही शुद्ध शब्द

आमच्यापुरतेच बोलावयाचे तर आम्ही काढिलेल्या वा अितरानी रूढाविलेल्या अशा काही शब्दाचेच अुदाहरण घ्या, अुपस्थित [ हजर ], विधिमडळ [ कायदे कौन्सिल ], जुळारी [Compositor], स्तभ [Column], दडविधान [ पिनल कोड] अुपमुद्रित [प्रूफ ], विश्वस्त (ट्रस्टी), निक्षेप किंवा विश्वस्तपत्र (ट्रस्टडीड), परिपत्र (सर्क्युलर), व्ययसकल्प (बजेट), प्रासिद्धिक (जाहिरात) टकलेखक (टाअिपरायटर), आजीवन किंवा आजन्म (तहाह्यात), छेदक, (पॅरिग्राफ), सचलन (ड्रिल), अेकटकक (मोनोटाअिप), पक्तिटकक (लिनो-टाअिप), अुच्चाक वा विक्रम (रेकॉर्ड), राजबदी, स्थलबदी (Interned), अखड टाक वा झरणी (फाअुन्टन पेन), ग्रथविक्रेते (बुकसेलर्स), घड्याळजी, (वाचमेकर) सैनिकाभिवादन (गार्ड ऑफ ऑनर), पुनर्न्याय (अपील), क्रमाक (नबर), गृहाक (हाअुस नबर), गण किंवा गणसख्या (कोरम), अिच्छुक किंवा स्पर्धालु (कॅन्डिडेट्), अुत्तरदायित्व वा दायित्व (जबाबदारी), प्रतिवृत्त (रिपोर्ट), ध्वनिक्षेपक (लाअुड स्पीकर) कालादर्श किंवा मितिपट (कॅलेंडर), निदिघत (खात्री), पूर्वसिद्धता वा पूर्वसज्जता (तयारी)' हुतात्मा (Martyr), हुतात्मता (Martyrdom), निर्बंध (कायदा), निर्बंधपडित (कायदेपडित), निर्बंधशास्त्र (कायदेशास्त्र), बोलपट, अद्यवत् up-to-date अित्यादि !

## भाषाशुद्धीचे प्रचारक

आता अशा दीडशे–दोनशे नव्या शब्दांमध्ये सगळेच काही टाकाअू आहेत असे म्हणवत नाही. कारण, त्यातील बहुतेक शब्द अनेक साहित्यिक प्रत्यही अुप-योजीत आहेत काही तर हिंदुस्थानभर प्रचलित आहेत प्राध्यापक माधवराव पटवर्धन, श्री आठवले, श्री भिडे, श्री. देवधर अित्यादि भाषाशुद्धीच्या अेकनिष्ठ

प्रचारकाची तर आम्हावरही वडी आहे त्यातही आता तर सुविख्यात आणि अक्षरशः दाडगा असा प्राध्यापक अत्रे याच्यासारखा साहित्यिक भाषाशुद्धीच्या पक्षास मिळालेला ! ज्या भाषाशुद्धीच्या पारड्यात प्राध्यापक अत्रे, ते पारडे आता जड झाल्यावाचून राहत नाही हे नक्की ! महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या अध्यक्ष-पदावरून परशब्दानी अकलंकित असा पहिला विशुद्ध मराठी निबंध वाचण्याचा मान पटकविला प्राध्यापक पटवर्धनानी ! मी नव्हे ! त्यानी आणि अितर कित्येकानी आज आणि कै प्रो भानु प्रभृति विगत साहित्यिकानी पूर्वीपासूनच, जे शतावधि स्वकीय प्रतिशब्द अुद्भावून मराठी भाषा परिपुष्ट नि सुसंपन्न केली, तोही ह्या भाषाशुद्धीच्याच तत्त्वाचा विजय होय

## बडोद्यातील महत्कार्य

बहुतेक प्रकरणी स्वभावतःच प्रगतिप्रिय असणाऱ्या श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यानी स्वकीय असा नैबंधिक प्रतिशब्दाचा संग्रह करणारा 'शासनकल्पतरु' हा प्रचंड कोश प्रसिद्धवून भाषाशुद्धीच्या कार्याला जी अमोल साहाय्यता दिली आहे, तीविषयी आम्ही महाराजानाही अभिनंदितो अितकेच नव्हे तर बडोद्यास असताना असे आढळून आले की अनेक विभागाच्या (डिपार्टमेंटच्या) कारभारात हे स्वकीय प्रतिशब्दच रूळतही आहेत आणि त्या प्रमाणात अनावश्यक असताही स्वभाषेत घर करून बसलेल्या परशब्दाचे अुच्चाटनही होत आहे श्रीशिवाजीमहाराजानी परकीय शब्दानी बुजबुजाटलेल्या स्वभाषेस विनिर्मुक्त करण्यास्तव पूर्वी राज्यव्यवहारकोश रचविला त्यानंतर आपली नैबंधिक परिभाषा परशब्दाच्या ग्रहणापासून सोडविण्यासाठी अितका व्यापक कोश असा रचविला अेका श्रीमंत सयाजीराव महाराजानीच

## संस्थानिकांना सूचना

अितर महाराष्ट्रीय संस्थानिकानाही आमची अशी विनंति आहे की, त्यानीही शक्यतो स्वकीय शब्दच आपल्या राज्यात रूढ करून परकीय शब्दाच्या आक्रमणा-पासून मराठी भाषेचे रक्षण करावे या कामी कुठे कुठे कशी कशी अक्षम्य ढिलाअी होत आहे याचे अेक अुदाहरण म्हणून ग्वाल्हेरच्या पंचसभेचे आजचे नाव दाखविता येअील लोकसभा, विधिमंडळ पंचसभा किंवा गुजराथी–हिंदीत म्हणतात तसे धारासभा हे स्वकीय नि सोपे शब्द आपल्या भाषेत आज असताना, प्रत्यक्ष मुसुलमानातही शेकडो लोकाना न समजणारा असा अेक परकीय शब्द ग्वाल्हेरच्या विधिमंडळास योजलेला आहे लोकसभेचे नाव पाळण्यातच ठेवले गेले–'मजलिस-अि-आम !' मराठी भाषेच्या अभिमानी असलेल्या शिंदेसरकाराना आमची विनंती आहे की, असले अगदी अनावश्यक नि कठीण परकीय शब्द त्यानी

आपल्या संस्थानात रुळवू नयेत. ते हिंदीस वा मराठीस सर्वस्वी विप्रकृत आहेत' हानिकारक आहेत, स्वाभिमानास शोभत नाहीत.

## हा काय अतिरेक झाला ?

आयर्लंड हा अिंग्रजी शब्द आयर्लंड देशामध्ये मुलाबाळाचे तोंडी दहा शतकें स्वदेशाचे नाव म्हणून रुळलेला होता. पण तरीही आयर्लंडला संधि मिळताच. त्यांनी तो बद्धमूल परशब्दही अुखडून टाकून त्याचा त्यांनाही अपरिचित धाटणारा त्याच्या मूळच्या गॅलिक भाषेतील जो 'आयरीन' शब्द त्याच शब्दाने आपल्या देशाचे पुन: अेकदा नामकरण केले. पार्लमेंट हा चिरपरिचित परकीय शब्द रद्द करून आपल्या पचसभेस 'डेल' हा स्वकीय शब्द योजला आणि आम्ही लोकसभा पंचसभा, धारासभा, विधिमडळ प्रभृति स्वकीय शब्द प्रचारात असताही आमच्या प्रतिनिधिसभेस नांव देतो 'मजलिस-अि-आम'! अमले अगदी अनावश्यक परकीय शब्द तरी आपण होअून स्वभाषेत घुसडू नका आणि त्या प्रमाणात आपले तदर्थक शब्द प्रचारातून लुप्तवू नका ! अितके काय तें जें भाषाशुद्धीचे म्हणणें, तें अतिरेकाचें कसे म्हणता येअील ?

## विरोधकांस विनंती

भाषाशुद्धीचे हें मुख्य सूत्रही जर कोणास अतिरेकी वाटत असेल तर त्याच्या त्या मतभेदाचाही आम्ही शक्य तो आदरच करू. त्याचे मत अनुकूल होअीतो त्यांचे प्रकरणी वाट पाहू. त्याना तोपावेतो विनती अितकी की, आम्हा भाषाशुद्धीच्या अभिमान्यानी आमच्यापुरते जर नवे नवे स्वकीय प्रतिशब्द जुळविण्याचा यत्न चालविला आणि जुन्या वा नव्या अुर्दू, अिंग्रजी शब्दाना टाळा दिला तर भाषा-शुद्धीच्या तत्त्वासही प्रतिकूल असणाऱ्यानी आमच्यावर रागावू नये. जर आमचे नवे शब्द जगण्यासारखे असले तर टिकतील; भाषेत परकीय शब्दाची ही भर टाकून तिला सपन्न बनविता येते असें मत असणाराना तिच्यात स्वकीय शब्दाची योग्य भर पडली असता त्याने मात्र तिची सपन्नता घटते असे तरी केव्हाही म्हणता येणार नाही !

## मंडळें स्थापा

भाषाशुद्धीची चळवळ तत्त्वत:च मान्य नसलेल्या माझ्या मित्राना अितके विनविल्यानंतर भाषाशुद्धीस अनुकूल असलेल्या माझ्या मित्रांना मला असें सागावयाचे आहे की, त्यानी आता वैयक्तिक प्रचार करीत न राहता त्यांनी आपलें अनुकूल असणारे अेक स्वतत्र 'महाराष्ट्र भाषाशुद्धि मडळ' स्थापावे आणि संघटित प्रचार चालू करावा. तत्काळ बहिष्कार्य अशा अुर्दू तोंडो नि लेखी मिळलेल्या अुर्दू शब्दांचा अेक लहानसा कोश रत्नागिरीचे भिडे, बी. अे. बी. टी. यानी

प्रसिद्धिला आहे अनेक नवे प्रतिशब्द मराठीत घुसलेल्या इग्रजी शब्दाना अुच्चाटण्या साठी पुढे येत आहेत त्याना साकल्याने विवेचून बहिष्कार्य अुर्दू, अिंग्रजी शब्दाचा अेक अधिकृत नि आटोपसर असा कोश प्रसिद्धावा प्रत्येक गावोगावी शाला काढून 'मी अनावश्यक परकीय शब्द आजन्म तोंडी वा लेखी वापरणार नाही' अशा प्रतिज्ञा करणाऱ्या सभासदाच्या तालिका कराव्या अधिकृत कोशातील शब्दच आपआपल्या लिखाणातून नि घराघरातून वापरावे, म्हणजे त त्या अर्थी रूढावतील शब्द वापरता वापरता त्याला तो अर्थ वा छटा आपसूक चिकटते हे मुख्य सूत्र ध्यानी धरावे

## नेट धरा

हिंदीमध्यही अशी अुठावणी विशेषत आर्यसमाजी हिंदी लेखकाकडून होत आहे त्याच्या नि हिंदीभाषा सघातील अितर भाषाशुद्धिवाल्याच्याही विचार विनिमयाने शुद्ध स्वकीय शब्दाची देवाण घेवाण करीत चलावे प्रसगी अेखादे 'अखिल भारतीय भाषाशुद्धि समेलनही' भरवीत चलावे काही झाले तरी भाषाशुद्धीचे आदोलन हे महाराष्ट्रात तरी गेल्या बारा वर्षांच्या चिकाटीच्या प्रचाराने स्थायिक झाले आहे आपण सर्वजण ते नेटाने नि सघटितपणे असच रेटीत राहू तर या टोकास अितके ताणल्याने, महाराष्ट्रीय भाषेतील अुच्चाटिले जाव अितके परशब्द अुच्चाटिले गेले नाहीत तरी, सध्या जी परशब्दाची राखठाव नि भरमसाट आवक वाढत आहे, तिला पायबद तरी निश्चितपणे पडेल्च पडेल. घराच्या नि दुकानावरच्या पाट्यावरुन हॅंगाडे मॅन्शन, Cloth Merchant सारख्या अनावश्यक परशब्दाचे अुच्चाटन करता यअील नव्या कल्पनाना नवे स्वकीय प्रतिशब्द 'बोल्पटा' सारखे प्रथमपासूनच रुळविता येतील

## आचार पाहिजे

वापरीत चला की आज परकीय अुर्दू–अिंग्रजी शब्दाना ज्या छटाबिटा चिकट्यास वाटत आहे त्या झट साऱ्या स्वकीय शब्दानाही चिकटल्यावाचून राहणार नाहीत. अितकच नव्हे तर अैकता अैकता नि वाचता वाचता ते स्वकीय शब्दच भाषाशुद्धीला आज मान्य नसलेल्या आपल्या मित्राच्याही तोंडी, रुळी रुळून तेही अनुकूल होतील. तव्हा ज्याना भाषाशुद्धि मान्य त्याना विनती की, त्यानी आता तात्त्विक विचाराचा वाच्याकूट पुष्कळसा सोडून देअून सघटितपणे व्यावहारिक आचारावरच मुख्य भर द्यावा आणि अेक 'महाराष्ट्र भाषाशुद्धिमडळ' स्थापून या मताच्या शतावधि लाखाना अेकसूत्री नि प्रत्यक्ष आचरणात्मक कार्यक्रमात गोवून घ्याव.

## 'कायदा' शब्द बहिष्कारा !

अितर सर्व शब्दापेक्षा कायदा ह्या अुर्दू शब्दाची आम्हास अत्यंत लाज वाटते मराठीलच नव्हे तर सार्‍या भरतखंडात 'कायदा' ह्या शब्दाला आपला स्वकीय हिंदु प्रतिशब्द असा अेकही अुरलेला नाही ! ज्या तत्त्वावर सुसंस्कृत समाजाची प्रतिष्ठा त्याच तत्त्वाला, ज्यांनी जगातील विविध विज्ञानावरचा अत्यंत प्राचीन असा मनुस्मृतीसारखा ग्रंथ जस्टिनियनच्या शतकोशतक आधी ग्रथिला ज्यांनी चंद्रगुप्ताचे साम्राज्य चालविले, चाणक्याचे अर्थशास्त्र रचले त्या आमच्या जगतात शब्द अुरू नये याचा आम्हास तीव्र विषाद वाटतो ! कायद्याला 'निर्बंध' हा शब्दच अुत्तम अटकाव याला 'प्रतिबंध' योजावा म्हणजे कायदेशीर, कायदेपंडित, कायदेशास्त्र यासारख्या घेडगुजरी कणकट्टु नि करंट्या शब्दांना निबंधशील निर्बंधपंडित निर्बंधशास्त्र नैर्बंधिक असे श्रुतिसुखद स्वकीय सामासिक शब्द हवे तितके अुद्भाविता येतील

महाराष्ट्राने अेकदा निर्बंध शब्द सुचविला की त्याची देणगी सगळ्या भारतवर्षातील काश्मिरी ते तामीळ तेलगूपर्यंतच्या आपल्या हिंदु भाषासंघास देता येअील विधिमंडळ हा शब्द जसा आता सर्व वृत्तपत्रांनी अुचलला तसाच जर ते निर्बंध (कायदा) हा शब्द नेटाने वापरतील तर अवघ्या अेका वर्षात तो बद्धमूल होअील अिंग्रजी नि मुसलमान या देशी येअीतो जणू काय आम्हास 'Law ची 'कायदा' ची कल्पनाच नव्हती असा जो लज्जास्पद ध्वनि त्या कल्पनेस स्वतःचा प्रतिशब्द आज मुळीच नसल्याने निघतो त्याचे यापुढे तोंडच बंद होअील भाषाशुद्धिवाल्यांनी तरी अगदी तत्काळ 'कायदा' या Law हे शब्द बहिष्कारून 'निर्बंध' हाच शब्द वापरण्याचा कृतनिश्चय करावा ! मतभेद असेल त्यांना आमचा आग्रह नाही त्यांनी रुचेल तोवर कायदा हा शब्द वापरावा

## विज्ञानपरिभाषेसाठी समिति

भाषाशुद्धीच्या प्रश्नाविषयी आपल्यात मतभेद असला तथापि या साहित्य-संमेलनातील बहुतेक सभासदांचे याविषयी तरी अेकमत आहेच आहे की आपल्या भाषेसाठी सर्व अर्वाचीन नि कित्येक प्राचीन विज्ञानातील पारिभाषिक ते ते शब्द अेकदा ठाम ठरले जावे रसायन, वानस्पत्य विद्युत् प्रभृति विज्ञान (Sciences) आता आपल्या मातृभाषेतून संपूर्णतः शिकवावी लागण्याचा समय जवळ आला आहे असतां ती कोठे कोठे तशी शिकविलीही जात आहेत अशा पारिभाषिक निश्चित शब्दांची अुणीव आपल्या मराठीलाच नव्हे तर बंगाली, हिंदी ते तामीळ तेलगूपर्यंतच्या आपल्या सर्व प्राकृत भाषासंघास आज नडत आहे प्रत्येक प्रगत अशा प्रांतिक भाषेत संघशः नि व्यक्तिशः काही काही शास्त्रातील परिभाषा निश्चिण्याचा यत्नही झालेला आहे त्या यत्नामुळे पुष्कळसे सुरेख शब्द आधीच पाडले गेले आहेत, पुष्कळशा अडचणी ध्यानी आल्या आहेत आणि अखिल भारतीय

अशी संस्कृतनिष्ठ परिभाषा ठाम करण्याचे कार्य त्या मानाने आता सुसाध्य झालें आहे. राजशक्ति मागे असती तर अेक वर्षाचे आत हे कार्य पार पडते पण आहे त्या अडचणीतही अडून बसण्याचे कारण नाही नुसत्या वार्षिक ठरावाचे नि योजना आखण्याचे काम आता पुरे झाले या साहित्यसंमेलनाने नि आपल्या मराठी साहित्यपरिषदेने ह अेक कार्य अगदी आपल्याच हातून पार पडले पाहिजे अशी अीर्षा धरून कामास लागावे

## परिभाषाकोश करा

प्रथमत काश्मीरपासून रामेश्वरापर्यंतच्या आपल्या ज्या ज्या संस्कृतनिष्ठ प्राकृत भाषा आहेत, त्याच्या त्याच्यात वैज्ञानिक परिभाषेचे आजवर निघालेले शब्द अेकत्र करावे विज्ञानातही प्रथमत केवळ बौद्धिक वा तार्किक शास्त्र हाती घेअू नयेत ज्योतिष, तत्त्व, तर्क, काव्यप्रभृतींच्या परिभाषा आहेत त्या सुद्धा पुरे आहेत. प्रथमत भौतिक अशा अर्वाचीन विज्ञानानाच हात घालावा व्यवहार जो आपल्या राष्ट्राला नडला आहे, तो मागासला आहे त्यामध्येच नतर प्राकृत भाषामध्ये जितक्या साहित्यसंस्था आहेत, त्यातील वा त्याच्या वतीने नेमलेल्या प्रमुख परिभाषापटु पडिताना आमत्रून अेक अखिल भारतीय संस्कृतनिष्ठ परिभाषामडळ स्थापावे, परिषदाही भरवाव्या अेकदर कार्य तीन वर्षांत संपवून 'भारतीय परिभाषाकोश' प्रसिद्ध करावयाचाच असा निर्धार केल्यास त्याच्या साहाय्यार्थ आपली महाराष्ट्रीय संस्थाने तरी पुढे आल्यावाचून सहसा राहणार नाहीत आपल्या संस्थानिकाचे हातून जे हात नाही त्यापुरते त्याच्यावर नुसते जळफळत राहण्यापेक्षा, त्याच्या हातून जे होण्यासारखे आहे त तरी करून घेण्यात अधिक शहाणपणा आहे

अितर साहित्यसंस्था परप्रातातून सहकार्य करतीलच पण ते न घडले तरी अेकट्या महाराष्ट्रीय साहित्य परिषदेस नि संमेलनासही ह कार्य स्वत चे बळावर पार पाडता आले पाहिजे काही शब्दाविषयी जरी वैकल्पिक परिभाषा सुचवावी लागली, तरी एकदरीत सहस्रावधि पारिभाषिक शब्द ठाम ठरवून टाकता येतील आणि निरनिराळ्या विश्वविद्यालयाच्या ठरावानी शिक्षणातून नि ग्रथातून तेच मुख्यत वापरविता येतील असे अेक चिरतन कार्य जरी साहित्यपरिषदेने नि संमेलनाने केले तरी बारा वर्षांच्या केवळ काथ्याकुटीपेक्षा साहित्याची काही तरी म्हणण्यासारखी सेवा घडेल—आपल्या साहित्यसंस्थेचे स्थान अखिल भारतात अुचावेल, नाव गाजेल

## अुर्दूचा समावेश नको

या प्रकरणी अेक चेतावणी मात्र दिलीच पाहिजे आणि ती ही की, ही परिभाषा ठरविण्यासाठी केवळ संस्कृतनिष्ठ त्या त्याच भाषाचे मडळ नेमले जावे.

हिंदुस्थानातील अेका अुर्दूवाचून खर पाहता यच्चयावत् भाषा सस्कृतनिष्ठ आहेत तामीळ, तेलगू, कानडी ह्याही सस्कृतोद्भव नसोत, पण सस्कृतनिष्ठ नाहीत अस कोणताही तद्‌भाषीय हिंदु मनुष्य तरी म्हणू शकणार नाही वास्तविक अुर्दू ही कोटयवधि मुसलमानानामुद्धा अपरिचितच, पण जर मुसलमान तिलाच आपली मातृभाषा समजणार असले आणि ज्या अर्थी तशी त्याची अुघड अुघड प्रतिज्ञाच झाली आहे तर, नि त्या अर्थी त्याना अुर्दू भाषेची रुचेल ती परिभाषा स्वतत्रपणे ठरवू द्यावी त्याचा भर अरेबी, पर्शियनवर त्याना श्रीचामुद्धा विटाळ! मग सबंध श्रीगणेशाची तर गोष्टच सोडा! तव्हा अखिल भारतीय या गाडस नावाखाली फसून, त्याची नि आपल्या परिभाषेची अेकच मोट बाधण्यासाठी अेकच मडळ नेमल तर त्या कार्याचा श्रीगणेशासुद्धा आजन्मात होण्याची आशा नको

## असगाशी सग

पुन, आपल्या यच्चयावत् भाषा सस्कृतनिष्ठ, अर्थात सस्कृतनिष्ठ परिभाषाच त्याच्या प्रकृतीस मानवणार त्यातही नवशब्दप्रसवक्षमतेत आपल्या सस्कृतचा हात धरील अशी भाषा जगात आजही दुसरी कोणतीही सापडणार नाही लटिन, ग्रीकमुद्धा जिचे कालवे शोभावे, त्या सस्कृतच्या गगौघाकडे पाठ फिरवून जर अेखादा करटा ताम्हेल्या पाण्याच्या घाघामाठी जाणूनबुजून अरबी चाळवटात भटकू लागला तर त्याच्या नादी आम्ही काय म्हणून लागावे? यास्तव महाराष्ट्र साहित्यपरिषदेने नि समेलनाने ज परिभाषामडळ नेमावयाच त चवचकीत अखिल भारतीय सस्कृतनिष्ठ परिभाषा मडळ म्हणूनच नेमावे असगाशी सग करण्याच्या वेडात, परिभाषेच्याच नव्हे तर स्वभाषेच्याही प्राणाशी गाठ पडेल नागपूर प्रातातील शिक्षणप्रधान श्री शुक्ल यानी विद्यामदिराची अेक योजना आखली त्या योजनेच्या त्या 'विद्यामदिर' ह्या साध्या सस्कृत नावानेसुद्धा चिडून जाअून मुसलमानानी विधिमडळावर चाल केली! विद्येशी अविद्येने ठाणलेले हे वैर ओळखून, विद्येची विद्येपुरतीच परिभाषा आपण आखावी हेच सद्य परिस्थितीत अुचित!

## श्री अकर्ते नि श्री वघे

आणखी अेक साहित्यविषयक काय केवळ साहित्य परिषदेनेच नव्हे तर अवघ्या महाराष्ट्र साहित्यिकानी आजच्या आज हाती घ्यावयास हवे साहित्य परिषद किंवा साहित्य समेलन त्याच्या शक्तीप्रमाणे करता येईल ते प्रत्यक्ष कार्य काही करीत आहे, अधिकही करील परतु आपण सर्वांनी हे ध्यानात ठवल पाहिजे की, आपण सर्वांनी हातभार जर न लावला तर त्या सस्था तरी काय करणार? बहुजन समाजाला अेक मोठी वाअीट खोड आजकाल आपल्या अिकडे लागली

आहे तो स्वत काही अेक करणार नाही त्याला जणू स्वत काही अेक न करता, जो कोणी थोडेबहुत करील त्याला, तू आणखी काम का करीत नाहीस अस हिणविण्याचेच काम तेवढे विधात्यान नेमून दिलेले असते! येता जाता साहित्य परिपद यव् करीत नाही नि त्यव् करीत नाही, म्हणून जेव्हा जेव्हा श्री अक्ते नि श्री वघे हटकतात, तेव्हा तेव्हा त्यानी ह विसरू नये की, साहित्य परिपदेला अनेक मोठमोठी कार्ये हाती घेता यावी अस कोणचे साहाय्य या लक्षावधि अक्त्यानी नि वघ्यानी दिले आहे ? जर समाज पाठिंबा देअील तरच सस्था काही करू शकणार !

## मराठी ग्रथाचे अिंग्रजी अनुवाद

मराठीतील अुत्तमोत्तम ग्रथाची भाषातरे अिंग्रजीत सिद्धवून मराठी साहित्याची योग्य ती थोरवी जगातील साहित्यात आज प्रस्थापिली जात नसेल तर तो दोप केवळ परिपदेचा नाही समेलनाचा नाही, तर अवघ्या महाराष्ट्राचा आहे म्हणूनच ह कार्य हाती घेण्याचे दायित्व श्रेष्टपा परिपदेच्या माथी आहे अस मी मानीत नसून, आमच्या सर्वांच्याच–आम्हा बहुजनाच्याच–माथी आहे असे मानतो अिंग्रजी भापेच्या मजावटीत जगाच्या प्रमुख चौकातून प्रदर्शविली गल्या-मुळेच काय ती आपल्या अितर काही प्राकृत भापातील अुपमोत्येही (Cultured pearls) अवाच्या सवा भावान विकली जात असता, मराठीच्या तिजोरीतच डावून ठेवल्यामुळे आपल्या मराठातील श्रिस्यक पाणीदार जातिवत मोत्येही मातीमोल होअून पडत आहेत नेदर्लंडसारख्या लहान-महान राष्ट्राच्या स्वातत्र्य-युद्धाचे अितिहास मॉट्लेसारख्या अितिहासकारानी अिंग्रजीत लिहिल्यामुळेच आज जगभर वाचले जातात पण महाराष्ट्राने हिंदुस्वातत्र्यार्थं जे प्रचड धर्मयुद्ध लढविले त्याचे नावसुद्धा जर जगाच्या साहित्यात अैकू येत नसेल तर त्याचे अेक मुख्य कारण म्हणजे त्या अितिहासावरील मराठीतले ग्रथ अिंग्रजीत कोणी अनुवादिले नाहीत हें होय अितिहासाप्रमाणेच अितर काही विषयातही मराठीत असे ग्रथ आहत आणि असे विद्वान ग्रथकार आहेत की, ज्याच्या लिखाणाचा परिचय अिंग्रजीतून केला गेला असता, त्याची कीर्ति युरोपभर व्हावी ! निदान त्याना अखिल भारतीय प्रख्याति तरी मिळाल्यावाचून राहूच नये

## आमचा नवा विद्वद्वर्ग

जगाच्या साहित्यात नि ज्ञानात नवी भर टाकील असा अेक विद्वानाचा वर्ग आज आमच्यात अुदयित आहे विज्ञानाची (Science) गोष्ट सोडली तर बहुतेक विषयातील युरोपियन सर्वसामान्य विद्वान् मडळीच ज्ञान अेकदेशी असत कारण त्याना आपल्याकडील माहिती नि आपल्या वाङ्मयाची ओळख आपल्या विद्वाना-सारखी नसते पूर्वीच्या आपल्या पडिताचे ज्ञान जसे आपल्या अिकडील ग्रथापुरतेच

नि अनुभवांपुरतेच अेकदेशी असे, तशी सापेक्षतः युरोपातील सर्वसामान्य ग्रंथकारांची स्थिति आहे. परंतु, सध्या संस्कृत वाङ्मयाचे नि भारतीय अनुभवाचे प्रगाढ पंडित नि मर्मज्ञ अजूनही युरोपियन वाङ्मयात नि अनुभवातही जे मुरलेले आहेत असे ज्ञानकोशकारांसारखे जे पंडित आपल्याकडे होतात ते सापेक्षतः युरोपियनापेक्षा अधिक बहुश्रुत असतात, सव्यसाची असतात. तत्त्व, काव्य, तर्क, पुराविज्ञान (Archaeology), अर्थशास्त्र, समाजशास्त्र, अितिहास प्रभृति विषयामध्ये त्याचे विचार, पौर्वात्य नि पाश्चिमात्य वाङ्मय नि अनुभव या दोघांचेंही परिशीलन त्यांनी केलेले असल्यामुळे, पूर्वीच्या अेकदेशीय पंडितापेक्षा किंवा आजच्या अेकदेशीय युरोपियनापेक्षा अधिक तुलनात्मक, अधिक बहुश्रुत नि अधिक सप्रमाण असतात. त्यायोगे ज्याप्रमाणे पूर्वी अेकदा संस्कृत युगात वा पालीयुगात त्या काळच्या जागतिक साहित्यात नि ज्ञानात आम्ही नवीन नवीन मोलाची भर टाकू शकलो तशी आजही पुनः टाकू शकू.

### भाषांतर-मंडळ स्थापा

अशी भर टाकण्यासाठी मराठी ग्रंथ आजही लिहिले जात आहेत. पण आपली भाषा संस्कृत वा पाली जशी पूर्वी अेकदा जागतिक भाषा झाली होती तशी पदवी पावलेली नसल्यामुळे, तशा पदवीस जी आज चढलेली आहे त्या अिंग्रजी भाषेत आपले ते मराठी ग्रंथ भाषांतरिले पाहिजेत. ते विचार अशा मराठी विद्वानांनी जसे मराठीत तसेच अिंग्रजीतही ग्रथिले पाहिजेत. हे काम काही अशी ज्याचा तोच करू शकेल. साहित्य परिषदेनेही वर्षाकाठी अेक दोन ग्रंथ तरी अिंग्रजीत भाषांतरिले पाहिजेत. परंतु हें काम मुख्यतः साऱ्या महाराष्ट्रानेच आपले समजून त्यासाठी अेक स्वतंत्र नि सधन मंडळच स्थापिले पाहिजे. पूर्वी अिंग्रजीतून मराठीत महत्त्वाच्या ग्रंथांची भाषांतरे करण्याची जशी आवश्यकता होती आणि तें काम करण्यासाठी श्रीमंत सयाजीराव गायकवाड महाराज, कै. दाभोळकर प्रभृति कार्यकर्त्यांनी मोठमोठ्या वा लहानमहान माला काढून जें कार्य केलें, तशीच आता मराठीतील ग्रंथ अिंग्रजीत अनुवादिण्याची अुलटी लाटही अुठली पाहिजे.

### महाराष्ट्रातील विद्यापीठ

या निबंधात येथवर ज्या लहानमोठ्या कार्यात्मक योजना आम्ही अुल्लेखिल्या त्यापैकी क्रियापददारिद्र्य घालविण्याची, वाक्यरचना-वैचित्र्याची, लिपिशुद्धीची नि भाषाशुद्धीची सुधारणा ह्या केवळ मनात येताच ज्याच्या त्याला पटतील तर लगोलग करता येणाऱ्या आहेत. 'संस्कृतनिष्ठ परिभाषा कोशाचे' अखिल भारतीय कार्यही करूच म्हटले तर साहित्यपरिषद नि संमेलन यांना पार पाडता आले पाहिजे. परंतु मराठीतील अुत्कृष्ट ग्रंथाचा नि विचारांचा अनुवाद अिंग्रजीत

करण्याचें कार्य मात्र अितकें व्यापक नि व्ययाचें आहे की, तें पूर्णपणे पार पाडा-वयास आजच्या परिस्थितीत तरी साहित्य-परिषद असमर्थच ठरेल. आणि वास्तविक पाहता अशीं अवजड कामें, तिने दिशा दाखविण्यापुरतें दहापांच ग्रंथ अिंग्रजीत अनुवादून प्रकाशिले तरी, पूर्णपणे नि सातत्याने करीत रहाण्याचा भार अशा साहित्यपरिषदांवर टाकणेंही अयोग्यच आहे. त्यासाठी आणि मराठी साहित्याच्या अेकंदर विवर्धनास्तव आपणांस महाराष्ट्र विद्यापीठच स्थापिलें पाहिजे. न्यायमूर्ति रानडेचांपासून हा विचार चालू आहे आणि त्याविषयी आपण आपली नेहमीची कृतिपंगुता जर सोडली नाही तर तो विचार आणखी दहा वर्षे 'अेक विचार' म्हणूनच रेंगाळत राहील.

## अनुकूल काळ

यास्तव माझें आपणां सर्वांना अत्याग्रहाचें सांगणें आहे की, या सम्मेलनाने आम्ही या दोन वर्षांच्या आत महाराष्ट्र विद्यापीठ प्रस्थापूच प्रस्थापू, असा कृत-निश्चय करून अुठावें. प्रत्येक वर्षाला पांचशे तत्त्वांचा काथ्याकूट, पांचशे ठराव, पांचशे वेत करीत बसण्यापेक्षा अेक कोणचे तरी विशिष्ट निकडीचें कार्य हाती घेअून तें पार पाडीत चलावे. असें केल्यावाचून आपल्या राष्ट्रापुढे सर्वच प्रकरणी जे कामाचे डोंगर पडलेले आहेत, प्रगतीची वाट अडवीत आहेत, त्यांचा अुठाव कसा होअील बरें? त्यातही आता काल थोडा अनुकूल आला आहे. करून टाकूच अशा अिरेने हात घातला तर कितीतरी तुंबलेली कार्यें आता करून टाकता येतील. साहित्यविषयक नव्हेत, तर राष्ट्रीय प्राबल्याच्या नि स्वातंत्र्याच्या प्रकर-णींही अत्यंत अुपयुक्त अशा — प्राथमिक शिक्षण मुलांना आवश्यक करणें, नैतिक शिक्षण तरुणांना सक्तीने देणे, प्रभृति अनेक गोष्टी ज्या संस्थेच्या द्वारें सुसाध्य होणार आहेत तें महाराष्ट्र विद्यापीठ स्थापण्याचें कामही आता सहजी करून टाकता येणाऱ्या कार्यांतील अेक निकडीचें कार्य आहे. असें महाराष्ट्र विद्यापीठ स्गोलग स्थापण्यासारखी भूमिका सर्व दृष्टीने योग्य अशी जर आपल्या हाती आजच्या आज कुठे असेल तर ती अेका पुण्यासच!

## विद्यापीठ अद्यतन हवें

तें महाराष्ट्रीय विद्यापीठ जे स्थापावयाचें तें नुसतें सत्याचे प्रयोग करणारें नको. जगाच्या अनुभवाने जीं विद्यापीठें अग्रवत् म्हणून ठरली आहेत, अमेरिके-सारख्या बलाढ्य नि अद्यतन प्रगतीच्या देशात जीं चालू आहेत, त्यांच्याअितकें तें प्रगत असलें आणि सिद्ध झालेल्या सत्यावरच काय तें अधिष्ठानिलेलें असलें, की सध्यापुरतें पुरें आहे. ह्या दोन गोष्टी ध्यानी ठेवून ह्या संमेलनाने वा साहित्य परिषदेने ह्या वर्षी आपला सर्व भर पुण्यास महाराष्ट्र विद्यापीठ स्थापण्याच्या

कार्यावर द्यावा. अेक व्यापक मंडळ नेमून महाराष्ट्रभर अेकच चळवळ अुडवून द्यावी प्रत्येक नगरी सभामागून सभा भरवाव्या लाखो सह्यांची आवेदने मुंबअी सरकारकडे धाडावी. विधिमंडळातून प्रश्नाचा, ठरावाचा भडिमार करावा प्रधान-मंडळाच्या दाराशी शिष्टमंडळाने सारखे ठोठावीत बसावे. जिकडे पहाल तिकडे भित्तिपत्रकातून ( Wall Posters ) हस्तपत्रकातून, वृत्तपत्रादि नियतकालिकातून अेकच कठशोष अैकू यावा- पुण्यास 'महाराष्ट्र विद्यापीठ' स्थापा! अशी चळवळ अेक वर्षभर सारखी करा नि पहा महाराष्ट्र विद्यापीठ दोन वर्षांचे आत प्रस्थापिले जाते की नाही ते! हे कार्य साहित्यपरिषद नि संमेलन यांच्या शक्तीतले आहे. वृत्तिदौर्बल्य झाडून अशी काही विधायक नि प्रत्यक्ष कार्य करण्याची धमक तेवढी धरली पाहिजे!

## ही वैयक्तिक मते

येथवर आपण सर्व महाराष्ट्रीयांनी नि साहित्यपरिषद वा संमेलन यांनी आजच्या आज अशी कोणती कार्ये करून टाकली पाहिजेत आणि ती करून टाकणे शक्य आहे याची चर्चा मी केली येथेच हेही सांगून टाकणे अवश्य नसता अवश्य वाटते की, ही किंवा ह्या निबंधात पुढे येणारी मते ही, जरी ती अध्यक्षपदावरून सांगितली गेली तरी माझी वैयक्तिक मते आहेत माझे अध्यक्षीय मत म्हणजे अर्थातच जे या संमेलनाचे ठरावात आपले सामुदायिक मत व्यक्तविले जाअील ते. माझी सर्व मते आपणा सर्वांना पटलीच आहेत वा पटतीलच असा अवास्तव भर-वसा मी केव्हाही बाळगणार नाही. ही माझी वैयक्तिक मते असल्यामुळे आपल्या कोणाच्याही वैयक्तिक मतस्वातंत्र्यास त्याच्यामुळे आळा बसण्याचे किंवा त्याच्या विरुद्ध ठराव जरी आपणास संमतिणे योग्य वाटले तरी ते संमतिण्याचे कामी कोणास संकोच वाटण्याचे काही अेक कारण नाही

## राष्ट्रभाषा संस्कृतनिष्ठ हिंदी होच

मी येथवर अेकंदरीत महाराष्ट्रातल्या साहित्यविषयक कर्तव्याचा त्यातल्या त्यात स्वतंत्रपणे विचार केला असला तरी आपण हे नेहमी ध्यानात ठेविले पाहिजे की, महाराष्ट्र हा जसा अखिल भारताचे अेक अुपांग आहे तसेच नि त्याच कारणा-साठी महाराष्ट्र साहित्य हेही अखिल भारतीय साहित्याचे अेक अुपांगच आहे काय ते अुपांगाचा विकास वा संकोच हा जसा शरीराच्या आरोग्यावर अती अवलंबतो तसेच भारतीय साहित्यजीवनाचे बरे वा वाअीट परिणाम महाराष्ट्रीय साहित्यावर झाल्यावाचून राहणार नाहीत. *या अवयवावयवी संबंधामुळे आपल्या राष्ट्रभाषेच्या* भवितव्याशी आपल्या महाराष्ट्रीय साहित्याचा संबंध त्यातल्या त्यात अधिकच अुत्कटत्वाने निगडित आहे ह्यामुळे महाराष्ट्र साहित्यास त्या प्रश्नाची अुपेक्षा

वरून चालणार नाही आपली राष्ट्रभाषा हिंदी हीच व्हावी असा आपल्या राष्ट्रातील फार मोठ्या वर्गाचा, निदानपक्षी हिंदु जगताचा, निर्धार झाल्यापासून बंगाल प्रभृति काही प्रांतांतील साहित्यिकांत असा अेक वर्ग निघत आहे, की ज्याला आपापली बंगालीप्रभृति भाषाच राष्ट्रभाषा व्हावी—हिंदी होअू नये असे वाटत आहे

## मराठी का नको ?

त्या वृत्तीला अनुसरून आपल्या मराठी साहित्यिकांतही काही मित्रांना असे वाटणे साहजिक आहे की, महाराष्ट्रीय साम्राज्य अटकेपर्यंत जेव्हा दिग्विजयी झाले होते, तेव्हा भारतीय साम्राज्याच्या भाषेचा मान ज्या मराठीला मिळण्याची संधि जवळजवळ हाती आली होती आणि जी मराठी हिंदीहून साहित्यश्रीत काकणभर सरसच ठरेल, ती मराठीच राष्ट्रभाषा न करता हिंदीसच तो मान देण्यात मराठीची किंचित् तरी अन्याय्य अुपेक्षा होत आहे परंतु आपण हे ध्यानी घेतले असता आपणास वा बंगाली प्रभृति अितर प्रांतिक भाषांना, असा अपमान वाटणार नाही की हिंदीला जी आपण राष्ट्रभाषेची पदवी अर्पीत आहो ती काही ती भाषा वा तिचे साहित्य बंगाली, मराठी, तेलगू, तामीळ याहून समृद्धतर वा अुच्चतर आहे म्हणून नव्हे अुलटपक्षी अगदी काल परवापर्यंत हिंदी साहित्य बंगाली-मराठीहून न्यूनतर होते परंतु हिंदीलाच राष्ट्रभाषा करण्याचे मुख्य कारण हे आहे की, ती भाषा अेकंदरीत अखिल भारतात बहुजनसमाजात अितर कोणत्याही भाषेहून अत्यधिक प्रमाणात बोलली जाते, समजली जाते, लिहिली जाते, आणि ती अितर कोणत्याही रीतीने राष्ट्रीय विचाराच्या विकासाला वा प्रगतीला साहाय्यभूत होण्यास कोणत्याही प्रकारे अक्षम नाही ही दोन्ही लक्षणे हिंदीस अितर कोणत्याही प्रांतिक भाषेपक्षा अधिक अशी लागू आहेत

## हिंदीचा विस्तार

हिंदी ही तिच्या पोटबोलीसुद्धा आठ कोटी लोकांची मातृभाषाच आहे मुळात. त्यातही खर पाहता हिंदुस्थानची ती आधीच राष्ट्रबोली तरी झालीच होती रामेश्वरापासून काश्मीरपर्यंत, आज दोन सहस्र वर्षे झाली, लाखो हिंदु प्रवासी, तीर्थयात्री, संतमहंत नि व्यापारी-व्यवसायी जे अव्याहतपणे जात-येत, दळणवळण ठेवीत आले ते या हिंदी बोलीच्याच बळावर काय तें! तुकाराम, नामदेव, चैतन्य नानक प्रभृति निरनिराळ्या प्रांतातील संतमंडळे हिंदीत आपली काही वचन रचल्यावाचून राहिली नाहीत ते तिच्या पुरातन सार्वदेशिक स्वरूपामुळेच होय. अिंग्लिशांनी मध्येच आडवे येअून शिक्षित वर्गाला जर अिंग्लिशचे नव माध्यम दिले नसते तर आज त्या शिक्षित वर्गापुढेही राष्ट्रभाषा ठरविण्याचा प्रश्नच बहुधा अुद्भवता नसता कारण आजही शिक्षित वर्गाव्यतिरिक्त लाखो लोकांची अेक जी राष्ट्रभाषा नसली तरी, राष्ट्रबोली आहे ती हिंदीच होय! कुंभमेळ्यात जाअून

पाहा की आपणास दिसेल—लाखो लोक तामील, तेल्गू, काश्मिरी, सिंधी, बंगाली हिंदीत बोलत आहेत हिंदुस्थानात येताच मुसल्मानांनी जी हिंदी बोलीच उचलली त्याचेंही कारण हेच होते की, तीच हाटाहाटातून नि घाटाघाटावर यच्चयावत् भरतखंडामध्ये निरनिराळ्या प्रांतात त्यातल्या त्यात अत्यधिक प्रमाणात समजली जाऊ शके.

## हिंदीतील तेज नि विशालत्व

हिंदीचे पुरातन साहित्यही सर्वसामान्यत अितर प्रांतिक भाषांच्या मानाने कमी विस्तृत किंवा कमी सरस नाही चंदभाटाचे जुन्या हिंदीतील 'पृथ्वीराज-रासो' हे प्रचंड अैतिहासिक काव्य पहा गुरुगोविंदसिंगाने रचलेले जे त्याचे आत्म-चरित्र ते विचित्र नाटक किंवा त्याचा दशमग्रंथ पहा हम्मीररासो, अल्हाअुदल, भूषणकाव्य, छत्रसालविजय प्रभृति हिंदुत्वाभिमानाने नि वीररसाने रसरसलेली वीरचरित्रे हिंदीच्या जुन्या वाङ्मयाचे तेज आणि सुप्रसिद्ध तुलसीरामायणासारखे अनेक धर्मग्रंथ त्याचे विशालत्व प्रस्थापीत आहेत अर्वाचीन हिंदी साहित्यास अद्य-वत् बनविण्याचे कामी तर आपल्या महाराष्ट्रीय वाङ्मयाने नि हिंदीतच ग्रंथरचना करणाऱ्या अनेक महाराष्ट्रीय लेखकांनी किती तरी हातभार लावलेला आहे तिचे साहित्य मराठी वा बंगाली यांच्याअितके आज परिपुष्ट नसले तरी ती त्यांच्या-अितकीच प्रगतिक्षम आहे मराठीची ती सख्खी बहीणच आहे संस्कृतनिष्ठा तिचेंही कुलव्रत. तेव्हा ती बहुसंख्य हिंदूंची आधीच राष्ट्रबोली असल्यामुळे त्या न्याय्य कारणासाठी ती राष्ट्रभाषाही झाल्यास मराठीला त योग्यच वाटावे, हेवा तर वाटूच नये मराठीचे हितासही अितर कोणती तरी राष्ट्रभाषा व्हावयाचीच तर हिंदीच होणे अधिक अनुकूल कारण तिची कर्कश वृत्ति मुळातच नाही, महा-राष्ट्राच्या हाताचा प्रेमाधार घेअूनच ती राष्ट्रभाषा पदावर चढत आहे

## अुर्दूची धोंड

पुन आपण विसरता कामा नये की, जर कोणती राष्ट्रभाषा झाल्याने मराठी साहित्याचीच नव्हे तर अखिल हिंदुसाहित्याचीच भयंकर हानि नि अपमान होणार असेल तर ती हिंदी नव्हे—अुर्दू ! जो जो आपण हिंदीला राष्ट्रभाषा करून टाकण्याचे कामी टाळाटाळ वा दिरंगाअी करू, तो तो जर कोणा भाषेची धोंड राष्ट्रीय भाषेच्या प्रश्नावर आदळणारी असेल तर ती न मराठीची, न बंगालीची—तर अुर्दूचीच होय! कारण, जरी अुर्दू ही मूळची हिंदीचीच 'बरजी' प्रत असली तरी अेखाद्या श्रीयुत दळवीचा मेहेरबान देहरवी होनाच तो गोताग काळ झाल्यावाचून राहत नाही, त्याप्रमाणेच ती अुर्दू हिंदीच्या, तिच्या गोत्राच्याच जिवावर अुठलेली आहे. तिची प्रकृति परसंस्कृतीच्या अमपाण्याने विकृत झाली आहे वास्तविक ती

मुसलमानाची धर्मभाषा नाही—ती अरबी आहे वास्तविक ती सात कोटी मुसल-मानांपैकी पाच कोटींची मातृभाषाही नाही त्याची मातृभाषा तामील, तेलगू, बगाली प्रभृति त्या त्या प्रांताची मूळ भाषा असते तीस पस्तीस कोटी लोकाच्या ह्या देशात जी अुर्दू दोनकोटी लाकाचीसुद्धा मातृभाषा वा धर्मभाषा नाही आणि वीस कोटींवर लोकाच्या सस्कृतीशी, साहित्याशी वा भाषेशी बहुतांशी असबद्ध, अपरिचित नि विरोधीही आहे, तिलाच त्या राष्ट्राची राष्ट्रभाषा करा असे नुसते म्हणण्याचे धाडससुद्धा, अितर कोणत्याही देशात कोणीही अल्पसख्याक करू शकले नसते पण हिंदुस्थानात मुसलमान ते करू शकतात!

## स्वतंत्र राज्याचे चिन्ह

बरे म्हणा, वाअीट म्हणा, पण आज मुसलमानाच्या मनात ज्या ज्या गोष्टींने त्याचा समाज हिंदूपासून अधिकात अधिक निराळा दिसेल, ते अेक हिंदूपासून अगदी विभिन्न, अगदी अुटट, अगदी विरुद्ध, अगदी निराळे राष्ट्र भासेल असे स्वरूप त्यास देण्याचा दृढ निर्धार झालेला आहे त्याच्या राजकीय कारणाची चर्चा कर-ण्याचे हे स्थळ नव्हे साहित्यापुरते अेवढेच सागणे भाग आहे की, भिन्न राष्ट्राची अेक अत्यत महत्त्वाची खूण जो विभिन्न भाषा तीही आपल्यात असावी यास्तव मुसलमानानी अुर्दू ही निवडली आहे अेवढ्याचसाठी सस्कृत हिंदुभाषासघापासून तिला विलग करण्यासाठी तिची मूळची सस्कृत प्रवृत्तिही प्रयत्नेकरून, बलात्काराने ते अधिकाधिक विकृत करीत चालले आहेत पजाबकडच्या मुसलमानानी अुर्दू आमची म्हटले तर अेक वेळ शोभेल पण बगाली हीच ज्याची मातृभाषा कालपर्यंत होती ते बगाली मुसलमान, किंवा शेकडा दहाजणही तामीळवाचून दुसरी भाषा जे बोलत नव्हते, अुर्दूचे वाक्यही वाचू शकत नव्हते ते मद्रासी मुसलमान, मराठीत घरच्या वह्या नि पत्र लिहिणारे कोकणी मुसलमान हे सुद्धा अुर्दूलाच राष्ट्रभाषा करा म्हणून जो अकस्मात् टाहो फोडू लागले आहेत, आम्हा सात-आठ कोटी मुसल-मानाची तरी अुर्दू हीच राष्ट्रभाषा आहे म्हणून धडाधड ठराव समतीत आहेत, अितकेच नव्हे तर वीस पचवीस कोटी हिंदूचा देशीत तीच अुर्दू राष्ट्रभाषा झाली पाहिजे म्हणून मुस्लिम लीगनेच ठराव केला, अितकेच नाही तर जिथे शेकडा पाच मुसलमान वस्ती नाही, त्या सुदूर तामीळभाषी मद्रासच्या भर विधिमडळात अेक विगतप्रधान नामदार सविनअुल्ला यानी गेल्या मार्च महिन्यात तेच मत प्रतिपाद-ण्यास सोडले नाही—हे सर्व जमेस धरता, मुसलमान असा अरबीनिष्ठ अुर्दूमच अुचलून धरणार हे सत्य दृष्टीआड करून कसे चालेल?

## हाती धुपाटणे येअील

अशा वेळी सर्व हिंदूनी पण सस्कृतनिष्ठ हिंदी हीच आमची राष्ट्रभाषा असा अेकमुखी निर्धार केला पाहिजे. नाही तर मराठी, बगाली, तामीळ यादात हिंदीचे

पाठवळ जर अुगावले तर तेल्ही गेले तूपही गेले आणि हाती अुर्दूचे धुपाटणे मात्र आले अशी आपल्या राष्ट्रभाषेची स्थिति होअून मराठी साहित्यालाही, त्या अरबी-निष्ठ अुर्दू मुसलमानी सत्तेत जसा हानिकारक नि अपमानकारक धक्का बसला, तसा बसल्यावाचून राहणार नाही। बिहारमध्ये महाराष्ट्राप्रमाणेच हिंदु बहुसंख्य, जवळजवळ शेकडा नव्वद; पण तिकडे हिंदूच्याच घरघालू प्रवृत्तीमुळे, मुस्लिमांच्या अतिक्रामक नेटामुळे, कांग्रेस सरकारनेच अेक भाषासमिति नेमून क्रमिक पुस्तकातून घातलेल्या भाषेत अुर्दू शब्दाची अर्धीमुर्धी तरी रेलचेल असावी असे सरकारी धोरण ठरविण्याचा घाट घातला आहे। तीच दुर्दशा मराठी क्रमिक पुस्तकाचीही त्याच वेडापायी झाल्यावाचून राहणार नाही हे ध्यानात ठेवा। आता आतून आतून बोटे मोडीत बसण्याचा भ्याडपणा मोडून, आम्ही सर्व हिंदूनी तरी मुसलमानाना नि कांग्रेसला रोखठोक बजावून सांगितले पाहिजे, की आम्हा हिंदूचीच तरी राष्ट्रभाषा संस्कृतनिष्ठ हिंदी हो, आणि हीच काय ती। मुस्लिमाना वाटेल तर त्यानी त्यांची राष्ट्रभाषा अुर्दू करावी या प्रयत्न करावी। राहतील राष्ट्रात दोन भाषा। स्विट्झर-लंडमध्ये चार आहेत. पण म्हणून प्रत्येक क्रमिक पुस्तकात प्रत्येक वाक्यात अेक शब्द अिटालियन, अेक शब्द फ्रेंच, अेक जर्मन, अेक स्विस असावा अशी काही खिचडी करण्याची खुळचट तोड त्यानी काढली नाही, आणि काढली असती तरी ती त्या स्वाभिमानी भाषिकांपैकी सर्वांनी झिडकारून तिचा बोजवारा अुडविला असता

## धर्मांतराचा भाषांतराशी संबंध नाही

येथे हे हेतुत स्पष्टपणे सांगून ठेवतो की, या निबंधात मागे जे अुल्लेख आले या पुढे येतील ते ज्या आमच्या मुसलमान देशबधूना नि भाषाबधूना मराठी ही आपलीच मायबोली वाटत आहे, आमचे खिश्चन, यहुदी, पारशी देशबधु जसे आपल्या मराठी, गुजराथी प्रभृति प्रांतिक नि त्यांच्याही मूळपासूनच असलेल्या मातृभाषाना जसे सावत्र भावाने न लेखता हिंदूअितक्याच ममत्वाने लेखतात, तसे जे मुसलमान त्या भाषाना आपलीच भाषा मानतात त्याना ते अुल्लेख लागू नाहीत. परतु मराठी प्रभृति भाषा ह्या त्यांच्या पूर्वजांच्या मातृभाषा असताही त्याना परकी मानून आपली स्वत ची अशी अरबी, पर्शियन शब्दनिष्ठ अुर्दू हीच काय ती स्वकीय भाषा आहे अशी जी विकृत चळवळ मुसलमानात चालली आहे तिला पाठिंबा देणाऱ्या मुसलमानाना काय ते ते अुल्लेख लागू आहेत. धर्मांतराचा भाषांतराशी संबध असतोच असे नाही. हे आमचे खिश्चन बधु मराठी-हिंदीना किती प्रेमाने आपणावतात ह्यावरून दिसून येअील.

## 'याने'चा अरबी खिळा

भाषेच्या अैक्यासाठी हपापलेल्या 'हिंदी याने हिंदुस्थानी'च्या नव्या खुळाचाही बोजवारा अुडाल्यावाचून राहणार नाही; आणि शेवटी हा 'याने'

हिंदुस्थानी ' उर्दूच बनविल्यावाचून मुसलमान सोडणार नाहीत. महाराष्ट्रातील लोकाना ही 'हिंदी याने हिंदुस्थानी' म्हणजे काय वस्तु आहे हे ध्यानी यावयास तो 'अेक सत्याचा प्रयोग' आहे अितके सांगणे पुरे! हिंदी म्हणताच मुसलमानाचे माथे फिरते ना! ठीक तर ते हिंदी हे अेकेरी नाव बदलून त्यात 'याने म्हणजे अर्थात्' हा अरबी शब्द घालू या, नावातच हिंदुमुस्लिम अैक्य त्या 'याने'चा अरबी खिळा ठोकून खिळवून टाकू या! आपल्या राष्ट्रभाषेचे नाव 'हिंदी याने हिंदुस्थानी' असेच ठेवले, नुसते हिंदी ठेवले नाही हिंदीत चिरफाड करून तिच्यात अर्धे संस्कृतीय नि अर्धे अरबी शब्द वापरीत गेले की हिंदुमुस्लिमाची राष्ट्रभाषा अेक झाली पाहिजे अशी आहे ही योजना! मागे अेका बुद्धिमान् मध्यस्थाने दोघा पक्षकारात अेका जिवंत गायीची यथान्याय वाटणी करण्यासाठी तिचे मधोमध दोन तुकडे केल्याची गोष्ट सांगतात, आणि तरी देखील त्या भागातील तोंडाचा भाग न घेता दुधाच्या कासेचा भागच मला हवा म्हणून त्यातील भाडखोर पक्षकार भांडतच बसला (!) तीच गत ही! सरहद्दीमेवरील पठाणाची टोळधाड हिंदुस्थानावर आल्यास, त्याच्या प्रतिकारासाठी हिंदवी स्त्रियाचीच अेक नि शस्त्र सेनाच तिथे धाडावी, म्हणजे बंदुक न झाडताच ते पठाण लोक लाजेने परत फिरतील असा अेक सत्याचा प्रयोग मागे सुचविला गेला होता! त्याच्याच तोडीचा हा दुसरा! पठाण लुटारू अशी स्त्रीसेना सामोरी आली तर बंदुकही न झाडता परततील, नव्हे पळत सुटतील हे अगदी खरे–पण ते लाजेने नव्हे–तर त्या स्त्रियातील, पाठुंगुळी टाकवतील तितक्या स्त्रिया पाठीवर घालून! तसेच या 'याने हिंदुस्थानी' च्या प्रयोगात हिंदीमध्ये अर्धे अरबी शब्द घालता घालता त्या हिंदीसच ते उर्दू बनवून सोडतील! त्याची वटीक करून टाकतील!

आणि त्याचे मूलग्राही कारण हे की, जे राजकारणात, समाजकारणात तेच साहित्यात नि भाषेत, की–मुसलमानाना तुमच्याशी एकमेकपणा, समाअीकपणा अगा मुळातच नको आहे त्याना त्याचेपणा काय तो हवा, तुमच्या तुमचेपणाचा गघटी नको त्याना निराळेपणाच हवा आहे अेकत्रपणा नको अेकता हवी. तुम्हीच मुसलमान व्हा तुम्हीच शिवा उर्दू हवे तर! असा जोवर त्याचा मानस, तोवर कसली तडजोड? अर्धे शब्द अरबी मिसळले तरी हिंदी ते मानणार नाहीत पुन्हा तुमचे कोणते शब्द ठेवणे, त्याचे कोणते हा वाद आलाच! त्याना वंदेमातरम् नको, विद्यामंदिर नको, विराम नको, सरस्वती नको, श्रीयुत नको, श्रीसुद्धा नको यात अतिशयोक्ति अक्षरसुद्धा नाही घडत असलेल्या घटना आहेत ह्या! त्याच्या मस्थागात ते शाळातून मराठी, तामीळ, तेलगू, हिंदी शिकवूच देत नाहीत. उर्दूच बळाने शिरवितात आमच्या मुलाबाळानासुद्धा! तेथे ही बसली घेऊन बसले आहात 'याने हिंदुस्थानी'!

पुन्हा असे पहा की, आपल्यापुढे कोण्या चोर बाजारातील किंवा चौपाटी-वरील बाजारू भाषा काढण्याचा प्रश्न नाही; तर या भारतीय राष्ट्राची राष्ट्रभाषा बनविण्याचा प्रश्न आहे. आता अशा या आपल्या प्रौढ नि सुसंस्कृत राष्ट्राची राष्ट्रभाषा म्हटली की, ती तितकीच प्रौढ नि सुसपन्न हवी तिच्यात काव्य, कला, तत्त्व, शासन, विज्ञानप्रभृति सर्व विषयाची परिभाषा हवी. अशी परिभाषा आपल्या मराठी प्रभृति हिंदी भाषाप्रकृतीस मानवणार व पुरविली जाऊ शकणार त्या अेका देववाणीतूनच, त्या शब्दरत्नाकर संस्कृतातूनच! पण तिचाच तर मुसल-मानाना विटाळ! केमालपाशानेसुद्धा ज्या अरबीला नि तिच्या लिपीला अप्रगत नि टाकाअू म्हणून झिडकारली तिच्या दाराशीच ते परिभाषेची भीक मागणार! तुमच्या मराठी वा हिंदीत अर्थशास्त्र म्हटलेत की ते म्हणणार अिलो-अिक्तेसादियात! भाषाशास्त्र म्हटलेत की ते म्हणणार अलसून, अलसना. खनिजशास्त्र म्हटलेत की ते म्हणणार अिलम मदनियात्. प्रकृतिज्ञान म्हटले की, ते म्हणणार अिलम तबअियात साम्यवाद म्हटले की ते म्हणणार अिलममसा वाम् ग्रहाला सैयारा, विमानाला तैय्यारा, भाग्याला तकसीम, विकासाला तरक्की!

आता सागा हे त्याचे शब्द तुमच्या मराठीला जुळतात का? पण ते तर तेच वापरणार त्याना स्वत ला मुद्धा जरी हिंदी शब्दाहून ते कमी कळत असले तरीही ते तेच वापरणार! त्याच्या विद्यापीठातून ते तेच आजही वापरीत आहेत. नव्हे, हिंदु मुलानाही तेच वापरणे क्रमिक पुस्तकातून भाग पाडीत आहेत अशा त्याच्या मनोवृत्तीत नुसते 'ओपन सिसाम्' 'याने हिंदुस्थानी' म्हणताच राष्ट्रभाषा अेक होअील असे समजणे खूळ नव्हे काय? तो सत्याचा प्रयोग नसून आहे अेका जाणीव वा अजाणीव असत्याचा! असल्या दोन अगदी विभिन्न नि विरुद्ध प्रकृतीच्या नि संस्कृतीच्या भाषा अेकमेकात घुसडून देण्याने अितरही अनेक दुष्परिणाम होतील. पण ते सागण्यास अिथे स्थल नाही.

तेव्हा आमचे स्पष्ट मत असे आहे की, ह्या राष्ट्रभाषेचा प्रश्न आपल्या मराठी नि हिंदु साहित्याच्या हितार्थ सोडविण्याचा अेकच मार्ग असा आहे की, आम्ही हिंदूनी आमच्यापुरते असे ठाम ठरवावे की, आमची राष्ट्रभाषा संस्कृतनिष्ठ हिंदी हीच. मुसलमानानी हवी ती निवडावी. दोन भाषा राहतील त्याना परवडतील तर. बहुसख्येची जी भाषा तीच राष्ट्रभाषा, हा जगाचा न्याय मुस्लिमाना रुचेल त्या दिवशीच काय ती अेक राष्ट्रभाषा होअील. नाही तर नाही होणार!

जी बहुसख्येचीच नव्हे, तर अुत्तमातील अुत्तम आहे त्या आमच्या देव-वाणीला, आमच्या संस्कृत भाषेला आम्ही पारखे होणे म्हणजे आमच्या संस्कृतीला पारखे होणे होय

मागची दोन वर्षे प. जवाहरलाल नेहरू हे काँग्रेसचे अध्यक्ष होते. त्यानी हिंदु-मुस्लिम अैक्याकरिता आम्हा हिंदूना आज्ञा सोडली की अुर्दूच राष्ट्रभाषा

करा आता श्री सुभाषबाबू सवाजी अध्यक्ष झाले, तेव्हा औदार्यात नेहरूवरही थोडी मात करावयासाठीच की काय, त्यानी कांग्रेसच्या अध्यक्षीय भाषणातच आम्हा हिंदु लोकाना दुसरी अेक आज्ञा सोडली की आपली लिपीही सोडून रोमन स्क्रिप्टच स्वीकारा, म्हणजे मुस्लिमांशीच काय पण जगाशीही आपले अैक्य होण्याचा पाया घातला जाअील ! डी व्हॅलेरा आयरीनचा अध्यक्ष होताच त्याला चिंता लागली, मेलेली आयरिश भाषा पुन अेकदा माझ्या आयरीनची राष्ट्रीय भाषा कशी करता येअील ? 'अिंग्लिश भाषा जगाची भाषा कशी होअील, आयर्लंडमध्ये ती आधीच राष्ट्रभाषा झालेली असल्यामुळे जगद्धिताच्या दृष्टीने आयरिश भाषा मेल्याचा आनदोत्सव कधी करीन' अशी धाअी काही त्याला झाली नाही तीच गोष्ट हिटलरची—जर्मन भाषा, जर्मन राष्ट्र, जर्मन सस्कृति हच त्याला वेड ! तीच गोष्ट मुसोलिनीची, तीच केमालची—आपल्या राष्ट्राचे स्वत्व वस बलिष्ठ होअील हीच त्याची चिंता पण आमचे अध्यक्ष पहा—त्याना जगाचे कसे होअील याची चिंता, त्या जगाहूनसुद्धा अधिक अुत्कटतेने सारखी तळमळवीत आहे ! म्हणूनच हिटलर हिटलर आहे, मुसोलिनी मुसोलिनी आहे नि आमचे अध्यक्ष आमचे अध्यक्ष आहेत ! म्हणूनच आयर्लंड, तुर्कस्थान, जर्मनी, अिटली स्वतत्र आहेत आणि हिंदुस्थान पाकस्तान वा आग्लस्थान होअू घातला आहे !

## ही तर आत्महत्या

परतु, जगाच्या अैक्याचाच प्रश्न असेल तर आपली स्वतत्र नागरी लिपि तेवढी सोडून रोमन स्क्रिप्ट स्वीकारल्याने तो सुटावा तसा सुटणार नाही कारण आपली स्वतत्र भाषा त्या अैक्याच्या वाटेत आडवी येणारच तेव्हा तीही सोडून आणि मराठी, बगाली, हिंदी आणि मुख्यत ते सस्कृत साहित्य—त्या व्यासा-कालिदासासुद्धा—समुद्रात बुडवून आपण अिंग्लिश भाषाच आपली म्हणून का स्वीकारू नये ? जगातील केवढ्या तरी भाषाची अेक भाषा होअील त्यामुळे, जर आपण पचवीस कोटी हिंदु तरी अिंग्लिशलाच आपली मातृभाषा बनवू तर ! आणि नुसत्या भाषेपुरतेच जगाचे अैक्य साधण्यापेक्षा ते आपल्या अेकट्या हिंदूच्याच वाट्यास आलेल कर्तव्य, पूर्णपणे पार पाडण्यास्तव ह्या आपल्या स्वतत्र राष्ट्रीय-त्वाच्या जाणिवेचे लोढणे तरी गळ्यात का अडकवून बसा ? आपण अिंग्लिशच आहोत, आणि हिंदुस्थान कसा निराळा देश वा राष्ट्र जगात मुळी नाहीच असे का मानू नये ? हो जगाचे अैक्य साधण्याचा अुत्तम मार्ग म्हणजे भाडणातील अेका कोणत्या तरी समजस पक्षकाराने आपल्या मुलाबाळासुद्धा आत्महत्त्या करून घेणे हाच होय ! आणि तसा समजस पक्षकार ह्या जगाच्या जीवन कलहात आहे अेकच काय तो—हिंदुस्थान, आम्ही हिंदु ।।

## आदर्श लिपि

अैक्याची सर्वाधिक झुरणी लागलेली असणार दुर्बलतमालाच. परतु दुर्बलत्तमतेचे, आत्मदौर्बल्याचे हे कीट जर आमच्या मनावर चढलेले नसते, तर आमच्या राष्ट्रपति म्हणविणाऱ्या अध्यक्षाने जगालाच असे खडसावून विचारले असते की, जगाच्याच अैक्यासाठी तुम्ही तुमची अरबी, रोमन, लॅटिन लिपी सोडून आम्हा पचवीसकोटी हिंदूची ही नागरी लिपिच का स्वीकारीत नाही? जगाचे हितार्थच अुत्तम ती लिपि जागतिक लिपि होणे अिष्ट. म्हणून अरेबीची तर गोष्टच तुलनेत बोलावयास नको. शिलाछापाचे पुढे जी जाअू शकत नाही, अशी ती अरेबी लिपि म्हणजे लिपीचा अेक शिलास्थि, अेक Fossil होअून पडलेली! पण रोमन लिपीसुद्धा तुलनेत नागरीहून किती तरी हीन आहे! आजही जगताला देण्यासारख्या ज्या आदर्श वस्तु आम्हापाशी आहेत त्यात जसे योगशास्त्र, तशीच ही नागरी!

## शास्त्रशुद्ध व्यवस्था

तिची ती 'वर्णस्थान समीरिता' अशी नुसती अक्षराची क्रमव्यवस्थाच पहा! अनाहत असा जो आद्य ध्वनि मनुष्यास करता येतो तो 'अ' म्हणूनच तो प्रथम घातला. त्याच तत्वाने अितर स्वर ते ते त्या क्रमाने पुढे घातले. त्या स्वरावर व्यजनात्मक असा पहिला आघात कठात होतो. म्हणून कठ्य व्यजने निवडून, 'क' वर्गात घालून, त्याना त्यापुढे घातले. ओठ कापले तरी 'क' वर्ग अुच्चारता येणारच. दुसरा आघात तालूचा, पुढे दताचा, शेवटी ओठाचा. वास्तव तालव्य, मूर्धन्य दत्य, ओष्ठ्य ती ती व्यजने निवडून, वर्गवून क्रमाने रचली. नाही तर अरेबी पहा, पहिलेच अक्षर गिदली अुच्चाराचे–अलेफ्! दुसरे अेकदम ओष्ठ्य–बे! तिसरेच अुलट जाअून पे! अिंग्रजीचीही तिच गत! पहिली अेकदम अे तर दुसरी अेकदम बी, तर तिसरी सी!!! ध्वनीच्या आघातानुवर्ती स्थानाचा क्रम असा नाहीच!

## लिपिशुद्धतेची लक्षणे

लिपि शास्त्रशुद्ध असण्याचे दुसरे लक्षण, म्हणजे अक्षराचे जें नाव तोच त्याचा अुच्चार हवा. नागरीत ज्या अक्षराचे नाव 'स' त्याचा अुच्चारही स; नाव 'क' तर अुच्चारही क; पण रोमनस्क्रिप्टमध्ये नाव वी तर अुच्चार व, नाव सी तर अुच्चार क आणि नाव डब्ल्यू तर अुच्चार व! तीच गत अरबीची.

तिसरे लक्षण म्हणजे अेका अक्षराचा अेक अुच्चार. नागरी क कुठेही आला तरी तो 'क'च, 'अ' आला की तो 'अ'च राहणार. पण रोमन लिपीत योण अडाणीपणा! सी कोठे स होअील तर कुठे 'क'; but मध्ये 'u' अ होतो, तर 'put' मध्ये 'अु'!!

शास्त्रशुद्ध लिपीचे चौथे लक्षण म्हणजे अेका अक्षराचे अेकच रूप ह्या प्रकरणी आजच्या नागरीत चार-पाच अपवाद आहेत नि तेही लिपिशुद्धीच्या चळवळीने नष्ट केले आहेत पुन रोमन स्क्रिप्टप्रमाणे युरोपीय भाषा लिहिताना स्पेलिंगमध्ये जो लिपीचा विचका अुडतो तो विचारूच नये! नुसता 'कमिशन' हा चार अक्षरी शब्द लिहिताना अक्षरे लागणार दहा, commission काही अक्षरे पूर्वीच्या रावबहादुराप्रमाणे सभेत नुसत्या खुर्च्या अडवून चूप बसणारी, त्याना स्वत चा ध्वनिच नाही Through हा शब्द पहा! पुन, आमच्या भाषेतले कित्येक 'थ, त' सारखे ध्वनि व्यक्तविणारी अक्षर रोमन स्क्रिप्टमध्ये मुळातच नाहीत

सुभापबाबूच्या सूचनेप्रमाणे कांग्रेसकडून जेव्हा सारे वेद, वेदांगे, रामायण, महाभारत हे ग्रथ A, B, C, D मध्ये छापले जातील, तेव्हा गीतेच्या पाठास असा श्रुतिमजुळ आरभ होईल—

ढर्म्य क्षेट्रे कुरुक्षेट्रे समवेटा युयुट्सव ॥

मराठी क्रमिक पुस्तकातून मी जातो हं mee jato असं छापले जाअील आणि असं आमचे सस्कृतसुद्धा सारे प्रचड साहित्य, जगाचे हितासाठी A B C D वरून सोडावयाचे! काय वाखाणावी सुधारणा! जितकी विक्षिप्त तितकीच बाटगी!!

अशा प्रकारे नागरीहून सर्वतोपरी हीनतर असलेल्या रोमन स्क्रिप्टला आम्ही स्वीकारण्यापेक्षा युरोपानेच आमची नागरी स्वीकारावी लिपिशुद्धीप्रमाणे दोनचार रूपे पालटली की ती नागरी शास्त्रशुद्धतेत मूळचीच अुत्तमोत्तम असल्याने, आजच्या आज मुद्रणसुलभतेत नि शिक्षणसुलभतेतही रोमन स्क्रिप्टहून वरचढ होणारी आहे

## फोल कारणे

रोमन स्क्रिप्टचे लाभ म्हणून जी दोन कारणे पुढे आणण्यात येतात तीही अवास्तव आहेत रोमन लिपि जगाची बहुसख्य लिपि झालेली नाही पस्तीस कोटींचा हिंदुस्थान तितकाच मोठा चीन, चार कोटींचा जपान, ह्या मोठमोठ्या राष्ट्रातून नि अनेक अितर राष्ट्रातून ती लिपि स्वीकारलेली नाही केवळ युरोपियनाची ती मूळ लिपि म्हणून ते गेले तिथे ती गेली अेका केमालपाशाने मात्र तुर्कस्थानात ती नव्याने चालू केली आणि त्याच कारण असे हाते की, अरबी लिपि अगदी टाकाअू नि तुर्कांना परकी होती, आणि तुर्कांची स्वत ची अशी कोणचीच लिपि नव्हती! ज्याच्या घरी गायच नव्हती, त्याने अेखादी शेळीच पाळावी यात नवल नाही पण अितर सारे शेळ्या पाळतात यास्तवच काय ते आपल्या घरची कामधेनु हुसकून अेखादा शेळीलाच तेथे बाधू लागला तर ते मात्र नवल खरे!

## अर्थबोध अशक्य

दुसर जगातील भिन्नभिन्न साहित्याचा परिचय नुसत्या अेक लिपीमुळे सुलभ करता येअील हा हेतुही केवळ हेत्वाभास आहे कारण ज्या भाषा परस्पराशी पुष्कळ प्रमाणात अेकरूप असतात त्या अेकाच लिपीत छापल्या तर थोडधाफार प्रमाणात परस्पराना गर्भितार्थी तरी समजू शकतात युरोपच्या अिंग्लिश, फ्रेंच, जर्मनादि भाषात अनेक शब्द समान, त्या अेका लिपीत छापल्या तर साराश परस्पराना कळू शकेल पण युरोपियन भाषाना सर्वतोपरी विभिन्न असणाऱ्या आपल्या भाषा, त्याच्या रोमन लिपीत छापल्या तरी त्या युरोपियनाना त्यातल्या अर्थाचे अवाक्षरही कळणार नाही, साहित्याचा परस्परपरिचय सुलभ होणार नाही 'रघुवश' रोमन लिपीत छापला तरी 'वागर्थाविव सपृक्तौ वागर्थ-प्रतिपत्तये' या पहिल्याच चरणाचा अर्थ लडनच्या शाळातील मुलाना वा शिक्षकानाही लवलेश तरी कळेल काय ? त्यातली ABCD तेवढीच कळणार! त्याचप्रमाणे 'अाय कॉंग्रॅचुलेट यू अपॉन युवर सक्सेस' हे अिंग्लिश वाक्य अगदी देवनागरीत छापले तरी आमच्या अिंग्रजी भाषा न जाणणाऱ्या शास्त्रीबुवाना त्यातील अर्थाचा काही तरी बोध होअील काय ?

## हे सारे कशासाठी ?

मला स्वत ला ठाअूक आहे की, दे भ सुभाषबाबूनी नागरी टाकून रोमन लिपि स्वीकारावी म्हणून जे म्हटल, त्याचे खर कारण त्यानी वरवर हे जे सागितले तेच नव्हत जे खरे कारण त्याच्या मनात होत, ते दुसर कोणत नसून हेच होत की, हिंदुमुस्लिम अैक्य सपादण्यासाठी मुसल्मानाना जिचा अगदी तिटकारा येतो ती नागरी टाकून आम्ही रोमन लिपि स्वीकारली असता ते समाधानतीन, तेही रोमनलिपि स्वीकारतील आणि अशा कोणत्या तरी अद्वातद्वा युक्तीने हिंदुस्थानची अेक लिपि होअील! परतु, तुम्ही नागरी सोडा अेवढेच मुसल्मानाचे म्हणणे नाही, तर तुम्ही अुर्दू लिपिच स्वीकारा हे त्याचे म्हणणे आहे तुम्ही रोमन लिपि तर काय, चीनची लिपि जरी स्वीकारलीत तरी ते, विशेषत हिंदी मुसल्मान, त्याची धर्मलिपि जी अरबी आणि तिची प्रतीक जी अुर्दू ती सोडण्यास मान्य होणार नाहीत ही खूणगाठ बाधून ठेवा! आणि जरी मुसल्मानानी रोमन लिपि त्याची राष्ट्रलिपि म्हणून स्वीकारली अस अशक्य ते शक्य म्हणून क्षणभर गृहीत धरले, तरी हिंदुत्वाचा यथान्याय ता आत्मसन्मान बाळगणारे आमच्या-सारखे लाखो हिंदु लोक, केवळ कोणा अहिंदूच्या दुराग्रहासाठी काय ते आमची नागरी लिपि त्रिकाळीही सोडू अिच्छिणार नाहीत, हीही खूणगाठ बाधून ठेवा! मग तो दुराग्रह धरणारे मुसल्मान असोत वा अिंग्रज वा पोर्तुगीज!

## हा डाव हाणून पाडा

कारण, अिथेच हेंही सांगून ठेवतो की, अिंग्रज लोकांचा नि अमेरिकन मिशनरीचाही नागरी मारून रोमन लिपि रुळविण्याचा डाव फार दिवसांपासून चालू आहे. ख्रिस्तपुराण मराठी भाषेत पण रोमनलिपीत पोर्तुगीजांनी शेकडो वर्षांपूर्वी रचलें होतें. आजही नागा प्रभृति वन्य जातींत मिशनरी लोकांच्या शाळा ज्या आहेत त्यांतून सहस्रावधि मुलांना त्यांच्या भाषेचीं क्रमिक पुस्तकें मिशनरी रोमन लिपीतच छापून शिकवीत आहेत. अितकेंच नव्हे पण सैन्यासाठी सरकारनें चालविलेल्या 'फौजी अखबार' प्रभृति वृत्तपत्रांतून हिंदी भाषा रोमन लिपींत छापण्याचा अुपक्रम झालेला आहे, तिकडेही कानाडोळा करून चालणार नाही. या सर्व कारणांसाठी राष्ट्रभाषेच्या प्रश्नाप्रमाणेच माझें असें निश्चित मत आहे की, राष्ट्रीय लिपीच्या प्रकरणीही आपण हिंदूंनी आणि त्यातही ज्यांच्या साहित्याची लिपि प्रत्यक्ष नागरी ही आजही आहे त्या आम्ही महाराष्ट्रीयांनी स्पष्टपणे असें अुद्घोषावें की, नागरी हीच आमची राष्ट्रीय लिपि राहणार !

## दोन भाषा नि दोन लिपि

मुसलमानांनी हवी तर त्यांची अुर्दू भाषा नि साहित्य ठेवावें. ती त्यांच्या परीनें चांगली आहे हें मी जाणतो. जशा आमच्या प्रांतिक भाषा त्या त्या प्रांतात राहतील, तशी अुर्दू भाषा नि लिपि मुसलमानांनी आपल्यापुरती वाटल्यास ठेवावी. भाषेच्या वा लिपीच्या अैक्यासाठी अेकमेकाच्या पायात पाय अडकविल्याने दोघांचीही प्रगति खुंटेल, वाद वाढेल, अुणावणार नाही. राष्ट्रांत दोन भिन्न प्रवृत्तींच्या हिंदुमुस्लिम संस्कृति जोवर आहेत तोवर दोन भाषा नि दोन लिपि राहणारच. त्याला अुपाय नाही, त्याची चिंताही नाही. हिंदूंनी मात्र पक्का निर्धार करावा की, आमची राष्ट्रलिपि नागरी !! आपण पचवीस कोटी हिंदु जर अेकमुखाने हा निर्णय अुद्घोषवू आणि आपल्यापुरती अेकच राष्ट्रभाषा नि अेकच राष्ट्रलिपि करून सोडू, तर अितरांनी काय वाटेल तें केलें तरी ह्या हिंदुस्थानची अेकदरीत अशी तीच राष्ट्रभाषा नि तीच राष्ट्रलिपि झाल्यावाचून राहणार नाही ही गोष्ट अगदी ठाम !

## साहित्याचें ध्येय काय असावें ?

कार्यात्मक असें ह्या वर्षापुरतें महाराष्ट्र साहित्य संमेलनास मला जें काही सांगावयाचें होतें त्याचा शक्य तितका थोडा असा हा कार्यक्रम मी येथवर सांगितला. आता आपल्या अनेक साहित्यिक मित्रांनी मला जें काही तात्त्विक किंवा मतमतांतराचे प्रश्न विचारले त्यांतील दोन चार प्रश्नांना अगदी त्रोटक अशी अुत्तरें देअून मी माझा हा निबंध संपविणार. पुष्कळांनी विचारलेला अेक मुख्य

प्रश्न म्हणजे ' साहित्याचे ध्येय काय असते ? ' तो प्रश्न तसा न मांडता ' साहित्याचे ध्येय काय असावे ? ' असा मांडला असता तर त्याचे अुत्तर अधिक निश्चितपणे मला देता येअील

## ध्येय कोणते ?

ध्येयाचा प्रश्न आला की, त्यात लहरीच्या, हौशीच्या, वैयक्तिक आवडीच्या अंतर्भावापेक्षा कर्तव्याचाच अंतर्भाव मुख्यत अनुस्यूत झालेला असणार अर्थात् जीवनाच्या सामूहिक कर्तव्याची जी व्याख्या तीच, त्या जीवनाचे जे अेक अुपांग सारस्वत, त्याचीही व्याख्या, त्याचेही ध्येय असले पाहिजे मानवी जीवनाच्या भौतिक ध्येयाची मला पटलेली व्याख्या ही आहे की, मनुष्यजातीचे अधिकात अधिक हित ज्यायोगे साधता येते तेच मनुष्याचे अैहिक कर्तव्य होय तात्कालिक कर्तव्यही त्याच न्यायाने असे की, प्राप्त परिस्थितीत त्या त्या काली मनुष्य जातीचे जे अधिकात अधिक हित साधता येअील ते ते साधावे या दृष्टीने साहित्याच्या परम वा तात्कालिक ध्येयाचीही व्याख्या अशीच असणार की, मनुष्य जातीच्या अधिकात अधिक हितास साधण्यासाठी झटेल तेच साहित्य श्रेष्ठ, तेच सुप्रासंगिक आनंद नि करमणूक ही मानव हितास काही प्रमाणात हितकारकच असल्यामुळे त्याचाही अंतर्भाव योग्य त्या प्रमाणात वरील ध्येयात होतोच पण केवळ करमणूक हे काही कर्तव्य नव्हे. घरात आअी मरणान्तिक वेदनानी अंथरुणास खिळली असता, जर अेखादा बहकलेला कलावंत बगल्यात नायकिणीच्या नाचात रमू शकला तर त्यास कलावंत म्हटले तरी कुलदीपक काही म्हणता यावयाचे नाही! कारण खऱ्या कलावंताला तशा वेळी ती कलाच विकल केल्यावाचून राहणार नाही! तशा स्थितीत ती त्याला केव्हाही आनंदविणार नाही, तर अुलट अेखाद्या कलाहीन माणसापेक्षा अधिक अुत्कटतेने व्याकुळवील!

## वास्तव-वाङमय नि ललित-वाङमय

माझ्या सोयीसाठी मी वाङमयाचे वस्तुनिष्ठ नि रसनिष्ठ असे दोन भाग करतो कारण मला विचारलेल्या अनेक प्रश्नाची अुत्तरे त्यात आपोआपच दिली जातील, वस्तुनिष्ठ वाङमयात तत्त्व, गणित, ज्योतिष, विद्युत् अितिहास अित्यादि विज्ञानाचा समावेश होतो त्यात सत्य काय तेच यथावत्पणे सांगितले पाहिजे त्यातही रस येअील, पण तो आणण्यासाठी कल्पनेस काही मुळात नसलेले कल्पित रंग भरता यावयाचे नाहीत वस्तुनिष्ठ वाङमय हे वस्तूचे छायाचित्र, चित्र नव्हे. परंतु ललित वाङमय हे कल्पित रंग भरलेले चित्र होय, रसोत्कर्ष हाच त्याचा विशेष वस्तुनिष्ठ वाङमयात जो दोष तो, कल्पनेची मनसोक्त भरारी हा, रसनिष्ठ वाङमयाचा गुण होअू शकेल वस्तुस्थितीत न सापडणारी पात्रे, भूमिका,

रंग, याची ने-आण रसनिष्ठ वाङमय आपल्या अभिप्रेत भावनांच्या शुत्कर्षास्तव कल्पनासृष्टीतून करू शकते. नाट्य, काव्य, कादंबरी, कथाकल्पात्मक वाङमयाचा हा रसनिष्ठ प्रांत तेच सारस्वत

## पावित्र्य विडंबनाची कसोटी

वास्तव वाङमयाचे कर्तव्य सत्यकथन. वस्तुस्थिति, वैज्ञानिक परिस्थिति यांचे यथार्थ ज्ञान मनुष्याच्या हितास अत्यवश्य. वास्तव हे वाङमय, साहित्याच्या आम्ही वर दिलेल्या ध्येयास सुसंगतच असणार. त्यायोगे जुन्या वा नव्या कल्पनांना आणि भावनांनासुद्धा धक्का बसला तरी चालेल ज्या भावना वा कल्पना, मग त्या जुन्या असोत वा नव्या असोत, सत्यावर अधिष्ठित असतील त्याच टिकाशू ठरणार पावित्र्यविडंबनाचा प्रश्नही याच दृष्टीने परीक्षिला पाहिजे. पूर्वी कित्येक पवित्र वा धर्म्य वाटणाऱ्या गोष्टी, आज सत्य वस्तुस्थिति अुमगल्यामुळे चुकीच्या ठरलेल्या आहेत कुराणातील, पुराणातील वा बायबलातील पृथ्वीच्या आकाराच्या, सूर्यचंद्राच्या रचनेच्या, गतीच्या वा ग्रहणाच्या नि त्यावर आधारलेल्या धार्मिक रूढि पहा ! त्या असत्य आहेत म्हणून ज्यांनी प्रथम म्हटले, त्यांचा ख्रिस्ती-धर्मीयांनी पावित्र्य-विडंबनाचे नावे कसा छळ केला हे आपणास माहीत आहे पण आज त्या असत्य आहेत हे मुलाबाळांसही त्याच युरोपात शिकविण्यात येत आहे या प्रकारच्या मागच्या अनेक अनुभवांवरून आपण सर्वांनी हा धडा शिकला पाहिजे की, सत्यजिज्ञासेने वा तथ्य-प्रतिपादनाचे हेतूने, जे मत कोणी प्रस्थापू पाहतो त्यास शक्य तो प्रतिबंध नसावा, लेखन वा अुपदेश यांचे स्वातंत्र्य असावे. त्यायोगे जर पावित्र्यविडंबन होते असे कोणास वाटेल तर त्यांनी त्याचे ते मत चुकीचे आहे, असे अुलट बाजूने साधार प्रतिपादन करावे, म्हणजे त्याच्या विडंबनाची विटंबना झाल्यावाचून राहणार नाही त्याचे म्हणणे सत्य वा तथ्य ठरेल तर आपण भलत्याच असत्य वा अतथ्य गोष्टीला पावित्र्य दिलेले होते हे आपल्या लक्षात येअील सत्याकडे नि तथ्याकडे मनुष्याची अधिक प्रगति होअील

## नवमतवाद नि पुरोगामी वाङमय

तीच गोष्ट आज ज्याला नवमतवाद वा पुरोगामी साहित्य अित्यादि नावे देण्यात येतात त्याविषयीही लागू आहे कोणतीही गोष्ट केवळ नवी आहे म्हणूनच ग्राह्य वा त्याज्य ठरत नाही. नवे मूल जन्मास आले म्हणजे ते आअीपेक्षा अनुभवी वा बापापेक्षा शहाणे असते असे नाही. कोणतेही वाङमय नुसते पुरोगामी आहे म्हणूनच काही सत्य वा तथ्य ठरेलच, असे गृहीत धरता येत नाही आअीच्या पुढे दुडदुड धावत जाणारे पुरोगामी मूल खड्ड्यातही पडण्याचा संभव असतो. लक्ष्याच्या पुढे निघून जाणारी गोळी पुरोगामी असली तरी चुकलेली ठरते. वास्तव-वाङमयाचे

जे साध्य ते सत्य वा तथ्य, त्याच्या कसोटीस ती नवमतवादी वा पुरोगामी मते वितपत अुतरतात, कोणत्या तरी नव्या सत्यास वा तथ्यास ती आविष्कारीत आहत किंवा नाहीत, या प्रश्नावरच त्याचा चागुलपणा वा टाकाअूपणा ठरणारा आहे पण ते ठरवावयाचे तर त्याना त्याचा पक्ष यथावत् माडू दिला पाहिजे ती नवी वा पुरोगामी म्हणून हुरळूनही जाता कामा नये, किंवा जुन्याविरुद्ध वा अुच्छृखल वाटतात म्हणून त्याची अेकदम मुस्कटदाबीही करता कामा नये जर ती अशी घाटतील तर त्याच्यातील तो अुच्छृखलपणा वा अतथ्य अुघडकीस आणणारे नि जुन्यातील सत्य प्रस्थापित करणारे विरुद्ध साहित्य प्रतिपक्षाने निर्मावे, हाच त्यावर अुपाय साहित्यात दोघानाही स्थान हवे कारण अनेक वेळा नवी मत ही अुपद्व्याप न ठरता जुन्या अपायकारक अधेरात घुसलेली प्रकाशाची नि आरोग्याची किरणेही ठरलेली आहेत ! आज आपल्या साहित्यात नव्यानेच अुगवलेल्या साम्यवादी वा काम्यवादी मताचेही तसेच स्वागत नि तशीच छाननी झाली पाहिजे हा साम्यवादी वा काम्यवादी नवमत चागली की वाअीट याविषयी जे प्रश्न मला विचारण्यात आले आहेत ते साहित्यविषयक असणाऱ्या या अशा निबधाच्या कक्षेबाहेर आहेत तो प्रश्न अर्थ, समाज, काम नि मानस या शास्त्राचाच होय

## साम्यवादी का काम्यवादी ?

त्यातील अेका प्रश्नाचा मात्र साहित्याशी सबध पोचतो मराठी वा कोणतही साहित्य हे कवळ अर्थशास्त्राचा वा केवळ कामशास्त्राचाच प्रपच आहे, यच्चयावत् साहित्याची मुळे भाडवल सत्ता नि श्रमिक सत्ता याच्या विरोधात वा सुप्त नि जागृत कामवासनातच काय ती रुतलेली असतात असा सिद्धान्त जर कोणी माडू लागला तर ता मात्र अेकागी नि अेककल्ली ठरल्यावाचून राहणार नाही, अितके अिथ सागितले की पुरे मनुष्य म्हणजे काही त्याचे पोट नव्हे त्याला अनेक अिद्रिये आहेत, अेकच अिद्रिय नाही त्या सर्व अिद्रियाची, त्याच्या विषयाची नि त्याच्या रसाची क्रिया प्रतिक्रिया विरोध विकास मनुष्याच्या जीवनात साठविला जात आहे तीच स्थिति, त्याच कारणासाठी, त्याच्या साहित्यातही प्रतिबिंबित झाली साऱ्या साहित्याच्या *विश्लेषणाची सोड केवळ धनवान नि निर्धन याच्या किंवा* अुत्पादन साधनाच्या किंवा कामतृष्णेच्या दृष्टिकोनानेच तेवढी करता येणारी नाही यद्यपि त्या विधेयाचे (Points) धागेदोरेही मनुष्याच्या जीवनात लाववर विणलेले आहेत, तरी त्या अेकेरी अेकाच धाग्याने काही ते जीवन वा वाङ्मयीन व्यक्तीकरण जे साहित्य ते विणलेले नाही ज्ञानेश्वरी हा भाडवलसत्तेचा अेक डाव काय तो होता, किंवा बुद्धाचा राज्यत्याग हा साम्यवादाचाच काय तो पुरस्कार होता, किंवा योगसूत्रे ही श्रमिकाना धनिकाचा छळ कळू नये म्हणून जाणूनबुजून खाअू घातलेली अफूची गोळी होती किंवा शकराचार्यांचे महाभाष्य हे

त्याच्या अतृप्त कामवासनाची अेक विकृति काय ती होती, असे समजणे म्हणजे वेदकालातील अग्निपूजेच्या सर्व स्तोत्रांची अुत्पत्ति, भारी भाजण्याला अग्नि अुपयोगी पडतो, या अेकाच अेकांगी सत्याची मात्र ती जाणीव होती, असे समजण्यासारखे अगदी अेकांगी नि अेककल्ली ठरल्यावाचून राहणार नाही.

तरी सुद्धा विरोधविकासवादाच्या दृष्टिकोनातून काही जुनी सत्ये नव्या मांडणीत थाटण्याच्या वा नवी सत्ये जुन्याच्या दृष्टिपथात आणण्याच्या कामी, असा अेकांगी प्रचारासाही अुपयोग होत आहे आणि म्हणूनच सांप्रत साहित्यात पडणारी त्याची भर आपण सर्वांनी प्रथम स्वागतिली पाहिजे आणि त्यासंग त्याची नीरक्षीरविवेकाने छाननी करणारे वाङ्मयही प्रसिद्धीत राहिले पाहिजे. नुसते पावित्र्यविडंबन म्हणून त्यास शापीत राहण्यात अर्थ नाही. कोणा व्यक्तींची वा समाजाची केवळ मानहानि, केवळ अुपमर्द वा केवळ हानि करण्याच्याच दुष्ट बुद्धीने ओंगळ वा असभ्य भाषेत जे लिहिले जाअील तेवढेच वाङ्मय काय ते अनिर्बंधित (बेकायदेशीर) वा अप्रसिद्धेय समजले जावे. या सर्वसाधारण सूचनेपेक्षा या

वैनायक वा मुक्तछंदादि निर्यमक वृत्ताचे महत्त्व मानीत असल्याने आणि ते कार्य मला स्वत पुरते तरी आजच्या परिस्थितीत अगदी दुय्यम-तिय्यम वाटत असल्याने मी त्यात येथे अधिक वेळ घालीत नाही

## साहित्याचे सापेक्ष महत्त्व

आणि आता सरतेशेवटी मला हे सांगितल्यावाचून गत्यंतरच दिसत नाही की, केवळ यमक वा काव्य वा कादंबरीच नव्हे तर स्वत सांगोपांग साहित्य हेही आपल्या आजच्या राष्ट्राच्या परिस्थितीत मला तरी दुय्यम-तिय्यम कर्तव्यच वाटत आहे साहित्यिक सज्जनहो, विज्ञहो, सुज्ञहो ! राष्ट्रातील तुम्ही विज्ञ आहात, सुज्ञ आहात म्हणून मी तुम्हासच विचारतो की, साहित्यासाठी जीवन आहे की जीवनासाठी साहित्य ? जर आपले राष्ट्रीय साहित्य—आणि अशा सामुदायिक संमेलनात साहित्याचा सामूहिक ऊहापोह मुख्य कर्तव्य असणार !— जर आपले सामूहिक, आपले राष्ट्रीय साहित्य हे राष्ट्रीय जीवनाचे अेक अुपांगच काय ते असेल, तर राष्ट्रीय जीवनाचे संरक्षण हीच आपल्या साहित्याची आद्य-चिंता, मुख्य साध्य असले पाहिजे अगदी कलेसाठी कलेचा जो कलावन्त अुपासक आहे वा साहित्यासाठीच साहित्याचा जो साहित्यिक भक्त आहे, त्याच्याविषयीही मला आदरच वाटेल पण असे कलेसाठीच कलेची अुपासना करणार साहित्यिक अेखाद्या नाट्यगृहात नाट्य नृत्यसंगीताच्या भर रंगात अगदी दंगले असतानासुद्धा जर त्या नाट्यगृहास अकस्मात् आग लागली तर कलेसाठी कलेला झिडकारून ते तत्क्षणी त्या आगीतून जीव बचावण्याच्याच मार्गास तडकाफडकी लागतील, का त्या संगीताचा तन्मय ताल धरीत तेथेच डुलत राहतील ? त्याचप्रमाणे राष्ट्राच्या प्राणावरच बेतली असता केवळ साहित्याची कथा काय ?

## परराष्ट्राकडे पहा

आपल्या राष्ट्राची आजची मृत्युंजय मात्रा म्हणजे त्याचे शस्त्रबळ, साहित्य नव्हे ! जपानात प्रत्येक प्राथमिक शाळेत मुलामुलींना प्रथम सैनिक शिक्षण सक्तीने देण्यात येते अलंकारशास्त्राचे नंतर ! आजकाल आयर्लंडात प्रत्येक दैनिकात पहिल्याच पानावर डी व्हॅलेराच्या आज्ञेने मोठमोठ्या अक्षरात प्रसिद्ध करण्यात आहेत— " *Wanted recruits* " ! सैनिक हवेत !— साहित्यिक नव्हे ! ! अिटलीत तर पाळण्यातील मुलांना काय ते सैनिक शिक्षण अद्याप आवश्यक केलेले नाही ! बाकी बालक पायावर चालू लागले की ' बालिरला ' तुकड्यातून त्याला ल्हान बंदूक खांद्यावर घेऊन सैनिक संचलन शिकविले जाऊ लागते तरुणांना मशीनगन्स प्रभृतींची सैनिक तंत्रे !—लघुकथांचा तंत्र नव्हेत ! ऑस्ट्रियाची मरणाची किंकाळी अैकलीत ना गेल्या महिन्यातच ? शेवटच्या प्राणत्याग-पत्रांत त्याच्या

शेवटच्या अध्यक्षाने शेवटचे वाक्य अुच्चारले ! 'We yield under German swords' — not under German sonnets ! आणि आपण ! जपानच्या, रशियाच्या, मुस्लिम राष्ट्राच्या बाँबफेकीच्या वैमानिक हल्ल्याची आगलावी काळछाया ज्या मुवअीवर दाट पसरत चालली आहे, त्या मुवअीत या साहित्य-समेलनातील नृत्यनाटयगीतात रगून गेलो आहोत ! ज्या मुवअीत गल्लोगल्लीत जीर्ण साहित्य, नव साहित्य, पुराण साहित्य, पुरोगामी साहित्य, सयमक मडळे, निर्यमक मडळे यातून राहिलेली आहेत, लक्षावधि तरुण-तरुणी अेक आणा मालेपासून साळा आणे मालेपर्यंतच्या कादवऱ्या वाचण्यात गढून गेली आहेत, — त्या मुवअीत म्हणण्यासारखा रायफल क्लब असा अेकही नाही सबंध मुवअी अिलाख्यात सैनिक कॉलेज ओषधालासुद्धा नाही ! अेक हाताची गुप्ती अेका कॉग्रेसवाल्याजवळ सापडली म्हणून पुण्याला परवा त्याला बदिवासाची कडक शिक्षा कॉग्रेसच्या सरकारने दिली ! सरकार अहिंसक म्हणावे तर, सरकारी लाठीमार नि गोळीबार प्रजेवर मात्र प्रत्यही चालू आहेत ! त्यावाचून सरकार चालू शकणार नाही असे तेच म्हणतात !

## शस्त्रबळ प्रथम, शास्त्रबळ नतर

चीन मेला तो त्यात वाङमयीन साहित्य नव्हते म्हणून मेला नाही—तर सैनिक साहित्य नव्हते म्हणून ! आपले हे अेवढे विस्तीर्ण भारतीय राष्ट्र आज जगतात निर्माल्यवत् जे होअून पडले आहे ते आपले साहित्य अुणे म्हणून नव्हे — शस्त्रबळ अुणे म्हणून ! ही गोष्ट सगळ्या आधी, साहित्यिकहो, तुमच्या लक्षात आली पाहिजे ! सगळ्यात साहित्यिक वर्गच सुज्ञ, विज्ञ असणार ! म्हणून सगळ्या आधी तुम्ही गर्जून अुठा की, आजच्या परिस्थितीत आमचे राष्ट्रीय साहित्य म्हणजे शस्त्रबळ ! शास्त्रचर्चा नव्हे ! जे थोडे साहित्य हवे ते तुम्ही—आम्ही जे चाळिशीच्या वर गेलेले लोक, ते काय ते हवे तर पुरवितील ! माझा हा साहित्यिक निबधसुद्धा त्या पाठीचा कणा वाकलेल्या वाक्पीठ वृद्धापुरताच आहे, शेष जे तरुण, ज्या तरुणी, जी पाठीचा कणा ताठ असलेली पुढची पिढी त्या साऱ्याना माझा या साहित्यपदावरून हाच निर्वाणीचा आदेश आहे की,

## राष्ट्रास आज साहित्यिक नकोत ! सैनिक हवेत ! !

तरुणहो, आमच्या दुर्बळ पिढीच्या देखोदेखी सुनीत नि कादवऱ्या लिहिण्याकरिता लेखण्या सरसावू नका तर त्या जपान, अिटली, जर्मनी, अिग्रज, आयरिश तरुणाच्या देखोदेखी आधी बदुका सरसावा ! आज राष्ट्रीय शस्त्रबळ हे मुख्य कर्तव्य, राष्ट्रीय साहित्य ह तिय्यम ! राष्ट्रसरक्षणार्थ प्रथम रायफल क्लबात घुसा, रडगाण्याच्या नि रडकथाच्या साहित्यसमेलनात नतर, वेळ राहिल्यास !

## जसें राष्ट्र तसे साहित्य

साहित्यासाठीसुद्धा आज साहित्याच्या पोथ्या गुंडाळून सैन्याच्या शिबिराकडे चळले पाहिजे कारण जे राष्ट्र खुरटें, दुबळें, त्याचे साहित्यिक खुरटे नि दुबळेच असणार ज्या दुबळ्या राष्ट्राला परक्याची प्रबळ दारू आग लावते, त्याच्या साहित्यालाही कशी आग लागते तें तक्षशिलेला विचारा, नालंदेला विचारा! मुस्लिम तवारिखा अंटीत सागतात की, खिलजी राजवटीत नालंदा विध्वसिली गेली तेव्हा त्या प्रचंड अेशियाटिक ग्रंथभांडाराला त्यांनी जो आग लावली ती तीन महिने धुमसत होती—हजारो ग्रंथ जळत होते!! अुलटपक्षी, त्याना लिहिता येत होतें की नव्हतें याचा पुरावा धुंडाळावा लागतो, अितके शिवराय होते अेक तुच्छ साहित्यिक! पण म्हणून जर ते युगधर्म न ओळखता सुनीतें रचीत बसते, किंवा नुसतीं रणगीतें खरडतें तर आज मराठी साहित्याची दुर्गति सिंधी, पंजाबी साहित्यासारखीच होती की नाही ते ध्यानात आणा! तिकडे जसा गायत्रीमंत्र-सुद्धा 'अले पे बे'मध्ये अुलटा लिहावा किंवा वाचावा लागतो, तसा महाराष्ट्रातही वाचावा लागता 'ज्ञानेश्वरी' ज्ञानेश्वराच्याच भाअुबदांनी जाळून टाकून हाती कुराणे धरली असती नेवाद्याला ज्ञानेश्वराच्या भिंतीची मशीद करू पाहणारे आजचे मियेंयें मुसलमान पूर्वीचे हिंदुच होते हे विसरू नका! पण युगधर्म ओळखून, शिवाजीने सरस्वतीचे रक्षणार्थच सरस्वतीकडे काही काळ पाठ फिरवून शुंभ निशुंभ-मर्दिनीचीच अुपासना केली, लेखणी टाकून भवानी अुचलली म्हणून तर आज महाराष्ट्र सारस्वत असा काही पदार्थ जिवंत राहिला आहे!

## लेखण्या मोडा, बंदुका अुचला

तुमच्या डोळ्यासमोर तुमच्या विद्यापीठातून श्रीची नि सरस्वतीची विटंबना का? विद्यापीठाच्या दाराशी अष्टायुधधारिणी दुर्गा पहारा देत नव्हती म्हणून! सरस्वतीचा अेक अुपासक या नात्याने मी तुम्हास सांगतो की, आपल्या तरुण पिढीने आता लेखणी मोडून टाकावी आणि बंदूक अुचलावी! साहित्यिक बनू नये तर आधी बनावे सैनिक! मी ज्या ज्या साहित्यसमेलनात अध्यक्ष म्हणून गेलो, त्या त्या ठिकाणी जाताच शरीराच्या सनकाड्या झालेली आमची तरुण मुले, मुली—कोरीकरकरीत कोणती तरी कादंबरी, कथा, काव्य हातात घेअून जेव्हा शेकड्यांनी येता-जाता मला दिसत, त्यात दिवसरात्र तन्मय होताना आढळत, तेव्हा माझ्या हृदयाला खरोखरच चरका बसत आला, अध्यक्षपदी मान लाजेने खाली घालावी लागली वाटे, आपणही या पापाचे वाटेकरी होत आहोत! यास्तव मी आपणास स्पष्टपणे सांगतो की, राष्ट्राच्या आजच्या परिस्थितीत साहित्याचे सापेक्ष महत्त्व तिय्यम आहे आणि तरुण पिढीचे पहिले कर्तव्य आहे सैनिक

शिक्षण—दुसऱ्याला अुपद्रव देणारे नव्हे, नुसते वैमनस्य शिलगविणारे नव्हे पण स्वसंरक्षणाचे नैर्बंधिय (कायदेशीर) कर्तव्य बजावणार, असलेल्या वैमनस्यास आपल्याला अुपद्रव देण्याची छातीच ज्यायोगे होअू नये असे स्वराष्ट्रसंरक्षक शस्त्रबळ आम्हास हवे आहे

## हे मला पाहवत नाही

पुढील दहा वर्षांत सुनीते रचणारा अेकही तरुण न निघाला तरी चालेल. प्रत्यही साहित्य-संमेलने न झाली तरी चालेल, पण दहा दहा हजार तरुण सैनिकांच्या वीर-चमू आपल्या रस्त्यावर नव्यातील नव्या रायफली टाकून, राष्ट्राच्या मार्गामार्गांतून, शिबिराशिबिरातून टप्टप् करीत संचलन करताना दिसल्या पाहिजेत ! ग्रंथालयाअितकी तरी, बौद्धिक कॉलेजाअितकी तरी नगरा-नगरातून सैनिक कॉलेजे गजगजलेली आढळली पाहिजेत ! मग अघूनमधून त्यांनी अेखादी बाखरी वा प्रेमकथा वाचली वा सुनीत लिहिले तरी चालेल नेपोलियनही रणांगणावर करमणूक म्हणून खोळ वाजवी 'दिल्लीच्या बादशहाची दाढी जाळून' आल्यावर पहिले बाजीरावही मस्तानीच्या भेत पुरात अेखादे पान खाताना आढळत ! पण जन्मभर नुसती झाडाची पानच चघळणाऱ्या आणि तमाशातील तबलेच झडत राहिलेल्या दुसऱ्या बाजीरावाचे अेक ब्रह्मावर्तच या राष्ट्राने बनावे—हे मला पाहवत नाही

साहित्यिक हो, आजच्यासारख्या प्रसंगी साहित्यिकाचही प्रासंगिक कर्तव्य हे हेंच होय असे मीच काही म्हणत नाही, तर साहित्यिकाचा सम्राट् जो व्यास तोही म्हणतो की, शास्त्री-साहित्यिकांचा म्हणजेच जो ब्राह्मणाचा वर्ग त्यासुद्धा—

> अमर्यादप्रवृत्ते च शत्रुभिस्संगरे कृते ।
> सर्वे वर्णाश्च दृश्येयु शस्त्रवन्तो युधिष्ठिर ।।

कारण साहित्यापुरते पाहिल तरी हेच खरे आहे की—

> शस्त्रेण रक्षिते राष्ट्रे शास्त्रचिन्ता प्रवर्तते ।।

✦ ✦ ✦

## ३१. युरोपीय महायुद्ध व हिंदु महासभा

"आज मला चुकल्याचुकल्यासारखे होत आहे मी सुटल्यापासून पुण्याला दोनतीनदा आलो आणि त्या प्रत्येक वेळेला सेनापति बापट गायकवाडवाड्यापासून तो मी स्टेशनवर पोहोचेपर्यंत माझ्याबरोबर असत. अेखादे वेळी आम्ही जरा पुढें

गेलो तर ते मागून हाक मारून म्हणायचे 'अरे, अरे, मी राहिलो आहे ना! ज्या मोटारीत सावरकर आहेत, त्या मोटारीत माझी जागा राखून ठेवलेलीच आहे.' माझ्या व्याख्यानाचा विषय त्यांना अनुकूल असो अगर नसो, ते माझ्याबरोबर व्यासपीठावर हजर असावयाचेच, पण आज ते माझ्याबरोबर येथे नाहीत, आज मला पहिल्या प्रथम जर कोणाची आठवण होत असेल, तर ती सेनापति बापट यांची होय. त्यांना अेक वर्षाची सजा झाली आहे अशा प्रकारच्या शिक्षा देऊन देशातील असंतोष कमी होईल अशी जर सरकारची समजूत असेल, तर ती चूक आहे महासभेच्या कार्यकारी मंडळाने या बाबतीत ठराव करून स्पष्टपणे बजाविले आहे की, अशा धरपकडीमुळे देशातील अशांतता जास्तच वाढेल सेनापतींना पाच वर्षांची सजा द्यावी असे सांगण्यात आले होते कारण काय तर त्यांना पूर्वीच्या शिक्षा आहेत. होय आहेत, आणि तेच तर ते कारण आहे की, ज्यामुळे ते आज लोकांच्या अंतःकरणात विराजमान झाले आहेत त्या पुरुषाला स्वदेशासाठी कष्टत असतां अनेकवार शिक्षा भोगाव्या लागल्या त्यांचे माझे मार्ग भिन्न असतील, पण त्यामुळे त्यांचा आमचा विरोध नाही, दोघांचे अुद्दिष्ट एकच आहे मी नाशिकच्या गाडीने निघालो तर ते कल्याणच्या गाडीने निघाले दोघांचेही ध्येय अेकच आहे आणि अशा स्थितीत अेकाला अपघात झाला, तर दुसऱ्याचे हृदय तळमळल्यावाचून रहाणार नाही"

वरील प्रास्ताविक अुद्गारानंतर 'महासभा व महायुद्ध' या विषयाकडे स्वातंत्र्यवीर वळले ते म्हणाले: "हिंदुस्थानच्या सध्याच्या परिस्थितीत, या कोटीकोटींच्या देशात, महासभा काय, राष्ट्रसभा काय किंवा महाराष्ट्र सभा काय यांनी काही योजना आखावी अशी परिस्थिति नाही येअून जाअून काय तर कोणाचा कार्यक्रम पगु याची तुलना करावयाची जन्मजात अंधळ्यांनी आपल्या अंधत्वाची दुसऱ्याच्या अंधत्वाशी तुलना करण्यासारखेच हे आहे या पगूपणाचे आपण सर्वच जण भागीदार आहोत तो पगूपणा घालविण्याचे प्रामाणिक प्रयत्न आपण सर्वांनी केले पाहिजेत, मग ते प्रयत्न फॉरवर्ड ब्लॉक म्हणून करा की बॅकवर्ड ब्लॉक म्हणून होअू द्यात. आपण पगु आहोत याचा अर्थ आपण अुद्योग सोडले पाहिजेत असा नाही. 'पगु लंघयते गिरिम्' असेही घडू शकते हिटलरचेच अुदाहरण घ्या ना वीस वर्षांपूर्वी हाच हिटलर तुरुंगात पडला असताना, देशाची स्थिति पाहून ढसढसा रडत होता असे त्याने आपल्या आत्मचरित्रात लिहून ठेविले आहे तो मनाचा अत्यंत हळवा आहे अनेक वेळा त्याच्या आयुष्यात हे करू की ते करू असे प्रसंग अुद्भवले आहेत आणि त्याला रडू कोसळले आहे. त्याने आत्महत्येचेही तीनदा प्रयत्न केले होते आजचा जर्मनी १२ वर्षांपूर्वी हिंदुस्थानप्रमाणेच पगु होता आज ज्याप्रमाणे महायुद्धाच्या राजकारणाची चर्चा करायची आपल्याला लाज वाटते त्याचप्रमाणे तेव्हाच्या जर्मनीला युरोपीय राजकारणाची चर्चा करायला लाज वाटत

असे पण हिटलरच्या प्रयत्नानी ते राष्ट्र आज वर आले जर्मनीच्या अुदाहरणाप्रमाणे हें राष्ट्र देखील तसेच प्रयत्न करीत गेले तर आज ना अुद्या आपण गिरि लघू शकू. आपल्या राष्ट्राची परपरा पाच हजार वर्षे नुमती जिवत नाही तर नादत आहे, नादत आली आहे

हिंदुमहासभा बोलून चालून अेवढ्याचकरिता प्रवृत्त झाली आहे की, या राष्ट्रात नादत असलेले खर राष्ट्र ज हिंदुराष्ट्र ते कायम राहिले पाहिजे ह धोरण कोणाला आकुचित वाटो पण हिंदुमहासभेचे धोरणच समजले नाही अस मात्र यापुढे कोणालाही म्हणता येणार नाही

मी जगाच्यापुढे मान ताठ करून हीच प्रतिज्ञा घेतली आह या जगात हिंदूचा कोणी वाली असलाच पाहिजे

जगाच्या सगळ्या राजकारणाची कसोटी, सत्याची कसोटी, असत्याची कसोटी, हिंसेची कसोटी, अहिंसेची कसोटी, ही अेकच असली पाहिजे ती कसोटी म्हणजे हिंदूच कल्याण होअील ते सत्य हिंदूचे अकल्याण त असत्य जगताचे काय होअील ? मानव्याचे काय होअील ? हे विचार मुख्य नाहीत ! तेही विचार आहेत पण ते विचार दुय्यम आहत सूर्य गेला तर काय होअील ! सूर्य विझला तर तो विझला म्हणून मला दु ख होणार नाही, तर हिंदूना प्रकाश मिळणार नाही म्हणूनच मला दु ख होअील

आजकाल आपले कल्याण विसरणे हाच न्याय ठरला आह ! स्वत ची माणुसकी विसरणे हच माणुसकीच लक्षण ठरले आहे !

महायुद्धाकडे हिंदुमहासभा अेकाच दृष्टिकोनाने बघते तो म्हणजे महायुद्धामुळे हिंदूचा किती लाभ होअील आणि किती हानि होअील ह पाहणे हा होय राष्ट्रीय सभेच्या वतीने गाधी म्हणाले, लोकशाही राष्ट्रावर सकट आले असताना त्याना अडविणे योग्य नाही, ते सकटात असताना हिंदुस्थानच्या स्वात याचा प्रश्न मला सोडवायचा नाही What is even the freedom of India if Britain and France lose their freedom ? अस गाधी म्हणतात नेहरूही चानमधून नुकतेच परत आले होते त्यानीही नाझीझम प्रभृति हुकूमशाही वादाचा विरोध करणं ह हिंदुस्थानचे अेकमेव ध्यय असल्याच घोषित केल या दोन प्रमुख पुढाऱ्यानी प्रामाणिकपणाने हे धोरण प्रदर्शित केल व त्याचेच प्रतिध्वनि अितराच्या तोडून दूरध्वनिक्षेपित झाले

महासभेने निश्चित भूमिका माडणारा पहिला ठराव या परिस्थितीत केला. चालू युद्ध ह अितर राष्ट्राच्या स्वातत्र्याकरिता चालले आहे, लोकशाहीकरिता चालले आहे, ह युद्ध नैतिक आह ही गोष्ट हिंदुमहासभा अमान्य करते सर्वचजण स्वत च्या सरक्षणासाठी, स्वत च्या राष्ट्राच्या स्वार्थासाठी लढत आहेत दहावा अवतार होअून जगाच्या अुद्धारासाठी काही कोणी लढत नाहीत

जर्मनीने पोलंडवर स्वारी केली तेव्हा प्रे रुझवेल्ट यानी हिटलरला तार धाडून हे कृत्य योग्य नाही असे कळविले होते मीही पण प्रे रुझवेल्ट याना तार करून, हिटलरप्रमाणेच हिंदुस्थानच्या बाबतीत तुम्ही इंग्लंडला तार करा असे कळविले होते त्या तारेवरून तेथील पत्रात अग्रलेखही आले होते महासभेने या ठरावाच्या दुसऱ्या भागात आपले धोरण काय असावे ते सांगितले आहे हिंदुस्थानाच्या बाबतीत व्हाइसरॉय, भारतमंत्री म्हणत आहेत की तुम्ही अल्पसंख्याकांचा प्रश्न सोडवा म्हणजे आम्ही तुम्हाला स्वराज्य देतो—त्यांचे हे म्हणणे वांझेच्या मुलीच्या लग्नासाठी पैसे देतो म्हणण्यासारखेच आहे. पोलंडच्या बाबतीत हिटलरनेही चेंबरलेनला सांगितले की, तुम्ही आधी हिंदुस्थान मुक्त करा, म्हणजे मी पोलंड मुक्त करतो जगामध्ये प्रत्येक राष्ट्र आपल्या लाभासाठी सर्व काही करीत आहे साम्राज्य असलेली राष्ट्रे साम्राज्यरक्षणासाठी, साम्राज्य नसलेली राष्ट्रे ती संपादन करण्यासाठी लढत आहेत नैतिक दृष्टीने तुम्हाला पाठिंबा देण्यास आम्ही बांधलेले नाही तुम्ही तुमचे जीव वाचविण्याकरिता प्रयत्न करीत आहा, आम्ही आमचे जीव वाचविण्याकरिता या चौकटीत (ठरावाच्या) बसत असलो, तर काही सहकार्य करू.

मुसलमानांच्या पाकिस्तानच्या योजना आजच्या नाहीत, त्या १५-२० वर्षांपूर्वीपासूनच्या आहेत किंबहुना त्या अहमदशहा अबदालीच्या काळापासूनच्या आहेत या पाकिस्तानच्या कल्पनेला जे आजचे निश्चित स्वरूप आलेले आहे ते या युद्धामुळे आलेले आहे मी तुम्हाला सांगतो की, या बाबतीत इंग्लिश मुत्सद्द्यांशी बोलणी चालणी होऊन अलिखित करार झालेले आहेत इंग्लिशांची हानि न होईल असा यत्न व हिंदूंची कितीही हानि झाली तरी मुसलमानांच्या मागण्या पुरविण्यात येतील यातून बादशीचे प्रकरण उद्भवण्याचाही संभव आहे

हिटलर कलेपर्यंत पळून पोचला आहे असे पत्र एक घेऊन म्हणतात, दुसरे पत्र फेंके घेतले नाही म्हणून म्हणतात तर तिसरे पत्र कलेपर्यंत पोचला आहे असे म्हणतात. ब्रि मुत्सद्दी लढाईच्या भयंकर पेचात सापडलेले आहेत. या वेळी गांधीजींनी सांगितले, 'हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा प्रश्न दुय्यम आहे' I don't want to embarrass the British कोणाची लढाई आहे? ही काय गांधींची लढाई आहे? He did not like to embarrass the Nizam मग निकडे हिंदूंचे काहीही होवो. व्हाइसरॉयसाहेबांनी आता नुकतीच विजयासाठी प्रार्थना करा असे सांगितले आहे. प्रार्थना करायला मनुष्य केव्हा लागतो? प्रार्थना करायला सांगणे हे काही मोठे शुभ लक्षण नव्हे! आतापर्यंत फॅसिस्टची आठवण कोणालाच नव्हती मला तर फॅसिस्टची कीव येते कारण त्याची ही दोन्ही पोरे आपापल्याला विजयप्राप्ति व्हावी म्हणून त्याची प्रार्थना करीत आहेत. एका कानात तो हिटलरची प्रार्थना ऐकत आहे, त्याच्या दुसऱ्या कानात इंग्लिशांची प्रार्थना शिरत आहे कोणाची प्रार्थना तो ऐकणार! मला वाटते या प्रार्थनेवर फॅसिस्ट काहीच बोलणार नाही, तो स्वस्थ बसेल

युद्धाच्या या परिस्थितीत व्यवहाराला धरून, व गडबडीत फसून जाऊ नये असें धोरण महासभेने आखलें आहे. तें बुद्धिप्रधान आहे. जवाहरलालनी अेकदा सांगितले, या वेळी सत्याग्रह करता कामा नये आणि लगेच पुन्हा दुसऱ्या ठिकाणी ते सांगतात, अिंग्लिशांचें तें काहीही जरी असलें तरी, आमचा स्वातंत्र्यसंग्राम आम्ही सोडणार नाही. अशी स्थिति होता कामा नये.

केवळ हिंदुस्थानच्या सरंक्षणापुरताच महासभेचा महायुद्धाशी संबंध आहे व या संरक्षणापुरता संधि करायला हरकत नाही. केवळ पोथीतले शब्द वाचून राजकारणातील कोडीं सुटत नाहीत. अेखादा मनुष्य काल शत्रु होता म्हणून आज तो शत्रु राहीलच असें नाही किंवा काल मित्र होता म्हणून आज तो मित्र राहीलच असेंही नाही. अशा स्थितीत सांभाळून वेताने मैत्री ठेवावयास हरकत नाही. गेल्या युद्धातील फरान्सचा दोस्त अिटली आज नाही फरान्सच्या विरुद्ध आहे? आणि १९३९ साली रशियाला रोग म्हणून संबोधणारा हिटलर पोलंडच्या प्रश्नावर अेका रात्रीत रशियाचा दोस्त नाही का बनला?

महासभेने आपल्या सहकार्यासाठी पुढे मांडलेल्या अटीत युद्ध संपताक्षणीच वसाहतीचे स्वराज्य मिळालेंच पाहिजे अशी मागणी केली आहे. वसाहतीच्या स्वराज्याची मागणी करणें म्हणजे तुमच्या स्वातंत्र्याच्या वाच्काळ बडबडीला कलंकच नाही का असें कोणी म्हणतील. पण ध्येय व वास्तववाद यात फरक आहे, आणि यात कलंक असला तरी, राजनिष्ठेच्या प्रतिज्ञा घेअून मंत्रिमंडळ स्वीकारण्याच्या कलंकापेक्षा तो खास कमी आहे.

महासभेचे दुसरें मागणें म्हणजे हिंदुस्थानचें अखंडत्व कायम राहिलें पाहिजे. आज पाकिस्तानची चळवळ जिवंत चळवळ आहे. ती संबीर आश्वासनावर आधारलेली आहे. याचा अर्थ खाकसारांच्या फावड्यांनी हिंदुस्थान अुकरला जाअील असा नाही. खाकसारांच्या फावड्यांनी हिंदुस्थान अुकरावयाचा प्रयत्न म्हणजे फावड्यांनी हिमालय अुकरण्याच्या प्रयत्नासारखा आहे. जोपर्यंत हिंदु राष्ट्र अशी कल्पना ज्याच्या मनात आहे असा अेक हिंदु जिवंत असेल तोपर्यंत पाकिस्तान होणें

मुसलमानाना काय पाहिजे हे सागणारे मुसलमान गटातून निवडून येणार आहेत, तर हिंदूना मात्र काय पाहिजे हे सागण्याकरिता स्वतत्र मतदार सघ नाहीत अशा स्थितीत घटनापरिषदेत हिंदूची काय दुर्दशा होअील याची कल्पना करा मुस्लिम लीगचे जे प्रतिनिधि येतील ते पाकिस्तानची मागणी करणार, तर आझाद परिषदेचे मुसलमान येतील त्याचे म्हणणे काँग्रेसने मान्य केले पाहिजे, कारण मुसलमानाना काय हवे हे ठरविण्याचा अतिम अधिकार त्याच्या हाती आहे

या परिस्थितीचा, तुम्ही कोणीही असा, राष्ट्रसभावादी वा सुभाषवादी असा, तुम्हाला जर हिंदु म्हणून जिवत रहावयाचे असेल, तर विचार केला पाहिजे

आज सारखे काँग्रेस आणि लीग, लीग आणि काँग्रेस असे अैक्य येते याचे कारण अेकच, नि ते म्हणजे काँग्रेस आज मत्तेला विरोध करीत नाही काँग्रेसने जेव्हा विरोध केला तेव्हा त्यानी तिला दमडीचीही महत्त्व दिले नाही

गाधीनी चार वेळेला स्पष्टपणे सागितले आहे की, मुसलमानानी पाकिस्तान मागितले तर अशी कोठली शक्ति माझ्याजवळ आहे की मी त्याना अडवू शकेन ! मी स्पष्टपणे सागतो मी गाधीना ती शक्ति दाखवितो ती शक्ति हिंदुमहासभा आहे

मुसल्मानाची पाकिस्तानची कल्पना म्हणजे केवळ पजाब स्वतत्र करावयाचा अशी नाही तर या देशात पजाब, सिंध, बगाल, निझाम अशी स्वतत्र मुसलमान राज्ये स्थापन करावयाची अशी आहे या पाकिस्थानासाठी सर्वस्वाचा त्याग करण्याची घोषणा हुबळीच्या मुस्लिम लीग परिषदेत मुसलमानानी केली आहे

मी कर्नाटकच्या दौऱ्यावर गेलो होतो तेव्हा तेथले लोक म्हणाले, आमच्याकडे हिंदुमुसल्मान काही नाही, सव ठीक आहे त्याच कर्नाटकाच्या मुसल्मानानी हा ठराव केला आहे मी मद्रासमध्ये गेलो तेव्हा तेथेही मुस्लिम लीगची परिषद झाली आणि फझ्लुल हक्कानी सागितले की, मलबार हा अरबस्थानचा भाग आहे तो त्याला जोडला गेला पाहिजे असे आहे काय? होय तर मग मीही आव्हान देतो We shall annex Arabia to Malbar आम्ही अरबस्थानच मलबारला जोडून घेअू वचने कि दरिद्रता ?

शब्दानी मनुष्य कसा फसतो याचे अुत्कृष्ट अुदाहरण गाधींच्या शब्दात सापडते ते म्हणतात ' मी जिनाचे राज्यात सुखाने राहीन कारण, त्याचे राज्य झाले तरी ते हिंदी राज्य आहे हिंदी या शब्दाने कशी फसगत होते याचे हे अुत्कृष्ट अुदाहरण आहे येथे राज्य केलेले औरगजेब वगैरे हिंदीच होते मग त्याच्याविरुद्ध शिवाजी महाराजाना का अुठावे लागले ? आज त्याना कोणी मार्ग चुकलेले देशभक्त Misguided Patriot असे म्हणतात पण महाराष्ट्रात तरी त्याना Misguided Patriot म्हणणारा कोणी नराधम नाही हिंदुस्थानात राहणारे म्हणजे हिंदी असे म्हटले, तर येथले साप, विंचू, वाघ हेही सर्व हिंदीच होतील, पण आपण त्याना तसे मानतो का?

गांधीजींनी सर सिकंदराचे पूर्वज ब्राह्मण होते व त्यांना त्याचा अभिमान वाटतो असे म्हटले होते. गांधींच्या या उद्गारावरून मुस्लिम लीगच्या ईस्टर्न टाईम्स या पत्राने त्यांच्यावर बदनामीची फिर्याद करण्याची चळवळ चालविली आहे. आपण आपल्यावरून भोळसटपणाने त्याची कल्पना करतो. तसे बघितले तर अिंग्लिशही आर्यच आणि हिटलरही स्वस्तिकाचीच पूजा करतो. प्राणिशास्त्रदृष्ट्या सिंह आणि गाय अेकच पण गाय सिंहाच्या पोटात जाते!

अशा स्थितीत रक्ताच्या संबंधाचा काय अुपयोग! औरंगजेब तर रजपुतानी-च्याच पोटचा होता आणि त्याने आपल्या भावाचा शिरच्छेद केला. तेव्हा यात रक्ताचा संबंध नाही. तसे म्हटले तर आपण नाही का दत्तक घेअून त्याला सर्व मालमत्तेचा वारसा देत? तेथे त्यात रक्ताचा संबंध कोठे आहे? मानसिक भाव मानसिक महत्त्व, हेच राष्ट्राचे खरे लक्षण आहे. तो मानसिक भाव, मानसिक महत्त्व हिंदूत आहे. ते मुसलमानात नाही. या परिस्थितीवर अेकच उपाय आहे तो म्हणजे हिंदूंच्या वतीने बोलण्याचा अधिकार हिंदूंच्याच प्रतिनिधींना द्या हे म्हणणे व्हाअिस-रॉयसाहेबाकडून मान्य करवून घ्यावयाचे.

* * *

## ३२. आत्यंतिक अहिंसा हे पाप होय

परवाच काँग्रेसचे अध्यक्ष आझाद यांनी असे उद्‌गार काढले आहेत की, शस्त्राखेरीज कोणतेही राष्ट्र २० तासमुद्धा आपले स्वातंत्र्य टिकवू शकणार नाही. मला आश्चर्य वाटते त्यांनी ही २० तासांची अट का घालावी? मी तर म्हणतो की, क्षणभर देखील टिकू शकणार नाही. परंतु वरील शब्द काँग्रेसच्या अध्यक्षाचे मुखातून बाहेर पडले आहेत, ही महत्त्वाची गोष्ट आहे.

आज देशात गांधीवादी, रॉयवादी, फॉरवर्ड ब्लॉक वगैरे ब्लॉक्स आणि त्यांचे हेडस् आहेत. त्या सर्वांचे धोरण देशाचे वर करावे हेच आहे, हीच खरी मनापासून सर्वांची अिच्छा आहे. परंतु, हे करताना आपले धोरण व तत्त्व कोणते असावे हा महत्त्वाचा भाग आहे, या दृष्टीने मी तर्ककर्कश चर्चा करणार आहे आणि त्या दृष्टीने मी जर व्याख्यानात थोडीफार टीका केली तर ती व्यक्तीवर नसून धोरणा-वर होय. या चर्चेचा अुद्देश व्यक्तीवर टीका करण्याचा नाही हा विवेक अैकणारांनी ठेवावा आणि मीही तो विवेक पाळीन.

## शांतिब्रह्माचा पत्रव्यवहार

आज हिंदुस्थानात जे पक्ष आहेत त्यात अेका बाजूला गांधींचा पक्ष आहे. त्यांनी युद्धाच्या सुरवातीला हिटलरला पत्र धाडून त्याला युद्ध करू नको म्हणून सांगितले. पण त्या वेड्याने ते अैकले नाही. ब्रह्मदेवाचीही बुद्धि तिरपी झाली आणि हिटलरने १५ राष्ट्रे पचनी पाडली हिटलर हा राक्षस आहे असे आपल्याला वाटणे साहजिकच आहे.

साधे दूध पचविण्याची शक्ति आपल्या अंगात नाही तेथे हिटलरने अवघ्या वर्षांच्या आत देश धशात घातले, तर मग आपण त्याला दुसरे काय म्हणणार! परंतु, काही वर्षांपूर्वी याच पधरा राष्ट्रांनी जर्मनीविरुद्ध कट करून जर्मनीची छकले छकले केली होती त्या गोष्टीचा सूड म्हणून त्याने ही १५ राष्ट्रे जिंकली आहेत त्याला पत्र धाडण्याला तुम्हाला तोंड नाही हिटलरला पाठविलेल्या पत्राचा अुपयोग न झाल्याने गांधींनी अिंग्लडला पत्र पाठविले व कळविले की, आपली घरे दारे शत्रूच्या स्वाधीन करून मोकळे व्हा अशी अहिंसा अिंग्लडने आचरली असती तर हिटलरची मारो शस्त्रास्त्रे निरर्थक ठरली असती असे ते म्हणतात, आणि अेका अर्थी त्यांचे हे म्हणणे बरोबरच आहे. हो, रेल्वेचा पास काढून हिटलरला अिंग्लड घेता आले असते तर बरेच झाले असते.

## अुधमसिंग पक्ष

हा झाला अेक पक्ष आणि दुसरा पक्ष म्हणजे सरदार अुधमसिंगाचा. मी पुण्याला यावयाला निघालो तेव्हाच ते फाशी गेल्याचे वाचले

पंजाबमधील २० वर्षांपूर्वीच्या ओडवायर याच्या राज्यसत्तेच्या गोष्टी खरे म्हणजे हिंदूंनी विसरून जायला पाहिजे होत्या पण ह्याने २० वर्षेपर्यंत हा सूड डोक्यात ठेवून, अिंग्लडला जाअून तेथे ओडवायर याना मारले

## रोगी मृत्युशय्येवर नि वाद डॉक्टर-वैद्यांचा !

बाकीचे आम्ही सर्वजण या दोन पक्षांच्या मध्ये घोटाळत आहोत ! अशा परिस्थितीत स्पष्ट कल्पना आल्यावाचून पुढचा मार्ग आक्रमिता येत नाही खरे म्हणजे जिवावरचा प्रसंग आला असताना अशा प्रकारची तात्त्विक चर्चा करण्याची पाळी यावी ही गोष्ट लज्जास्पद आहे 'अेकच प्यालयातील तळीरामाचे अुदाहरण मला येथे आठवते रोगी मृत्युशय्येवर पडला असताना पाश्चात्य वैद्यक चांगले की आर्यवैद्यक चांगले असा डॉक्टर-वैद्य खल करीत बसतात. त्याचप्रमाणे सध्या हिंसा की अहिंसा असा खल चालू आहे! ही वेळ खल करण्याची नसून प्राप्त आपत्तीला तोंड दिले पाहिजे.

अेक घाव नि दोन तुकडे करण्याची वेळ आलेली आहे

## कसोटी

हिंसे-अहिंसेबद्दल काही ठाम अशी सूत्रमय कल्पना आपल्यापुढे मांडावी हा माझा बऱ्याच दिवसाचा हेतु होता हिंसा-अहिंसा, चांगले-वाईट, धर्म-अधर्म, न्याय-अन्याय, नीति-अनीति हे सर्व ठरविण्याचा अेकच सिद्धान्त म्हणजे ज्या योगे मानवजातीचे हित होअील तो धर्म ही कसोटी तात्त्विक दृष्ट्या खरी आणि व्यावहारिक दृष्ट्या सुसंगत अशी आहे

मनुस्मृति, मार्क्स, लेनिन, या सर्वांनी हीच कसोटी धरली आहे. धर्माधर्मांचे विवेचन या अेकाच सूत्रावर केलेले आहे मनुष्यजातीच्या हिताला अिष्ट ठरेल तो धर्म सिंहाने माणसाला खाणे हा सिंहाचा धर्म मग मनुष्याने स्वत ला सिंहाला खाअू द्यावे असा धर्म का नाही ?

धर्म-अधर्म, नीति अनीति या सर्व गोष्टी मानवाच्या दृष्टीने ठरविलेल्या असतात गाय पाळणे हा धर्म तर मग साप पाळणे हा देखील धर्म का होअू नये ? गाय दूध देअून मानवाचे पोषण करते म्हणून आपण गाय पाळतो. अशा प्रकारे सर्व नीतिशास्त्राचे केंद्र मानव हा आहे या सर्व गोष्टींची कसोटी, निकष-पाषाण मानव जातीचे हित हाच आहे या कसोटीवर कोठलेही तत्त्व घासून व पारखून घेतल्याखेरीज मानवाचे अंतिम कल्याण होणार नाही

## विश्वारंभी

जग निर्माण झाले त्या वेळी सुरवातीस मानव प्राणी नव्हता या जगाचे पहिले नागरिक म्हणजे सरपटणारे प्राणी सर्प होत दोन दोन मैल लांबीचे देखील ते प्राणी असत त्यांच्यातही हिटलर, मुसोलिनी असत अुत्क्रांतीचा पुढील टप्पा म्हणजे झाडावर राहणारी व झाडपाला ओरबडून खाणारी गोरिलासारखी माकडें जन्माला आली प्राणिशास्त्रदृष्ट्या पाहिले तर मानव जगायला अगदी असमर्थ आहे शस्त्राचे साहाय्य मानवाने घेतले नसते तर मानव हा पृथ्वीतलावर टिकलाच नसता अितका मानव दुर्बल आहे

आपण अगदी गरीब मनुष्याला गाय म्हणून म्हणतो, पण गाय आणि मनुष्य यांची जर झोंबी लावली, तर शिंगांजवळ शिंगे असल्याने ती त्याला शिंगाने भोसकून ठार करू शकेल. हो, मात्र त्या मनुष्याजवळ काठी अगर चरखासुद्धा थमता कामा नये. न जाणो जिवावर बेतले म्हणजे तो चरखा फेकून मारावयाचा !

## शस्त्रसाधनेला आरंभ

शरीरदृष्ट्या मानवाजवळ जे नव्हते ते त्याने अुपन्न करण्याचा प्रयत्न केला. मानवाने निर्माण केलेली तलवार ही त्याच्या नखासारखी आहे आणि तलवार हातात घेतल्यावर तो सिंहालासुद्धा भारी झाला माकडसुद्धा धोंडा मारायला शिकून सिंह हत्ती यापासून अरण्यात आपला बचाव करते म्हणजे धोंडा हें माकडाचे शस्त्र झाले

माकड जर अहिंसक झाले असते तर सापं-हत्ती व्याघ्र-सिंहांनी त्यांचा केव्हाच फडशा पाडला असता मग कोठला मानव-प्राणी निर्माण होता ? कारण मानव हा माकडापासूनच निर्माण झाला असं उत्क्रांतिशास्त्र म्हणते परंतु, त्या माकडाला कोणी आत्यंतिक अहिंसक भेटला नाही, हें मानवजातीचें भाग्यच होय घोड्यामुळे माकड सरक्षण करू लागले, परंतु, मानव हा प्रगतीचा नैसर्गिक भोक्ता असल्याने त्याने निरनिराळे शोध लावले त्याला कच्चे मांस पचेना म्हणून त्यानें उखळ, मुसळ, अग्नि वगैरे निर्माण केली, हीं अेका प्रकारे शस्त्रेच होत आपण जे अन्न खातो त्यामध्ये वनस्पतींची हत्या होतेच ना म्हणून ब्राह्मणांनी वैश्वदेव करावा असा दंडक घातला गेला कारण उखळ, मुसळ यामध्ये कांडताना अनेक जीव-जंतूंची हत्या झाली असेल त्या पापक्षालनार्थ वैश्वदेव केला परंतु वैश्वदेव करताना अग्नि पेटविला त्या वेळीही अनेक जीवजंतु मेलेच असतील ना ? तेव्हा निर्भेळ व आत्यंतिक अहिंसा अशक्य आहे हेच सिद्ध झालें

अहो, ढेकूण चावतात त्यांना मारल्याखेरीज गत्यंतर नाही त्यांचेपुढे मनु-स्मृति वाचून चालणार नाही आत्यंतिक अहिंसा हे खूळ जगात टिकणें अशक्य आहे असेंच सिद्ध होतें हा प्रयोग गांधी नवीनच करतात असं नव्हे अनेक महान् महान् थोर पुरुषांनी हे प्रयोग केले, परंतु, ते त्यांनी राष्ट्रावर केले नाहीत

## जैनांचे दंडक

'अहिंसा परमो धर्मः' असा आदेश देणाऱ्या जैनांचीही राष्ट्रें होती त्यांच्यात शूरपुरुष होते त्यांनीही अहिंसेला बंधन घातले होते, आणि व्यवहारात राष्ट्ररक्षण व आत्मनाश टाळण्यासाठी हिंसेला परवानगी दिली होती त्या सर्वांना हेंच आढळून आलें की, आत्यंतिक अहिंसा अशक्य आहे गांधींचा हा प्रयत्न पहिलाच नाही त्यांच्या पूर्वीच्या लोकांनी तो अशक्य म्हणून ठरविला होता अशा स्थितीत गांधींचा हा प्रयत्न वेडगळपणाचाच आहे चुलीवर भात शिजतो हे माहीत असताना बुभुक्षित मनुष्य आला असताना त्याला सांगावयाचे की, थांब चंद्रज्योतीमध्यें तांदूळ शिजतात की नाहीत याचा मी प्रयोग करीत आहे त्यांनी हे असले प्रयोग पाहि-जेत तर स्वतःवर करावे

## बुद्धि सुचते

परंतु, इतके कशाला ? स्वतःवर प्रसंग आला म्हणजे बुद्धि सुचते नुकताच वर्ध्याच्या आश्रमात कोल्हा पिसाळला तेव्हा त्याला गोळी घालण्यात आली याच वेळी हिटलर पिसाळला म्हणून इंग्लंडला जें पत्र धाडण्यात आलं त्यात मात्र अहिंसापालनाचा उपदेश केला गेला !

साबरमतीच्या पांजरपोळात अेक कुत्रा पिसाळला. त्या कुत्र्याला मारावा असा सल्ला गांधींनी दिला; म्हणजे येथे तारतम्य आलें. दहा हिंसा टाळण्याकरिता अेक हिंसा करणें योग्य ठरलें.

## प्रयोग-क्षेत्राची मर्यादा

आपण स्वतःवर हवे तेवढे प्रयोग करा; परंतु, प्रयोगाकरिता आपण जेव्हा अेक राष्ट्र घेता तेव्हा त्या गोष्टीचा समाचार घेतलाच पाहिजे. आपल्या प्रयोगाकरिता राष्ट्र निर्माण झालें नाही. तुम्ही प्रयोगाकरिता राष्ट्र घेता आणि तें हिंदुराष्ट्र घेता, अिंग्लंड किंवा अितर कोठलें राष्ट्र कां नाही घेत प्रयोगाकरिता ?

आपणांला प्रयोग करावयाचे असतील तर ते अवश्य करा. पण, त्याकरिता राष्ट्राचा खेळखंडोबा करूं नका. असल्या या साहसाचें कौतुक करण्यापेक्षा तीव्र निंदा करणेंच श्रेयस्कर ठरतें.

रोजच्या खाण्यात आपण कितीतरी हिंसा करतो. पूर्वी श्राद्धाला मांस करावें अशी रूढि होती. पुढे ब्राह्मणांतही हिंसक आणि अहिंसक असे पक्ष पडले. आणि अेक गोष्ट आहे की, अेका अहिंसक ब्राह्मणाने श्राद्धाच्या दिवशी हिंसक पक्षाच्या अेका ब्राह्मणाला जेवायला बोलाविलें. पानावर मांस नाही असें पाहून तो म्हणाला श्राद्धाला मांस कोठे आहे ? तेव्हा अहिंसक पक्षाच्या ब्राह्मणाने अुत्तर दिलें 'आम्ही अहिंसक आहों ! खीर केली आहे.' तो ब्राह्मण म्हणाला, 'बरें आहे तर खीर आणा. खीर वाढली गेली आणि त्याने त्या खिरीवर पाणी शिंपडताच त्याच्या तपःसामर्थ्याने खिरीच्या प्रत्येक कणाकणातून आळचा बाहेर निघाल्या. व त्या ओरडून म्हणू लागल्या 'आमची हिंसा होत आहे, आमची हिंसा होत आहे.'

## वनस्पतीच्या प्रत्येक कणात चेतना व बीज आहे.

त्या बीजाचें झाड होअून त्याला फुलें यावीत हा निसर्गाचा हेतु आहे आपण खातो तेव्हा देखील काय थोडी हिंसा होत असेल ! अन्न खात नसाल तर अरबस्थानातील खजूर आणि काश्मिरची द्राक्षें खात असालच ना, पण तरी देखील हिंसा झालीच ना !

आत्यंतिक अहिंसा पाळावयाची म्हणजे मला श्वासोच्छ्वास करता येणार नाही, खाता येणार नाही, पिता येणार नाही, फार काय अुभें राहता येणार नाही, बसता येणार नाही. सचेतन देहाची कोठलीही हालचाल झाली तरी त्यात हिंसा झाल्याखेरीज राहणार नाही. अितकी ही आत्यंतिक अहिंसेची कल्पना हास्यास्पद आहे; अितकेंच काय पण पापण्या अुघड्या ठेवून जगणें देखील अशक्य होअील !

## अेक दृष्टान्त

देवळात देवाकडे पाय करून अेक संत निजले असताना देवाचा पुजारी तेथे आला तो म्हणाला, 'अहो हे काय ? हा देवाचा धडधडीत अपमान आहे' तेव्हा संताने पूर्व दिशेकडे पाय केले तेव्हा दुसरा म्हणाला, अहो हा सूर्याचा अपमान आहे, त्याने तिसऱ्या दिशेकडे पाय केले तेव्हा असाच तिसऱ्या अेका देवाचा अपमान झाला अखेरीस तो संत डोके खाली करून पाय वर करून गरगरा चकरा मारू लागला. तेव्हा सर्वच जग ओरडले, आता हा सर्वच देवाचा अपमान होत आहे ! अखेरीस तो संत म्हणाला, आता माझे पाय कापून ठेवा, त्याखेरीज दुसरा अुपाय मला दिसत नाही

आपणाला काटेकोर अहिंसेने चालण्याचा प्रयोग करावयाचा असेल, तर या पुणें म्युनिसिपालिटीत ठराव करा को, पुण्यात वाघ, साप, विंचू काहीही मारावयाचे नाही हा प्रयोग केलात तर १ वर्षाच्या आत पुण्यात मनुष्य दिसणार नाही. सर्वत्र वाघ, सिंह, साप, विंचच दिसतील आणि सांगतो जर का तुमच्या या दुगणांची माहिती अेखाद्या वाघाला लागली तर तो येथे येअून दिवसाला अेक पेठ या हिशो-बाने तुमच्या काय पेठा असतील तेवढया दिवसात सारे पुणे माफ करून टाकील

## सृष्टीचे स्वरूप

अीश्वराने जगाची रचना करताना ती निव्वळ हिंसेवर केली नाही की आत्यंतिक अहिंसेवर केली नाही या दोघांची गुंफण घालून त्याने सृष्टीची रचना केली आहे. आत्यंतिक अहिंसा ही जगाची स्थिति नव्हे व तत्त्व तर नव्हेच नव्हे. आअी मुलाला पाजते म्हणजे त्याला आपले जीवन देते मूल आजारी असले तर आपल्या जिवाची पर्वा न करता त्या मुलाची जागून करते, तेव्हा काही तिला हा मुलगा पुढे मोठा होअील आणि आपले पांग फेडील अशी कल्पना नसते हे प्रेमतत्त्वही जगात असते

मी स्वत सृष्टि कशी आहे याची पुढीलप्रमाणे कल्पना करतो मी जर चित्रकार असतो, तर मी सृष्टीचे चित्र असे रंगविले असते

हरिणबालकाचा वध करून रक्ताने माखलेल्या जिव्हेने वाघीण आपल्या पिलांकडे येत आहे ती पिले तिला बिलगून दुग्धप्राशन करीत आहेत, आणि वाघीण रक्ताने भरलेले आपले तोंड जिभेने साफ करीत आहे. सृष्टि ही अशी आहे. अेकीकडे ती वाघीण आपले जीवन म्हणजे दूध पिलांना देता यावे म्हणून दुसरीकडे हरिण-बालकाची हत्या करून त्याचे रक्त पीत आहे अेकावर प्रेम करता यावे म्हणून दुसऱ्याची हिंसा करीत आहे हिंसा व अहिंसा यांचा समन्वय साधणारे हे चित्र आहे

## भ्रामक समजूत

काँग्रेस म्हणते, गांधींना त्यांचा मार्ग आचरण्यासाठी आम्ही मुक्त केले आहे. पण, याचा अर्थ असा होतो की, आपण काही तरी कमी आहोत आणि ते कोणी तरी मोठे आहेत जो अव्यवहार्य, जगापेक्षा काही विपरीत सांगेल तो सत हो आपल्यातील कल्पना टाकून द्या हे असे सांगणारे लोक महात्मे तर नाहीतच नाहीत, पण ते दुरात्मे तरी असले पाहिजेत नाहीतर भ्रातात्मे तरी असले पाहिजेत. आज २० वर्षांत फाशी गेलेल्या देशभक्तांबद्दल सहानुभूतीचा शब्द उच्चारण्याची यांना छाती झाली नाही शिवाजी, प्रताप यांना वाट चुकलेले देशभक्त म्हणून संबोधिले अुदीर कुरतडील या आत्यंतिक अहिंसेने आम्ही वागलो असतो तर घरातील अुदरांनी आम्हाला कुरतडून नाहीसे केले असते आत्यंतिक अहिंसा हे पाप ज्या कसोटीवर ठरते त्याच कसोटीवर आत्यंतिक हिंसाही पाप ठरणार आहे तेव्हा सुजानो आत्यंतिक अहिंसेच्या व आत्यंतिक हिंसेच्या अुपदेशाची वृत्ति आता मारण्याची वेळ आली आहे तुम्हीच हे अितके दिवस सहन करुन गप्प बसलात, यापुढे बाअिटाला बाअीट म्हणण्याची धमक तुम्ही दाखविली पाहिजे.

ज्याप्रमाणे आत्यंतिक अहिंसा हे पाप आहे, त्याचप्रमाणे आत्यंतिक हिंसा हे देखील अेक पाप आहे आत्यंतिक अहिंसेने मानवसमाजाने परस्परांना खाल्ले नाही तरी अितर वन्यपशु मानवजातीला खाअून टाकतील, तर आत्यंतिक हिंसेने मानव समाजच राहणे कठीण होअील

## पुण्याला आल्यावर अक्कल सुचली

आता राष्ट्राच्या रक्षणाकरिता अहिंसेचा त्याग करण्यास काँग्रेस सिद्ध झाली आहे. पूर्वी हिंदुस्थानला बाहेरचा कोणीच शत्रु नाही असे सांगत होते आणि आता पुण्याला आल्याबरोबर हिंदुस्थानवर शत्रु तुटून पडायला लागलेले त्यांना दिसले! राजकारणात आत्यंतिक अहिंसा हे वेड आहे हे त्यांना आता पटू लागले आहे–आत्यंतिक अहिंसा हा धर्म नसून तो अधर्म आहे माझ्या राष्ट्राच्या, समाजाच्या व मानव्याच्या नाशास जे कारणीभूत होते ते कधीच धर्म्य होअू शकत नाही

मारले त्याला आपण कसवध म्हणतो, ती काही कसहत्या नाही जेथे मरणे अिष्ट असते तेथे मारून मरावे हेच योग्य.

## हे महात्मेपण नव्हे

आत्यंतिक अहिंसेची राष्ट्राला शिकवण देणे हे महात्मेपण नव्हे, हे मूर्तिमंत पाप आहे लो टिळकानी गांधीना लिहिलेले अेक पत्र आता प्रसिद्ध झाले आहे या पत्रात लो टिळक म्हणतात की, व्यवहारामध्ये आत्यंतिक अहिंसा ही शक्य आहे, पण, मी म्हणतो याच्याही पुढे गेले पाहिजे आत्यंतिक अहिंसा ही केव्हाही अिष्ट अशी अवस्था नाही, ते पाप आहे. आत्यंतिक अहिंसेचे खूळ पिकवून राष्ट्राला भ्रमात ठेवणे हे महात्मेपण नव्हेच, त्याना पाहिजे तर दुरात्मा किंवा भ्रातात्मा म्हणा

*अहिंसक असा बुद्धाला सुद्धा मृतमांस खाण्यास हरकत नाही अशी परवानगी* आपल्या शिष्यवर्गाला देण्याची पाळी आली आणि याच मृतमांस खाण्याच्या कल्पनेचा अवशेष मुसलमानांच्या हातून मांजडे खाण्याच्या प्रथेच्या रूपाने कायम आहे आपल्याकडील संत तुकाराम यानीसुद्धा अहिंसेचे फार गोडवे गायिले आहेत. पण त्यानीसुद्धा 'सर्प विंचू नारायण । परि वंदावे दुरून ' असेच सांगितले आहे तेंसुद्धा विंचवाची दया करीत नाहीत आपल्याकडचे विंचू काळे असतात, पण रशिया वगैरे पाश्चिमात्य राष्ट्रातील विंचू काही पांढरे, काही तांबडे असतील असा विंचू जर राष्ट्राच्या देव्हाऱ्यात आला तर त्याच्याशी तुकारामबुवा म्हणतात त्याचप्रमाणे

> विंचू देव्हाऱ्यासी आला । देवपूजा नावडे त्याला ।
> तेथे पैजाराचे काम । अधमासी व्हावे अधम ॥

*या न्यायाने वागले पाहिजे*

—दि २ ऑगस्ट १९४०, पुणे-

* * *

# ३३. राष्ट्ररक्षणासाठी केली जाणारी हिंसा पुण्यकारक होय

ज्यानी मला वचन देऊन येथे आणले ती वचने शतपटीनी पुरी झाली आहेत असे मला वाटते सबंध हिंदुस्थानभर लक्ष लक्ष नागरिकांच्या सभा भरतात, कलकत्त्यासही विराट सभा भरतात पण आजचा समाज पाहून मला अतिशय आनंद झाला आपण माझ्या कार्याचा उत्साह वाढविला आहे पैसे किती दिले हा महत्त्वाचा प्रश्न नाही हिंदुमहासभेचा अध्यक्ष, हिंदु धर्मासाठी नि भगव्या ध्वजासाठी झुजणारा अेक सैनिक म्हणून मी येथे आलो असताना आपण माझे भाषण अैकण्यास अगत्यपूर्वक आलात यातच मला लाखो रुपये मिळाल्यासारखे आहेत

## काग्रेसमध्ये तरी हिंदुत्व का असू नये ?

हिंदुस्थान हिंदूचा राहिला पाहिजे व हे तत्त्व अढळ राहिले पाहिजे असे म्हणणारेच लोक बहुशी आजच्या सभेस अुपस्थित राहिले आहेत कारण तसे त्याना ते पूर्णाशाने किंवा बहुशी पटले नसते तर माझे तोंड पाहण्यास ते आलेच नसते हिंदुत्वाचे नाव घेणे तीन वर्षापूर्वी पाप होते आज ते पुण्य आहे किंवा नाही हे जरी सागता आले नाही तरी पाप तरी खास नाही आज काँग्रेस ही राष्ट्रीय संस्था म्हणतात पण त्यात सुद्धा शेकडा ७५ लोक असे म्हणणारे आहेत की हिंदुस्थानात रहावयाचे तर हिंदु म्हणूनच राहू, नाही तर काँग्रेस सोडून जाअू मुन्शीचे अुदाहरण आपल्या डोळ्यापुढे ताजे आहेच तत्त्वाच्या दृष्टीने गोष्टी अशक्य होअू लागल्या म्हणून त्यानी सभासदत्वाचा त्याग केला काँग्रेसमध्ये तरी हिंदुत्व का असू नये ? हिंदु काही लायकीपेक्षा अधिक मागत नाहीत पण आता मात्र आम्ही थोडेही सोडणार नाही राष्ट्रीयत्व सोडणे म्हणजे नामर्दपणा आहे हिंदुमहासभेच दुसरे काही म्हणणे नाही काँग्रेस हिंदूची आहे असे जिना म्हणतात, हे सत्य आहे यात लाजावयाची गोष्ट काय आहे ? काँग्रेसची प्रतिष्ठा वाढविली हिंदूनी, सत्याग्रह केला हिंदूनी, स्वार्थत्याग केला हिंदूनी, तुरुंग भोगले हिंदूनी व आत्मयज्ञ केला हिंदूनीच ! या वेळी दुसरा कोणी आला नाही !!

## हिंदुत्व असेल तरच सर्व ग्राह्य

आज नाही अुद्या आपण सर्व सत्याला सादा लावून रहू असा आत्मविश्वास वाटतो काँग्रेस ही संस्था आहे, ती जात नव्हे, धर्म नव्हे पण हिंदुत्वाची गोष्ट निराळी आहे हिंदुत्व म्हणजे आई, बाप, नद्या, जीवन तत्त्व सर्व त्यात सामावलेले आहे हिंदुत्वाला काँग्रेस ही साहाय्यभूत झाली तर पुढेही काँग्रेस राहीलच हिंदुत्वासहित आम्हास काँग्रेस चालेल हजारो काँग्रेस आम्ही मोडू, हजारो ब्रह्मदेव सोडू, पण हिंदुत्व सोडणार नाही असा आमचा अढळ निश्चय आहे !

## हिंसा श्रेष्ठ की अहिंसा श्रेष्ठ

आजचा विषय करमणुकीचा किंवा तात्त्विक चर्चेचा म्हणून मी व्याख्यानासाठी घेतलेला नाही राष्ट्राच्या दृष्टीने हा अत्यंत महत्त्वाचा असा विषय आहे अहिंसेचा विचार जैनाचार्यांनी व बुद्धानी सखोल रीतीने केला व तो आचारातही आणला आहे जपानपासून मेक्सिकोपर्यंत तीन चार हजार वर्षांपूर्वीपासून याचा अभ्यास चालला आहे मी काही नवीन सांगत नाही विषय जुनाच आहे सर्वांच्याच मतानं आत्यंतिक हिंसा ही निंद्य असल्याने हा काही गूढ प्रश्न नाही पण हिंदुस्थानात चांगल्या गोष्टींबरोबर वाईट गोष्टीही उत्पन्न होतात असा अनुभव आहे अहिंसा सत्य की हिंसा सत्य हा प्रश्न आज आपणास भेडसावू लागला आहे अर्जुनालाही मागे हा प्रश्न पडला होता पण ती भावाभावाची लढाई असल्याने असा प्रश्न पडणं साहजिक तरी होते पण आजची स्थिति तशी नाही ज्यांचा आपणाशी काहीच संबंध नाही अशा लोकांचा विचार करताना 'हिंसा श्रेष्ठ की अहिंसा श्रेष्ठ' हा प्रश्न उत्पन्न करणं मूर्खपणाच आहे अनंतकाल याची चर्चा झालीच आहे आज हिटलर जपान हिंदुस्थानाजवळ येऊ पाहात आहेत इतकेच तर आणखी आहे आपल्या देशातही ढाक्का अहमदाबाद व मुंबईचे प्रकार होतच आहेत आणि अशी स्थिति असताना 'हिंसा श्रेष्ठ की अहिंसा श्रेष्ठ' हा प्रश्न आता का? पूर्वी प्रभु रामचंद्राला असाच प्रश्न पडला होता पण वसिष्ठांनी तत्त्वबुभुक्षितेबद्दल त्याचा धिक्कार केला 'तुझी पट्टराणी शत्रूने पळवून नेली असता सुद्धा हा भ्याडपणाचा विचार सुचतो कसा ?' असा वसिष्ठ मुनींनी प्रश्न केला रामाला त्यामुळे चीड उत्पन्न झाली, त्याची वीरवृत्ति जागृत झाली व रावणाला मारून आल्यानंतरच योगवासिष्ठ सांगण्याविषयी रामाने वसिष्ठाला सांगितले ही योगवासिष्ठाची भूमिका आहे आज हीच हिंदुस्थानची स्थिति झाली आहे तरुण दसाल हिंसा श्रेष्ठ की अहिंसा श्रेष्ठ याची चर्चा करू लागले आहेत रामाप्रमाणेच आपल्यातही वीरवृत्ति जागृत झाली पाहिजे अशा परिस्थितीत तात्त्विक नव्हे पण व्यावहारिक ठाम निश्चय केला पाहिजे

## आत्यंतिक हिंसा अशक्य व पाप आहे

या बाबतीत माझा पहिला सिद्धान्त असा आहे की, आत्यंतिक अहिंसा अशक्य आहे दुसरा सिद्धान्त असा आहे की, आत्यंतिक अहिंसा पाप आहे हा पाया माझा पूर्वपक्ष आपल्या देशातले तीनही धर्मपंथ म्हणतात की सापेक्ष अहिंसा पुण्य आहे निरपेक्ष अहिंसा हे पाप आहे मनुष्यजातीच्या एकंदर हितास जे कारणभूत होते ते चांगले व पुण्य आणि जे अहितास कारणीभूत होते ते पाप या निकषावर आपण अहिंसा पुण्य का पाप हे पाहिले पाहिजे व या दृष्टीने आत्यंतिक अहिंसा हे पाप आहे असे आपणास सिद्ध करता येईल

घ्यावा की, हिंदुमुस्लिम अेकी हिंदुमहासभेच्या तत्त्वानेच लवकर होअील नि तीही मानाची असेल.

शिवाजी नि गुरु गोविंदसिंग याच्याकाळी जी अखिल हिंदुत्वाची भावना नव्हती आणि जी निर्माण करण्यासाठी हिंदु महासभेने आतापर्यंत भगीरथ प्रयत्न केले ती भावना कोणत्याही हिंदुविरोधी शक्तीला अुच्छेदिण्याअितकी आता प्रबळ झाली आहे तुरुगातही सधन प्रतिकारक सर्व विशेष सोयींचा त्याग करून अितर सर्व हिंदूप्रमाणेच समानतेने वागले हिंदूवरील अन्यायाची वार्ता अैकून सताळाची मोठी जमात भागलपूरकडे निघाली होती पथभेद, प्रांतभेद, हे सर्व नद्या ज्याप्रमाणे अेका समुद्राला मिळतात, त्याप्रमाणे हिंदुत्वाच्या मानासाठी या धर्मयुद्धात विलीन झाले होते. पण हे सर्व झाल्यानतर आपण हे विसरता कामा नये की, असले लढे हे *भविष्यकाळातील राजकीय रणांगणावर लढल्या जाणाऱ्या विराट् स्वातंत्र्ययुद्धाचे* केवळ प्रातिनिधिक आहेत. आज आपण नि शस्त्र आहोत अेक दिवस असा येअील –नि तो दिवस आतराष्ट्रीय योगायोगामुळे तुम्हाला कल्पना करवणार नाही अित-क्या त्वरेने जवळ येत आहे–की सशस्त्र होअून आजचे प्रतिकारक, सेनापति होअून सशस्त्र युद्धातही शत्रूचा पाडाव करनीलच करतील जगाच्या नव्या नकाशावर *अिंग्लिशांकरिता अिंग्लड, जर्मनीकरिता जर्मनी त्याप्रमाणे हिंदूकरिता हिंदुस्थान हा* देश निश्चितीने राखला जाअील !

—चौपाटी, ता १८ १–४२

✦ ✦ ✦

# प्राचीन यहुदी योषिता

## (लेखांक १ ला)

स्त्री मासिकात मागे आम्ही मनुस्मृतीतील महिला हा लेख लिहून त्यात सरासरी तीन हजार वर्षांपूर्वी आपल्या आर्य स्त्रियांची राहणी, समाजातील स्थान, अवस्था नि वागणूक कशी असे ते दाखविले होते.

त्याच प्राचीन काळी आपल्या आर्य स्त्रीप्रमाणेच भारताबाहेर पॅलेस्टाईन, सिरिया प्रभृति प्रांतातून निवसणाऱ्या दुसऱ्या अेका प्रख्यात जातीतील अिस्रायल या यहुदी राष्ट्रातील स्त्रियांची वागणूक कशी असे, स्त्रीविषयी त्या तीन चार हजार वर्षापूर्वीच्या भारताबाहेरील राष्ट्रांच्या काय कल्पना, भावना नि निर्बंध असत, स्त्रीविषयक त्यांची नीति कशा प्रकारची असे, ती माहितीही सामान्य महिला वाचकांना मनोरंजक नि विदुषी महिलांना तर अभ्यसनीयही वाटल्यावाचून बहुधा राहणार नाही. त्याविना तीनचार हजार वर्षांपूर्वी आर्य महिला कशी असे, हे ज्यांनी वाचले असेल, त्यांना त्याच काळी आर्येतर महिलांचीही भारताबाहेर काय अवस्था नि नीतिमत्ता होती ते जाणण्याची अुत्कंठा सहजच वाटणार. त्या दृष्टीने मनुस्मृतीतील महिला या लेखाचा हा 'यहुदी योषिते'वरील आजचा लेख अेक पूरक अुत्तरार्धच होणार आहे.

मनुस्मृतीतील महिलेची रूपरेखा आखताना ती तुटक तुटक निर्बंधाच्या रूपानेच आखणे भाग होते. कारण, मनुस्मृति हे काही कथानक नसून तो अेक निर्बंध ग्रंथ (लॉ बुक) आहे. तीत नुसते निर्बंध, नियम, विधिनिषेध तेवढे क्रमवार दिलेले आहेत. परंतु ही यहुदी योषितेची जी रूपरेखा या लेखात आखावयाची आहे, तिला मुख्य आधार अेका कथानकमय धर्मग्रंथाचाच असल्यामुळे प्राचीन यहुदी योषिता कशी असे तें अेका मनोरंजक कथानकातून वर्णावयाचे. अेखाद्या आख्यानमालेतल्या सोप्या नि सरस गोष्टी सांगता सांगताच समजून देण्याची सोय अनायासेच होणारी आहे.

यहुद्यांचा हा प्राचीन धर्मग्रंथ आपल्या वेदांसारखाच अीश्वरी संदेश समजला जातो. अब्राहाम, मोझेस प्रभृति अीश प्रेषितांना देवाने स्वत सांगितलेल्या आणि काही स्फूर्तविलेल्या आज्ञा त्यात दिल्या आहेत. तसाच सृष्टीच्या अुत्पत्तीपासूनचा अिस्रायल — यहुदी — लोकांचा नि ह्या त्यांच्या अीशदूतांचा अितिहासही त्यातच आहे. त्या अितिहासावरून नि त्या आज्ञावरूनच प्राचीन यहुदी योषितेची मूर्ति आपणास घडविता येते. ह्या धर्मग्रंथास जगातील आज अुपलब्ध असलेल्या यच्चयावत् धर्मग्रंथामध्ये वेदांच्या खालोखालचे महत्त्व दिले पाहिजे

यहुद्याचा हा 'जुना करार' नावाचा धर्मग्रंथ त्याच्या परंपरेच्या कालगणने प्रमाणेच अि स पूर्वी ८००० वर्षांच्या अितिहासापासून तो खिस्ती शकाच्या आरंभापर्यंतचा वृत्तान्त देणारा आहे, असं ते मानतात अैतिहासिक दृष्टचाही तो ३००० वर्षांचा तरी असलाच पाहिजे. त्यात अितर कोणत्याही प्राचीन धर्मग्रंथा-प्रमाणे प्रक्षिप्त वा प्रलुप्त भाग ह असणाराच पण अेकदर ग्रंथ असा अितक्या प्राचीन कालाचाच आरसा आह ह नि संशय अितक्या प्राचीन काळची यहूदी यापिता कशी असे नि स्त्रीजातिविषयक कल्पना नि वागणूक त्या प्रसिद्ध राष्ट्रात कोणती होती त दाखविणारे मूळचे काही श्लोक नि त्याच्या संदर्भापुरत कथानकातील वेचक श्लोक याच भाषातर या लेखात देत आहोत त्या कालच्या त्या राष्ट्राच्या अितिहासास हा अेकच ग्रंथ खास आधार आणि अनन्य असं मुख्य साधन आहे जगातील अति प्राचीन धर्मग्रंथातील अेका धर्मग्रंथाची ताडओळखही त्यायोगे, अभ्यासू विदुषींना अनायासेच होअील

ह्या 'जुन्या करारा तील पहिला विभाग 'सृष्टयुत्पत्ति' (Genesis) हा होय त्याच्या पहिल्याच अध्यायात स्त्रीची अुत्पत्ति कशी झाली त्याविषयीची दिलेली कथा अशी —

## स्त्रीची अुत्पत्ति

अगदी आरंभी अीश्वरान आकाश नि पृथ्वी निर्मिली पृथ्वी आकार नसलेली अेक पोकळी हाती अगाध समुद्र अंधारात गुरफटलेला होता त्या जलावर अीश्वरी तेज तळपल दव म्हणाला 'प्रकाश पडा!' आणि प्रकाश पडला दवान पाहिल नि प्रकाश त्याला आवडला त्यान प्रकाशास अंधेरापासून वगळे केल, आणि दवान प्रकाशाला दिवस म्हटल नि अंधेराला रात्र तो सकाळ नि सध्याकाळ हाच (जगाचा) पहिला दिवस! आणि देव म्हणाला 'जलाच्या अगदी मध्य अंतरिक्ष होवो!' तस झाल आणि दव म्हणाला 'त्या अंतरिक्षामुळे दुभगलेल्या जलापैकी वरचा जलाशय वर नि खालची खाली वगळी राहोत!' तसच झाल तो दुसरा दिवस आणि दव म्हणाला खालची सारी जल अेकवटोत नि कोरडी भूमि प्रकटो!' तस झाल देव तिला पृथ्वी म्हणाला नि त्या पाण्याना समुद्र देवाने ते पाहिल नि त त्याला आवडल आणि देव म्हणाला, 'पृथ्वी आता तृण, वृक्ष, वनस्पति बीज फलादिकाना निर्माण करो!' तसच झाले दवाला त आवडल तो तिसरा दिवस आणि दवाने दोन मोठे तेजादीप निर्मून अेकाला दिवस नि दुसऱ्याला रात्री पृथ्वीवर अुजेड असावा म्हणून प्रकाशण्यास सांगितले दवान तारेही निर्मिल हा चौथा दिवस आणि दव म्हणाला, 'आता जलातून नाना प्रकारच प्राणी, पक्षी मासे निर्माण होवोत!' ते तसे झाल तो पाचवा दिवस आणि देव म्हणाला, आता पृथ्वी, पशु, कृमि, सर्प, प्राणी याना प्रसवो तसच झाल आणि दव म्हणाला,

'आता आपण मनुष्य निर्मूया ! अगदी आपल्याच मूर्तीप्रमाणे, आपल्याच सारखा!' आणि देवाने मनुष्य तसा अगदी देवासारखाच निर्मिला. स्त्रीपुरुष दोघेही ! आणि देव त्याना म्हणाला, या पृथ्वीवरील नि समुद्रातील सर्व पशुपक्षी, मत्स्य, वनस्पति, प्रभृति वस्तूवर तुमची सत्ता चालो ! तुमचा वंश वाढवा, सुखाने नांदा !' तो सहावा दिवस

(अध्याय दुसरा) – अशा प्रकारे स्वर्ग, पृथ्वी नि हे सारे निर्मिले गेले आणि सहा दिवस ही कामे करून सातव्या दिवशी देवाने विश्रांति घेतली देवाने त्या दिवसाला सुटीचा दिवस म्हणून वरदान दिले. (सरकारी शाळेतील मुलाना नि कचेऱ्याना यासाठीच रविवारी सुटीचा हक्क आहे ! – लेखक)

- असे सर्व निर्मिले, पण कसे ? तर पृथ्वीवर कोणीही मनुष्य नांगरण्यास नसता आणि पाऊसही पडू लागण्याच्या पूर्वीच देवाने सारी धान्ये, फळे, वृक्ष आपणच निर्मिली '

आणि नंतर देवाने पृथ्वीच्या मातीपासून मनुष्य घडविला त्या मातीच्या मूर्तीच्या नाकपुड्यामधून देवाने चेतन्याचा श्वास आत घातला आणि मनुष्य जिवंत झाला नंतर देवाने अेडनला अेक सुरेख अुद्यान लावले सुरेख नि रुचिर अशा प्रत्येक प्रकारच्या फळांही ते अुद्यान भरलेले असून त्याच्या मध्यभागी जीवनाचा वृक्ष होता आणि दुसरा सदसद् ज्ञानाचा वृक्ष ! त्या बागेतून ज्या नद्या अेथिओपिया, नि असीरिया अिकडे वाहत जातात त्या सर्वच पाण्याचा पुरवठा करीत होत्या. अशा त्या बागेत देवाने मातीचा केलेला तो पहिला मनुष्य स्थापला नि त्याला सांगितले, 'तू येथील सारी फळे यथेच्छ खा ! पण ह्या सदसद् ज्ञानाचे फळ मात्र खाअू नकोस ! नाही तर जीवनास मुकशील !'

आणि देवाला वाटले की, ह्या मनुष्याने अेकटे असावे हे काही बरे नाही त्याला अेक सहचर नि सवगडी हवा. मी तो निर्मिणार ! देवाने पृथ्वीपासून अुत्पादिलेले सारे प्राणी, पशु पक्षी त्या आदमच्या – आदि मानवाच्या – पुढे आणले त्याना आदमने ज्या ज्या नावाने संबोधिले तीं तीच त्यांची नावे पुढे पडली, पण त्या सर्वांमध्ये आदमला सवगडी नि सहचर असा अेकही सापडला नाही

तेव्हा प्रभूने आदमला झोपी घातले. तो गाढ झोपेत असता देवाने त्याची अेक बरगडी काढली आणि तिथला घाव मासाने भरून बाजला. नराच्या त्या बरगडीचीच देवाने अेक नारी केली नि आदमच्या समोर आणली !

तिला पाहताच आदम म्हणाला, 'अहाहा, ही तर माझ्या अस्थीचीच अस्थि, माझ्या मासाचे रक्तमास ! हिला नारी ( Woman ) हेंच नाव हवे कारण ती नरापासूनच ( out of man ) घडविली गेली !' यासाठीच पुरुष हा आपल्या मातापित्याना सोडून स्त्रीशीच संलग्न होअील. ती त्याची अर्धांगी. तो नि ती मिळूनच ते पूर्णांग !'

'आणि ती दोघेही अगदी नग्न होती तो पहिला पुरुष नि ती त्याची पहिली पत्नी त्या दोघानाही त्या नग्नतेत सकोचास्पद असे काहीच वाटले नाही.'

## जगातील पहिल्या पतिपत्नींचा संसार

(अध्याय तिसरा)—पण ईश्वराने निर्मिलेल्या त्या साऱ्या सृष्टीत जो पुरता लबाड होता, तो साप त्या पहिल्या स्त्रीला म्हणाला, 'अैक, देवाने ह्या अुद्यानातील सर्व वृक्षाची फळें खावयाची अनुज्ञा तुम्हाला दिली आहे ना?' ती स्त्री म्हणाली 'पण ज्ञानवृक्षाचे फळ मात्र वर्ज्य, ते खाताच मराल! असे देव म्हणाला' सर्प म्हणाला, 'छट् मराल कसल! देवाला हे ठाअूक आहे की, ज्ञानवृक्षाचे फळ का अेकदा मनुष्याने खाल्ले, की त्याचे डोळे अुघडतील आणि सदसद् ते काय हे सारे तुम्हास समजू लागून तुम्ही माणसे देवासारखी व्हाल'

हे अैकताच त्या स्त्रीला त्या दृष्मोहक नि रुचकर अशा ज्ञानवृक्षाचे फळ खावेसेच वाटले ज्यायोगे सदसद्विवेकबुद्धि येते ते फळ शेवटी तिने स्वतः खाल्ले नि आदमलाही दिले तिच्या त्या पतीनेही ते खाल्ले

त्यासरशी त्या दोघाचेही डोळे अुघडले आणि आपण नागवे आहोत याची त्याना जाणीव झाली. त्या दोघानीही लगेच अंजिराची पाने शिवून त्याची अंगवस्त्रे केली

अितक्यात दुपारी त्या अुद्यानाची शीतलता अुपभोगीत हिंडणाऱ्या देवाची चाहूल लागून आदम नि त्याची पत्नी देवास दिसू नये म्हणून झाडाआड लपली. तेव्हा प्रभूने त्याना हाक मारून विचारले, 'तू कुठ आहेस?' आदम म्हणाला 'तुझा आवाज अैकून मी लपलो कारण मी नागवा होतो, म्हणून तुमची मला भीति वाटली!' देव म्हणाला, 'काय, तुला कोणी सागितले की तू नागवा आहेस? तू त्या झाडाचे फळ खाल्लेस की जे खाता कामा नये म्हणून मी बजावले होते' तो पुरुष म्हणाला, 'ज्या स्त्रीला तुम्ही माझी सागातीण म्हणून मला दिलीत तिनेच ते फळ मला दिले नि मी खाल्ले'

तेव्हा प्रभूने त्या स्त्रीला विचारले, 'तू हे काय केलेस? बोल!' स्त्री अुत्तरली, 'त्या सापाने मला भुलविले नि मी ते खाल्ल' तेव्हा देव त्या सर्पाला म्हणाला, 'हें जे तू केलेस, त्याच प्रायश्चित्तही आता भोग सर्व प्राण्यात तू नीच नि नष्ट समजला जाशील पोटावर फरपटत राहशील नि जन्मभर धूळ काय ती खात पडशील स्त्रीत नि सर्पात ह्यापुढे सर्वदा वाकडे राहील. तिची सतति तुझ्या सततीचे डोक चिरडील नि तुझी प्रजा तिच्या प्रजेच्या टाचा चावतील! हा घे शाप!'

आणि स्त्रिये, तुझे गर्भ नि तुझी दुःखे मी शतगुणित करीन मुलास जन्म देताना तुला वेदना होतील नवऱ्याच्या अिच्छेत तुला राहावे लागेल, नि तुझा नवरा तुझ्यावर सत्ता गाजवील. हा घे तुला शाप!'

आणि हे आदम, ज्याअर्थी मी नको खाऊ म्हटले तेच तू या तुझ्या बायकोच्या नादी लागून खाल्लेस त्याअर्थी तुझ्या प्रकरणी ही भूमिही अभिशप्त असो बाबाड-कष्टावाचून तिचे फळ तुझ्या हाती पडणार नाही काटेरी झाडेझुडपे तिच्यावर वाढतील तिचा झाडपाला तुला खावा लागेल. काबाडकष्टाच्या घामातच भिजलेली भाकर तुला खाल्ली पाहिजे आणि शेवटी ज्या भूमीतून तुला मी काढले तीतच तू गाडला जाशील कारण की, तू मातीच आहेस नि मातीलाच मिळशील!

नंतर आदमने आपल्या बायकोचे नाव ओव्ह असे ठेवले कारण ती यच्चयावत् प्रजेची मूळ माता होय मग देवाने आदमला नि त्याच्या बायकोला कातडयाचे कपडे शिवले नि त्याना ते घातले नंतर देव अुद्गारला, 'अहो, या ज्ञानवृक्षाचे फळ खाल्ल्यामुळे माणूस हा आता चांगले काय नि वाअीट काय हे ओळखू लागला तो आम्हासारखाच झाला कोणी सांगावे की, तो आता ह्या दुसऱ्या जीवनवृक्षाला सुद्धा हात लावणार नाही म्हणून? जर का त्याने ते जीवनवृक्षाचे फळही खाल्ले आणि देवासारखाच अमर झाला तर!' असे चिंतून देवाने आदमला नि त्याच्या बायकोला त्या अेडनच्या अुद्यानातून हाकून लावले नि त्या अुद्यानाच्या पूर्वद्वारी अेक जळती तरवार लटवत ठेविली ती अेकसारखी स दिशानी फिरत राही त्या जळत्या तरवारीचा नि देवदूताचा त्या जीवनवृक्षा-भोवती असा खडा पहारा अुभा केला! आणि तेथून हुसकलेला तो माणूस त्या अुद्यानाबाहेर भूमि नांगरण्यास लावला

(अध्याय ४ ते ९)—पुढे आदमचा त्याची पत्नी ओव्ह हिच्याशी संबंध होअून तिला गर्भ राहिला. तिचा तो पुत्र 'केन'. तिला दुसरा पुत्र झाला तो, 'अबेल' त्या दोघा भावात वितुष्ट येअून केनने अबेलला ठार मारले केनने आपल्या पत्नीशी संबंध केला नि तिला गर्भ राहून पुत्र 'अेनाक' हा झाला. (पण आदम नि ओव्ह हे जर मनुष्य जातीचे पहिलेच जोडपे होते आणि केन हा त्याचा पुत्र तर त्याला बायको कोठून मिळाली? तो ही त्या पहिल्या जोडप्याचीच मुलगी, त्याची बहीण. कारण तिला अुजविणारे दुसरे जोडपेच तोवर जगात नव्हते) पुढे आदमपासून ओव्हला तिसरा पुत्र झाला. तो 'सेथ'. त्या सेथला अेक मुलगा झाला. (कोणापासून?) त्याचे नाव 'अेनाश' त्यानंतर पुष्कळ मुले नि मुली होअून आदम हा नअुशे तीस वर्षांचा होअून वारला.

### जलप्रलय

पुढे वंश वाढता वाढता लामेक याला 'नोहा' हा पुत्र झाला. अनेक मुली-मुले झाल्यानंतर ७७० वर्षांचा होअून लामेक वारला. नोहाला तीन पुत्र झाले. शेम, हेम, जाफेथ. ही मनुष्य प्रजा वाढता वाढता त्याच्यात फार पाप माजले. अितकं की, देवाला वाटले, मी कुठून ह्या पृथ्वीवर हा मनुष्य प्राणी अुपादिला! आणि

देव म्हणाला, 'मी ह्या मनुष्याचा नि साऱ्या प्राण्याचा आता सर्वनाश करून टाकणार!' पण नोहा तेवढा देवाला आवडत असल्यामुळे देव त्याला म्हणाला, 'ह्या पापी जगाचा मी नायनाट करणार, पण तुला वाचवीन मी मोठा जलप्रलय धाडणार आहे तर तू अेक नाव कर, नि त्यात तू, तुझी बायको मुलं नि सुना अितके बसा' त्याप्रमाणे नोहाने केले (या पुढे त्या अद्भुत जलप्रलयाचं सविस्तर वर्णन दिलं आहे तो जलप्रलय फुगत फुगत जाअून त्यात पर्वताची शिखरं, पदार्थ नि माणसं बुडाली पण नोहाची बंद नाव तरंगत होती ) तो महापूर दीडशे दिवस पृथ्वीला बुडवून राहिला होता तोच देवाला नोहाची आठवण झाली आणि त्याने पाणी अुतरविले समुद्राचे फुटलेले झरे आणि आकाशाच्या अुघडलेल्या खिडक्या पुन्हा बंद केल्या आणि अरारात पर्वताच्या शिखरावर ती नाव लागली तेव्हा देवाच्या आज्ञेने नोहा पृथ्वीवर सहकुटुंब अुतरला त्यानं अेक स्थंडिल केलं त्यावर मेध्य अशा पशुपक्ष्यांचे मांस हवन केले त्या होमिल्या जाणाऱ्या मांसाच्या सुवासाने प्रसन्न होत्साता देव म्हणाला, 'मी तुझ्याशी करार करतो की, मनुष्याच्या अपराधासाठी यापुढे मी अशी सारी पृथ्वीच दंडिणार नाही मनुष्य स्खलनशीलच आहे! पुन्हा जलप्रलय केव्हाही होणार नाही! भिवू नकोस! याची खूण म्हणून मी आकाशात हं अिंद्रधनुष्य अुगवतो पहा! हंच माझे आश्वासन ' (अध्याय ९)

नंतर नोहाने शेती केली द्राक्ष लावला अेक दिवस प्रमाणाबाहेर द्राक्षाची दारू पिअून नोहा गुंग झाला आपल्या तंबूत तो नागवा अुघडा पडला हं त्याचा पुत्र हेम याने पाहिलं त्याच्या अितर दोघी मुलांनी वस्त्र घेअून तिकडे तोंड न करता मागे मागे सरकत जाअून नोहाच्या अंगावर वस्त्र घातलं नोहा शुद्धावर आल्यानंतर त्याने आपल्या ज्या पुत्राने आपल्यास अुलिंग पाहिलं त्या हेमला शापिलं वयाच्या ९५० व्या वर्षी नोहा वारला

(यापुढे अध्याय दहाव्यात नोहाच्या मुलांचे वंशविस्तार दिले आहेत )

## भाषाची फाटाफूट

(अध्याय अकरावा) — तेव्हा ही सारी पृथ्वी अेक भाषीच होती सारी माणसं अेकच बोली बोलत शिनारच्या मैदानात ती माणसं आल्यावर (ख्रिस्तपूर्व २५०० वर्षांच्या सुधीस ही यहुदीय पुराणगणना) ती माणसे म्हणाली 'चला, आपण विटा पाडूया, त्या भाजूया आणि स्वर्ग गाठील अितका अेक अुंच स्तंभ नि अेक नगर बांधू या!' जेव्हा देव तं नगर आणि कीर्तिस्तंभ पाहण्यास आला तेव्हा तो म्हणाला, 'अहो ही सारी माणसे अेक झाली, अेकच बोली बोलतात त्याचा हा परिणाम त्यांनी आता हं करावयास आरंभिलं! असेच चालू तर मनुष्य योजील ते करू शकेल छट्, आपण खाली जाअून त्यांची फाटाफूट केली पाहिजे

आणि त्याची भाषा गोंधळून टाकली पाहिजे अेकाची बोली दुसऱ्यास समजता कामा नये!' आणि देवाने तसेच केले म्हणूनच त्या स्थळास 'बाबेल' म्हणतात. कारण तिथूनच देवाने पृथ्वीवरील अेक भाषा मोडून तिच्या परस्पराशी भिन्न अशा अनेक भाषा केल्या आणि सार्‍यांना देशोदेशी पांगून दिले!

## पैगंबर अब्राहाम नि त्यांची पत्नी सराओ याची कथा

आता तेराहची वंशावळ अशी तेराहचे तीन पुत्र. अब्राहाम, नाहर, हारन. हारनने 'लाटला' जन्म दिल्यानंतर तो वारला अब्राहाम याने लग्न केले त्याच्या बायकोचे नाव सराओ अब्राहामचा बाप २०५ वर्षांचा होअून वारला. तेंव्हा प्रभु अब्राहामला म्हणाला, 'तुझ्या वडिलांच्या देशाला नि घराला सोडून दे नि मी सांगतो तिकडे चल! मी तुझे अेक मोठे राष्ट्र बनवीन, तुझे नाव जिकडे तिकडे गाजेल ज्याला तू आशीर्वादिशील त्याला मी आशीर्वादीन, शापशील त्याला शापीन' देवाच्या या सांगण्याप्रमाणे अब्राहाम हा आपली बायको सराओ नी पुतण्या लॉट ह्यासह घर सोडून निघाला नंतर फिरत फिरत बेथल येथे येअून त्याने तंबू ठोकला तिथे स्थंडिल अुभारून त्याने प्रभूस प्रार्थिले आणखी पुढे प्रवासात अब्राहाम जाता तो दुष्काळात सापडला, म्हणून शेवटी अिजिप्तकडे गेला

## बायकोला बहीण म्हटले

आणि जसा तो अिजिप्तच्या अगदी जवळ आला तसा तो आपली बायको जी सराओ तीस म्हणाला, 'हे बघ, तू दिसायला अेक सुरेख स्त्री आहेस, हे मी ओळखून आहे यामुळे मला वाटते की, आपण अिजिप्तमध्ये जाताच जेंव्हा ते अिजिप्शियन तुला पाहतील तेंव्हा म्हणतील, ही तर ह्याची बायको! आणि म्हणून ते मला मारतील पण तुला वाचवतील! तेंव्हा हे भार्ये, कृपा कर, नि तू माझी बहीण आहेस असे सर्वांना सांग, म्हणजे तुझ्या रूपाच्या वशिल्याने माझे दिवस सुखात जातील नि तूच मला जीवदान दिल्यासारखे होअील'

नंतर काय झाले की, ते अिजिप्तमध्ये जाताच तेथील लोकांनी पाहिले की, ती स्त्री फारच सुरेख आहे तेथील राजा जो फाराहो त्याच्यापर्यंत तिच्या रूपाची कीर्ति गेली आणि फाराहोने तिला आपल्या अंतःपुरात घेतले

'आणि तिच्या वशिल्याने फाराहोने अब्राहामलाही फार चांगले वागविले. शेळ्या, बैल, गाढवं, दासदासी अशी विपुल संपत्ति अब्राहामला राजाने दिल्यामुळे त्याची चंगळ झाली

पण पुढे देवाने सराओला अंतःपुरात घेणाऱ्या फाराहोच्या घरी दारी रोगाची साथ धाडली तेंव्हा अब्राहामला बोलावून फाराहो म्हणाला, 'अरे, हे तू काय केलेस? ती तुझी बायको आहे हे का सांगितले नाहीस? ती तुझी बहीण

आहे असे न फसवितास तर मी तिला माझी बायको करतो ना ! आता झाले ते झाले तुझी बायको तू घे नि तुझी वाट धर असे सांगून अब्राहामला त्याची बायको देऊन त्याला पूर्वी दिलेल्या विपुल संपत्तीसह फाराहोने धाडून दिले (अध्याय १२ वा)

(अध्याय तेरावा)–अब्राहाम, त्याचा पुतण्या लॉट ह्यासह अिजिप्त सोडून बाहेर पडला ते दोघेही धनधान्य पशु यांही आता संपन्न होते अेकदा लॉटच्या मेंढपाळात नि अब्राहामच्या मेंढपाळात तटा झाला तेंव्हा स्वसंतोषाने आपण निराळे होअू असे अब्राहाम म्हणाला आणि त्याला जी दिशा आवडली, त्या दिशेला लॉट दासदासी पशूसह निघून गेला

तंव्हा प्रभु अब्राहामला म्हणाला, 'अूठ नि या चारी दिशाना पाहा तुला दिसतो तो सारा प्रदेश मी तुलाच नि तुझ्या संततीलाच सदोदितचा देणार ! आणि तुझी संतति मी धुळीचे कण जसे अगणित तशी असंख्य वाढविणार ! अूठ नि या साऱ्या प्रदेशाची रुंदी नि लांबी चालत जा कारण तो सारा प्रदेश मी तुलाच देणार ' 'अब्राहामने तसेच केले नि माम्रेला तंबू ठोकला. देवाचे स्थंडिलही बांधले पण लॉटला बायकामुलांसुद्धा शत्रूने पकडले हे अैकून अब्राहामने शत्रूवर हल्ला करून लॉटला बायकासह सोडविले (अध्याय १५)

## नि संतान अब्राहामचो नि सराअीची चिंता

(अध्याय १५–१६) — नंतर अेके दिवशी प्रभु अब्राहामला म्हणाला, 'भिअू नकोस ? मी तुझी ढाल आहे ! ' अब्राहाम म्हणाला, 'पण हे प्रभो, मला संतान नाही ! माझा वारस दुसऱ्याचे संतान होणार ! ' प्रभु म्हणाला, 'नाही, तुझ्याच पोटी जन्मलेले संतान तुझे वारस होअील ! मी तुला खाल्डाच्या 'अर' मधून आणून हा प्रदेश दिला जा, नि मला अेक कालवड गाय, बोकड नि पक्षी मारून होमून बळी दे ! तुझ्या संतानाला मी अिजिप्त ते युफ्रेटीस पर्यंतचे सारे राज्य सदोदितचे दिले आहे नंतर सराअी आपला पति अब्राहाम याला म्हणाली, 'बघ देवाने मला वांझ केली माझा कुमवा निष्फळ झाला ! आता असे तरी कर की, अिजिप्तमधून आणलेली ही जी मोली 'हगर, नावाची सुरेख दासी आहे ती मी तुला देते तू तिच्याशी संबंध कर म्हणजे तरी तुझ्या पोटी संतान होअून आपला निर्वंश होणार नाही '

आपल्या पत्नीने दिलेल्या ह्या दासीशी अब्राहामने संबंध केला आणि तिला गर्भ राहिला पण आपल्याला गर्भ राहिलेला पाहून ती दासी हगर आपली जी धनीण सराअी तिला तुच्छवू लागली

तेंव्हा सराअी अब्राहामला म्हणाली, 'माझ्या अपमानाचा दोष आता तुझ्याकडेच आहे ! मी माझी दासी तुझ्या सेजेस दिली, पण तिला गर्भ राहताच

तो मला पाण्यात पाहू लागली ! आता देवच आमचा न्याय करो ! ' परतु अब्राहाम म्हणाला, 'हें बघ तुझी दासी तुझीच बटीक आहे ना ? तिचे काय करणे ते तुझ्या हातीच आहे. मग जेव्हा सराओ त्या हगरला कडकपणे वागवू लागली, तेव्हा ती पळून गेली ती रानावनात भटकत असता तिला अेक देवदूत भेटला नि म्हणाला, 'भटकतेस कुठे ? तुझ्या पोटी पुत्र आहे त्याचा वश विस्तारेल परत फीर ! ' तेव्हा ती परत घरी आली हगरला पुढे पुत्रच झाला अब्राहामने त्याचे नाव ,अिस्माअेल ' ठेवले तेव्हा अब्राहाम ८६ वर्षांचा होता

प्रभु पुढे म्हणाला ,' आणि तुझी पत्नी जी सराओ तिला यापुढे तू ' सरा ' असे म्हणावेस मी आता तिला देखील पुत्र देणार ! होय, तिलाही पुत्र होओील नि माझ्या आशीर्वादाने ती राष्ट्राची माता होओील, लोकाधीश राजे तिच्या पोटी येतील ! तेव्हा अब्राहाम दडवत घालीत हसून मनात म्हणाला, ' काय ! शभर वर्षे अुलटली त्यास पुत्र होणार, नी सराओ नव्वद वर्षांची म्हातारी तिला गर्भ राहणार ! देवा माझा अेक पुत्र ' अिस्माओील ' आहे, त्यासच अुदड आयुष्य दे ! ' तेव्हा देव म्हणाला, सराला पुत्र होओीलच होओील त्याचे नाव अिसाक ठेव आणि मी अिस्माओीललाही सभाळीन. त्याचा वश वाढेल बारा राजे त्याच्या पोटी जन्मतील '

पण ' सरा ' तर अगदी वृद्ध ती मनात हसली की, या म्हातारपणात का आता मला ते गोड वाटणार ? माझा नवराही म्हतारा ! ह कळताच देव म्हणाला, ' सरा का हसली ? देवाला अशक्य अस काही आहे काय? ' ह अैकून सरा देवास भ्याली नि आपण हसलो हें तिने नाकारले देव म्हणाला, ' छट्, तू हसलीस !

## देवप्रिय लॉटला स्वत च्या कन्यापासून पुत्र

(अध्याय १९ वा) ' अिकडे सोडम नगराचा देवाने नाश केल्यानतर त्याने त्या नाशातून वाचवून बाहेर आणलेला अब्राहामचा पुतण्या नि देवाचा आवडता लॉट हा आपल्या दोन्ही कन्या तेवढ्याच घेमून पर्वतातील अेका गुहेत राहात होता. त्या दोन्ही कन्या अुपवर असून त्याना पुरुष असा माहीत नव्हता

तव्हा वडील कन्या आपल्या धाकट्या बहिणीला म्हणाली, ' बघ, आपला पिता आता वृद्ध झाला, पण त्याच्या पोटी पुत्रसतान नाही. आपण दोघी येथे अेकट्या जगाच्या रहाटीप्रमाणे आपल्यालाही सेजेस घेओील असा अेकही पुरुष दुसरा मिळणारा नाही यासाठी चल, आपण आपल्या या बापाला दारू पाजू ये आणि नतर आपणच आपल्या या थोर पित्याचे बीज आता जतन करू ये !,

' याप्रकारे लॉटच्या दोन्ही मुली आपल्या पित्यापासून गरोदर राहिल्या त्या वडील कन्येचा मुलगा तोच ' मोआब ' धाकटीला सुद्धा मुलगाच झाला तो ' बेन आमी ' पहिला आजच्या मोआबाओीट जातीचा पूर्वज दुसऱ्याचा वश म्हणजेच आजची अॅमोन जाति ' (अध्याय १९ श्लोक ३० ते ३८)

त्यास बाधून टाकले आपला सुरा उपसून त्या मुलाच्या कंठावर हाणण्यास त्याने हात उगारला—तोच देवदूताचा ध्वनि आला, 'अब्राहाम !' अब्राहाम उत्तरला, 'जी, हा मी इथे !' प्रभुध्वनि म्हणाला, 'मारू नकोस त्या लेकराला मी तुझी परीक्षा पाहिली तुझ्या एकुलत्या पुत्राला देखील तू बळी देत आहेस ! तुझी माझ्यावरची निष्ठा खरी आहे !' इतक्यात एक बोकड दिसला, तेव्हा त्यालाच अब्राहामने त्या स्थंडिलावरील अग्नीत मुलाच्या बदली होमिल त्यासाठीच त्या स्थळास आजही 'जेहोवा जिर' असेच म्हणतात तेथून अब्राहाम बीरशेबा येथे गेला नि तेथेच राहू लागला (अध्याय २२)

## सरा साध्वीचा मृत्यु

तिथे सराच्या वयाला १२७ वे वर्ष लागले ती अब्राहामची बायको होती तशीच बहीणही होती कारण अब्राहामच्या आईच्या पोटी जरी ती झालेली नव्हती तरी त्याच्या बापाच्या पोटचीच ती होती म्हणून बापाच्या नात्याने ती त्याची सावत्र बहीणच होती आणि तिलाच अब्राहामने आपली बायकोही केला होती तिला जेव्हा १२७ वर्षे झाली तेव्हा ती मृत्युशय्येवर पडली, आणि अब्राहामला दु खात लोटून लौकरच मेली

येथे सरा साध्वीची कथा सपली



# लेखांक २ रा

(अध्याय २४ वा) अब्राहाम पैगंबराची पत्नी साध्वी सरा ही वारल्यानंतर त्याने आपल्या मुख्य कारभाऱ्याला बोलावून म्हटले, 'ये नि तुझा हात माझ्या मांडीखाली घाल, आणि शपथ घे की, माझ्या पुत्राला,ऐझाक याला या कॅननाईट लोकाची मुलगी करू देणार नाही, परतु माझ्या वशाच्या मूळस्थानी जा नि त्यातली मुलगी माझ्या मुलास कर तुझ्यापुढे एक देवदूत चालेल नि तुला वाट दाखवील बायको मिळताच माझ्या मुलाला परत आण जर ती वधू इकडे यावयास नाकारू लागली, तर तुझ्याकडे बोल राहणार नाही तू तिला सोडून दे, पण मुलाला मात्र परत आण '

त्याप्रमाणे शपथ घेऊन तो कारभारी उटावर सव सामान लादून नेहारच्या नगराला अब्राहामच्या मेसोपाटेमियातील मूळ स्थानाकडे निघाला तिथे पोचताच गावाबाहेरच्या विहिरीवर सध्याकाळच्या वेळी आपल्या उटाना गुडघ्यावर टेकवून

## सराला पुत्र होतो सराचा सवती मत्सर

अिकडे प्रभु सराला भेटला देवाने म्हटले ते तिच्या विषयी केले कारण ती गर्भवती झाली. अब्राहामच्या शभराव्या वर्षी त्याची पत्नी सरा हिला हा पुत्र झाला. नाव अैझाक ठेवून आठवे दिवशी देवाच्या सागण्याप्रमाणे त्या पुत्राची सुता केली. पण सराला अितक्या म्हातारपणी झालेल्या त्या पुत्रास पाहून हगर दासीला जो अब्राहामपासून पुत्र झाला होता तो अिस्माअील हसला. हे पाहताच सरा रागावली नि अब्राहामला म्हणाली, ' या बटकीला नि तिच्या त्या दासी-पुत्राला आताच्या आता हुसकून दे माझ्या मुलासह तो तुझा वारस होता कामा नये. अब्राहामला हे अैकून फार दुःख झाले पण देव म्हणाला, ' दुःख करू नकोस. कारण तुझेंच बाज असलेल्या त्या दासीपुत्राचेंही मी अेक राष्ट्र करीन !' तेव्हा मोठ्या पहाटेस अब्राहाम अुठला अेक पाण्याची बाटली, भाकरीचा तुकडा, आणि ते मूल त्या हगरच्या स्वाधीन करून तिला त्याने घराबाहेर काढून दिले

हगर तेथून जी निघाली ती रानावनात भटकत चालली तिच्याजवळचे पाणी सपले दुसरे कुठे दिसेना तेव्हा ते तिचे मूल अेका झुडपाखाली टाकून ती दूर जाअून रडत बसली. ते मूल मरताना तिला पाहवेच ना पण देवाने तिचे रडणे अैकताच देवदूत आला तो म्हणाला, ' रडतेस का ? काय होते तुला ? तुझ्या मुलाला अुचल देव तुझा साथी आहे त्याचे अेक राष्ट्र होअील.' हे शब्द अैकून हगरने मुलाला अुचलले, तो देवाने तिचे डोळे अुघडले. पाहाते तो जवळच अेक पाण्याची विहीर तिने पुन्हा आपली बाटली पाण्याने भरली नि पुढे चालली. तो मुलगा रानावनातच तिने वाढविला तो मोठा धनुर्धर झाला अिजिप्तमधल्या अेका मुलीशी त्याच्या आअीने त्याचे लग्न लावून दिले.(अध्याय २१)

## अब्राहाम पुत्राचें वलिदान करावयास जातो

पुढे असे झाले की, देवाने अब्राहामची कसोटी पाहावयाचे मनी आणले-देवाने हाक दिली, ' अब्राहाम ' ' जी, हा मी !' अब्राहाम अुत्तरला देव म्हणाला, ' तुझा पुत्र, तो अेकुलता अेक पुत्र अैझाक, तुझा आवडता, तोच घे मोरियाच्या पर्वताकडे जा आणि त्याचे हवन करून मला बळी दे !'

आणि अब्राहाम सकाळीच अुठला, आपल्या गाढवावर स्वारी भरली, हवनाची लाकडे घेतली, नि मुलासह त्या पर्वताकडे गेला पर्वत येताच तो आपल्या मुलाला तेवढाच घेअून पुढे चालला मुलगा अजाणपणे म्हणाला, ' बाबा बलिदानाला, चार, लाकडे, आग घेतलीत, पण बोकड कुठे आहे ?' अब्राहाम म्हणाला, ' देव देअील तो बोकड !' ठराविक जागी येताच अब्राहामने स्थंडिल उभारले, लाकडे रचली आणि त्यावर आपल्या मुलाचा होम करण्यासाठी

त्यास बांधून टाकलें. आपला सुरा उपसून त्या मुलाच्या कंठावर हाणण्यास त्याने हात उगारला—तोंच देवदूताचा ध्वनि आला, 'अब्राहाम!' अब्राहाम उत्तरला, 'जी, हा मी इथे!' प्रभुध्वनि म्हणाला, 'मारू नकोस त्या लेकराला. मी तुझी परीक्षा पाहिली. तुझ्या एकुलत्या पुत्राला देखील तू बळी देत आहेस! तुझी माझ्यावरची निष्ठा खरी आहे!' इतक्यात एक बोकड दिसला, तेव्हा त्यालाच अब्राहामने त्या स्थंडिलावरील अग्नीत मुलाच्या बदली होमिलें. यासाठीच त्या स्थळास आजही 'जेहोवा-जिरें' असेंच म्हणतात. तेथून अब्राहाम बीरशेबा येथे गेला नि तेथेच राहू लागला. (अध्याय २२)

## सरा साध्वीचा मृत्यु

तिथे सराच्या वयाला १२७ वें वर्ष लागलें. ती अब्राहामची बायको होती तशीच बहीणही होती. कारण अब्राहामच्या आईच्या पोटी जरी ती झालेली नव्हती. तरी त्याच्या बापाच्या पोटचीच ती होती. म्हणून बापाच्या नात्याने ती त्याची सावत्र बहीणच होती. आणि तिलाच अब्राहामने आपली बायकोही केली होती. तिला जेव्हा १२७ वर्षे झालीं तेव्हा ती मृत्युपंथावर पडली, आणि अब्राहामला दुःखात लोटून लोकरच मेली.

येथे सरा साध्वीची कथा संपली.



## लेखांक २ रा

(अध्याय २४ वा) अब्राहाम पैगंबराची पत्नी साध्वी सरा ही वारल्यानंतर त्याने आपल्या मुख्य कारभाऱ्याला बोलावून म्हटलें, 'ये नि तुझा हात माझ्या मांडीखाली घाल, आणि शपथ घे की, माझ्या पुत्राला, इथल्या या कॅननाईट लोकांची मुलगी करू देणार नाही; परंतु माझ्या वंशाच्या मूळस्थानी जा नि त्यातली मुलगी माझ्या मुलास कर. तुझ्यापुढे एक देवदूत चालेल नि तुला वाट दाखवील. बायको मिळताच माझ्या पुत्राला पत्न आण. जर ती वधू इकडे यावयास नाकारू लागली, तर तुझ्याकडे बोल राहणार नाही. तू तिला सोडून दे; पण मुलाला मात्र परत आण.'

त्याप्रमाणे शपथ घेऊन तो कारभारी उंटावर सर्व सामान लादून नेहारच्या नगराला अब्राहामच्या मेसोपोटेमियातील मूळ स्थानाकडे निघाला. तिथे पोचताच गावाबाहेरच्या विहिरीवर सध्याकाळच्या वेळी आपल्या उंटांना गुडघ्यावर टेकवून

तो अुतरला तिथेच गावच्या स्त्रिया पाणी भरण्यास येत तेव्हा त्या कारभाऱ्याने देवास विनविले ' हे अब्राहामच्या प्रभो, असेच व्हावे की, ह्या नगरातील स्त्रिया जेव्हा पाण्यास अिथे येतील तेव्हा मी जीस म्हणेन की, तुझी घागर खाली ठेव नि मला पाणी पिअू दे, आणि जी मला म्हणेल, 'पी, तुझ्या अुंटाना सुद्धा पाणी पाजते'—तीच मुलगी तू अिझाकला जी पत्नी म्हणून नेमलेली असशील ती असो!'

ही प्रार्थना सपते न सपते तोच, आश्चर्य की, रेबेका अब्राहामचा भाअू नेहार याची नात ही बाहेर आली कोणत्याही पुरुषाचा स्पर्श न झालेली, कुवार नि दिसण्यात सुरेख अशी ती कन्या रेबेका आपल्या खांद्यावरचा घडा भरण्यासाठी विहिरीवर गेली आणि घडा पाण्याने भरून आली त्यासरशी तो कारभारी भराभरा तिच्याकडे गेला नि म्हणाला, ' तुझ्या घड्यातील थोडे पाणी मला प्यायला देशील का ?'

'प्यावे महाराज,' असे म्हणून तिने घडा हातावर घेतला नि पाणी दिले त्याचे पिणे होताच ती म्हणाली, ' तुमच्या अुंटाना पाजण्यासाठी सुद्धा मी पाणी ओढून देते ' झटकन तिने तो घडा गुराच्या पाण डोणीत ओतला, विहिरीवर गेली आणि पाणी ओढून त्या अुंटाना पोटभर पाजले कारभारी तिच्याकडे आश्चर्याने पाहात होता की देवाने हिलाच धाडले असेल का ? अुंटाना पाजणे सपताच त्याने सोन्याची कानबाळी नि सोन्याच्या बागड्या हाती घेअून तिला विचारले, ' कन्ये तू कोणाची मुलगी ? तुझ्या बापाच्या घरी आम्हाला अुतरायला मिळेल काय ?' रेबेका अुत्तरली ' नहारची मी नात आहे आमच्या घरी अुतरायला जागा नि दाणावैरण पुष्कळ आहे ! आणि रेबेकाने पळतपळत जाअून आपल्या आअीच्या घरातील मडळींना ते सारे सागितले तितक्यात रेबेकाचा भाअू लेबन तिथे आला, आणि त्या सोन्याच्या बागड्या नि कानबाळ्या रेबेकाच्या अगावर पाहिल्या आणि म्हणाला ' ठीक आहे त्याने स्वत पुढे जाअून त्या कारभाऱ्याला त्याच्या सा या मडळींसह घरी आणिले नि स्वागतिले

हातपाय धुतल्यावर त्या मडळींना जेवायास बोलाविले पानावर रुचकर मास वाढले, पण कारभारी म्हणाला, ' माझ्या धन्याचा निरोप दिल्यावाचून मी घास घेणार नाही सागू का ? सागावे म्हणताच तो सागू लागला की, ' माझ्या धन्याने अब्राहामने त्याच्या सरा साध्वीपासून झालेल्या पुत्राचे लग्न तुमच्या घराण्यातील कोणा मुलीशी लावावे म्हणून आज्ञापिले आहे अब्राहामच्या वडिलाचे घर म्हणजेच तुमचे देवदूताने मला वाट दाखविली विहिरीवर मी देवास विनविले की, जी वधू तू या पुत्रास नियोजिली असशील तीच मला पाणी पिण्यास देवो त्याप्रमाणे या कुमारिकेने मला पाणी दिले आणि मी सोन्याची कवणे तिच्या हातात घातली तेव्हा माझा धनी जो अब्राहाम त्याच्या भावाची ही कन्या रेबेका अब्राहामच्या या मुलास तुम्ही द्याल तर आभार होतील नकार देणार तर तसे सागावे.

हें त्याचें बोलणें अैकून लेबन म्हणाला, ' देवाची अिच्छा जर तशी, तर तुला तरी आम्ही काय म्हणणार ? ही पहा, रेबेका तुझ्या समोरच आहे. तिला न्या आणि अब्राहामच्या मुलाशी तिचे लग्न लावा; आमची हरकत नाही.'

हे अैकताच प्रभूला वंदून त्या कारभाऱ्याने रत्नजडित सोन्या चांदीचे दागिने रेबेकाला दिले आणि तिच्या भावाला नि आजीला मूल्यवान अुपहार अर्पिले. खाअून पिअून सुखात ती रात त्या सगळयानी घालविली. सकाळीच अब्राहामचा तो कारभारी अुठला नि म्हणाला, ' आता आम्हास निरोप द्यावा. आमची मुलगी घेअून आम्ही जातो. ' तेव्हा रेबेकाची आअी नि भाअू म्हणाले, ' अिथे थोडे दिवस तरी राहा, निदान दहा दिवस तरी ! मग मुलीला न्या ?' पण कारभारी म्हणाला, ' मला परत गेलेंच पाहिजे.' तेव्हा रेबेकाची माणसें म्हणाली, 'आम्ही मुलीलाच बोलावतो नि तिच्याच तोंडून तिचे मत अैकू.' त्याप्रमाणें तिला त्यानी बोलाविले नि विचारले, ' मुली तू ह्याच्यासह आताच जाशील का ?' ती म्हणाली, ' हो, जातेच मी !' तेव्हा तिच्या माहेरच्यानी रेबेकाला तिच्या दाअीस सोबत देअून सासरी धाडली. जाताना त्यानीं त्यांच्या त्या मुलीला आशीर्वादून म्हटले, ' जा, बाळे, जा !' तू आमची जशी बहीण आहेस तशीच असंख्य मुलालेकरांची आअी हो ! आणि तुझ्या पुत्रपौत्राचा द्वेष करणाऱ्यावर त्याना सदा विजय मिळो !' नंतर रेबेका जावयास निघाली. तिला तिच्या माणसांसह अुंटावर बसवून सामानसुमान घेअून तो कारभारी अब्राहामकडे परत निघाला.

अिकडे अैझाक, अब्राहामचा तो पुत्र, संध्याकाळच्या वेळी शेतात प्रार्थनेसाठी आला असता अुंटाचा जमाव परतलेला त्याने पाहिला. रेबेकानेही आपल्या सेवकाना विचारले, ' हे कोण ?' ते म्हणाले, ' हाच तुझा धनी !' तेव्हा अुंटावरुन ती खाली अुतरली, पदर घेतला, आणि तिने आपले अंग झाकून घेतले. नंतर कारभाऱ्याने अैझाकला सारी माहिती सांगितली. तेव्हा अैझाकने रेबेकाला आपल्या तंबूत नेले नि पत्नी म्हणून स्वीकारिले. तेव्हा अैझाकचे वय ४० वर्षांचे होते.

## अब्राहाम पैगंबराचा मृत्यु

(अध्याय २५ वा) सरा साध्वी मेल्यानंतर सव्वाशे वर्षांवर वय झालेल्या पैगंबर अब्राहामने केटूरा नावाच्या स्त्रीशी लग्न केले. तिच्यापासूनही त्याला पुत्र झाले. त्यावाचून अब्राहामच्या ज्या रखेल्या होत्या त्यानाही संतति झाली. त्या सर्वांना यथोचित देणग्या देअून अब्राहामने देशोदेशी धाडून दिले. आणि मुख्य अुत्तराधिकार अैझाकलाच देअून वयाच्या १७५ व्या वर्षी अब्राहामने देह ठेविला.

## पैगंबर अैझाक नि रेबेका यांची कथा

पुढे रेबेकाला संतान होअीना. तेव्हा अैझाकने देवास प्रार्थिले. देवाच्या आशीर्वादाने रेबेकाला जुळे झाले. वडील पुत्र अीसा—तो फारच केसाळ होता.

घावटा जेकब तो साध्यासिध्या स्वभावाचा होता अैझाकची प्रीति ओसावर, पण रेवेकाची जेकबवर होती

पुढे मोठा दुष्काळ पडला. तेव्हा प्रभु त्या अैझाकच्या साक्षात् पुढे येअून म्हणाला, 'मी सागतो त्या देशी जा मी तुला नि तुझ्या वशाला हे देश देअीन मी अब्राहामशी केलेला करार सफळवीन तुझा वश आकाशातील तायासारखा असख्य वाढेल तेव्हा पैगबर अैझाक जरार ह्या प्राती गेला

## अैझाक पैगबर सुद्धा बायकोला बहीण म्हणतो

पण जेरारमध्ये येताच (पूर्वी अब्राहामची गत झाली तशीच अैझाक पैगबराची होअून) लोक विचारू लागले की, 'ही स्त्री तुझी कोण ? तेव्हा आपली तो बायको असे न सागता अैझाकने सागितले, 'ही माझी बहीण !' कारण त्याला अशी भीति पडली की, रेवेका दिसण्यात सुरेख, तिला पत्नी म्हणावी, तर तिला नेता यावे म्हणून लोक मला ठार मारतील !

पण पुढे अेकदा असे घडले की, त्या देशाचा तो फिलिस्टाअिनाचा राजा अभिमलेक आपल्या खिडकीतून पाहात असता त्याला अकस्मात् रेवेकाशी लडिवाळपणे लगटताना अैझाक दिसला ! तेव्हा त्याने अैझाकला बोलावून विचारले, 'ह काय, ही तुझी बायकोच असली पाहिजे बहीण कशी म्हणालास ?' तेव्हा अैझाकने आपण जिवाच्या भयाने तस खोट बोललो असे सागितले अभिमलेक म्हणाला, 'माझ्या लोकातून कोणी हिच्याशी सग केला तर ? ह पाप तू आमच्यावर ओढवून आणल नाहीस का ?' असे म्हणून त्या राजाने प्रजेस समज दिली की, कोणीही रेवेकास वा अैझाकला त्रास देता कामा नये' (अ २६)

नतर तेथेच शेतीभाती करून अैझाक भरभराट पावला. काही दिवसानी त्याच्या वाढत्या शक्तीला पाहून फिलिस्टाअीनच्या राजाने त्याला तो प्रात सोडून जाण्यास सागितले

पुढे अैझाक काही काळानतर वृद्ध होअू लागला आणि त्याची दृष्टि अधूक झाली तेव्हा आपल्या आवडत्या पुत्राला, ओसाला जवळ बोलावून तो म्हणाला, 'बघ, आता माझा काही नियम नाही म्हणून आज अेकदा तू स्वत पारध करून आणलेले मास मला पोटभर खावयाची आलेली हौस पुरवून घेअू दे तर जा नि पारध करून अुत्तम मास मला खाअू घाल नि माझा आशीर्वाद मी तुला देअीन' त्याप्रमाणे त्याचा वडील पुत्र ओसा धनुर्बाण घेअून मृगयेस गेला

वृद्ध अैझाकचे हे बोलणे रेवेकास आवडले नाही कारण तिची प्रीति तिच्या धाकट्या मुलावर होती यासाठी तिने त्याला गुपचूप बोलावून घेतले नि म्हणाली 'जेकब, तुझ्या वडील भावाला तुझ्या वडिलानी मृगयेस धाडले आहे आणि ते

त्यालाच संतोषून वरदान देतील. तेव्हा तू असे कर की, मी तुला शिजवून देते ते रुचकर मांस घेऊन तूच तुझा भाऊ औसा आहे म्हणून पुढे होऊन अँझाकला दे. पोटभर जेऊ घाल म्हणजे हे वरदान देणे ते तुलाच दिले जाईल !'

तेव्हा जेकब म्हणाला. ' बाबाना दिसत नसले तरी स्पर्शता येते. माझा वडील भाऊ औसा केसाळ आहे. तेव्हा मी जर तोच म्हणून पुढे गेलो तर ते क्वचित् माझ्या अंगावरून हात फिरवून चाचपतील नि मी केसाळ नसल्याने माझेच कपट उघडकीस येईल !'

रेबेका म्हणाली, ' भिऊ नकोस, औसाचा हा अंगरखा मी तुला घालते. बोकडाच्या केसाळ कातड्याचे हातमोजे हातावर घाल. घे हे मांस, रोट नि तुझा भाऊ औसा मृगया करून येतो त्यापूर्वी वडिलांकडे जा.' त्याप्रमाणे जेकब गेला वृद्ध पैगंबर अँझाकला तो आला तसा औसाच आला म्हणून वाटले. त्या अंध पित्याने त्याला आनंदाने म्हटले, ' औसा, ये, मला भेट, ये मुला, ही मृगया इतक्या लौकर कशी सापडली ?' जेकब औसासारख्या आवाजात म्हणाला, ' देवाची इच्छा ! आता बाबा उठा नि जेवा ' अँझाक म्हणाला, ' पण जवळ ये म्हणजे मी स्पर्शून बघतो तू औसाच आहेस की नाहीस तें.' तसा जेकब त्या अंध वृद्धाजवळ गेला, अँझाकने त्याला चाचपून पाहिले नि म्हणाला, ' आवाज जेकबचा आहे पण हात तर औसाचा आहे !' (कारण त्यावर केसाळ मोजे होते आणि औसा केसाळ होता.) तेव्हा पैगंबर अँझाकची फसगत होऊन त्याने औसाच समजून जेकबला कडकडून मिठी मारली, त्याचे मुके घेतले, त्याची वस्त्र प्रेमभराने हुंगली, आणलेले मांस पोटभर खाल्ले आणि त्याला वरदान दिले की, ' जा, पुत्रा तुझे सारे भाऊ तुझ्या अंकित होतील, तुझा द्वेष करतील ते नाश पावतील. तुझी भरभराट होईल. राष्ट्रं तुझ्यापुढे मान वाकवितील !'

वृद्ध अँझाकचा आशीर्वाद उपटून जेकब परत जातो न जातो तोच औसा स्वत: पारध करून शिजवून आणलेले मांस घेऊन त्या आपल्या पित्याकडे आला. तेव्हा जेकबने आधीच कपटाने आपल्या नावे पित्यास कसे फसविले नि पित्याचे वरदान उपटले ते त्या औसाच्या नि अंध पित्याच्या ध्यानात येऊन दोघेही शोकाकुल झाले. पण जे वरदान देण्याची दैवी शक्ति पैगंबर अँझाकमध्ये होती ते वरदान तो जेकबला देऊन चुकला होता, हे पाहून औसा फार शोक करता झाला.

अशाच प्रकारे त्या दोघा भावाचें भांडण विकोपास जाऊन औसाने संधि सापडताच आपल्या धाकट्या भावाला, जेकबला ठार मारण्याचा बेत केला ! हें जाणून रेबेका घाबरली नि तिने ' आपल्या माहेरी जाऊन तेथील कोण्या माहेरच्या मुलीशी लग्न लाव नि तिकडेच राहून संकट जाओनो जीव वाचव ' असे जेकबला सांगून त्याला औसाच्या नकळत दूर धाडून दिले.

## जेकबचा राशेलशी विवाह

आपल्या मामाच्या घरी निघून जात असता वाटेत दगडाची अुशी करून जेकब निजला असता त्याला स्वप्नात दिव्य दृश्य दिसले पृथ्वीवर ठेवलेली अेक शिडी थेट स्वर्गाग्रत पोहोचलेली आणि देवदूत तिच्यावरून चढत अुतरत आहेत ! आणि अहो आश्चर्य ! प्रभु स्वत वर अुभा राहून म्हणाला, 'जेकब मी अब्राहामचा देव, अैझाकचा देव, ज्या भूमीवर तू आहेस, ती सारी भूमि मी तुला नि तुझ्या वंशाला देणार ! तुझा वंश चारी दिशाना विस्तारेल !'

जेकब स्वप्नातून अुठताच म्हणाला, 'अहो आश्चर्य ! स्वर्गाचे दार त हेंच हीच पुण्यभूमि !' अुशी केलेला दगड त्याने तेथे त्या साक्षात्काराची स्मृति म्हणून अुभारला, आणि त्यावर तेल ओतल 'हा स्तभच देवाच गेह होअील ! अस भावून जेकब पुढे चालला (अध्याय २८)

जाता जाता तो अेका विहिरीपाशी आला तेथे मेंढपाळ मंडळी त्यांनी आपले कळप ते तेथेच पाणवीत असत त्याना जेकब म्हणाला, 'गड्यानो तुम्ही कुठले ?' 'हेरन गावचे ' ते म्हणाले 'मग तुम्हाला लेबन, जेहारचा पुत्र माहीत आहे काय ?' 'हो तर, आमच्या ओळखीचेच आहेत ते !' 'कुशल आहेत ना ती मंडळी ?' 'अगदी कुशल !' अशी प्रश्नोत्तर झाली

तोच अेक मुलगी आपल्या शेळ्या घेअून तेथेच आली, तेव्हा ते म्हणाले, हीच राशेल, लेबनचीच मुलगी !'

त्यासरशी जेकबने राशेलला मिठी मारली, तिचा मुका घेतला नि आनदाने अश्रु ढाळीत म्हणाला, 'मी तुझ्या वडिलाचा भाअूबद आह अग मीच लेबनची बहीण जी रेबेका, तिचा मुलगा ' त अैकताच राशेलने रगरग घरी जाअून त सागितल तेव्हा लेबन धावत तेथे आला, नि आपल्या बहिणीच्या त्या मुलाला त्यान कवटाळून त्याचे चुबन घेतल त्याला घरी आणले आणि अेक महिना ठेवून घेतले मग लेबन म्हणाला, 'जेकब, जरी तू माझा नातलग तरीही माझ्या घरी तू जे काम करतोस त्याचे तुला मी काही तरी प्रतिमोल देणेच योग्य काय पगार घेशील ?'

आता लेबनला दोन मुली वडील ली व धाकटी राशेल ली सौम्य नयनाची साधी मुलगी राशेल सुरेख व सुभग जेकबला तीच आवडे

यासाठी जेकब अुत्तरला, 'माझा पगार राशेल ! जर ती मला देशील तर मी सात वर्षे तुमची चाकरी करीन ' त्या प्रमाणे जेकबने सात वर्षे चाकरी केली. ती सात वर्षे त्याला सात दिवसाप्रमाणे झटकन् गेल्यासारखी वाटली त्याची राशेलवर तशीच प्रीति होती

मग जेकब लेबनला म्हणाला, 'आता माझी बायको राशेल मला दे. मी माझा करार पुरा केला. चाकरीची सात वर्षे भरली. आता राशेल माझी झाली. तिच्याशी संग करायला मला आता अनुज्ञा हवी.'

मग लेबनने मान्या मंडळींना जमवून मोठी जेवणावळ दिली पण रात्री आपली मुलगी जी 'ली' तिलाच लेबनने जेकबच्या खोलीत धाडली, आणि त्याचा—संग झाला. पण पहाटे दिसू लागले तेव्हा जेकब पाहातो .. तो ती 'ली' आहे ! त्यासरशी जेकबने आपला मामा लेबन—त्याला विचारले, 'तू हे काय केलेस ? मी धाकट्या—राशेलसाठी चाकरी केली नाही काय ? मग तू वडील मुलगी...रात्री माझ्या शेजेस देऊन असे का फसविलेस ?' तेव्हा लेबन म्हणाला, 'आमच्या देशी वडिलीला देण्याच्या आधी धाकटीला देत नाहीत. आता तू 'ली' चा आठवडा पुरा कर. मग राशेलसाठी आणखी सात वर्षे चाकरी केलीस की ती पण तुला मिळेल !'

तेव्हा जेकबने आपली वडील मामेबहीण जी 'ली' तिच्याशी ठरावाप्रमाणे आठ दिवस संग केला. मग आणखी सात वर्षे चाकरीच्या करारावर त्याची धाकटी मामेबहीण जी राशेल तीही त्याला देण्यात आली तिच्यावर लीपेक्षाही जेकबची अधिक प्रीति असल्यामुळे तिच्या संग सुखाने त्याला त्या दुसऱ्या सात वर्षांच्या चाकरीचे तर काहीच वाटले नाही.

## बहिणींची बाळंतपणाची चढाओढ

पण देवाने जेव्हा पाहिले की, जेकब 'ली'चा तिटकारा करीत आहे तेव्हा त्याने तिचा कुसवा सफळ केला. पण राशेल वांझच राहिली. 'ली' गरोदर होऊन तिला पुत्र झाला. तिने त्याचे नाव रुबेन ठेविले, आणि समजू लागली की, 'देवाने मला पुत्र दिला' आता मात्र माझा पति मजवरच प्रेम करील.'

आणि 'ली' पुन्हा गरोदर राहिली. तिला दुसरा पुत्र झाला. आणि तिला पुन्हा गर्भ राहिला, नि तिला तिसरा पुत्र झाला आणि 'ली'ला पुन्हा दिवस लोटले नि तिला चौथा पुत्र झाला नंतर मात्र तिला दिवस गेले नाहीत.

आता जेव्हा राशेलने पाहिले की, आपल्याला जो तो वांझ म्हणतो, तेव्हा ती आपल्या बहिणीचा हेवा करू लागली. ती जेकबच्या गळी पडली नि म्हणाली, 'मला मूल तरी दे नाही तर मी जीव देते !'

तेव्हा मात्र जेकबला राशेलचा संताप आला नि तो म्हणाला, 'तुझा कुसवा देवाने वांझ केला का मी ?'

तेव्हा राशेल म्हणाली, 'ही बघ माझी दासी बिला. हिला भोग. ती माझ्या मांडीवरच बाळंत होईल म्हणजे तेच मूल माझे (पूर्वी गुलामाची-दासदासींची-जी मुले ती धन्याचीच मालमत्ता ठरे.)

त्याप्रमाणे जेकबने बिल्हाशी संग केला. बिलाला पण मुलगा झाला. तेव्हा राशेल हर्षून म्हणाली, देवाने माझी पण विनंती अैकली, मला पण मुलगा झाला याचे नाव 'दान'. बिला पुन्हा गरोदर राहिली नि तिला दुसरा पुत्र झाला.

आता 'ली' घाबरली तिला मुले होणे बंद झाले आणि राशेलला मुले होअू लागली तेव्हा 'ली'ने पण आपली दासी जी झिल्फा तिला जेकबच्या शेजेत धाडली झिल्फालाही गर्भ राहून पुत्र झाला. तेव्हा 'ली' हर्षली, 'बघा, अेक सैन्यचे सैन्य येत आहे! पुत्रच पुत्र!

अेक दिवस काय झाले की, 'ली'च्या अेका मुलाने अेक कंद आणला. राशेलला तो हवा यासाठी तिने तो 'ली' जवळ मागितला तेव्हा ली फणकाऱ्याने म्हणाली की, 'काय, तू प्रथमपासून माझ्या पतीची प्रीति छिनावून नेली आहेस तेवढी पुरेशी नाही की काय? तर आता हा कंदही नेअू पाहतेस?' तेव्हा राशेल अुत्तरली, 'ह्या कंदासाठी मी त्याला अेक रात्र तुझ्याकडेच धाडीन. मला कंद दे' त्याप्रमाणे ठरले गुराढोरांना नि शेळयामेंढरांना चारून जेकब सध्याकाळी शेतातून परतताच 'ली'ने त्याला हटकले, 'आजची रात्र तुला मजकडेच राहिले पाहिजे कंदावारी मी आजची रात तुला खरीदले आहे आणि अशा रीतीने देवाची 'ली'-वर पुन्हा कृपा होअून बंद झालेला तिचा कुसवा पुन्हा सफल झाला यथाकाल ती प्रसवली तो तिचा पाचवा पुत्र. 'ली' पुन्हा गरोदर झाली नि तिला सहावा पुत्र झाला मातव्या बाळतपणात 'ली'ला मुलगी झाली तिचे नाव दीना.

पण शेवटी अीश्वराला राशेलचीही आठवण झाली तिला स्वत लाही गर्भ राहिला नि पुत्र झाला तोच जोसेफ

आता जेव्हा राशेललाही पुत्र झाला तेव्हा जेकब त्याचा मामा लेबन याला म्हणाला, 'बघ, आता माझी तुझ्या दोन्ही मुलींसाठी ठरलेली चाकरी पुरी होअून गेली आता मला माझी बायकामुले घेअून परत माझ्या वडिलधाऱ्याकडे जाअू दे पण लेबन म्हणाला, 'मी तुला आता म्हणशील ते वेतन देअीन अियेच माझ्या गुराढोरांची नि शेळयामेंढयांची ही अपार संपत्ति सांभाळून राहा' तेव्हा त्या कळपातील ठराविक भागाची नि प्रकारची गुरे नि शेळयामेंढया द्यावयाचा करार करून जेकब तीच चाकरी करीत राहिला पण पुढे जेकब जसजसा पशुधन, दास-दासी, मुलेमुली यांही संपन्न होत चालला, तसतसा लेबनला त्याचा मत्सर वाटू लागला. लेबनची वृत्ति अशी पालटलेली पाहून जेकबला भीति वाटली त्याने तेथून निसटून जाण्याचे ठरविले

तेव्हा त्याने राशेल आणि ली ह्या दोन्ही आपल्या भार्यांना बोलावून आणून आपला बेत मागितला तेव्हा त्या दोघी म्हणाल्या, 'आमची तरी आता ही माहेरची माणसे कोण लागतात? आम्हास ते परक्याच्याच स्त्रिया लेखतात. त्याच्या धनात आमचा वाटा नाही अुलट, आमच्यासाठी जे धन तू त्यांना मिळवून

दिलेस ते आमच्या बापाने नि भावाने स्वतःच सारें दावले; आम्हांस थोडेच दिले ! तेव्हा आम्हीही तुझ्याबरोबर येणार !'

हें अैकताच जेकबने आपल्या साऱ्या मुलालेकरांना, दासदासींना, धनधान्याला घेअून आपल्या स्त्रियाना अुंटावर बसवून गुराढोरांच्या कळपासह संधि सापडताच लेबनच्या गावातून गुपचूप यःपलाय केलें !

काही काळाने लेबनला तें कळताच तोही माणसें घेअून जेकबचा पाठलाग करीत चालला. त्याने जेकबला शेवटी गाठलें. जेकब म्हणाला, 'मी आता परतणार नाही.' लेबन म्हणाला, 'तू जा, पण चोरासारखा पळून कां जातोस ? आणि माझ्या देवघरातील देव का चोरलेस ?'

जेकब म्हणाला, 'हा आरोप मिथ्या आहे. माझ्या साऱ्या तळाची झडती घे.' त्याप्रमाणे लेबन जेकबच्या बायकामुलांच्या तंबूची सुद्धा झडती घेत चालला.

आता पळून येताना राशेलने आपल्या माहेरच्या देवाच्या मूर्ति खरोखरच चोरून आणल्या होत्या. झडती चालली तसें तिने त्या मूर्तींना अुंटावरच्या बोचक्यात लपविले नि त्या बोचक्याना भूमीवर टाकून ती त्यावर बसून राहिली. लेबन तिच्या तंबूची झडती घ्यावयास येताच ती म्हणाली, 'या आणि हवें तें पहा. तुम्ही वडील माणसें, मीच अुठून अुभे राहावें, तुम्हाला वदावें. पण मी आज बाहेरची बसले आहे म्हणून क्षमावें.' त्या लेबनच्या लोकांनी खूप शोधलें, पण देव सापडले नाहीत,

तेव्हा जेकब लेबनवर फार रागावला. लेबनही ओशाळला. शेवटी त्या दोघानीही मागचें विसरून प्रेमाने अेकमेकांना निरोप दिला. अेक दगडाची रास करून तिला साक्ष ठेवून त्यांनी मैत्रीचा करार केला, जेवणावळ दिली आणि लेबनने जेकबला शपथ घातली की, त्याने लेबनच्या त्याला दिलेल्या त्या दोघी मुलींना छळू नये किंवा दुसऱ्या बायका करू नये. मग ते पुत्राना व कन्याना चुंबून दोघे दोन्ही दिशाना निघून गेले. (अध्याय ३१)

पुढे जेकब आपल्या घरी परत चालला. पण तो पूर्वी जेव्हा अीसाच्या भयाने घरून पळाला तेव्हा त्याच्या त्या वडील भावाने त्याला मारण्याचे मनात आणले होते त्याची जेकबला फार धास्ती पडली. तेव्हा त्याने आपल्या पुढे आपले निवडक दासदासी, पशु भावास भेट म्हणून धाडून त्याची मनधरणी केली आणि अीसा-सामोरा येताच भूमीवर सात वेळा डोके टेकून वंदित जेकब अीसाला शरण गेला तेव्हा त्याचें पुन्हा सख्य झाले.

## कुमारी दीनाचें अपहरण

पुढे जेकब आपल्या बायकामुलांसह नि दासदासी गुराढोराकळपांसह शालेम नगराच्या मैदानावरदे गेला आणि तंब ठोकून त्याने तिथे तळ दिला.

निसटून नाहीसे होऊ तरच बचाव! असे योजून जेकब सर्व मुलामाणसासह अेदर प्रांताकडे गुपचूप निसटून गेला वाटेतच गरोदर असलेल्या राहेलचे पोट दुखू लागले वेदना फार झाल्या. बाळंत होऊन पुत्र झाला, पण राहेल त्या वेदनापायी वारली. त्याच पुत्राचे नाव बेंजामिन.

### पैगंबर जेकबच्या वडील पुत्राचा सावत्र आओशी संबंध

याच प्रवासात असताना पैगंबर जेकब याचा सर्वांत वडील मुलगा जो रुबेन त्याचा जेकबची स्त्री आणि रुबेनची सावत्र आओ जी बिला तिच्याशी झालेला संग अुघडकीस आला. पुढे जेकबचा पिता अिझाक हा १८० वर्षांचा झाल्यावर मृत्युशय्येवर पडला तेव्हा पैगंबर अिझाकच्या त्या मृत्युशय्येपाशी त्याचा वडील पुत्र अीसा नि धाकटा पैगंबर जेकब हे दोघेही होते त्यांनी पैगंबर अिझाकला यथाविधि पुरले

### विधवा सून तामर हिची कथा

जेकबचा सर्वांत वडील मुलगा रुबेन हें वर सांगितलेच आहे त्याच्याहून जो अेक धाकटा मुलगा जुडा त्याने शुआ नावाच्या कॅनेनाअिट माणसाच्या मुलीशी लग्न केले तिच्यापासून जुडाला 'अेर' नि 'ओनन' असे दोन पुत्र झाले. त्याला पुढे तिसरा पुत्र झाला तो 'शेलाह'

पुढे तिघांपैकी सर्वांत वडील पुत्र जो अेर त्याचे तामर नावाच्या मुलीशी जुडाने लग्न लावले परंतु अेर हा देवास नावडता होअून देवाने त्यास ठार मारले; तेव्हा ती तामर विधवा झाली अेरपासून तिला पुत्रही झालेला नव्हता

आपला वडील मुलगा असा निपुत्रिक वारल्यामुळे जुडाला वाअीट वाटले. यास्तव त्याने आपला दुसरा मुलगा जो ओनन त्याला सांगितले की, 'तू तुझी विधवा भावजय जी ही तामर तिच्याशी संग करून तिची संतति वाढीव.' पण ओननने ती आज्ञा नीटशी पाळली नाही. हें पाहताच देवाला राग आला आणि देवाने त्या ओननलाही ठार केले तेव्हा त्या विधवा तामरचा सासरा तो जुडा तिला म्हणाला, 'आता तू सध्या तरी विधवाच राहा, आणि आपल्या बापाच्या घरी थाव. माझा सगळ्यात धाकटा मुलगा शेलाह हा अगदी लहान आहे. आजच मी घाओी केली तर त्याच्या भावाप्रमाणे न जाणो, तोही मरेल! तेव्हा तो मोठा होओीतो नरी वाट पाहा. त्याप्रमाणे ती विधवा कामिनी तामर आपल्या बापाच्या घरी जाअून वाट पाहात राहिली.

पुढे काही दिवसांनी जुडाचीच बायको वारली तेव्हा तोच विधुर झाला. तिचे सुतक फिटताच तो आपल्या शेळयामेंढ्या भादरावयास टिमनाथ या स्थळी गेला तामरला कोणी ती बातमी दिली की,'नव तुझा सासरा शेळया भादरावयास जात आहे' हे अैकताच तिने विधवेची वस्त्रे सोडून ठेविली, पदर ओढला नि

जेकबची कन्या दीना, 'ली' ची मुलगी, हौसेने त्या गावच्या स्त्रिया कशा असतात हे पाहण्यासाठी त्या नगरात फिरावयास गेली.

पण तेथील राजपुत्र शेचेम ह्याने तिला पाहताच धरून नेली आणि तिच्याशी सग केला राजपुत्रास ती जीव की प्यार झाली नि तो राजाला म्हणाला, 'ह्याच तरुणीशी मला लग्न लावायचे!'

ही वातमी जेकबच्या मुलामाणमाना कळताच आपल्या अिस्रायलाच्या कन्येस त्या हिटाअिट राजपुत्राने अशी भ्रष्टविली याचा त्याना सताप आला पण ते बोलले नाहीत अितक्यात जेकबकडे राजाची मागणी आली की, 'राजपुत्राला तुमची कन्या द्या आपल्या दोन्ही जातीनी यापुढे अेकत्र राहावे आम्ही आमच्या मुली तुम्हास देअू, तुम्ही तुमच्या आम्हास देत चला वाटेल तो हुडा नि दहेज नि देणगी तुम्ही या कन्येसाठी मागा, पण ही कन्या दीना माझ्या पुत्राला द्या!'

जेकबच्या पुत्रानी त्या हिटाअिट राजाचे हे बोलणे अैकून राग न दाखविना अुत्तर दिले, 'ते सर्व खरे, पण आमच्या जातीच्या नियमाप्रमाणे जे लोक सुता करीत नाहीत त्याना अिस्रायलाच्या कन्या देणे निषिद्ध आहे! तेव्हा जर तुम्ही सारेचे सारे लोक सुता कराल तरच आम्ही आमच्या मुली देअू घेअू'

हें अैकून राजाने त्या नगरीतल्या सर्व लोकाना समजावले की, करू या सुता! या लोकाना आपल्या जातीशी अेकजीव करून टाकल्यास आपले सुद्धा बळ वाढेल!' हे अैकून ते नागरिकही म्हणाले, 'ठीक, त्यांच्या मुली आपण करू, आपल्या ते!' असे योजून त्या हिटाअिट लोकातील साऱ्या पुरुषानी आपली सुता करविली त्या दिवशी ते सारेचे सारे त्या सुतेच्या घावाने आजारी पडले

तिसऱ्या दिवशी त्या नगरीत जो तो घरी विव्हळत पडलेला होता हे पाहताच दीनाचे भाअू जो तो तरवार अुपसून अकस्मात् राजवाड्यात घुसले राजा, राजपुत्र नि सैनिक याना तरवारीच्या धारेने कापून काढले, ते सारे नगर लुटून आणि आपली कन्या दीना हिला घेअून निघून गेले

✦ ✦ ✦

निसटून नाहीसे होऊ तरच बचाव! असे योजून जेकब सर्व मुलामाणसासह अेदर प्रांताकडे गुपचूप निसटून गेला. वाटेतच गरोदर असलेल्या राशेलचे पोट दुखू लागले. वेदना फार झाल्या. बाळंत होऊन पुत्र झाला, पण राशेल त्या वेदनापायी वारली. त्याच पुत्राचे नाव बेंजामिन.

### पैगंबर जेकबच्या वडील पुत्राचा सावत्र आओशी संबंध

याच प्रवासात असताना पैगंबर जेकब याचा सर्वांत वडील मुलगा जो रुबेन त्याचा जेकबची स्त्री आणि रुबेनची सावत्र आओ जी बिला तिच्याशी झालेला संग अुघडकीस आला. पुढे जेकबचा पिता अैझाक हा १८० वर्षांचा झाल्यावर मृत्युशय्येवर पडला. तेव्हा पैगंबर अैझाकच्या त्या मृत्युशय्येपाशी त्याचा वडील पुत्र अीसा नि धाकटा पैगंबर जेकब हे दोघेही होते. त्यांनी पैगंबर अैझाकला यथाविधि पुरले.

### विधवा सून तामर हिची कथा

जेकबचा सर्वांत वडील मुलगा रुबेन हे वर सांगितलेच आहे. त्याच्याहून जो *अेक धाकटा मुलगा जुडा त्याने शुआ नावाच्या कॅनेनाअिट माणसाच्या मुलीशी* लग्न केले. तिच्यापासून जुडाला 'अेर' नि 'ओनन' असे दोन पुत्र झाले. त्याला पुढे तिसरा पुत्र झाला तो 'शेलाह.'

पुढे तिघांपैकी सर्वांत वडील पुत्र जो अेर त्याचे तामर नावाच्या मुलीशी जुडाने लग्न लावले. परंतु अेर हा देवाम नावडता होऊन देवाने त्यास ठार मारले; तेव्हा ती तामर विधवा झाली. अेरपासून तिला पुत्रही झालेला नव्हता.

आपला वडील मुलगा असा निपुत्रिक वारल्यामुळे जुडाला वाअीट वाटले. यास्तव त्याने आपला दुसरा मुलगा जो ओनन त्याला सांगितले की, 'तू तुझी विधवा भावजय जी ही तामर तिच्याशी संग करून तिची संतति वाढीव.' पण ओननने ती आज्ञा नीटशी पाळली नाही. हें पाहताच देवाला राग आला आणि देवाने त्या ओननलाही ठार केले. तेव्हा त्या विधवा तामरचा सासरा तो जुडा तिला म्हणाला, 'आता तू सध्या तरी विधवाच राहा, आणि आपल्या बापाच्या घरी जाव. माझा सगळ्यात धाकटा मुलगा शेलाह हा अगदी लहान आहे. आजच मी घाओी केली तर त्याच्या भावाप्रमाणे न जाणो, तोही मरेल! तेव्हा तो मोठा होअीतो तरी वाट पाहा. त्याप्रमाणे ती विधवा कामिनी तामर आपल्या बापाच्या घरी जाअून वाट पाहात राहिली.

पुढे काही दिवसांनी जुडाचीच बायको वारली तेव्हा तोच विधुर झाला. तिचे सुतक फिटताच तो आपल्या शेळ्यामेंढ्या भादरावयास टिमनाथ या स्थळी गेला. तामरला कोणी ती वातमी दिली की, 'तव तुझा सासरा शेळ्या भादरावयास जात आहे.' हें अैकताच तिने विधवेची वसने सोडून ठेविली, पदर ओढला नि

अगाभोवती गुंडाळून जुडाच्या वाटेत अुघड्या जागी बसला कारण जुडाचा तिसरा मुलगा जो शेलाह तो जाता मोठा झाला असताही पूर्वी ठरल्याप्रमाणे त्याच आपल्याशी लग्न करण्याचे जुडा टाळीत आहे हे ती जाणून होती

जुडाने तिला जेव्हा पाहिले तेव्हा त्याला वाटले की, ती कोणी वेश्या आहे कारण तोंड पदरात थाकलेले होते तिला पाहताच जुडा जवळ गेला नि म्हणाला, 'चल ये मजशी संग कर ती बोल्ली माझ्याशी संग करावयाचा? पण काय देशील? जुडा म्हणाला कळपातील अेक कोकरू धाडीन तुला' ती बोल्ली, 'पण ते तू धाडीतो गहाण ठेव काही वस्तु 'काय ठेवू गहाण?' ती बोल्ली, 'हा तुझा मुद्रा, ही सलकडी नि ही काठी' जुडाने त्या वस्तु तिच्यापाशी ठेविल्या नि तिच्याशी संग केला तिला गर्भ राहिला मग ती लगेच अुठली ती घरी गेली तो पदर काढला आणि विधवापणाची वस्त्रे पुन्हा ल्याली

जुडाला ती कुणी तरी अनोळखी वेश्याच वाटली होती म्हणून त्याने ते कोकरू तिच्याकडे आपल्या अेका मित्राच्या हाती धाडले पण तो मित्र तेथे येअून पाहतो तो तेथे वेश्या अशी कुणीच दिसेना त्याने तथील लोकांना विचारले कुठे आहे ती वेश्या? येथ अुघडपणे बसत असे नाही का?' लोक म्हणाले 'छे बुवा, अिथे तर वेश्या बिश्या कोणी नसते!

मानतर तीन महिन्याच्या आत जुडाला लोक म्हणू लागले की, 'तुझी सून व्यभिचारी निघाली! ती स्वैरिणी गर्भार आहे! तेव्हा जुडा रागावला 'तिला बाहेर आणा! जिवंत जाळून टाकली पाहिजे तिला!'

तामरला जेव्हा बाहेर काढली तेव्हा तिने आपला सासरा जो जुडा त्याच्याकडे त्या वस्तु धाडून त्याला म्हटले, ज्या मनुष्याच्या ह्या वस्तु असतील

तिचाच सासरा जेकबचा पुत्र असा संग करू जात असता परमभक्त जेकबला वेळीच सावध कसे केले नाही ? ह्या दोन्ही मुलांना जुडाची मुले म्हणून जेकबच्या कुटुंबात देवाने कसे सामावले ? याचा ऊलगडा या कथेत सापडत नाही, ते ठीकच कारण अशा भक्तिविजय छापाच्या जेवढ्या कथा, तेवढ्या ज्यू लोकात या मुस्लिमात वा आमच्यात युक्तिसंगत अशा कधी नसायच्याच ! देवभोळेपणा हाच त्याचा अरुचार !! फार काय, प्रत्यक्ष पैगंबर जेकबचा वडील मुलगा रुबेन हा आपल्या त्या बापाच्या दुसऱ्या पत्नीच्या शेजेस गेला तेव्हा देखील देवाने जेकबला ती आगाऊ सूचना दिली नाही ! आणि लहानसहान प्रकरणी देखील वारंवार त्या भक्ताला देव म्हणे भेटून आगाऊ सावध करी ! – लेखक)

## समारोप

या यहुदी लोकाचा पवित्र धर्मग्रंथ, ज्याला ख्रिश्चन लोक जुना करार म्हणतात, त्याचा प्रथम खंड जो 'सृष्टयुत्पत्ति' (The Genesis) त्यातील स्त्रीविषयक माहिती देणारे मुख्य श्लोक अेकत्र गुंफून त्याचा अनुवाद या तिन्ही लेखाकात आम्ही दिला या तिन्ही लेखाकातील नाना कथावरून न्यूनाधिक तीन सहस्र वर्षांपूर्वी पॅलेस्टाअिन ते अिजिप्तपर्यंत येजा करणाऱ्या अजपाल (धनगर) वृत्तीच्या प्राचीन यहुदी लोकातील स्त्री अेकदरीत कशी असे याचे अगदी यथावत् चित्र वाचकाच्या डोळ्यापुढे अुभे राहते,

यहुदी लोकाचा हा धर्मग्रंथ अितिहास ह्या दृष्टीने अवघ्या मानव जातीची अेक अत्यंत मूल्यवान् ठेव आहे अत्यंत प्राचीन अशा मानवी अितिहासाचे वेद-अवेस्ता नि हा जुना करार हे धर्मग्रंथ म्हणजे जिवंत मोलपटच आहेत

परंतु ह्या ग्रंथाविषयी त्याच्या धार्मिक अनुयायांची जी आजवरची निष्ठा असे की, ते धर्म त्रिकालाबाधित, सर्वज्ञानमय, त्रिकालदर्शी आणि अीश्वरोक्त होत, ती निष्ठा मात्र ह्या धर्मग्रंथाच्या तात्त्विक कसोटीत चुकीची ठरते ह्या तीन लेखाकात ह्या अेका धर्मग्रंथातील अगदी पहिला नि अग्रगण्य खंड जो सृष्टयुत्पत्ति, त्याच्यातील ज्या बहुतेक कथा नि कथानके आम्ही अनुवादिली आहेत, त्यावरूनही तेच मत निर्विवादपणे स्पष्ट होते कारण त्यातील सृष्टिज्ञान आज प्रयोगान्ती अनेक प्रकरणी अगदी भ्रांत ठरत आहे देवाच्या लीलांची वा देवपणाची वर्णने भाकड ठरत आहेत, देवपणाला न शोभेशी आहेत अेका सर्वज्ञानमय धर्मग्रंथात अीश्वरोक्त म्हणून दिलेल्या आज्ञा वा ज्ञान तशाच अीश्वरोक्त म्हणविणाऱ्या दुसऱ्या तितक्याच प्राचीन धर्मग्रंथाशी अगदी विसंगत नि परस्पर विरुद्धही असलेली आढळत आहेत

अुदाहरणार्थ, या यहुदी धर्मग्रंथातील लेखमालेत अनुवादिलेल्या भागात देव स्वत प्रकटून अीशप्रेषिताना (पैगंबराना) सांगतो की, मला गाअीचा वा वृषाचाच

वळी या मोठेमोठे देवप्रिय कुलपति गाओला मारून गोमासाची पक्वान्ने हया ग्रथातील माहितीप्रमाणे धार्मिक सस्कारात खात होते. पण आमच्या अिकडच्या त्याच काळच्या धर्मग्रथामध्ये गावध हा कोणत्याही मनुष्याने नाही केल्या करू नये, गोमास खाणे ह पच महापातकाप्रमाणे महापातक होय कुठलेही असले तरी गोघ्न हे अत्यत पापी नि वहिष्कार्य लोक होत, अस देव कठरवाने आज्ञापीत आह! अेकाच वेळी देव अत्यत विरुद्ध अशा आज्ञा सार्वभौम धर्म म्हणून, सार्वकालिक, त्रिकालाबाधित कर्त य म्हणून आपल्या मानवी वशाच्या प्रजेला निरनिराळ्या देशात पाठून अशा दुटप्पीपणाने त्याच्यात भयकर तेढ माजवून ठेवील ह शक्य नाही असा दुटप्पीपणा साध्या माणुसकीला देखील वर्ज्य – मग देवाच्या देवपणाला, देवस्कीला तर त अगदीच हीनविणार कृत्य ठरते!

दुसर अुदाहरण याच प्रकरणातील भाषाच्या गाधळाविपयीच पहा पूर्वी सारी मनुष्ये अेकच भाषा बोलत त्यामुळे त्याच्यात अेकी होअून ते मोठमोठी काम पार पाडू लागत त्यानी अेक अत्युच्च मनोरा बाधण्यास आरभिले त काम पाहण्यास देव आला पण तो अुच्च स्तभ पाहताच देव म्हणाला, 'अरे, ह काय, हीं माणस अशीच जुटीने वागू लागली, तर आकाशास पोचेल असा अुच स्तभसुद्धा हे बाधतील! छट! हे अुद्या देवासारखे समर्थ होतील! मग मला देव म्हणून कोण विचारतो?' अस भिअून नि रागावून देवाने माणसाची भाषा गाधळून टाकली! भाषात फूट पाडली? त्यामुळे अेकाची भाषा दुसऱ्यास कळेनाशी होअून मनुष्यात पृथक भाषाभाषी जाती झाल्या, त्याच वळ घटले! (अध्याय ११)

आता अेक भाषा ठेवली तर त्याचा परिणाम काय होअील ह प्रथमच कळण्याअितका दखाल देव दूरदर्शी नव्हता की काय? 'देव तो स्तभ बघण्यास आला तव्हा त्याला ते कळल ह देवाच्या सर्वसाक्षीपणास लाछन लावीत नाही काय? तिसरी विसगति ही की, मनुष्यजातीत अेकी नि जूट झालेली पाहून ज्या देवास आनद न वाटता अुलट मत्सर वाटतो, आपल देवपण जाअू नय म्हणून जो मनुष्यात फूट पाडतो तो देव, की कोणी 'फोडा नि झोडा' अस डुरकत प्रजेस पिळून काढणारा छळक कस? नरास नारायण करील, मनुष्यास देव करील तो देव ही देवाची व्याख्या कुठे, आणि हा आपल देवपण जाअू नये म्हणून मनुष्यात फूट पाडणारा, आपल्या प्रजेस वेठीचे दास बनविणारा देवाचा दैत्यपणा कुठे!' अर्थात अज्ञानी, भावड्या, अजपाल अवस्थेतील त्या तीन सहस्र वर्षापूर्वीच्या अेका धनगर जातीतील ही अक दतकथा होय! ज्याचे अक्षर नि अक्षर परम सत्य ओश्वरोक्त, त्रिकालदर्शी प्रेपितानी प्रकटविलेल आहे, अशा, कोण्या धर्मग्रथातील सूक्त नव्हे धनगरातील शिळोप्याची अेक गोष्ट मनुष्याच्या भाषा भिन्न कशा झाल्या, ह्या विषयीच्या भावड्या साध्यासोध्या धनगर मडळीतील अेका शहाण्याचा अेक तर्क, ह्या दृष्टीने वाचू गेले असता ही कथा किती गमतीची नि छान वाटते! पण अस्खलनीय,

अशकनीय, धार्मिक, औश्वरी सूक्त, म्हणून ती वाचू लागताच तो निव्वळ वेडगळ-पणा वाटू लागतो देवाची थोरवी वाढविण्याच्या ठायी देवाला दैत्याचे स्वरूप येते।

आणि ह्या भक्तिविजय छापाच्या भाबडया कथा अीश्वरोक्त, परमसत्य नाहीतच नाही, हें दर्शविणारा प्रबळ पुरावा म्हणजे हा की, देवाने बेबल्च्या ह्या स्तंभामाठी तोवर साऱ्या मनुष्यजातीची असलेली अेक भाषा गाधळवून तीत फूट पाडली नि अनेक भाषा केल्या ती घटना, ह्या अीश्वरोक्त धर्मग्रंथात साडेचार हजार वर्षांपूर्वी घडली म्हणून निश्चित काळ दिलेला आहे पण त्या काळी पॅलेस्टाअीन-पलीकडे प्राचीन चीन नि भारतामारख्या महाद्वीपातून अनेक भिन्न भाषा शतको-शतक आधीच प्रकर्ष पावलेल्या होत्या। बिचाऱ्या पॅलेस्टाअीनच्या अजपाल जातींना त्याची नावमुद्धा माहीत नसावीत हे अगदी साहजिक आहे पण 'देव'ही अितका गैरमाहितगार असावा हे मात्र साहजिक नाही कारण सर्वसाक्षी, सत्यमूर्ति नि सर्वज्ञानमय तो देव ह्या देवाच्या व्याख्येशी हे अज्ञान पूर्णपणे विसगत ठरते

तिसरे आणि सर्वांत निर्णायक अुदाहरण म्हणजे या लेखमालेच्या आरंभीच अनुवादलेला या धर्मग्रंथातील पहिलाच अध्याय पहा त्यात सृष्टयुत्पत्तीची कथा आहे आपल्या अिकडील धर्मग्रंथातही सृष्टीच्या अुत्पत्तीसंबंधी अगदी प्राचीन काळी त्या काळच्या ज्ञानी सज्जनानी किंवा कवींनी केलेले तर्क नि रचलेल्या कथा आहेतच त्या वेदादिक आपल्या अिकडच्या ग्रंथात चंद्र, सूर्य, वायु, वीज, पृथ्वीप्रभृति पदार्थांच्या अुत्पत्ति नि व्यापार याविषयी रचलेल्या कथा जशा आज विज्ञानाच्या प्रत्यक्ष प्रयोगसिद्ध ज्ञानाने लटक्या पाडल्या तशीच ही या मुस्लिम, ख्रिस्ती नि यहुदी लोकांच्या धर्मग्रंथातील सृष्टीच्या अुत्पत्तीची कथाही अक्षर नि अक्षर लटकी पाडली आहे। अेक प्राचीन बुद्धिविकासाची चुणूक म्हणून, अेक प्राचीन गमतीची कल्पना म्हणून, अेक कथा, अेक कविता म्हणून, हे सृष्टीच्या अुत्पत्तीचे ह्या धर्मग्रंथाच्या अगदी आरंभीच हे अीश्वरोक्त म्हणून दिलेले सूक्त आदी वाचनीय, गमतीचे नि गोड मुद्दा आहे पण तीच मनुष्याच्या अज्ञानाची, अेक कल्पित कथा आहे, विज्ञानाने तिला साफ चुकीची ठरविली आहे तिला अीश्वरीय ज्ञानाची सत्यकथा, जिचे अक्षर नि अक्षर त्रिकालाबाधित सत्य आहे नि प्रत्यक्ष देवाने सांगितले आहे अशी ती अशकनीय पवित्र अीश्वरोक्ति आहे असे म्हणणे म्हणजे अीश्वरीय ज्ञानालाच अज्ञानग्रस्त ठरविण्यासारखे होत

थोडी चुणूक म्हणून खालील दोनतीन विधेयेच ह्या दृष्टीने पाहू ह्या सृष्टि-कथेत म्हटले आहे, देवाने प्रथम पाणी निर्मिले, नंतर पृथ्वी, नंतर वनस्पति, आणि मग पृथ्वीवर अुजेड देण्यासाठी सूर्य नि चंद्र निर्मिले। आता प्राचीन मनुष्याच्या सृष्टीची रहस्ये अुलगडण्याचा अेक आरंभीचा प्रयत्न, अेक कल्पना म्हणून हे सूक्त

विचारार्ह, मनोरजक नि वाचनीय आहे पण त्रिकालाबाधित ओश्वरी सत्य म्हणून त्याला मिरविले म्हणजे त्याला किती हास्यास्पद नि टाकाअू ठरविले पाहिजे हें काय सांगावयास पाहिजे? आज विज्ञानाच्या प्रत्यक्षावगम्य पुराव्याने सिद्धलेल्या ज्ञानाशी ते पूर्णपणे विसंगत आहे, अगदी लटके आहे सूर्य प्रथम झाला, आणि तो केवळ पृथ्वीवरील माणसांना अुजेड देण्यासाठीच काय तो झालेला नाही वेळी सारी पृथ्वी, तिच्यावरील सारे धर्मग्रंथ, देवळे, मशिदी, चर्चेस मुद्धा क्षणार्धात भस्म करून टाकण्यासही तो सूर्य सोडणार नाही मनुष्य केला तो म्हणे या सगळ्या पृथ्वीचा भोग घेण्यासाठी! पण हजारो माणसांनाच वाघ, सिंह गट्ट करून आजवर माणसाचा भोग घेत आले, त्याचे काय? प्रथम पुरुष केला, नि त्याची अेक बरगडी घेअून त्यावर रक्त, मांस थापून देवाने स्त्री ‘केली’! ज्यांनी ह्या कथा रचल्या त्यांना जवळचा कोणी कुंभार मूर्ति, पुतळे, मडकी मातीची बनविती हे दिसत होते, याच विल्लीने त्यांनी मनुष्य नि स्त्री ‘करण्याचे’ ‘बनविण्याचे’ हें कोडे सोडविले! देव हा अेक महान् कुंभार त्याला वाटले, पुरुष ‘केला’ त्याचीच अेक बरगडी घेअून स्त्री ‘केली!’ स्त्रीची अँटोची ठेवण पाठीच्या बाजूने बरगडीसारखी बाकदार दिसतेही! जी सृष्टि केली ती मारीची सारी किडामुंगीसुद्धा अेका सहा दिवसांत करून टाकून थकलेला देव विसावा घ्यावयास ज्या दिवशी गेला, तो रविवार! म्हणूनच आपण साऱ्यांनी आता देखील रविवारी कामकाज बंद केले

धर्मकथा म्हणून, अशक्तनीय सत्य म्हणून मिरवीत राहिल्याने झाल्ली आहे, होणारी आहे कसे त पहा

ह्या सूक्ताला ओदवरोक्त सूक्त मानल्याने युरोप अणेपुरे अेक सहस्र वर्षे सृष्टि-विज्ञानविषयक अज्ञानाच्या अंधकारात गाडले गेले होते कोणी म्हटले पृथ्वी गोल आहे, की तो या सूक्ताविरुद्ध बोलतो म्हणून ठार झालाच ! कोणी म्हटले पृथ्वी फिरते, की तो ह्या सूक्ताविरुद्ध बोलतो म्हणून जिवास मुकलाच ! कुणी म्हटले मॅन् पृथ्वीआधी होता, सात दिवसात सारी सृष्टि, काटयवधि प्राणी, कीडमुंगी मनुष्यप्राणीसुद्धा सायसगीत केली ही या सूक्तातील क्लृप्ति भ्रम असून लक्षावधि वर्षांनी विकसत सृष्टि होत गेली, आजही प्राणी, मनुष्य, पक्षी विकसत जात आहेत असे जेव्हा विकासवादी (Evolutionists) म्हणू लागले तेव्हा पोपची पाखंडनाशक गदा त्याच्या डोक्यावर आदळली ! सहस्र कान्त्या होअून बस्टील-चा बंदीगड फोडून टाकून जसे बंदिवान् सोडवावे लागले, तसे या सूक्ताचे तट फोडून सृष्टिविज्ञानास धर्मवेडाच्या बंदीतून सोडवावे लागले ! तेव्हाच काय ते गेल्या तीनशे वर्षांमध्ये युरोपात सृष्टिविज्ञान बुद्धिवादाच्या पायावर अुभारले गेले, आणि त्यासरशी युरोप आज सृष्टिशक्तींना आपल्या सेवेस, गाडीला बैल जुपावे तसे जुपीत चालला आहे युरोपात आज या कथेस अेक शिळोप्याची गप्प यापलीकडे कोणीही शिक्षित अधिक महत्त्व देत नाही

ओश्वरकृत वा ओश्वरप्रेषित म्हणून मानले जाणारे सर्व धर्मग्रंथ हे मनुष्य-कृत आहेत हे वेदादिकांच्या बुद्धियुक्त निरीक्षणावरून जसे ठरते, तसेच मुस्लिम कुराण, ख्रिस्ती बायबल नि यहुदी धर्मग्रंथांचे मूळ जो हा जुना करार, हे 'बुक ऑफ मोझेस' त्यावरूनही सिद्ध होते त्या सर्व ग्रंथांचे अैतिहासिक, वाङ्-मयिक महत्त्व अपूर्व, मनुष्यजातीची ती अत्यंत आदरणीय, अभ्यसनीय वाक्-संपत्ति अितकेच काय ते खरे त्यातील शब्दन् शब्द खरा नाही. अनेक कथा निव्वळ कल्पना ! विज्ञानाच्या कसोटीस न टिकेल ते ह्या वेद, अवेस्ता, कुराण, बायबल, मोझेसोक्तादि ग्रंथात असले तरी ते टाकाअू हेच सत्य पूर्वीचे युग ते सत्ययुग नव्हे ! अतिप्राचीन ते ते अतिपूज्य, अतिध्येय, अतिपवित्र असलेच पाहिजे ही गोष्ट खोटी आहे

विचाराहं, मनोरंजक नि वाचनीय आहे. पण त्रिकालाबाधित ऑश्वरी सत्य म्हणू त्याला मिरविले म्हणजे त्याला किती हास्यास्पद नि टाकाऊ ठरविले पाहिजे काय सांगावयास पाहिजे? आज विज्ञानाच्या प्रत्यक्षावगम्य पुराव्याने सिद्धिलेल्या ज्ञानाशी ते पूर्णपणे विसगत आहे, अगदी लटके आहे सूर्य प्रथम झाला, आणि तो केवळ पृथ्वीवरील माणसांना उजेड देण्यासाठीच काय तो झालेला नाही वेळ सारी पृथ्वी, तिच्यावरील सारे धर्मग्रंथ, देवळें, मशिदी, चर्चेस सुद्धा क्षणार्धात भस्म करून टाकण्यासही तो सूर्य सोडणार नाही मनुष्य केला तो म्हणे या सर्व पृथ्वीचा भोग घेण्यासाठी ! पण हजारो माणसांनाच वाघ, सिंह गट्ट करून आजवर माणसाचा भोग घेत आले, त्याचे काय ? प्रथम पुरुष केला, नि त्याची अेक बरगडी घेअून त्यावर रक्त, मांस थापून देवाने स्त्री 'केली'! ज्यांनी ह्या कथा रचल्या त्यांना जवळचा कोणी कुंभार मूर्ति, पुतळे, मडकी मातीची बनवितो हे दिसत होते, याच विस्लीने त्यांनी मनुष्य नि स्त्री 'करण्याचे' 'बनविण्याचे' हें कोडे सोडविले ! देव हा अेक महान् कुंभार त्याला वाटले, पुरुष 'केला' त्याचीच अेक बरगडी घेअून स्त्री 'केली !' स्त्रीची अैटीची ठेवण पाठीच्या बाजूने बरगडीसारखी बाकदार दिसनेही ! जी सृष्टि केली ती सारीची सारी किड्यामुंगीसुद्धा अेका सहा दिवसांत करून टाकून थकलेला देव विसावा घ्यावयास ज्या दिवशी गेला, तो रविवार ! म्हणूनच आपण साऱ्यांनी आता देखील रविवारी कामकाज बंद केले पाहिजे !

धर्मकथा म्हणून, अशक्यनीय सत्य म्हणून शिकवीत राहिल्याने झालेली आहे, होणारी आहे कसे त पहा.

ह्या सूक्ताला ओदवरोक्त सूक्त मानल्याने युरोप अुणेपुरे अेक सहस्र वर्षे सृष्टि-विज्ञानविषयक अज्ञानाच्या अधकारात गाडले गेले होते कोणी म्हटले पृथ्वी गोल आहे, की तो या सूक्ताविरुद्ध बोलतो म्हणून ठार झालाच ! कोणी म्हटले पृथ्वी फिरते, की तो ह्या सूक्ताविरुद्ध बोलतो म्हणून जिवास मुकलाच ! कुणी म्हटले 'मी' पृथ्वीआर्धी होता, सात दिवसात सारी सृष्टि, कोटयवधि प्राणी, कीडमुगी मनुष्यप्राणीसुद्धा सायसगीत केली ही या सूक्तातील क्लृप्ति भ्रम असून लक्षावधि वर्षांनी विकसत सृष्टि होत गेली, आजही प्राणी, मनुष्य, पक्षी विकसत जात आहेत असे जेव्हा विकासवादी (Evolutionists) म्हणू लागले तेव्हा पोपची पाखडनाशक गदा त्याच्या डोक्यावर आदळली ! सशस्त्र क्रान्त्या होअून बॅस्टील-च्या बदीगड फोडून टाकून जसे बदियान् सोडवावे लागले, तसे या सूक्ताचे तट फोडून सृष्टिविज्ञानास धर्मवेडाच्या बदीतुन सोडवावे लागल ! तेव्हाच काय ते गेल्या तीनशे वर्षांमध्ये युरोपात सृष्टिविज्ञान बुद्धिवादाच्या पायावर अुभारले गेले, आणि त्यासरशी युरोप आज सृष्टिशक्तीना आपल्या सेवेस, गाडीला बैल जुपावे तस जुपीत चालला आहे युरोपात आज या क्येस अेक शिळोप्याची गप्प यापलीकडे कोणीही शिक्षित अधिक महत्त्व देत नाही

अीश्वरक्त वा अीश्वरप्रेषित म्हणून मानले जाणारे सव धर्मग्रथ हे मनुष्य-कृत आहेत हे वेदादिकाच्या युक्तियुक्त निरीक्षणावरून जसे ठरते, तसेच मुस्लिम कुराण, ख्रिस्ती बायबल नि यहुदी धर्मग्रथाचे मूळ जो हा जुना करार, हे 'बुक ऑफ मोझेस' त्यावरूनही सिद्ध होते त्या सर्व ग्रथाचे ऐतिहासिक, वाङ्-मयिक महत्त्व अपूर्व, मनुष्यजातीची ती अत्यत आदरणीय, अभ्यसनीय वाक्-सपत्ति अितकेच काय त खरे त्यातील शब्दन् शब्द खरा नाही अनेक कथा निव्वळ कल्पना ! विज्ञानाच्या कसोटीस न टिकेल त ह्या वेद, अवेस्ता, कुराण, बायबल, मोझेसोक्तादि ग्रथात असले तरी ते टाकाअू हेच सत्य पूर्वीचे युग ते सत्ययुग नव्हे ! अतिप्राचीन ते ते अतिपूज्य, अतिध्येय, अतिपवित्र असलेच पाहिजे ही गोष्ट खोटी आहे

या लेखमालेत स्त्रीविषयक तेवढाच भाग जरी या धर्मग्रथातून अनुवा-दिणे भाग पडले असले, तथापि तेवढयावरूनही आपल्या वेदात वा यहुद्याच्या जुन्या करारात जे वर्णिले तेच सत्ययुग ही आपली, वा मुस्लिम, ख्रिश्चन, पार्शी, यहुद्यातील पौराणिकाची समजूत किती भ्रात आहे हे स्पष्टपणे अुलगडून दाखविता येते स्त्रीविषयक कल्पना, आचार, वर्तन, व्यवहार जे ह्या लेखमालेत ह्या यहुद्याच्या अतिप्राचीन ओश्वरोक्त ग्रथातून दिले आहेत, त्यातील दोनचार अुदा-हरणाची छाननी केली असता हे सहज सिद्ध होते.

पहिले अुदाहरण म्हणून स्त्रीच्या अुत्पत्तीचीच कथा पहा ! स्त्रीनेच मनुष्य-जातीचा सर्वनाश केला ! स्त्री हीच मनुष्यजातीतील पहिला पापी ! तिसऱ्या अध्यायात सांगितले आहे की, आदम नि त्याच्या बरगडीपासून निर्मिलेली स्त्री अीव्ह ह्या जगातील पहिल्या स्त्रीपुरुषांना देवाने सांगितले की, 'ज्ञानवृक्षाचे फळ खाअू नका !' कारण, नाही तर मनुष्य देवासारखा ज्ञानी होअील अशी देवाला भीति पडली !! ('न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।' हे सांगणारा गीतेतील भगवान् कुठे आणि मनुष्यांनी अज्ञानी राहावे म्हणून जिज्ञासेसच निषेधिणारा हा जेनेसिसमधला देव कुठे !) परंतु देवाचा डोळा चुकवून सापाने अीव्हला म्हटले, 'ते ज्ञानफळ खा' म्हणून तिने ते खाल्ले, आदमने पण खाल्ले, आणि त्यामुळे देव रागावला ! शिक्षा काय दिली अीव्हला ? तर स्त्रीला यावच्चन्द्र-दिवाकरौ प्रसूतिवेदना भोगाव्या लागतील ! आता या गोष्टीवरून हे अुघड होते की, पहिली स्त्री नि पहिला पुरुष हे खोटे बोलणारे, देवाधर्माला न जुमानणारे, पहिले पापी होते ! तेव्हा सत्ययुगात जिकडे तिकडे देवप्रिय, पुण्यवान् धर्मभीरु, संयमी स्त्रीपुरुषांची रेलचेल अुडालेली होती, ही समजूत आपल्या पुराणातील वर्णनाप्रमाणेच या यहुदी पुराणावरूनही लटकी पडते.

आदम आणि अीव्ह — मनुष्यांची अगदी आद्य मातापितरे — अगदी नग्न असत देवाला तेच फार आवडे ! पण पुढे ती दोघे ज्ञानफळ खाअून देवापुढे नागवेपणी यावयास लाजू लागली; तेव्हा देव त्यांच्यावर या त्यांच्या संकोचाविषयी भयंकर रागावला ! नागवेपणाच्या संकोचामुळेच आदम नि अीव्ह ही देवमाणसे नागवली गेली हे वाक्य कोणत्याही अर्वाचीन नग्न संघाच्या द्वारावर कोरून ठेवण्यास हरकत नाही ! सत्ययुगात नग्नसंघाना प्रतिबंध नव्हता सत्ययुग ज्यांना चांगले म्हणावयाचे त्यांना नग्नसंघास अेकदम वाअीट म्हणता येणार नाही ! नग्नसंघ ही काही नवमतवादाची संस्था म्हणता येणार नाही !

अीव्ह नि आदम ह्यांना नग्नतेची जाणीव झाली, त्यांनी ज्ञानफळ खाल्ले, या त्यांच्या अपराधासाठी देवाने त्यांना नंदनवनातून हुसकून देण्याची शिक्षा दिली अपराध अीव्हचा, तिला प्रसूतिवेदनांचा दंड झाला तोही चालेल, पण त्या अेका अीव्हच्या अपराधासाठी साऱ्या स्त्रियांना वंशपरंपरा, सीतेसारख्या साध्वीस सुद्धा जो त्या प्रसूतिवेदनांचा दंड देवाने दिला म्हणून ही कथा सांगते तो खरा असल्यास आदम, अीव्ह ह्या सत्ययुगातील माणसांप्रमाणे सत्ययुगातील तो देवही अगदी अविचारी होता असे तरी म्हटले पाहिजे, नाही तर ही कथा अीश्वरोक्त, परमप्रमाण त्रिकालाबाधित धर्मकथा नसून अेक कुतूहलप्रिय साध्याभोळ्या माणसाची दंतकथा आहे असे तरी म्हटले पाहिजे. पुन्हा अीव्हसाठी प्रसूतिवेदनांचा शाप मानवी स्त्रियांना दिला म्हणून ही कथा म्हणते पण पशूतील मायांनाही प्रसूतिवेदना होतात त्या का ? अीव्ह स्त्री होती म्हणून केवळ मानवी स्त्रियांनाच नव्हे,

तर अवघ्या स्त्रीलिंगालाच तो शाप भोवला असेल तर ती अन्यायाची परमावधि झाली म्हणावयाची ! ख्रिश्चन साधूंच्या मठात पूर्वी ब्रह्मचर्याचा असा कडक नियम असे की, मठात स्त्रीच काय, पण स्त्रीलिंगी मांजरी, कुत्री, हरिणी, अुंदरी, घुशी सुद्धा कोणताही प्राणी फिरकता कामा नये ! त्यातलीच ही अेक गोष्ट म्हणावयाची ! अुद्या अेखादी स्त्री चोरी करताना पकडली की, तिच्या अपराधासाठी अवघ्या स्त्री जातीलाच नव्हे तर स्त्रीलिंगी, त्या त्या पशुपक्ष्यातील सार्‍या माद्यांना सुद्धा वंशपरंपरा पचवीस पचवीस फटके मारण्याचा दंड जर कोण्या वेड्या महमद तघलकाने दिला, तर त्याला आपण काय म्हणू ? परंतु ही कथा खरी धरल्यास सत्य युगात हाच न्याय होता असे म्हणणे भाग पडेल !

## सत्ययुगातील स्त्रीपुरुष संबंध

आपल्या पुराणातून प्राचीन स्त्रीपुरुषांच्या आणि मोठमोठ्या ऋषिपत्न्या, राजकन्या, महर्षि, राजर्षि यांच्याच चरित्रातून नव्हे, तर देवदेवतांच्या चरित्रातूनही काही काही प्रसंगी आजच्या बोल्शेव्हिक रशियातील स्त्रीपुरुषसंबंधानाही मागे सारणारी वर्णने जशी आढळतात, तशी या यहुदी देवातही आढळतात ही गोष्ट त्या प्रथातील स्त्रीविषयक जी जी चरित्रे या मालेत वानगीदाखल अनुवादिली आहेत, त्यावरुन वाचकांच्या ध्यानी आलीच असेल. यासाठीच 'न देवचरितं चरेत्।' किंवा ऋषीचे मूळ नि नदीचे मूळ शोधणे कठीण असे म्हणण्याचा शिष्टसंप्रदाय पडला आहे व तो योग्यही आहे. परंतु सत्ययुगात जिकडे तिकडे न्याय, नीति, शील, संयम यांचेच राज्य होतें, पापाची प्रवृत्तिच माणसात नसे, नव्हे माणसे, माणसे नसून देवच होती ही जी पौराणिकांची कल्पना असते, ती आमच्या पुराणाप्रमाणेच ह्या यहुदी पुराणावरूनही साफ चुकीची आहे हे कोणी विसरू नये अेवढ्यासाठीच या गोष्टीस अुल्लेखिणे भाग आहे.

त्यातही आमच्या हिंदु पुराणातील काही घटना घेअून त्याचाच तेवढा पक्षपाती बोभाटा करणाऱ्या आणि आपल्या पायाखाली वा पदराखाली काय आहे ते मात्र लपवून ठेवू पाहणाऱ्या पोटभरू मिस मेयो प्रभृति अहिंदु विदूषकांची तोंडे बंद पाडण्यासाठी निर्भेळ न्यायाच्या दृष्टीनेही खालील अुल्लेख आवश्यक आहेत.

वहीणभावाची लग्ने (अ. ४ ते ५), देवप्रिय कुलपति नोहा मद्यातिरेकाने बेशुद्ध होतो (अ १०) देवप्रिय साक्षात्कारी अब्राहाम लोट आपणास मारतील ह्या भयाने आपल्या बायकोला बहीण म्हणून म्हणतो, नि तिला तिच्यावर लोलुपलेल्या परपुरुषाच्या घरी राहू देतो, सावत्र बहिणीशी लग्ने, अनेक स्त्रियांशी लग्ने, दासीशी संबंध, सख्या बहिणी सवती होतात, चुलतबहीण, मामेबहीण, आतेबहीण ह्यांशी लग्ने, सवती मत्सरांचा साध्वी स्त्रियांतही माजलेला भयंकर मत्सर यांची अुदाहरणे तर पानोपानी आहेत. देवप्रिय थोर लॉट निपुत्रिक मरू नये यासाठी

# भारताच्या अितिहासातील
## पहिलें सोनेरी पान

### १ — चंद्रगुप्त-चाणक्य

आपल्या भारताच्या राष्ट्रीय जीवनाच्या अुप कालाचा आरभ न्यूनत पाच सहस्र वर्षांपासून दहा सहस्र वर्षांपर्यंत तरी आजच्या सशोधनानुसार प्राचीन आहे. चीन, बाबिलोन, ग्रीस प्रभृति कोणत्याही प्राचीन राष्ट्राच्या जीवनवृत्तान्ताप्रमाणे हा आपला प्राचीन राष्ट्रीय वृत्तान्तही पुराणकालात मोडतो म्हणजे त्यात असलेल्या अितिहासावर दतकथेची, दैवीकरणाची आणि लाक्षणिक वर्णनाची पुटेची पुटे चढलेली आहेत तरीही ही आपली जुनी 'पुराणे' आपल्या प्राचीन अितिहासाचे आधारस्तभच आहेत हे विसरता कामा नये हे प्रचड 'पुराण वाङमय' आपल्या साहित्याचे, ज्ञानाचे, कर्तृत्वाचे नि अैश्वर्याचे जसे अेक भव्य भाडार आहे तसेच ते आपल्या प्राचीन जीवनवृत्तान्ताचेही असगत, अस्ताव्यस्त नि सदिग्ध असले तरी अेक अमर्याद सग्रहालय आहे

परतु आपली 'पुराणे' म्हणजे निर्भेळ 'अितिहास' नव्हे

यास्तव मी त्या पुराणकालाचा विचार या प्रसगापुरता बाजूस ठेवणार आहे कारण मी ज्या सोनेरी पानाचा निर्देश करणार आहे ती सोनेरी पाने भारताच्या 'पुराणातील' नसून 'अितिहासातील' आहेत

### भारतीय अितिहासाचा आरभ

अितिहासाचे मुख्य लक्षण म्हणजे त्यातील वर्णनातील नि घटनातील स्थल नि काल ही जवळ जवळ निश्चितीने तरी सागता आली पाहिजेत आणि त्यातील घटनाना परकीय वा स्वकीय अवातर पुराव्याचे शक्यतो पाठबळ मिळत असले पाहिजे.

अशा कसोटीस बहुताशी अुतरणारा आपला प्राचीन काळचा वृत्तान्त हा बुद्ध कालापासून मोजता येतो यास्तव अनेक भारतीय नि पाश्चात्य प्राच्यविद्यावेत्ते आपल्या भारताच्या 'अितिहासा'चा आरभ ह्या बुद्धकालापासूनच सध्या समजत आहेत ह्या प्राच्यविद्यावेत्त्याच्या सतत चालणाऱ्या परिश्रमामुळे आज आपण ज्याला पौराणिक काल म्हणतो त्यातलाही काही भाग नवीन सशोधन झाल्यास ह्या अितिहासकालात समावेशिता येअील पण तोपर्यंत तरी बुद्धकाल हाच आपल्या 'अितिहासा'चा आरभ म्हणून समजणे भाग आहे

त्यातही कोणत्याही प्राचीन राष्ट्राचा निर्भेळ अितिहास निश्चितपणे ठरविण्याच्या कामी तत्कालीन जगातील तदितर राष्ट्रांच्या साहित्यादिक लिखाणात सापडलेल्या अुपोद्बलक अुल्लेखाचा फार अुपयोग होतो आज अुपलब्ध असलेल्या आणि निश्चितार्थ ठरलेल्या जगातील अैतिहासिक साधनामध्ये भारताच्या ज्या प्राचीन कालखंडाला असा भारतेतर राष्ट्रांच्या सुनिश्चित साधनाचा पाठिंबा मिळतो तो आपल्या अितिहासाचा कालखंड सम्राट् चंद्रगुप्ताच्या काळाच्या आगेमागेच चालू होतो कारण अलक्षांडरची स्वारी भारतावर जेव्हा झाली तेव्हापासूनच्या ग्रीक अितिहासकाराच्या नि पुढे पुढे चीन देशातील प्रवाशाच्या प्रवासवर्णनाच्या लेखातून भारतातील त्या त्या पुढील घटनाचे अैतिहासिक कसोटीस बव्हंशी अुतरणारे असे अनेक अुल्लेख सापडतात

## सोनेरी पान कोणतें ?

ह्या आपल्या अैतिहासिक कालातील ज्या सोनेरी पानाविषयी मी चर्चा करणार आहे तीच पाने काय ती सोनेरी म्हणून निवडण्यासाठी मी कोणची कसोटी वापरीत आहे ? तसे पाहता आपल्या ह्या अैतिहासिक कालात काव्य, संगीत, प्राबल्य, अैश्वर्य, अध्यात्म प्रभृति जवातर कसोटींना अुतरणारी शतावधि गौरवार्ह पान सापडतात परंतु कोणत्याही राष्ट्रावर पारतंत्र्यासारखे प्राणसंकट जेव्हा गुदरते, आक्रमक परशत्रूच्या प्रबळ टाचेखाली त स्वराष्ट्र जेव्हा पिचून गेलेल असत किंवा जाअू लागत तेव्हा तेव्हा त्या प्रबळ शत्रूचा पाडाव करून नि पराक्रमाची पराकाष्ठा करून स्वराष्ट्रास त्या पारतंत्र्यातून मुक्त करणारी, त्या पारतंत्र्यातून सोडविणारी आणि आपल्या राष्ट्राच स्वातंत्र्याचे आणि स्वराज्याचे पुनरुज्जीवन करणारी जी झुंझार पिढी, तिच्या नि तिला झुजविणारे जे धुरंधरवीर नि विजयी पुरुष त्याच्या त्या स्वातंत्र्ययुद्धाच्या वृत्तान्ताच जे पान त्या पानास मी अिथे सोनेरी पान म्हणून संबोधीत आहे कोणत्याही राष्ट्रात त्याच्या अशा परजयी स्वातंत्र्ययुद्धाची अैतिहासिक पान अतीव गौरविली जातात अगदी अमरिकेचेच अुदाहरण पहा रणांगणात अिंग्लंडला जीत करून ज्या समयी अमेरिकेने आपले स्वातंत्र्य छिनावून घेतले त्या विजयी दिवसालाच अमेरिकेच्या अितिहासातील सोनरी दिवस म्हणून सणासारखे गौरविले जाते, आणि त्या युद्धाच्या अितिहासाचे पान हे अमेरिकेच्या अितिहासातील सोनेरी पान गणले जाते.

## प्रत्येक मोठ्या नि प्राचीन राष्ट्रावर पारतंत्र्याचे संकट केव्हातरी कोसळलेलेच असतें

त्यातही अमेरिकेच्या राष्ट्राचा जन्मच मुळी कालचा! म्हणून त्याच्या टीचभर अितिहासात त्याच्यावर असेच काय त प्राणसंकट गुदरावे आणि त निवारणारे असेच

काय तें सोनेरी पान असावें ह्यात काही विशेष नाही परतु चीन बाबिलोनियन, पर्शियन, अिजिप्शियन, प्राचीन पेरू, प्राचीन मेक्सिको, ग्रीस, रामन प्रभृति जी पुरातन राष्ट्रें सहस्रावधि वर्षे नादत राहिली त्याच्या त्या विस्तृत राष्ट्रीय जीवनात प्रबलतर परकीयाच्या आक्रमणाखाली चेचले जाण्याचे अनेक प्रसग त्याच्यावर साहजिकपणेच येथून गेले तदा प्राणसकटातून त्यातील काही राष्ट्रानी आपल्या पराक्रमाने पुन्हा पुन्हा मुटकाही करून घेतली आणि त्याच्या त्या त्या परदास्यूना दाती तृण धरावयास लावल सहस्रावधि वर्षे आपले राष्ट्रीय अस्तित्व नि प्राबल्य टिकवून धरणाऱ्या अशा राष्ट्राच्या अितिहासात वेळोवेळी पुन पुन्हा स्वातत्र्य-सपादनार्थ केलेल्या रणागणाची नि त्यात मिळविलेल्या विजयाची अेकाहून अधिक अशी सोनेरी पाने सन्मानिली गेलेली आहेत भारताचा अितिहास तर त्या प्राचीन-तम कालापासून आजपर्यंत अखडपणे चालत आलेला। त्याच्या प्राचीन काळात भरभराट असलेली वरील बहुतेक राष्ट्रे नि राज्ये आज नामशेषसुद्धा होअून गेली आहेत अेक चीनचे महान् राष्ट्र तेवढे भारताच्या महनीयतेचे पुरातन साक्षी म्हणून आज अुरलेले आहे

चीन आणि भारत ही दोन्हीही राष्ट्रे अति विस्तृत असल्यामुळे आणि अति-प्राचीन कालापासून सततपणे आजपर्यंत आपल स्वातत्र्य आणि सामर्थ्य टिकवून नादत आलेली असल्यामुळे त्याच्यावर अनेक वेळा अितर अल्पजीवी राष्ट्रापेक्षा अधिक प्रसगी परदास्याची प्राणसकटे कोसळलेली आढळतात यात काही आश्चर्य नाही चक्रनेमिक्रमाचा अटळ नियम त्यानाही ह्याच हिंदुस्थानावर ज्याप्रमाणे शक, हूण, मोगलादिकाच्या अनेक चढाया झाल्या त्याचप्रमाणे चीनवरही त्या आणि अितर परराष्ट्राच्या अनेक चढाया झालेल्या आहेत हूणाच्या प्रलयापासून बचाव करण्यासाठी तर चीनने त्याच्या राष्ट्राभोवती ती जगत्प्रसिद्ध तटबदी, ती Chinese Wall बाधली होती पण तिलाही वळसे घालून किंवा अुल्लघून चीनच्या शत्रूनी त्याला पादनाक्रान्त करावयास सोडल नाही बहुधा अशात परतु काही वेळा तर सपूर्णत चीनही परकीय राजसत्तेच्या जोखडाखाली सत्रस्त होअून पडलेला होता तथापि त्या त्या वेळी ते महान् राष्ट्र पुन पुन्हा नवजाने नि चैतन्याने अनुप्राणित होअून त्या परकीय सत्तेला अुन्मूलन पाडू शकले, आपले जीवित, सत्त्व नि स्वातत्र्य राखू शकले आणि आजही पुन्हा अेक स्वतत्र नि सामर्थ्यशाली राष्ट्र म्हणून नादत राहिले आहे हच खरे अैतिहासिक आश्चर्य होय। भारताच्या अितिहासाचे मूल्यमापन करताना या प्रकरणी तोच मानदड वापरला पाहिजे परतु विशेषत अिंग्रजाच्या परकीय सत्तेखाली जेव्हा हिंदुस्थान दबला होता तेव्हा अनेक अिंग्रजानी भारताचा अितिहास अशा विकृत पद्धतीने लिहिला आणि त्यानी काढलेल्या शाळामहाशाळातून तरुणाच्या दोनतीन पिढ्याकडून त्या विकृत अितिहासाची अितकी पारायण करून घेतली की, जगाचाच नव्हे तर आपल्या स्वतच्या

लोकांचाही त्या प्रकरणी बुद्धिभ्रंशच व्हावा हिंदुस्थानचे राष्ट्र हे सतत ह्या वा त्या परसत्तेखालीच दडपलेले होते, हिंदुस्थानचा अितिहास म्हणजे हिंदूंच्या पराभवा-मागून पराभवाचीच काय ती अेक जंत्री आहे, अशी घडघडीत असत्य, अुपमर्दकारक आणि दुष्ट हेतूनी केलेली विधाने चलनी नाण्यासारखी परकीयाकडूनच नव्हे तर काही स्वकीयाकडूनही वसटक व्यवहारिली जात आहेत त्याचा प्रतिकार करणे हे स्वराष्ट्राभिमानाच्या दृष्टीनेच नव्हे तर अैतिहासिक सत्याच्या दृष्टीनेही अत्यंत आवश्यक आहे ह्या कार्यी जे काही प्रयत्न अन्य अितिहासज्ञाकडून होत आले आहेत, त्यात ह्या प्रसगानिमित्ते प्रचाराची शक्यतो अधिक भर घालणे हे अेक कर्तव्यच आहे यासाठी ज्या ज्या परकीय आक्रमकानी हिंदुस्थानवर स्वाऱ्या केल्या किंवा राज्यसत्ता गाजविली त्या त्या परकीयाचा अंती धुव्वा अुडवून देअून आपल्या हिंदुराष्ट्रास ज्यानी ज्यानी विमुक्त केले त्या त्या हिंदुराष्ट्रविमोचक पिढ्याचे आणि त्याचे प्रतीक म्हणून त्या त्या सग्रामातील काही युगप्रवर्तक वीरवराचे अैतिहासिक शब्दचित्रण करण्याचे मी येथे योजिले आहे

## अलेक्झांडरची स्वारी

पूर्वी अुल्लेखिलल्या भारताच्या अैतिहासिक कालातील भारतावर झालेली परराष्ट्राची पहिली प्रसिद्ध स्वारी ही अलेक्झांडरची होय अिसवी सन पूर्व ३२७ मध्ये ही स्वारी झाली त्या प्राचीन काली युरोपमधली सध्याची अिंग्लंड, फ्रान्स, जर्मनी प्रभृति राष्ट्रे जन्मली सुद्धा नव्हती रोमन साम्राज्याची पायाभरणीही झालेली नव्हती युरोपात अेक ग्रीक लोक तवढे गाजत होते ग्रीकाची लहान लहान नगर राज्ये (City States) स्वतत्रपणे नादत असत त्यात स्पार्टा, अथन्स ही नगरराज्ये पुढारलेली परतु ह्या फुटकळ नगरराज्यावर जेव्हा सघटित विस्तृत, अेकवटित नि बलाढ्य अशा त्या वेळच्या पारसिक साम्राज्याच्या अधिपतीने स्वारी केली तेव्हा त्या स्पार्टा, अथन्स प्रभृति फुटकळ नगरराज्याचा काहीच टिकाव लागला नाही त्या लहान लहान ग्रीक प्राजकानी (Republics नी) लढण्याची पराकाष्ठा केली, पण पारसिक साम्राज्याच्या सेनासागरापुढे त्याचे काहीच चालेनासे झाले ह्यामुळे पारसिकाप्रमाणेच आपल्या साऱ्या फुटकळ नगरराज्याचे मिळून अेक प्रबळ ग्रीक राज्य स्थापावे नि शत्रूशी अेकमुखी सामना द्यावा अशी ग्रीक लोकात तीव्र अिच्छा अुत्पन्न झाली त्याच्यातील मॅसिडोनियाचा राजा फिलिप याने त्या महत्त्वाकाक्षेने लहानमहान ग्रीक प्रातर जिंकली परतु त्याचे अेकमुखी राज्य वाढत चालले असताच तो मृत्यु पावला तथापि त्याच्यामागे त्याच्या राज्यावर बसलेला त्याचा पुत्र हा त्याच्यापेक्षा शतपटीने महत्त्वाकाक्षी, विजयिष्णु आणि शूर निघाला त्याचेच नाव अलेक्झांडर साऱ्या ग्रीक राष्ट्रात त्याने अेकराष्ट्रीयत्वाचे नवचैतन्य सचारविले बलाढ्य सैन्य अुभारले, आणि ग्रीकाच्या राष्ट्राचा शत्रु जो

पारसिक सम्राट दरायस त्याच्यावरच अलेक्झांडर चालून गेला. ग्रीकांच्या त्या संघटित सैन्यापुढे दरायसच्या बहुसंख्य पण असंघटित साम्राज्यसेनेचा धुव्वा उडाला. अलबेला येथील लढाईत तर पारसिक राजसत्ताच उखडून पडल्यासारखी झाली. अलेक्झांडर आपल्या विजयोद्दीप्त सेनेसह पारसिक सम्राटाच्या थेट राजधानीवर चालून गेला आणि ती जिंकून त्याने स्वतःचीच पारसिकांचा सम्राट् म्हणून घोषणा केली. ह्या अपूर्व विजयाने अलेक्झांडरची राज्यतृष्णा अधिकच वाढली. ग्रीसच्या नि पारसिकांच्या सुविशाल साम्राज्याचे सम्राटपद हाती येताच अलेक्झांडरला स्वर्ग दोन बोटे उरल्यासारखा वाटू लागला. आपण मनात आणू तर आपण सार्‍या जगास जिंकू शकू आणि इतिहासात आपले नाव जगज्जेता म्हणून गाजवू शकू असा प्रबळ आत्मविश्वासाचा उन्माद त्याला चढला. पारसिकांचे नि त्यांच्याही पूर्वीचे ते बाबिलोनियाचे महाराज्य जसे एका घडाक्यासरशी त्याने पादाक्रान्त करून टाकले तसेच त्याला लागूनच असलेले आणि ज्याची कीर्ति ग्रीक लोक पिढ्यानपिढ्या ऐकत आलेले होते ते भरतखंडही मी सहज पादाक्रान्त करून टाकीन अशा दुर्दम्य महत्त्वाकांक्षेने अलेक्झांडरने भरतखंडावरही स्वारी करण्याचे ठरविले. त्या धाडसी योजनेप्रमाणे त्याने लवकरच ग्रीकांचे अगदी निवडक, ताज्या दमाचे नि कोर्‍या करकरीत शस्त्रास्त्रांनिशी सज्ज असे नवीन सैन्य उभारले. त्यात एक लक्ष वीस सहस्र पायदळ नि पंधरा सहस्र घोडेस्वार होते. आजपर्यंत विजयामागून विजय मिळवीत आलेल्या आपल्या महासेनानी नि सम्राट अलेक्झांडरवर, ह्या त्याच्या पराक्रमी नि विजयिष्णु सेनासंभाराची इतकी श्रद्धा बसलेली होती की, ते ग्रीक सैनिक त्याला एक अलौकिक असा दैवी पुरुषच समजत. अलेक्झांडर स्वतःसही 'झ्यूस' (द्यु) देवतेचा पुत्र म्हणून म्हणवी.

## भारत राष्ट्राची तत्कालीन व्याप्ति

त्या दोन अडीच सहस्र वर्षांपूर्वीच्या काली सिंधु नदीच्या पलीकडे अगदी हिंदुकुशाच्या सीमेला भिडलेल्या प्रदेशापर्यंत भारतीयांची वस्ती नि राज्ये पसरलेली होती. आज ज्याला हिंदुकुश पर्वत म्हणतात त्याला ग्रीक लोक 'परोपनिसस' (Paropnisus) असे म्हणत. आज ज्याला अफगाणिस्थान म्हणतात त्याला त्या काळी गांधार म्हणत. 'अहिगणस्थान' हे अफगाणिस्थानचे आपले प्राचीन नाव आहे. काबूल नदीचे आपले त्या वेळचे प्राचीन नाव 'कुभा' असे होते. त्या हिंदुकुश पर्वतापर्यंतच्या ह्या सर्व प्रांतात भारतीयांची लहान मोठी राज्ये होती. ह्या भागातील राज्यापासून तो सिंधुनदी समुद्राला जेथे मिळाली आहे तेथपावेतो तिच्या दोन्ही काठांना लागून वैदिक धर्मानुयायी असलेल्या भारतीयांच्या लहान मोठ्या स्वतंत्र राज्यांची मालिकांची मालिका पसरलेली होती. ह्या राज्यांतील बहुतेक राज्ये ही प्राजक होती. त्यांना त्या काळी गणराज्ये म्हणत. त्यांची घटना अधानच

लोकसत्ताक पद्धतीची असे. राजसत्ताक राज्ये म्हणण्यासारखी तशी दोनतीनच होती त्यात ज्याला ग्रीक लोक पौरस असे म्हणत त्या पौरव राजाचे राज्य सगळ्यात मोठे होते.

## डॉ जयस्वाल ह्यांचा Hindu Polity ग्रंथ

'अभिनव भारत ह्या क्रांतिकारक संस्थेचे लंडनमध्ये सन १९०७ ते १९१० च्या कालात अेक प्रमुख सदस्य असलेले आणि पुढे प्राच्यविद्याविशारदांत जागतिक कीर्ति पावलेले डॉ जयस्वाल ह्यांनी लिहिलेल्या Hindu Polity ह्या सुप्रसिद्ध ग्रंथात सिंधु नदीच्या अुभय तटावर तिच्या समुद्रसंगमापर्यंत पसरलेल्या ह्या भारतीय 'गणराज्यांच्या' निरनिराळ्या लोकसत्ताक राज्यघटनांचे संशोधनपूर्वक विस्तृत वर्णन केलेले आहे

ग्रीक लोकांच्या पुराणाप्रमाणेच त्यांचे पूर्वज फार प्राचीन काळी भारताच्या सिंधूपलीकडील गांधारप्रभृति प्रांतातूनच मूळच्या आर्यवंशाच्या जानपदांची अेक तुटक शाखा होअून ग्रीसकडे गेले होते अशी त्यांची पुरातन भावना असे अलेक्झांडरचे सैन्य प्राचीन भारताच्या त्या भागात प्रवेशले तेव्हा तेथे त्यांना अकस्मात् अेक ल्हानसा समूह स्वत ला मूळचा ग्रीक समजणारा असा आढळला तो जरी भारतीयात मिसळून गेलेला होता तरी त्याने ते ग्रीक सैन्य पाहताच आपणही त्यांचेच पुरातन कालचे भाअूबंद आहोत असे सांगितले अलेक्झांडरलाही आपल्या प्राचीन पूर्वजांचे हच मूळ ठिकाण असल पाहिजे असे वाटले त्याला नि त्याच्या ग्रीक सैन्याला त्यांच्या ह्या प्राचीन पितृभूमीचे दर्शन झाल्याविषयी अितका अत्यानंद झाला की, त्या सार्‍या सैन्यानं काही दिवस युद्ध बंद ठेअून अेक महोत्सव साजरा केला ग्रीक लोकांनी ग्रीक देवतांच्या संतोषास्तव यज्ञ करून हवन अर्पिले

ग्रीक लोकांच्या देवतांचे वैदिक लोकांच्या देवतांशी अत्यंत सादृश्य होते. त्यांच्या देवतांच्या नावांचे अुच्चार तेवढे अपभ्रंशानुसार पालटलेले होत ग्रीक लोकही यज्ञ करीत, हवन देत ग्रीकांना आयोनियन्स असेही म्हणत

## आयोनियन्स नावावरून ' यवन ' शब्द पडला

क्वचित् ययातीचा पुत्र अनु ह्याचेच हे ग्रीक लोक वंशज असतील काय ? अन्वायन–अयोनियन अशी अपभ्रष्ट रूपे होत गेली असतील काय ? पण तो विषय संशोधकांकडे सोपविला पाहिजे अितके मात्र खरे की, ग्रीक लोकांना अगदी आरंभापासून आपले भारतीय लोक 'यवन' या नावानेच ओळखीत आलेले आहेत ही गोष्ट संस्कृत साहित्यावरून अुघड आहे ग्रीकांच्या 'अयोनिअन्स' ह्या नावावरून त्यांना भारतात 'यवन' किंवा 'योन' हे नाव पडलेले असावे.

## त्या काळी गांधार पंचनद ते सिंधपर्यंत बुद्धाचा पत्ता सुद्धा नव्हता

आणखी अेक गोष्ट अिथेच सांगून टाकण्यासारखी आहे की, पूर्वी अुल्लेखिलेल्या गांधारापासून तो पंचनद (पंजाब) प्रांतापर्यंत आणि तेथून सिंधु नदीच्या अुभय तटावरील प्रदेशापासून तो ती नदी समुद्रास मिळते तेथपर्यंत भारताच्या ज्या भागात अलेक्झांडरने संचार केला त्या त्या भागातील लोकस्थितीचे विविधांगी वर्णन त्या वेळच्या ग्रीक लेखकांनी दिलेले आहे. परंतु त्या सर्व वर्णनात वैदिक धर्मानुयायी भारतीयांचे अनेक अुल्लेख असताही बुद्धाचा किंवा बुद्धपंथाचा चुकूनसुद्धा अेखादा अुल्लेख आढळत नाही. ह्यावरून आणि अर्थातच अितर सर्व तत्कालीन पुराव्यावरून हे स्पष्ट होते की त्या कालापर्यंत भारताच्या शतद्रू पलीकडील भागात तरी बुद्धपंथाच्या अस्तित्वाचा पत्तासुद्धा नव्हता. म्हणजे बुद्धाच्या मृत्यूनंतर अडीचशे तीनशे वर्षे अुलटून जाअीतोपर्यंत केवळ मगध प्रांतातच बुद्धपंथाचा यत्रतत्र जो प्रसार झाला त्यापलीकडे काही त्याचे पाअूल पडलेले नव्हते. पुढील अितिहासाच्या अनुरोधासाठी ही गोष्ट ध्यानात ठेवली पाहिजे.

## ग्रीक म्हणजे 'यवन'; मुसलमानांना यवन म्हणणें हे चूक !

परराष्ट्रीय, आक्रमक आणि अन्न परधर्मीय अशा ग्रीकांना आपले तत्कालीन भारतीय लोक 'यवन' म्हणून ओळखीत परंतु त्यामुळे सर्वच परराष्ट्रीय आक्रमकांना यवन असे म्हणणे ही अर्थातच चुकीची गोष्ट होते. विशेषत मुसलमानांना आपले लोक जे यवन म्हणूनच म्हणू लागले ती तर घोडचूक होती कारण ग्रीक लोक आक्रमक नि परराष्ट्रीय जरी असले तरी सापेक्षत ते त्या वेळच्या विद्याव्यासंगी सुसंस्कृत नि सभ्य जगतातच मोडत होते. परंतु भारतावर ज्या मुसलमानांच्या टोळधाडी शतावधि वर्षांनंतर पुढे चालून आल्या त्या धर्मांध, रानटी नि विध्वंसक अशा राक्षसी वृत्तीच्या होत्या. तशा राक्षसी वृत्तीच्या मुसलमानांना 'मुसलमान' म्हणून ओळखणेच अवश्य होते. त्यानाही 'यवन' म्हणण्यात त्यांचा नसता गौरव करण्याची आणि 'यवन' शब्दाची नसती पायमल्ली करण्याची अशी दुहेरी चूक आपल्या हातून घडत आली. मुसलमानांना 'म्लेच्छ' म्हणता येअील, यवन नव्हे.

## वेडगळ मुसलमान समजतात तसा शिकंदर हा काही कुणी मुसलमान नव्हता

बहुमस्य मुसलमानांतील अेक वेडगळ समजूतही येथे सांगण्यासारखी आहे. अलेक्झांडर ह्या नावाचे पर्शियन भाषेत शिकंदर असे रूपांतर झाले होते. ग्रीकांचे साम्राज्य पर्शियावर होते तोपर्यंत अनेक पर्शिअन लोक अलेक्झांडरच्या अलौकिक

पराक्रमामुळे मोहित होअून आपल्या मुलानाही शिकदर हेच नाव ठेवू लागले पुढे पर्शियानील लोक मुसलमान झाल्यानतरही त्याच्यात मुलाना शिकदर हे नाव ठेवण्याची प्रथा चालूच राहिली भारतातील वाढग्या मुसलमानानीही तीच प्रथा अुचलली. त्या शिकदर ह्या शब्दाची ही मूळ कथा ठाअूकच नसल्यामुळे हिंदुस्थानातील सहस्रावधि मुसलमानाची अशी दृढ समजूत झालेली असते की, ज्या अर्थी महमद अल्ली, कासिम अित्यादि त्याच्या नावाप्रमाणे 'शिकदर' हेही त्याच्या मुसलमानी नावातच मोडते, त्याअर्थी हा पराक्रमी शिकदरही मुसलमानातीलच कोणीतरी महापुरुष असला पाहिजे! किंबहुना तो मुसलमान होता म्हणूनच तो अेवढा पराक्रमी नि दिग्विजयी निपजू शकला! असल्या कित्येक धमवेड्या, अडाणी नि आत्मप्रशसक मुसलमानाना जर कोणी सागितले की 'शिकदर' हा मुसलमान नव्हता. तो मुसलमान होअू तरी कसा शकेल? शिकदराच्या मृत्यूनतर अुण्यापुऱ्या अेक सहस्र वर्षांनी महमद पैगबराचा जन्म, तर तसले गावढळ मुसलमान त्या सागणाऱ्यालाच वेड्यात काढतील!

अलेक्झाडरच्या साम्राज्याची त्या वेळची सरसीमा हिंदुकुश पर्वत ही होती. अलेक्झाडर त्याच्यापुढे आपल्या तुवळ ग्रीक सेनेसह भारतावर जो चालून आला तो तक्षशिलेला येअून पोचला. तक्षशिलेचा राजा अबुज (अभी) याने युद्ध न करताच अलेक्झाडरचे माडलिकत्व मान्य केले काही ग्रीक लेखक म्हणतात की ह्या तक्षशिलेच्याच राजाने आपला प्रतिस्पर्धी जो पोरसराजा त्याचा मोड करण्यासाठी अलेक्झाडरला आपण होअून बोलाविले होते तसे असेल तर ह्या स्वजनद्रोहाचे प्रायश्चित्त अभी राजाला ग्रीकाशी दोन हात न करताच त्याना शरण जाअून हौसेने भोगावे लागले हे क्रमप्राप्तच झाले

## तक्षशिलेतील विद्यापीठ आणि अेक विलक्षण योगायोग

तक्षशिलेला तत्कालीन जगतात सुप्रसिद्ध असलेले अेक भारतीय विद्यापीठ होते त्या विद्यापीठात देशोदेशीचे विद्यार्थी येअून अनेक शास्त्राचे नि कलाचे अध्ययन करीत. अितकेच नव्हे तर देशोदेशीच्या राज्यातील राजपुत्रही तेथे येअून, तेथील अनुशासन पाळून, राज्यशास्त्र नि युद्धशास्त्र याचे शिक्षण घेत असत

कोण्या विलक्षण योगायोगाने, तिकडे अलेक्झाडर तक्षशिलेचे राज्य पादाक्रान्त करुन भारतात ससैन्य चाल करुन जात असता, अिकडे त्याच तक्षशिला विद्यापीठात तेजस्वी, तरतरीत आणि भारताच्या अितिहासात अेक देदीप्यमान असे सोनेरी पान ज्याच्या हातून भवितव्यता लिहविणार होती असा अेक तरुणही राज्यशास्त्राचे नि युद्धशास्त्राचे शिक्षण घेत होता किंवा ते शिक्षण घेअून नुकतेच बाहेर पडला होता. त्याचे नाव चद्रगुप्त आणि ह्या तक्षशिला विद्यापीठाच्या परिसरातच विविधशास्त्रपारावारपारगत नि राजकारणधुरधर असा अेक प्रौढ

पंडित त्या तरुणाला राष्ट्रीय क्रांतिकार्याचे नि राज्यशास्त्राचे धडे देत होता, त्याचे नाव चाणक्य !

परंतु शिकंदरच्या स्वारीने उडालेल्या हलकल्लोळात ह्या दोन सामान्य व्यक्ति कोणाच्याही डोळ्यात असामान्यपणे भरलेल्या नव्हत्या. त्या दोन व्यक्ति मात्र शिकंदरच्या त्या साऱ्या प्रचंड परचक्रीय हालचालींकडे डोळ्यात तेल घालून बघत होत्या भारतातील साऱ्या रावराजवळ, राजा महाराजांचे ते फुटकळ फुटकळ मुकुट अेकत्र वितळवून शिकंदर स्वतःच्या शिरावर धारण करण्यासाठी जो भारतीय सम्राट्पदाचा महामुकुट रणांगणात घडवीत होता तो आयताचे आयता त्या परशत्रूच्या हातून हिसकून घेअून आपल्या त्या तरुण शिष्याच्या मस्तकावरच ज्यायोगे बसविता येअील अशा अेका महान क्रांतिकारक कार्याची योजना तो प्रौढ आचार्य मनोमन आखीत होता

## पौरवराजाशी युद्ध

तक्षशिलेचा राजा अंभुज हा ग्रीकांच्या म्लेंच्छ सैन्याशी युद्ध न करताच त्यांचे आधिपत्य मानता झाला ह्या त्याच्या कृत्याची जो तो छी थू करू लागला. अंभुज राजाच्या ह्या क्षात्रधर्माला कलंक लावणाऱ्या वर्तनाचा वचपा काढण्यासाठी आपण आपापल्यापरी ग्रीकांशी प्रखर सामना द्यावयाचा निर्धार आजूबाजूच्या राजसत्ताक असलेल्या भारतीय राज्यानी नि गणराज्यानी केला दुर्दैवाची गोष्ट अितकीच की त्या सर्व फुटकळपणे स्वतंत्र असलेल्या भारतीय राज्याना त्या ग्रीक युद्धापुरते का होअीना, पण अेकत्र येअून अेकाच सैनिक नेतृत्वाखाली ते युद्ध लढण्याची बुद्धि झाली नाही म्हणा किंवा समय सापडला नाही म्हणा अलेक्झांडरने वेळ न दवडता तक्षशिलेला येताच आजूबाजूच्या सर्व भारतीय राज्याना शरण येण्याची आज्ञा सोडली आणि तक्षशिला राज्याला लागूनच असलेल्या पौरव (पौरस) राजाने ती आज्ञा धिक्कारून युद्धाचे आव्हान स्वीकारताच त्याच्यावर चाल केली

पौरव राजाच्या बळाचा मुख्य भर त्याच्या लढाअू रथावर नि हत्तीच्या बळावर होता तर अलेक्झांडरचा मुख्य भर ग्रीकांच्या रणनिष्णात घोडदळावर होता. ह्या दोन्ही सैन्याच्यामध्ये वितस्ता (झेलम) नदी होती अितक्यात त्या सैन्याचे तोंड लागायच्या आधीच अकस्मात् मोठा वादळी पाअूस पडू लागला. त्यामुळे नदीला मोठा पूर आला. तथापि अलेक्झांडरने थोड्याच दिवसात दूरवर शोध करीत नदीच्या वरच्या बाजूला असलेला अेक अुतार शोधून काढला नि झटपट त्याच्या त्या रणनिष्णात घोडदळासह नदी अुतरून पौरवाच्या पार्श्वावर चाल केली त्यामुळे पौरवाचा व्यूहच ढासळला तरीही राजा पौरवाने तुंबळ लढाअी दिली परंतु पावसामुळे त्या रणभूमीत जिकडे तिकडे चिखलच चिखल

झाल्यामुळे पौरवाचे रथ नि हत्ती ही दोन्हीही रणसाधने निकामी झाल्यामुळे अलेक्झांडरच्या घोडदळाच्या चढाईपुढे पौरवाच्या सैन्याचा टिकाव लागला नाही. त्या रणधुमाळीत हत्तीवर आरूढ झालेला पौरव राजाही जिवावर अुदार होअून लढत असता स्वतःच घायाळ झाला आणि अलेक्झांडरच्या हाती सापडला अशा प्रकारे अशन पौरवाच्या दुर्दैवामुळे नि अशात अलेक्झांडरच्या रणचापल्यामुळे ग्रीकांचा पूर्ण विजय झाला

## कौतुकाने नव्हे राजकारणासाठी !

पौरव राजाला बंदिवान् करून अलेक्झांडरपुढे नेले असता अलेक्झांडरने त्यास विचारले 'मी तुला कसे वागवावे अशी तुझी अिच्छा आहे?' तेव्हा पौरवाने अुत्तर दिले, 'राजासारखे!' आपल्या अिंग्रजांच्या नि युरोपीय अितिहासकारांनीही बहुधा असेच लिहिले आहे की 'पौरव राजाच्या धिटाअीच्या अुत्तराचे अलेक्झांडरला मोठे 'कौतुक' वाटले आणि म्हणून त्याने पौरवाला न मारता केवळ अवित करून पुन्हा राज्यावर बसविले परंतु हे वर्णन चुकीचे आहे विशेषत शालेय पुस्तकातून तरी अशी भोगळ स्तुतिवाक्ये घालू नयेत

कारण, स्वप्नात राज्य देण्याचे वचन दिले म्हणून जागे झाल्यावरही त्या वचनाप्रमाणे राज्य देअून टाकणारा अलेक्झांडर हा कोणी भावडट भारतीय राजा नव्हता जर पौरवाला त्याने ठार मारले असते किंवा त्याचे राज्य छिनावून घेअून ग्रीक जातीचा अेखादा 'क्षत्रप' अलेक्झांडरने त्या राज्यावर नेमला असता, तर त्या राज्यातील स्वाभिमानी भारतीय जानपद ग्रीकांच्या द्वेषाने अधिकच खवळले असते. अलेक्झांडरला अनेक शत्रूंशी लढत भारताची मुख्य राजधानी जी पाटलीपुत्र तिथपर्यंत जावयाचे होते ते केवळ त्याच्या समवेत असलेल्या जातिवंत ग्रीक सेनेच्या काय त्या बळावर थोडेच साधणार होते ! त्यापेक्षा तक्षशिलेच्या अंभुज राजाप्रमाणेच पौरवालाही दिखाअू दयेने जिंकून आपला अंकित नि पाठीराखा केल्यानेच अलेक्झांडरचा भारतविजयाचा हेतु सुलभतेने साधण्याचा अधिक संभव होता यास्तव पौरवाच्या धीरोदात्त अुत्तराने अलेक्झांडरला जे कौतुक वाटले तेवढ्यासाठी नव्हे तर या राजकीय डावपेचासाठीच त्या राजकारणपटु अलेक्झांडरने पौरवाचे राज्य त्याला परत दिले, अितकेच नव्हे तर आजूबाजूची जिंकलेली याही छोटीछोटी संस्थानेही पौरवाच्या राज्यात समाविष्ट केली आणि त्याला आपल्या त्या विस्तृत भारतीय प्रांतावरचा 'क्षत्रप' (Governor) म्हणून नेमिले पौरवानेही प्रसंग पडला बाका ह्या न्यायाने ते अलेक्झांडरचे बोलणे मान्य केले परराष्ट्रीय शत्रूंशी पौरवाने क्षात्रधर्माप्रमाणे झुंजण्याचे कर्तव्य बजावलेलेच होते, आणि 'तावत् काल प्रतीक्षेनाम्' हाही राजनीतीचाच दंडक आहे ! हे जाणून राजा पौरवाने अलेक्झांडरचे नावापुरते आधिपत्य मानून राज्य वचावले याचा भारतीयांना

विषादही वाटला नाही सधि येताच 'क्षत्रप' पौरवाने अलेक्झांडरचा हा डाव त्याच्यावरच कसा उलटविला तेही पुढे दिसेलच

## ग्रीसहून अलेक्झांडर नवे ग्रीक सैन्य भरीस मागवितो

पौरवाचे युद्ध सपताच अलेक्झांडरने आजूबाजूच्या लहानसहान सस्थानाना जिंकून त्या प्रदेशाची व्यवस्था लावण्याची आणि तेथील नि त्यापुढील प्रदेशातील लोकस्थितीची चौकशी केली. हिंदुकुशपासून तेथपर्यंत देश जिंकीत येण्यात त्याच्या मूळच्या ग्रीक सैन्याची जी हानि झालेली होती ती भरून काढण्यासाठी त्याने त्याच्या बाबिलोन नि ग्रीसमधील प्रांताधिपाकडून नव्या ग्रीक सैन्याची मागणी केली जुन्या सैन्यातील जे ग्रीक सैनिक घायाळ, अधू नि अगचुकार किंवा निकामी झालेले होते त्याना परत धाडले

## भारतीय यतीची नि योग्यांची चौकशी

भारताच्या त्याने जिंकलेल्या आणि जिंकावयाच्या प्रदेशातील लोकस्थितीचा वृत्तान्त समजून घेण्याकरिता अलेक्झांडरने जे चौकस लोक चहूकडे धाडले होते त्यानी आणलेल्या समाचारात तेथील अरण्यात वसत असलेल्या तपोवनाची, तपस्व्याची, नि सग नि अेकअेकटेच विचरणाऱ्या तत्त्वचिंतक यतीची, योग्याची नि प्रव्रजिताची वर्णनेही होती. स्वत सम्राट् अलेक्झांडरला विद्वत्तेची नि तत्त्वज्ञानाचीही अभिरुचि असे अलेक्झांडर हा स्वत स तत्त्वज्ञ अॅरिस्टॉटलचा शिष्य म्हणवी. ग्रीस देशामध्ये अशा यति, योगी, तत्त्वज्ञानी नि सन्यासी ब्राह्मणाची प्रख्याति असे. ती अलेक्झांडरच्याही कानावर पडलेली होतीच त्यामुळे त्याला त्या भारतातील सन्यासी ब्राह्मणाना, ज्याना ग्रीक भाषेत 'Gymnosophist' म्हणून सबोधीत, त्यापैकी काहीना प्रत्यक्ष पाहण्याची नि त्याच्याशी सभाषण करण्याची प्रबळ जिज्ञासा होती अरण्यातील तपोवनातून अलेक्झांडरने अशा काही सन्याशाना बोलावून घेतले आणि काहीची त्याच्याकडे जाअून भेट घेतली अशा प्रसगाच्या काही कथा ग्रीक लेखकानीच दिलेल्या आहेत त्यामधून अेक दोन कथा ग्रीक लोकाच्या नि अलेक्झांडरसारख्या अलौकिक सम्राटाच्या भावना व्यक्तविण्यापुरत्या ग्रीक कथानकाच्याच शब्दात सागतो

अशा अेका यतीची भेट झाली असता अलेक्झांडरने विचारले, 'माझ्या ह्या दिग्विजयाच्या कार्यास यश येअील की नाही ?' अशा अर्थाच्या त्याच्या प्रश्नास त्या यतीने शब्दामध्ये काहीच अुत्तर न देता अेक मोठे चामडे ज्याच्या दोन्ही बाजू अगदी सुकून वातड होअून धनुष्यासारख्या वक्र झालेल्या होत्या ते आणविले आणि नतर तो यति अलेक्झांडरला म्हणाला, 'हे चामडे नीट सपाट पसरून याच्यावर अेकटा बैस.' त्यावर अलेक्झांडरने किंवा त्याच्या आज्ञेने त्याच्या कोणा अधिका-

ऱ्याने त्या चामड्याच्या अेका टोकास बळाने दाबून त्यावर बसण्याचा प्रयत्न केला ताच ते दुसरे वातड टोक खाडकन वर आले ते दुसरे टोक खाली दाबून त्यावर बसू पाहाव तो पहिले वातड टोक खाडकन अुभे राहावे अर्थात् ते चामडे सपाट अथरता यअीना नि त्याच्या मधोमध चपखल बसता येअीना! ते दाखवून तो यति म्हणाला, 'तुझ्या भारतावरील स्वारीची अशी स्थिति होअील तू अेका बाजूला पुढे जिकीत जाशील तर तुझी मागची जिंकलेली राज्ये पुन्हा तुझ्याविरुद्ध अुठन तुज जोखड फेकून देतील तू मागे वळशील तर तुझी पुढची जिंकलेली राज्ये तुझे जोखड फेकून देतील तुला अखिल भारताच्या केंद्री सम्राटपदावर बसणे ह असे अशक्य आहे '

## ' डडामिस 'चा दडक

ग्रीक लेखक ज्याला Dandamis (डडामिस) म्हणतात आणि ज्याचे शुद्ध संस्कृत नाव मला तरी आटळल नाही अशा अेका सन्यस्त ब्राह्मणाची ख्याति तक्षशिलकडे अेकून त्यालाही बोलावून त्याच्याशी सभाषण करावे अशी अलेक्झाडरला अुत्कट अिच्छा झाली तो वयोवृद्ध नि ज्ञानवृद्ध ब्राह्मण सन्यस्त नि अुल्लिग अवस्थेत विचरत असे निरोपावारी तो सन्यस्त ब्राह्मण अलेक्झाडरकड जाअीना. तेव्हा अलेक्झाडरने आपल्या ' सेक्रेटस ' नावाच्या अधिकाऱ्याला त्या सर्वसगपरित्यागी ब्राह्मणाकडे धाडून आज्ञापिले की, ' जे प्रत्यक्ष ' झ्यूज ' देवतेचे ( सस्कृत ' द्यु ' चे) पुत्र आहेत त्या जगज्जेत्या सम्राट अलेक्झाडरने तुला बालाविले आहे जर तू येण्यास पुन्हा नकार देशील तर तुझा आताच्या आता शिरच्छेद केला जाअील ' ही धमकी अेकताच तो सन्यासी ब्राह्मण खदखदून हसला, आणि अुत्तरला की ' अलेक्झाडर हा जसा नि ज्या अर्थी ' झ्यूज ' देवतचा पुत्र आहे तसा नि त्याअर्थी मीही पण त्या द्यु चाच पुत्र आहे ! अलेक्झाडरची जगज्जेतेपणाची वढाअी ही व्यर्थ आहे त्याने ब्यास नदीच परतीरही अजून पाहिलेल नाही त्यापुढे ज्या शूर भारतीयांची राज्य आहेत आणि त्याच्याही पुढे ज भगधाच प्रबळ साम्राज्य आहे त्याच्याशी ताड दिल्यानतर जर अलेक्झाडर अुरला तर मग तो जगज्जेता आहे की नाही याचा विचार करता येअील ! मला अलेक्झाडर भूमिदान देअू म्हणतो, धन देअू म्हणतो, परतु त्याला जाअून साग की अशा वस्तूना माझ्यासारखे सन्यस्त ब्राह्मण तुच्छ मानतात ही माझी मातृभूमि मला ज हव त, आयी लेकराला देते तितक्या मायेने, मला पुरविते आहे अलेक्झाडर जर माझ शिर छाटील असल तर फार तर माझे शिर नि पिंड ज्या ह्या मातीतून घडल गेले तीतच त मिसळून जाअील पण त्याला माया आत्मा काही छाटता येणार नाही तो अच्छेद्य, अमर आहे अलेक्झाडरला साग की जे सत्तचे नि सुवर्णाचे दास असतील आणि जे मृत्यूला भीत असतील त्याना अशा धमक्या दे ! आमच्यापुढे अलेक्झाडरसारख्या अेका मर्त्य मनुष्याच्या अशा धमक्याच पागुळतात ! कारण खरा स यासी ब्राह्मण सुवर्णाने वश होत नाही आणि मरणाला भीत नाही ! ! मी येत नाही जा ! '

डडामिसने अलेक्झांडरच्या अधिकाऱ्याला दिलेल्या अुत्तरातून काही वाक्ये तेवढीं वर दिली आहेत ग्रीक लेखकांनी त्याचे ते बाणेदार अुत्तर सविस्तर दिले आहे Plutarch नेही ह्या कथा वर्णिल्या आहेत विशेषत 'डडामिसची' वरील कथा देअून काही ग्रीक लेखकांनी त्याच्या ह्या निर्भय नि बाणेदार अुत्तराने थक्क होअून म्हटले आहे, 'ज्या अलेक्झांडरने अनेक राष्ट्रे जिंकली त्या जगज्जेत्या अलेक्झांडर-लाही धूळ चारणारा जर कोणी ह्या जगात भेटला असेल तर तो हा वृद्ध नि नागवा अुघडा भारतीय ब्राह्मण सन्यासीच होय!!'

## अलेक्झांडर ब्राह्मणाना क्रांतिकारक म्हणून फाशी देतो !

ह्या चौकशीत अलेक्झांडरला असेही आढळून आले की, हे सन्यासी, योगी नि यति जरी फटिंगासारखे अेकट भटकत असले तथापि त्याच्या नि सग, निर्भय नि नि स्पृह वृत्तीमुळेच भारतीय गणराज्याच्या काय किंवा अेकसत्ताक साम्राज्याच्या काय राज्यचालकावर त्याच्या राजकीय मताचा अत्यत प्रभाव पडत असे भारतीय क्षत्रियाच्या खडगाच्या धारेअितकीच ह्या सन्यस्त ब्राह्मणाच्या जिभेची धारही तीक्ष्ण असून परकीय ग्रीकाच्या अन्याय्य आक्रमणाची ती तीव्र प्रतिकार करीत होती आणि अलेक्झांडरविरुद्ध भारतीय जनतेत प्रकटपणे वा गुप्तपणे प्रक्षोभ पेटवीत चाललेली होती हे ध्यानी येताच ह्या 'Gymnosophist' तत्त्वज्ञानी वर्गाविषयी अलेक्झांडरला प्रथमप्रथम वाटणाऱ्या जिज्ञासेचे रुपातर अशा सन्यस्त ब्राह्मणाच्या द्वेषात झाले तेव्हा अलेक्झांडर अशा काही ब्राह्मणाना पकडून फाशी देअू लागला अशा अेका ब्राह्मणाचा शिरच्छेद करण्याआधी त्याला जेव्हा विचारण्यात आले, 'तू अमक्या अेका भारतीय सस्थानिकाला ग्रीकाविरुद्ध का चिथविलेंस ?' तेव्हा त्याने ठासून सागितले की, 'कारण माझे असे ब्रीद आहे की जगायचे तर मानाने जगावे, अन्यथा मानानेच मरावे!' (Plutarch LXIV)

पौरव राजाचा पराभव कल्यानतर अलेक्झांडरला साहजिकच असे वाटल होते की त्याच्या त्या डोळे दिपविणाऱ्या जयामुळे आजूबाजूच्या गणराज्याचेही धैर्य आपोआपच खचून जाअील आणि ती प्राजके (Rpublics) आपण होअून पटापट शरण येतील परतु ही त्याची समजूत बहुताशी भ्रामक ठरली तो वितस्ता (झेलम) अुतरून जसजसा पुढे जाअू लागला तसतशी त्याच्या वाटेतील बहुतेक लहानमोठी गणराज्ये त्याच्याशी लढाअी देत चालली रणदेवतेचा निर्णय घेतल्या-वाचून ती त्याचे स्वामित्व सुखासुखी मानीनात ह्यामुळे त्यातील बहुतेकाना ग्रीकाचे बहुसख्य नि प्रबळ सैन्य जरी जिंकीत चालले होते तरी त्या सतत लढत रहा-ण्याचा ताण ग्रीकावरही पडल्यावाचून राहिला नाही

अशा अनेक हुजार भारतीय गणराज्याशी झालेल्या लढायाची वर्णने ग्रीक ग्रथकारानी दिलेली आहेत. परतु ती सविस्तरपणे किंवा सक्षेपानेही सागण्याचा

हा प्रसंग नाही. तथापि सारे भारत पादाक्रांत करून थेट मगध सम्राटाचा मुकुट आपल्या डोक्यावर मिरविण्यासाठी आलेल्या त्या प्रबळ लक्षलक्ष ग्रीक सैन्याशी आणि त्याच्या त्या असामान्य नि जगत्प्रसिद्ध 'देवसेनानीशी'— अलेक्झांडरशी भारतीय स्वातंत्र्यार्थ ज्या ज्या गणराज्यांनी फुटकळपणे का होईना, पण आपापल्यापुरता तुंबळ नि भीषण लढा दिला नि शेवटी अलक्षांडरला अगणातूनच परत जाणे भाग पाडले त्यांच्यातील काही गणराज्यांची नि राज्यांची वेचक उदाहरणे केवळ कृतज्ञतेसाठी तरी सांगितलीच पाहिजेत.

## सौभूति नि कठ गणराज्ये

ह्या दोन्ही गणराज्यांची राज्यघटना प्रजासत्ताक होती नि ती स्वतंत्र होती. डायोडोरस हा ग्रीक ग्रंथकार लिहितो की, त्यांच्या हाताखालील सर्व नगरांतील राज्यव्यवस्था नि निर्बंध हे अत्यंत हितकारक नि प्रशंसनीय होते. (They were governed by laws in the highest degree salutary and their political system was admirable.) ह्यांचे एक वैशिष्ट्य असे होते की, आपली प्रजा अधिकाधिक बलिष्ठ नि सुंदर निपजत जावी म्हणून प्रजनन हे व्यक्तिविषयक लहरीवर न सोपविता ते एक राष्ट्रीय कर्तव्य जाणून त्यावर राजसत्तेचे नियंत्रण ठेवलेले होते. ते शारीरिक सौंदर्याने मोहते होते. वास्तव त्यांच्यात विवाहाचे वेळी हुंडा घेण्याची चाल नसे. वधूवरांचे शरीरसौष्ठव, सुंदरता आणि निकोप नि बलिष्ठ संतति उत्पन्न करण्याची पात्रता हे गुण जुळल्यासच तो विवाह श्रेयस्कर मानला जाई. त्यांच्या गणराज्यांच धुरंधर पुढारी निवडण्यातही शरीरसौष्ठव नि बळ ह्या गुणांचाही विचार केला जाई. हे सुप्रजननाचे तत्त्व इतके कठोरपणे त्यांच्या निर्बंधात अनुस्यूत केलेले असे की, मूल जन्मल्यानंतर तीन महिन्यांचे आत त्यांची राज्याधिकाऱ्याकडून शारीरिक परीक्षा केली जाई. जर एखादे मूल जन्मतःच अत्यंत व्यंग दुर्धर रोगाने पछाडलेले वा विकृत असले तर त्यास राज्याज्ञेने निर्दयतेने मारले जाई!

ग्रीसमधल्या 'स्पार्टा' ह्या प्राजकातही आनुवंश (Heredity) सुधारण्यासाठी असेच निर्बंध असत हे ज्ञात्यास ठाऊकच आहे.

ह्या सौभूति नि कठ गणाप्रमाणे अगदी कठोरपणे नसली तरी बलिष्ठ नि सुंदर प्रजा व्हावी म्हणून जपणारी आणखी गणराज्ये भारतात असत. वृष्णीगणातही त्यांचे धुरंधर पुरुष बलिष्ठ नि देखणे असावे असा कटाक्ष ह्या काळच्या फार पूर्वीपासून असे. त्या वृष्णीगणाचा जगद्विख्यात नेता जो श्रीकृष्ण त्याच्या शरीरसौष्ठवाची नि बलिष्ठतेची ख्याति तर अजरामरच झाली आहे! श्रीकृष्णाचे पुत्रही अतिशय देखणे होते असे पुराणातून सांगितले आहे.

